मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या
इतिहास संशोधन मंडळाची ग्रंथमाला, क्र. १७

# विजापूरची आदिलशाही

## बुसातिन-उस-सलातीन

या फारसी ग्रंथाचें
नरसिंहराव विठ्ठल पारसनीसकृत
मराठी भाषांतर

संपादक
श्री. वा. सी. बेंद्रे

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळानें पुरस्कार दिलेले

मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या
इतिहास संशोधन मंडळाची ग्रंथमाला, क्र. १७

# विजापूरची आदिलशाही

बुसातिन-उस-सलातीन
या फारसी ग्रंथाचें
नरसिंहराव विठ्ठल पारसनीसकृत
मराठी भाषांतर

Origin of Shivaji's Ajña-patra see Dastur-ul-amal by Muhammad Adilshah P. 376-95




संपादक
श्री. वा. सी. बेंद्रे

१९६८

मुंबई -- १४

संपादक :
श्री. वा. सी. बेंद्रे,
१२।१४४, सहकारनगर, चेंबूर, मुंबई ७१.

आवृत्ती १ ली, नवंबर १९६८.

प्रती : १०००,

किंमत : रुपये वीस.

मुद्रक :
श्री. पु. गो. पाटील,
सत्कार प्रिंटींग प्रेस,
अलिबाग, जि. कुलाबा.

प्रकाशक :
श्री. वा. वि. भट,
प्रमुख कार्यवाह, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय,
१७२, नायगांव क्रॉस रोड, दादर, मुंबई १४.

~~क~~ तारीख-ए-फ़रिश्ता — ब्रिग्ज़, अंक प्रशान्ते
~~मि~~ ~~~~ ~~~~ 9323

Tarikh-e Ferishta Briggs III. 45, London 1829

Practice of enlisting only foreigners, Turks & Mughals
Afghans & Rajputs allowed if not Dakani P. 45
This continued upto Ibrahim II.
not true, see Ibrahim I, P. 79

Mostly Daknis were employed in A'nagar army P. 53

~~Ismail~~ Adilshah (not much to say

Ibrahim's tyranny P. 95
Murder of 40 Hindus & 70 Muslims causing disaffection 96
in 2 mths
Asad Khan died in 956/1549 P. 100

Raichur & Mudgal taken by Vijayanagar in 959/1551 AC P. 105
Ibrahim put to death many physicians who failed to cure him
trampled down
Very suspicious character
Buried at Gogy (with Ismail & Yusuf) P. 112

Founding of Shahpur town in memory of Ali's accession in 965 P. 116
Was Shia by persuasion P. 117 justice praised, Ali's rule prosperous 117
Ambitious to increase his dominions 118

Ali, Vijayanagar & Qutb invade A'nagar 966/1558 120-1
Chand Bibi to marry to Ali 125
" Sholapur to Ali
" Hadija Sultana to marry to Murtaza

Talikot battle 972/ Dec 26, 1564
1 lakh Hindus killed, 130
plunder & all excesses, 131

Dharwar fort Captured 975/1567, 132

Adoni captured in 976/1568, 133

{ Torgal taken in 981/1573 } 133
Dharwar "

e. हिमायरे 94 ...

Bankapore taken from Velapa वरदा after 14 mths in 983/1575 — p. 139

↑ temple demolished & a mosque constructed, Ali laid stone } p. 138

Chandragutty & Karoor also taken - 139

[illegible] Jerreh } ~~surrender~~ became subordinate 140
Rani of Barcelore }

Ranis govern in Malebar & Karnatak 140

142

Ali stabbed in 988/1579

Buried at Bijapur

The Juma mosque, ii) Howz-shahpur, iii) City wall } 143
iv) aqueducts of water constructed.

सातीमुस-सलातीन - बड़े, अंक पृष्ठांचे

बीदरचा किल्ला बांधला श १३२३
अहमदनगरचा " " श १३८६
विजापूरचा " " श १४३८
यूसुफ आदिल

१ यूसुफ आदिलखान शक १४१२-३२ यूसुफ व इस्माईल दफन - गोगी येथे
परंडा किल्ला बांधला श १४०८
बेळगांव " " १४०८
मिरज " " १४१०
सोलापूर " " १४०५

२ इस्माईल श १४३२-५६ - चम्पा महल बांधला श. १४४५
३ मल्लूशाह ७ महिने
४ प्र. इब्राहीम श १४५६-८०
५ प्र- अली आदिलशाह श १४८०-१५०२
शाहदुर्ग किल्ला बांधला श १४८२
रायचूर व मुदगलचे किल्ले जिंकले - Doaba श १४८६
विजापूर कोट बांधला श १४८८
धारवाड किल्ला बांधला श. १४९०
तोरगल, धारवाड, बंकापूर, अदोनी जिंकली

६ द्वि. इब्राहीम शक १५०२-४८
सातखणी महाल श १५०५
उपल्या बुरूज श १५०६
आनंद महल श १५१२
नवरसपूर वसविले श. १५२२-२८, पृ २४२
नवरस महाल श १५२३.
७ मुहम्मद आदिलशाह १५४८-७८
बंगलूरू व सेरा घेतले श १५५८
बसवपट्टण = शिवापट्टण श १५५८
चंदी घेतली श १५७२ } Tamilnad
पिलुकोंडा श १५७६ } → A.P.
चित्रगल, गंजीकोट
८ द्वितीय अली १५७८-१५९४
९ सिकंदर १५९४ ते १६०

# प्रकाशकाचे निवेदन

महाराष्ट्र राज्याचे माजी डायरेक्टर ऑफ आर्काइव्हज, डॉ. पु. म. जोशी यांचा हा ग्रंथ छापून प्रसिद्ध करण्याचा विचार होता. परंतु इतिहास संशोधन मंडळातर्फे तो ग्रंथ संपादून प्रसिद्ध करण्याची मनीषा आम्ही त्यांस सांगितली. डॉ. जोशी यांनी त्यास अनुमति दर्शविल्यावर श्री. बेन्द्रे यांनी आपल्या मोडी हस्तलिखितावरून प्रेस कॉपी तयार करण्यास घेतली. मुद्रण प्रत तयार होतांच साहित्य आणि संस्कृती मंडळाकडे अनुदानासाठी अर्ज करण्यांत आला व त्याचा विचार होऊन साहित्य आणि संस्कृति मंडळाने ताबडतोब रु. ७,५०० चे अनुदान मंजूर केले. साहित्य आणि संस्कृति मंडळाने अनुदान दिल्यानेच इतिहास संशोधन मंडळास हा ग्रंथ प्रसिद्ध करणे शक्य झाले. इतिहास संशोधन मंडळ त्यांच्या या साह्याबद्दल फार आभारी आहे. आदिलशाहीचा आणि विशेषतः सतराव्या शतकांतील कारकीर्दीचा इतिहास प्रथमच उपलब्ध करून दिल्याचे श्रेय इतिहास संशोधन मंडळाबरोबर साहित्य आणि संस्कृति मंडळालाहि आहे. इतकेच नव्हे तर गेल्या पाच वर्षात इतिहास संशोधन मंडळाने जी पंधरा पुस्तके प्रसिद्ध केली त्यांतील चार मोठे ऐतिहासिक साधनग्रंथ ( सुमारे अडीच हजार पृष्ठांचे ) केवळ साहित्य आणि संस्कृति मंडळाने अनुदान दिले म्हणूनच काढता आले. याशिवाय या वर्षी केवळ संशोधनास वाहिलेल्या आमच्या "इतिहास आणि संस्कृति" या त्रैमासिकालाहि अनुदान देऊन उपकृत केल्याबद्दल मंडळ साहित्य आणि संस्कृति मंडळाचे फार ऋणी आहे.

सदर ग्रंथाची छपाई चालू असतानांच साहित्य आणि संस्कृति मंडळाचे ( त्यावेळचे कार्यवाह ) श्री. सेतुमाधवराव पगडी यांनी प्रा. न. र. फाटक यांच्या मार्फत भाषांतर विषयक कांही सूचना संपादकांकडे पाठविल्या होत्या. या सूचनांपैकी योग्य वाटणाऱ्या कांही सूचनांचा मुद्रणाच्यावेळी विचार करण्यांत आला आहे. श्री. सेतुमाधवराव पगडी यांनी केलेल्या सूचनांबद्दल संस्था त्यांची आभारी आहे.

—**प्रकाशक**

# अनुक्रमणिका

# संपादकीय प्रास्ताविक

" बुसातिने–सलातीने " हा मूळ पर्शियन ग्रंथ आहे. त्या ग्रंथाचें ऊर्दु आणि दख्खनी हिंदीमध्यें झालेलीं भाषांतरेंहि उपलब्ध आहेत. परंतु हीं भाषांतरें मुळास सर्वस्वी धरून झालेलीं नाहींत. भाषांतरकारांनीं त्यांत आपल्या वेळच्या माहितीप्रमाणें बराच सुधार करण्याचा प्रयत्न केल्यानें त्यांतील तपशील बऱ्याच ठिकाणीं परस्पर विरोधी अगर विपर्यस्त असलेले थोड्याहि अभ्यासानंतर दिसून येतात. शिवाय मूळ जुन्या पर्शियन ग्रंथाचें भाषांतरकार, मग ते इस्लामी असोत किंवा हिंदु मुनशी असोत, त्यांना इतिहासकालीन व ऐतिहासिक भाषेचें ज्ञान नसल्यानें एक तर ते शब्दशः भाषांतर बोल भाषेंत करूं शकत नाहींत आणि केलेंच तर मजकुरापेक्षां शब्दाशब्दांचे अर्थ–विवेचनच अधिक करित राहातात. ते मजकुराचा गोषवाराच देतात. पण तसें करितांना ते आपल्या निवेदनांत ऐतिहासिक प्रसंगांच्या कार्यकारणभावाकडे आणि विशेषतः कालोल्लेखांकडे दुर्लक्ष करितात. शिवाय त्यांना इतिहासाची वास्तवबोधी पार्श्वभूमि माहित असतेच असें नाहीं. ते आपल्या प्रचलित इतिहासबोधाला धरूनच आपल्या गोषवाऱ्याची जुळणी करितात. विसाव्या शतकांत तर या जुन्या पर्शियन भाषेचा अभ्यास इतका अपुरा व उथळ झालेला आहे कीं, हे आधुनिक भाषांतरकार आपला सारा भर सध्यां उपलब्ध झालेल्या कामचलाऊ शब्दकोषांवर ठेवितो. साहजिकच सांस्कृतिक आंदोलनांत कालांतरानें शब्दांच्या उपयोगांत झालेले बदल लक्षांत येणें जड जातें आणि भाषांतरांत विपर्यस्त स्वरूप आलेलें दिसतांच ते आपल्या मनोभावनेप्रमाणे सुधारण्याकडे त्यांची प्रवृत्ति होते. विशेषतः अशा मूळ ग्रंथांची अनुपलब्धी व भाषांतर तपासून घेणारा व देणारा यांची दुर्मिळता या सुधाराकडे निर्धास्तपणें प्रवृत्ति राखण्यास या सध्याच्या गोषवारा सांगणाऱ्या पर्शियन भाषांतरकारांना अडचण भासत नाहीं.

हीं दुसऱ्या प्रकारचीं गोषवारा देणारीं पर्शियन ग्रंथांचीं भाषांतरें इतिहास-रचनेंत फ़ारशीं उपयुक्त ठरत नाहींत. असें निवेदन कथागोष्टींच्या रूपानें सांगितलेल्या तपशिला इतकेंच मुल्यवान राहिल्यानें त्यांचेंतून ऐतिहासिक वास्तवबोध करून घेणें धोक्याचेंच ठरतें. त्यामुळें असल्या गोषवाऱ्यांना ऐतिहासिक अव्वल साधनांचें महत्त्व देणें शास्त्रशुद्ध होणार नाहीं. इतिहासकालीन वस्तुस्थिती या गोष-वारी वाङ्मयावरून समजूं शकणार नाहीं. शद्बशः अर्थबोध करून देणारें भाषांतर जरी मूळ लेखनाचा सुलभपणें व थोडक्यांत बोध करून देणारें नसलें तरी त्यांत लेखकाच्या लेखनांतील आशय स्पष्ट करण्याची शक्य ती जबाबदारी घेतली जाते.

त्यामुळें लेखकाची मनोभूमिका स्पष्ट करण्याच्या प्रयत्नांत भाषांतरकार फिरवाफिरवी किंवा मजकुराची गाळागाळी करण्याच्या भरीस पडत नसतो. इंग्रज अधिकाऱ्यांनीं आणि विशेषत: ज्या अधिकाऱ्यांना इतिहास लेखनाभ्यासाची गोडी होती त्यांनीं बऱ्याच पर्शियन ग्रंथांचीं भाषांतरें आपापल्या मुनर्शीकडून तयार करून घेतलीं. त्यांतील कांहीं ब्रिटीश म्युझियम व इंडिया ऑफिसांत मी पाहिलीं. कांहीं अधिकाऱ्यांना जरी पर्शियन येत होतें तरी त्यांना आपल्या सरकारी कामांत भाषांतरें, नकला करून घेणें इत्यादि कामांकडे लक्ष देणें शक्य नव्हतें. परंतु त्यांनीं योग्य अशीं मिळतील तीं माणसें लावून हें काम करून घेतलेलें दिसतें. अर्थात या मुनशींची पर्शियन जशी बोलभाषा नव्हती तशीच इंग्रजीहि त्यांची बोलभाषा नव्हती. वाचण्या, समजण्या व लिहिण्या इतकें त्यांना या दोन भाषांचें ज्ञान होतें. त्यांचे भाषांतर कोणत्या प्रकारचे होतें व या भाषांतरावरून इंग्रज अधिकारी व संपादक आपला मसुदा कसा तयार करीत याची कल्पना यावी म्हणून पुढे काफीखानाच्या "मुंतकबुलतुबाब" मधील एक उतारा देतो:

"The account of the Nineth years reign after the King's accession to the throne answering to one thousand and seventy **sixth** ( **1078** ) years of the Heijra Including Seevahs arrival at Hozore. In the beginning of Rejoicing for the year the King was pleased to give one lack rupees to the Nabab Kudsuah Begum Sahebah in addition to her annual salary of twelve lacks rupees, besides he granted one lack and ten thousand gold Mohors ( each Mohor was changed in that time into seventeen rupees ) to aforesaid Begum in Ready Cash. Also Bestowed two thousand horsemen together with two lacks rupees Ready money to the Prince Mahomed Moosuma – and in the like or the same manner to all other Princes and Begums with ready money and additional Munsubs or offices – and the Rajah Jeesansingh (who had in that time in conjunction with – Seevah the Deviating from the right road displayed all his braveries and valours ) after he done Pillaged the part of the Beejapore and done fought that Province (so that its particulars will be Mentioned by and by) made the Seevah Most hopeful to have the royal favours and he himself stood responsible to him to make the King favouror on him and to Receive or Excuses and Despatched him to the Kings heavenly court, and In this festive occasion ( the diffusing to light in the

world ), The king after he was reported the news of arrival of such a man of Bad ended near to the Akbarabaud gave orders to Konarum Singh, son of the Rajah Jeesingh, and to Mukhlis Khan to advance some road forewardly to meet such animal-like Man of Bad Nature and to Bring or to conduct him to his Hózore and to make him an interview with him and the King shortly after had sent – the treasury according to the time from the fort of the Royal residence – to the fort at his Capital, buy any his present the King sent for the Treasury again by Naumdaur Cawn to the fort of Akbarabaud who ( or the Naumdaur Cawn ) In the same days having tied about one thousand and four hundred bullock to the eight carriages ( each of them was loaded full of gold Mohor, rupees and plates made of gold and silver and other articles set with jewels ) and arrived along with them into the fort of Akbarabaud for the purpose that the Eyes of the aforesaid Infidel and whole other adversaries and Enemies of the household of Sahib Kauraun or Great Emperor may be Blinds, and on the eighteenth of the month of Zeekasah of the same year when they Rejoiced on account of the Weighing the King for Fifty years of his noble age the Seevah ( who was the beastlike in condition and quality ) together with Sumbah who was his young son, that is he was then nine years old, arrived at Hozore and with a great shame and bashfulness acquired the Honour and Felicity of the King's visit and he presented one thouoand five hundred gold mohor and six thousand rupees (all together was reckoned to the amount of thirty thousand current rupees at that time by way of Nazar and Niauz or intruding with great humility, and on the signal of the King They made him to stand with the persons of five Huzaree in ranks–because he had been pleased to class his son of eight years old lately with five Huzaree ( Mansabdars ) and besides Nuttojee ( a relation to the Seevah and his Particulars would be mentioned Including the subject of Bravery of the Rajah Jeesingah who was bestowed in reducing and ruining the country of Beejapore ) likewise has been exalted to the same rank, though the Seevah ( the queer, blockhead and fraudful ) resting on the favours and the Promises of Rajah Jeesingah (who had made him hopeful in whole) had claimed that he would not be classed into lesser than seven huzaree, but on account of some

misconduct and bad behaviours ( which happened from him and it was taken place in the heart of the King the Defender of Faith ) He could not find a single proof out of those claims as also he was not treated civilly in esticbaul or in sending the certain Ameers as his mind willing. In cousequence before he was treated with Donations of a Robe of honour, jewels and elephant the sweat of ignorance intermixed with bashfulness is appeared from the face of situation, and at every moment he used to plunge himself into the water of deep consideration and through his lmposture and fraudulence went away to a corner stating his feebleness and put himself on the ground as the chance that shot with arrow or newly arrived into the net, and after few hours occurred he returned through his artfulness and artifice to his own sense and turned face to Kanoram Singah to speak. In the meantime he disclosed all his eomplaints and his losing his time for nothing–Though the said Kanoram Singah comforted to such beastlike man of ill natured too much, but which effected nothing, when all his motions which were contrary to the respects and to the good manners were reported to the King who being much disgusted by him ordered him to take leave from him before he could obtain the Royal Farman and made him to come down into the house that was fixed for him by the contrivance and deliberations of Ramasingh beyond the city and close to the habitations of Jeesingh and he ordered that the Seevah may write the whole circumstancea to the Rajah Jeesingh and untill he received an answer from him he may do as he think proper and just and he may not come to his presence to perform the Mujran or salutation, but his son was ordered to come to the Mujran or Royal salutation along with Ramasingh. *

यावरून एकोणिसाव्या शतकाचे प्रथमार्धात व तत्पूर्वी पर्शियन ग्रंथांची भाषांतरे कशीं शब्दशः अर्थाने व समजुतीसाठी अर्थाची फोड करून केली जात याची कल्पना येईल. हाच काफीखानाच्या लिहिण्याचा भाग संपादकाने कसा सुधारून व त्याच्या कामास जरूर नव्हता व उद्देशास जुळता नव्हता तो भाग गाळून तत्वार्थाचा

* Pp, 211–16, no. 9, part 1, Persian, Unbound translstions, class I, Mackenzie Collection, Secretary of State for India Library, London.

विशेषार्थाने बोध करून देताना कसा आपल्या कल्पनांना वाव दिला व दिला जात असे याची नीट कल्पना यावी म्हणून तोहि संपादकाचा उतारा येथे माहितीकरिता देतो. :

* Ninth year of the reign, 1076 A. H. ( 1666 A. D. ). Siwaji at the Imperial Court.

Rajah Jai Sihgh, in the war with Bijapur, to be described presently, had, with the cooperation of Sivaji, done splendid service. After giving Sivaji every assurance of a kind gracious reception, he made himself responsible for his safety, and sent him to Court. News of Sivaji's arrival was brought as the festival of the accession was being celebreted. It was orderd that Kunwar Ram Singh, son of Rajah Jai Singh, with Mukhlis Khan, should go out to meet and conduct that evil malicious fellow into Agra. On the 18th Zilkada **1076** Sivaji and his son of nine yeara old, had the honour of being introduced to the Emperor. He made an offering of **500 Ashrfies and 6000 rupees** altogether **30,000 rupees.** By the Royal command he was placed in the position of a Panchhazari. But his son, a boy of eight years, had previously been made a panchhazari and Nathuji, one of his relations who has rendered great service to Rajah Jai Singh in his campaign aginst Bijapur, had been advanced to the same dignity, so that Sivaji had a claim to nothing less than the dignity of a haft-hazari ( 7000 ). Rajah Jaising had flattered Sivaji with promises, but as the Rajah knew the Emperor to have a strong feeling against Sivajee, he artfully refrained from making known the promises he had held out. The istikhal or receiption of Sivaji, had not been such as he expected. He was annoyed, and so, before the robe and jewels and elephant, which were ready for presentation to him couid be presented, he complained to Rama Slngh that he was disappointed. The Kunwar tried to pacify him, but without effect. When his disrespectful bearing came to the knowledge of the Emperor, he was dismissed with little ceremony without receiving any rank of the lmperial bounty and was taken to a house outside the city near to the house of Raja Jai Singh, as had been arranged, by Kunwar Singh. A letter was sent to the Rajah Jai Singh, informing him of what has passed, and Sivaji was forbidden to come to the Royal presence

until the Rajah's answer and advice should arrive. His son was ordered to attend the presence in the company of Ram Singh."*

या दोन उताऱ्यांवरून मूळ पर्शियन ग्रंथाचें शब्दशः भाषांतरांत अवास्तवता किंवा एकपक्षीयतेला हिडीस स्वरूप कसें प्राप्त होतें व संपादित भाषांतरांत तपशीलांत कशी कातर लागल्यानें विपर्यास होतो व त्याचबरोबर या पुराव्यांतील दिसून येणारी भिन्नता लक्षांत येण्यास मदत होईल. अनुवाद हा अर्थाचें स्पष्टीकरण करण्याचा एक प्रयत्न असतो. त्यांत अनुवादकाच्या मनोभूमिकेची छाप बसलेली असते. मग ती बरीवाईट, खरीखोटी, वास्तवबोधी वा विपर्यासात्मक कोणतीही असूं शकेल. इतकेंच नव्हे तर समजुतींत आलेला कोतेपणाहि प्रसंगविशेषीं मूळ साधन निकस करण्यास कारण होतो. शिवाय ज्या उद्देशानें हा भाषांतराचा खटाटोप केला जातो त्या उद्देशानुरुप त्या ग्रंथांतील वेचक तपशील उचलला जातो. इंग्रजांच्या भाषांतरांच्या प्रयत्नांत विशे-षतः भारतीय म्हणजे मोगली इतिहासाकडेच ओढ असल्यानें त्यांनीं त्या ग्रंथांतील दक्षिणेंतील शाह्यांची व मराठ्यांची जी बारिक सारिक, पण प्रांतीय इतिहासाच्या दृष्टीनें फार महत्त्वाची माहिती आलेली असते ती बहुधा गाळलेली आढळते. मोगलांशीं संबंध जडले तितक्यापुरतीच पण पूरक माहिती घेतलेली आहे. अर्थात दक्षिणेंतील शाह्यांचा अगर मराठ्यांचा, विशेषतः शिवशाहीचा, इतिहास लिहावयाचा तर या भाषांतरांपेक्षां मूळ ग्रंथांतच अधिक माहिती मिळण्यासारखी आहे. परंतु एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत भारताच्या इतिहासाच्या शास्त्रशुद्ध पुनर्रचनेकडे अभ्यासूंचें लक्ष वेधूं लागलें तेव्हां अशा तऱ्हेची गाळागाळी कमी होऊं लागली. अकबर, जहांगीर, औरंगझेब वगैरेंचीं चरित्रें जशीं प्रसिद्ध झालीं तसेंच दक्षिणेंतील शाह्यांच्या फेरिस्ता, मासिरुइ-अलमगिरी वगैरे ग्रंथहि प्रसिद्ध झाले. त्यामुळें तप-शिलांतील जरी उणेपणा गेला असला तरी हीं भाषांतरें शब्दशः केलेलीं आहेत असें नाहीं. सारार्थानेंच मुळांतील तपशील भाषांतरांत आलेला आहे. खास हिंदी लोकांचेंच लक्ष या कार्यावर केंद्रित होईल तेव्हां हाहि दोष दूर होईल यांत शंका नाहीं.

भारत स्वतंत्र झाल्यापासून भारताला शाह्यांच्या अथवा सम्राटांच्या दृष्टिकोनां-तील इतिहासापेक्षां राष्ट्रीय दृष्टिकोनांतून इतिहासाच्या फेररचनेची निकड फार भासूं लागली आहे आणि ही निकड दूर करण्यासाठीं इतिहासाचीं मूळ साधनें अखिल भारताच्या दृष्टिनेंच संपादिली जाणें आवश्यक झालें आहे. भारताची ही साधनसंपत्ति केवळ मायभाषेंत नसून ती पर्शियन, इंग्लिश, फ्रेंच, डच आदि परदेशीय भाषांतूनहि उपलब्ध होण्यासारखी आहे. इंग्रजी व देशी भाषेचें ज्ञान सध्यां सहज सुलभ असल्यानें

* 'History of India as told by its own Historians,' by Elliot and Dawson, Vol, VII, P. 276.

त्या बाबत अडचण भासत नाही. परंतु पर्शियन फ्रेंच व पोर्तुगीज या भाषा सर्वच इतिहासाभ्यासूंना शिकणें, आणि विशेषतः इतिहासकालीन वाङ्मय तत्वार्थानें जाणण्याइतकी तयारी करणे, आवश्यक आहे, परंतु तसें होणें फार जड आहे. अशा परिस्थितींत हीं महत्त्वाचीं साधनें शब्दशः भाषांतरित झालीं पाहिजेत आणि हें काम भाषाभिज्ञांनींच केलें पाहिजे. परंतु विशिष्ट दृष्टिकोनांतून व पूर्वग्रहदूषित आणि इतिहासशास्त्राचें अज्ञान असणाऱ्या भाषांतरकारांचीं भाषांतरें राष्ट्रिय इतिहास-रचनेस उपयुक्त होण्यापेक्षां तत्कालीन वास्तवबोध करून देण्यांत फसगतच करितील.

मूळ 'बुसातिने सलातीन' हा पर्शियन ग्रंथ फकीर महंमद झुबेरी यानें लिहिला असून त्याचा लेखनकाल अगदीं अलिकडचा म्हणजे इ. स. १८२४ चा आहे. हा ग्रंथ छापला गेला आहे. परंतु त्यासाठीं वापरलेली नकल तितकी विश्वसनीय दिसत नाहीं. जुन्या पद्धतीप्रमाणें या नकलकारानें कित्येक ठिकाणीं आपली माहिती त्यांत घुसडली आहे व मुळांतील कांहीं गाळली आहे. त्यानंतर या ग्रंथाचे दख्खनी हिंदी भाषांतर गायकवाड पुस्तकमालेंत देवनागरी लिपींत इ. स. १८८५ सालीं बडोद्यांत प्रसिद्ध झालें. हा ग्रंथ महंमद फजलूल हक ऊर्फ अहमद मियां याणी तयार केला असून यांतील तपशील मराठी भाषांतरांतील तपशिलाशीं तपासून पहातां या दख्खनी ग्रंथांत कांहीं भाग गाळल्याचें आढळून येतें. या ग्रंथाचें उर्दूत भाषांतर प्रसिद्ध झालें आहे. परंतु यांत मूळ मजकुराचे बऱ्याच ठिकाणीं विपर्यस्त स्वरूप दिलें असल्याचें दिसतें. त्यामुळें या ग्रंथांचा व मूळ ग्रंथाच्या या मराठी प्रतीची चिकित्सा करून अभ्यासूंचा वेळ न घेणें बरें. या ऊर्दु ग्रंथाबद्दल कांही युरोपिअन इतिहासकारांनीं आपलें विरोधी मत प्रदर्शित केलें आहे. त्याचप्रमाणें माजी डायरेक्टर ऑफ आर्काइव्हज, डॉ. पी. एम्. जोशी यानींहि मजजवळ या ग्रंथाबद्दल नापसंती दाखविली होती. असो. मूळ पर्शियन ग्रंथ जरी उत्तरकालीन असला तरी या ग्रंथ-कारानें आपली बरीच माहिती समकालीन ग्रंथांच्या आधारानेंच दिलेली असल्यानें या ग्रंथांतील ऐतिहासिक माहितीला बरेंच वरचें अग्रस्थान प्राप्त होते. या ग्रंथाच्या आधारग्रंथांत जे ग्रंथ वापरल्याचें मूळ लेखकानेंच लिहिलें आहे त्यांत पुढील ग्रंथांचे उल्लेख आलेले आहेत.

(१) नवरसनाम फरिस्ता – गुलशने इब्राहिमी – महमद कासम फरिस्ता कृत (१६०६ –१६१० इ. स.).

(२) तजकरदुलमुलुक – मीर रफिउद्दीन शिराजी कृत (१६०८–१६०९ इ. स.).

(३) महमदनामा – मुल्ला जहूर वल्द मुल्ला जहूरी (१६५६ इ. स. पूर्व).

(४) रनशाय अली आदिलशाही – सय्यद नुरूल्लाह वल्द काजी सय्यद अली महंमद नुरूल्लाह कृत (१६७६ इ. स. पूर्व).

(५) अलीनामा – मलिकुषाआरा दक्षणी मिया नसरती कृत ( १६७६ इ. स. पूर्व ).

(६) गुलषने ईष्क – मिया नसरती कृत ( १६७६ इ. स. पूर्व ).

(७) तब्रेयेक आदिलशाही – शेख अब्दुल हसन वलद काजी अब्दुल आजिज कृत ( १७०० इ. स. पूर्व ).

(८) जव्हेररूह – शेख महंमद बहरी कृत ( १७०० इ. स. पूर्व ).

(९) जव्हेरे कुनिया – शेख महंमद बहरी कृत ( १७०० इ. स. पूर्व ).

ग्रंथकाराच्या लिहिण्याप्रमाणें त्यास मदमदनामा व तब्रेकेय आदिलशाही हे दोन्ही ग्रंथ संपूर्णावरर्थेत पहावयास मिळाले नाहीत. या आधाराशिवाय ग्रंथकारानें आपल्या पुस्तकांत ज्या इतर लेखकांचे उल्लेख केलेले आहेत त्यांत पुढील नांवे आढळतात : (१) शमसुद्दिन, (२) मीर इब्राहीम आसदखानी, (३) मिया हपमी, (४) मिर्झा मर्सियाखान, (५) शाह अब्दुल मआनी, (६) मुल्ला अब्दुल रिझाहिया, (७) आबीम, (८) अब्दुल कादर नवरसी, (९) अब्दुल लतीफ, (१०) अब्दुल नबी, (११) हकीम आतशी, (१२) मिर्झा हकीम, (१३) मिर्झा दौलतशाह. भाषांतरकारानेहि मूळ फारशी ग्रंथाचे भाषांतर करिताना जे फरहंगीचे म्हणजे कोषांचे ग्रंथ आधारार्थ पाहिले त्यांत त्याने (१) फरहंगे जेहानगिरी, (२) बुरहान काते, (३) कंजुल्लुगात, (४) कषफुतल्लुगात, (५) मुंतखबुल्लुगात षाहनेहानी, (६) वबिदुलफुजला वगैरेंचा उल्लेख केलेला आहे.

मूळ ग्रंथकारानें जरी कांहीं तत्कालीन ग्रंथ पाहिल्याचें म्हटलें असलें तरी त्यानीं त्यांतील सर्वच संबंधित प्रसंग, तपशिल किंवा कालोल्लेख घेतलेत असे दिसत नाहीं. ग्रंथांत आलेल्या टिपांवरून निदान कालोल्लेखांबाबत ही बाब तपासून घेतां येईल. आधारग्रंथांतील परस्पर विरोधी मजकुराची जरी थोडीबहुत चर्चा केलेली असली तरी हा मूळ ग्रंथकार नेहमीच्या चरित्रनायकांच्या कृष्णकृत्यांवर पांघरूण घालणें, शक्य तो गुणांचे अतिशयोक्तीनें वर्णन करणे, दुष्कृत्यें व पराजय याबाबत मुग्धता स्वीकारणें ही जी तत्कालीन बखरकरांची किंवा चरित्रकारांची वैशिष्ट्यें आहेत त्यांची साक्ष या ग्रंथातहि पटते. पक्षियतेचा पगडा लेखकावर बसलेला आढळतो. साहजिकच समकालीन आधारांवर जरी या ग्रंथाची उभारणी झालेली असली तरी उपरनिर्दिष्ट वैशिष्ट्यांतून सजविलेला मजकूर वास्तवबोधी चष्म्यातून चिकित्सकानें तावून सुलाखून घेणें जरूर आहे आणि ही चिकित्सा मूळ आधारग्रंथ व शत्रुपक्षीय ग्रंथ यांचा मेळ घालण्यानेच साधता येण्यासारखी आहे.

'बुसातिने सलातिने 'चें हें मराठी भाषांतर मूळ ग्रंथानंतर २०–२५ वर्षांच्या आतच झालेलें आहे. मूळ व मराठी भाषांतरित ग्रंथावरून असें दिसतें कीं, ह्या दोन्हीहि प्रयत्नांना चालना देणारे इंग्रज अधिकारीच आहेत. बहुधा जी मूळ ग्रंथाची

सरकारी प्रत होती तीच भाषांतरकारास भाषंतराकरितां मिळाली असावी. भाषांतरकारानें आपलें भाषांतर पुरें करित आणल्यावर त्यानें आपले इंग्रज अधिकाऱ्याकडे एक विनंति पत्र २ मोहरमला लिहिलं त्यांतील मजकूर असा : ...... दिगर मजमन यंकेषाहेब बहादूर याणी विजापूर येथील पादशाही कारकीर्दीचे वर्णनाची पारसी किताब " तारिखे विजापुरी " ही मऱ्हाटींन तरजुमा करण्याकरितां मजकडे दिल्ही. त्या किताबीचा तरजुमा शेवटास आला आहे. परंतु सदरहू किताबीचे शेवटी इंग्रेज सरकारचे फारच दुर्गुण वर्णन केले आहेत. तेव्हां येविसीचा तरजुमा करणे नीट दिसत नाही. हें वर्णन तसेंच ठेऊन येथपर्यंत ग्रंथ समाप्त करावा किंवा कसें येविसी फार जलद हुकुम पाठविण्यांत यावा. कारण कीं, मजला वारीस श्रीपंढरीस जाणेची फार जरूर आली आहे. तरी वारीकरितां जाणेविसींहि हुकुम लिहून आला पाहिजे." या २ मोहरमच्या पत्राचे उत्तर " मेहरबान बाबा पारसनीस यास मेहेरबान बारटल फ्रीयरसाहेब एस्कोयर कमिशनर बहादुर इलाखा सातारा " नहराहून ९ नवंबर १८५० रोजीं लिहितो कीं, " निंदेचा तरजुमा तुम्ही बिन फिकीर करून काम पुरे करून पंढरीहून आल्यावर तरजुमा हुजूर जाहिर करणे." यानंतर ग्रंथसमाप्तीनंतर ग्रंथसमाप्तीची तारिख व नंतर या ग्रंथाची दुसरी म्हणजे प्रस्तुत पुस्तकांत वापरलेली व ग्रंथकाराने मुद्दाम करवीराधिशासाठी तयार केलेली प्रत यांचा समाप्तीकाल देतांना भाषांतरकार लिहितो : " ......१२६६ हिजरी ...या सनांत हा ग्रंथ षहर सातारा येथें सुाा इहिदे खमसैन व आलफ, छ २९ जिल्हेज मुाा तारिख, ५ माहे नवंबर सन १८५० इसवी सन, १२६० फसली, कार्तिक शुाा १ प्रतिपदा शके १७७२ साधारणनाम संवत्सरे रोज मंगळवारी प्रातःकाली समाप्त जाहाला असे. " पुढें लिहितोः" सदरहु तारखेस ग्रंथ समाप्त जाहालेला मेहरबान फ्रियरसाहेब बाहादूर कमिशनर इलाखा सातारा याणी करविला. तो गत वर्षी त्यांचा त्यास दिल्हा. त्या ग्रंथाची प्रत श्रीमन्महाराज छत्रपति स्वामी राजधानी संस्थान करवीर यांहीं मी नरसिंगराव विठल पारसनीस निसबत सरकार इलाखा सातारा या मज सेवकास समक्ष आज्ञा केली कीं सदरहू ग्रंथाची एक प्रत या सरकारांत तुम्ही लिहून हजर करून स्वामी सेवा करून दाखवावी. त्यावरून ही प्रत लिहिली. हें लिहिणे आज मिति कार्तिक शुाा १ प्रतिपदा शके १७७३ विरोधकृतनाम संवत्सरे तारिख २५ माहे आगटंबर सन १८५१ इसवी रोजी समाप्त जाहाले. हा ग्रंथ षहर सातारा येथें सदरहू मितिस समाप्त करून श्रीमंत छत्रपति स्वामी संस्थान करवीर यांचे सेवेंत हजर केला असे. दस्तुर नरसिंगराव विठ्ठल पारसनीस निाा सरकार इलाखा सातारा. " या उल्लेखांवरून भाषांतराचें कारण, भाषांतराच्या समाप्तीचा काल व जी प्रत प्रस्तुत ग्रंथाचे संपादनासाठीं वापरली आहे तिचाहि लेखनकाळ व प्रत तयार करण्याचें कारण लक्षांत येते. त्यावरून ह्या प्रतीच्या ऐतिहासिक मुल्यमापनास जरूर तो सर्व पुरावा उपलब्ध होत आहे.

मराठी भाषांतरकार नरसिंगराव विठ्ठल पारसनीस हे प्रथम सातारकर छत्रपतींचे पारसनीस होते. नंतर त्यांना इंग्रजाकडे कदाचित याच भाषांतराचे कामावर घेतलेसें दिसतें. या लेखकाच्या लिहिण्यावरून त्यानें मुळ फारसी ग्रंथ "कोशांचे आधारानें सर्व विद्वान लोकांस पसंद पडे असा सप्रमाण अर्थ फारसी शब्द न सोडतां महाराष्ट्र भाषेत मेळ घालून यथामती केला आहे." सारांष, मूळांत गाळागाळी वगैरे केलेली नाही. या भाषांतरकर्त्याचे वडील रा. रा. विठ्ठलराव सखाराम उर्फ आबासाहेब पारसनीस हे चां. का. प्रभु ज्ञातींतील एक मोठे संस्कृतज्ञ पंडित होते. यांच्या घराण्यांत जरी पारसनविसीचा कामधंदा होता तरी आबासाहेबानीं मोठे पंडित म्हणून प्रतापसिंहाच्या कारकीर्दीत नांव मिळविलें होतें. आबासाहेब यांचे चिरंजीव नरसिंह विठ्ठल उर्फ बाबासाहेब हेहि फारसी भाषेचे चांगले जाणते लेखक असल्यानें सर बारटल फ्रियर यानी बुसातिने सलातिन सारख्या मोठ्या ग्रंथाचे मराठींत भाषांतर करण्याचें काम त्यांचेकडे सोंपविलें. शके १७५९ हेमलंबीनाम संवत्सरे जेष्ठ बहुल नवमीच्या (२६ जून १८३७) प्रतापसिंह छत्रपतींनी लिहिलेल्या आज्ञापत्रांतील मजकूर "राजमान्य राजश्री विठ्ठलराव सखाराम पारसनीस चांद्रसेनीय कायस्थ प्रभु दिमत हुजरात यांसी आज्ञा केली ऐसी जे ………त्यास यथोचित जें कर्म असेल तितकें शास्त्रार्थानें लिहून ग्रंथ सप्रमाण करून द्यावे म्हणून सरकारची आज्ञा जाहाली : त्याजवरून श्रुति-स्मृति-पुराणादि सर्व ग्रंथ संदोहन करून, "मथितार्थ सिंद्धांतविजय" ग्रंथ 'कर्मकल्पद्रुम' ग्रंथ, 'चरणविलास' ग्रंथ व 'वंशवृक्ष' संस्कृत व प्राकृत इत्यादि करून सरकारांत दिल्हे. त्यांच्या प्रती सरकारांनी छापविल्या… …सदरहू ग्रंथ… … निर्मत्सर पंडित मंडळींनी पाहून पसंत केले आहेत…… त्यावरून मनास आणितां तुम्ही स्वामीचे मनोदयानुरूप श्रुतिस्मृतिपुराणादि अनेक ग्रंथ प्रमाणावरून ग्रंथ वगैरे करून सेवा करून दाखविली व ते शास्त्रार्थ सर्वत्र निर्मत्सर विद्वान ब्राह्मणांत पसंत जाहाले, त्यावरून स्वामी तुम्हावर कृपाळू होऊन तुमचें नांव हमेशा सरकारांत व सर्व महाराष्ट्रीय क्षत्रीय ज्ञातींत रहावें यास्तव हें आज्ञापत्र तुम्हास व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें दाखल्यास करून दिल्हे असे."[1] या पंडित आबासाहेबांचा मुलगा नरसिंह हा अर्थातच विद्वानांच्या सानिध्यांत व सुसंस्कृत वातावरणांत वाढलेला होता. शिवाय हें घराणें वारकरी पंथांचे होतें असें वरील उताऱ्यावरून दिसून येते. या भाषांतरित ग्रंथाची एक प्रत करण्यास जवळजवळ एका वर्षाचा अवधि लागला. यावरून भाषां-तरास सहजच दोन तीन वर्षे लागणें शक्य दिसतें. करवीरकरांसाठीं एक प्रत केल्यानंतर आणखी एक प्रत खास भाषांतरकारानींच केलेली आहे. ती सध्यां माजी डायरेक्टर ऑफ आर्काइव्हज, महाराष्ट्र राज्य, डॉ. पी. एम्. जोशी यांचेकडे आहे. ही प्रत करवीरकरानंतरची आहे. असें मानण्याचें कारण म्हणजे या प्रतींत बऱ्याच ठिकाणीं

१. 'श्रीसिद्धांतविजय', संपादक म. गो. डोंगरे, कोल्हापूर, १९०६.

शब्दलोप व अक्षरलोप लिहितांना झालेले आहेत. शिवाय तींत कोणताही अधिक मजकूर नाहीं. हीहि प्रत मला उपयोगांत आणता आली. त्याबद्दल मी डॉ. जोशींचा फार आभारी आहे. करवीर प्रतीवरून हा ग्रंथ छापून प्रसिद्ध करण्याचा प्रयत्न 'भारतवर्ष' मासिकांत केला होता. परंतु फक्त २४ पानेंच वर्ष २ च्या पहिल्या व दुसऱ्या अंकांत (एप्रिल–मे १८९९ च्या) छापलीं गेलीं.

या 'बुसातिने सलातिने'च्या मराठी भाषांतराच्या दोन्ही प्रती मोडींत लिहिलेल्या आहेत. तत्कालीन लेखन–वाचनाभ्यास पद्धतीचा विचार केला तर मराठी बखरी वगैरेंचे लेखन बाळबोधींत न होतां मोडींत कां होत होतें याचा बोध होतो. त्याकाळीं म्हणजे खास एकोणिसाव्या शतकाचे पूर्वीच्या काळांत 'बाळबोध लेखन वाचन ही विद्या शास्त्री व भिक्षुकांची आणि मोडी लेखन व हिशेब करणें ही विद्या गृहस्थाची म्हणजे अर्थात ब्राह्मण क्षत्रीय व वैश्य जातीयांचीच, असें त्या वेळीं समजत असत. भिक्षुकांस क्वचित मोडी लेखन व वाचन आणि गृहस्थांस क्वचित बाळबोध लेखन व वाचन असावयाचें". त्या वेळची म्हणजे एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धातील शिक्षण घेण्याची प्रवृत्तीहि अशी होती कीं, 'ब्राह्मण प्रभु आणि शेणवी यांत कारकुनीपुरतें व इतर पेशेवाले यांजला त्यांच्या व्यवहारापुरतें कामचलाऊ शिक्षण मिळाल्यास बस होत होतें. अशीच समजूत सर्व इलाखाभर होती. वेद आणि शास्त्रें यांतच विद्या आहे; ती ब्राम्हणांनींच संपादावी; इतरांचा अधिकार नाहीं; व त्यांनीं ती शिकूं नये हीच समजूत सर्व लोकांमध्यें प्रचलित होती." या एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धातील अभ्यासक्रमाची व्यवस्थाहि तितकी प्रगत झालेली नव्हती. 'त्यावेळीं पंतोजीपणा म्हणजे कांहींच नाहीं! कोणास वाटेल त्यानें शाळा काढावी व मुलें जमवावी! आणि कायतें हेंच शिकावें व शिकवावें! मोडी अक्षर लिहिणें, मुखपाठ उजळणी व नित्य व्यवहारापुरते कच्चापक्क्याचे तोंडी हिशेब आले कीं झाली त्यांची विद्या. नंतरहि त्यावेळच्या सरकारी मराठी शाळांतून मुख्य अभ्यास म्हटला म्हणजे गणित बाकीचे विषय म्हणजे तोंडपाठ भूगोल व व्याकरण आणि भूमितीचे सिद्धांत व मोडी अक्षर घटविणें हेच होतें. परंतु अर्थज्ञान, शब्दार्थ, शुद्धाशुद्ध वाचन, वर्णोच्चार व लेखन याकडे कांहीच लक्ष नसे. इतिहासाचें नांव नको. गणित वगैरे सर्वांवर घोटे चालावयाचे. परंतु अशा सरकारी शाळा इंग्रजी राज्यांत व त्याहि फारच थोड्या जागीं पूर्वार्धानंतर निघाल्या होत्या. पण अशा शाळांतहि 'वरिष्ठ मास्तरांचें मत विद्यार्थ्यांस इतिहासाचे ज्ञान देण्याविरूद्धच होतें.[1]'

१. रावसाहेब केशव शिवराम भवाळकर यांचे आत्मचरित्र – विदर्भ संशोधन मंडळ ग्रंथमाला, क्र. १७, नागपूर, १९६१.

भिक्षुक–शास्त्री–पंडितांचा पाठांतरावरच सारा भार होता. गुरु–घरीं धर्मशास्त्रादि विषयावरील ग्रंथ नकलून आणलेले असावयाचे. परंतु अशीं पाठशाळांचीं स्थानें महाराष्ट्रांत फारच थोडी होती. त्यामुळें वाचनाचा सराव जवळ जवळ नव्हताच म्हटलें तरी चालेल. आधीं त्रैवर्णिकांनांच फक्त पाटीवर म्हणजे धुळपाटीवर बसण्याचा संस्कार होता. वैश्य तर आपल्या धंद्यापलीकडे जाण्याची इच्छाच करित नव्हते. क्षत्रियांनीं सरकारी नोकरपेशा पत्करला होता. त्यांना जे कारकुनीसारखें लेखनकर्म तेवढेंच ते आपल्या धंद्यापुरते–आणि हा त्यांचा धंदा वंशपरंपरेनें आलेला असल्यानें–लेखनवाचनाचे पाठ घेत. त्यामुळें त्यांना भाषाशास्त्र, मोडी पर्शियन खेरीज इतर लेखनाची व ठराविक राजभाषेपेक्षां अधिक भाषाज्ञान संपादण्याची गरज भासत नसे. पुस्तकलेखन हा कांहीं आतांसारखा द्रव्यप्राप्तीचा धंदा नव्हता. कारण छपाईचीं साधनें तेव्हढी प्रचारांत आलेलीं नव्हती. अर्थात शास्त्रीपंडितांचे ग्रंथ आपापल्या प्रवचनार्थ अथवा इतर अनुयायांच्या मार्गदर्शनार्थ लिहिले व जोपासले जात. असे ग्रंथ बहुधा संस्कृतांत लिहिले गेल्यानें ते बाळबोधींत लिहिले जात. अशा ग्रंथांच्या वापरासाठीं त्यांच्या हस्तलिखित प्रती करून घेण्यांत येत. अशा प्रती करणारे नकलकार धंदेवाईकच होते. संत साधु आपली शिकवण तत्कालीन पाठांतराच्या युगांत गद्यांत न करितां कविताबद्ध म्हणजे मात्रा वृत्तांत केवळ आपल्या सांगातींसाठीं लिहित. अशा संतांचा लिहिण्यावाचण्याचा अभ्यास असे. हीं सर्व लेखक मंडळी सुसंस्कृत व सुविद्य असत. पाठांतरामुळें त्यांची बोलभाषा पुष्कळच अर्थपूर्ण व तत्वज्ञानाचें दर्शन करून देण्याइतकी प्रगल्भ असे. वाक्–शुद्धींतहि पाठांतरानें पुष्कळ सिद्धी साधलेली असे. मात्र लेखनाची संवय आणि लेखन नियंत्रित ठेवण्याइतका त्यांना अभ्यास नव्हता. वाचनाच्या अभावीं नेत्रांस संवय नसल्याकारणानें ही मंडळी जरी शब्दांतील अक्षरांचे उच्चार बिनचुक करित होती तरी लिहितांना वर्णोच्चारांचें लेखन एकसारखें करणें सहजसुलभ झालेलें नव्हतें. परंतु अशा संवयीच्या अभावी अशुद्ध लेखनाला, केवळ सुबुद्ध नव्हतें म्हणून, " कुणबाऊ ' भाषा वगैरे म्हणणें वस्तुस्थितीस धरून होत नाहीं. मराठी बखरी छापल्या गेल्या आहेत. आजहि तें लेखन भाषापंडितांना मानवतें. परंतु त्यांच्या मूळ नकला पाहिल्या तर काय आढळतें ! एकच शब्द, या संतांच्या कविताबाङमयासारखा, भिन्न प्रकारें लिहिलेला आढळतो आणि तोहि त्याच पृष्ठावर व चारदोन ओळींच्या मजकुरांत. निरनिराळ्या नकला पाहिल्या तर त्यांत नुसतीच मजकुरांत गळागाळी व घालाघाली झालेली नसते तर शब्दोच्चारांतहि सर्वत्र भिन्नता आढळते. परंतु हे तत्कालीन परिस्थितींतून उत्पन्न झालेले हस्तदोष सुधारून तयार केलेल्या व प्रसिद्ध झालेल्या बखरींना ' कुणबाऊ ' वगैरे संबोधलें जात नाहीं. मात्र केवळ त्यांच्या जातीनामावरून संतांच्या वाङमयाला ' कुणबाऊ ' वगैरे संबोधलें गेलें आहे.

प्रस्तुत ग्रंथाचा लेखक हा चांगला सुसंस्कृत घराण्यांत वाढलेला आहे. राज्यांत याची भाषाज्ञानांत ख्याती होती म्हणून याची या कामाकरितां मुद्दाम निवड केली गेली आहे. असें असतांनासुद्धां या लेखकाच्या लेखनांत हे व्याकरणदृष्टया भासणारे दोष कसे व कितपत आटळून येतात याची कल्पना यावी म्हणून या भाषांतराच्या लेखनाची, मराठी भाषेच्या प्रगतीच्या अभ्यासाच्या दृष्टीनें, कल्पना यावी म्हणून मूळ प्रत बरीचशीं या हस्तदोषांसह संपादिली आहे. या लेखनाची चर्चा करण्यापूर्वी मोडी लेखनांत कसे व कोणते दोष उत्पन्न होतात त्यांचा प्रथम विचार करणें जरूर आहे.

मोडी लेखन जरी राज्यकारभारांत उपयुक्त व किफायतशीर होतें तरी तें लेखन शुध्दाशुध्द वाङ्मय प्रसृतींत बऱ्याच अडचणी उपस्थित करणारे होतें. मोडी लेखनांत शब्द सोडून लिहिलें जात नाहींत. त्यामुळें वाचन चुकीचें केलें जातें. मराठी गद्यवाङ्मयांत इतिहासकालीं कविता वाङ्मयांत किंवा हिंदी वाङ्मयांत चरणरेघ किंवा धृपदादि द्वित्त रेघ काढून विचार किंवा वाक्यभेद दर्शविला जात असे. तसा किंवा नंतर रूढ झालेलीं विराम चिन्हे यांचा उपयोग केला जात नसे त्यामुळेंहि पुष्कळ वेळा अर्थभेदाचें कारण उपस्थित होतें. वर्णोच्चारांचे लेखनहि पुष्कळ वेळां घोटाळयांत घालते. विशेषतः ज व न, द व प, ह व ब, उ हु तु ड व दु, ख व क्ष, ट व र, कधींकधीं ड व उ, फ व रा, क, म व ला, ल व वेलांटी, ह्या अक्षरांच्या लिहिण्यांत गडबड झालेली असते. या शिवाय मोडीच्या धावत्या, हात न उचलता लिहिल्या गेलेल्या लेखनांत, हात उचलून जीं अनुस्वार मात्रांसारखी चिन्हें करावयाचीं असतात तीं राहून जातात. जोडाक्षरें बहुधः एकाक्षर चिन्हांनींच दर्शविलीं जातात. मग तीं एकापुढें त्या अक्षरांच्या दोन चिन्हांनीं किंवा एकाच चिन्हानें दर्शवितात. त्याशिवाय व्याकरणाविषयक अभ्यासाच्या अभावीं जे भेदाभेद विशेषत्वानें दृष्टीस पडतात ते म्हणजे ज्या शब्दांत अ किंवा ह हें आद्याक्षर असते व त्यापुढील व्यंजनोच्चारामुळें या आद्य अ अगर ह च्या उच्चारांत थोडेंसें दीर्घत्व प्राप्त होते तेथें अ किंवा ह च्या जागीं आ किंवा हा असें लिहिले जाते. कित्येक वेळा शब्दांतील पूर्णाक्षर र व क्वचित लहि पुढच्या अक्षरास जोडून तें पुढील व्यंजन जोडाक्षरानें लिहिलें जातें. त्याचप्रमाणें चार, राजास सारख्या शब्दांतील उच्चार च्यार, राज्यास असें म्हणजे य जोडून लिहिले जातात. न आणि ण या उच्चारांतील भेद जाण्‍ता असतांनासुद्धां मध्यें मध्यें न च्या जागीं ण लेखनसंबंधीच्या अभावीं लिहिला जातो, ळ च्या जागीं ल लिहिला जातो. हें झाले सामान्यतः आढळणारे मोडी लेखनांतील लेखनदोष. याशिवाय लेखकाचे निरनिराळ्या वळणामुळें येणारे व रूढ बोलभाषेत आलेले दोष असतात ते वेगळेच. त्यांचा एथे विस्तार करण्याचें कारण नाहीं.

'बुसातिने सलातीन'चा भाषांतरकार हा सुसंस्कृत व सुविद्य कुलांत जन्मलेला असल्यानें आणि विशेषतः मराठा राजधानींतच एक अधिकारी म्हणून वावरत असतांना

त्याची बोलभाषा अशुद्ध असणें संभवनीय नाहीं. इतकेंच नव्हे तर शुद्ध शब्दप्रयोगां-बद्दल कांहीं थोड्या ठिकाणीच मधूनमधून भिन्न उच्चार लेखन केलें आहे यावरूनहि बोल भाषेत उच्चारदोष असल्याचें मानता येत नाहीं. हे जे दोष आढळतात ते लेखनाच्या संवयीच्या अभावी चुकून होणारे दोष होत पुरुषांपेक्षा स्त्रियांची बोलभाषा बरीच शुद्ध असते. परंतु शिक्षण झाल्यातंनर सुद्धां नंतरच्या लेखनवाचनाच्या अभावीं त्यांचें लेखन कसें व किती अशुद्ध होतें याचा अनुभव कित्येकांना असेलच. मराठी लेखनकलेच्या प्रगतीचा इतिहास जाणता यावा म्हणून हे मराठी भाषांतर होतां होईतों जसेंच्या तसेंच दृष्टीक्षेपांत यावें म्हणून संपादित केलें आहे. सर्व बारिकसारिक लेखनदोष कायम राखले आहेत. मात्र जे शब्द भिन्न स्वरूपांत परंतु लेखनांत बरेच वेळां आलेले आहेत ते वाचनास व अभ्यासास अडचण भासूं नये म्हणून सुधारून छापले आहेत. अशा तऱ्हेच्या मूळांत ज्या सुधारणा केल्या आहेत त्यांचा तपशील पुढें देत आहे. मोडींत विरामचिन्हे देण्याचा प्रघात नसल्यानें भाषांतरकारानें त्याऐवजी ' व ' किंवा ' आणि ' "चा उपयोग केला आहे. जेथें जेथें विरामचिन्ह" छापलें आहे तेथें तेथं व किंवा आणि या मूळांतील शब्दांचा लोप केला आहे असें समजावें. अनुस्वार फारच थोडे ठिकाणीं परंतु ज्या शब्दावर दिलेले आहेत तशाच शब्दांवर इतरत्रहि देऊन एकसूत्रता ठेविली आहे. पुष्कळ ठिकाणीं विजापुराऐवजीं विज्यापूर लिहिलें आहे. परंतु छापतांना तें सुधारून सर्वत्र विजापूर असें करण्याचा प्रयत्न केला आहे. "सेवक" मधील से ऐवजी सर्वत्र शे लिहिलें आहे. परंतु तो शब्द सुधारून सेवक असा छापला आहे. उलट शिपाई ऐवजी सर्वत्र सिपाई असा पाठ लिहिलेला आहे. परंतु तो सुधारून शिपाई असा दिला आहे. त्याचप्रमाणे एक मधील ये ऐवजी सर्वत्र सुधारून ए केलें आहे. महाली ऐवजीं मूळांतील माले शब्द हा कायम ठेविला आहे. सर्व या शब्दाबद्दल सर्वत्र असे लिहिलें आहे. बहुतेक परंतु त्यांत जरूर त्या ठिकाणी सुधा-रून सर्व असें केले आहे. बहुतेक ठिकाणी ळ बद्दल ल च लिहिला आहे. परंतु छापताना सुधारला आहे. असा असी दिवसी सारख्या शब्दांत ज्या ठिकाणीं स ऐवजी श लिहिला जातो तेथे तो तसा लिहिलेला नाहीं परंतु तो जरूर त्या ठिकाणी सुधारला आहे. शाहा किंवा शहा या शब्दांतील शा या अक्षराऐवजीं प बऱ्याच ठिकाणी लिहिला आहे, परंतु छापताना सर्वत्र शाहा हेंच रूप कायम ठेविलें आहे. विच्यार च्यार सारख्या शब्दांतील च्या ऐवजी सर्वत्र चा केलें आहे. च्छ ऐवजी फक्त छ लिहिला आहे तोहि सुधारला आहे. अ ऐवजीं कित्येक ठिकाणीं आ आला आहे. तेथे भाषिक रूपच देण्यांत आ.. आहे. कित्येक हा शब्द बऱ्याच ठिकाणीं बिनचूक लिहिला आहे. परंतु कांहीं ठिकाणीं कितीएक किंवा कितीक असा तो लिहिला आहे. जरूर त्या ठिकाणीं तो सुधारून छापला आहे. जाहाले हे रूप कायम ठेविलें आहे. परंतु जाले ऐवजीं झाले करण्याचा प्रयत्न केला आहे. शब्दलोप, मात्रालोप, अक्षरलोप यासारखे जे हस्तदोष होते ते

सुधारले आहेत. हे हस्तदोष केवळ लेखनाच्या व वाचनाच्या संवयी अभावी आलेले आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. परंतु हे हस्तदोष वगळल्यास मराठी गद्यांतील तत्कालीन भाषेचें स्वरूप या भाषांतरावरून समजून येण्यासारखें आहे. भाषेच्या दृष्टीनें येथें चिकित्सा करण्याचें प्रयोजन नाहीं.

या ग्रंथात बुसातिने सलातीनचें शब्दशः भाषांतर आलें आहे असें समजण्यास हरकत नाही. कारण ते भाषांतरकर्त्याच्या समाधानार्थ केलेलें नाहीं, चोख कामगिरी म्हणून धन्यासाठीं केलेलें आहे. साहाजिकच त्यांत उर्दु व दख्खनी हिंदी प्रतीपेक्षा अधिक मजकूर आला आहे व भाषांतरकार तसेंच सांगत आहे. या ग्रंथात दिलेल्या आधार ग्रंथांचा विचार केला तर मूळ पर्शियन लेखनात या आधार ग्रंथांतील बरेचसे कालोल्लेख व तपशील आलेले नाहीत. तत्कालीन समजुतीप्रमाणें कालनिश्चितीची आवश्यकता भासत नव्हती व जो मजकूर घ्यावयाचा तो होता होई तों आपल्या चरित्र-नायकाच्या कीर्तीत भर टाकणारा व प्रशस्तिप्रद घेण्याची मर्यादा पाळली जात होती. त्यामुळें पुष्कळ महत्त्वाच्या हालचालींची माहिती, जरी त्या प्रसंगांशी आदिलशाही पादशाहा निगडित होते तरी ती, ग्रंथात घेतली गेलेली नाहीं. आधारार्थ घेतलेल्या व इतर ग्रंथांवरून कालनिर्णित करणाऱ्या टिपणी जोडलेल्या आहेत त्यावरूनहि आधारार्थ घेतलेल्या ग्रंथांतून ही माहिती कशी घेतली गेली नाहीं हें कळेल. आधारार्थ घेतलेले ग्रंथ आदिलशाहीला पोषक असेच होते. परंतु तत्कालीन मोगली, निजामशाही व मराठा स्वराज्याचे ग्रंथ पाहिले तर बुसातिनींत नुसताच विरोधी मजकूर गाळला असें नाहीं तर मोगल निजामशाहा व शिवाजी यांची वरचढ अमान्य न करितां आदिल-शाहीचा विजय दाखविण्याकडे ग्रंथकाराचा सारा कल असल्याचें पटतें. अशा परिस्थितींतहि जयापजयाचा उत्कर्षापकर्षाचा भाग सोडला तर या ग्रंथांतील बराचसा मजकूर समकालीन ग्रंथांवरून घेतलेला असल्यानें त्यांतून बराच वास्तवबोध करून घेता येतो. या सर्व ग्रंथांतील मजकुरावरून प्रकरणवार चर्चा करूं म्हटले सर फारच विस्तार होईल. त्याचप्रमाणें या समकालीन ग्रंथांतून गाळला गेलेला तपशील देऊं म्हटले तरी तोहि बराच वाढेल. शिवाय हा ग्रंथ म्हणजे एक साधनग्रंथ आहे. अशा साधनग्रंथाचा इतर साधनग्रंथाबरोबर निरनिराळ्या कारकीर्दीच्या इतिहासरचनेंत उपयोग केल्यास तो अधिक वास्तवतेच्या चिकित्सेंत भर टाकील. या ग्रंथांतील महत्त्वाच्या तपशिलांची चर्चा माझ्या ‘मालोजी व शाहाजी’ आणि ‘संभाजी’ यांच्या चरित्रांत आलीच आहे व माझ्या शिवचरित्रांतहि येत आहे. तरी देखिल येथें आदिलशाही कारकीर्दीचा दक्षिणेंतील हिंदवी राष्ट्रिकांवर जो संस्कृति व धार्मिक बाबतींत बरावाईट परिणाम झालेला दिसून येतो व आदिलशाहींतील राज्यव्यवहारांत क्रांतिउत्क्रांतीचीं बंडे किती व कोणत्या प्रकारचीं झाली याचा थोडासा विचार करणें जरूर दिसतें. कारण हा विचार आदिल-शाहीच्याच इतिहाससंग्रहांत अधिक सुलभतेनें पहातां येण्यासारखा आहे.

महंमद आदिलशाहाच्या कारकीर्दीपर्यंत आदिलशाहा हे सर्वस्वी स्थानिक देशमुख जहागिरदार यांस आपले मांडलिक समजून त्यांच्याच बळावर आपला राज्यकारभार पार पाडित असत. पूर्वापार चालीप्रमाणें पठाणांखेरिज इतरांना वजिरीचा मान मिळत नव्हता, तरी त्यांस जे इतर स्वातंत्र्य मिळत होतें तितक्यावर ही स्थानिक मंडळी खुषवख्त होऊन पातशाहास सहाय्यक होत होतीं. इब्राहिम आदिलशाहाच्या कारकीर्दींत तर हिंदु सरदारांना वजिरीहि शाहाजीच्या वर्चस्वामुळें मिळूं लागल्या. परंतु हें सर्व ऐक्य सतराव्या शतकाच्या सुरुवातीस मावळण्यास प्रारंभ झाला. स्थानिक लोकांच्या राज्ययंत्रणेबाबतच्या अधिकारलालसेच्या भावना तीव्रतर होत गेल्या, आणि त्याबरोबर परदेशस्थ पठाण आणि स्थानिक बारगे मुसलमान व सिद्दी यांच्यांत तेढ वाढूं लागली. या दोन्ही जमातींनां राज्यकारभार आपल्याच हातीं राहावा अशी तीव्र आकांक्षा उत्पन्न झाली. त्यामुळें सिद्दी पठाणांत वैमनस्य आलें. हिंदु लोकांची सहानुभूति सिद्दीकडे झुकूं लागल्यानें हिंदूंस पठाणी राजकर्ते धार्मिक व सामाजिक विषमतेचीं बंधनें घालून सतावूं लागले. महंमद आदिलशाहा व अली आदिलशाहा यांनीं जी नियमावलि अमलांत आणिली त्या यादींतील कलमांवरून धार्मिक तेढ कां वाढली हें सहज लक्षांत येण्यासारखें आहे. आणि याच अडवणुकीच्या वागणुकीमुळें हिंदवी स्वराज्याची भावना उदयास आली. राज्यांत अंतर्गत भांडणांना व हेव्यादाव्यांना मार्ग मोकळा झाला व याच अंतर्गत भांडणामुळें राजक्रांतीचें बीज अधिक जोमानें व त्वरित गतीनें वाढून फळास आलें. स्थानिक लोकांचा पाठिंबा जातांच कोणतीहि परकीय सत्ता लयास गेल्याशिवाय राहात नाहीं, हें प्रत्यक्ष अनुभवास आलें. राजक्रांतींतील राजसत्तेच्या तृष्णेपेक्षा धार्मिक व सामाजिक आचारधर्मांतील विषमतेचें दुःखच अधिक सामर्थ्यवान व यशस्वी ठरतें धार्मिक व आचारपद्धतींतील स्वातंत्र्यच सामाजिक ऐक्याला (integration) उपयुक्त होतें. त्याउलट दुफळीचीं (disintegration) बीजें फोफावण्यास मदत होते, मग ही राजक्रांति परकियांच्या सत्तेबाबतची असो किंवा स्वकीयांच्या राज्यांतील जातीय द्वेषांतून निर्माण झालेली असो. महाराष्ट्राच्या इतिहासाचे १७ व्या व १८ व्या शतकाचे काल या दोन्हीहि राजक्रांतीचे अनुभव निदर्शनास आणून देतात. राजसत्तेपेक्षां धार्मिक स्वातंत्र्याला समाज अधिक जागृत रहातो.

या ग्रंथांतील विवेचनावरून शेवटच्या दोन तीन पादशहांची कर्तबगारी निर्दोष व उत्कटतेनें रंगविण्याचा प्रयत्न केलेला आहे. अर्थात तत्कालीन मोगली व इतर लेखकांच्या मजकुरावरून हा विरोधाभास सहज लक्षांत येतो. इतकेंच नव्हे तर खास या वर्णनांतील तपशिलांवरून ग्रंथकर्त्यानें काढलेल्या निर्णयाबाबत संशय तेव्हांच जागृत होतो. कार्यकारणभावांतहि असाच विरोधीभाव असल्याचे कित्येक ठिकाणीं दिसून येतें. मात्र इतर तपशील पुष्कळसा मूळ ग्रंथांतील मजकुरांना धरून आहे. मूळ ग्रंथांतील तारखा मात्र सर्वत्र घेतल्या गेल्या नाहींत व प्रसंगवर्णनांचा क्रम कालक्रमाला धरून नसल्यानें

अभ्यासूला प्रत्येक प्रकरणांचा अभ्यास व उपयोग स्वतंत्रपणेंच करणें जरूर पडतें. प्रसंगानुक्रमानें नव्हे.

फारसी ग्रंथांत कित्येक सरदारांचा उल्लेख त्यांच्या मूळ नावाने व कित्येक वेळा त्यांच्या राजमान्यतेच्या पदवीनें केला जातो. ही पदवी त्यांच्या मृत्यूनंतर त्यांच्या मुलांस बहाल होते कारण त्यांना त्यांच्या बापाचाच हुद्दा व सरंजाम चालू रहातो. क्वचित प्रसंगी एकच पदवी एकापेक्षा अधिक सरदारांस चालू असते. अशा वेळीं बाप, मुलगा का नातू संबोधला जातो हें नीटसें सहज लक्षांत येत नाहीं. त्यामुळे प्रसंगांचा काल ठरविण्यांतहि थोडी अडचण उपस्थित होते. शिवाय कार्यकारणभावहि ठरविण्यांतहि साहजिक दिशाभूल होते.

संभाजीच्या बऱ्हाणपुराकडील स्वारीबद्दल काफिखानाचा उल्लेख अन्य पुराव्याच्या अभावी माझ्या संभाजी महाराजांच्या चरित्रांत अनुल्लेखिला गेला. त्यास आतां बुसातिने सलातिनमध्येहि पुरावा सापडल्याने त्या प्रकरणाची येथें थोडी चर्चा करित आहे. त्या माहितीमुळें आतां राजाराम महाराजांच्या लग्नाला संभाजी कां उपस्थित नव्हता व तो त्यावेळी पन्हाळ्यांत कैदेत नव्हता या बाबत निश्चित असा पुरावा उपलब्ध होत आहे. त्याशिवाय शिवाजी–संभाजीचे संबंध व शिवाजीचा संभाजीच्या कार्यकर्तृत्वावर किती विश्वास होता याचाहि बोध होऊ शकतो.

शिकंदर आदिलशाहाच्या कारकिर्दीतील दिलावरखानाच्या १६७९–८० मधील आक्रमक लढायांची व त्या निमित्तानें आदिलशाहा व शिवाजी यांची एकी झाल्यामुळें शिवाजीच्या मोगली हद्दींतील आक्रमणाची माहिती बरीच तपशिलवार आलेली आहे. त्यांत बऱ्हाणपूर–औरंगाबादेकडील संभाजीच्या अधिपत्याची हकिकतहि आलेली आहे. तिच्या कालमानाचा विचार केला तर ही हालचाल इ. सन १६८० च्या प्रथमार्धातील ठरते. संभाजी व दिलेरखान यांच्यात आलेले वैमनस्याचा फायदा घेऊन शिवाजीनें संभाजीस मोगलाकडून परत येतांच दिलेरखानाच्याच सुभ्याची लुटालूट व नासाडी करण्यास योजिलें व संभाजीनें दिलेरखानाचा सूड घेण्याच्या उद्देशानें केलेली ही चढाई तत्कालीन राजकर्त्यांच्या दृष्टीने मोगली साम्राज्यास फारच धक्का देणारी ठरली. या लढाईवरून संभाजी परत येतांच त्याला शिवाजी महाराजांच्या मृत्यूची बातमी समजली व त्याच्या अनुपस्थितीचा फायदा घेऊन व तो विशेषतः मोठ्या संकटांत अडकला आहे हे पाहून आण्णाजी दत्तोनें राजारामाला मंचकारूढ करण्याची कारवाई केली. परंतु संभाजी परत आल्याची बातमी लागतांच खास रायगड येथील व इतर अधिकाऱ्यांनी मंत्र्याच्या कारवाईस न जुमानता संभाजीसच आपला राजा मानलें व त्याला पन्हाळ्याहून आल्यानंतर राजा केलें. संभाजी इ. स. १६८० च्या सुरुवातीस शिवाजीचे सैन्य घेऊन मोगली मुलखाची पायमल्ली करित होता हें समकालीन काफीखानहि सांगतो. ते मजकूर असा

"Though his father neglected not in plundering and pillaging the famous purganas and public buildings but he had never advanced to ravage Khojstabuniyad and Burhanpore (which were called Panyeetakutt or capital seat of the kings), nor had he extended ever the hand of plundering towards them, though many of his noble and respectable servants directed him to destroy these two countries. Yet he through his own forecast and foreseeing knowledge he used to prevent them from ruining them and to say to them these only that in case if we had been engaged to do so, it would be then a great necesstly for the honour and shame of the king Alumgeer to advance with force to these parts, afterwards God knows how far the battle of this King goes or extends at last..... His unlucky son Sambha wished to surpass his father in bad characters and bad name and to lay foot presumably before his father and to erect the standard of rebellion. Sambha was sent by Sivaji consequently in the month of Muharram of 23rd years of the King's jooloos on answering to 1091 (22nd Jaunary to 17th February 1680). The abovementioned Sambha of ill natured, having with the force of about 20000, attacked Burhanpur when it was guarded by Kaukar Khan Afgan (who had the munsab of 900) being as a deputy of Khan Zaman the Soobhedar of there. Afterward again as soon as he done with the plunder of the Soobha of Baraud having from the distance of 35 koss marched with speed (as it was the custom in that time to assault from such distance) against Bahadurpurah bituated at a distance of 1 koss from Burhanpore. Also it was well peopled and rich purah amongst all the other purahs of aforegoing Burhanpore, and approached the purah at the break of day in such order that not a single man of there had the information of the arrival of the army of infidels by any ways. Also it was not heard from any one that a certain side is the suspicious of the arrival. In that time good number of Bankers and mostly merchants (possessed of many lakhs) with plenty of jewels and several other sort of valuable clothes of the many regions of the world also with various kinds of rarities and uncommon things of the differnt bunders or Ports (which were placed in every shop in full) had inhabited there. Afterwards he began to stretch out the band of spoul (?) towards the inhabitants there and

surrounded round the Bahadurpurah (which was compassed by other 17 famous purahs of the above said city and were situated beyond the Shaharparah or assylum of the city) particularly in such manner that not even one man of there could save a single man of his family and of his honour, nor could take a single dam or drum out of the siege. Kaukar Khan the Deputy of the Soobhedar and the other people of the city were informed of the disturbance. At that time while the smoke of firing purahs had reached the sky, then the deputy of the Soobhedar could not come out to oppose them and he being besieged in the same place employed to strengthen the gates, bastions and ramparts therein. They then surrounding the other famous seventeen purahs such as Hasan Purah, Shaw Ganj, Shahjahan Purah, Khurrum Purah, Nabab Purah etc. (which were outwardly situated near the fortification of Shaharparah inwardly were within the city and each purah was filled up with valuable goods and many lakhs ready money of Bankers and renouned merchants) opened the hands to plunder them and to burn away the purahs.

Meantime certain of noblemen (who having honour and shame) bringing all their reputations and families under their swords came out of home and after showing their baveries acquired the honour of being martyred, and several others having delivered up their lives to the will of God and to the decree of Fate and also those (who were living near the Hesour or wall and the Gate of Shaherparah) holding the hands of their women and children with great disgrace and confusion put themselves into the four walls of the city. During an infinite of resurrection-like Tumult, but those spoilers have plundered and pillaged all the abovementioned Poorahs with peace of mind till three days. In the meantime, great deal of money etc. (that were concealed in the ground since a considerable time, also there were many places in which was hiden treasure, which places were not conceived by any one, even by the owners of those places) is fell in the possession of the infidels the wickeds. Whereupon they preparing ladders brought them to the abovesaid Poorah and attacked twice with intention to go up the Hessur or fortification of its Shaharparah.

" In consequence of certain munsubdars (who were appointed to all the morechauls, gates, ramparts and embraces, also they had bestowed all their endeavours in driving all those ill dogs away). Enemy's People could not come into the Shaharparah, and excepting moneys and gold, silver (without stamped) and jewels set with precions stones, valuable wares, they never allowed to take several other things such as plates made of copper and brass and China plates blackpieces, and species such as cloves, cardmums and cinnamon, nutmeg and dressed old suits of clothes, but those which they had provided by plunder same as the abovesaid in the first of attacking, which they throwed away for fear of heavy load. Therefore they were satisfied with principal things and never mind to triflings and went away.

" After they went away from thence there ware found so many things fallen in the street and so many things were burnt away which were beyond the bound of discription.

" After the intelligence of dispersing of the army of worst ghanim from the part of Burhanpore to the environs of Khojistabuniyad received from the certain spys into the ear of Khan Jahan Bahadur Cocultash, who though at first immediately rode on horseback and pursued or travelled three or four days journey in the course of one day and night speedily and arrived himself at the Kutul or Ghaat of Furdapore on thirty two cosses distant, but he happened some delay in getting crosses his soldiers and cattles etc. for three or four prahars (or each prahar signifies a quarter of a day or night) and by another Kowl or narrative it was commonly expressed, saying that Khan Jahan Bahadur had agreed secretely with Sambha, on which the vakeel of Sambha coming to Khan Jahan has presented great snm of money requesting him to delay in proceeding too forward for more four or five prahars but there was truth that Ghaneem after being defeated from Burhanpore on account of the heavy burden and the rumour or report of the pursuit of Khan Jahan Bahadur could not reach the distant or famous forts, wherefore he being helpless chosed the road to the fort of Salehre of the talookah of Baglana (which was near than the all other forts were possessed by them) by way of Purganah Mustafabad oorf

or otherwise called Javeerah. If it be so it was necessary for Khan Bahadur that he should march out from Furdapore instantly towards the left side taking the roads to Dharumgavnvoon (Dharangaon) and Javeerah too forewards and should oppose the infidels from procedure, but he minding the request of the Vakeel of that Ghaneem the worst in nature left off the proper road, has proceed by the right side road of Adu Aidnul Aapad (Edlabad). Ghaneem hearing the intelligence thought that it was good opportunity for him, as also took many things such as ready money and several other things made of gold and silver and wares of high value as much as he could along with him, and also taking few numbers of Ameers along with him proceeded through the road of Javeerah with speed and before Khan Jahan Bahadur arrived at Burhanpore he arrived within four or five days in the fort of Salher.

The excellents, noble men and theologians of Burhanpore being united together wrote a mahjar, contains following contents : that the infidels predominate over us and giving away the honours of our faith and of our women on the wind and lay waste all over properties in order we may leave off here after the prayers of Friday and having despatched it together a petition to the Hozore.

After the abovementioned intelligence was laid before the King, who issued a Farman (intermixed with rage) contains the signal that he himself is to march out with intention to give chastisement to the infidels of the Deccan, in the name of Khan Jahan Bahadur and brought him to the place of his displeasure; also he put him to the place off disagreeably all the former or list of his contrivance that he (or Khan Jahan Bahadur) had sent it in the year about additions and increase munsubs to or for his undercommanded people, as it was quite contrary to the kings former custom and in consideration of disturbance that rose in the Deccan and by the flight of the Prince Mahomad Akbar he ordered to put off out the Paishkhana or Baggage tents etc. to go towards the Burhanpore."[1]

1. Kafi Khan, English Translation in the Mackenzie collection, p, 451-461.

वरील हकीकतीवरून असें स्पष्ट दिसून येते कीं, संभाजी देशीं परत येतांच शिवाजी महाराजांनी त्यास चांगल्या प्रकारें दिलासा देऊन ज्या दिलेरखानावर तो चिडला होता त्याच्याच सुभ्याचा सूड म्हणून नासधूस लूटमार करण्यास जानेवारीत पाठविला तो मार्च अखेरपर्यंत तरी तिकडे असावा. अर्थात त्याला राजारामाच्या लग्नासाठीं रायगडला येणें शक्य नव्हतें. उलट शिवाजी महाराज परतले व आपल्या मोहिमेचें नेतृत्व संभाजीकडे सोंपविलें. या स्वारीनें आदिलशाहा व शिवाजी यांची एकी होऊन मोगलाला धक्का देण्याचें ठरविलें होते त्याप्रमाणें तो उद्देश उत्तमपणें संभाजीनें साधला आणि दिलावरखानाला नाइलाजानें आपला हट्ट सोडून परतावें लागलें. शिवाजीच्या मृत्यूनें जो मोगली सरदारानें हायसें वाटून जोर चढावयाचा तो मात्र संभाजीनें मुळांतच घालविला. संभाजीला मात्र वडिलांच्या मृत्यूमुळें ओढविलेल्या पेंचप्रसंगाला तोंड द्यावयाची वेळ आली होती. परंतु संभाजी या मोगली मुलखांतील अगणित लुटीनें समृद्ध झाला होता आणि फार मोठ्या सैन्याचें आधिपत्य व त्याबरोबरच त्यांची सहकारिता लाभली होती त्यामुळें आण्णाजीनें उपस्थित केलेली अंतर्गत बंडाळी उपजतांच निर्जीव होऊन राहिली.

याशिवाय आणखीहि कांहीं प्रसंग या ग्रंथांत आलेले आहेत कि ज्यांच्या आधारें शिवाजी व हिंदु मुस्लीम लढ्याबाबतचे कांहीं विपर्यस्त दुराग्रह दूर होतात. परंतु त्यांची चर्चा माझ्या शिवचरित्रांत आलेली असल्यानें अधिक विस्तार करित नाहीं.

मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयानें या ग्रंथावर खर्च करण्याचें ठरविल्यानें हा ग्रंथ मला बाहेर काढतां आला व महाराष्ट्राशीं संबंध असलेल्या कुत्बशाही ग्रंथानंतर आदिलशाहीचा इतिहास अभ्यासूंच्या हातीं देण्यास सवड मिळाली. त्यामुळें महाराष्ट्राच्या सतराव्या शतकाच्या इतिहासाच्या संशोधनाची भूमिका बरीच व्यापिता आली त्याबद्दल साहाजिकच मला समाधान होत आहे.

१२।१४४, सहकारनगर,
चेंबूर, मुंबई ७१.
१ सप्टेंबर १९६८

वा. सी. बेंद्रे

विषय–सूचि

# जिलद् पहिली



## 1 बुस्तान पहिलें : युसुफ आदिलशाहा ( ७–२६ )



## 2 बुस्तान दुसरें : इस्माईल आदिलशाहा ( २७–४७ )

## बुस्तान तिसरें : इब्राहीम आदिलशाहा–पहिला ( ४८–६५ )

## बुस्तान चवथें : अलि आदिलशाहा – पहिला ( ६६–१४७ )

## बुस्तान पांचवें : इब्राहीम आदिलशाहा–दुसरा – ( १४८-२९२ )

## बुस्तान सहावें : महंमद आदिलशाहा – ( २९३–२९५ )

## बुस्तान सातवें : अलि आदिलशाहा–दुसरा – ( ३९६-४८८ )

## बुस्तान आठवें – शिकंदर आदिलशाहा ( ४८९ ते ६५९ )

# विजापूरची आदिलशाही

अथवा

## बुसातिने सलातीन या फारसी ग्रंथाचें भाषांतर

---

हुवलगनी.

बुसातीनें सलातीन म्हणोन पारसी ग्रंथ शहर विजापूर येथील बादशाही कारकीर्दीचे प्रारंभीं मुळ पुरुष युसुफ बेग सावी म्हणोन पादशाहा जाहला. त्यापासून अखेर पुरुष शिकंदर बादशाहापर्यंत व त्यापुढें अलमगीर पादशाहा संस्थान दिल्ली याची कारकीर्द व श्रीमन्महाराज शाहाजी छत्रपति व श्रीमंत शिवाजी महाराज व श्रीमंत संभाजी महाराजपर्यंत[1] व त्यापुढें नबाब हैदराबादवाले व त्यापुढें पेशवाई कारकीर्द व त्यानंतर इंग्रज सरकारचा अंमल होई तोपर्यंत सविस्तर तारिखवार वर्णनाचा पारसी भाषेंत आहे. त्या ग्रंथाचा तर्जुमा महाराष्ट्र भाषेंत केला असतां सर्वांचे समजुतींत येईल. यास्तव मेहेरबान कदरदान बारटर(ल) फ्रियरसाहेब इस्कॉयर कमिशनर बाहादूर इलाखा सातारा यांणीं, मी नरसिंगराव विठल पारसनिवीस निसबत सरकार याणीं, मज सेवकास कचेरींत बोलाऊन समक्ष हुकूम फर्माविला कीं, तुम्हीं या पारसी ग्रंथाचा महाराष्ट्र भाषेंत पारसी शब्दांचा अर्थ न राहूं देतां त्वरित समजुतींत यावयाजोगा तर्जुमा करावा. त्यावरून कनुल्लुगात व कफुल्लुगात व मुवेंद बुलल्लुगात शाहाजहानी व बुरहानकाते व जहानगिरी वगैरे कोशांचे आधार संमतानें अर्थ करून सर्वांस समजुतींत यावयाजोगा तर्जुमा केला आहे. या ग्रंथांत बादशाहा वगैरे मुसलमान लोकांचीं व किल्ले व शहरें वगैरेंचीं पारसी नांवें व कांहीं कारणीक पारसी शब्द लिहिलेच पाहिजेत असे येतील ते मात्र तांबडे शाईनें लिहिले आहेत. कारण महाराष्ट्र भाषेची लिपी हरएक वाचणारांस पारसी विद्येचा अभ्यास नसतो. यामुळें साफ उच्चार केला जात नाहीं. तेणेंकरून वाचण्यास हरकत होती. यास्तव तो शब्द पारसी भाषेचा आहे असें समजुतींत यावयाकरितां तांबडे शाईनें लिहून ज्यांत फारसी शब्द नाहींत तितकीं अक्षरें मात्र काळे शाईनें लिहिलीं आहेत; ज्या ठिकाणीं एक प्रकर्ण सरून दुसरें प्रकर्ण लागतें तेथें तांबडे शाईनें लिहिलें आहे; व कोठें तांबडे शाईनें लिहावें तें चुकून

---

१. दुसऱ्या प्रतींत ' संभाजीमहाराज व शाहूमहाराज पर्यंत ' असें आहे.

तो शब्द हस्तदोषानें काळे शाईनें लिहिला गेल्यास तो शब्द तांबडे शाईचा आहे असें समजुतींत यावयाकरितां त्या शब्दाखालीं तांबडे शाईनें रेघ ओढली आहे. या ग्रंथांत अनेक प्रकर्णांचीं वर्णनें आलीं आहेत. तेव्हां ज्यावेळेस जें प्रकर्ण पाहावयाचें कारण पडेल तें प्रकर्ण त्याचवेळेस या ग्रंथांतून काढून पाहाण्यास फार आयास पडतील. यास्तव आरंभापासून जीं प्रकर्णे आलीं तें प्रकर्ण लिहून ज्या पृष्ठावर जें प्रकर्ण आहे त्या पृष्ठाचा अंक त्या प्रकर्णाशेजारीं लिहूनही अनुक्रमणिका केली आहे. या अनुक्रमणिकेचे रीतीनें पाहिलें असतां फार सुलभ पडेल. महाराष्ट्र भाषेचे व संस्कृत भाषेचे ग्रंथांत अध्याय असतात. त्याप्रमाणें या ग्रंथांत आठ बुस्तान केले आहेत व बुस्तान या शब्दाचा अर्थ बाग असा होतो, म्हणजे या आठ बागेंत सर्व वर्णनें आलीं आहेत.

हुवलगनी

बुसातीनें सलातीन म्हणोन विजापूर येथील पादशाही कारकीर्दीचे तारिखवार वर्णनाचा पारसी ग्रंथ आहे. त्या ग्रंथाचा अक्षरशः महाराष्ट्र भाषेंत तरजुमा लिहिला जात आहे.

हे ईश्वरा सुलभ कर. उत्तमपणानें हा ग्रंथ समाप्त कर. हरएक समयीं व हरएक वेळेस तुजपासूनच आम्हीं साह्य इच्छितों. नाना प्रकारचे स्तव व अगणित स्तुती सानआ, म्हणजे सर्व आपले कौशल्यानें उत्पन्न करणारा असा जो एक ईश्वर, त्यासच शोभतात कीं त्याणी आपले पूर्ण सामर्थ्यानें मनुष्याचें शरीर श्रेष्ठत्वाच्या पोशाखानें शोभविलें. ईश्वर म्हणतो कीं, सत्य आहे कीं आम्ही मनुष्यास श्रेष्ठतेचा पोशाख देऊन शोभविलें. सत्य आहे कीं, मी करणारा आहे. या पृथ्वींत मनुष्यास खलिफा, म्हणजे प्रतिनिधीचे लाडानें पाळलेले मस्तकावर श्रेष्ठत्वाचा मुगुट ठेविला. मुगुट म्हणजे आसिर्वाद. अत्यंत स्तव व अगणित पृथ्वीचे धणी, ज्याचा जीव पवित्र व ज्याचा प्राण निर्मळ जगाहून श्रेष्ठ असे जे सयदुल-मुरसलीन, म्हणजे पैगंबर, याचे सरदार पृथ्वीवर कृपा करणार महंमद मुस्तफा रसुलिल्लाह सल्लीलाह आलेहे वसल्लम ईश्वराची कृपा सर्वांस पाहोचविण्याचे आश्रयभूत जे सर्वांस त्याचेसाठींच निर्माण केले. ज्याची जाती उत्तम व चार तत्त्वें पवित्र आहेत, त्याचे पवित्र वंशावर व त्याचे कल्याणरूप आसहाब, म्हणजे संनिध राहणारे त्यावर, किं ते धर्माच्या डेऱ्याच्या मेखा व प्रबल धर्माचे महालाचे खांब ते आहेत त्यावर असो.

ईश्वराचा व पैगंबराचा स्तव केल्यानंतर

आकाश ध्वनीचे जाणणारे, सत्य ओळखणारे व वर्तमानाचे समजणारे याचे चित्तावर गुप्त व आच्छादित नाहीं कीं माहाजरान म्हणजे तारिखीची विद्या कीं तारिखेची विद्येनीं विस्तार करणारी होती. श्रेष्ठ विद्येनीं व उत्तम विद्येनीं हिशेब केली गेलेली व गणित केले गेलेली होती. याजकरितां आहे कीं, त्याचा श्रेष्ठ फायदा व थोर नफा खास प्रांत लोकांस माहितगारी प्राप्त होण्याचा आहे. अकलवान लोकांचे ईभ्रतीची वृद्धि करणारी आहे. ईभ्रत व विश्वास हे स्वतः ईश्वरानीं ठरविलेले व ईश्वरानीं केलेले आहेत. ईश्वर आज्ञा करितात कीं, ईभ्रत धरा. तुम्ही म्हणजे दुसऱ्याचे पाहून त्याग करा. तुम्ही हे ज्ञानदृष्टीचे धणी व्हा. या सारांशाचा तपशील व भापणाचा विस्तार तो कीं, जर करितां कोणास सत्य मार्गांत बसविणारी विद्या असेल तर त्याणें एक घटकाभर अंतःकरणास नाना प्रकारचे अंतरापासून स्थिर करून थोडेसें पूर्वी गुजरलेले लोकांचे वर्तमानाकडे सन्मुख व्हावें. ईभ्रतीच्या दृष्टीनीं गुजरलेले लोकांचे वर्तमानांत व गत झालेले लोकांचे कैफियतींत विचाराचे दृष्टीनीं अवलोकन करावें. म्हणजे खास जो कोणाचा सरकतदार नव्हे असा तो ईश्वर त्याचे पूर्ण सामर्थ्याचा व्यय व जें इच्छिल तें करूं शकणार असा जो ईश्वर त्याचे श्रेष्ठ कौशल्यतेची वाहवाट, पृथ्वींतील सर्व अणुरेणूंत एक एक उत्पन्न झालेले पदार्थांत, त्याची माहिती व समजुत होईल. पृथ्वींतील नाश व ऱ्हास व मूळरहित जी पृथ्वी त्यांतील फसाद, म्हणजे वांकडेपणाच्या गोष्टी, व अशाश्वतपणा त्याजला सत्य प्रत्यय येईल. हा गुह्यार्थ बहुतकरून त्याजला ईश्वरासी रुजू करण्याचा वारसा करणारा आहे. बेवफा म्हणजे कोणाशीं टिकून न राहणारी जी पृथ्वी तिची मित्रता व ईष्काच्या अंकुचितपणाचें कारण होईल. आणखीही याच प्रकारें जर करितां कल्याणप्रद स्वभावाचे उत्तम दैववान सुलक्षणिक उत्तम स्वभाववानाच्या कामाचे परिणामावर दृष्टी ठेवील व दुर्गुणी, दुर्दैवान व बलात्काराचा विचार करणारे अयोग्य पुरुषाचे वर्तणुकीवर व वाईट चालीनें चालणाराचे परिणामावर दृष्टी ठेवील तर प्रथम भागाचे लिहिलेले पुरुषाचा स्तव व कीर्ति व दुसरे भागाचे पुरुषाचा वाईटपणा व अपकीर्ति कालचक्राचे सज्यावर पृथ्वी आहे तोपर्यंत जे अवशेष आहे ते लक्षांत येईल. सत्य आहे कीं, ही गोष्ट त्याजला अत्यंत अमर्यादा व अयोग्य मार्गापासून फिरवणारी व शास्त्रज्ञांचे सेवेचे सत्य मार्ग व सन्मार्गांत बसविणारी होईल. येथून लिहिलें जात आहे कीं, हरयेक शहरचे श्रेष्ठ लोक व ज्या कालांतील जे श्रेष्ठ लोक झाले योविपयीं बहुत ग्रंथ केले आहेत व बहुत वर्षे या तहकिकींत घालवून स्मरणार्थ दप्तरें पूर्वी केलीं आहेत. गुजरलेले पुरुपाचे वर्तमान व गत झालेले पुरुपाचें

युध्याचे वर्तमानाचा विस्तार प्रकरणानें पुढें होणारे पुरुषांस बोधाचे व भ्रांत व मुखांस बोधाचें कारण झाले आहे. आरबी वाक्याचा अर्थः "ईश्वर करो. त्याचा यत्न जो व्हावा त्वास योग्य." आणखी येथून पुढें लिहिलें जात आहे कीं, विजापूर शहरांत प्रथम महंमद कासम फिरिस्ता याणी न्यायचिन्हित सुलतान ईब्राहिम पादशाहा याचे कारकीर्दीत सन १०१५ (१६०६–७ इ. स.) सालीं ग्रंथ करून त्या ग्रंथाचें नांव 'नवरसनामा इ फिरिस्ता' असें ठेविलें व त्याच ग्रंथास 'गुलषने ईब्राहिमी' असें म्हणतात, कीं तो ग्रंथ सर्व पृथ्वींत श्रेष्ठ व प्रसिद्ध आहे कीं त्या ग्रंथांत शब्दांचें मूळ सत्यत्त्वावर ठेविलें आहे. श्रेष्ठ भाषणानें व निर्बाधकपणानें तात्पर्य लेखन केलें आहे. हिंदु राज्याचे राजधानीचे आरंभापासून आरंभ करून यावनी राजधानीचे कारकीर्दीपावेतों व धर्मदूषक पुरूषापर्यंत पोहचऊन यावनी ज्ञातीचे श्रेष्ठ पादशाहाचे वर्तमान, कीं ज्यांणीं चौखुट हिंदुस्थानांत राज्य केलें त्याचें तपसीलवार, लिहून ग्रंथांतील तिसेर प्रकरणांत दक्षणचे पातशाहांचे व सरदारांची वागणूक व वर्तमान सविस्तर लिहिलें आहे. विजापूरचे पादशाहांचे वर्तमान त्या ग्रंथांत युसुफ आदिलशाहा ताभ्तरी याचे राजधानीचे व राज्य घेतल्याचे आरंभापासून ईब्राहिम आदिलशाहा मवमुफ याचे कारकीर्दीत दुसरे प्रकरणांत विस्तार केला आहे. याच ईब्राहिम आदिलशाहा याचे कारकीर्दीत मीर रफिउद्दीन पीराजी यांणीं याच शहरांत या प्रकरणी सन १०१७ (इ. स. १६०८–९) सालीं ग्रंथ करून त्या ग्रंथाचें नांव 'तजकरदुलमलुक' असें ठेविलें आहे, कीं त्या ग्रंथांत निवडक मजकूर लिहिला आहे. त्यानंतर मुल्ला जहूर वलद मुल्ला जहुरी कायनी यांणीं केला, कीं तो ग्रंथ प्रसिद्ध व श्रेष्ठ पृथ्वींतील सर्व मनुष्यांस मान्य आहे व श्रेष्ठतेनें सचिन्हित त्या ग्रंथातील कविता पृथ्वींतील सर्व बोलणारास प्रीय व प्रीतिकर आहेत. तो सुलतान अहंमद आदिलशाहा याचे कारकीर्दीत केला. ईब्राहिम याचे कारकीर्दीत सुलतान महंमद आदिलशाहा याची वागणूक व फत्तेमंदी म्हणजे यशस्वीपणा व उत्तम समर्यी युद्ध केल्याचा मजकूर लिहून ग्रंथ करून त्या ग्रंथाचे नांव 'महंमदनामा' असें ठेविलें आहे. यानंतर प्रमुखालय पूर्णता संचयरूप जो दुसरा अली आदिलशाहा याचे कारकीर्दीत सय्यद नरुलुल्लाह वलद काजी सय्यद अली महंमद नुरुतुल्ला याणी पादशाहाच्या जागा व त्या काळांतील वर्तमान व हकीकत स्वच्छ व रसिक फाकिका व प्रौढ मिष्ट शद्ब जादूचे लेखन करणारे लेखणीचे अग्रभागापासून स्रवलेलें लिहून त्या ग्रंथाचें नांव 'इनषाय अली आदिलशाही' असें ठेविलें. तो ग्रंथ प्रसिद्ध आहे. आणखी मलीकुष आरा दक्षणी मिया नसरवी यांणी अली आदिलशाहा याचे यशस्वीपणाचे कथाभाग स्वादिष्ट कसीदे व मिष्ट पद्यरूप कवितेनें त्या काळांतील वहिवाट लिहिली. तो ग्रंथ 'अलीनामा' या नामेंकरून प्रसिद्ध आहे. त्यानंतर विद्यालय शेख अबदुल हसन वलद काजी अबदुल अजीज याणीं अली आदिलशाहा याच्या वागणुकी व कथाभागाचे विस्तार व सिकंदर ज्यान याचे कारकीर्दीतील

मजकूर लिहून बहुत विचारानें ग्रंथ केला, कीं या ग्रंथाचें नांव ‘ तवकैय आदिलशाही ’ असें आहे. तो ग्रंथ करण्यांत बहुत दिवस यत्न करून शेवटीं हादी आश्रर ग्रंथकार याणीं आदिलशाहा याचे यशस्वीपणाचा व वागणुकीचा संपूर्ण कथाभागयुक्त विस्तार केला आहे. तेथें तो लिहितो कीं, मुल्ला जहूर वल्लद मुल्ला जहुरी कायनी याणीं त्या पादशाहा गाजी म्हणजे सुलतान महंमद आदिलशाहा याचे समयांतील वागणुकी बहुत विस्तारयुक्त फाकिका व प्रौढ शद्बानें ग्रंथ करून त्या ग्रंथाचें नांव ‘ महमदनामा ’ असें ठेविलें आहे. त्या दप्तरापैकीं कारणिक विस्तार उपयोगी होता तो निवडक उत्तम व त्यापैकीं सूक्ष्म शद्ब लिहिले होते ते व प्रस्तुतचे श्रेष्ठ लोकांचे सेवेपासून सत्यत्वानें पाहिले व ऐकिले व बहुतकरून सांप्रत दृष्टोत्पत्तीस आले ते सर्व या गरीब फाकिरानें, म्हणजे स्वत: शेख अबदुल हसन याणें त्याहून वाढवून तारिखवार जुळणीनें जुळून त्या दप्तरांत बहुत ग्रंथित केले. परंतु प्रसिद्ध असो कीं, हे दोन्हीही ग्रंथ म्हणजे मुल्ला जहूर याणी केलेला ‘ महंमदनामा ’ व शेख अबदुल हसन यानें केलेला ग्रंथ दुर्मिळ बहुधा मिळतच नाहीं. प्रत्यक्ष अद्यापि शोध करित असतां पाहण्यांत आले नाहींत. परंतु कित्येक कागदांचे तुकडे गत कथाभागाचे वर्तमानाचे लिहिलेले मसुदेवजा कित्येक शेख अबदुल हसन याणीं लिहिलेले व कांहीं ईब्राहिम आसदखानी वगैरे यांचे लिहिलेले विष्कळित व गळाठ्यासारखे अप्रसिद्ध या फाकिरापासी जमलेले होते. ते सांप्रत कित्येक मित्रजन कारणभूत झाले, म्हणजे म्हणूं लागले कीं त्या विस्कळींत व गळाठ्या सारखे कागदांस एके ठिकाणीं जमा करून जुळून एक ग्रंथ निवडक जरकरितां केल्यास फार उत्तम होईल. या फाकिरानें या विचारास निर्फळ समजून हें कार्य कबूल केलें नाहीं. बोलण्याचे शेवटीं, आरबी वाक्याचा अर्थ : “ कोणतेही मागणाराचा धिक्कार करूं नको : ” हा वाक्यार्थ मनांत आणून कित्येक दिवस अंत:करणास या विचारांत सोपून ग्रंथ जुळला होता. पुन्हा तो ग्रंथ वाचून पाहिला नव्हता तोंच दोन तीन नकला उतरल्या व जागोजाग गेल्या. कित्येक दिवसानंतर वाचून पाहिला. त्या ग्रंथांत कित्येक जागीं ज्या चुका दृष्टीस आल्या त्यावर रेघा मारिल्या. कित्येक जागीं, कीं अधिकपणा योग्य होता तो फिरिष्त्याचे तारिखेचे व खाफीखान वगैरेंचे वर्णनापासून अल्प विस्तार व संक्षेपाचे मार्गानें त्यावर वाढाविणेंत आला. हा ग्रंथ समाप्त करण्यानंतर कीं हा ग्रंथ पादशाहाचा केला आहे. आठ स्वर्गाप्रमाणें आठ बुस्तान करून त्या ग्रंथाचें नांव बुसातीने सलातीन असें ठेविलें. त्या ग्रंथाचे अवलोकन करणारे शास्त्रज्ञ पुरुष व मुरवतदार श्रेष्ठ जन ग्रंथावलोकन करणारापासून ही इच्छा आहे कीं या ग्रंथाचे ग्रंथकाराविषयीं किं हा फकीर गरीब महंमद ईब्राहिम आलजबैरी कृपावंत दयावंताच्या कृपेचा ईच्छक आहे. कल्याणार्थ आसिर्वाद द्यावा. जर करतां ग्रंथावलोकन करिते समयीं चूक असल्यास वर्म काढण्यांत उत्तेजन पावों नये. बहुधा कृपावंत पुरुषाचे उत्तम स्वभावाप्रमाणें कार्य करून शुद्ध करावे. ग्रंथ करण्यास माझी काय योग्यता आहे ?

बुस्तान पहिलें

# युसुफ आदिलशाहा

---

## १. मजलस रफीआ युसुफ आदिलशाहा याचें आदिलशाहीचें वहिवाटीचा आरंभ :

जाणावें कीं, बखरींत लिहिलें आहे कीं प्रथम ज्या कोणी पुरुषानें आदिलशाही सिलसिल्यापैकीं कानडे मुलकांत आपलें नावानीं राज्यकारभार चालविला व पादशाहीचा आधिकार धारण करून आपले आज्ञेचे आधिकार चालू केले आणि मजबुतीच्या मार्गानें हुकुमाचे कायदे ठरवून आपले नांवानीं सिक्का व खुतबा आदिलशाहानें चालू केला तो युसुफ बेग सावी म्हणून होता, कीं परिणामीं त्यासच युसुफ आदिलशाहा असें नांव पडलें. ग्रंथकारांनीं त्याचे संबंधांत निरनिराळें लिहिलें आहे. सत्य पाहतां असें आहे कीं, कित्येक बखरींत लिहिलें आहे कीं, तो रुमचे मळीकजाद्यापैकीं आहे. या भाषणांतील तात्पर्य तें आहे कीं, जेव्हां रुमचा सुलतान मुराद[१] पादशाहा सन ८५४ ( १४५०–५१ इ. स.) सालीं महा सामर्थ्यवान अविनाश असा जो ईश्वर त्याचे आज्ञेनें मृत्यु पावला, तेव्हां त्याचा वडिल पुत्र सुलतान महंमद म्हणून होता. याणीं वडिलांचे अंतकाळचे बोधाप्रमाणें आपण सिंहासनारूढ होऊन सिंहासन शोभविलें. त्यास युसुफ नामेंकरून धाकटा बंधू होता, कीं रुपानें व लावण्यानें प्रति युसफ म्हणवित होता. त्याजवर सुलतान महंमद बहुत लोभ करित होता. पितृवत ममतेनें पालन करित होता. त्याजला आपल्या वेगळें ठेवित नव्हता. असें असतां दौलतीकडील कारभारी लोक याणीं राजधानीचा कल्याण ईछकपणा धारण करून येकांतीं सुलतान महंमद यास या कामापासून म्हणजे बंधूवर लोभ करण्यापासून वर्ज्य करित होते व बोलत होते कीं बंधुवर्ग, कीं जे मुलकाचे वारसदार व राज्याचे दायाद भागी आहेत, त्यावर याप्रकारचा लोभ व मित्रता धारण करणें हे अकलेपासून विरुद्ध व कल्याणप्रद मार्गापासून दूर व पुढील विचार पहातां सर्पाचे पिलास खिशांत पालन करण्यासारखे आहे. जेव्हां पुनः पुनः वारंवार विचारवान सेवकलोकांचा या प्रकरणीं हळ व आग्रह अत्यंत पडला तेव्हां निरुपाय होऊन सुलतान महंमद पादशाहा याणीं त्या सर्वांच्या मसलतीस कांहीसें मान्य होऊन आज्ञा केली कीं या कामांत अमर्यादा करणें. दोन कर्म निरुपाय कीं दोन्हीही कर्में कठीण आहेत. ते संकट प्राप्त होईल.

१.– आगा मुराद इ. स. १४५०–५१ त मेला–ब्रिगचा फिरस्ता, भाग ३, पृ. ४; २ फेब्रुवारी १४५१ गिबन व्हॉ. १२, पृ. १५० वर मृत्युतारिख दिली आहे.

प्रथम बिनअपराधी व न्यायाव्यतिरिक्त वृथा वध करणें. दुसरें कर्म त्याचे मातुश्रीचें काळिज पुत्रवियोगाग्निवर जाळणें. आतां विचार तों आहे कीं, युसुफ याचे मातुश्रीसच या प्रकरणीं विचारणा करावी व जरूर ठरविलेले मजकुराविषयीं तिची परवानगी घ्यावी. कारभारी लोक यांणीं निरुपाय होऊन पादशाहाचे आज्ञेवरून त्या वृद्ध स्त्रीचे म्हणजे युसफ याचे मातुश्रीचे, वाड्यांत जाऊन नानाप्रकारचे ठकविद्येचे भाषणानें तात्पर्यार्थ त्या बोलण्यांत दर्शविते झाले. युसफ याची मातुश्री, कीं स्त्री असोन अक्कलवाल होती, अकलेनें समजली कीं हें काम परिणामीं होणारच व आपण परवानगी दिली किंवा न दिली तत्रापि व्हावयाचेंच, असे दृष्टोत्पत्तीस येते. विचार करून एक चांगली युक्ति योजून कारभारी मंडळास उत्तर दिलें कीं, जो तुमचा विचार तोच माझा विचार आहे. परंतु आजची रात्र फुरसत द्यावी. म्हणजे आपल्या डोळ्यांतील पुतळीस, म्हणजे युसुफास, पाहून समाधान पावून उदईक त्याजला तुमचे हवाली करीन किंवा मीच त्याजला आपले हातानींच निःशेष नाहींसें होण्याचे प्रवासाचा प्रवासी करीन, म्हणजे मारून टाकीन. कारभारी लोक यांणीं उत्तर आपले मनोदयानुरूप समजून ठीक आहे म्हणोन आपआपले घरास गेले. कर्मधर्मसंयोगें तेंच दिवशीं ख्वाज्या इमानुद्दीन (ख्वाज्या इमादुद्दीन) या नांवाचा गुर्जस्थानी सौदागर यांणीं सावा या शहराहून नानाप्रकारचे उत्तम उत्तम सेवक तुर्की उत्पत्तीचे विकावयास आणिले होते. त्या सर्व सेवकांत एक सेवक रूपवान व लावण्यानें व वय व वर्णानें शाहाजादा युसुफ याचे प्रतिमेसारखी तस्वीर होती. युसुफाचे मातुश्रीस हीं गोष्ट कळली होतीं. पूर्व रात्रीं गुप्तपणानें सौदागर याजला वाड्यांत बोलावून आणिलें. तो सेवक, जो युसुफ याची प्रतिमाच होता तो, बहुत किंमत देऊन सौदागर याजपासून विकत घेतला. सौदागर यास ताकिदी व बहुत सावधपणानें बोध शिकवून आपले काळजाचा तुकडा जो युसुफ त्या युसुफास जडजवाहिरासहित सौदागराचे हवालीं केला. वायदे पुष्कळ करून त्याचे परिपालनार्थ बहुत बोध केले. ताकिद केली कीं, एका मनुष्यास देखिल या कर्मांत ओळख न देतां रातोरात येथून निघोन आपले वतनाकडे जावे, म्हणोन सांगितले. त्यानंतर युसुफ याचे मातुश्रीनीच जातीनेंच त्याच रात्रीं त्या नूतन खरिदी केलेले सेवकास विषग्रस्त केले व एक प्रकार केला कीं त्याचे रूप काळें होऊन बदलले. मोठ्या पहाटेस वाड्यामध्यें शोक करूं लागली. शाहाजादा मृत्यु पावला असें म्हणून मोठ्यानें ओरडूं लागली. मिषाचे आणि मित्राचे चाली धारण केल्या. कारभारी मंडळ हें वर्तमान ऐकतांच तिचे वाड्यांत हजर झाले. त्या विषग्रस्त मुलास कारभारी मंडळास तिणें दाखविलें. कारभारी लोक यांणीं बहुत समारंभानें व पादशाहीच्या चालीप्रमाणें त्याचें कफन व दफन केलें, म्हणजे उत्तरकार्य केलें. नंतर सुलतान महंमद पादशाहा व सर्व कारभारी मंडळ यांणीं युसुफाचे मातुश्रीपासीं जातीनें येऊन शांतवन केल्यानंतर युसुफाचे मातुश्रीस समाधानाच्या गोष्टी अत्यंत सांगून जाते झाले. ख्वाज्या ईमानुद्दीन

सौदागर याजला जेव्हां या प्रकारचे धन अप्रतिम व अत्यंत द्रव्य मिळालें तेव्हां त्याच रात्रीं क्षण एक अवकाश न करितां चालता झाला. जेव्हां सावा या शहरास, कीं त्या सौदागराचे वस्तिस्थान होतें तेथें, पोहोंचला. शाहाजादा युसुफ याचे पालनार्थी आपल्यास कोणत्याही सबबीनें विसावा देत नव्हता. चाकरीं, पालन करणें व सांभाळणेच्या बारकाईपैकीं एकाही कोणत्याच बारकाईपासून अंतर करित नव्हता. त्यासमयीं शाहाजादा युसफ सात वर्षांचा होता. त्याजला मर्यादेच्या चाली शिकविणाराचे शिक्षेंत ठेविला. पादशाहीचे कायदे पूर्ण विचारानें व मनुष्यानीं कोणते कोणते चालीपासून भिती धरावी त्या भिती व संपूर्ण मर्यादा, गुण व विद्या पूर्ण शिकण्याकरितां स्वाधीन केला. एक वर्ष गुजरल्यानंतर युसुफ याची दाई राबत्यांतील कित्येक मनुष्यांसहित नानाप्रकारचे जडजवाहीर घेऊन शाहाजादा युसुफ याचे मातुश्रीकडून आली. दाई सेवकीण शाहाजादा याचे चाकरीस राहिली. बाकीचे सर्व राबत्यांतील गृहस्थ शाहाजादा याचे सुखरूपतेचे वर्तमान घेऊन जाते झाले. थोडे कित्येक दिवस गुजरल्यानंतर पुनः राबत्यांतील कित्येक सेवक याणीं मातुश्रीकडून उतम प्रकारचे जडजवाहीर आणून शाहाजादा याचे सेवेंत प्रविष्ट करून सुखरूपतेचें वर्तमान व संतोष वृत्त घेऊन जाते झाले. सारांश, याच प्रकारें व मोतादीनें प्रतिवर्षी त्याच्या मातुश्रीकडून मनुष्यें, धन व जवाहीर व नानाप्रकारचे उत्तम पदार्थ घेऊन येत होते. शाहाजादा याचा उत्तम स्वभाव व विद्या शिकणें व दिवसेंदिवस वाढणे व सुखरूपतेचे संतोष वर्तमान मातुश्रीस पोंहचावित होते. हळुहळु हा पादशाहाचा पुत्र आहे असें वर्तमान सावा या शहरांत प्रकट झालें. सर्व मनुष्यांस ही गोष्ट प्रगट झाली. सावा शहराचा मालक फार आशावंत पुरुष होता. त्याणीं आशेचे नेत्र उघडून सौदागर याजकडून हरएक निमित्तानीं आदावत करणें स्विकारून द्रव्य हरण करणेचा स्वभाव धारण केला. इमानुद्दीन याणी शहराच्या हकिमाच्या उपद्रवानीं त्रासून शाहाजादा यास घरांतून काढून कुना (कूम)[२] या शहरास पळविला व तेथे जाऊन राहिला. कित्येक दिवसानंतर सावा या शहरचा सौदागर याणें मृत्यूची पराव मरणाचे प्यालयानें प्राण केली, म्हणजे मृत्यू पावला. तेव्हां ख्वाज्या इमानुद्दीन याचा संकल्प वतनाकडे जाण्याचा दृढतर झाला, कीं तें वतन सावा येथें होते अशा समयांत युसुफ यास सुष्ट स्वप्न पडलें कीं, स्वप्न अवस्थेंत एक पुरुष कल्याणप्रद रीतीचा प्राप्त होऊन आपलें नांव ख्वाज्या खंजर (खिज्र)[३] दर्शवून सांगतो कीं, 'हे युसूफ सावा या शहराचा संकल्प मोडून हिंदुस्थानास जावें. कारण कीं, तुझ्या मनोरथाचा वृक्ष त्या शहरांत सफल व्हावयाचा आहे. प्रवासाचे दुःख भोगल्यानंतर मनोरथाप्रती पावशील. श्रेष्ट राज्याधिकाराचे ऐश्वर्याप्रती पावशील.' युसफ याणी हें स्वप्न समागमचे पुरुषास न सांगता ख्वाज्या ईमानुद्दीन यासी

२.– 'कूम' असावें–ब्रि. फे. ३, पृ. ६. ३.– खिज्र (Khigr)–ब्रि. फे. ३, पृ. ७.

हिंदुस्थानाकडे जावयाचा संकल्प करावा म्हणोन बोलावण्याप्रकरणीं हट्ट व आग्रह केला. त्यावरून ख्वाज्या याणीं वतनाकडे जाणें राहतें करून हिंदुस्थानाकडे जाण्याच्या जहाजावर बसला. सन ८६४ (१४५९–६० इ. स.)[४] सालीं दाभुळच्या (दाभोळ) बंदरास लागला. तेथें कित्येक दिवस वास केला. इतक्यामध्यें एके दिवसीं युसुफ याणीं शिकारीकरितां निघोन संतोषानें समुद्रकिनाऱ्याची सैर करित होता. इतक्यामध्यें युसफ यास तहान लागली. तों एकाएकी समुद्राचे कांठी एक पुरुष तेजस्वी व एक प्रकारचे रूपाचा, कीं जो प्रथम स्वप्नामध्यें प्रगट झाला होता तोच, प्रगट होऊन सन्मुख आला. त्याचे हातांत येक प्याला मिष्टोदक भरलेला होता. तो युसुफाचे हातीं दिला व बोलला कीं,' प्राशन कर.' पूर्ववत प्रमाणें पुन: सुष्टफलदर्शक होऊन बोलला कीं,' जें स्वप्न कीं पहिले दिवसीं पाहिलें होतेंस तें सत्य आहे. येविषयीं शंका धरूं नको व इच्छा करीन ऐस.' युसुफ जेव्हां उदक प्राशन करावयास निमग्न झाला तेव्हां सर्व उदक प्राशन केलें नव्हतें तों सुलक्षणिक खंजर पैगंबर अदृश्य झाले. युसुफ या नवीन कल्याणप्रद चमत्कारावरून संतोष पाऊन आनंदयुक्त झाला. इतका कीं, अंगरख्याचे बंद तुटूं लागले. तेथून ख्वाज्या इमानुद्दीन युसुफासहित निघून बेदरच्या राजधानीकडे चालता झाला. ते दिवसीं ख्वाज्या अल्लाउद्दीन महंमुद कैकनी याचे दौलतीचे बहाराचा नुकतांच प्रारंभ होता व अल्लाउद्दीन यास मलिक उत्तुजार असा किताब झाला. नंतर ख्वाजा जहान असा झाला. तोच खान-इ-कावान या नांवानीही प्रसिद्ध आहे. त्यास प्रधानपणास च र पुरुष बाहामनी पादशाहाकडील येऊन पोहोंचले होते. ख्वाज्या इमानुद्दीन याणी ख्वाज्या अल्लाउद्दीन याची भेट घेतली. उभयतांमध्यें वतनाचे सांनिध्य व समानत्वाचे कारणास्तव मित्रता व सख्य अत्यंत पडलें. एके दिवसीं युसुफ कीं जो रूपानें व लावण्यानें प्रति युसफ होता व उत्तम स्वभाव व सुलक्षणिक चालीमध्यें श्रेष्ठ ख्वाज्या जहान याच्या दृष्टीस पूर्णत्व दिसोन आलें व शोभायमानांत मान्य झाला. ख्वाज्या जहान हा ख्वाज्या इमानुद्दीन यांस बोलला कीं, 'तें बरे आहे कीं, या पुरुषास पादशाहाचे चेले मंडळांत योजावा.' त्यासमयीं दक्षण देशामध्यें वहिवाटी चाल चालू होती कीं, शहरचे मोठमोठ्यांची मुलें पादशाहाचे खासे चेले मंडळांत योजिले जाऊन दैवप्रारब्धानुरूप जातीच्या अक्कलेप्रमाणें तसतसे योग्यतेंत चढत होते. थोडक्याच दिवसांत दैवबळ व प्रारब्धानें मनोरथ पूर्ण होऊन वजिरी व अमिरीच्या पदवीस पावत होते. ख्वाज्या इमानुद्दीन हें भाषण ऐकून यद्यपि प्रारंभीं ही गोष्ट योग्यतेंत अयोग्य जाणून आग्रह केला, परंतु शेवटीं ईश्वरी मनोगताप्रमाणें युसुफ याच्या दैवदशेची वृद्धि व प्रारब्धाचे श्रेष्ठत्वाच्या कारणानें विचार करून कबूल केलें व युसुफ यास पादशाहाचे खासे चेले मंडळांत दाखल केला. याजकरितां कीं, सर्वदा ग्रंथकारानें मूळ वर्तमान न समजतां विचाराशिवाय

४.– फिरिस्ता हें वर्ष ८६४ हि. (१४५९–६० इ. स.) देतो–ब्रि. फे. ३, पृ. ७.

युसुफ आदिलखा याचे वर्तमानास तुर्की गुलाम विकावयास आणिलेला असें लिहीलें आहे. सारांश, सुलतान महंमद बाहामनी याचे चेले मंडळांत युसुफ दाखल जाहल्यानंतर व उत्तम लोकांचे सेवेंत प्रविष्ट झाल्यानंतर दिवसेंदिवस त्याचे दैवाच्या साह्यानें व जातीचे हुषारीनें अबरूस वाढत होता. दिवसेंदिवस श्रेष्ट पदवीस चढूं लागला व ख्वाज्या जहान कैकनी याणी युसुफ याजला पुत्रवत् मानिला. त्याचे संरक्षण मनापासून करित होता. तेव्हां थोडकेच दिवसांत सुलतान महंमद पाद-शाहाचे सरलष्करीचें पद प्राप्त होऊन प्रथम युसुफ आदिलखान नंतर मेजारफीआ असा व तिसरे वेळेस मले कुजर्क असा किताब झाला. सन ८९७ (इ. स. १४९१–९२)[५] सालीं पादशाहीचा झेंडा विजापूर येथें उभा केला. विजापूरचे ताब्यांतील एकंदर गांवसुद्धां विजापूरचा पादशाहा झाला.

## २. युसुफ आदिलशाहाचे उत्पत्तीचें दुसरें वर्णन

रफिउद्दीन षीराजी याचे बोलण्यांतील तात्पर्य हें आहे कीं, बोलतो कीं, मी सन समान व सितैन व तिमामया (१५६७-८ इ. स.) या सालीं विलायतीहून सौदागरीच्या रीतीनें नानाप्रकारच्या पदार्थांसहित दक्षण देशांत आलों. सागरचे कसब्यांत, कीं सागर हे प्रसिद्ध आहे तेथें, पोंहचलों. खरिदीविक्रींत निमग्न झालों. त्या गांवापासून अडीच कोसांवर येक कौला म्हणून कसबा आहे, कीं त्या गांवीं युसुफ आदिलशाहा याची व त्याचे वंशाच्या कबरी आहेत व तेथील खर्चाकडे लंगरचे खर्चाकडून सेवकजन व पाहाऱ्यास शिपाई यास नेमणूक ठरवून दिली आहे. शंभर सेवक संरक्षणास व तसेच सर्व सेवक व हुद्देदार व आणखी फाते देणारे व वजिफे करणारे नेमिले आहेत. सर्व सेवेकराचे जमातीपैकीं षमसुद्दीन खंजरी या नांवाचा एक पुरुष धर्मामध्यें व पवित्र चालीचा होता. त्याचें वय ९० नव्वदावर झालें होतें. प्रवास पुष्कळ केला व युसुफ आदिलखान याचे दौलतींतील जुनाट इमानी चाकरांपैकीं होता. त्याचे शेवटीं त्याचेच कबरेचा चाकर झाला. तेथील सेवकजनांत नेमलेला होता. त्याची भेटी घेतली व मित्रता पडली. तेव्हां षमसुद्दीन हा युसफ आदिलशाहा याच्या कार्यारंभाचा व मूळ उत्पत्तीचा सविस्तर वृत्तांत असा सांगत होता कीं, मी हिंक या शहरांत हसन बेग याचे राजधानीचे कारकीर्दींत होतो. इतक्यामध्यें उमरा ज्याहानशाहा याणीं वैरभाव धारण करून बदलला आहे. असें वर्तमान जाहीर झालें कीं एकमेकांमध्यें वांकडे पडून उभयतां फंदफितुरीचे वस्तिस्थान झाले. हसन बेग याणी फुरसत पाहून ज्याहानशाहाचा मुलूक घेण्याचा संकल्प केला. जेव्हां तबरीन येथें

५.– फिरिस्ता ८९५ हि. (१४८९–९० इ. स.) देतो–ब्रि. फे. १, पृ. ९.

पोहोंचला तेव्हां जहानपाहा याणीं आयुर्दायाचा बिछाना गुंडाळिला, म्हणजे मृत्यु पावला. आजुर्बान्धान व खुरासीन व आराकीन व पारस व करमान मुद्धां त्याचे संपूर्ण मुलूक हसन बेग याणीं घेतले. हकीम व मामलेदार वगैरे आपले तर्फेचे हरएक शहरावर व संपूर्ण मुलुकांतील ठिकाणावर नेमिले. याचप्रकारें अहंमद बेग या नांवाचे आपले भाच्यास सावा या मुलुकावर व सावा शहरचे तर्फेतील गांवावर मालक केला. अहंमद बेग पूर्ण तयारीनें त्या मुलकास पोंहचला. न्याय व इनसाफ व शिपाई संरक्षण व रयतचे पालन करून मुलुकाची वसाहत केली. सावा येथील श्रेष्ठ लोकांची कन्या मागून आपलें लग्न केलें. तिजला संतती झाली. त्यानंतर अहंमद बेग याचे आयुर्दायाचा प्याला परिपूर्ण झाला, म्हणजे मृत्यु पावला. त्याचे अवलादीपैकीं महंमुद बेग सावा येथील मालकपणावर बापाचे गादीवर बसला. त्याणीही श्रेष्ठ बापासारखेच न्यायाच्या व इनसाफाच्या चाली चालवून कीर्ति मिळविली. वीस वर्षापावेतों प्रपंच्य करून जगांत कीर्तिमानपणानें प्रसिद्ध झाला. शेवटीं राज्यांत धांदल झाली. तेव्हां अमीर लोक बदलले. वांकडे वागूं लागले. या कारणास्तव ईस्तेफर मिर्जा यासी वैर धारण केलें. त्यामुळें सावा येथील मालक महंमुद बेग हा युद्धांत मारला गेला. महंमुद बेग याचा वंश शत्रुचे भयानें हरएक परागंदा होऊन देशांतरास गेले. युसुफ बेग हा महंमुद बेग याचा वडिल पुत्र बालदशेंत आस्फहान या शहरांत राहिला. तेथेंही शत्रूंचे भयास्तव न राहातां सिराज येथें आला. तेथें पांच वर्षे चालवून जेव्हां पढूं लागला तेव्हां शत्रूचे जुलुमानें व दुर्दैवाच्या योगानें निरूपाय होऊन हिंदुस्थानास जाणेचा संकल्प याचे अंतःकरणांत उभा राहिला व लार येथें गेला. तेथें मसिदीमध्यें एक स्वप्न पडलें कीं, एक वृद्ध पुरुष तेजस्वी रूपाचा प्रौढ स्वभाववान येऊन कित्येक भाकरी ऊन ऊन युसुफाचे हातांत देता जाला व बोलला कीं, तुजला दक्षिण देशास गेलें पाहिजे. कारण कीं, तुझी भाकरी तेथें शिजली आहे. जागृत जाला तेव्हां त्याजला या स्वप्नेंकडून अति आनंद झाला. ईश्वरी सूचनेप्रमाणें हुरुनचे बंदरास गेला. तेथे पोंहचला तों इतक्यांमध्यें खाज्या जैनुल अबिदीन खानानी या नांवाचा सौदागर सुलतान महंमुद बाहामनी याजकडून नानाप्रकारचे उत्तम पदार्थासहित तेथें पोंहचून, विकावयाचे पदार्थास विकून, तेथील उत्तम उत्तम पदार्थ बहुत खरेदी करून, नानाप्रकारचे घोडे वायूसारखे चालणारे व तुरकी उत्पत्तीचे सेवक व हरएक प्रकारचे किरकोळ जिन्नस व दागदागिने भारी किंमतीचे बरोबर घेऊन, जहाजांत ओझां घालून निघावयाच्या बेतांत होता. तों अशा समयांत युसुफ योग्य पुरुष रूपवान बळकट होता. खाज्या जैनुल अबिदीन व त्याचे समागमचे मंडळीनें युसुफ याजला पूर्ण रदबदलीनें व ममतेनें जहाजांत बसवून घेऊन आणिले. बंदरामध्यें खान साकर याचे मित्रतेत, कि जहाजामध्यें एके जागीं होते व त्यासी मित्रता पूर्ण होती, तेथें कित्येक दिवस घालविले. जेव्हां अद्यापि

शत्रूचे प्राणहारक भयाची कृति राहिली, मनोरथाचे प्रातःकाळचे प्रकाशानें प्रसिध्दीस अवकाश होता, यामुळें दिलगीर होऊन पुनः स्वदेशास निघाला. जेव्हां तार या शहरास येऊन पोंहचला व याच पूर्वींचे मसिदींत उतरला (तेव्हां) पुनः पूर्ववतप्रमाणें स्वप्न पडलें. स्वप्नांतील पुरुष बोलताहे कीं, तुजला दक्षण देशास घालविला होता असें असतां परत येण्याची त्वरा करण्याचें कारण काय? पुनः तेथेंच जा. कारण कीं, तुझा दीप तेथेंच उज्वलित होईल. असा दैवयोग सूचवून पुनः त्याजला दक्षणेस घालविला. याणीं त्याच पूर्वींचे स्थळीं, कीं खान साकर याचे मित्रतेनें प्रथम उतरला होता तेथेंच त्याचे घरीं, उतरला व नित्य शिपाईगिरीचा धंदा अंतःकरणांत धारण केला. तिरंदाजी, जेजेबाजी म्हणजे भाल्याचा खेळ, तरवार मारणेचा अभ्यास व पैलवानीचा अभ्यास बहुत यत्नें करून करित होता. कदापि सदरहू अभ्यासाविषयीं अंतर व आळस करित नव्हता. तेथें अभ्यासाचें एक स्थान म्हणजे तालिमखाना करून साम्यतेचे पुरुषांस प्रमुख होऊन कुस्तीगिरींत व पैलवानीचे विद्येंत तालिम देत होता. कुस्तीचे डावपेंच त्याजला शिकवित होता. तेव्हां कित्येक दिवसानंतर या विद्येंत मान्य झाला. कर्मधर्मसंयोगें त्याच दिवसीं दिल्लीहून येक पैलवान, कीं तो आपले विद्येंत पृथ्वीस प्रसिद्ध होता. त्या काळांतील पैलवानाचा सरदार व आपले बरोबरीचे बहुतेक पैलवानांशीं कुस्ती करून पाडित होता. जागोजागचे सभेंतील यश व बक्षिस मिळवून सर–पैलवानींचीं जयपत्रें मिळऊन बेदरचे राजधानींत येऊन पोंहचला. नित्य जमात, कीं मोताद होती तितकी संपूर्ण पैलवान व संपूर्ण प्रवीण लोक, दरबारांत येऊन पादशाही तक्तासन्मुख येऊन आपआपली विद्या दाखवित होते. पादशाहास गुण दाखवून बक्षिस व पोशाख मिळवित होते. सदरहु दिल्लीवाला पैलवानही आपले पागीर्द मंडळीचे जमातीसहित दरबारांत आला. शहरचे हरएक पैलवानासी व आपले तयार झालेले पागीर्द मंडळीशीं कुस्ती लावून पाडून या विद्येच्या बारिक बारिक कुशलता करून दाखवून पादशाहा व पादशाहाचे मंडळापुढ सलामी देत होता. गप्पा मारित होता. गप्पा छाटित होता. आत्मस्तव व गर्विष्ठपणा करित होता. कारभारी लोक व संपूर्ण खासे लोक व तमासबीन याणीं त्या विद्या व वस्तादीपणा, कीं त्या पैलवानानीं दाखविले होते ते, पाहून संतोष व आनंद पावत होते. परंतु पादशाहा मात्र त्याचे आत्मस्तव व गप्पा छाटण्यानें मनांत खिन्न होत होता. पादशाहाचे नाजूक अंतःकरण त्या पैलवानाचे गर्वाचे हें मोठें ओझें उचलूं शकत नव्हते. याजकरितां त्याचे चित्तांत ही गोष्ट राहिली कीं, ईश्वर या शहरचे मनुष्यांपैकीं कोणास तरी उत्पन्न करो, कीं या गप्पा मारणारासी कुस्ती खेळून जबरदस्त व्हावा, म्हणजे हा पैलवान या गप्पा छाटणें व आत्मस्तव करणें सोडील. युसफही कांहीं निमित्ताच्या शोधांतच होता. बहुत दिवस कांहीं निमित्त पहात होता, कीं त्या

योगानें थोरपणास पावावें. त्याणीं पादशाहाच्या मनांत होता तो किंचित भाव जाणीला. पादशाहाचा मुख्य खान साकर होता त्याचे वशिल्यानें पादशाहास विनंती करविली कीं, पादशाहाची आज्ञा झाल्यास या पैलवानास पाडीन. पादशाहानीं या विनंतीवरून परम संतोष पावून हुकूम दिल्हा. त्यावरून दुसरे शुक्रवारीं मोतादीप्रमाणें सर्वत्र गुणवान जमा झाले. सहरहू पैलवान आपले शागीर्द मंडळीसुद्धां येऊन पोंहचला. युसुफही आपले मंडळासहित कुस्ती खेळण्याचे जाग्याकडेच येऊन बसला. दिल्लीवाला पैलवान याणीं कित्येक जोरदार पैलवानाशीं कुस्ती खेळून आपले गुण दाखविले. युसुफ पैलवानीच्या साजानें तयार होऊन आपण बाजूनें मैदानांत येऊन उभा राहिला. सदरहु पैलवानांनीं जेव्हां युसुफाचे डोळे व बनावट पाहिली तेव्हां विचार पडला. पादशाहाचा हुकूम पैलवानास जाहाला कीं, जो मैदानांत येऊन उभा राहिला आहे त्याशीं कुस्ती कर. पैलवान याणीं अनमान करून बोलला कीं, मी कित्येक पैलवानाशीं कुस्ती केली आहे. या पुरुषाशीं दुसरे शुक्रवारीं करीन. हुकुम झाल्यास माझ्या शागिर्दासी लावितो. असें ऐकतांच युसफ याणें हांक दिली कीं, पाहिजे त्यास मैदानांत पाठवावें. त्यानंतर एकेक त्याच्या शागीर्दापैकीं मैदानांत येऊन युसुफासी कुस्ती करित होते. त दोन तीन पेचांत पडत होते. जेव्हां त्याचे सर्व शागीर्द सरले तेव्हां मुख्य पैलवानास हुकूम झाला. कित्येक पैलवानाशीं कुस्ती करून निम्मा दम झाला आहे. आतां त्यासी कुस्ती कर. तो पैलवान निरुपाय होऊन मैदानांत आला. तो युसुफ यासी हमदस्त झाला, म्हणजे कित्येक डांवपेंच उत्तम प्रकारचे उभयतामध्यें चालू झाले. इतक्यामध्यें युसुफ याणीं अति त्वरेनें एक हात कुल्यांत व दुसरा हात गर्दनीवर मारून मस्तकावर उचलून घेतला व कित्येक कदम पुढें चालून जाऊन पादशाहाचे तक्ताचे रुबरु आणोन जमिनीवर आपटला. तेव्हां एकाएकीं दरबार मंडळ ओरडले. पादशाहा अत्यंत व मनस्वी संतोष व आनंद पावून आपले आंगावरील पोषाख व जवाहीर व द्रव्य युसुफास बहुत देऊन श्रीमंत केलें. दरबारचे कारभारी मंडळीनीं पादशाहाचे रीतीप्रमाणें हरएकानेंही पोषाख, सुवर्ण, जवाहीर, तरवारी व तिरकमानी वगैरे त्याजला बहुत बक्षीस दिलें. असें कीं, त्याच मजलसींत युसुफ याजला अमीरपणाच्या तयारीजोगें मिळाले. कित्येक दिवसानंतर, कीं युसुफ याची हुशारी व शहाणपण परिक्षेस उतरलें तेव्हां सदर–कोतवालीचें काम बक्षिस दिलें. शहरचे इमारतीच्या पाहणीचें काम बाजाराचा बंदोबस्त व सोदे लुच्चे उचले व चोर यांस शिक्षा व सजा करण्याचे काम खास त्यासच दिलें. याचप्रमाणें दिवसेंदिवस त्याचे दैवाचे नक्षत्र, म्हणजे दिवसेंदिवस दैवाचा उदय होऊं लागला. तेव्हां थोडकेच दिवसांत श्रेष्ठत्वाचे पदवीस व उंचत्वाचे पदाधिकारास चढून पादशाहीचा झेंडा विजापूर येथें उभा केला, म्हणजे युसुफ विजापूरचा पादशाहा झाला.

## ३. युसुफाचा कार्यारंभ :

मीर इब्राहीम असदखानी याणीं युसुफ आदिलशाहाचे कार्यारंभाचे प्रकरणीं जें कांहीं लिहिलें आहे त्या इब्राहिम असदखानी याची परंपरा आदिलशाहा याचे दौलतीकडील इमानी सेवकजनापैकीं व सदरहु दौलतीकडील विश्वासू चाकर लोकांपैकीं होती. अली आदिलशाहा याचे कारकीर्दीत तो स्वतः पुरातन चाकर व विश्वासूक सेवक प्रसिद्ध झाला आहे. त्याचे लिहिणेंही या जागीं कथन करणें योग्य दिसलें. याकरितां लेखणीस याचे बोलण्याकडे फिरविण्यांत आलें, म्हणजे त्याचे बोलण्यांत आलें. तो लिहितो कीं, जम पादशाहाप्रमाणें आहे पदवी ज्याची, फरिदुन पादशाहासारखी आहे योग्यता ज्याची, जमषीदशाहा सारखा आहे विश्वास ज्याचा, श्रेष्ठ वंश बाहामन व असफंदयार कीं जे पादशाहाचे पादशाहा व राज्याधिराज जो सुलतान महंमद बाहामनी याचे कारकीर्दीत कीं दक्षणची पादशाही व राजधानी सुलतान अल्लाउद्दीन याचे कारकीर्दीपासून कानगो बाहामनीपर्यंत प्रसिद्ध कीं बाहामनी परंपरेचा तो प्रारंभ पुरुष आहे. वंशपरंपरेनें वंशावळ त्यापर्यंत पोंहचली होती. अहंमदाबाद बेदर येथील राजधानींत इरान येथील पैलवान, कीं जो त्या काळांतील अद्वितीय व त्या समयांतील कुस्ती करण्याचे विद्येमध्यें श्रेष्ठ व प्रबळ होता व त्याजला सातशें शागिर्द होते, तो इराणचे मुलुकाहून हिंदुस्थान येथें आला. हरएक मुलुकांत व हरएक शहरांत येऊन पोंहचत होता. तेथील पैलवानांसी कुस्ती करून त्यांजवर प्रबळ होऊन बक्षिस व इनाम बहुत मिळवित होता. जयपत्रें घेत होता. तो बेदरास येऊन पोंहचला. तेथेंही बराबरीचे पैलवानांचा इच्छक व साम्यतेचे पैलवानांचा इच्छक जाहाला, कीं त्यासी कुस्ती करावी व त्याजला पाडावें. दरबारांतील हुजरे मंडळींनीं या वर्तमानाचा पादशाहास अर्ज केला. पादशाहा याणीं हुकुम केला कीं, आमचेही शहरांत कोणी असेल कीं जो त्यासीं बराबरी करील व कुस्ती खेळेल; असा कोणी आहे कीं काय ? त्यावरून कित्येक हुजरे मंडळीनें अर्ज केला कीं, सर सरनौबत हा प्रसिद्ध बलवान व मोठे निश्चयाचा पैलवान आहे. त्याणीं बहुत पैलवानास कुस्ती करून पाडिलें आहे. मस्त हत्तीसही पाडिलें आहे. तो मात्र यासी बरोबरी करील तर करील. पादशाहांनीं हुकुम केला कीं, पुज्या आतषआर म्हणजे शूरत्वाचा आहे पोशाख ज्यास, शाहामत आसार म्हणजे शूरत्वाचीं आहेत चिन्हें ज्यास, जीरकुवत म्हणजे व्याघ्रासारखे आहे सामर्थ्य ज्यांचें, रुस्तुमइकतदार म्हणजे रुस्तमासारखे आहे सामर्थ्य ज्यांचे असा जो हुसेन आका रूमवाला यास हुजुर आणविला आणि पादशाहा यांणीं आज्ञा केली कीं, या इराणी पैलवानासी कुस्ती कर. हुसेन आका याणीं अर्ज केला कीं, मी वृद्ध झालों आहे. माझें, बल व सामर्थ्य अति वार्धिक्यास पोंहचलें. परंतु माझ्या तालिमखान्यांत कित्येक हुनर

पैलवान अभ्यासांत निपुण आहेत. हुकुम झाल्यास त्यांतून एक पैलवान त्या पलवानासी कुस्ती करूं शकेल असा आणितो. नंतर हुसेन आका शाहामतपन्हा, म्हणजे शूरत्वास आश्रयभूत व पुज्याआत दस्तगाह म्हणजे वीरवृत्तीस आधारभूत जो, त्याणे युसुफ बेग सावी याजला, कीं जो युसुफ योग्य पुरुष, बलवान, शूर, शरीरसंपत्तिवान व गुणवान होता तो आपले सर्व शागिर्दांचा वस्ताद होता त्याजला, घेऊन आला. तेव्हां पादशाहा याचा हुकुम झाला कीं, इराणवाले पैलवानासी कुस्ती करण्याकरितां तयार व सिद्ध व्हावें. एक दिवस कुस्तीकरितां नेमिला. त्यावरून नेमलेले दिवसीं दरबारची सर्व मंडळी जमली. पादशाहा ऐश्वर्यासहित तक्तावर शोभायमान जाहला, म्हणजे तक्तावर बसला. संपूर्ण कारभारी मंडळ, कामदार, प्रधान व मानकरी आले आणि आसपासचे सर्व पैलवान व दुसरे खासे मंडळ व तमासबीन जमा झाले. युसुफ बेग यांणीं मुस्तजन पैलवानाचे चालीप्रमाणें पैलवानी चड्डी घालून कंबरबंद मजबुत बांधून, कस्तुरी व केशर व चंदन व बुक्का सर्वांगास लावून, शालजोडी माळेसारखी गळ्यांत घालून, मस्त हस्तीप्रमाणें आला व मर्यादेनें पादशाहा, कारभारी मंडळ, वस्ताद व संपूर्ण आपले बरोबरीचे पैलवान लोकांस सलाम करण्याचे श्रेष्ट होऊन, म्हणजे सर्वांस सलाम करून, मैदानांत फिरूं लागला. इराणचा पैलवानही इराणी पैलवानांच्या चालीप्रमाणें कातडयाची चड्डी घालून, गंध व सुगंधी पदार्थ शरीरास लावून, पैलवानाचे ऐटीनें आला. सर्वांस सलाम करून मैदानांत उभा राहिला. सातशें पैलवान त्याचे शागिर्दी तक्तापुढें वेढा देऊन उभे राहिले. नंतर इराणचे पैलवानानीं सन्मुखचे पैलवानास, म्हणजे युसुफास, हलका पैलवान समजून तक्तापुढें येऊन सलाम व मुजरा करून अर्ज केला कीं, पादशाहाचे आयुष्य व दौलत चिरकाल असो. मी आपले संपूर्ण वयांत म्हणजे आजपर्यंत ज्या पैलवानांसी कुस्ती केली व ज्या पैलवानांवर जबरदस्त झालों ते पैलवान या पैलवानापेक्षां दुपटी तिपटीनें होते. त्याजला पाडिलें. या मुलाशीं हमदस्त होणें, म्हणजे बराबरी करणें, मजला कंटाळा आहे. यांत फार हलकेपणा आहे. बेअब्रू आहे. दुसरा माझ्या जोडीचा असेल त्याजला पाठऊन देण्याविषयीं हुकूम व्हावा. हुसैन आका यांणीं दांडगेपणानें उत्तर देऊन बोलला कीं, आधीं हें बाळ, कीं मैदानामध्यें कुस्ती करण्याकरितां तयार होऊन व बनून उभे राहिलें आहे, याशी कुस्ती कर. जर करितां या मुलास म्हणजे युसुफ यास पाडलेस तर दुसरा मैदानांत येऊन पोंहचेल. तेव्हां उभयतां पैलवान सन्मुख येऊन उभे राहिले. युसफ यांणीं प्रथम ईश्वराचा स्तव करून किबल्याकडे म्हणजे मक्केकडे नमस्कार केला आणि इराणचे पैलवानासीं कुस्ती करण्यास आरंभ करून त्याच्या बगलेकडे गेला. कित्येक डाव व पेंच दिलपसंत त्या उभयतां पैलवानांमध्यें होऊं लागले. जो डाव युसुफ याजवर करित होता त्या पेंचाचे निवारण तो पैलवान करित होता. जो डाव इराणचा

पैलवान करित होता त्याचें निवारण युसुफ करित होता. जेव्हां कित्येक डावपेंच भयंकर याप्रमाणें उभयतामध्यें प्रसिद्ध झाले तेव्हां बळी निर्बळी कोण हे ओळखत नव्हतें. पादशाहा, कारभारी मंडळ, संपूर्ण खासे मंडळ व तमासबिन त्या उभयतांचे डावपेंच व गुण पाहून संतोष पावून शाबास व वाहवा म्हणून स्तुती करूं लागले. इतक्यामध्यें एकाएकी युसुफ याणी तारुण्यबळें करून व डावपेचाचे सामर्थ्यानीं त्वरा करून जलद एक हात त्याचे कमरबंदावर मजबूत मारून दुसरा हात त्याचे गर्दनीवर नेऊन, ईश्वराचें नांव रसुल्लिल्लाह महंमद मुस्तफा सल्लिल्लाह आलहे वआलही वसल्लम यास कर्तेपणा देऊन, एकाएकी जमिनीवरून तो पहिलवान उपटला व मस्तकावर नेऊन असा भूमीवर आपटला, कीं त्याच्या बरगड्या पाठीचा चुराडा झाला. तेव्हां हुजुरचे मंडळ, सर्वत्र लोक व तमासबीन मोठ्यानें ओरडले व चहूंकडून शाबासकीच्या हाका उठल्या. सुलतान महंमद पादशाहा याणीं युसुफ याजला पुढें बोलावून आंगावरील पोषाख, इनाम व बक्षिस देऊन श्रेष्ठ व श्रीमंत केला. सर्वत्र कारभारी मंडळ व खासगीचे मंडळ या हरएकानीही आपआपले योग्यतेनुरूप पोषाख बक्षीसें, द्रव्य व अनेक उत्तम पदार्थ युसुफ याजला दिले, कीं युसुफ याच्या सभोंवती राशी पडल्या. त्याच दिवशीं पादशाहा याणीं गोगी वगैरे पाच गांव युसुफ बेग यास इनाम दिले युसुफ याजला हुजूर संनिध निरंतर राहण्याचा हुकुम दिल्हा. हें प्रकर्ण सन ८९५ ( १४८९–१४९० इ. स. ) मध्यें झालें. नंतर युसुफ बेग हुजुरचा चाकर झाला. बसणें, उठणें व चालचलणीमध्यें पूर्ण योग्यतेनें व मान्यपणानें पादशाहाच्या व संपूर्ण कारभारी मंडळाच्या दृष्टींत शोभायमान झाला. तेव्हां प्रथम हुजूरदारुगीचा हुद्दा मिळाला. नंतर कित्येक दिवसानीं कोतवाली बक्षिस झाली. त्यानंतर हवालदारी मिळाली.

४. जाणावें कीं :

येविषयींचें वर्णन निरनिराळें आहे. कदाचित कालचक्राचे नुतनोद्भव व दैवरेषेचे गतीप्रमाणें युसुफ हा रुमच्या मलिकजाद्याचाही असेल, कीं येविषयींचा मजकूर पहिले प्रकरणांत लिहिला आहे. सावा या शहराचे अमीरजाद्याचाही असेल, कीं जो मजकूर दुसरे प्रकरणांत लिहिला आहे. दैवयोगानें व अन्नोदक-रुणानुबंधानें त्याजला संकटातून काढून दक्षणचे हिंदुस्थानाकडे ओढून आणला असेल. दक्षणचे चाल व कायद्यानें प्रवीण श्रेष्ठ व अमीरजादे लोकांस श्रेष्ठ पदवीस वाढणें हलहलु थोडके दिवसांत प्राप्त होत होतें. युसफ याजला पादशाही चेल्यांत घातले असेल. त्यानंतर थोडके दिवसांत सर सरनोबतीच्या पदवीस, कीं जें पद दक्षणचें मालकास

दिलें होतें त्या पदवीस, प्राप्त झाला असेल. येविषयीं कीं जो मजकूर तिसरे प्रकर्णांत लिहिला आहे व त्या काळांतही तिरंदाजीचेही विद्येचाही अभ्यास सर्वत्र करित होते त्यामध्यें आपले सोबतीचें मंडळांत सरदार होऊन सर्वांवर चढ केला असेल. याच कामाकरितां पैलवानाची कुस्ती करून प्रबल झाला असेल. यांत अशक्य नाहीं. आरबी वाक्याचा अर्थ : “ महा सामर्थ्यवान ईश्वर. त्याणींच हें ठरविलें आहे. परंतु त्याचें आश्चर्य आहे. ” महंमद कासम फिरिस्ता, कीं त्याचें वर्णन कित्येक तवारिखेचे ग्रंथांत याच प्रकरणावर वर्णन पुरें केलें आहे, कीं युसुफ हा तुर्की उत्पत्तीचा चाकर विकावयास आलेला होता, हें प्रसिध्ध आहे. यद्यपि दुसऱ्या प्रकरणात मजकूर दुसरे प्रकर्णाचा आहे तत्रापि कांहीं चिंता नाहीं. तात्पर्य दिवसेंदिवस त्याचे दैवाचे नक्षत्र वृध्धीच्या उंचत्वामध्यें व वृध्धीमध्यें होतें. दिवसेंदिवस त्याचे तेज वाढत होतें व त्याचे हुषारीचा आंगस्वभाव प्रसिध्ध होत होता. अशा समयांत तेलंगचे मुलुकाचे सरहद्दींतून वर्तमान आलें कीं, तिकडील तर्फेतील मजूर लोकांनीं बंड करून गर्विष्ठपणा व माजुरपणानें कांहीं विचार करित नाहींत. वाटमार्ग लुटून घेणें बहुत आरंभलें आहे. त्या गांवोगावची रयत त्यांचे उपद्रवानें प्राणत्याग करण्यापर्यंत आली आहे. त्यावरून विचार करणारे कारभारी लोक याणीं त्या बंडवाले लोकांचे बदचालीवरून पारपत्य करण्याचा विचार करून त्या माजुरी लोकांवर बहुत लष्कर नेमणेची तजवीज केली. कित्येक कारभारी कपटी लोक, कीं असाध्य वाटणारे, टपून बसलेच होते. दिवसेदिवस युसुफ याची दौलत वाढत चालली. सबब कारभारी यानीं येविषयींचे कपट व वांकडेपणा धारण करून पाहूं शकत नव्हते. इच्छित होते कीं युसुफ हा सरकारांत नसावा, म्हणजे हा थोर पदवीस व थोरपणाचे पदाधिकारास पावणार नाहीं. असा समय जाणोन सरकारांत अर्ज कळविला कीं, युसफ बेग हा मोठा जवान व शूर व धैर्यवान आहे. हें काम त्याचे योग्य आहे. त्याजला या कामावर प्रमुख करणें योग्य दिसतें. पादशाहा याणीं त्या सर्वांचा अर्ज उत्तम जाणोन युसुफ याजला पादशाही पोशाखानीं वाढवून व मजलसरफिआ व मलकुपर्क असे किताब देऊन सिध्ध सैन्यासहित रवाना केला. मजलसरफिआ याणीं त्या हद्दींत पोंहचल्यानंतर युक्तीनें व अकलेनें व बळानीं थोडकेच दिवसांत त्या जिल्ह्यांतील बंडवाले लोकांचे वाजवी पारपत्यें व शिक्षा केली. संपूर्ण हद्दी व मार्ग या उपद्रवाचे कांटेकचऱ्यापासून निष्कंटक व सोज्वळ केले. सरकारांत कांहीं उत्तमोत्तम पदार्थ नजर पाठऊन विजापूरकडे परत येण्याचे संकल्पांत होता. इतक्यांमध्यें एके दिवसीं पादशाहास स्मरण होऊन विचारलें कीं, युसुफ यास जाऊन बहुत दिवस झाले. त्याचेकडील वर्तमान कांहींच आलें नाहीं. त्याचें कारण असें होते कीं, युसुफ अर्ज्या व विनंतीपत्रें सरकारांत पाठवित होता. परंतु सर्व कारभारी मंडळ कपटी व आदावतखोर हे त्या पत्रांस आपले मनांतील भावास बाधक समजून तीं विनंतीपत्रें दाबून ठेवून

बादशाहास निवेदन करित नव्हते. अशा समयांत हुजुर अर्ज केला कीं, युसुफ यार्णी तो मुलुख घेऊन आपणच मालक असा दावा ठेविला आहे. त्यावरून हुसेन आका यार्णी त्या सर्वांस उत्तर दिलें कीं, युसुफ असा निमकहराम नाहीं, कीं पादशाहाचे कामांत आशा करील. परंतु अलबत यांत कांहीं तरी कारण असेल. त्यामुळें इतके दिवस तिकडे राहावयाचें कारण झालें. असें बोलून नंतर हूसेन आका यार्णी येविषयीं विचार करून बारी आका याजला युसुफ यास आणावयाकरितां पाठविला. बारी आकासही जाऊन कित्येक दिवस झाले. तेव्हां पुनः कपटी लोकांनीं दरबारांत आरडाओरडा केला कीं, दोघेही हरामखोर एकत्र होऊन उभयतांनींही मालकपणाचा संकल्प ठेविला आहे. कारण कीं, उभयतांतून एकही अद्यापि परत येत नाहीं. पादशाहा यार्णी येविषयीं हुसेन आका यास आज्ञा केली कीं, तुम्ही जलद युसुफ याजला आणोन हजर करावा. त्यावरून हुसेन आका खुद जातीनें तिकडे रवाना होऊन बारी आका याजला तेथील बंदोबस्तास ठेऊन मजलसरफिआ यासुध्धां व नाना प्रकारचे उत्तम पदार्थ राजपसंत नजरेकरितां घेऊन हुजूर रवाना झाले. मजलसरफिआ यशस्वी व फतेमंद होऊन परत आल्याचें वर्तमान ऐकण्यानी पादशाहा यार्णी संतोषयुक्त होऊन बहुत कृपा व मेहरबानगीनें व शाही खलिल्लुल्लाह कर्मानी कुदस सीरहु या दरवाज्यापर्यंत सामोरे जाऊन शहरांत घेऊन आला. हुसेन आका व मजलसरफिआ यार्णी नजरेचे पदार्थ समागमें आणिले होते ते पादशाहाचे सेवेसी प्रविष्ट करून यशस्वीपणाचे व कामाचें व बंदोबस्ताचे व बंडवाले लोकांस शिक्षा व पारपत्य केल्याचें संपूर्ण वर्तमान जसें झालें होतें तसें निवेदन केलें. पादशाहा यार्णी ते सर्व नजरेचे पदार्थ अत्यंत प्रीतीनें स्वीकार करून युसुफ मजलसरफिआ याची उत्तम सेवा व उत्तम विचारावरून अत्यंत संतोष व आनंद पावोन युसुफ याजला नवीन पादशाही अधिकारानें बक्षिस व इनाम पादशाही चालीप्रमाणें देऊन श्रेष्ठ व मान्य करून, म्हणजे योग्यतेस चढऊन, कानकुडतीचे हद्दीपासून व कल्याणमज्यानचे हद्दीपर्यंत कोवा व कची व कालस्तरी ताब्यांतील व तर्फेतील गांवांसुद्धा युसुफ याजला दिले. मंगळवेढें, कीं जें पूर्वींचे राजे लोकांची जुनाट तख्ताची जागा होती तीही जागा म्हणजे मंगळवेढे, युसुफ याचे ताब्यांत आलें. बारी आका याजला सुभा होनकुली या किताबानें पदाधिकारी व श्रेष्ठ करून त्यास तेलंग देशाचे जिल्हांत रहाण्याचा हुकूम दिल्हा. त्यानंतर दिवसेंदिवस युसुफ याचें दैव उच्चत्वास पोंहचणारें व प्रारब्ध श्रेष्ठत्वाचा विचार करणारें वृध्धिंगततेंत होतें. त्यामुळें संपूर्ण अमीरलोकांहून युसुफ श्रेष्ठ झाला. सुलतान महंमद पादशाहा वारल्यानंतर बाहामनी राजधानींत धांदल प्रसिद्ध झाल्यानंतर व सुलतान महंमुद पादशाहा याचे दौलतीस जीर्णता व वार्धक्य आल्यानंतर, म्हणजे दौलत खराबीत झाल्यानंतर, युसुफ यार्णी बहुत शिपायांची जमात ठेविली. त्याचे बहुत

प्रीतीनें पालन केलें. तुरकी लोक व इराणचे व तुरानचे मोंगल लोक, कीं बाहामनी पादशाहापासीं जमले होतें त्याजला पादशाई भरंवशानें आपले जवळ बोलावून आणून, श्रेष्ठ मर्तबे देऊन, वाढविले व सामर्थ्य व दौलत अत्यंत प्राप्त झाली. याप्रमाणें विजापूर येथील खुतबा आपले नावानें पढविला. आपलें नावाचा खान हा शब्द पादशाहानें बदलून आपलें नांव युसुफ आदिलशाहा असें ठेविलें. त्याजला याजकरितां युसुफ सावी असें म्हणतात, कीं सावा या शहरांत बहुत दिवस प्रतिपालन केलेला होता. येविषयींचा मजकूर पूर्वी लिहिलाच आहे. दक्षणचे मनुष्याचे बोलण्यांत युसुफ सवाई असेंही प्रसिद्ध होतें. त्याचेंही कारण हें आहे कीं. दक्षणी लोकांचे पाठांत एकावर पाव हिसा अधिक असला म्हणजे त्यास सव्वा असें म्हणतात. जेव्हां युसुफ हा महंमदशाहाचे आमीर लोकांत दौलतीनें व ऐश्वर्यानें सर्वांहून श्रेष्ठ व अधिक होता व मुलुकही दुसरेकडील लोकांचे मुलुकाहून युसुफ याणीं सवाईनें अधिक हस्तगत केला होता या कारणास्तव युसुफ सवाई असे बोलत होते.

## ५. कासम बरीद याणीं वैरत्वावर उठणें व विजयानगर येथील अधिकारी तिमराज याजला हाकलून देणें :

जेव्हां युसुफ आदिलशाहा पादशाहा झाला व दिवसेंदिवस त्याच्या दैवाचें नक्षत्र वृध्दिगत होऊन ऐश्वर्यांत आणि संपत्तींत वाढत होतें (तेव्हां) कासम बरीद सुलतान महंमूद याचा हुकूम न मानितां बाहामनी राजधानीचे कामावर आपणच प्रबळ झाला होता. विजापुरचा मुलुक आपलेकडे यावा अशी कित्येक दिवस आशा करितच होता. सांप्रत त्याच्या वांकडेपणाची नाडी वाहूं लागली. जुनाट कपट अंत:करणात होतें. हलीं चलणवलणांत आला, म्हणजे दुर्बुध्धीनें उद्योग करूं लागला. विजयानगर येथील अधिकारी तिमराज, कीं त्यांणींही आपले मुलुकांतील वारसदार राजवंशास न मानितां आपणच प्रबळ होऊन, मालक झाला होता, हे उभयतां अशर आणि आशा धारण करून युसुफ आलिशाहा यास हांकून देण्याकरितां उठले. याचप्रकारें दुसरे तर्फेंतील तर्फदारही आशा दाखऊन त्यावर उठविले. याचप्रकारें हरएक तर्फेकडून शत्रु समुदाय युसुफ आदिलशाहा याजवर उठून संकट उभें केलें. परंतु ईश्वराची कृपा युसुफ आदिलशाहा याजवर होती. त्यायोगें वारंवार आपले हिकमतीनें व पराक्रमानें हरएक शत्रूशीं हरएक कर्मांत अनुसरून चहुंकडील धांदल निवारण केली. संकटाचा अग्नि, कीं चहूंकडून लागला होता तो, युसुफ याचे पराक्रमाचे उदकानें शांत झाला. अशा समयांत युसुफ आदिलशाहा याचे प्रकृतीनें आरोग्यपणाचा मार्ग उल्लंघन केला, म्हणजे प्रकृति

बिघडली. तेव्हां दोन महिने भरत आले होते तों सर्वांमध्यें युसुफ मृत्यु पावला असें वर्तमान प्रगट झालें. असें असतां ईश्वराची कृपा त्यानंतर होती. यामुळें ईश्वराचे वैद्यशाळेंतून आरोग्यतेचा उपाय झाला व निखालस आरोग्य झाला. आरोग्य जाहल्यानंतर स्नान करून ईश्वराचे स्तव व वंदन करून खजिन्याचा दरवाजा मोकळा केला आणि धर्म करण्याचा हात उंच केला. जवळचे व दूरचे लोकांस बहुत धर्मानें व गरीब व भिकारी यांजला अत्यंत धर्म करून धनवंत केलें. वीस हजार होन मक्का व मदिना येथील राहणारे व विद्वान व संभावित यांजला नजर पाठविले. वीस हजार होन ख्वाज्या अबदुल्ला हरवी (हिरवी) मिरजा वतनावरून येते वेळेस त्याचे बरोबर होता त्याचे हवाली केले आणि सांगितलें कीं, स्वदेशास जाऊन सावा शहरांत मसिदी व मनोरे बांधावे व शहरांत पाणी आणावें. त्याप्रमाणें मसिदी व मनोरे बांधिले. कित्येक दिवसानंतर पुन: तिमराज वांकडेपणानें व मुलूक व विजापूरचे ताब्यांतील गांवे हस्तगत करावी या संकल्पानें बहुत लष्कराची सिध्धता करून विजापुराकडे चालता झाला. युसुफ आदिलशाहा यार्णी हे वर्तमान ऐकतांच, आठ हजार स्वारांहून अधिक स्वार बरोबर नसतां, शत्रु पराभव करण्याची हिंमत बांधून या अल्ली व ईश्वरा तूं आश्रय आहेस असें म्हणोन रिकाबींत पाय ठेविला. शत्रूकडे सन्मुख जाहला. उभय सेना सन्मुख होण्यानंतर व कत्तल करणार व युद्ध करणार याची युद्धाची रचना केल्यानंतर महान दारूण युद्ध झालें. सहस्त्रावधि मनुष्यें दोहींकडील ठार व घायाळ झालीं. हिंदूकडील फौजेनें युसुफ याचे फौजेचा मोड केला. यामुळें युसुफ अदिलशाहा यार्णी कांहीं जमातीसुध्धां तमाशबीन लोक युध्धाचा तमाशा पाहाणारे लोकांत निघोन आपण येकटा येकीकडे जाऊन उभा राहिला. आपल्या सेनेची खराबी पाहून अंत:करणात खिन्न जाहला. परंतु निराशा मनांत न आणितां ईश्वराचे बळकट दोरीस मजबूत हातीं धरून ईश्वराच्या आधाराची इच्छा बळकट केली. जेव्हां ओळखिलें कीं, शत्रूंनीं बाह्यात्कारी आपल्यास यश आलें असें जाणून संतोषयुक्त खातरजमा पावला आहे, लुटणें व हरण करण्यांत निमग्न झाला आहे, असें अवलोकन करून अंत:करणांत हिंमत बांधली. ईश्वराच्या आधारावर पूर्ण भरंवसा ठेऊन त्याचे दोन हजार स्वारानिसीं, कीं जे स्वार त्याची सेना सर्व विस्कळित झाल्यानंतर युसुफ याजपासीं राहिले होते, एकदम हल्ला करून शत्रूचे सेनेवर, कीं जी सेना टोळधाडीहून अधिक होती त्याजवर चालून जाऊन पडले. [६] तेव्हां शत्रू व त्याचे लस्कर व बळवान

६. फिरिस्ता रजब ८८९ हि. (एप्रिल १४९३) शनवार देतो– ब्रि. फे. ३, पृ. १२–१३, परंतु बहुधा फिरिस्ताच्याच आधारें मुधोळकर घोरपडे घराण्याच्या बखरींत ११ रजब ८९८ हि. शनवार (२८ एप्रिल १४९३) ही तारिख दिली आहे. मु. घो. ब., पृ. १४२.

लोकांचे जमातीनें युसुफ याजला सलामी दिली. तरवारी व शस्त्रें युसुफ याजला देते जाले. तिमराज याजकडील सर्व सेनेंत येकच धांदल जाहली. या योगानें अयोग्य, म्हणजे तिमराज, हा युध्धप्रसंगातून आपला जीव रक्षण करून पळून गेला. तेव्हां यावनी सेनेस अत्यंत लूट हातीं लागली. युसुफ आदिलशाहा याणीं ईश्वराचा स्तव करून यशस्वी आणि फतेहमंद होऊन आपले राजधानीस येता झाला.

## ६. आदिलशाहा याणीं षिआचे धर्मास चालू करणें व खलिफा यांचें नांव वर्ज करून श्रेष्ठ इमाम यांचे नांवें खुतबा पढविणें :

जेव्हां आदिलशाहा याचे दैवाचे सुदैवतेनें व प्रारब्धाचे सानुकुलतेनें वृध्धिगतता दिवसेंदिवस प्राप्त झाली व सामर्थ्य व ऐश्वर्य पूर्ण प्राप्त झालें तेव्हां तर्फेतर्फेचे तर्फदार, जे बदचालीचे, त्यांस योग्यपणाचे कारणानें शिक्षा व पारिपत्य करिता झाला. मुलुकाची विस्तीर्णता व आपल्या राज्यांतील आसपासचे गांवची विस्तीर्णता प्रगट झाली, म्हणजे मुलुक अधिक वाढला व पूर्ण खातरजमा प्राप्त झाली. तेव्हां इछिलें कीं, जो संकल्प, कीं बहुत दिवस मनामध्यें होता तो, प्रगट केला. एके दिवशीं सभा[७] करून दौलतीकडील कारभारी व प्रमुख कामदार लोक जमविले व शहरांतील मोठे मोठे विद्वान लोकहि बोलावून आणिले आणि मिष्ट व शोभिवंत व उत्तमपणानें बोलता झाला कीं, या कार्यारंभाचे पूर्वी मी ईश्वरास नवस केला आहे कीं, जर करितां ईश्वर मजला प्रबल ऐश्वर्य व श्रेष्ठ संपत्ती व पादशाहापणा होईल तर, इमाम याचा धर्म चालवीन. षिआ धर्माची चाल शोभवीन, म्हणजे धारण करीन. खुतबा पवित्र इमाम याचे नावें पढवीन. आसहाब, म्हणजे पैगंबराचे संनिध रहाणारे, यांचा मजला कदापि कंटाळा नाहीं व हनफीच्या धर्मापासून मजला कदापि चिंता व खेद नाहीं. ज्यास जी चाल चांगली वाटली त्याणीं ती स्वीकारावी. दुसऱ्याचे त्याजला आजेव करण्याचें कारण नाहीं. असें आहे. आतां तुम्हां सर्वांचे विचारास कसें येतें ? या प्रकरणीं काय मसलत सांगतां ? असें विचारिल्यावरून त्या जमातीपैकीं जे कोणी षिआचे धर्माचे होते त्या कित्येकांनीं खास पादशाहाचे अकलेचे मनोधारणानुरूप मान्य होऊन उत्तर दिलें कीं, बिसमिल्लाह, फार चांगले व अति उत्तम आहे. कल्याणाचे कामांत कोणाचाही उत्तम विचार घेणेचें कारण नाहीं. कित्येक हनफी व सुनी धर्माचे लोक होते त्याणीं त्या जमातींतून कित्येकांनीं उत्तरास ओठ उघडला नाहीं. जिव्हेस वर्ज करण्याविषयीं व ज्याचा जो धर्म नव्हे यदर्थीचे सूचनार्थी चलनवलनांत न आणितां स्तब्ध राहिले. कित्येक जे स्पष्ट वक्ते होते त्याणीं येविषयीं अमान्य होऊन उत्तर दिलें कीं, दुर्वि-

७. इ. स. १५०२ तील प्रसंग— ब्रि. फे. ३, पृ. २२.

चार करणाराचे अकलेसंनिध हें काम उत्तम आचारानें नाहीं. कारण कीं, राजधानीचें मूळ व ऐश्वर्याची बुनयाद नूतनपणानेंच प्रसिद्ध झाले आहे, म्हणजे नुकतीच संपत्ती आली आहे व वैरी टपून बसलेच आहेत. सुलतान महंमुद, कीं या मुलकाचा वारिसदार आहे तो, मध्यभागीं आहे. असेच आणखीही दावेदार, जसे अमीर बरीद व अहंमद निजामुलमुल्क व इमादुल्मुल्क हे, सर्व केवळ सुनी धर्माचे आहेत. सर्व सरकारचे अमीर लोक व शिपाई मंडळ व संपूर्ण आसपासचें व शहरांतील राहणारे हनफी धर्माचे व सुनी धर्माचे आहेत. न जाणों कीं, या कर्मानें मोठें संकट उभें राहील, कीं त्याची प्राप्ती अकल्याणकारक होईल व संकटाचा अग्नि मस्तक उचलील. तो अग्नि विझविण्याची शक्ती रहाणार नाहीं. आपले कल्याण त्यांत आहे कीं, चित्तास या संकल्पापासून दूर ठेवावें, म्हणजे हा संकल्प करूं नये. आदिलशाहा हें उत्तर श्रवण करून खालीं मान घालून विचारांत पडला. संपूर्ण कामदार, अमात्य प्रतिकूल झाले यामुळें फिकिरींत पडून निरुपाय होऊन स्तब्ध राहिला. इतक्यामध्यें इराण येथून वर्तमान आलें कीं, शाहा इस्माईल सुफवी याणीं इराणचे मुलुकांत पिआचा धर्म चालविला व खुतबा बदलून खलिफा याचे नावानें सोडून पवित्र इमाम याचे नांवें पढविला. युसुफ आदिलशाहा याणीं हें संतोषाचें वर्तमान ऐकतांच, कीं त्याच मनोरथाप्रमाणेंच गावरून, आनंदयुक्त व अत्यंत संतोषप्रद झाला. तो मनोरथाचा वृक्ष, कीं ज्याचें चित्त तल्लक्षण शेतांत उगवून पादशाहाचे प्रतिकूलतेनें सुकला होता तो, वाढला व नवीन सपल्लव व सपत्र होऊन टवटवीत झाला. तेव्हां भयास व संशयास एकाएकीं पाठीमागें टाकून इछित मनोरथाचा संकल्प केला. नंतर माहे जमादिलावल सन ९०८ (नवंबर १५०२) शुक्रवारी आर्क किल्याचे मसिदींत संपूर्ण अमीर लोक, खासे मंडळी व सर्वांसहित आला. नबीब हा कलमें पढणारांत मातबर अमीर होता त्यास बोलवावें म्हणोन हुकुम केला. त्याणीं मिनोरेवर उभें राहून आजान पढला व आपहादचा कलमा आनाइ-ल्लिया व इल्लाह इतका आजानचे कलम्यांत वाढविला. खतीब याणी मिंबरावर उभें राहून श्रेष्ठ साहाबाचे म्हणजे पैगंबराचे संनिध राहणाराचें नांव सोडून बारा इमाम याचे नावानें खुतबा शेवटास नेला. त्या जमातींत सुनी धर्माचे मंडळीपैकीं अमीर लोक बहुतेक होते. महंमद ऐनुलमुल्क सर्व अमीर लोकांहून श्रेष्ठ व लस्कराचा सरदार होता व दिलावरखान बक्षी व महंमद सिस्तानी वगैरे कित्येक सेवक जनमनांत वांकडेपणा येऊन उठोन, पढणें समाप्त झालें नाहीं तोंच, घराकडे निघाले. इतकें होतांच या कारणानें तेच दिवसीं संकट उभे राहिलें तों आदिलशाहा याणीं नम्रतेनें पुढें येऊन हरयेक प्रकारें शांतवन केलें. बोलण्यांतील तात्पर्य जाणोन लकुमुद्दीन बिन वलिद्दीन याणीं भरंवसा दिला. परंतु कित्येक विद्वान लोक व मुख्य व शहरां-तील कारभारी लोक, कीं जे सुनी धर्माचे होते, त्याणीं सुलतान महंमुद यास व

त्याचे सर्व कारभारी लोकांस धर्मरक्षण साह्यार्थी पत्रें लिहून रवाना केलीं. सुलतान महंमुद शस्त्रांसहित सज्ज होऊन अमीर बरीद व अहंमद निजामुलमुल्क व कुतुबशाहा सुध्धां बहुत सेना घेऊन विजापुरास निघाला. आदिलशाहा यास शहरांत राहण्याचें धैर्य निघेना. सबब बाहेर पडून खानदेशाची वाट धरली. इमादुलमुल्क यासी आदिलशाहा याचे अत्यंत सख्य होतें. सबब या भीति प्रसंगांत त्याजपासीं आश्रय इच्छिला. तो वृध्ध पुरुष व पृथ्वी अवलोकन केलेला होता. या कारणामुळें त्याणीं आदिलशाहा यास बोध केला व आचाराचे भिन्नत्वावर व खुतबा बदलण्यावर रागास येऊन पूर्ववत खुतबा कायम ठेवणेंविषयीं शिकविलें. आदिलशाहा याणी इमादुलशाहाचे मसलतीप्रमाणें काम करणारा होऊन आपले दिवाणास गुप्तपणें स्वस्थ आज्ञापत्र लिहून विजापुरास पाठविलें कीं, नवीन खुतबा बंद करून पुरातन खुतबा कायम ठेवावा. असें करून आपण समय टाळावा. यामुळें खानदेशास गेला. इमादुलशाहा याणीं सुलतान महंमुद यास अर्ज्या पाठविल्या व विनंती करणारा होऊन बेदरास जाण्याविषयीं आज्ञा मागितली. तेव्हां अहंमद निजामुलमुल्क याजकडील हरएक व कुतुबशाहाही आपले स्वस्थळास निघोन गेले. कित्येक दिवसानंतर हें संकट विझलें. आदिलशाहा तिकडून फिरून विजापुरास आला. कित्येक दिवस याच चालीनें राहिला. खुतबा खुलफायरापद्दीन याचे नावें पढणें चाललें. जेव्हां दौलत व ऐश्वर्य अधिक प्राप्त झालें व आपले राजधानींतील सुनी लोकांचे मंडळीपैकीं नानाप्रकारचे मनोरंजन व भरंवशाचे योगानें खातरजमा करून आपले हातीं आणिले तेव्हां पुनः पूर्ववत कार्य धारण करुन खुतबा पवित्र इमाम याचे नांवें चालू केला. यानंतर कित्येक दिवसांनीं किल्ले गोवा येथून वर्तमान आलें कीं गफलतीमुळें तेथील मालक फिरंगी याणीं किल्ला घेतला.[८] आदिलशाहा याणीं हें वर्तमान ऐकतांच खासे निशाणाचे दाहा हजार खासे स्वार मोंगल व दक्षणी घेऊन विजापुराहून निघाला. पांचवे दिवसीं प्रातःकालीं तेथें पोंहचला. साधे लोक सहजां येणारा जाणारा प्रमाणें किल्यावर चढला. नंतर कित्येक ओढाओढी व बहुत यत्नानें किल्ला सर केला. किल्ल्यावरील बहुत मनुष्यें ठार मारिलीं. किल्ल्याचा बंदोबस्त करुन विजापुरास आला.

---

८. २० फेब्रुवारी १५१० ला मीर अलीनें गोवाकोट पोर्तुगीजांस दिला; परंतु युसुफ आदिलशाहानें जाऊन नंतर मे महिन्यांत परत घेतला– बि. फे. ३, पृ. २९–३० आणि परिशिष्ट पोर्तुगीज क्रॉनोलॉजिकल एपिटोम, पृ. ५०८–५०९.

### ७. युसुफ आदिलशाहा याणीं मृत्यु पावणें व त्याचे कामाचा शेवट होणें व युसुफाचा आखार म्हणजे खूण बाकीं राहणें :

युसुफ आदिलशाहा याणीं बेवीस वर्षे राज्य केल्यानंतर त्यास संग्रहणीचा उपद्रव होऊन दिवसेंदिवस प्रकृत बिघडत चालली. त्याजला परिणामाचें चिन्ह दिसोन आलें. नंतर आपला पुत्र इस्माईल यास राज्यावर बसऊन त्याचे राजधानीचा कारभार कमाल हुसेन दक्षणी याचे गळयांत घातला. अंतकाळीं बोध केला कीं, माझें प्रेत सय्यद जमान ऊर्फ शाह चंदा हुसेनी, कीं त्याची सेवा मी बहुत केली होती, त्याचे कबरेचे आसपास गोगी येथें दफन करावें.[१] आग्रे येथील ग्रंथकाराचे लिहिण्यांत युसुफ याचे मृत्यूची तारिख सन ९१३ नऊशें तेरा (१५०७–८ इ. स.) व महंमद कासम फिरिस्ता याचे लिहिण्यांत ९१६ नऊशें सोळा (१५१०–११ इ. स.) व रफीउद्दीन षिराजी व मिर इब्राहीम असदखानी यांचे लिहिण्यांत ९२५ नऊशें पंचवीस (१५१९ इ. स.) होती. युसुफ आदिलशाहा याजला इस्माईल या नांवाचा एक पुत्र व तिघी कन्या होत्या. यद्यपि धर्मविरुध्धपणा होता तत्रापि तिघी कन्या सुनी धर्मवाल्यांस दिल्या. मर्यम सुलतान म्हणोन कन्या होती ती बुरहान निजामशाहा यास दिली. खदीचा सुलतान ही कन्या अल्लाउद्दीन इमादुलमुल्क यास दिली. बिबी सती ही कन्या अहंमदशाहा बिन मुलतान महंमुद बाहामनी यास दिली. युसुफ याची आसार म्हणजे खुण विजापूर येथील आर्क किल्ल्यास आहे. पुरातन इदीचा जागाही अली आदिलशाहा याचे कारकीर्दीत किल्ल्याचे आंत आली आहे. आहसनाबाद कलबुर्गा येथें शेख महंमद सिराजनिंदी युसुफ याचे मूळ पुरुषाचे रवने व मिनोरे आहेत. बिजापूर हा गाव पुरातन आहे. दुसरा इब्राहीम आदिलशाहा याचे कारकीर्दीत महंमदपूर असें नांव पडलें. पूर्वी विजापुरास कसबे असें म्हणत होते व मातबर शहर नामांकित असेंही म्हणत होते. श्रेष्ठ श्रेष्ठ विद्वान लोक व अबरुदार याणीं जमा व्हावयाचें स्थान आहे. सर्वे सर्व शेखांचे शेख एनुद्दीन गंजुलइल्म याणीं (हें) आत्वारुल इब्रार या कितार्बांत लिहिलें आहे. त्या इमारतीचा तरजुमा हा आहे कीं, षयखुल कामिलुल मुलामिन वजहेबतुल मकामादुल इल्लिया शेख इब्राहीम संगानी रेहमतुल्ला आलहे हे कित्येक दिवस दौलताबाद येथें फकिराचे संगतींत होते. त्यानंतर हरुल येथें जाऊन व तेथून कसबे विजापूर येथें येऊन राहिले. तेथेंच मृत्यु पावले. त्याची कबर पमाली याचे कबरस्थानांत प्रसिध्ध आहे. हजरत शेख मशारनिल्हे याणींही तवारिखेमध्यें दूरवर विचार करून लिहिलें आहे कीं, इनुद्दीन आबु रज्या याचे अधिपत्य

१. युसुफ आदिलशाहा मे १५१० पर्यंत तरी हयात होता. नंतर थोड्याच दिवसांत वारला असावा– ब्रि. फे. पो. कॉ. ए. ३, पृ. ५०९.

पूर्वीपासून अल्लाउद्दीन खलजी याचेवेळेपासून होतें. नंतर अल्लीशाह याचें अधिपत्य व त्याचे शेवटी सन ७०१ सातशें एक (१३०१–१३०२ इ. स.) सालीं शहरचें अधिपत्य दुसऱ्याचें झालें. साहा वर्षे पर्यंत त्याजकडेच राहिलें नंतर सन ७०६ (१३०६–१३०७ इ. स.) सालीं विजापुरचें अधिपत्य कानडयाकडे झालें. राय रामदेव याचे विनंतीवरून जुमा मसिद लांकडी केली. त्यानंतर कित्येक दिवसानंतर इनुद्दीन याचा अधिकार जाऊन त्याचा मुलगा करीमुद्दीन आबु रज्या हा विजयापूरचा मालक झाला. सन ७१६ सातसेंसोळा (१३१६–१३१७ इ. स.) सालीं जुमा मसीद दगडी केली. शेवटीं अद्यापि आर्क किल्ल्यामध्यें दगडी मसिदीवर संगी तक्तावर पुरातन किल्कमरीमुद्दवला असे नांव लिहिलेलें स्पष्ट आहे.

## ८. युसुफ अदिलशाहा याचे लष्कराची परिभिती व तारिखवार विस्तार :

युसफ याचे कारकीर्दीतील लष्कराची गणती स्वार १२,००० बारा हजार, सिबंदी लोक १४,००० चौदा हजार व हत्ती ३७ सदतीस कित्येक तारिखेपर्यंत येथें होते. किल्ल्याचा तारिखवार झाडा. परांड्याचा किल्ला ख्वाज्या जहान यार्णी सन ८९२ आठशें ब्याण्णव (१४८६–१४८७ इ. स.) साली बांधला. बेळगांवचा किल्ला असदखान यार्णी ८९१ आठशें येक्याण्णव (१४८६ इ. स.) साली बांधला. मिरजेचा किल्लाही असदखान यार्णीच सन ८९३ आठशें त्र्याण्णव (१४८७–१४८८ इ. स.) सालीं बांधिला. सोलापूरचा किल्ला कमालसाहेब याच्या हुकुमानीं खाज्या जहान यार्णी सन ८८८ आठशें अट्ठ्याऐंशीं (१४८३ इ. स.) साली बांधिला. बेदरचा किल्ला अहंमदशाहा बाहामनी याच्या हुकुमानें सन ८०३ (१४००–१४०१ इ. स.) सालीं तयार झाला. अहमदनगरचा किल्ला अहंमद निजामशाहा बहीरी यार्णी सन ८७८ आठशें आठ्ठ्याहत्तर (१४७३–१४७४ इ. स.) सालीं बांधिला. विजापुरचा किल्ला युसुफ आदिलशाहा यार्णी सन ९१९ नऊशें येकुणवीस (१५१३–१५१४ इ. स.)[१०] सालीं बांधिला. किल्ल्यामध्यें मसीद आहे तीहि युसुफ अदिलशाहा यार्णी ९१८ (१५१२–१५१३)[१०] सालीं बांधली. मौजे फत्तेपूरची वसाहत ९१९ नऊशें येकुणवीस (१५१३–१५१४ इ. स.)[१०] सालीं युसुफ यार्णी केली. फरूखमहालही युसुफ यार्णी सन ९२१ नऊशें येकवीस (१५१५–१५१६ इ. स.)[१०] सालीं बांधिला. त्या महालासंनिध ज्या मसिदी प्रसिध्ध आहेत त्या ख्वाज्या जहान यार्णी सन ८९४ आठशें चवऱ्याण्णव (१४८८–१४८९ इ. स.) सालीं बांधिल्या.

---

१०. या तारखांबद्दल शंका वाटते.

बुस्तान दुसरें

# इस्माईल आदिलशाहा

## १. इस्माईल आदिलशाहा बिन युसुफ आदिलशाहा याचें वर्णन :

पूर्वी वर्णिलेंच आहे कीं, युसुफ याणीं आपण जिवंत असतां इस्माईल आपला पुत्र बारा तेरा वर्षांचा होता, लोकांचे बोलण्यांत तेवीस वर्षांचा होता, त्याजला मालक करून राज्याधिकाराचें व पृथ्वीस संरक्षण करण्याचें काम त्यावर मुकरर करून बंदोबस्त ठेवणेचा व वकिलीचा लगाम कमालखान दक्षणी याचे मुकत्यारीचे हातीं देऊन, त्याजला दाराबेजीरखी असेंही म्हणतात, कीं तो पुरातन सेवकजन व जुनाट विश्वासुक सेवक मंडळीपैकीं सेवक व विश्वासुक व अक्कलवान होता त्याजकडे सोपून, पूर्ण दरबारचे कारभारी मंडळास कमालखान याचे आज्ञेंत व त्यासी अनुसरून असावें असा बोध करून, इस्माईल आदिलशाहा याजलाही कमालखान याचे मसलतीनें चालावें अशी ताकिद केली होती. युसुफ आदिलशाहा वारल्यानंतर कमालखान दाराबेजीखी याणीं युसुफ आदिलशाहा याचे प्रेतास स्नान घालून व कफन करून, युसुफ आदिलशाहा याणीं अंतकालीं सांगितल्याप्रमाणें, त्याचें प्रेत गोगी येथें पादशाही डौलानें रवाना केलें. अक्कलवान व हुकुमवाले खुण चालणारांनी सुमुहुर्त व उत्तम समय ठरविला होता त्या समयीं इस्माईल याजला विजापूर येथील राजधानीचे तक्तावर बसऊन पादशाहीचा मुगुट त्याचे मस्तकावर ठेविला व पादशाही छत्र त्याचे मस्तकावर धरलें. कमालखीन याणीं स्वतः सेवकाप्रमाणें जिवादारम्य सेवा करण्याची कंबर बांधून मुलकाचा बंदोबस्त व राजधानीची व्यवस्था केली. पादशाहाचे अमीर लोक, कारभारी व सेवकजन होते त्या हरएकास समाधान करून व भरंवसा देऊन सर्वांस सेवा करण्यांत व मनोगतानुरुप चालण्यांत तत्पर ठेविलें. तर्फेतर्फेचे हरएक सरदारास, जसे अमीर बरीद व निजामशाहा व कुतुबुल्मलिक व इमादशाहा वगैरे असे होते सरदार त्यांजलाही, सख्यत्त्वानें व कामास साह्य करणारे करून शत्रुत्वाचा व वैरभावाचा कांटा मध्यभागांतील काढिला. थोडकेच दिवसांत ते आदिलशाही राजधानीची शोभा व तेज कमालखान याचे कारभाराचे विचारांनीं वृध्दिगततेचे पदवीस पोंहचलें. मुलुक व रयत लोक संपूर्ण आबादानी व मामुरी पावते झाले. कमालखान हा सुनी धर्माचा होता. युसुफ आदिलशाहा याचे कारकीर्दींत ताबेदारीच्या कारणामुळें निरुपाय होऊन स्तब्धता स्वीकारून विचारांत पडला होता. सांप्रत तर सर्वोपरी मुक्त्यार सर्वाधिकार त्याजकडेच झाला. तेव्हां हनफी धर्मास सामर्थ्य देणें यामध्यें

आला, सुनी धर्म चालविला आणि खुतबा खुनफायरायद्दीन याच्या नांवानें पूर्वीच्या कायद्याप्रमाणें ठरविला. गोव्याचें बंदर हमेषा इंग्रज* लोकांच्या योगानें उपद्रवांत होतें. ज्या ज्या समयीं, कीं संधि दिसत होती तेव्हां भोळसरपणा दाखऊन किल्ल्यावर चढून इंग्रज लोक किल्ला सर करित होते. कमालखान याणीं मनांत आणिलें कीं, या लोकांचे प्रतिवर्षांचे उपद्रवापासून विश्रांति हातीं आणावीं, म्हणजे उपद्रव चुकवावा, असें जाणून त्याजला बोध केला. या करारानीं इंग्रज लोक याणीं किल्ला मात्र घेऊन गांवखेड्यापासून हात आंखडून, म्हणजे गांव खेडी न लुटतां मित्रता धारण करून, साह्यार्थी परस्परें एकदिल असावें व गोव्याचें बंदर त्याचें, म्हणजे इंग्रज लोकांचें, खर्चाकडे सोपलें. त्या तारिखेपासून[1] गोव्याचें बंदर इंग्रज यांचे खर्चाकडे राहिलें. मुसलमान लोकांस पुनः त्या गांवावर सत्ता प्राप्त झाली नाहीं.

## २. कमालखान याणीं सफदरखान या पुत्रासहित सूड घेण्याचे कारणानें मृत्यू पावणें :

विचारवानाचे चित्तावर प्रसिद्ध आहे व प्रगट आहे कीं, संकटोद्भव पृथ्वीमध्यें एकाच स्थितीवर व एका प्रकारावर शाश्वती व स्थिरता सर्वोपरि नाहीं. वांकडे चालीचे कालचक्राचा फेरा हरएक कार्यामध्यें नित्य नवीन संकट उभें करितो. पृथ्वीच्या चौकामध्यें फिरणारांस वाईटपणाच्या योगानें नाना प्रकारचीं संकटें उभीं राहतात, कीं जीं संकटें धर्म व ऐश्वर्य यांचा नाश करितात. त्या योगानें या लोकीं अपकीर्ति व परलोकीं वाईटपणा प्राप्त होतो. या बोलण्यांतील सारांश हा आहे कीं, जेव्हां कमालखान याजला सर्वोपरि प्रबलता व मुखत्यारी प्राप्त झाली तेव्हां आपले आप्तविषयी व स्वज्ञातीय पुरुषांसच सामर्थ्य देणें चालविलें व प्रतिपाळ करूं लागला. दुसऱ्याच्या जहागिरी व उत्पन्नें हरण करून आप्तविषयी यांजला देत होता. श्रेष्ठ पुरुषांचे अधिकार हरएक बहाण्यानें पूर्वापार दौलतीकडून चालत होते ते हरण करून आपले मंडळीस देत होता. तेव्हां अन्य जनांची भिति होती ती कांहींएक राहिली नाहीं. नंतर हळुहळु दुर्भाव, कीं जो निमकहलालीपणास योग्य आहे तो भाव, त्याचे अंतःकरणांत आला, म्हणजे कमालखान याणीं इच्छिलें कीं इस्माईल आदिलशाहा याजला, कीं जो मुलुकाचा वारिसदार आहे त्यास, कैद करुन किंवा त्याचे डोळे काढून आपण पादशाहा व्हावें. यदर्थी

---

* 'इंग्रज' या ऐवजीं 'पोर्तुगीज' असें पाहिजे होतें.

१. गोवा पोर्तुगीजांकडे २२ नवंबर १५१० ला दिलें. – ब्रि. फे. पो. ए. ३, पृ. ५०९.

अमीर बरीद याजला, कीं तोही याच उद्योगांतील होता त्याजला, सल्लाह विचारून परवानगी मागितली. बरीद याणीं या त्याचे दुष्ट संकल्पास योग्य जाणून बळ दिलें. एकमेकांत करार ठरला कीं, आपण आपले आपले मुलुकाचे धणी व मुलुकाचे वारिसदार यांचा उच्छेद करून परस्पर साह्य करून किल्ले घेणें व मुलुक वाढविणेचा विचार करित जावा. याप्रमाणें याच प्रकारें व प्रतिज्ञेवरून कमालखान याणीं इस्माईलशाहा यांजला महालांतील बायकांसुध्धां मोठे कैदेंत ठेविला. पूर्ण भरंवशाचे त्यावर कामदार सोंपून फौजेचा व विजापूरचे मुलुकाचा बंदोबस्त केला. प्रथम सोलापूरचे किल्ल्यावर हल्ला करून, बहुत यत्न व ओढाओढी करून, तीन महिन्यांत किल्ला सर केला. याचप्रकारें अमीर बरीद याणीं आपले मुलुकाचे वारिसदार आपले यजमानास बंदीशाळेंत कैद करून, बेदराहून निघोन कलबुर्गी वगैरेकडे युद्ध करून, कित्येक स्थानें हस्तगत करून येता जाहला. जेव्हां कमालखान याजला सोलापूरचे कामापासून फुरसत झाली तेव्हां आपले राजधानीस येतां जाहला. तेव्हां त्या गुप्त मनोरथांनीं बळ बांधिलें[२] आणि मनांत आणिलें कीं, त्या मनोरथांस सामर्थ्यांनीं सिध्धीस न्यावें, म्हणजे सिंव्हासनारूढ व्हावें. असा विचार करून शास्त्रज्ञ ज्योतिषी याजला आज्ञा केली कीं, सिंव्हासनारूढ होण्यास सुमुहुर्त ठरवावा, कीं त्यावेळेस सिंव्हासनारूढ होणें कल्याण व उत्तमपणाचें फल देणारें व्हावें. हरएक प्रकारें हें काम कोणाचेच चित्तास पसंत नव्हतें. ज्योतिषी याणीं निरूपाय होऊन गणित करून बोलला कीं, ज्योतिष्याचे गणितावरून हे पंधरा दिवस फार वाईट संकटाचे दिसतात. याजकरितां या दिवसांत आत्मसंरक्षण बहुत सावधपणानें ठेऊन सोळावे दिवसी[२] जे काम कराल तें कल्याणप्रद होईल. कमालखान याणीं या ज्योतिष्याचे बोलण्यावरून पंधरा दिवस वाईट आहेत ते टाळणें सहज आहेत असें समजून आत्मरक्षणाचा विचार केला. एक स्थान मजबूत व एक जागा अत्यंत बंदीची, कीं एका मनुष्याचेही भयाचा संशय तेथें न यावा असें स्थान, ठरऊन त्या स्थानांत बसला. महाली व मुलुकाची कामें पहिल सफदरखान या पुत्रावर व दुसरें कामदारावर सोंपले. जेव्हां त्याचे या दुष्ट संकल्पाचें वर्तमान सर्वांस कळलें होतें व घरांतील खाशा स्त्रियांही हें वर्तमान ऐकून चिंतेच्या डोहन्यांत पडल्या होत्या व अत्यंत निरूपायपणामध्यें ईश्वराचे कृपेच्या इच्छक होऊन कामाचा उपाय हा इच्छित होत्या कीं जेव्हां पंधरा दिवसांचे मुदतीपैकीं दोन दिवस बाकी राहिले तेव्हां बुननी खानून (बुबूजी खानून– फे.

२. सफर ९१७ हि. म्हणजे २९ एप्रिल १५११ ला जमात जमवून राज्याधीश होण्याचा बेत केला व तो १ रबिलावल म्हणजे २९ मे १५११ ला राज्यावर बसणार होता. –ब्रि. फे. ३, पृ. ३७.

पुंजी खातून– घो. ब. ) या नामेंकरुन इस्माईल याची मातुश्री, व दिलषाद आगा, म्हणोन त्याची चुलती, या उभयतांही अकलवान स्त्रियांपैकी होत्या त्यार्णी बेमानाचे, म्हणजे कमालखान याचे नाशार्थी विचार करून एक सेवक, कीं जो पुरातन पालन केलेला होता व जो सेवक इस्माईल याचा काका होता असे म्हणतात, त्याजला आपले सन्निध बोलावून, पूर्वींच्या प्राप्तीच्या हक्कानें स्मरण देऊन, बोलत्या जाहल्या कीं अत्यंत काळीं हरएक मनुष्यास मृत्यूचा पराब प्राशन करणेंच आहे. कसेंही केलें तत्रापि या मृत्युलोकापासून गमन करणें भाग आहे. आतां आपलें इमान सांभाळून प्राण खर्च करणें हें शाश्वत ऐश्वर्य मिळविणें आहे. कारण कीं या लोकीं सत्कीर्ति व परलोकीं कल्याण प्राप्ति आहे. जर करितां सेवकपणा सिध्धीस नेसील तर व मस्तकाची व जिवाची आशा सोडून त्या निमकहरामाचा, म्हणजे कमालखान याचा, फडशा करिशील तर सर्व सेवेचे व प्राण खर्च करण्याचे अधिकार सिध्धीस नेलेस असें होईल. जर करितां जिवंत राहिलास तर आमचे दौलतींतील मुख्य कारभारी लोकांपैकीं तूं एक कारभारीच होशील. जर करितां कार्यभाव प्रकारांतर जाहल्यास, म्हणजे स्वामीकार्यार्थी मेला गेलास, तर आनंदात राहा. संपूर्ण पृथ्वींत सत्कीर्तीनें व इमानीपणानें स्तवास योग्य होशीलव परलोकीं शाश्वतपणास पावशील. काका यार्णी हे बोलणें ऐकल्यानंतर हिंमतीची कंबर प्राण खर्च करण्यामध्यें बळकट बांधून बोलला कीं, एक माझा जीवसा काय इस्माईलशाहा याजवरून शंभर जिवानिसीं मी ओवाळून जाईन. प्रतिज्ञा अशी आहे कीं, जर करितां मनोरथ पूर्ण झाल्यास सर्व उत्तम आहे. राणी बोलली कीं, त्यार्णी एके स्थानीं आश्रय केला आहे, कीं तेथें रावत्यांतील व संनिधचे पुरुषास देखिल प्रवेश नाहीं. परंतु मी हरएक बहाण्यानीं व हरएक निमित्तानीं तुजला एकांत स्थळापर्यंत पोंहचवितें. तेथें जिवावरील काम करणें तुजकडे आहे. इतकें बोलोन इस्माईल याचे मातुश्रीनें दाईला, कीं जी महालाकडील वर्तमान पोंहचविण्याकरितां कमालखान यार्णी नेमलेली होती तिजला, फार काकुलती येऊन हजारो बहाण्यानीं व मत्रतंत्रांनीं वश केली. तेव्हां त्या दाईनें काकास कमालखान याचे एकांत स्थळाचे दारानें नेऊन पोंहचाविलें व कळविलें कीं, काका मक्केस जाण्याचा संकल्प करून प्रवासास निघण्याकरितां उभा राहिला आहे. इस्माईल याचे मातुश्रीचें मानस असें आहे कीं, त्याजला आपण मनापासून निरोप द्यावा वं आपले हातानीं निरोपाचे विडे द्यावे, म्हणजे त्याचे मक्केस जाणें सुफळ होईल. असें ऐकून त्या भोळ्यानीं व मृत्यूनमुख झालेल्यानें मान्य करून काकास एकांत स्थळांत येऊं दिलें. जेव्हां निरोपाचे विडे द्यावयाकरितां संनिध बोलाविलें तेव्हां तो प्राण अर्पण करणारा, म्हणजे काका, जेव्हां अति संन्निध गेला तेव्हां विडे घ्यावयाचे समयीं आपणापाशीं जें शस्त्र गुप्त ठेविलें होतें तें अति त्वरेनें कमालखान याचें छातीवर व पोटावर असें मारिलें कीं त्याचीं

आंतडी बाहेर निघोन पडली व कमालखान याणें आपला जीव काळाचे हातीं सोंपविला. ³ असा प्रसंग प्राप्त होतांच कमालखान याची स्त्री जी बहुत अक्कलवान होती ती स्वतः पडद्यांतून बाहेरे पडून आपल्यास ईश्वराचे हातीं सोंपून, म्हणजे ईश्वरावर भरंवसा ठेऊन, पती वारल्याविषयीं कांहीच शोक केला नाहीं. दुसऱ्यासही ओरडूं न देतां बोलली कीं, प्राण अर्पण करणारे सेवक लोकांनीं व हुजूरचे लोकांनीं घोंडे व सोटे व तरवारी व पेषकबाज्यानिसीं तयार व्हावें. कमालखान याचा पुत्र सफदरखान याजला बोलाविलें. जेव्हां सफदरखान आंत येऊन या वर्तमानावर माहितगार झाला, म्हणजे हें वर्तमान त्याजला कळलें, तेव्हां त्याचे मनांत आलें कीं, मोठ्यानें ओरडावें. तों त्याचे मातुश्रीनें त्याचे हात व तोंड धरून न ओरडतां बोलावयास लाविलें व बोलिली कीं, आतां धैर्य धर. हातांतून काम गेलें नाहीं तों हस्तगत करून घे. इस्माईलशाहा व त्याचे मातुश्रीपासून पितृवधाचा सूड उगीव. या कामांत किंचितही आळस करशील तर मी प्राण देईन. सफदरखान याणीं या विध्नांत धैर्य व सामर्थ्य न धरितां असमर्थ झाला. हें माझे हातून होत नाहीं असें बहुत प्रकारें बोलला. मातुश्रीनें शेंकडो तऱ्हेनें त्याजला उत्तेजन देऊन सिध्ध केला. आदिलशाहा यासी युध्धास कायम केला. तेव्हां सफदरखान महालांतून बाहेर येऊन कमालखान याचा म्हणोन निरोप सर्वांस सांगितला कीं, अति त्वरेनें पादशाहाचे महालावर हल्ला करून इस्माईल यास मातुश्रीमुध्धां युध्धास व सेना व युध्धास साहित्य सिध्ध करूं लागला बुननी खातून, ईस्माईल याची मातुश्री, कीं जिणें काकास दाईसमागमें देऊन सदरहु कामास पाठविला व मार्गप्रतिक्षा करित होती. जेव्हां उसीर लागला व त्याचे वर्तमान कांहींच कळलें नाहीं त्यावरून जाणिलें कीं, न जाणों मनोगतानुरूप कार्यसिध्धी झाली नसेल. काकाचें हातून काम झालें नसेल. काका घात पावला असेल. आतां मोठे विघ्न खास आम्हां निराश्रितांवर प्राप्त होईल. या सावधपणाचे मार्गानें दुरवर विचार करून इस्माईल आदिलशाहा याजला धीर देऊन युध्ध करण्यास सिध्ध होण्यावर मान्य केला. पादशाहाचे मोंगलास व आणि सेवकांस दक्षणी व हपसी वगैरे लोक, कीं पादशाहाचे महालाचे बंदोबस्तास नेमिले होते त्याजला, निरोप पाठविला कीं, जर करिता इमान सांभाळून शाश्वत यशस्वीपणा हस्तगत करणें आहे व इस्माईल आदिलशाहा याचे बरोबर आपलें कल्याण करून घ्यावयाचे असल्यास आजचे दिवशीं, कीं स्वामी सेवेस प्राण खर्च करण्याचा दिवस आज आहे, सेवकपणा सिध्धीस न्यावा. पादशाहाची कीर्ति संरक्षण करणें सर्व योग्य कामांतील काम आहे. तें करून दाखवावें. कित्येक मोंगल व दक्षणी वगैरे लोक जे इमानी व निमकहलाल होते व सेवकपणामध्यें व प्राण खर्च करण्यामध्यें मजबुद पाऊल ठेविले होते ते लोक तात्काळ सिध्ध

---

३. २६ मे १५११–टीप क्र. १२ प्रमाणें कमालखानाचा मृत्यु २७ मे १५११ चा असावा.

व तयार होऊन पादशाहाचे महालावर येऊन मजबूत प्रबळ स्थानास मोठे किल्ल्यासारखी मजबुदी करून युध्धास सिध्ध झाले. ते लोक, कीं ज्यास कमालखान याचें भय चितामध्यें दारूण होतें ते, सफदरखान याजपासी येऊन पोंह्चले. सफदरखान मंडळी जमल्यानंतर व सिध्ध जाहल्यावर पादशाहाचे महालावर चालू झाला. प्रथम पहिले दरवाज्यावर, कीं जो दरवाजा बंद केलेला होता त्या दरवाज्यावर, येऊन पोंह्चला. दरवाजा मोडण्याचा हुकूम दिल्हा. जेव्हां दरवाजा मोडला तेव्हां सफदरखान याचे सर्व लोक आंत सिरले. नंतर दुसरा दरवाजाही मजबूत बंद केलेला होता. तोही मोडण्याविषयीं हुकूम दिला. इतक्यामध्यें पादशाहाचे महालावरून तीरांचा व बंदुकीचे गोळ्यांचा वर्षाव होऊं लागला. बुननी खानून, म्हणजे इस्माइल याची मातुश्री, व दिलषाह आगा, म्हणजे ईस्माईल याची चुलतीनेंही पुरुषाचा पोषाख करून ढाल तलवार घेऊन निर्वोन प्राण खर्च करणारे सेवक मनुष्यांस युध्धांत अचळ व कायम राहण्याविषयीं ताकिद करित होत्या. भरंवसा देत होत्या. इस्माईल आदिलशाहाही त्याच कामावर म्हणजे युध्धार्थी सिध्ध होता. इतक्यामध्यें एकाएकी एक तीर, कीं जो महालावरील मनुष्याच्या हातून सुटला होता तो सफदरखान याचे कपाळावर येऊन लागला. यद्यपि फार लागूं झाला नव्हता तत्रापि सफदरखान अशक्तपणाचे कारणास्तव झीट येऊन भिंतीच्या छायेस येऊन टेकला. तें महालावरील मनुष्यानें जाणिलें कीं, सफदरखान भिंतीस टेकला आहे. असें जाणून एक धोंडा भारी वजनदार त्याचे मस्तकावर ढकलून दिला. या प्रकारें, कीं त्याचें मस्तक व शरिराचा चुराडा झाला. जेव्हां सफदरखान याचे मंडळीनें आपले सरदाराची ही दशा अवलोकन केली तेव्हां ते भूमीस पाय लागे न लागे अशा त्वरेनें पळते झाले. इस्माईल पादशाहा याजकडील इमानी लोक प्राण अर्पण करणारे महालावरून खालीं उतरून पळालेले लोकांचा पाठलाग केला. धराधरींत व मारामारींत निमग्न झाले. जेव्हां कमालखान याचे महालावर जाऊन पोंह्चले तेव्हां कमालखानही ठार झाला आहे असें समजलें. कमालखान याजकडील सर्व मनुष्यें निखालस बेशुद्ध होऊन अति त्वरेनें परागंदा झाले. इस्माईल आदिलशाहा ईश्वराचे कृपेकरून सदैव व प्रारब्धाची गती अनुकूल समजून संतोष व आनंदयुक्त होऊन निर्भयपणें सिंव्हासनारुढ झाला.[४] सर्वत्र सत्के व नजरा करुं लागले. सेवक जन, कीं त्यादिवसीं प्राण अर्पण करण्यास व सेवकपणा सिध्धीस नेण्यास सिध्ध झाले होते ते, नाना प्रकारचें इनाम व बक्षिस पावोन उत्तम पदाधिकारास पावले. खुसरव आका लारी, कीं तोही दौलतीचे वृध्धीकरितां पादशाहीचे मंडळांत दाखल झाला होता तोही त्या दिवशीं यत्न करणारा व प्राणार्पणास उदित जाह्ला

४. मे १५११ अखेर ?–ब्रि. फे. ३, पृ. ३७.

होता. त्याजला असदखान हा किताब मिळोन श्रेष्ठत्त्वास चढून बहुत इनाम व मोठ्या जहागिरीनें दैववान झाला. दक्षणी लोकांची जमात व हफसी लोक संपूर्ण चाकरीवरून बरतर्फ झाले. बहुधा कित्येक मोंगलजादे लोकही दक्षणी लोकांसही आप्तविषयीपणाचा संबंध ठेवित होते तेही बरतर्फ झाले. यानंतर इस्माईल आदिलशाहा याचा संपूर्ण विचार मोंगल लोक जमविण्यावरच होता. कित्येक दिवसांत मोंगल शिपाई संपूर्ण तिरंदाज भालेकरी कित्येक जमा झाले, कीं ज्या लोकांचे पाठबळानें आदिलशाहा याजला बळ व ऐश्वर्य वृध्धी अत्यंत प्राप्त झाली. कित्येक दिवसानंतर शिफारशीनें मोंगलज्यादे लोक जे गरीब होते त्यांस चाकरीवर घेतले. परंतु हपसी लोक व दक्षणी लोकांस कदापि चाकरीवर घेतले नाहींत. इस्माईल होता तोंपर्यंत ही स्थिति होती. इस्माईल आदिलशाहा यांणीं मजबूद व राजधानीचे कायदे प्रबळ जाहल्यावर पुनः खुतबा बदलून पिआ धर्माचा मार्ग चालविण्याचे चालीवर आला. बापाहून अधिक षिआचा धर्म चालविण्याविषयीं यत्न करूं लागला. संपूर्ण शिपाई लोकांस आज्ञा केली कीं, बारा ताज म्हणजे टोप्या तुर्की लाल रंगाच्या एकावर एक अशा बारा टोप्यांची एक टोपी करुन मस्तकावर धारण कराव्या. जो कोणी या तऱ्हेचा ताज न घालील त्याजला सलाम करूं देऊं नये. बहुधा कोणी ताज न घालतां शहरांत येऊं नये. जर करितां कोणी चुकून एखादे वेळेस बिनताज्याचा मनुष्य दृष्टोत्पत्तीस आल्यास त्याचें पारिपत्य पादशाहा करित होता. हाच आचार इस्माईल आदिलशाहा याचे शेवटापर्यंत चालू होता

**३. अमीर बरीद याणीं अहमदनगर व गोळकुंडा येथील अधिकारी यांचे साह्यानें फौज घेऊन येणें, इस्माईल आदिलशाहा याजवर हल्ला करणें, अमीर बरीद याणी पराजय पावणें व बिबी सती इचें सुलतान महंमुद बाहामनी याचे पुत्रासी लग्न लावणें :**

जेव्हां आदिलशाहा यास राजधानीचा बंदोबस्त करण्यापासून फुरसत झाली तेव्हां जो मुलुक दंग्याचे वेळेस दुसऱ्याचे हातीं गेला होता तो मुलुक हस्तगत करण्याचा संकल्प आदिलशाहा यांणीं दृढनर केला. प्रथम अमीर बरीद याचे तालुक्यांत फौज सुध्धां जाऊन कित्येक मुलुक त्याचे हातीं गेला होता तो सोडवून आपले हातीं आणिला. अमीर बरीद यांणीं या कारणानें सर्पवत क्रोधायमान होऊन मसलत केली. आपलें व सुलतान महंमूद याचे नांवानें दक्षणचे अधिकारी यांस पत्रें पाठऊन कुमक आणविली. या प्रकारणीं बहुत आग्रहरूप लिहिलें तेव्हां बुरहान निजामशाहा व सुलतान कुली कुतुबशाहा व अल्लाउद्दीन इमादुलमुल्क याणी सेना सिध्ध बेदरास

येऊन पोंहचले. अमीर बरीद यांणीं सुलतान महंमुद याजला उत्तेजन देऊन आपले जमातीसुध्धां व दक्षणचे सरदारांकडील फौजेसुध्धां आदिलशाहावर चालू झाले. सेनेंतील मंडळी गांव वगैरे लुटित लुटित विजापुरासंनिध येऊन पोंहचली. जेव्हां कोणीच आडथळा करणार दिसेनासे झाले तेव्हां विजापुरापासून तीन कोसांचे सुमारें अंतरावर डेरे व तंबू ठोकिले. आदिलशाहा यांणी सुलतान महंमुद यापासून बचावाकरितां त्यामध्यें किंवा दुसऱ्या हिकमती करितां कोणाचें साह्य न इच्छिण्याचा नेम केला होता, कीं हालचाल त्याचे विचारानें करावी अशी कदापि त्याची आशा धरलीं नाहीं. ही गोष्ट आदिलशाहा याचे कपटाची व त्रासाची बेदरचे फौजेंत सर्वांस प्रसिद्ध झाली. येथपर्यंत कीं, स्वस्त: खातरजमेनी निर्भयपणें युध्धाचा संकल्प केला. एकाएकी इस्माईल आदिलशाहा याणीं संपूर्ण मोंगल लोक टोपीवाले होते त्या बारा हजार स्वारांनिसी हल्ला करून अमीर बरीद याचे फौजेवर जाऊन पडला. बहुत जमात अति त्वरेनें ठार मारिली.[५] या प्रकारें कीं, अमीर बरीद याची शिकस्त होऊन बेदरास पळाला. सुलतान महंमुद त्या फौजेच्या गर्दीत धक्यानें घोड्यावरून पडला. जखमा लागोन सुलतान अहंमदशाहा या नांवाचे आपले पुत्रासहित आदिलशाहाचे कैदेंत पडला. कुमकेस फौज आली होती तिनीं युध्ध न करितां आदिलशाहाचे धाकानें आपले इलाख्यांत निघोन गेली. आदिलशाहा याणीं सुलतान अहंमदशाहा याजला अति गौरवानें व दयपणानें पुढें येऊन कित्येक दिवस सुलतान अहंमदशाहा याजला ठेऊन घेऊन अंतःकरणांतील व शरीरावरील जखमा नीट करण्याविषयीं उपाय केला. साह्यार्थी व संरक्षण करण्याकरितां नानाप्रकारें ताजिमतवाजु व हरयेक प्रकारचें जडजवाहीर व द्रव्य व सुगंधी पदार्थानें अत्यंत चित्त समाधान ठेविलें. सुलतान अहंमद याजला सर्वोपरी आरोग्यता प्राप्त झाल्यावर आदिलशाहाची बहीण बिबी सती, कीं जी पूर्वी अहंमदशाहास नेमस्त केली होती, तिचे लग्नाविषयीं सिध्ध करण्याकरितां सुलतान महंमूद याणीं निरोप पाठविला. तो निरोप आदिलशाहा याणीं तात्काळ मान्य करून लग्नाचे साहित्याचे सिध्धतेत लागून कित्येक दिवसांत सर्व साहित्य सिध्ध करून राजधानीचे डबींतील एक मोत्याचे दाण्यास त्या राजधानीचे उंच स्थळाच्या नक्षत्राच्या लडींत स्वधर्माच्या चालीने ओविले, म्हणजे बिबी सती ही आपली बहीण अहंमदशाहा याजला देऊन लग्न पादशाहीचे योग्यतेनें समारंभ पादशाही रितीनें शेवटास नेला. दोन महिन्यामध्यें लग्न समारंभ[६] समाप्त झाला. या मोठे कामांनून मोकळिक झाली. नंतर सुलतान महंमूद याजला नजरनजराणा व कित्येक जडजवाहीर व कित्येक

५. हा प्रसंग ९२० हि. (१५१४ इ. स.) तील आहे.—ब्रि. फे. ३, पृ. ४६; मुं. घो. घ. ब., पृ. १६४.

६. मरियम सुल्तानचें लग्न रजब ९३० हि. (मे १५२४) महिन्यांत झालें—ब्रि. फे. ३, पृ. ५१–५२; मु घो. घ. ब., पृ. १७०–७१.

नानाप्रकारचे उत्तम उत्तम पदार्थ प्रविष्ट करून पांच हजार मोंगल स्वारांनिसीं जाण्यास निरोप देऊन बेदरास चालते केले.

## ४. असदखान याचे आदिलशाहा व बुऱ्हान निजामशाहा याशीं सख्य होणें, निजामशाहा यासीं मरियम सुलतान ईचें लग्न होणें व उभयतां पादशाहामध्यें थोडकेच दिवसांत विरुध्ध येणें

कित्येक दिवसानंतर असदखान याजकडून सेवेची चाल किफायत होणें, म्हणजे राजधानीचा नफा करण्याचा मार्ग, दिवसेंदिवस उत्तम प्रकारें प्रसिध्ध होत होता. मोठीं मोठीं कामें त्याचे तेजस्वीमय अकलेचे योगानें होत होतीं. आदिलशाहा यांणीं सिपहसालारीचा पदाधिकार, कीं कोणतेंच पद दक्षण देशांत त्या पदाहून अति श्रेष्ठ नाहीं तो अधिकार, असदखान याजला देऊन त्याची योग्यता बहुत वाढविली. मनांत आणिलें कीं, त्याचे कल्याणप्रद अकलेचे व मसलतीचे योगानेंच बुऱ्हान निजामशाहा याशीं सख्य करून व त्याशींच शरीरसंबंध करून मित्रता जोडून एकमेकाच्या साह्यानें विजयानगर येथील राय तिमराज याजवर, कीं ज्याणीं गर्वाचें मस्तक आकाशास लाविलें होतें व गर्व व अभिमानाचे देग, म्हणजे भाताचे तपेल्यास ऊत आणिला होता म्हणजे अति अभिमान व गर्व झाला होता, त्या तिमराजास शिक्षा करावी व युध्धापासून यश मिळवावें. चिंतेची फलश्रुती, कीं जी चिंता सर्व मुसलमान लोकांस व श्रेष्ठ पादशाहास तर मुख्यच लाविली आहे कीं जे पुरुष धर्माचें व मुसलमानांचें आश्रयस्थानच व योग्य आहेत अशा पुरुषांस दुःख देत आहे, त्याचें फल तिमराज याजला दर्शवावें. नंतर असदखान याचे विचार सय्यद अहंमद हिरवी याजला, कीं जो अक्कलवान व समजदार त्या काळांतील होता त्याजला, मित्रता वृध्धिकारक व सख्यता सिध्धिकारक पत्रें लिहून देऊन नानाप्रकारचे योग्य पदार्थ व उत्तम उत्तम पदार्थांसहित अहमदनगरास पाठविला. सय्यद अहंमद यांणीं अहमदनगरास पोंहचल्यानंतर शाह ताहेर याचे वसिल्यानें बुऱ्हान निजामशाहा याची भेटी घेण्यास सिध्ध झाला. नानाप्रकारचीं मिष्ट भाषणें व योग्य शब्दानें आपला तात्पर्यार्थ बोलण्यांत दर्शविला तो मान्य झाला. निजामशाहा यांणीं शाबासकी दिली. मसलत अशी ठरली कीं, उभयतांही पादशाहा यांणीं आपले शहरांतून निघोन सोलापूरचे किल्ल्यांत, कीं जो किल्ला उभयतांचे प्रीतीचें स्थान होतें तेथें, उभयतांही भटी घेऊन रूबरू व मनांतील मजकूर प्रतिज्ञापूर्वक ठरवावा. आदिलशाहा याची बहीण मरियम सुलतान इजला बुऱ्हान निजामशाहा यास ग्यावयाची नेमस्त करून पादशाही डौलानें व राजसमारंभानें लग्न व्हावें. असें ठरविलें नंतर याच कराराप्रमाणें आदिलशाहा पादशाही डौलानें व राज-

चिन्हानें आपले राजधानीचे जाग्याहून विजापूर येथून निघोन सोलापुरास येऊन पोंहचला. कुरान शरीफमध्यें लिहिले मुहूर्तांप्रमाणें उत्तम समयीं उभयता पादशाहा एकमेकांस भेटून परस्परें हर्ष पावते झाले. उभयतांमध्यें परस्परें मेजवानीचे समारंभ चालू झाले. उभयतांमध्यें मित्रता व सख्य प्रबळ झालें. उभयतांकडूनही थोडकेच दिवसांत लग्नसाहित्याची सिध्धता व विवाहाचे सामानाची तयारी होऊन लग्नसमारंभास आरंभ केला. एक महिना पादशाही डौलानें लग्नसमारंभात गुजरून पादशाहीचे डर्बीतील भारी किंमतींचे त्या मुक्ताफळास पादशाहीचें ऊंच स्थानावरील सुर्यास मान्यतेंचे मार्गांनीं ओविलें, म्हणजे मरियम सुलतान ही वधु निजामशाहा याजला देऊन विवाह जाहला.[६] मरियम सुलतान इचे काबिन, म्हणजे मुसलमानलोकांत मुलीचे मातुश्रीनें मुलीस दूध पाजून पालन केलेले किंमतीबद्दल ठराव होत असतो त्यास काबिन म्हणतात, त्या टरावाचे वेळेस जडजवाहीर व सोलापूरचा किल्ला पांच पेठ्यासहित द्यावयाचें ठरलें होतें. लग्न समारंभातून मोकळिक झाल्यानंतर सहस्त्रावधि प्रकारचे संतोषानें उभयतां शाहाही सोलापूर येथून निघोन आपआपले राजधानीस येऊन पोंहचले. कित्येक दिवसानंतर आदिलशाहा सोलापूरचा किल्ला देण्याचे कराराचे वायदे सरल्यावर किल्ला मागूं लागला. या योगानें पुन: उभयतांचे मित्रतेंत अंतर आलें. मुरवतीचा पडदा उभयतांतून निघाला. तेव्हां दुसरे वर्षी बुरहान निजामशाहा याणीं ईमादुल्मुल्क याचे साह्यानें सोलापुरचा किल्ला घ्यावयाचा नाहीं यदर्थी सेना जमविली. तेव्हां आदिलशाहा याणीं हें वर्तमान येऊन पोंहचतांच बारा हजार स्वार घेऊन उभयतां पादशाहांचे, म्हणजे निजामशाहा व इमादुल्मुल्क यांची, च्याळीस हजार फौज होती त्या भारी जमातीवर ईश्वराबर भरंवसा ठेऊन चालू झाला. भेट झाल्यानंतर दारूण युध्ध झालें. आदिलशाहा याजकडील शूर मंडळीनें रणभूमींत शूरत्व गाजविलें. अहमदनगरवाल्याचे लष्करानें बहुत ओढाओढी व यत्न केला. परंतु यशाचा वायू आदिलशाहाचे ध्वजाकडेच वाहता झाला. वऱ्हाड देशचे लष्करानें म्हणजे इमादुल्मुल्क याचे फौजेनें युध्धापासून मोहर माघारा फिरऊन पळून जाते झाले. निजामशाहा याणीं कितीही धैर्य धरिलें तत्रापि असदखान याचे सिंहवत पराक्रमापुढें धैर्य ठरेना. तेव्हां रणभूमीचा परित्याग करून विन्मुख झाला, म्हणजे पाठ दाखऊन पळता झाला. तेव्हां असदखान याणीं परांड्यापर्यंत त्याचा पाठलाग सोडिला नाहीं. या युध्धांत हत्ती व दुसरें सामान सरंजाम आदिलशाहाचे हातीं लागले. त्यावरून यशस्वीपणानें व विजयानें संतोषप्रद होऊन आदिलशाहा याची स्वारी परत येती झाली.[७] संपूर्ण लुटीपैकीं दहा अकरा हत्ती सिपहसालार असदखान याजला बक्षिस दिले. तसेच दरबारचे संपूर्ण कारभारी व अमीर लोक यांजला योग्यतेनुरूप हरएकास बक्षिस व इनाम

७. ही लढाई ९३१ हि. (१५२४–५ इ. स.) त झाली.– मुं. भो. प. व., पृ. १७१.

देऊन संतोषयुक्त केलें. पुनः दुसरे सालीं बुरहान निजामशाहा यांणीं अत्यंत वांकडे वाटून युध्धांत सिकस्त झाल्यामुळें अमीर बरीद यासहित आदिलशाहा याजवर चालून आला. तेव्हां आदिलशाहाही आपले यशस्वी लष्करासहित निघोन पुढें चालून आला. जेव्हां उभयतांकडील सेनेंचा सामना झाला तेव्हां युध्धाचा व संग्रामाचा अग्नि उभय सेनेमध्यें भडकला. मोठे दारूण युध्द केलें. उभयतांकडील योध्ये यांणीं अति शूरत्वानीं हल्ला करून शूरत्व दाखविलें. पुनःही आदिलशाहा याजकडील सिंहवत पराक्रमकारक पुरुषांचे पराक्रमानें निजामशाहा याची मोठी सिकस्त झाली. तसेंच ख्वाज्या जहान दक्षणी हा वीस हत्तीनिसीं व दुसरे बहुत सामानासुध्धां असदखान याचे कैदेंत पडला. आदिलशाहा यासमयींही विजयवंत, म्हणजे फतेहमंद, होऊन आपले राजधानीचे स्थळास, म्हणजे विजापुरास, येता झाला.[८] ईश्वराचा स्तव व स्तुति करून बहुतेकांस बक्षिस व इनाम दिलें. सिपेहसालार असदखान याजला संपूर्ण हत्ती लुटींत सांपडलेले बक्षिस दिले. परंतु एक हत्ती, कीं ज्याचें नांव अल्लाह बक्ष होतें व तो हत्ती निजामशाहा याचे तक्ताकडेच नेमणुकीस होता तो हत्ती मात्र आपले खासे स्वारीकरितां ठेविला.

## ५. असदखान याचे यत्नानें आदिलशाहाचें व इमादुल्मुल्क या उभयतांमध्यें सख्य होणें व इमादुल्मुल्क याजशीं खदीजा सुलतान इचें लग्न होणें :

त्यानंतर असदखान, कीं जो बहुत अक्कलवान व हुशार व संपूर्ण कारभारी लोकांमध्यें सरदार व त्या काळांतील शूरत्वामध्यें शूर प्रसिध्ध होता त्याचे विचारास आलें कीं, आदिलशाहा व वऱ्हाडचा अल्लाउद्दीन इमादुल्मुल्क यामध्यें निरंतर वांकडे-पणाचे समय निजामशाहा पाहात होता. उभयतांचे युध्धामुळें विजापूर तालुक्याची फार खराबी व पायमाली होत होती. याजकरितां मित्रता व सख्यत्वाची वागणूक प्रबल व्हावी. नंतर या प्रकर्णीं चांगली योग्य युक्ती काढून कांहीं चमत्कारिक कार-णांनीं उभयतां पादशाहांचे भेटीचा योग केला आणि वैरत्वाचा व परकेपणाचा कंटक उभयतांमधून उपटून काढिला. मित्रतेचा परिपाठ असा प्रबळ केला कीं, इमादुल्मुल्क अंतःकरणापासून व जिवादारभ्य आदिलशाहाचा सेवक झाला ही मित्रता कायम रहावी यदर्थी उभयतांमध्यें शरीरसबंधाची योजना केली आणि खदिजा सुलतान म्हणोन आदिलशाहा याची बहीण होती तिजला अल्लाउद्दीन इमादुल्मुल्क याजला

८. ही लढाई ९३४ (१५२७–८ इ. स.) त झाली.–मु. घो ध. ब, पृ. १७१–१७२.

दिली.[९] परंतु बहुत इच्छिलें कीं बेदरचा पादशाहा अमीर बरीद यांशीं सख्य व्हावें. परंतु गोष्ट घडून आली नाहीं. वारंवार सख्य होण्याच्या प्रबळ युक्ती परस्परें प्रसिध्ध होत होत्या. पुनः युध्धाचे व मनुष्यें ठार मारण्याचें कारण उभें रहात होतें. या संपूर्ण युध्धांतून एका युध्धांत अमीर बरीद याणीं आदिलशाहा यांचे तालुक्यांत युध्ध करून मुलुकाची खराबी फार करित होता. आदिलशाहाही आपले लष्करानिशीं त्याजवर चालून जात होता. उभयतांची सन्मुखता व उभयतांचे शस्त्रप्रयोग वारंवार चालत होते. अमीर म्हणोन एक गृहस्थ शूरामध्यें कीर्तिवान, नामांकित व धैर्यवान अमीर बरीद याचें स्त्रीच्या बंधूपैकीं होता. तो बरोबरी करण्याचे ईच्छेनें फौजेंतून बाहेर पडून मैदानांत दौड करून येऊन युध्धाकरितां आदिलशाहा याजला बोलाविलें. आदिल-शाहा याचे लज्जेची नाडी वाढूं लागली, म्हणजे अशा सामान्य पुरुषाशीं काय युध्ध करावें अशी लज्जा वाटूं लागली. तेव्हां जातीनेंच त्याशीं युध्द करण्याकरितां उठावला. असदखान याणी व कित्येक कारभारी याणीं मना केलें. परंतु न ऐकतां घोडा मैदानांत ढकलला. त्याचे मोकाबल्यास दोन शूर धाऊन येऊन शूरत्व दाखऊं लागले. मध्यभागीं आल्यानंतर दक्षणचे शूर लोकांमध्यें शिपायगिरीचे विद्यें‍त हलकेपणा तर असतोच, ईस्माईल आदिलशाहा नामांकित उभयता शूरांवर प्रबळ होऊन एकएकास निरनिराळे जीवें मारून परलोकांस पाठविता झाला. नंतर यशस्वी होऊन आपले फौजेकडे परतला. तेव्हां मनोरंजन करणारे सेवक संपूर्ण पुढें धावून सल्के करूं लागले व असदखान याणीं आदिलशाहाचे चरण चुंबन करून मुबारकबादी दिली.

### ६. अमीर बरीद यास शिक्षा करण्याकरितां त्याचे पारपत्यावर आदिलशाहा याणीं जाणें, असदखान याणीं अमीर बरीद याचे निद्रास्थानांतून मंचक आणणें, आदिलशाहा याणीं बेदर हस्तगत करणें व कित्येक दिवसांनतर पुनः अमीर बरीद यास परत देणें :

जेव्हां अमीर बरीद याचें कापट्य अति झालें आणि वारंवार कुतुबशाहा व विजयानगरचे पायलोक यासी मिलाप करून अमीर बरीद नाना प्रकारचीं संकटें उभीं करित होता व अनेक रीतीनें फंदीफतूर करित होता तेव्हां आदिलशाहा याणीं त्याचें पारपत्य व शिक्षा करण्याकरितां कंबर बांधून दहा हजार स्वार घेऊन बेदरावर दौड केली. अमीर बरीद याणीं हें वर्तमान ऐकून किल्ल्याची मजबुती व सामान जमा करून युध्धार्थी सिध्ध झाला. कुतुबशाहा याणीं बेदरावर जाऊन युद्धारंभ केला. आदिलशाहा व अमीर बरीद या उभयतांचे सेनेमध्यें नित्य

९. ९३५ हि. (१५२८–२९ इ. स.) तील ही हकीकत आहे. ब्रि फे. ३, पृ. ५५–५६.

युध्द होत होतें. अशा प्रसंगामध्यें कुतुबशाहा अमीर बरीद याचे कुमकेस येऊन पोंहचला. आदिलशाहा यांणीं निमी फौज युध्धाचे मोकाबल्यावर कायम ठेऊन असदखान याजला कुतुबशाहाचे लष्करावर दौड करून कुतुबशाहाकडील फौज परागंदा केली आणि पुनः आपले फौजेचे साह्यानें आपले सेनेंत येऊन पोंहचला. आदिलशाहा या फत्तेमंदीनें, कीं जी फत्तेमंदी असदखान करून आला तेणेंकरून, असदखान याजला अत्यंत प्रीतीनें बक्षिस व ईनाम देऊन पुढ्यांत घेऊन नानाप्रकारचे कृपेनें वाढविला. त्यानंतर युध्धस्थलावर आदिलशाहा यांणीं सक्ती करून खर्चाचा व जमेचा दरवाजा बंद केला, म्हणजे जामदारखाने वगैरे ठिकाणीं पाहारे बसविले. तेव्हां अमीर बरीद घाबरून येऊन परस्परें, म्हणजे आदिलशाहाचे व आमचें, सख्य व्हावें असे ईमादुल्मुल्क यांसी बोलोन विनंती केली. ईमादुल्मुल्क यांणीं सख्याकरितां स्वतः येऊन आदिलशाहाचे लष्करापासून अडीच कोसांवर उतरून आदिलशाहाची भेटी घेऊन विनंति केली कीं, आपले भेटीपासून मुख्य प्रयोजन हें आहे कीं, अमीर बरीद याच्या अपराधांची क्षमा होऊन उभयतांचें सख्य असावें, हें माझे मनांत आहे. त्यावरून आदिलशाहा बोलला कीं, अमीर बरीद याचा अत्यंत वांकडेपणा आहे. यास्तव त्याचा सूड घेऊं नको कीं काय ! सख्य करण्याविषयीं तुम्ही यत्न करूं नका. असें बोलणें ऐकून आदिल-शाहा यास आपलें बोलणें मान्य होत नाहीं असें समजून पुनः त्या बोलण्यावर इमादुल्मुल्क याची विनंति मान्य केली नाहीं. त्यावरून भयाभीत झाला. ईमादु-ल्मुल्क याचे डेऱ्यास येऊन काकुलती आला आणि बोलला कीं, मी आपला आश्रय जोडिला आहे. हरएक प्रकारें कार्य घडून येईल असें करावें. आपण आमचे उभयतांचे सख्य करून द्यावें आणि मजला व माझे तालुक्यास युध्धाचे भयापासून सोडवावें. त्यावरून ईमादुल्मुल्क बोलला कीं, हा तुमचा मनोरथ किल्ला दिल्या-वांचून सिध्धीस जावयाचा नाहीं. हें ऐकून अमीर बरीद खिन्न होऊन तेथून उठून अडीच कोसांपर्यंत ईमादुल्मुल्क याचे लष्करापासून किल्ल्याचे बाहेर ईमादुल्मुल्क याचे आश्रयानें प्रबळ शत्रुचे, म्हणजे आदिलशाहाचे, भय न धरितां निर्भयपणें उतरला व आनंदांत निमग्न झाला. इमादुल्मुल्क वकील आहे तेव्हां या योगानें सख्य होईल या भरंवशावर उभयतांकडील लष्कर शस्त्रें एकीकडे टाकून स्वस्थ बसला होता. असदखान हुशार व सावधपणानें रात्रीस आपले लष्करांत बहुत तकवा करित होता, म्हणजे लष्कराभोंवते फिरून पाहरा करित होता. अमीर बरीद ऐंशीं वर्षांहून अधिक वय झालें असतां कोणतांच एक दिवस किंवा एक रात्र देखिल मद्य प्राशनाशिवाय घालवीत नव्हता, म्हणजे नित्य प्राशन करित होता. इमा-दुल्मुल्क याचे वकिलीचे भरंवशावर आपल्या लष्करांत गाफिल राहून एक रात्रीस मद्य प्राशनाची सभा करून स्वतः मित्रजनांसहित मद्य प्राशनानें असा धुंद

व भ्रांत व बेशुध्द जाहला होता कीं, तेथें त्या वेगळे दोन मशालजी त्याचे निद्रास्थानापासीं उभे राहिले होते तेवढे मात्र कांहींसे शुध्धीवर होते. दुसरा कोणीच सावध नव्हता. असें वाटतें कीं, संपूर्ण कचेरीच मरण पावल्यासारखी झाली. तेव्हां बातमीवरील जासूद लोकांनीं अमीर बरीद याचे कचेरीचे वर्तमान तलाव्याचे समई असदखान याजला समजाविलें. असदखान मोठा अक्कलवान व हुषार व त्या काळांतील अति स्वामीकार्यार्थी श्रेष्ठ होता. ईश्वराचें साह्य व परमेश्वराची कृपा त्याजकडेच वृध्धिंगत होती. स्वामीकार्यार्थी प्राण अर्पण करणारे असे कित्येक स्वारांनिसीं तलाव्यांतून निघोन अमीर बरीद याचे लष्कराकडे निघाला. जेव्हां संनिध पोंहचला तेव्हां घोड्यावरून उतरून साधे येणारे जाणारे मनुष्यासारिखे होऊन अमीर बरीद याचे लष्करांत दाखल झाले, म्हणजे शिरले. संपूर्ण जागीं व रस्ते व बाजारांतून अमीर बरीद याचे लष्करांतील सर्व मनुष्यादेखतां चालून जाऊन जातीनें पांचसाहा सेवकांनिसीं अमीर बरीद याचे निद्रास्थानी येऊन पोंहचला. तेथील संपूर्ण मनुष्यें धुंद व अंमल केलेली व आपआपले हातपाय व मस्तकास ओळाखित नाहींत असे अवलोकन केलें. आपले समागमचे लोकांस सूचना केली तेव्हां त्याणीं अति त्वरेनें उभयतां मशालजी याजला, कीं जे कांहींसे सावध होते त्याजला, असें ठार मारले कीं त्याचे श्वासोश्वासाचा आवाज देखील उठूं दिला नाहीं. असदखान याचे खांद्यावर होती ती शालजोडी अति त्वरेनें अमीर बरीद याचे गळ्यावर, कीं जो पलंगावर प्रेतवत निजला होता त्यावर, घालून आपले लोकांस इशारा केला कीं, कदापि दुसरा कोणता पदार्थ न घेतां चार सेवकांनीं बहुत सावकाशपणानें त्या जडावदार पलंगास त्यासुध्धां उचलून डेऱ्याचे बाहेर घेऊन आले. नंतर बाजारचे जागीं येऊन प्रेत नेते वेळेस ओरडत जातात अशा प्रकारचे शद्ब करित अलविदा पढत सर्व मनुष्यांस श्रवण करवित लष्करांतून बाहेर घेऊन आले. इतक्यामध्यें आपले सेनेसंनिध येऊन पोंहचले. तेव्हां असदखान याणीं सांगितलें कीं, तयहीदचा कलमा, म्हणजे मनुष्य मेल्यावर प्रेत नेते वेळेस म्हणतात तो कलमा, पढावा. तेव्हां वृध्ध पुरुष व यातील मूर्ख म्हणजे अमीर बरीद त्याचे उंच स्वरेंकरून ओरडण्याचे आवाजानें व पलंगाचे हलण्याने किंचित शुध्धीवर आला. अमीर बरीद याणीं मनांत आणिलें कीं, पिशाच्च येऊन माझा पलंग उचलून मजसुध्धां घेऊन जातात कीं काय! तेव्हां लाहुलची आयत पढत धुंदीचे झोपेंतून उठून व पिशाच्च निवारण्याचीं वाक्यें पढण्यास प्रारंभ केला. असदखान हें समजून बोलला कीं, हे पृथ्वी अवलोकन केलेले म्हाताऱ्या सर्व वय मूर्खपणांत घालविलेंस, आम्ही पिशाच्च न होत, कीं तुझे लाहूल पढण्यानें भिऊन पळावें. मी असदखान आहे. तुझे सावधपणाचें आश्चर्य आहे कीं, इतका वृध्ध झाला आहेस तत्रापि व हा समय कीं तुझे भोंवते आमचेकडील लष्कर युध्धार्थी

सिध्ध आहे आणि तूं असा मूर्ख व भ्रांत व अक्कल गेलेला पुरुष झाला आहेस कीं, येवढें थोर संकट व मोठा घात तुजवर येऊन पोंहचला आणि तुजला खबर देखिल नाहीं. अमीर बरीद हें संकटाचें वर्तमान कळल्यानंतर भयानें बेशुद्ध झाला. बेशुध्धीचे अवस्थेंत काकुलती येऊन रडूं लागला. अति लीनतेची भाषणें करूं लागला. मजला जीवदान द्यावें असें म्हणाला. तेव्हां असदखान याणीं त्याचें शांतवन करून बोलला कीं, माझें सामर्थ्य आहे तोंपर्यंत तुझा प्राण रक्षण व तुझी अबरु रक्षणार्थ यत्न करीन. नंतर त्याचा पलंग इस्माईल आदिलशाहा याजपासी आणोन त्या प्रकरणीं सर्व वर्तमान श्रुत केलें. पादशाहा याणीं त्याशीं दोन गोष्टी बोलोन असदखान यास आज्ञा केली कीं, याजला यावेळेस घेऊन जावें. उदईक अदालतीचे वेळेस आणोन हजर करावा. दुसरे दिवसीं पृथ्वीस तेजस्वी करणारे सूर्यानें पूर्व दिशा तत्क्षण खिडकींतून मस्तक काढून पृथ्वीस स्वतेजानें तेजस्वी केली, म्हणजे सूर्योदय झाला. आदिलशाहा याणीं कचेरी करून त्या संकटांत प्रतिबंध पावलेले पुरुषास, म्हणजे अमीर बरीद यास, आणोन हजर करण्याविषयीं हुकुम दिल्हा. तेव्हां असदखान याणीं हुकुमाप्रमाणें अमीर बरीद याचे दोनी हात बांधोन तक्तापुढें आणोन उभा केला. कारण कीं, त्याचे अमार्गाचे वर्तणुकीस्तव अबरु घेऊन आदिलशाहा याचे अंतःकरणांत फार वांकडे आले होतें. यास्तव दोन घटकेपर्यंत बुध्धया त्याकडे अवलोकन न करितां दुसरींच कामें करित होता. अमीर बरीद उघडा बोडका उन्हांत उभा होता. या आश्चर्यप्रद गोष्टींत व चमत्कारिक प्रकर्णांत कीं जी गोष्ट कबूल करण्यांत अक्कल चालत नाहीं. बहुत विचार केला पाहिजे कीं, अमार्ग वर्तणुकीनें, दुर्मार्गानें व वाईटपणानें मुलुकाचे वारिसदार, म्हणजे अमीर बरीद, याजपासीं कित्येक हजार आज्ञापालक सेवक त्याचे संरक्षणार्थ असतील असें असतां कसें झालें! असा प्रौढ पुरुष असे सिक्याचे व खुतब्याचे धण्यास असा खराबीनें निजलेले जाग्यापासून आणतात याचें कारण खास त्याचे अमार्ग वर्तणुकीचे बदल्यामुळें संकटांत प्रतिबंध पावला, कीं असे कोणत्याच बखरींत कोणत्याच पादशाहाची अशी व्यवस्था पाहाण्यांत आली नाहीं. सारांश, सुलतान इस्माईल जेव्हां त्याजपासून बहुत चित्तांत फार त्रास पावला होता यास्तव आदिलशाहा याणीं आज्ञा केली कीं, त्याचे वागणुकीचा सूड घेण्याकरितां त्याजला तोडून टाकावा. असा हुकूम होतांच जल्लाद, म्हणजे तरवारीनें ठार मारणार पुरुष नागवी तरवार करून एकाएकी मृत्युसारिखा, त्यावर येऊन पोंहचला. असदखान याणीं आपलें वचन दिलेलें सेवटास नेण्याकरितां व अभय दिलें होतें तें सिध्धीस नेणेकरितां अमीर बरीद याचे प्राणदानार्थ अन्याय क्षमा करण्यास्तव अति काकुलती येऊन अर्ज केला. अमीर बरीदही रूदन करून फार काकुलती येऊन बोलला कीं, मी आपल्या अपराधाचें फळ पावलों. मी जीवें मारण्यालायक आहे अशी

माझी साक्ष मी देतों. जर करितां शत्रुवध करण्याचें कर्म अपराध क्षमा करण्याचे कर्मानें बदल जाहल्यास, म्हणजे मजला जीवदान देऊन अन्याय क्षमा केल्यास, अहमदाबाद बाकरचा किल्ला खजिन्यासुद्धां निधीनिक्षेपसहित स्वामीचे सेवकापाशीं अर्पण करितों. याजकरितां याप्रकर्णी असदखान याचे मागणें वारंवार पडलें. कुरणांत वाक्य आहे कीं, "क्षमा करा म्हणतील त्यांची विनंती ऐकण्यांत यशप्राप्ति आहे." या वाक्यावरून अमीर बरीद याची विनंती मान्य झाली. तेव्हां अमीर बरीद याणीं आपले पुत्रास, कीं जे किल्यामध्यें होते त्याजला, किल्यांतून निघण्याविषयीं व किल्ला हवालीं करून देण्याविषयी निरोप पाठविला. त्याचे पुत्रानें उत्तर दिलें कीं, म्हातारा निर्दैवी व दुर्दवी वेडा अक्कल जाऊन अशा समयीं अशा फजितीनें शत्रूचें हातीं सांपडून कैदेंत पडला. आतां आपले प्राण वाचविण्या-करितां इच्छितो कीं, पुत्राचीही अबरु घ्यावी. अली बरीद, म्हणोन सर्व पुत्रांहून वडील पुत्र होता, त्याणें उत्तर मुल्ला याजला देऊन गुप्तपणानें बापास निरोप पाठविला कीं, तुझें वय शेवटास आलें आहे, परिणामीं कधीं तरी एक दिवसीं तरी हा मृत्युलोक सोडून जाणें प्राप्त आहे. सामर्थ्य आहे तोंपर्यंत संकट भोगून धैर्य धरून असावें. तोंपर्यंत काळाची गती कशी फिरते हे पहावी. असें सांगून एक विश्वासुक माणूस पाठीमागून गुप्तपणें पाठविला. त्याजला ताकिद केली कीं, जर करितां गोष्ट जाहीर झाल्यास व बातमी फुटल्यास बापाची सुटका किल्ला हवाली केल्याशिवाय कदापि व्हावयाची नाहीं. ते तुजला किल्ल्याचे जाबसालाकरितां कैद करितील व बापास संकट प्राप्त होईलसें करूं नको. याप्रमाणें निरोप सांगून माणूस पाठविला. आदिलशाहा याणीं जाणिलें कीं अद्यापि अमीर बरीद याचे पुत्र किल्ल्यांत ठरले आहेत. किल्ल्याची फत्ते सत्वर होता दिसत नाहीं. नंतर हुकूम दिल्हा कीं, अमीर बरीद याजला हातपाय बांधून किल्याचे दरवाज्यापुढें हत्तीचे पायांसीं बांधून मारावा. पुत्रांनीं पाहिलें कीं, निर्दैवी बापाची अवस्था अशा प्रसंगा-वर ठरली आहे तेव्हां त्या विश्वासू गृहस्थास हुकूम पाठविला कीं, तुम्ही असदखान यासीं रूजू होऊन सांगावें कीं बिवास अभय असावें. अमीर बरीद याचे पुत्राची व त्याचे इलाख्यांतील राहणारांची अबरु रक्षण करावी. असें झाल्यास किल्ला हवाली करणें मान्य केलें आहे व ठरलें आहे कीं बायका वस्त्रासहित, आंगावरील दागिने आहेत त्यासुध्धां, किल्यांतून निघाल्या त्यांजला कोणी उपद्रव करूं नये. त्यानंतर किल्ला रिकामा झाला. आदिलशाहा त्याच वेळेस किल्यावर येऊन ईश्वराचा स्तव करून बाहामनी राजधानीचे मसनदीवर बसून इमादुल्मुल्क याजलाही आंत बोलावून त्याचे रुबरु संपूर्ण शहरांत व किल्यावर खजाना, जडजवाहिराची, सोन्याचीं व रुप्याचीं भांडीं, कित्येक सुगंधी व खाण्यापिण्याचे पदार्थ व रोख ऐवज बहुत होता तो मित्रतेमुळें ईमादुल्मुल्क याचे विद्यमानें काढिला

व बोलला कीं, आपल्यास जे पसंत येईल तें यापैकीं घ्यावें. असें आदिलशाहाचें भाषण ऐकून त्याणीं हात लांबऊन एक जडावदार अत्तरदानी उचलून घेतली. आदिलशाहा याणीं असदखान यास हुकूम केला कीं नक्ती व किरकोळ जिन्नस मिळून तीन लक्ष होनांचा माल ईमादुल्मुल्क याचे सेवकांचे हवाली करावा व एक लाख होन मलुखान, आलुखान, इब्राहीम व अबदुल्ला हे षाहजादे आहेत त्यांजला द्यावेत. तितकेच तुम्ही घ्यावे. तितकेच मक्का व मदिना व मनोरे व पवित्र स्थानाचे खर्चाकडे व पवित्र लोकांचे कबरेकडे पाठविले पाहिजे म्हणोन सांगून त्याप्रमाणें त्या त्या स्थानीं रवाना केलें. बाकी राहिले ते विद्वज्जन, गुणीजन, गोरगरीब, सुखवस्तु व चांगल चालीचे मनुष्य, हुजूरचे कविता करणारे लोक व विजापूरचे लोकांस पाठविले व जातीनें एक हिऱ्याचे अत्तरदानीसिवाय कोणताच पदार्थ घेतला नाहीं. आदिलशाहा पदर झाडून त्या मजलसींतून उठला. इमादुल्मुल्क याणीं अमीर बरीद याचे अन्याय क्षमा करावे म्हणोन विनंति केली. अशा प्रकारें कीं, अदिलशाहा याणीं त्यावर कृपा व योग्यता वाढवणें. असें केलें कीं, आपले अमीर लोकांत त्याची योजना केली. बेदरचा किल्ला असदखान याचे तजविजीनें मुस्तफाखान गिराजी याचे हवालीं केला व कित्येक दिवस तेथें संतोषांत घालवून सर्वांस सुख देतां झाला.[१०]

### ७. मुदगल व रायचूर येथील फत्ते करणें व अमीर बरीद याजला आपले मुलुकास जावयास निरोप देणें :

त्या दिवसामध्यें तिमराज मृत्यू पावला होता. विजयानगरचे रायलोकामध्यें विरुध्द आलें होतें. आदिलशाहा याणीं ती संधि अलभ्य लाभाची असें समजून रायचूरचा व मुदगलचा किल्ला विजयानगरवाल्याकडे गेला होता तो हस्तगत करण्याकरितां ईमादुल्मुल्क यासहित तिकडे जाता जाहला. श्रीकृष्णाबाई उतरून मुदगलावर हल्ला केला. किल्ला घ्यावा म्हणून हुकूम दिला. किल्ल्यांतील राहणारांनीं पाहिलें कीं, मदत व कुमक कोणीकडूनच येत नाहीं तेव्हां किल्ला हवाली केला. त्यानंतर उठून रायचूर येथें झेंडा लाविला. किल्ल्यांतील राहणारे कुमक व साह्यापासून निराशी झाले होते. यामुळें युध्द व भांडण केलें नाहीं. किल्ल्याचे कुलुपाच्या किल्या आणोन हजर केल्या. त्यानंतर आदिलशाहा याणीं तेथें कचेरी करून सुख पावता झाला. तांबडे रंगाचे मद्य प्राशन करण्यांमध्यें निमग्न झाला. ईमादुल्मुल्कही त्या संतोषांचे कचेरींत हजर होता. त्या दिवसीं असदखान याजला बसावयाचा हुकूम झाला. तीन मद्याचे प्याले आपले हातानें त्याजला दिले. ईमादुल्मुल्क व असदखान या उभयतांनीं मिळून अर्ज केला कीं, अमीर बरीद याजलाही याच आनंदाचे कचेरींत आणि-

१०. हा प्रसंग ९३६ हि. ( १५२९–३० इ. स. ) तील आहे.–ब्रि. फे. ३, पृ. ५६–६३; मु. धो. ग. ब, पृ १७२–१७९.

त्यास अत्यंत कृपेचें लक्षण होईल. आदिलशाहा याणीं कबूल केलें. जेव्हां अमीर बरीद आला व बसला तेव्हां आदिलशाहा बोलला कीं, 'राबाअहमकुल्लबाम' या आरबी वाक्याचा अर्थ: 'तीन आसहाबमध्यें चौथा कुतरा होता.' त्याप्रमाणेंच आपण तिघे बसलों आहों यामध्यें हा चवथा कुतऱ्याप्रमाणें हा कुतरा आला, असें बोलला. इमादुल्मुल्क व असदखान हे उभयतां विद्वान होते, उभयतांही समजून हसूं लागले. अमीर बरीद यद्यपि समजला नाहीं तत्रापि उभयतां मित्रांचे हांसण्यावरून लज्यायमान होऊन खालीं मान घातली. नेत्रांतून अश्रुपात चालले. आदिलशाहा याणीं समजून त्याची लज्या निवारण करण्याकरितां मेहरबानगीनें त्याशीं बोलला कीं, 'ईनषा आल्ला हुता आला.' षहर विजापूर येथें जाऊन पोंहचल्यानंतर बेद्र तुजला दिलें जाईल. अमीर बरीद तात्काल ही बैत म्हणतां झाला. बैतेचा अर्थ: "या संतोषाचे वर्तमानावर मी आपला जीव ओवाळून टाकिला, तत्रापि योग्य आहे कीं, हें संतोषाचें वर्तमान माझ्या जिवाची विश्रांती आहे." आदिलशाहा याणीं अमीर बरीद याचे या समयोचित बैत म्हणण्यावरून आश्चर्य केलें व हा मिसरा म्हटला. मिसऱ्याचा अर्थ:. "या वृध्ध पुरुषास म्हणजे अमीर बरीद यास इतकें कळत असेल असें आम्हास वाटत नव्हतें." सारांश येक मासपर्यंत तेथें सुखांत घालऊन अति संतोषानें व आनंदानें आपले राजधानीस म्हणजे विजापुरास येतां झाला. ईमादुल्मुल्क वऱ्हाडकडे रवाना झाला. आदिलशाहा याणीं येऊन पोंहचल्यानंतर करार केलेला सिध्धीस नेण्याकरितां अमीर बरीद याजला आपले आंगावरील पोषाख, हत्ती, घोडे व जडजवाहीर बक्षिस देऊन अहमदाबाद बेदराकडे जावयास निरोप दिला[११] आणि नजरेच्या ऐवजीं कंधार व कल्याण सरकारांत ठेऊन बेद्र व बेद्रचे ताब्यांतील मुलुक सर्व त्याजला दिला. बैतेचा अर्थ: "या उपकारापासून पृथ्वीस आनंद झाला. कारण कीं दक्षणचा पादशाहा त्याजला केला."

## ८. आदिलशाहा व निजामशाहा यांची सन्मुखता व आदिलशाहा याणीं यशस्वी होणें:

यानंतर आदिलशाहा यांजकडून युध्धामध्यें बहुत वेळ निजामशाहा याची शिकस्त झाली. यामुळें कित्येक दिवसपर्यंत निजामशाहा आदिलशाहा यासीं बदलून वांकडेपणानें होता. या कारणास्तव पंचवीस हजार स्वार व तोफखाना व अमीर बरीद याजला घेऊन आदिलशाहा त्याचे सरहद्दींत येऊन पोंहचला. आदिलशाहा दोन हजार

११. ९३७ हि. (१५३०-३१ इ. स.) तील हकीकत दिसते.- ब्रि. फे. ३, पृ. ६४-६८.

टोपीवाले स्वामिनिष्ठां त्याजपुढें चालून गेला. उभयतांची भेटी झाली. तेव्हां असदखान याचे सरदारीचे योगानें सेवेची व्युहरचना होऊन परस्परें मिसळले आणि तुमुल युध्द झालें कीं, पूर्वींचीं युध्दें या युध्दापुढें मुलांचे खेळासारखीं होतीं. शेवटीं यशप्राप्तीचा वायु आदिलशाहाचे ध्वजाकडेच वाहून निजामशाहा याचे श्रेष्ठ अमीर लोकांपैकीं खुरशीदखान म्हणोन होता तो मृत्यू पावला. त्यावरून निजामशाहा घाबरून अहमद-नगरास पळोन गेला. त्याचे राजधानींतील सामान तोफखाना व हत्ती वगैरे आदिलशाहा याचे हस्तगत झाले. इस्माईल आदिलशाहा व निजामशाहा यामध्यें युध्द झालें नाहीं. यास्तव उभयतांकडील कारभारी मंडळींनीं यत्न करून उभयता पादशाहांची भेटी सरहद्दींत करून सख्य केलें.[१२] असें ठरविलें कीं, आदिलशाहा यांणीं कुतुबशाहा याचे मुलुकास व निजामशाहा यांणीं आदिलशाहा याचे मुलुकास दावा न करितां आपआपल्यामध्यें मित्रतेनें असावें. उभयपक्षीं युध्दाचे संकल्पाचा त्याग करावा.

## ९. इस्माईल आदिलशाहा याणीं मृत्यु पावणें :

त्यानंतर इस्माईल आदिलशाहा याणीं कित्येक दिवस तेथें सुखांत घालऊन युध्दाचा संकल्प व यावनी फौजेचे सामर्थ्य त्याचे अंतःकरणांत उभें राहिलें. बहुत किल्ले व श्रेष्ठ स्थानें हिंदू लोकांचे हातीं गेलीं होतीं. याजकरितां आपले यशवंत फौजे-सुध्दां अमीर बरीद यास घेऊन गेले आणि तेलंग देशाचे मुलुखावर चालू झाला. प्रथम गोळकुंडाचे किल्ल्यावर, किं तो किल्ला तेलंग देशाचे किल्ल्यांपैकीं होता त्यावर, हल्ला करून कित्येक दिवस त्या किल्याचे भोंवतें जाऊन बसला. वारंवार यावनी सेनेंत व अकल्याणप्रद परिणामाचे हिंदूंचे सेनेंत बहुत युध्दें झालीं. उभयतांकडीलही बहुत जमात कत्तल झाली. हरवेळेस पंचाननवत पराक्रमवान असदखान याची व दुसरे यवनी सेनेची फत्ते व प्रबलता होत होती आणि हिंदूंचे फौजेवर संकट प्राप्त होऊन थकले होते. किल्ल्यावरील मंडळी निराशवान होऊन किल्ला हवाली करून द्यावा असें थोडक्यांत आले होते.[१३] असा करार मदार करणार होते. तों इतक्यांत एका-एकी ईश्वरी इच्छेनें व त्या देशाचे हवेनें अदिलशाहा याची प्रकृत बिघडून शरीर तल्लक्षण किल्ल्यांतील सुखरूपतेचें सामान घेरलें. चार तत्त्वांचे युक्तीची जुळणी उलटली. वैद्यादि लोकांनीं नानाप्रकारचे उपाय केले. परंतु आयुर्दायाचा प्याला परि-

१२. ९३८ हि. (१५३१–३२ इ. स.) मधील हालचाल–ब्रि. फे. ३, पृ. ६८–७०; मु. घो. घ. ब., पृ. १७९–८०.

१३. ९४० हि. (१५३३–३४ इ. स.) तील लढाई–ब्रि. फे. ३, पृ. ७०–७१.

पूर्ण झाला होता. यामुळें औषधें गुणास आलीं नाहींत. तेव्हां पुनः आम्ही येऊं असा करार पादशाहानीं करून परतले. तेव्हां वाट चालणें हे प्रकृत अधिकच बिघडण्यास कारण झालें. सागर शहरासंनिध येऊन पोंहचले तेव्हां प्रातःकाळीं बुधवारीं तारीख १६ माहे सफर सन ९४१ नऊशें येकेचाळीस (२७ आगष्ट १५३४–Old Style or ६ सप्तेंबर १५३४· New Style) रोजीं परलोकनिवासी झाला,[१४] म्हणजे मृत्यु पावला. असदखान यार्णी पादशाहाचे मृत्यूचें वर्तमान गुप्त ठेऊन पादशाहास पालखींत घालून पडदे सोडून रात्रीचे समयी गोगी येथें रवाना केलें. त्याचे वडिलांचे कबरेसंनिध याचेंही दफन केलें. चंदापूर हा गांव इस्माईल आदिलशाहा यार्णी वसविलेला आहे. तो गांव सन ९२६ नऊशें सव्वीस (इ. स. १५१९–१५२०) सालीं झाला. चंपा महाल सन ९२७ (१५२०–१५२१ इ. स.) सालीं आदिलशाहा यार्णीच केला आहे. आदिलशाहा याचे लष्कराची गणती स्वार सिबंदी मिळून १,४०,००० येक लक्ष च्याळीस हजार व हत्ती नग ११६ होते.

## १० मलुखान याजला तक्तावर बसवावें म्हणोन आदिलशाहा यार्णी असदखान याजला बोध करणें व मलुखान यार्णी सात महिने राज्य करणें :

जेव्हां इस्माईल आदिलशाहा यार्णी असदखान याजला अंतकालीं बोध केला कीं, मलुखान याजला तक्तावर बसवावें, त्यावरून असदखान यार्णे मलूखान याजला तक्तावर बसविलें. त्याची वागणुक व चालचलन असदखान याचे मनोगतानुरूप नव्हती. यामुळें असदखान त्रास पावून इस्माईल याची मातुश्री बुननी खानून इजला सावधपणा नीट राखावा असा बोध करून आपण बेळगांवास गेला. मलुखान यार्णी सात महिने[१५] राज्य केलें. परंतु हलके उत्पत्तीचा होता. यामुळें अयोग्य कर्मांचा भटकणारा झाला. यास्तव सर्व थोर व लहान मनुष्यें त्रासलीं. बुननी खानूनही त्रास पाऊन ठरविती झाली कीं, मलुखान याजला काढून इब्राहीम याजला तक्तावर बसवावें. याजकरितां येक विश्वासू सेवक असदखान याजकडे पाठऊन या प्रकर्णां सूचना करविली. असदखान यार्णी उत्तर लिहिलें कीं, मीं याच त्याचे अयोग्य वागणुकीवरून विजापूर सोडून येथें येऊन बसलों आहे. इब्राहीम याजला तक्तावर बसवावें हें जें आपल्या सलेस आले आहे हेंच उत्तम आहे. नंतर युसुफ तुर्की याजला लिहिलें कीं, इस्माईल याचे मातुश्रींचें विचारास आलें आहे त्याचे सुचनेप्रमाणें व

१४. १६ सफर ९४१ हिजरी बुधवार (६ सप्टेंबर १६३४).–ब्रि. फे. ३, पृ. ७१.

१५. फेरिस्ता प्रमाणें ६ महिने म्हणजे सप्टेंबर १६३४ ते फेब्रुवारी १६३५ राज्य केलें.– ब्रि. फे. ३, पृ. ७७.

हुकुमाप्रमाणें कार्याची सिध्धता करावी. युसुफ तुर्की हा टोपीवाले अमीर लोकांपैकीं एक मातबर मनुष्य होता. त्याणी मलुखान याजला धरून लोखंडाची सलई तापऊन त्याचे नेत्रांतील बुबळावरून फिरऊन अंधळा केला. इब्राहीम शाहाजादा याजला विजापूरचे तक्तावर बसविला.

बुस्तान तिसरें

# इब्राहीम आदिलशाहा-- पहिला

## १. इब्राहीम आदिलशाहा वलद ईस्माईल आदिलशाहा

ईब्राहीम आदिलशाहा जेव्हां विजापुरचे पादशाही तक्तावर बसला तेव्हां तक्त व ताजयास आपले दातृत्वानें शोभविलें. आपले अति उत्तम चालीनें व योग्य स्वभावानें सर्व मनुष्यांस संतोष केला. मलुखान याचे नीचोत्पत्ति व कपटबुध्धीनें खासे मंडळ व सर्व लोक यांचे अंतःकरण दुखवलें होतें. त्या लोकांचे अति उत्तम चालीनें समाधान केलें. सर्व ग्रंथकारांचे मत असें आहे कीं, इब्राहीम आदिलशाहा हा एक पादशाहा शूर व पराक्रमी होता. त्याणीं अति शूरत्वानीं निर्भयपणाचें चिलखत आंगांत घालून आयुर्दायपर्यंत युध्धसंग्राम व रणकंदन केलें. दक्षणचे सर्व पादशाहा त्याचे भयेंकरून रात्रीं निद्रा घेत नव्हते. ईब्राहीम आदिलशाहा सर्वदा शत्रुवर दौड करून त्यांचे मुलुकास खराब व पायमाली करित होता. स्वसामर्थ्येंकरून शत्रूशीं व वैरी लोकांशीं युध्ध करित होता. त्यांवर प्रबळ होत होता. याजकरितां दक्षणचे संपूर्ण राजे आपआपल्यांत मिळून इब्राहीम याचा उच्छेद करण्याचा विचार करित होते. परंतु विचार सिध्धीस जात नव्हता. यद्यपि एखादे वेळेस इब्राहीम याचे लष्करचा मोड होत होता तत्रापि थोडकेच अवकाशांत जमात जमऊन शत्रुवर दौड करित होता. सूड घेत होता. ऐकण्यांत असें आहे कीं, इराणचा पादशाहा शहा तह्मासीप वारंवार सांगत होता कीं, शूर व धैर्यवान निरूपम व प्रख्यात जे पादशाहा झाले त्यामध्यें तुर्क देशचा एक आफरासियाब व दुसरा इब्राहीम आदिलशाहा दक्षणचा आहे, कीं त्याणीं स्वतः जातीनें रणभूमींत जाऊन तरवार लाविली आहे. त्याणीं शत्रु सन्मुख अल्प किंवा बहुत आहे हें न गणितां थोडे जमातीनिशीं शत्रूचे बहुत समुदायावर हल्ला करून त्यावर प्रबळ झाले. तो प्रथम आदिलशाही खानदानापैकीं, कीं ज्याणें बापाची व आज्याची चाल सोडून बारा इमाम याचें नावें खुतबा पढणें वर्ज्य करून संपूर्ण इमामी धर्माची मंडळी बरतर्फ करून, सुनी धर्म चालविला. जे सिपाई मोंगल बारा ताज तुर्की घालित होते त्याजला मना केलें. आपले मुलुकांतील सर्व मनुष्यांस, कीं त्याचे बापानें मोठे यत्नानीं जमा केले होते त्याजला, चाकरीवरून दूर करून चारशें मोंगल चाकरीस ठेविले. दक्षणी लोक व सुनी धर्मवाले चाकरीवर घेतले. ताज घालणारे अमीर लोक यांजला असदखान लागी

व हुपलाक आका या उभयतांशिवाय सर्वांस अमीरीचे कामावरून काढिले. आज्याचे व बापाचे कारकीर्दीपासून पारसी दप्तर होते ते बंद करून त्या ठिकाणीं हिंदवी दप्तर केलें, व महाली-मुलकीचीं सर्व कामें ब्राह्मण लोकांस सांगितली.

## २. विजयानगरावर इब्राहीम आदिलशाहा याणीं फौज घेऊन जाणें व तेथून पूर्ण मनोरथ होऊन परत येणें :

तक्तावर बसल्यावर दुसरे वर्षी बिजयानगराकडे फौज घेऊन जाऊन थोडकेच दिवसांत कार्यसिध्धी होऊन आपले राजधानीस आनंदयुक्त येतां झाला. या प्रकर्णाचा विस्तारयुक्त वृत्तांत असा आहे कीं, बिजयानगर हे पुरातन तक्ताची जागा, कीं बिजयानगर या शहरचे वसाहतीस सातशें आठशें वर्षें झालीं, मोठ मोठे रायलोक याणीं बिजयानगर येथील अधिपत्य व पादशाही केली. मुलुकाची आबादानी व बहुत सिपायी लोक, विपूल सेना, अत्यंत धनसंचय व खजिना येणेंकरून दक्षण व हिंदुस्थानचे संपूर्ण रायलोकांहून त्या शहरचें ऐश्वर्य अधिक होतें. याजकरितां त्याची प्रबलता व जरब पूर्ण होती. वास्तव बाहामनी यावनी संपत्तीचा उदयकाल दक्षण देशांत प्रसिध्ध झाला. ईश्वराचें साह्य यावनी पादशाहाकडे प्राप्त होऊन युध्ध होऊं लागले. तेव्हां प्रतिवर्षी शत्रूचे मुलुकावर युध्ध करून देवतार्चन करणाऱ्या हिंदू लोकांचे निर्मूळ करण्याचा विचार करुं लागले. त्यावेळेपासून बिजयानगरचे रायलोकांत बहुत धाक पडला. तेव्हां हिंदु लोकही त्याचे घातसमयार्थी टपून बसून, समय आला म्हणजे यवन लोकांचे शहरावर हल्ला करून, मुलुकाची खराबी करून, यवन लोकांचे कित्येक तालुके हस्तगत करित होते. सुलतान अहंमद सलील्लाह बाहामनी बेदरी यांचे राजधानीचे कारकीर्दीत शिवरायचे मृत्युनंतर रामराजा संपत्तिवान सन ८४० (१४३६-१४३७ इ. स.) सालीं बिजयानगरचे तक्तावर बसला. न्याय व इनसाफ व शूरत्व व पराक्रमानें अठ्ठावीस वर्षेंपर्यंत राज्य करून मृत्यू पावला. नंतर त्याचा वारिसदार राजा अजीतराय नामें तक्तावर बसून, न्याय व रयत लोकांचे परिपालन करून, सत्कीर्तीत वय घालऊन, पितृवत तोही मृत्यू पावला. त्यानंतर क्रिसनराय नामें राजा तक्तावर बसला. तो अक्कलवान व न्याय करणारा राजा होता, कीं त्याणीं न्याय व इनसाफ करणें धारण करून आपले मुलुकाची आबादी केली. यवनाकडील कित्येक अमीर लोक पादशाहा लोकांपासून त्रास पाऊन त्या राजाकडे आश्रय जोडण्याकरितां पळून गेले. त्या राजांनीं त्यांजला आश्रय देऊन त्यांचे संरक्षण पूर्ण करित होता. हरएक प्रकारें त्यांचे समाधान ठेऊन हरएकास

संतोषांत व आनंदांत ठेवित होता. कांहींसी जागा त्याजला रहायावस देऊन हुकूम दिल्हा कीं, आपल्यास रहावयाकरितां तेथें घरें व वाडे बांधून आनंदानें कालक्रमणा करित जावी. आपला यावनी मार्ग व आचारधर्म निर्भय व निःसंशयपणें आचरित जावा. तुमचेकडील कोणाएकास हिंदु लोकांकडून उपद्रव कोणत्याच सबबीनें व्हावयाचा नाहीं. त्या वसलेले मुसलमानास तुर्कवाले असें नांव ठेविलें. अशा सत्कीर्तीनें व जरबेनें दिवस घालऊन आपले पूर्वजांचे पाठीमागें गेला, म्हणजे तोही मृत्यु पावला. त्यानंतर एक लहान बाळ एक वर्षाचें बिजयानगरचे तक्तावर बसविलें. ते समईं तिमराज म्हणोन बिजयानगर येथील श्रेष्ठ वजिरांपकीं दौलतींतील मुख्य कारभारी होता. त्याणीं राजधानीचीं कामें आपले मुखत्यारींत हस्तगत करून मोठ्या सामर्थ्यानें व सावधपणानें कारभार करित होता. जेव्हां तो तक्तावर बसलेला लहान मुलगा जाणता झाला तेव्हां तिमराज याणीं त्या मुलास काढून दुसरा एक मुलगा रायलोकांपैकीं आणून, तक्तावर बसऊन, आपण कारभार करित होता. जेव्हां तोही जाणता झाला तेव्हां त्याजला पदच्यूत करून दुसरा मुलगा हातीं धरून तक्तावर बसवित होता. तिमराज होता तोंपर्यंत असें चाललें होतें. जेव्हां तिमराज मृत्यु पावला तेव्हां रामराज नामें त्याचे स्थानीं कायम झाला. त्याची चाल व वागणुक तीच होती, कीं जबरदस्ती फार करित होता. बहुधा निमकहरामी व बेमानपणाचे मार्गांत फार पुढें पाऊल ठेऊन यजमानाचे मर्यादेवर नजर ठेवण्यास पाठीमागें टाकून, म्हणजे मर्यादा सोडून, रायलोकांचे वंशापैकीं एक कन्या वधू नेमस्त करून आपलें लग्न लाऊन, मुलुकाचे वारिसदाराशीं असा आप्तविपर्यांपणाचा संबंध लाऊन, गर्वाचे व अभिमानाचे मस्तक आकाशावर वाढविलें, म्हणजे अति गर्विष्ठ झाला. गर्वाचा आणि अभिमानाचा झेंडा बहराम म्हणजे मंगल व कैवान म्हणजे शनी यावर उभा राहिला, म्हणजे आपणास मीच अति श्रेष्ठ असें जाणित होता. राजा भोज तिरमल याजला, कीं तो रायाचे लेकीचा पुत्र होता त्याजला, पूर्व वयांतच राजकी कामांतून काढिलें होतें. त्यानंतर तो प्रौढ झाला तेव्हां त्याजला हस्तगत करावें व आपले निरूपायपणास्तव मनामध्यें जळत होता. त्या जबरदस्ताचा नाश करण्याचें धैर्य धरून समयाची मार्गप्रतिक्षा करित होता. तेव्हां रामराजा याणीं सरहद्दींतील फंदफितुर लोकांचे पारपत्याकरितां आपले शहरांतून निघोन किल्ल्यावर, कीं जो किल्ला शत्रूचे हातीं गेला होता त्याजवर, हल्ला केला. तेथेंच फार दिवस राहिला. भोज तिरुमल याणी कार्याचा समय जाणून विचार करिता झाला. एक वकील, मृदु भाषण करणारा सुज्ञ पाहून, त्याजला नम्रतेचीं पत्रें, नजरेकरितां साहा लक्ष होन व आणखी कित्येक उत्तमोत्तम पदार्थ बरोबर देऊन इब्राहीम आदिलशाहा याजकडे पाठऊन विनंती करविली कीं, आपले चरणारविंद या सरहद्दींत लागून, म्हणजे आपण येथें येऊन, या भूमीस स्वर्गास हेवा देणारी केल्यास, म्हणजे श्रेष्ठ केल्यास, अति उत्तम आहे.

निमकहराम जबरदस्त यांणीं मजला व माझे मुलुकास कमी केले आहे. मी या मुलुकाचा वारिसदार आहे. याजकरितां त्या निमकहरामाचे पारपत्य करून माझी स्थापना केल्यास कित्येक द्रव्य भारी किंमतीचें देणारा होईन. तें द्रव्य आपल्या तक्तासंनिधचे सेवकजनांपुढें, म्हणजे आपलेपुढें, नजर करीन. आयुर्दाय आहे तोंपर्यंत आपले सेवेंत व आज्ञेंत वागून सख्यत्वांत राहीन. सरकार दौलतमदार याचे सेवकजनापैकीं मी एक आहे असें समजत जाईन. इब्राहीम आदिलशाहा यांणीं असदखान याचे योगानें व त्याचे विचारानें या विनंतिपत्रास मान्य करून त्याचे साह्याविषयीं कंबर बांधिली. थोडकेच दिवसांत शत्रूवध करण्याचे व मुल्क घेण्याचे सामानाची सिध्धता करून कटा फौजेनिसीं आपले राजधानीहून, म्हणजे विजापुराहून, कूच केलें.[1] जेव्हां कित्येक मजली करून विजयानगर येथें पोंह्चला तेव्हां रामराज यांणीं मुसलमानी फौजेचे दंग्याचे वर्तमान ऐकिलें. इब्राहीम आदिलशाहा येण्याचें कारण होते तें समजला. तेव्हां घाबरला व कापट्याचे मार्गानें विचार करून अति त्वरेनें विनंतिपत्र आतां मजवर दृष्टि ठेवावी असें नम्रतेच्या मजकूराचें लिहून राजा भोज तिर्मल याजकडे सुज्ञ व मृदु भाषण करणारे सेवकांसमागमें पाठविलें. त्या पत्रांतील मजकूर कीं, इब्राहीम आदिलशाहा याजला आपले राजधानींत बोलाऊन आणणेचें आपले मनांतील भाव कोणते आहेत? जर करितां माझें पारपत्य करणें व मजला शिक्षा व सजा माझे कर्मांची देणे यास्तव, कीं जें कर्म अमर्यादेनें मजकडून प्रसिध्ध झालें ती गोष्ट मजकडून घडली असेल यास्तव, आदिलशाहा यास इकडे आणविलें असल्यास मी अपराधी आहे. शरण येतों व करार करितो कीं, पुनः अमर्यादा व गर्वाचे भोंवते कदापि फिरणार नाहीं, म्हणजे पुनः अमर्यादा करणार नाहीं. आपली आज्ञा पालन करणें व सेवेव्यतिरिक्त दुसरा मार्ग धारण करणार नाहीं. परंतु मुसलमानी फौज या मुलुकांत येणें कोणतेही कारणानें योग्य नाहीं, कीं यांचे घोड्यांचे सुंबाचे धक्क्यानें मुलुकाची संपूर्ण खराबी होईल. बाहामनी फौज दौड करून आपले सर्व लुटून फडशा करितील. देवालयें व क्षेत्रांचा उच्छेद करून मशिदी बांधतील. ब्राह्मणांच्या व कित्येक रयतेच्या हजारो स्त्रिया व मुलें कैद करितील. जेंव्हां मुलुक व रयत लोक खराब होतील तेव्हां पुनः पुनः मनुष्याचे वस्तीचे सुख स्वप्नांतही दृष्टोत्पत्तीस येणार नाहीं, म्हणजे माणसांची वस्ती नाहिशी होईल. आपल्यास तें योग्य आहे, कीं वाईट संकल्पाचा त्याग करावा व आपले व मुलुकाचे संरक्षण करावें. हरएक प्रकारें जसें योग्य दिसेल तसें करून इब्राहीम आदिलशाहा याजला, कीं जो वारिसदार शत्रु आहे त्याजला, परत घालवून द्यावा. राजा भोज तिमराज मृत्युग्रस्त मूर्ख भ्रांत त्या कपटी पुरुषाचे कपटानें त्या ठकविद्येचे पाशांत पडला. रामराजाचे वकिलाचे कपटानें भरलेलें भाषणास खरें व

१. ९४२ हिजरी (१५३५–३६ इ. स.) ब्रि. फि. ३, पृ. ८३–४.

सत्य मानून रामराजाचे विनंतीपत्र नम्रतामिश्रित चवेच्याळीस लाख होन नजर व कित्येक पदार्थ, उत्तम भारी किंमतीचे यैशीं लाख होनांचे किंमतीचे पदार्थांसहित इब्राहीम आदिलशाहा याजकडे पाठऊन परत जाणे विषयीं विनंती करविता झाला. आदिलशाहा याजला जेव्हां राजा भोज तिर्मल याजपासून या बहुत धनप्राप्तीचें कारण होतें तें प्राप्त झालें तेव्हां लष्कराची ढाल आपले राजधानीकडे, म्हणजे विजापूराकडे, फिरवितां झाला. जेव्हां मुसलमानी फौज परत गेल्याचें वर्तमान रामराजास लागलें तेव्हां त्यानें अति त्वरेनें स्वतः विजयानगरास येऊन थोडकेच दिवसांत कापल्यानें व स्वपराक्रमानें राजा भोज तिर्मल याजला धरून ठार मारिला. आपण निरूपद्रविकपणानें व निर्भयपणें विजयानगरचे तक्तावर बसून झेंडा उभा केला.

## ३. विजयानगर येथून परत आल्यानंतर इब्राहीम आदिलशाहा याणीं विजापूरचा किल्ला बांधणें :

जेव्हां इब्राहीम आदिलशाहा विजयानगर येथून पूर्ण मनोरथानें सुरक्षितपणें परत आला तेव्हां मनामध्यें आणिलें कीं, विजापूरचा किल्ला युसुफ आदिलशाहा याणीं बांधिलेला आहे तो मजबूत नाहीं व टिकेल असा भरंवसा नाहीं. याजकरितां धोंडे मजबूत व चुना पक्का करून मजबूत पुनः बांधिला पाहिजे. याजकरितां गवंडी हिशेब जाणणारे हुशार, पाथरुट चांगले कुशल व अकलवान बोलाऊन किल्ला बांधणें चालू केलें. अशा प्रकारें कीं, किल्ल्यास दोन तट व दोन खंदक असावेत. नंतर जलद काम करणारे व काळे निबंध पाषाण घडणारे पाथरुट याणीं मोठे मोठे धोंडे घडून कैवार व पानसळीनें कलासजुले व बहुत कुशल फार चतुर गवंडी होते त्याणीं पाण्यापर्यंत पाया खाणून पायामध्यें चुन्याचा गच्च भरून त्यांत धोंडे गाडून पाया पक्का भरून काढिला. थोडकेच दिवसांत पूर्ण पक्केपणानें व मजबुदीनें किल्ला बांधून तयार केला. दोन्हीही तटांची रुंदी वीस गज, बाहेरचे तटाची उंची वीस गज, आंतील तटाची उंची तीस गज व दोनी तटांचे व खंदकाचे मध्यभागीं बाग लाविली आहे, कीं त्या बागेची रुंदी साठ गज व लांबी किल्ल्याचे घेऱ्याचे आठ मलीची व बागेमध्यें बंगला मजलेदार व पादशाहानीं बसावयाच्या खिडक्यासहित संतोष वृध्धिकारक असा बांधिला. मसिदीही बांधिल्या, कीं ज्या मसिदीस एक हजार तेहतीस १०३३ कमानी होत्या, कीं त्यांची गणती सांपडत नाहीं. याच कारणामुळें त्या मसिदीचें नांव मसनदेगालब असें ठेविलें आहे. अली आदिलशाहा याचे कारकीर्दींत तो बाग फार शोभिवंत होता, कीं अवलोकन करणारांस आनंदकारक व या बागेंत येणारास यशप्रद होता. अनेक प्रकारचे

वृक्ष शीत, समधात व उष्णपणाचे निंबे, नारिंगे, खारिका, द्राक्षे, दाळिंबे, अंजीर, सेव, नारळ वगैरे वृक्ष अति टवटवीत व सफलित होते, तसींच नाना प्रकारचे रंगाची पुष्पें व हरएक जातींचीं प्रफुल्लित होऊन निरंतर बागेस शोभवित होती. खंदकाचें व नहराचें उदक बहुत स्वच्छ व अति निर्मळ, कीं पाहणाराचे अंत:करणास पुष्पासारिखें प्रफुल्लित करित होतें. पाहणारांचे नेत्रांस वारंवार संतोषाचें तेज देत होतें. अशा प्रकारचा बाग होता.

## ४. आदिलशाहा यांणीं असदखान याजला उदोनीचा किल्ला हस्तगत करण्याकरितां पाठवणें व यश मिळविणें :

त्यानंतर इब्राहीम आदिलशाहा याजला राजा भोज तिर्मल याचा नाश झाल्याचें व रामराज यांणीं निमकहरामी व धण्याचा वध करणेचा प्रकार कळल्यानंतर सिपहसालार असदखान याजला बहुत फौजेनिसीं उदोनीचा किल्ला हस्तगत करण्याकरितां रवाना केलें. असदखान यांणीं किल्ला मर्कजा कैवारांतील मध्य भागाचा ठिपका असतो त्याप्रमाणें घेरुन हल्ला करणें ठरविलें. रामराज यांणीं हें वर्तमान कळून असदखान याजला घालवून देण्याकरितां आपले बंधु व्यंकटाद्री याजला उत्तम शूर व स्वार व पायदळ अगणित समागमें देऊन रवाना केलें. तो जेव्हां संनिध येऊन पोंहचला तेव्हां असदखान यांणीं किल्ल्यावर हल्ला करणें सोडून देऊन रामराजाचा बंधु फौजेनिसीं आला होता त्यापुढें चालून जाऊन युध्धारंभ केला. दारुण युध्ध झालें. शेवटीं हिंदूकडील फौजेचा धाक व प्रबळता अत्यंत झाली. तेव्हां असदखान यांणीं युध्धापासून मोहोरा फिरऊन आपण एकटाच एकीकडे निघाला. हिंदूकडील फौजेनीं धैर्य धरून कित्येक कोस पाठलाग केला. रात्रीं असदखान मुक्काम करण्याकरितां उतरला व व्यंकटाद्रीही असदखान याचे लष्करापासून पांच कोसांचे अंतऱ्यानें उतरले. हिंदुकडील फौजेंतील लोक गर्वाचे व अभिमानाचे योगानें, कीं स्वत: यशस्वी झाले होते यामुळें, कालचक्राचे खेळापासून गाफिल राहून निर्भय-पणें परतले व विश्रांति घेते झाले. पंचाननवत पराक्रम करणारा शूर असदखान लारी यांणीं अरुणोदयीं चार हजार नि:सीम चिलखतदार स्वारांनिसीं व्यंकटाद्री याचे लष्करावर जाऊन छापा घातला. रामराज याचे बंधूनीं यद्यपि त्रासून हातपाय आप-टून असदखान याजला घालऊन देण्याविषयीं यत्न केला परंतु जिवावर उदार झालेले, शूराचे भाले तोडणारे, तरवारीचे तीक्ष्ण त्यापुढें दम न निघोन पराजय पावतां झाला, म्हणजे व्यंकटाद्री याची शिकस्त झाली. तेव्हां व्यंकटाद्री यांणीं कीर्तीची व नांवाची पर्वा सोडून महा संकटातून आपला जीव वाचवितां झाला,

म्हणजे फौज सोडून पळून गेला. नंतर व्यंकटाद्री याची बायकामुलें संपूर्ण सामान-सुध्धां व राजधानीचे पदार्थ, कित्येक घोडे, कित्येक हत्ती, कित्येक जडजवाहीर वगैरेसुध्धां अगणित सामान असदखान याचे हातीं लागलें. व्यंकटाद्री याणीं निरुपाय होऊन करार मदार ठरविला व आपली कीर्ति युध्धांत धरले जाऊन सर्व गमावली. धरला गेला होता तो निस्तेज होऊन सुटला. असदखान याणीं लुटींतील सर्व जिन्नस जडजवाहीर वगैरे घेऊन आपले राजधानीप्रती यशस्वी व विजई होऊन येतां झाला. इब्राहीम आदिलशाहा याणीं असदखान याची या प्रकारची सेवा व प्राणावर उदारपणा पाहून अति मान्यता व श्रेष्ठता देऊन, शाबास शाबास असें म्हणून, वाढविला. ऐशीं हत्ती व त्या लुटीपैकीं आणखी कित्येक उत्तम उत्तम पदार्थांसहित असदखान याजला बक्षिस देऊन त्याची बहुत योग्यता वाढविली. जेव्हां असदखान याची सेवा, प्राणावर उदारपणा, येजमानाचें कल्याण इछिणें व मस्तक ओवाळून टाकणें वारंवार प्रत्यक्ष दिसूं लागलें, व असदखान याचे खरेपणाचे व मित्रतेचे धन वारंवार आदिलशाहा याचे परीक्षेचे कसोटीवर कसास उतरलें तेव्हां असदखान यासी शरीरसंबंध असावा असें मनांत आणून त्याची योग्यता फारच वाढऊन शरीरसंबंधाचा योग ठरऊन इछिलें कीं, नात्यानीं नातें जोडावें व त्याचें सेवकपणाचे नात्यास सासरेपणाचें नातें जोडावें. त्यावरून असदखान याची कन्या आपणासच नवरी योजून लग्न केलें. एके दिवसीं अत्यंत कृपावंत होऊन सर्व सरकारी कारभारी लोक यांचे समक्ष सांगितलें कीं, असदखान याणीं जे कांहीं सेवेचें व दौलतीच कल्याण इछिण्याचे अधिकार आमचे बाप व आज्याचे कारकीर्दीपासून जोडिले आहेत व स्वामीसेवेकरितां प्राण खर्च करणारे व मस्तक ओवाळून टाकणारे काम केलें आहे त्याप्रमाणें दुसरे कोणतेच सेवकाकडून झालें नाहीं. याजकरितां आम्हास असें करणें प्राप्त आहे कीं, याचे सेवेचे उत्तीर्णतेकरितां राज्याचा मालक याचे कन्येचे उदरीं जो मजला पुत्र होईल तो मी ठरविला आहे. माझे पाठीमागें शिक्कयाचा, ताज व तक्ताचा धणी तो होईल.

## ५. आदिलशाहा याजसीं ऐनुलमुल्क याणीं बदलणें व त्या बदलणागाचा परिणाम वाईट होणें :

ऐनुलमुल्क कनआनी म्हणोन एक अमीर लोकांपैकीं पुरातन त्याणीं पालन केलला होता. तो शूरत्व व सलाबतीमध्यें निरुपम होता. दर्यावे किनाऱ्याचे मुलुकांतील गावांत रहात होता. त्या समयीं कल्हेरच्या किल्ल्याचे माचीस रहावयास घर बांधल होतें. हलुहळू गर्वानें शूरत्व व प्रबळपणा व मूर्ख मित्रांचे संगतीनें शत्रुत्वानें

वागूं लागला. संकल्प असा केला कीं, समुद्र किनारा, कीं ज्या किनाऱ्याचे जाग्यांत धनाच्या खाणी, मोठेमोठे पर्वत व जागा विस्तीर्ण असा तो मुलुक संपूर्ण आपले हातीं आणून मजबूत व्हावें. जेव्हां त्याजकडून ही वागणूक दृष्टोत्पत्तीस येऊं लागली तेव्हां इब्राहीम आदिलशाहा यांणीं त्याचें पारिपत्य करणें योग्य जाणून, बहुत लष्कर घेऊन, जातीनेंच त्यावर चालून गेला. तो यद्यपि आपले शूरत्वावर व फौजेचे निःसीमपणावर विश्वास ठेऊन, युध्धास सिध्ध होऊन, मोकाबल्यास उभा राहिला, युध्धरचना करून दारूण युध्ध केलें, धर्य व पराक्रमाविषयीं अंतर केलें नाहीं, परंतु प्रसिध्ध आहे कीं, जुल्म करण्याचा दीप तेजहीनच असतो, म्हणजे जुल्म करणाराचें कधींही कल्याण होत नाहीं. निमकहरामीचे वृक्षास टवटवी व वाढ नसते. बहुत ओढाओढी, मारामारी व तोडातोडी अत्यंत केल्यानंतर ऐनुल्मुल्क याची शिकस्त झाली. आपले सामानाची व कुलीनतेची आस्ता सोडून युध्धांतून आदिलशाहाचे रुबरु पळाला. दुसरेकडील कुमकहि आली नाहीं. यामुळें निजामशाहाचे शहरास गेला. तेथें जाऊन बोलण्याचालण्याचे करार करून निजामशाहाचे भेटीस गेला. निजामशाहाचे ऐनुल्मुल्क यासीं दोन कारणांनीं विरुध्धच होतें. प्रथम कारण हें कीं, सरकारी कामाचे समयीं उभयतां पादशाहामध्यें ग्झटला होत होता. निरंतर फंदफितूर होत होते. दुसरें कारण हें कीं, आपले यजमानासीं सख्य करण्याकरितां आला होता. त्या समयीं निजामशाहा याजला ठार मारावा असा हुकूम दिला होता. असें वाक्य आहे तें खरें आहे : “ आपले धण्याशीं बदलशील तर आकाश असलें तत्रापि खालीं तोंड करावें लागेल. ”

## ६. कारभारी लोक यांणीं असदखान याचे वांकडेपणावर उठणें व असदखान विद्यमानी नसतां त्याचे पाठीमागें कित्येक त्याचे घाताच्या गोष्टी सांगून इब्राहीम आदिलशाहा याचे अंतःकरणांत विरुध्ध आणून पुनः इमादुल्मुल्क पादशाहा याचे योगानें उभयतांचे सख्य होणें :

जेव्हां असदखान याची योग्यता व पदवी फारच वाढली व इब्राहीम आदिलशाहा याची कृपा असदखान याजवर दिवसेंदिवस अधिक वाढली तेव्हां विरुध्धपणाचा अग्नि दरबारचे मंडळीचे चित्तांत प्रदिप्त झाला. कारभारी लोक यांणीं यत्नार्थी सिध्ध होऊन असदखान याजविषयीं इब्राहीम आदिलशाहा याजला समजाविलें कीं, असदखान हा निजामशाहा याशीं सख्य करून गुप्तपणें त्याचे धर्मानीं वागतो. इच्छिताहे कीं, बेळगांवचा किल्ला निजामशाहा याजला देऊन त्यासीं मिळावें आणि निजामशाहा याचा सेवक आपण व्हावें. हा मजकूर असा बनवून

सांगितला कीं, या प्रकरणीं चौकशी न करितां व खरें खोटें न ओळखतां आदिलशाहा याची मर्जी बिघडली आणि शिपहसालार असदखान याजवर इतराजी झाली. असदखान याजला धरण्याचा विचार केला. असदखान याजला येविषयीं थोडीशी बातमी समजली. तेव्हां चिंताग्रस्त होऊन आपले ठिकाणीं स्तब्ध होऊन बसला. तो इतराजीचें वर्तमान सर्व लोकांस समजलें. निजामशाहा हा तर पूर्ण वैरीच होता व समय लक्षीतच होता. त्याजला हें वर्तमान समजलें तेव्हां संधि लक्षून, खाज्या जहान दक्षणी व अली बरीद याजला आपणाशीं मिळऊन घेऊन, इब्राहीम आदिलशाहा याचे मुलुकावर चालून आला.[२] प्रथम सोलापुरावर येऊन सोलापूर ताब्यांतील सर्व मुलूख काबीज केला आणि लुटित लुटित पाऊल पुढें टाकून बेळगांवचे सरहद्दींत येऊन पोंहचला. या इच्छेनें तेथें जमात जमऊन जाऊन आला कीं, आपले पुरातन यजमानापासून म्हणजे आदिलशाहापासून चित्त दुखविलें आहे त्या यजमानाचें व आपलें या योगानें तरी सख्य होईल. यास्तव चालून आला. असदखान यजमानाचे कृपेपासून केवळ निराशी होऊन चिंतेचे अवस्थेंत वेळ घालवित होता. तो मसलतीकरितां आपली जमात, कीं साहा हजार स्वार नि:सिम होते, त्यासुध्धां निजामशाहाशीं मिळाला. निजामशाहा असदखान याचे येण्यानें संतोष व आनंदयुक्त जाहला आणि अधिकच बळ प्राप्त झालें. अति दांडगेपणानें मुलुख लुटित लुटित विजापुरास येता झाला. तेव्हां या जमातीपुढें आपले रहाण्याचे सामर्थ्य दिसत नाहीं असें आदिलशाहा याणीं जाणून विजापुराहून निघून कलबुर्ग्यास जाता झाला. तेव्हां निजामशाहा याणीं निर्भयपणें येऊन पोंहचून विजापूरचा किल्ला घेरला. असदखान, कीं त्याची उत्पत्ती इमानीपणा व निमकहलालीचे चिखलांनीं झालेली होती, म्हणजे जन्मापासून इमानी होता. आपले यजमानाचे कामाचे विचार करणें इमानी लोकांस योग्य आहे. यास्तव विचार करून एका संभावित गृहस्थास इमादुल्मुल्क याजकडे रवाना केला. अर्जी लिहिली. त्यांतील मजकूर हा कीं, अयोग्य काम करून संकट उभें करणारे व पाठीमागें निंदा करणाराचे यत्नानें आपली मर्जी मजवर अति बिघडली आहे. अपराध नसतां हलीं अपराधाचा डाग माझे कपाळीं लागला. येणेंकरून या समयामध्यें वैरी लोकांस समय लक्षिणारानें गर्दी करून खराबी करण्याचे पाठी लागले आहेत. आपणापासून ही इच्छा आहे कीं, हाच समय साह्य व उपयोग करण्याचा आहे. याजकरितां जातीनें येऊन इब्राहीम आदिलशाहा याचें साह्य करण्याकरितां विचाराची कंबर बांधून आदिलशाहा याचें व आमचें पूर्वीचे सख्यत्वास पुन: शोभिवंत करावें, म्हणजे उभयतांची एखलासी पुन: करावी. कारभारी लोक यांचे असत्य भाषणानें अपराधाचें व अन्यायाचें लांछन, मी जो इमानी चाकर त्या, माझे कपाळीं लागलें आहे तें क्षमेचें व मित्रतेचें उदकानें धुऊन निर्मळ करावें. असें केलें असतां

२. ९४९ हिजरी ( १५४२–३ इ. स )– ब्रि. फि. ३, पृ. ८९–९०.

सेवक परिपालनाचें श्रेय आहे. इमादुल्मुल्क यांणीं हें विनंतिपत्र घेऊन पोंहचतांच लष्करची ढाल उभी करून कूच केलें. जेव्हां असदखान याजला हें वर्तमान कळलें कीं, इमादुल्मुल्क कलबुर्ग्यासंनिध येऊन पोंहचला तेव्हां तेच समईं निजामशाहा याची संगत सोडून आपल्या जमातीसुध्धां निघोन इमादुल्मुल्क याजकडे जाऊन मिळाला. कारभारी लोक यांचे यत्नाचे व अपराध नसतां असदखान याजला दूषण लावण्याचें संपूर्ण वर्तमान इब्राहीम आदिलशाहा याजपासीं सविस्तर विदित केलें. इमादुल्मुल्क पादशाहा यांणीं असदखान याचे इमानीपणानें वागणुकीचें वर्तमान इब्राहीम आदिलशाहा याजपासीं संपूर्ण सांगून आदिलशाहा याचे अंतःकरणावरील मळ दूर केला, म्हणजे मनांतील वांकडेपणा काढिला. तेव्हां इब्राहीम आदिलशाहा यांणीं अत्यंत प्रीतीनें व लोभानें असदखान याजला जवळ बोलाऊन पोटासी धरलें व बादशाही चालीनें सन्मान दिला. असदखान याचे येण्यानें इब्राहीम आदिलशाहा याजला दुप्पट बळ चढलें. इमादुल्मुल्क पादशाहा याजला घेऊन निजामशाहा याजला धालऊन देण्याकरितां सन्मुख झाला. निजामशाहा याजला दोन तीन हल्लेंतच युध्धापुढें टरण्याचा दम निघेनासा झाला. तेव्हां निजामशाहा वराडाकडे जातांना इब्राहीम आदिलशाहा यांणीं इमादुल्मुल्क पादशाहासहित निजामशाहाचा पाठलाग सोडलाच नाहीं. तोंपर्यंत कीं, निजामशाहा यांणीं अहमदनगर येथेंही राहूं देत नाहींत असें जाणून दौलताबादेस जाता झाला. तेव्हां आदिलशाहा तेथून फिरोन निजामशाहा याजकड जे जे गांव व परगणे गेले होते ते आपले हस्तगत करून आपले राजधानीस येता झाला.

## ७. निजामशाहा, रामराज, कुतुबशाहा व बरीद यांणीं फौज घेऊन इब्राहीम आदिलशाहा याचे इलाक्यावर येणें व असदखान याचे उत्तम विचाराचे योगानें संकट विझणें :

किल्येक दिवसानंतर निजामशाहा, कीं जो लज्जायमान झाला होता व सोलापूर ताब्यांतील मुलुक गेला या कारणास्तव खिन्न होऊन खाणे पिणें व निद्रा वर्ज्य केली होती त्यानें अनेक प्रकारचे निमत्तानें रामराज याजला इब्राहीम आदिलशाहा याजकडून फिरविला. जमशिद कुतुबुल्मुल्क याजला आपले सोबतीस घेतलें. ख्वाज्या जहान दक्षणी व अली बरीद यांसहित इब्राहीम आदिलशाहा याचे तालुक्यावर फौजेनिसीं चालून आला. सोलापूरचा किल्ला घरून त्या ताब्यांतील मुलुक हस्तगत केला. इब्राहीम आदिलशाहा याचे सर्व मुलुकांत लुटालूट व खराबी करण्यांत शत्रुत्वाचा हात वाढविला. आदिलशाहा याणी निजामशाहा याजला घाल-

ऊन देण्याकरितां आपली सेना सिध्द करून त्यापुढें चालून गेला. वारंवार लढाईंत निजामशाहा याची शिकस्त होत होती. अशा समयामध्यें जमषिद कुतुबशाहा यांणीं बहुत फौज घेऊन विजापूरचे सरहद्दांत पोंहचून लुटालुट करण्यास आरंभ केला. रामराज यांणीं तिकडून आपला बंधू व्यंकटाद्री याचला अगणित स्वार सिबंदी देऊन रायचूर मुदगलाकडे पाठवितां झाला.[3] आदिलशाहा यांणीं जेव्हां पाहिलें कीं, हरएक तर्फेकडून शत्रुलोकांचा समुदाय व दंगा उठला आहे व चहूंकडून शत्रु उठून युध्ध करण्यास सिध्द झाले आहेत, यांचा विनाश करणें कठीण दिसतें, असें जाणून शिपहसालार असदखान वजीर अक्कलवान याजला विचारणें करितां झाला. या प्रकर्णी मसलत विचारितां झाला. असदखान यांणीं बहुत विचार करून विनंती केली कीं, आतां माझे अकलेनें तजवीज ती दिसती व त्यांत बरें दिसतें कीं, किल्ला सोडून देऊन निजामशाहाचे हवालीं करावा. कारण कीं, तो मूळचा शत्र आहे. दुसरे वैरी त्याचे योगानें सिध्द झालेले आहेत. तेव्हां निजामशाहा याजला किल्ला देऊं त्यावेळेस सर्वांचे दांत पडतील आणि सिध्द झालेले शत्रू युध्याचा संकल्प सोडून स्तब्ध राहतील. नंतर दुसरे लोकांची समजूत सावकाशपणानें करितां येईल. आदिलशाहा याणी असदखान याचा पक्का विचार मान्य करून निजामशाहाशीं किल्ला देऊन सख्य केलें. त्यानंतर एक वकील मृदु भाषण करणारा व गोड बोलणारा समागमे कित्येक उत्तम पदार्थ जडजवाहीर वगैरे भारी किंमतचे व आणलीहि उत्तम पदार्थ व सख्य व्हावयाजोगें पत्र लिहून, कीं ज्या पत्राच्या योगानें मित्रता मजबूत व्हावी व स्नेहाचें मूळ प्रबळ व्हावें असें पत्र देऊन, बिजयानगरचे यजमानाकडे पाठवितां झाला. त्यावरून त्या उत्तम पदार्थ व जडजवाहिराचे योगानें रामराज संतोष पाऊन वैरभाव मनांत होता तो सोडून राहिला आणि फौज व आपले बंधूस परत आणविलें. यानंतर सिंहासारिखा पराक्रम करणारा असदखान याजला कुतुबशाहाचे समजूतीकरितां नेमिला. असदखान यांणीं पादशाहाचा हुकूम होतांच अशा प्रकारचे हल्लेनां, कीं भुकेलेला वाघ दरींतून बाहेर निघून सिकार धरणे करितां दौड करितो त्याप्रमाणें, बहुत शूर निःसिम पराक्रमवान होऊन हल्ला केला व कुतुबशाहा याजवर कीं जो सरहद्दींत येऊन खराबी करण्याच्या विचारांत होता त्याशीं सामना करून लढाई दिली. एक दोन सामन्यांत त्याची मोटी शिकस्त केली. कुतुबशाहा यांणीं असमर्थ होऊन तेलंग देशाकडे पळतां झाला. असदखान यांणीं गोळकुंड्यापर्यंत पाठलाग न सोडतां गोळकुंड्याचे आसपास गेला. कुतुबशाहा याजला जमात साह्य झाली. सामना बांधण्याचें धैर्य धरून युध्दरचना करून युध्द केलें. असदखान यांणीं शत्रुवध करणारे शूरांनिसीं त्या युध्दांत शूरत्वाचा पराक्रम प्रसिध्द केला. त्या युध्दाप्रमाणें या पृथ्वीवर कधींच युध्द झालें नाहीं. असें युध्द झालें. शेवटीं आपले जमातीप्रमाणें उभयतां

३. ९५९ हिजरी (१५५१–५२ इ. स. )– ब्रि. फि. ३, पृ. १०४–५.

सरदार एकमेकांस न ओळखीत असे परस्पर सन्मुख येऊन एकामेकांवर दौड केली. कुतुबशाहा याजला असदखान याचे तरवारीची जखम दारूण असी मस्तकावर लागली, कीं आयुर्दाय आहे तोंपर्यंत खाण्यापिण्याकडे मन न घाली. सारांश, असदखान तेथूनही यशस्वी व विजयी होऊन आपले यजमानस्वामीचे राजधानीकडे येतां झाला.

## ८. रामराज याचे सांगण्यावरून निजामशाहा यार्णी आदिलशाहा याजवर फौज घेऊन येणें व निजामशाहा यार्णी पराजय पावणें :

कित्येक दिवस गुजरल्यानंतर पुनः निजामशाहा यार्णी पूर्वीचे वैरामुळें व रामराज यार्णी भकळविले या सूचनेवरून भारी फौज घेऊन आदिलशाहाचे सरहद्दींत पोंहचून लुटण्यास आरंभ केला. तिकडील भिवरेचें पाणी सर्व खराब करून भिवरेचे कडेस राहिला. इब्राहीम आदिलशाहा यार्णी निजामशाहा याजला घालवून देणेचे संकल्पानीं कटा फौज घेऊन निघतां झाला. निजामशाहा याचे फौजेनें पाणउताराच्या वाटा धरून उतरून जाण्याचे मार्ग बंद केले होते. बहुत दिवस आदिलशाहा याजला पैल तीरास उतरून जाणेचा योग घडून आला नाहीं. तेव्हां आदिलशाहा त्रासून जोरानें पाण्यांतून पोहून उतरून पलीकडे गेला आणि युध्धाचा सामना बांधून युध्ध करिता झाला. दोन तीन लढाया या उभयतांत सरासरी झाल्या. चवथे वेळस युध्ध असें झालें कीं, पूर्वींच्या लढाया निजामशाहाशीं झाल्या होत्या त्या लढाया चवथ्या युध्धापुढें मुलांच खेळासारिख्या दिसोन आल्या. असें चवथे युध्ध दारूण झालें. ते दिवसींचें युध्ध प्रातःकाळचे प्रथम प्रहरापासून अस्तमानपर्यंत जाहले. तेव्हां आदिलशाहा शूरानें शूरत्वाचे अधिकार जसे असावे तसे सिध्धीस नेले. अगणित स्वार सिबंदी लोक उभयतांकडील सरदारांनिसीं नागव्या तरवारी करून तीरकमानी कसून व भाले मारिते झाले. आदिलशाहा यार्णी युध्धामध्यें तीन वेळ जातीनें हल्ला मोठा केला. बहुत यत्नानें व तोडातोडीनें इब्राहीम आदिलशाहा याचे दैवाचा विजय झाला. निजामशाहाचे लष्कराची शिकस्त होऊन पळत झाले. आदिलशाहाचे लष्करवाल्यास बहुत लूट हातीं लागली. छत्रें, वाद्यें, निशाणें, झेंडें व माहीमरातब, हत्ती नग १३५ रिकामे, द्रव्य भरलेले वगैरे व एकशेंवीस तोफा छकड्यासुध्धां आदिलशाहाचे हस्तगत झाल्या. अशी फत्ते झाली कीं, इब्राहीम आदिलशाहाचे संपूर्ण कारकीर्दीत या प्रकारचे दैवाची फत्ते कधींच झाली नव्हती. यशस्वी व विजयी होऊन आपले राजधानीप्रती, म्हणजे विजापूरास, येता झाला.

## ९. इब्राहीम आदिलशाहा याचे प्रकृतीवर कठोरपणा व निर्दयता प्रबळ होणें व लोकांवर जुलुमाचा प्रलय करणें :

जेव्हां इब्राहीम आदिलशाहा याचे प्रकृतींत उत्पत्तीचे आरंभापासून व ऐश्वर्याचे प्रारंभापासून शूरत्व, निर्भयता, धैर्य व क्रोध प्रबळ होता व सामर्थ्य, त्वरा, दबदबा व जरब बहुत होतीं, याच कारणामुळें सर्वदां युध्दप्रसंगांत व दारूण युध्दांत निर्भयपणें जातीनेंच सर्वांहून पुढें वाढत होता. शत्रूंचा समुदाय बहुत हें न गणितां स्वत: युध्दांत शिरत होता. एकटाच पुढें जाऊन युध्द करित होता. यशप्राप्ती होऊं लागल्यानंतर इब्राहीम आदिलशाहा याची प्रबळता व दारुण स्वभाव वृध्धींगत झाला. याचा कठोरपणा व निर्दयत्व वाढलें. येथपर्यंत कीं, त्या कठोरपणांत विचाराचा व सबुरीचा किंचित प्रवेश न होय. मनुष्यांविषयीं त्याचे सदय अंत:करणानें व कृपेनें नि:शेष सदयता त्यागिली. यद्यपि रयतेचें पालन, सिपाई लोकांस वाढविणें, पृथ्वी रक्षण करण्याची संपूर्ण लक्षणें व श्रेष्ठत्वाचीं चिन्हें अद्वितीय व अप्रतीम होती. परंतु हल्केपणानें कोणाचाच अपराध क्षमा करित नव्हता. क्षमा व सख्य करणें न स्वीकारितां कैद करणें व जिवें मारणें विषयीं हुकूम दत होता. शिक्षा करण्याचे हुकूमांत हल्के मनुष्यांस व श्रेष्ठ लोकांस एकसारखेच धरित होता. याजकरितां दरबारचे कारभारी लोक व राजधानींतील कामगार लोकांनीं इब्राहीम आदिलशाहा याचें अति भय घेऊन धाकामुळें पळून जाणेचे विचारांत पडले. इब्राहीम आदिलशाहा याजपासून त्रास पाऊन असा विचार करिते झाले कीं, इब्राहीम आदिलशाहा यास गादीवरून काढून याचा बंधु शाहाजादा अबदुल्ला आहे यांस तक्तावर बसवावा. यद्य पि विचाराचे माजुमीची भूल प्रकृतीवर चढली नव्हती तोंच, म्हणजे हा विचार ठरला नव्हता तोंच, हें वर्तमान त्याचे, म्हणजे इब्राहीम आदिलशाहा याचे, कानावर गेलें. तेव्हां त्याचा अविचाराचा हात व शिक्षेची प्रकृति प्रलय करण्याचे लक्षणांत आली. शिक्षा करण्यांत प्रवर्तक झाला. कारभारी मंडळ व अमीर उमराव जे नित्य राबत्यांतील होते व ज्याजवर या मसलतीचे निमित्त दिसत होतें त्याजलाही शिक्षा करण्यांत आणिलें. तेव्हां थोडकेच दिवसांत कारभारी लोकांपकीं मुसलमान व हिंदू मिळून एकशेंदहा असामी ठार मारिले. या योगानें शहरांत फार जळजळाट झाला. मोठी जरब बसून गेली. सर्वत्र पळून गेले. याच धरावरींत भयाभीत होऊन शाहाजादा अबदुल्लाही गोव्याकडे पळून गेला.[४] इंग्रज (पोर्तुगीज) लोकांचा आश्रय जोडितां झाला. याच समयांत कांहीं अपराध नसतां शिपहसालार असदखान याचेही दुर्बुध्दीचा संशय आला आणि नित्य

४. ९५२ हिजरी (१५४५-६ इ. स.)– मुधोपत्र. पृ. १९१.

लोभाचा व कृपेचा पाठ होता तो बंद केला. यास्तव असदखान विचारांत पडून आपल घरीं स्तब्ध बसला. असदखान याचे तर्फेची मंडळी जी शहरांत होती त्याजला आदिलशाहा याणीं कैद करण्याचा हुकूम दिला. कित्येक दिवसा-नंतर तो सेवक, इमानी व कल्याण इच्छक, आपली सेवेची प्रसिध्धी करण्यांत आला. मित्रतेचे सुवर्णाचा इब्राहीम आदिलशाहा याचे दृष्टीस कस दाखविण्याचा संकल्प करून मित्रतेचे विस्तारांनीं भरीत विनंतिपत्र, घोडे रास ९, हत्ती दिग्गज नग ९, कित्येक जडजवाहीर व आणखीहि उत्तम उत्तम पदार्थ नजरेसहित चांगले मनुष्या-समागमें इब्राहीम आदिलशाहा याजकडे पाठविता झाला. पत्राचा मायना अशा प्रकारचा लिहिला होता कीं, हे सुलेमान पैगंबर व सिकंदरशाहाप्रमाणें सिंहासनाधीश व हे फरिदून पादशाहाप्रमाणें ऐश्वर्यवान; बैतेचा अर्थ : " काय झालें, काय झालें कीं, माझ्याविषयीं असा त्रासलास कसें : मी काय केलें, मजविषयीं तूं काय ऐकिलेंस, काय पाहिलेंस : अपराध केला असें असल्यास हें माझें मस्तक हजर आहे, शस्त्र घेऊन वध कर व उत्तरक्रिया कर : " नाहींपेक्षां निःकारणी मज मित्रापासून त्रास पावणें योग्य नाहीं. दरबारचे गरजवंत लोकानें मजवर कित्येक तुफानें घेऊन मजला वाडा बंद झाला आहे. मजला कळत नाहीं. युसुफ याचे कडायाप्रमाणें मी निरपराधी आहे. सर्व काल सर्व अवस्थेंत चिंतेंत बसलों आहे. विनंतिपत्राचे शेवटीं या दोन बैता आपले मनोगतानें लिहिल्या : " एक महिन्यांत नजर नजराणा घेऊन : संतोष-युक्त होऊन दरबारांत येईन : मी येईन व सेवेंत कंबर बांधीन : लेखणी प्रमाणें आपलें अक्षरावर मस्तक ठवीन : " आदिलशाहा याणीं पुनः कृपावंत होऊन असदखान याचें तर्फेची मंडळी कैदेतून मोकळी करून त्यास पोषाख वगैरे देऊन बेळगावांस पाठविता झाला. अशा समयामध्यें असदखान याची प्रकृती बिघडली. त्याजला वाचण्याची अशा-श्वता दिसून आली. दुखणें येऊन पडला. दुखणें दिवसेंदिवस अधिक होत चाललें. औषधांचा उपाय चालेना. शेवटीचे दुखण्याचें चिन्ह दिसोन आलें. तेव्हां पुनः विनंतिपत्र स्वामी चरणारविंद अवलोकन करण्याचे मजकुराचे लिहून इब्राहीम अदिलशाहा याजकडे पाठविलें. त्या पत्रांत ही बैत लिहीली होती : " शोभिवंत सुरूच्या झाडाप्रमाणें ये : प्रातःकाळचे वायुप्रमाणें बागेमध्यें ये : " या पत्रावरून आदिलशाहा याणीं असदखान याची प्रकृत फार बिघडली आहे त्याचा समाचार घेण्याकरितां व त्याचे परिपूर्ण करूणापर विनंतिपत्रावलोकनानें त्याचे पूर्वापार सेवा व स्वामीकार्यार्थी प्राण आर्पण करण्याचें स्मरण करून मनामध्यें फार करुणा येऊन नेत्रांनून अश्रू टाकिता झाला. इब्राहीम आदिलशाहा याचें चित्त असदखान याजकडे लागलें होतें. पुरातन सेवक अवलोकान करावा अशी आवड उपजली आणि निघाला. मजली करून अति त्वरेनें दोन मजलीची एक मजल करित होता. इतक्यामध्यें बेळगावसंनिध येऊन पोंहचला. तों असदखान वारल्याचें वर्तमान

ऐकिलें. तेव्हां आपला सासरा समाप्त झाला या शोकानें त्याच रात्रीं पायानींच बेळगांवास येऊन पोंहचला. पाठीमागें राहिलेले मनुष्यांचे व त्याचे मुलाबाळांचे शांतवन करून सर्वांस नाना प्रकारचे जडजवाहीर व पोषाख दिले. असदखान याचे पाठीमागें राहिलेले संपूर्ण पदार्थांपैकां तीनशेंवीस हत्ती व च्यारशें घोडे सरकारांत जप्तीस आणोन बाकीचे सर्व पदार्थ त्याचे पुत्राकडे कायम ठेऊन परत येतां जाहाला. असदखान याचें वय शंभर वर्षांवर अधिक झालें होतें. चाळीस पंनास वर्षे उभयतां पादशाहाचे सेवेंत खर्च केली होतीं. दुष्ट मनुष्यांचें व शत्रूंचे सांगण्यावरून गुप्त राहून सत्कीर्तीनें सुा खमसैन तिसामया (१५४९–१५५० इ. स.)[५] सालीं मृत्युलोकचा परित्याग करून परलोकवास करितां झाला, म्हणजे वारला. बेळगांवचा किल्ला, कीं जो असदखान याणीं बांधलेला आहे, त्या किल्यानजिक असदखान याचें दफन करून त्याच्या कबरेसंनिध सर्वत्र लहान मोठे फात्या द्यावयास जातात. असदखान याच्या प्रपंचांत बकरीं १०० व कोंबडीं २०० व याचप्रमाणें मसाला, तांदुळ, तूप व गहूं वगैरे नित्य इतकें त्याचे मुतबकांत शिजत होतें व दस्तरखान्यावर, म्हणजे भोजनसमयीं धूतवस्त्र आंथरुण त्यावर मुसलमान लोक जेवतात त्यास दस्तरखान म्हणतात, त्या दस्तरखानावर, सदरहू अन्न खासे मंडळींतच खर्च होत होतें. असदखान वारल्यानंतर सन ९६५ (१५५७–८ इ. स.)[६] सालीं इब्राहीम आदिलशाहा वारल्यानंतर अली आदिलशाहा तक्तावर बसून त्याणीं राजधानीचे सर्व कामकाजाचा बहुत विचारानें बंदोबस्त केला.

## १०. जाणिलें पाहिजे कीं :

बखरीचे ग्रंथांत असदखान याचें वर्तमानाविषयीं जें कांहीं कळणेंत येतें तसेंच आहे. असदखान हा श्रेष्ठ अमीर लोकांपैकीं व श्रेष्ठ वजीर लोकांपैकीं उत्तम स्वभाववान सुलक्षणिक व ज्याचीं लक्षणें स्तवनास योग्य व ज्याची क्रिया सर्वांस मान्य असा होता. शूरत्वांत व दातृत्वांत, कीं हीं दोन लक्षणें मनुष्यामध्यें उत्तम, व विद्वानपणा, कीं हेंही लक्षण मनुष्यामध्यें उत्तम आहे, असदखान या सर्व लक्षणांत अद्वितीय होता. विचार व मसलतीविषयीं निरुपम, संकट निवारणार्थी अनुपम्य, दैववानपणा व सुदैवपणांत अद्वितीय, व असें वाटतें कीं ईश्वराचे व ग्रहगणांचही

५. असदखान मोहरम ९५६ हिजरी (१५४९ फेब्रुवारी) महिन्यांत वारला. मुधोघब. पृ. १९२.

६. ब्रि. फि. ३, पृ. ११२.

साह्य नित्य त्याचेकडेसच होते. यशस्वीपणा व विजय हे त्याचे काळांतील आज्ञाधारक होते. कधींही त्याजला संकट येत नव्हतें. ज्या संकटांत पाऊल ठेवित होता त्या संकटाचें सहजीं निवारण करित होता. उत्तमपणाचे वृध्धीनें त्याची खरी वागणूक झाली होती. मनोगतानुरूप मनोरथ पूर्ण होत होते. परंतु हें जें कीं हलीं दृष्टोत्पत्तीस येते कीं त्याचा दरगा हा श्रेष्ठ आवलियाचे दरग्याप्रमाणें व त्याची कबर श्रेष्ठ ईश्वरानें मान्य केलेले पुरुषाचे कबरीप्रमाणें सर्व लहानथोरानीं फात्या देण्याची जागा व त्याची कबर महान साधूचे कबरेप्रमाणें मानतात. तेथील प्रसाद घेतात. चमत्कार दृष्टोत्पत्तीस येतात. मुजावर रात्रंदिवस तेथें सेवेंत हजर राहून फात्या देणें, ऊद व फुलें व नवस महान औलियाचे स्थानाप्रमाणें चालवितात. संपूर्ण गांवचीं मनुष्यें तेथील चमत्कार पाहून आश्चर्य मानितात. हिंदु व मुसलमान लोकांचे समुदाय प्रीतिपूर्वक विश्वासानें व भरंवशानें येतात जातात. याचें कारण समजुतींत येत नाहीं. कारण कीं, या कामाचें अभ्यासांत सिध्दतेचें साहित्य पूर्ण ज्ञानी याचे आश्रयानें व ज्ञानमार्गातील वृध्द पुरूषांचे आश्रयावर ज्ञानी पुरूषाचे उपदेश घेण्यावर व त्याणी प्रतिपालन मनशमदमादि म्हणजे अंतरेंद्रिय निग्रह व बाह्येंद्रिय निग्रह करण्याचे लक्षणाचा मार्ग दाखविण्यावर ठरविलें आहे कीं, ज्ञानमार्गाचें मूळ अभ्यासावर आहे. येविषयींचा विचार पहातां असदखान याणीं हा मार्ग आचरण केल्याचें कोठेंच दिसण्यांत येत नाहीं. परंतु कारण हें आहे कीं, ईश्वराचे कृपेस कारणाचें प्रयोजन नाहीं, म्हणजे अमुक कारण पाहिजे तेव्हां ईश्वर कृपा करितो असें नाहीं. ईश्वर इच्छील त्यावर कृपा करितो. पादशाहाचे मेहरबानगीस सबबेचें प्रयोजन नाहीं. बहुत करून असें आहे कीं अभ्यास करणें सोडतात व खास सामर्थ्यानें अभ्यासापासून भिन्न कामें करितात. आरबी बैतेचा अर्थः “ ही ईश्वराची कृपा आहे. ईश्वर मनास येईल त्याजवर कृपा करितो. ईश्वर या कृपा करण्यामध्यें सामर्थ्यवान आहे. ” हेंहीं ईश्वरास माहित कीं, असदखान याजकडून परिणामीं कोणते उत्तम कर्म घडलें असेल व आयुष्याचे परिणामीं कोणता पश्चाताप घडला, कीं त्या योगानें असदखान याजवर ईश्वराची कृपा व पादशाहाची मेहरबानगी झाली. ईश्वराचे कृपेची व पादशाहाचे मेहरबानगीची फळें दिसोन आलीं व दिसत आहेत. बैतेचा अर्थः “ तिळमात्र ईश्वराची कृपा सहस्त्रावधि पादशाहाहून अधिक आहे. हे ईश्वरा तुझी तिळमात्र कृपा सहस्त्रावधि वर्षें तपश्चर्या व जपजाप्य व निमाज केल्याहून अधिक आहे. ” असो. तात्पर्य, इब्राहीम आदिलशाहा क्रूर व दुर्गुणी पादशाहा होता, कीं अल्प अपराधास बहुत शिक्षा करित होता. थोडका गुन्हां झाला असतां मोठी कैद करित होता. क्षमा व दया कदापि करित नव्हता. परंतु विद्वानाचे व गुणीजनांचे गुण जाणण्यांत अद्वितीय होता. रयतेचें पालन व शिपाई लोकांचा प्रतिपाल कर

ण्यांत निरूपम होता. विषय शृंगारावर फार प्रीति होती. सर्वदा येकांतांत अंतरगृहांत आपणासारखे गौरवर्णी कस्तुरीसारिखे सुवासिक केशांचे स्त्रियांशीं संतोषांत व आनंदांत वेळ घालवित होता. संतोषाच्या गोष्टी ऐकत होता. त्याजला बहुत संतती झाली. त्या संततीपैकीं चार पुत्र हे ईस्माईल, अल्ली, तह्मासी व अहंमद असे चवघे होते. ते आज्ञेत राहून सर्वदां सेवा संनिध राहून कृपेंत वागत होते. इब्राहीम आदिलशाहा याचा लोभ ईस्माईल म्हणोन वडील पुत्र होता त्यावर होता. त्या वडील पुत्रास वलीआहाद म्हणजे आपले पाठीमागें गादीचा मालक व तोच राज्याचा अधिकारी ठरविला. पुत्राचे दैवाची परिक्षा करित होता कीं कशीं कामें करितात हें पाहावें. यास्तव दक्षणचे शहरचीं कामें एकएकाचे नावें सांगणें आरंभिलें, कीं उभयतानें सावधपणानें व उत्तम विचारानें कामें करावी. जें काम ईस्माईल याजला सांगत होता तेव्हां ईस्माईल संकटात पडत होता. जेव्हा अल्ली याजला जें काम सांगत होता तेव्हां ते काम फार जलद व बहुत चांगलेपणानें शेवटास जात होतें. याजकरितां ईब्राहीम आदिलशाहा याजला हें नीट वाटत नव्हतें व चिंताग्रस्त होत होता. कंटाळून अल्ली याजला बोलला कीं, माझे पाठीमागें तूं मालक होशील व तक्तावर बसशील. असें बोलून अल्ली याजला कैदेंत व संकटांत घालून सात वर्षांचे वयांत अल्ली याजला मुबारकबादचे किल्यावर, कीं त्या किल्यास, मूर्तजाबाद असेंही म्हणतात व तो किल्ला हल्ली मिरजेस प्रसिध्ध आहे त्या किल्यावर, घालून कैद केला. नऊ वर्षेपर्यंत कैदेंत राहिला.

## ११. इब्राहीम आदिलशाहा याणीं मृत्यु पावणें :

इब्राहीम आदिलशाहा याजला वृध्धापकाळीं रोग प्रबळ झाले. अतिज्वर, भोंड, श्वास व धातुक्षय असे रोग झाले. तेव्हां दरमाहा देऊन ठेविलेले जवळ राहणारे बहुत वैद्यांचे व आसपासचे गांवोगांवचे वैद्यांचे समुदाय जमा झाले. हरएकानीं जिवादारम्य उपाय केले. परंतु कोणताच उपाय लागू झाला नाहीं. रोग बहुत वाढत चालला. दुखणें लांणीस पडलें. वैद्य लोक उपाय करण्यांत अंतर करितात असा संशय येऊन कित्येक वैद्यांस हत्तीचे पायाशीं बांधून जिवें मारिलें. दुसरे वैद्य आपआपले वतनाचे जाग्यास निघोन गेले. औषधी विकणारे आतार लोकांनी औषधें विकणें सोडून दुकानें बंद केलीं. दोन वर्षेपर्यंत इब्राहीम आदिलशाहा याचे दुखणें लांबलें. नंतर परिणामीं सन ९६५ (१५५७–१५५८ इ.स.)[६] सालीं मृत्युलोकांचा परित्याग करितां झाला, म्हणजे मृत्यू पावला. गोगी येथें बापाचे व आज्याचे कबरेसंनिध दफन जाहला. इब्राहीम आदिलशाहा याणीं चोवीस वर्षे व त्यावर कांहीं

महिने राज्य केलें. त्याजला दोन कन्या होत्या. एकीचे नांव तानी बिबि, कीं जी अलि बरीद याजला दिली व दुसरी बादय सुलतान, कीं जी निजामशाहा याजला दिली.

## १२. इब्राहीम आदिलशाहा याचे खजिना व लष्कर व स्वार व सिबंदी व इमारतीचा तारिखवार ( तपशील ) :

सन ९३३ ( १५२६–१५२७ इ. स. ) सालीं इब्राहीमपूर म्हणोन गांव बांधिला. सन ९३५ ( १५२८–१५२९ इ. स. ) सालीं सोळा खांबाचा बंगला बांधिला. सन ९५८ ( १५५१ इ. स. ) सालीं जुमा मसीद बांधली. लष्कराची संख्या घोडेस्वार ३००० तीन हजार, पायदळ दोन लक्ष तीस हजार २,३०,००० व हत्ती ४५० च्यारशेंपन्नास. ईश्वराचे कृपेकरून व दैवबळानें या प्रकारें त्या कारकीर्दीत राज्य वाढलें होतें. थोडकेच दिवसांत द्रव्याचे खजिने, जडजवाहीर, सुवर्ण, रुपें, कलाबुती सामान व शस्त्रें अशीं जमलीं होतीं, कीं इतके पदार्थ दुसरे जागीं ठेवण्यास जागा मिळत नव्हती. शिपाई व फौजेचा पूर्ण समुदाय होता. मुलुकांतील रयत लोक आबादान होते. आसपासचे गावोगांवाचे इच्छक इब्राहीम आदिलशाहा याचे वाड्यांत येऊन पूर्ण मनोरथी होत होते. सांगण्यांत असें आहे कीं, इब्राहीम आदिलशाहा याचे मृत्युसमयीं खजिन्यांत द्रव्य १,५०,००,००० एक कोटी पंनास लक्ष होन होते. परंतु शाहाजादा अल्ली, कीं जो बाप मृत्यु पावल्यानंतर तक्ताकर बसला, त्यानीं थोडकेच दिवसांत ते भारी द्रव्याचे खजिने फडशा केले. शिपाई लोक व फकीरफिक्रा व विद्वान लोक व गुणीजन व इच्छक लोकांस पर्जन्याचे अभ्रासारखे सर्व धन उधळले. हा बैतेचा मिश्रा या उभयताचे नावानें शोभतो. मिस्याचा अर्थ : " बाप जोडणार व पुत्र उधळणार ".

बुस्तान चवथे

# अली आदिलशाहा

## १. अली आदिलशाहा बिन इब्राहीम आदिलशाहा :

जाणावें कीं, अली हा इब्राहीम आदिलशाहा याचे मरणसमयीं मिरजेचे किल्यांत कैदेंत होता. त्याजला कैदेंत ठेवण्याचें कारण दिसण्यांत विपरित दिसतें. ग्रंथकारास मजकूर होईल तो तरजुमा लिहिण्यासिवाय दुसरा अधिकारच नाहीं. कथाभाग लिहिणारास कथाभागाव्यतिरिक्त उपायच नाहीं. जसें असेल तसें लिहिणें प्राप्त. जर करितां या ग्रंथामध्यें कथाभागाचें वर्णन वारंवार व विपर्यास दिसोन आल्यास ग्रंथावलोकन करणारे क्षमाशील पुरुषास योग्य आहे कीं, कथाभाग वर्णन करणारावर क्षमा करून ग्रंथकाराचे चुकीवर दृष्टि ठेऊं नये. जें कांहीं मीर इब्राहीम असदखानी याणीं याप्रकर्णीं लिहिलें ते हें आहे कीं, अली शाहाजादा वय व वर्षानें प्रौढ व अक्कलहुषारींत तहमासीप याहून अधिक व पूर्ण होता, कीं तहमासीप याचा बाप इब्राहीम आदिलशाहा आहे व तहमासीप हा अली याचा बंधु हा सिकंदर असदखान याचे कन्येचा पुत्र आहे. हें पूर्वीचे कथाभागांत वर्णिलें आहे कीं, इब्राहीम आदिलशाहा याणीं असदखान याचे उत्तम सेवेबद्दल व उत्तम प्रकारचे यत्न करून स्वामी सेवा करून दाखविली याबद्दल आपले पश्चात आपले राज्याचा मालकपणा असदखान याचे कन्येच्या पुत्रास ठरवून अंतकाळीं बोध केला होता. त्यानंतर इब्राहीम आदिलशाहा याची मर्जी शाहाजादा अली याजवर बिघडून कंटाला करुं लागला. अली याजवर क्रोधायमान होऊन अली याजला क्रोधाचे व रोषाचे...केला व अली याजला घालवून देण्याचा बेत केला. पाहशाहाचा संकल्प कारभारी व कामगार मंडळीस कळला. तेव्हां कारभारी लोक इब्राहीम आदिलशाहा याजला या कामापासून वर्ज करावयास आले. विनंति केली कीं, या कामांत सेवकानीं विनंती करण्याची अमर्यादा करणें हें सेवकजनांस योग्य नाहीं. अली याजला घालवून देणेचे सरकारास मंजूर आहे तर तें योग्य आहे कीं शाहाजादा अली याजला असदखान याचे हवालीं करावा. बहुधा असदखान याजला आपल्या कन्येचे पुत्राचे संरक्षण करणें प्राप्त होईल.

असदखान याजला जें नीट दिसेल व त्याचे मनास आवडेल तसें करील. या करण्यांत कठोर अंतःकरण * निर्दयपणाचे लांछन सरकारचे सेवकजनांस लागणार नाहीं. पादशाहा यांणीं कारभारी लोकांचा विचार पसंत करून शाहाजादा अली याजला सोन्याच्या बेड्या पायांत व गळयांत ठोकून मिरजेचे किल्यावर असदखान याजकडे पाठविला. पत्र पाठविलें कीं, तक्ताचें अधिपत्य तहमासीप याजला मी ठरविलें आहे. अली हा या कामास प्रतिबंधक आहे. याजकरितां तिकडे पाठविला आहे. जसें तुमचे मनास येईल तसें करून अली यास जिवें मारावें किंवा डोळे काढून ठेवावा. कमाल गीशहरखान म्हणोन असदखान याचा पुत्र, कीं जो हुजूर चाकरीवर होता व पूर्ण संभानित व बहुत अक्कलवान होता, त्याणीं गुप्तपणें असदखान याजला पत्र लिहिलें कीं, पादशाहा क्रोधायमान होऊन शाहाजादा अली याजला, कीं जो वडील पुत्र तरूण व राज्याधिकारास योग्य आहे त्याजला, हातांत व पायांत बेड्या घालून आपल्याकडे रवाना करून जिवें मारणेविषयींही हुकुम दिला आहे व आज्ञापत्र पाठविलें आहे. आपण ईश्वरकृपेनें कार्यभाग जाणणार व कल्याणकारक धर्माविषई विचारवान आहांत. याजकरितां जे करणें तें बहुत विचारानें करावें. जो हुकूम कीं क्रोधाचे योगानें झाला आहे त्याप्रमाणेंच करणें ही गोष्ट दूरवर विचार करणाराचे अकलेपासून अति दूर आहे. असदखान याणीं पादशाहाचे आज्ञापत्र व आपले पुत्राचें विनंतिपत्र पाहिलें. नंतर शाहाजादा अली याजला प्रतिबंधांत ठेविलें. असदखान स्वतः विद्वान, अक्कलवान, बोलणार, ज्ञानवान व अनेक प्रकारचे चमत्कारिक गुणेंकरून गुणवान होता. त्वरेनें तहमासीप याचे दैवाची विचारणा केली. तां तहमासीप याचें दुर्दैव दिसोन आलें. परंतु हेंही समजलें कीं, याचे सेवेंत व कारभारांत दैववान व प्रारब्धवान उत्तम पुरुष जमतील व जेव्हां शाहजादा अली याचे दैवाची तुलना केली तों ग्रहगणांची अनुकुलता व नक्षत्रांची उत्तम दृष्टि याचे उत्तम दैवावर अशा यशस्वीपणानें दिसोन आली कीं दूरवर विचार करणारी अक्कल असदखान याची त्याचे कल्याणप्रद हुकुमांत ढिली दिसोन आली, म्हणजे नजर चालेना. तेव्हां असदखान याणीं सूचना व हें चिन्ह पाहून बहुत श्रेष्ठता व योग्यतेने शहाजादा याजला गुप्तस्थानीं ठेऊन त्याचे सेवेंत व प्रतिपालनांत कित्येक बारिकपणाविषयीं अंतर करित नव्हता. अली यास जे पदार्थ आवडतील त्याविषयीं जित्रादारम्य यत्न करून तिलप्राय आपलेकडून अंतर पडूं देत नव्हता. पादशाहाचे चित्त समाधानाकरितां हरणाचे दोन डोळे व मुलाचे एक बोट तोडून पादशाहाचे सेवेंत विनंतिपत्र लिहून त्या विनंतिपत्रासमागमें ते डोळे व बोट तोडून पादशाहाकडे रवाना केले. विनंतिपत्रांत लिहिलें कीं, आपले हुकुमाप्रमाणें शाहाजादा अली याचे दोन्ही नेत्र व एक बोट कापून अली याजला नाकीस करून टाकिला आहे. त्यानंतर इब्राहीम आदिलशाहा मृत्यू पावला. तेव्हां जैदखान हवालदार विजापूरकर याणे पादशाहाचे प्रेत पादशाही

डौलानें व शोभेनें शोभिवंत करून गोगी येथें पाठविलें. शाहाजादा तहमासीप याजला बंधुवर्गासहित कैदेंत ठेविलें. कित्येक कारभारी लोक याणी जैदखान हवालदार याजला बहुत यत्न करून बोलिलें कीं, त्वरित एक तरी शाहाजादा आदिलशाहा याचे शाहाजाद्यापैकीं कैदेंतून मोकळा करून तक्तावर बसविला पाहिजे. समय अवलोकन करित बसणारे शत्रूची टपून बसलेले वैरियाची निराशा होईल असें बोलल्यावरून जैदखान हवालदार याणीं त्याजला उत्तर दिलें कीं, हें काम आमचे वडिलाचे हातीं नाहीं. थोराचें काम आहे. या कामाचा संबंध मगरुल महंमद असदखान याजकडे आहे. असें बोलिला व अति त्वरेनें या प्रकर्णी सविस्तर मजकूर असदखान याजला लिहून पाठविला. असदखान याणीं हें वर्तमान ऐकून पोंहचतांच तेच दिवसीं अति त्वरेनें शाहाजादा अली याजला कैदेंतून मोकळा करून अली याचे मस्तकावर पादशाही छत्रें चामरें धारण केलीं. राज्याधिकाराची स्थापना करावयाकरितां बाहेर काढून मुबारकबादी देविल्या व नजरा करविल्या. शाहाजादा अली दुसरे दिवसीं पादशाही सरंजामानिसीं व पादशाही दबदब्यानें मिरजेहून निघोन विजापूरचे राजधानीकडे चालता झाला. हें वर्तमान कळतांच हरएक तर्फेकडील व शहरचीं मनुष्यें मस्तकांचे पाय करून सामोरे यावयास धांवले. सर्व मुबारकबादी व नजरा करित होते. त्यासमई जिल्हा तोरवा दौलतीकडे आला. शाहाजादा अली याणीं जैदखान याजला हुकुम सांगून पाठविला कीं, शहरामध्यें जितके शाहाजादे आहेत तितक्यांचे डोळे काढून हुजूर पाठवावे, म्हणजे स्वस्थपणें व निर्भयपणें श्रेष्ठत्वास पावोन ताज व तक्याचे अधिपत्याचा उपभोग घेईन. राज्य करीन. जदखान याणीं उतर दिलें कीं, मी सेवक आहे. आपला दायादभागी भाऊबंद मंडळीसारखा मिरासदार नव्हे. यजमानाचे डोळे काढणें माझे हातून घडावयाचें नाहीं. असें उतर देऊन तहमासीप याजला उभयता बंधुसहित अली आदिलशाहा याजकडे सुरक्षित पोंहचविलें. नंतर पादशाहाचे आज्ञेवरून तिघेही तऱ्हेतऱ्हेचे नुकसानाप्रति पावते जाहले, म्हणजे कोणाचे डोळे काढिले व कोणाचे कान कापिले व कोणाची बोटें तोडलीं. यानंतर पादशाही ऐश्वर्यानें व राजाधिराजपणाचे ऐश्वर्यानें विजापूर येथ उत्तम वेळेस व सुमुहुर्तसमयीं पोंहचून आदिलशाहा तक्तावर बसला.

## २. दुसरें प्रकारचें वर्णन :

महंमद कासम फिरस्ता व रफीउदीन सिराजीसारख दुसरे ग्रंथकारांनीं असें लिहिलें आहे कीं, शहाजादा अली लहानपणींच मोठा अक्कलवान सुज्ञ होता. दिवसेंदिवस जेव्हां प्रौढ होत चालला तेव्हां श्रेष्ठ स्वभाव व उत्तम लक्षणें धारण करिता

झाला. परंतु अली याजला तालीम देणें व विद्या शिकवणें करितां ख्वाज्या इनायतुल्ला नेमिला होता. त्याचे सोबतीमुळें शिआचा धर्म आचरण करण्याची पूर्ण प्रीति उत्पन्न झाली. जसें इब्राहीम आदिलशाहा एके दिवशीं एकांतांतील मंडळीसहित एकांतीं बसला होता तेव्हां बोलण्यामध्यें बापाचे व आज्याचे धर्माचरणाचें बोलणें निघाले तेव्हां इब्राहीम आदिलशाहा बोलला कीं, सत्यस्वरूप जो ईश्वर त्याचा स्तव असो, कीं ज्या ईश्वरानीं मजला आश्रय दिल्हा त्या योगें मी आपले बाप व आज्याचा धर्म व मार्ग सोडून प्रबल धर्म व सन्मार्ग धारण केला, कीं ज्या मार्गाचे श्रेष्ठ फल व जो सुनी धम वर्णिला आहे त्या धर्माचा मार्ग मी स्वीकारला आहे. शिआ धर्माचे लोकांस बरतर्फ करून कांहींएक त्यापैकीं अवशेष ठेविलें नाहीं. असें बोलिला. तेसमई शाहाजादा अली आपले बापासंनिध हजर होता. हें पादशाहाचे बोलणें ऐकत होता. अमर्याद स्वभावामुळें विचार न करितां दांडगेपणानें पादशाहाशीं बरोबरीचें उत्तर केलें कीं, जर करितां बाप व आज्याचा मार्ग सोडणें ही चांगली चाल व उत्तम मार्ग असल्यास आपले पुत्रासही असेंच करणें प्राप्त, म्हणजे आपण वडिलाचा मार्ग सोडिला तसाच आम्हीही आपला मार्ग सोडून वागूं. इब्राहीम आदिलशाहा यांणीं या प्रकारचे दांडगेपणाचें बरोबरीचें भाषण अली याचें श्रवण करून क्रोधायमान झाला व विचारिलें कीं, तुझा कोणता धर्म आहे? अली बोलला कीं, तूर्त आपलेच धर्मानी मी वागत आहे. परंतु पुढें ईश्वराचे हातीं आहे. जें घडेल तें खरें. असें बोलतांच पादशाहा यांणीं जाणिलें कीं अली हा शिआ धर्माचा आहे. अली याजला त्याचे वस्तादाचे संगतीचा गुण लागला. असें जाणून क्रोधायमान होऊन कित्येक दिवस अली याजला सलामीस येणें बंद केलें. त्याचे वस्तादास पक्के बंदोबस्तानें कैदेंत ठेविला. नंतर अली याजला तालीम देण्याकरितां मीर फतहल्लाह शिराजी याजला नेमिला. कर्मधर्मसंयोगें तोही वस्ताद शिआ धर्माचाच होता. त्यांणीं त्या काळचे षिआ लोकांप्रमाणें आचारआचरण करून हनफी धर्माचे मंडळींत थोरपणा मिळविला होता. त्याचीही संगती शाहाजादा अली याजला लागली. शाहाजादा शिआ धर्म चालवणेविषयीं अति श्रेष्ठत्वानें व पूर्ण प्रीतीन यत्न करित होता. अशा दिवसांमध्यें आसपासचे रहाणारे लोकांची जमात इब्राहीम आदिलशाहा याचे तापिष्ट प्रकृत व भयंकर स्वभाव जाणून बुरहान निजामशाहा याचे अविचार शिकिवण्यावरून इछित होते कीं, इब्राहीम आदिलशाहा याजला राज्याधिकारापासून पदच्युत करून इब्राहीमशाहा याचा बंधू अबदुल्ला याजला तक्तावर बसवावा. या विचारांत होते. ही मसलत पुरी ठरली नव्हती तोंच एकाएकी मसलत फुटली. याजवरून पादशाहा वस्तादाचे पारिपत्य करण्याविषयीं अति क्रोधायमान होऊन अली याचे वस्तादाचे व आणखीही जे जे या मसलतींत होते त्यांचे पारिपत्य करिता झाला. इब्राहीम आदिलशाहा याचे ऐकण्यांत आलें कीं,

मुल्ला फतहुल्लाह हा दुसरा वस्तादही षिआ धर्माचाच आहे. याचीही संगती अली याजला लागली. आणखी समजण्यांत आलें कीं, शाहाजादा अलीही अबदुल्ला या आपले चुलत्याविषयींचे मसलतींत एक विचारानीं होता. यास्तव अत्यंत क्रोधायमान होऊन शाहाजादा याजला पंतोजीसुध्धां मिरजेच्या किल्ल्यावर पाठविला. सिकंदरखान किल्लेदार व कामीलखान ठाणेदार, कीं जो इस्माईल आदिलशाहा याचा भाचा होता, त्याजला लिहिलें कीं, शाहाजादा अली याचा बहुत सावधपणानें पाहाऱ्याचा वगैरे बंदोबस्त ठेवावा. राफनी धर्माचे लोकांस शाहाजादा अली याजकडे कदापि जाऊं देऊं नये. असें लिहिलें परंतु आश्चर्य संगतीचें हें आहे कीं, सिकंदरखान व कामीलखान हे उभयतांही विचार पाहतां षिआ धर्माचेच होते. शाहाजादा अली याचे सेवेंत इब्राहीम आदिलशाहा याचे मनोगताप्रमाणें वागत नव्हते. जेव्हां इब्राहीम आदिलशाहा अनेक प्रकारचे योगानें दुखणाईत होऊन पडला तेव्हां दुसरे संनिध राहणारे लोकांस कळलें कीं, या पादशाहाचे प्राणहारक स्थानापासून सुटका व्हावयाची नाहीं, म्हणजे आतां याचे गावांत राहिलें असतां प्राण घेईल. हा परिणाम रोग आहे. शाहाजादा यानीं तिकडे अजान, म्हणजे उंच स्थानावर उभे राहून यवन लोक उंच स्वरानें ओरडतात त्यास म्हणतात तो अजान व निमाज षिआ धर्मानीच करित आहे व राफनी धर्माचे लोकांचा धर्म यत्नें करून चालवितो. इब्राहीम आदिलशाहा याजला हें भयंकर वर्तमान प्रकृत फार बिघडली होती त्या समयांतच कळलें. तेव्हां इब्राहीम आदिलशाहा सर्पासारिखा क्रोधायमान झाला आणि इच्छिता झाला कीं, आपण जिवंत आहों तोंच तहमासीप याजला तक्तावर बसवावें आणि राजधानीचे मुखत्यारीचा लगाम त्याचे हातीं द्यावा. अली याजला जिवें मारावा किंवा कांहीं कान चोट वगैरे कापून ठेवावा म्हणोन ठरविलें. तेव्हां कित्येक दुष्ट लोकांनीं इब्राहीम आदिलशाहा यास अर्ज केला कीं, शाहाजादा तहमासीप याजलाही वडील बंधूचे चालीची गोडी लागली आहे. शाहाजादा अली याजहून अधिक राफनी धर्म चालवित आहे. असें ऐकून इब्राहीम आदिलशाहा अत्यंत चिंताग्रस्त होऊन बोलला कीं, पृथ्वींतील सर्व मनुष्यें ईश्वराचीं आहेत.' यांचे पालनाचे मुखत्यारीचा लगाम राफनी लोकांचे हातीं मी कसा देऊं ? असें बोलून त्याजलाही, म्हणजे तहमासीप याजलाही कैद केला. राजधानीचीं कामें ईश्वरी इच्छेवर सोंपलीं. जेव्हां इब्राहीम आदिलशाहा याचें दुखणें लांबलें व आरोग्य होण्याचा भाव तिळमात्र दिसेनासा झाला तेव्हां कारभारी लोक हे दुसरा कोणी राज्याधिकारावर बसविण्याचे विचारांत पडले. जे कारभारी लोक शहरांत होते त्यांणीं शाहाजादा तहमासीप याजला राज्याधिकारावर बसविण्याचा विचार केला. खाज्या कमाल लारी, कीं जो यानंतर किष्वरखान यासीं सन्मुख होत आहे व त्या काळीं होम्री व त्या तर्फेंतील दुसरे परगण्यावरील मामलतीचे कामावर होता, त्यांणीं त्या

मुलुकाचा वसूल घेऊन आपलेपासी ठेविला होता. इब्राहीम आदिलशाहा याची प्रकृत बिघडली ते समयीं गांवोगांवचे वसूल करित होता. तो वसुलाचा ऐवज सरकारी खजिन्यांत दाखल न करितां अली आदिलशाहा याचे राजधानीचे तयारीचे उपयोगा-करितां तेथेंच ठेवित होता. जे कारभारी लोक याचे लगत्याचे व मित्रतेंतील होते त्यांसी अली आदिलशाहा यास तक्तावर बसविण्याविषयीं सदरहू मामलेदार बोलत होता. तुम्ही या कामास अनुकूल असावें, म्हणजे तुमचाही उपयोग होईल असी त्याजला आवडी उत्पन्न करित होता. तसेंच मिरज येथील किल्ल्याकडील कामगार सिकंदरखान याजला निरोप पाठविला कीं, आज इब्राहीम आदिलशाहा मृत्यु पावला व येथील हरएक मनुष्यें अनेक प्रकारचे विचार करित आहेत. यास्तव उत्तम मार्ग तो आहे कीं, तुम्ही अति त्वरा करून शाहाजादा अली याजला तक्तावर बसवावा व पादशाही मर्तब्याची छत्रें चामेंरं त्याचे मस्तकावर धारण करावीं. यावरून सिकंदर-खान याजला ही अक्कलेची मसलत पसंत व उत्तम दिसोन आली. तेव्हां कित्येक कारभारी लोक व कामदार जे दूर होते त्यांजला संनिध बोलाऊन आणून हजरत शमसुद्दीन मिरानसाहेब, कीं जे दक्षण देशांतील मोठे अवलिया म्हणजे सिध्ध जाहीर आहेत, त्याचे रोज्यामध्यें सभा करून या कार्याविषयीं प्रश्न करून निर्णय ठरविता झाला. दुसरे दिवशीं, कीं जी वेळ सुमुहूर्ताची व उत्तम समय होता त्या वेळेस शाहाजादा अली याजलाही सदरहू रोज्यांत आणून श्रेष्ठ कबरेसंनिध राज्याधि-काराची तरवार त्याचे कमरेस बांधून पादशाही छत्रें चामरें त्याचे मस्तकावर धारण केलीं. तेव्हां संपूर्ण लोकांचे समुदाय जमून नजरनजराणे करूं लागले. दुसरे दिवशीं मिरज येथून निघून किल्ल्याबाहेर येऊन उतरले. तेव्हां किष्वरखान याणीं त्या समयीं जो वसूल केला होता तो ऐवज, याच दिवसीं खर्च करण्याकरितां ठेविला होता तो ऐवज, न विचारितां अली आदिलशाहा याजपासीं आणून दिला. त्याणीं तें संपूर्ण द्रव्य सर्वांस धर्म करित राहून आणि आपले न्याय व नीतीचे संतोषयुक्त वर्तमानानें सर्वांस प्रसिध्धी केली. हें वर्तमान प्रसिध्ध होण्यानें जवळचे व दुरचे मनुष्यांचे समुदायानें पादशाहाचे भेटीचा इहराम बांधिला, म्हणजे व्रत धारण करून मेळेच्या मेळे निघाले. पादशाहाचे दातृत्वानें सर्वत्र लहान थोर मनुष्यें पूर्ण सुखी व तृप्त होतीं झालीं. अशा समयांत इब्राहीम आदिलशाहा याणीं या मृत्युलोकाचा परित्याग केला, म्हणजे मृत्यु पावला. तेव्हां अली अति त्वरा करून विजापुराकडे चालता झाला. शहरापासून एक कोसाचे अंतरानें किष्वरखान याचा बाग आहे तेथें उतरला. एका संभावित व अक्कलवान मनुष्यास विजापूर येथील मालकास, म्हणजे जैदखान हवालदार यास व आणखी थोर लोकांस विचारून पादशाहाचे प्रकृतीचा भाव कसा आहे हें पाहून चौकशी करून यावयाकरितां पाठविला. जर करितां कारभारी मंडळांचा वगैरे चेहरा व मनोधर्म नीट सख्यत्वाचा दिसला तर त्या सर्वांस अभय देऊन परत यावें.

शहर विजापूर येथील हाकीम म्हणजे कामदार हिंदु चाकर जैदखान म्हणोन शहरचे बंदोबस्ताचे कामावर एकटा नेमिला होता व पूर्ण विश्वासू चाकर अद्वितीय होता. अशा समयांत पृथ्वीपती पादशाहा वारला होता. तेव्हां जैदखान यांणीं शहरचे दरवाजे मजबूत लाऊन बंद करून माणसाचे येणेजाण्याची मनाई केली. शाहाजादे येऊन गर्दी करतील यास्तव त्याचे बंदोबस्ताविषयीं पूर्ण सावधपणा ठेविला होता. कारभारी लोकांनीं जैदखान याजला कितीही समजून सांगितलें कीं, एखादा तरी शाहाजादा आणावा म्हणजे तक्तावर बसवूं व पादशाई छत्रचामरें त्याचे मस्तकावर धरूं. असें म्हटलें म्हणजे जैदखान त्यास उत्तर देत होता कीं, माझे ऐकण्यांत आलें आहे कीं, कित्येक अमीर लोकांनीं शाहाजादा अली याजला तक्तावर बसविण्याकरितां योजिला आहे. जर करिता आम्ही येथें दुसरा शाहाजादा कायम केल्यास संकटास व प्रळयास कारण होईल. अमीर लोकांत व सरदारांत वगैरे वैर उत्पन्न होईल. मुलुकाची व लष्कराची खराबी होऊन मोठा नाश होईल. याजकरितां सबुरी करावी. कारण कित्येक सर्वत्र अली याजला घेऊन शहराचे आसपास येऊन आतांच पोंहचतील, म्हणजे तुम्हा सर्वत्रांची मनकामना व त्या सर्वत्रांचे मनोगत समजुतींत येईल. तुमचे व त्यांचे विचारानें जें ठरेल व ज्यास तक्तावर बसविण्याचा निश्चय कराल ते समयीं मीही तुम्हा सर्वत्रांपैकींच एक सेवक आहे. अशा प्रकारच्या भाषणानें कारभारी मंडळाचें समाधान व वेळ ढकलीत होता. इतक्यांत अली याजकडील वकील येऊन पोंहचला. तेव्हां सर्वत्र कारभारी मंडळी व अमीरउमराव जमून कचेरी केली आणि या प्रकर्णीं एकमेकांत विचारणा करूं लागले. अकलेचे मार्गानें सभेंतील मुख्य मुख्य पुरुषांत बोलणें चालत होतें. ज्याचे विचारास जें आलें तसें ते बोलत होते. जैदखान यांणीं एकाएकी कचेरींत उठोन उभे राहून मोठे आवाजानें बोलला कीं, जेव्हां सर्वत्र सिपाईमंडळ व लहानथोरांनीं शाहा अली याजला तक्तावर बसविण्याकरितां योजिला आहे व अली याजला सर्व मान्य झाले आहेत तेव्हां आलहमदुल्लिल्लाह म्हणजे ईश्वराचा स्तव असो. असें म्हणोन फार चांगलें आहे असें बोलला. मीही सर्व सेवकांपैकींच सेवक आहे व पुरातन चाकर आहे असें बोलून ईश्वराकडे मुख करून सेवकपणानें नमन केलें. त्यानंतर कचेरींतील सर्वत्रांचाही विचार खास ठरला व शाहा अली याजकडे विनंतीपत्र असे मजकुराचें, कीं त्या विनंति पत्रांत एक पारसी बत लिहिली होती. त्या बैतेचा अर्थ– " माझे नेत्राची कमान तुझें राहावयाचे स्थान आहे : कृपाकर व निघोन ये. कारण कीं, हें तुझ्या घरापैकींच घर आहे. " असें विनंतीपत्र लिहून अली याजकडील वकिलाचा सत्कार करून रवाना केला. लोक, शहरांतील कारभारी व कामगार, सरदार, काजी वगैरे व सर्वत्र लहानथोर सामोरे जाऊन मुबारकबादी देऊन सर्वांनीं अली याजवरून सत्के केले व नजरा केल्या. अली याचे बक्षीस देण्यानें सर्वत्र पूर्ण मनोरथी झाले. शाहा अली याणीं जैदखान

याजला निरोप पाठविला कीं, ही गोष्ट प्रसिध्द आहे, कीं दोन पादशाहा एका मुलुकास मावत नाहींत. तिघे शाहाजादे किल्यामध्यें प्रत्यक्ष असतील तव्हां माझें येणें कसें होईल ? शाहाजादे असल्यास त्यांचे योगानें हजारो विघ्नें उत्पन्न होतील. जर करितां तुमचे हें विनंतीपत्र मित्रतेच्या मार्गानें आहे तर तिघेही शाहाजादे यांस हुजूर पाठवून द्यावेत किंवा त्यांचे डोळे काढावेत. याजवरून जैदखान यार्णी विनंतीपत्र लिहिलें कीं, हुजुरून एक विश्वासुक चाकर या कामाकरितां पाठविण्यांत यावा, म्हणज आज्ञेप्रमाणें काम करण्यांत येईल. तेव्हां शाहा अली यार्णी इआतेमदखान या नांवाचे सेवकास, कीं तो सेवक सरकारचे सर्व विश्वासू सेवकापैकीं होता त्याजला, या कामाकरितां पाठविला. तेव्हां त्यार्णी पादशाहाचे हुकुमाप्रमाणे तिघेही शाहाजादे यांचे नेत्र काढिले. अली आदिलशाहा त्याच वेळेस, कीं जी वेळ जोसी यार्णी सुमुहूर्तांची सांगितली ते समई, पादशाही ऐश्वर्यानें विजापूर येथें येऊन तीर्थरुपाचे तक्तावर बसून तक्तास पुनः शोभिवंत केलें. संपूर्ण मनुष्यांस न्याय व इनसाफानें व दाद व बक्षीस व इनाम देण्यानें सुखी केलें. दौलतीकडील कामदार व कारभारी लोकांस योग्यता वाढवणें, इजाफे करणें, पदें देणें व किताब देण्यानें योग्य करितां झाला. तक्तावर बसला तेव्हां पहिले दिवशींच अलीचे हुकमानें अलीयावलिल्लाह हा शद्ध अजानचे कलम्यांत वाढविला व खुतबा खलिफाचे नावानें बद करून बारा इमाम याचे नावें पढविला. बापाचे कारकीर्दीतील संपूर्ण चाली व कायदे बदलून आज्याचे व पणज्याचे कारकीर्दीतील धर्म चालविला. षिआ धर्म चालविणेविषयीं व षिआ धर्माचे लोकांचे पालनार्थी अत्यंत यत्न करित होता. त्यासमयीं विजापूर येथें राजधानींत इरान, तुरान, कर्मान व खुरासान येथील मनुष्यें जमलीं. तीन हजार माणसें तबराई नावाची म्हणजे सुनी धर्मास दूषणें ठेवणार होते त्याजला बडबड करण्याचे काम नेमिलें होतें. इस्तगफरुल्लाह अलअजीम, म्हणजे आधार देवानें श्रेष्ठ ईश्वर दिसण्यांतील मनुष्यें स्वारींत काय, दरबारांत काय, गल्लींत काय व बाजारांत काय असे कित्येक जागोजाग बडबडूं लागले. त्यासमयीं संपूर्ण शहरांत एका जुमा मसिदींत संपूर्ण मनुष्यें निमाज पढत होतीं. तेंही शतावधी संकटानें इक्तियारखान या नांवाचा एक अमीर लोकांपैकीं व निःसीम सुन्नी धर्माचा आचार चालविण्याविषयीं पूर्ण निश्चयाचा होता त्यार्णी शुक्रवारी आपले सत्तेंतील आप्तविषयीं जातींतील मनुष्यांसहित तरवारी वगैरे शस्त्रें घेऊन, तयार होऊन, पुरातर जुमा मसिदींत येऊन, मसिदीचा दरवाजा मजबूत लाऊन, तोफा बंदुका व दुसरे आणखी कितेक हत्याऱ्याचे लोक पाहाऱ्यास मसिदीचे मंडपावर ठेऊन व शूर व धर्यवान मनुष्यें त्या शस्त्रसरंजामाकडे नेमून आपण जमातीसुध्दां खुतबा व निमाज पढत होता. जर करितां असा बंदोबस्त न ठेवितां तर सामर्थ्य नव्हतें कीं खुलफायराषदीन याचे नावें मिंबरावर उभे राहून

उच्चार केला जाईल. हनफी धर्माचे धर्माचरण करणारे लोक या नवीन उत्पन्न झालेले संकटाचे योगानें खिन्न होऊन आपआपल्यांत बेत करून दंग्याची व युध्याची मसलत करूं लागले. थोडक्यांतच संकट उभे रहाणार होते. परंतु अली आदिलशाह याणीं उत्तम चाल, दातृत्व व धर्म करणें व उतम स्वभाव न्याय इनसाफाचे धारण केले होते. रयत व गरीब लोकांवर दया व उपकार करित होता. विद्वान व गुणीजनांचा सत्कार जसा व्हावा तसा करित होता. निराश्रित लोक व ज्यांवर जुलूम झालेला आहे त्यांची दाद जलद घेत होता. याचक व फकीर लोकांस बहुत धन देत होता. आणखीही बहुत जमात, कीं जे इब्राहीम आदिलशहा याचे कारकीर्दीत षिआ धर्म आचरण छपाऊन प्रगटपणांत कापट्ये अंतःकरणानें दशा धारण करून आम्ही सुन्नी धर्माचे आहों असें दाखवित होते त्याणीं हल्लीं षिआ धर्म छपावणेचा बुर्खा मुखावरून काढून, म्हणजे उघडपणें षिआचा धर्म चालवून' मनांत होते तसें बाह्यात्कारीही रंगले. सुनी धर्मवाले लोकांचे पारडें फार वजनदार झालें. यामुळें संकट उत्पन्न झालें असतांही विझलें. षिआ धर्माचे व सुनी धर्माचे लोकांत कज्या बंद झाला. सत्य आहे कीं, पादशाहास न्याय व इतरांस धर्म करणेची चाल योग्य आहे, कीं या दोन चाली अपराधाचे अछादन करणाऱ्या व नुकसान बंद करणाऱ्या होतात. ज्यासमयीं, कीं राजधानींत न्याय व धर्म या दोन चाली एके ठिकाणीं जमतात तेथें मित्रतेनें किंवा शत्रूनें बाध ठेवणेची जागा रहात नाहीं. अली आदिलशाहा अक्कलवान, धर्मनिष्ठ, सुलक्षणिक प्रकृतीचा व दयावंत होता. कित्येक ग्रंथ वित्पत्तीकरितां प्रथम शिकण्याचे कलम, मतीक, हिकमत, नुहुसर्फ व सर्फ वगैरे ग्रंथ गुरुपासून शिकला होता. बहुत विद्येंतील बहुत दृष्टांत पाठ होते. अक्षर सुलस, नस व रुकाआ या तीन प्रकारचे लिपीची अक्षरें बहुत चांगली लिहित होता. राहणी फकिरासारखी व विरक्त, उदासीन पुरुषासारखी होती. कोणतेही पदार्थाचा आग्रह आपले सुखार्थ ठेवित नव्हता. कदापि आपले आंगावर अलंकार भूषणें घालून नटत नव्हता. पादशाई तक्तावर बसतांच न्याय, इनसाफ, दया, मेहरबानगी व बक्षिस देणें व धर्म करणेचा असा उत्तम मार्ग धारण केला, कीं या पृथ्वीमध्यें सदरहू लक्षणाचा झेंडा लाविला. सिपाईलोक, लष्कर, सरदार, विद्वान, संभावित, कविता करणारे, गरीब फकीर वगैरे लोकांवर धैर्य धरून जें द्रव्य कीं इब्राहीम आदिलशाहा याणीं यत्न करून बहुत श्रमानें एक कोटी पन्नास लक्ष होन राखले होतें ते तो देत होता. एकांतवास करणारे साधू राहात होते तेथें संततीकरितां जात होता. यद्यपि हिंदू लोकांचे जातीचा साधू असला तत्रापि त्याची परिक्षा घेत होता. त्या साधूमध्यें लक्षण बरें दिसल्यास त्याचे संरक्षणार्थ बंदोबस्त करून पालन करित होता. नाहींपेक्षा कांहीं देऊन निरोप देत होता. मुलकावर व मालावर कदापि भुलत नव्हता. पृथ्वींतील विषयाची त्याजपुढें कांहींच योग्यता

नव्हती. पृथ्वींतील सर्व कामें सेवकजनांवर सोंपून आपण मोकळा राहत होता. जेव्हां संनिध राहणारांचे सोबतीनें बसत होता तेव्हां पांच सहा घटका चहूंकडील गोष्टी बोलत होता. गोष्टी व कथा ऐकून आपले चित्त समाधान करित होता. जेव्हां कचेरींतून उठत होता तेव्हां बोलत होता कीं, पाहिलेंत कीं, काय व्यर्थ बडबड मीं केली. या गप्पाछप्पा वृथा भाषण करण्यापेक्षां हे बरें आहे, कीं हे पृथ्वींतील राहणारे मनुष्याचे मुलुक व कमाविसीचे विचारांत आम्ही असावें. आतां जाऊन थोडेसें निजतों. जर करितां आयुर्दाय अवशेष आहे तर पुनः बोलूं व ऐकूं असें म्हणत होता. जेंव्हां पादशाहाच्या चाली व रहाणी फकिरासारखी होती, जेव्हां ही गोष्ट आसपासचे राहणारे लोकांचे ऐकण्यांत आली तेव्हां फकिराचे चालीच्या पादशाहाचे भ्रांती, बेगर्जी व मूर्खपणावर दौड करून आशेचे दांत तीक्ष्ण केले, म्हणजे दुसऱ्याचें राज्य घेण्याची आशा उपजली. त्याचे नीच उत्पत्तीचा स्वभाव चलनवलनात आला, म्हणजे आपण नीच मनुष्यानें पादशाहावर चालून जाऊन कसा हल्ला करावा हें कांहींच मनांत आणिलें नाहीं. सर्वांनीं बेत केला कीं, फौज घेऊन अली आदिलशाहा याचे मुलुकावर व मालावर गर्दी करून सर्व हस्तगत करावे. पादशाहा याणीं प्रथम बहुत यत्न केला, कीं कदाचित सख्य करण्यानीं हें विघ्न टाळावें. परंतु उपयोग झाला नाहीं. यास्तव विजयानगर येथील पादशाहा रामराज याजसीं मित्रता करण्याचें ठरविलें आणि किश्वरखान, अबुदराव, व सिराजी या उभयतांसमागमें जडजवाहीर व भारी किंमतीचे पोशाख देऊन पाठविलें आणि प्रतिज्ञा व शर्ती ठरविण्यांत आणिल्या. करार त्या गोष्टीवर ठरविला कीं, अली आदिलशाहा स्वसत्तेनें विजयानगर येथें जाऊन, रामराज याची भेटी घेऊन, समक्ष बोलणें होऊन, मित्रता व दोस्ती मजबूत करावी आणि उभयतां एक होऊन एकमेकांचे साह्यानें शत्रूवर फौज घेऊन जाऊन पारपत्य करावें.

## ३. रामराज याचे भेटीकरितां विजयानगर येथें अली आदिलशाहा याणीं जाणें :

अली आदिलशाहा याणीं करार ठरल्याप्रमाणें बिजयानगर येथें जाण्याचा निश्चय केला. अशा समयांत नवीन वर्तमान येऊन पोंहचलें कीं, रामराज याचे लहान मुलापैंकीं एक मूल, ज्यावर रामराज याचा अत्यंत लोभ होता तें मूल, वारलें. याविषयीं शांतवन करण्याकरितां विजयानगर येथें जाण्यास हें एक दुसरें कारण झालें. आदिलशाहा याणीं सहस्रावधि संशय व भिती मनामध्यें असतां ईश्वराचे कृपेवर भरंवसा ठेऊन विजयानगर येथें जाणें करितां विजापूर येथून निघोन बिजयानगरास जाता

झाला.' रामराज यांणीं अली आदिलशाहा पादशाहा याची स्वारी इकडे येत आहे असें वर्तमान ऐकून आपले श्रेष्ठ सरदारासमागमें फौज देऊन सामोरे पाठऊन आज्ञा केली कीं, श्रीकृष्णातीराचे सरहद्दीपासून मुक्काम, दर मुक्कामाचे जागीं आदर तारतम्य व सरबराईचा बंदोबस्त ठेऊन, नित्य मेजवान्या करित जाव्या. पादशाहास जें जे पदार्थ आवडतील ते ते प्राणप्रीय पाहुण्याचे आदराप्रमाणें पदार्थ नजर करित जाऊन बहुत श्रेष्ठतेनें पादशाहाची स्वारी येथें घेऊन यावी. जेव्हां आदिलशाहा याची स्वारी श्रीकृष्णानदी उतरून अलिकडे आली तेव्हां बिजयानगर येथील सरदार मंडळी अति आदर तारतम्यानें उत्तम प्रकारें मेजवान्या करित मुक्कामाचे जागीं चौकी पाहाऱ्याचा बंदोबस्त हुशारीनें हरएकप्रकारें दर मुक्काम जागीं दर मजलीस येऊन बिजयानगराकडे पादशाहाची स्वारी घेऊन जात होते. बिजयानगरापासून एक मजलीचे अंतऱ्यावर स्वारी जाऊन पोंह्चली. रामराज यांणीं शहरची तयारी व नाना प्रकारची आरास करण्याचा हुकूम दिला, कीं गल्ली व बाजारचे जाग्यांतील दारें व भिंती उंच किंमतीचे रंगानें रंगऊन उंच कापडानें खांब वगैरे मढऊन तयारी करावी. त्यावरून हुकूमाप्रमाणें इंद्रभुवनासारखे शोभिवंत केलेले, तुंगभद्रेचे कांठी विस्तीर्ण स्थान, पाण्याची जागा, हवासीर उत्तम व संतोषकारक होती, ती जागा पादशाहाची स्वारी उतरण्याकरितां ठरवून, मोटमोठे तंबू देऊन, त्या अति उंच तंबूस मखमली, कलाबुती पडदे, छते वगैरे देऊन शोभिवंत केले. नाना प्रकारच्या रंगाच्या बिछायती अंथरून तयारी केली. नंतर रामराज स्वतः आपले बंधूसहित, सरदार व हत्यारबंद फौज घेऊन, पाचशाहा कोस सामोरे पुढें येऊन, पूर्ण संतोषानें पादशाहाची भेटी घेऊन, आदिलशाहा याची स्वारी शहरांत घेऊन आला. भेटीचे पहिले दिवशीं रामराज याचे वाड्यांत पादशाही डौलाची आरास केली होती. तेथें कचेरी झाली. आदिलशाहा यांणीं प्रथम आपलेकडील पोशाख रामराज याजकरितां आणिला होता तो रामराज याचे आंगावर घालून रामराज याचे आंगावरील दुःखाची वस्त्रें काढिलीं व शांतवन केलें. त्यानंतर आपले मनांतील बोलणें आरंभिलें. रंगीन व मिष्ट भाषणें, कीं ज्या बोलण्यानीं मित्रता व सख्यतेचें मूळ प्रबळ होय असे बोलणें, विस्तारयुक्त बोलिला. रामराज यांणींही पूर्ण संतोष व आनंदानें पादशाहाचीं उत्तम भाषणें आवडीनें अंतःकरणापासून श्रवण केलीं. नंतर अली आदिलशाहा यांणीं रामराजयास नजरेकरितां उत्तम उत्तम पदार्थ फार किंमतीचे आणिले होते ते रामराज यास दिले. त्या नजरेचे जिनसांचा तपसील आठरा लक्ष होन रोख व कित्येक भारी किंमतीचे जवाहिराचे व मोत्याचे कित्येक डबे, कित्येक हत्ती पर्वतासारखे थोर थोर, कित्येक घोडे जलद उडणारे सानासुध्धां व कित्येक घोडे,

१. ही हकीकत ९६५ हि. (१५५७–५८ इ. स.) तील आहे.– ब्रि. फि. ३, पृ. ११७.

कीं ज्यांचे लगामास व चारजम्यास मोत्यें खिळलेले, जडावदार चारजमे व लगामाचे व किल्येक उंट पोपाखाचे बासने भरलेले, कीं त्या बस्त्यांत मिसर देशचें कसब म्हणोन फार किंमतीचें कापड असतें तें, रूम देशचे खुब म्हणोन उंची कापड असतें तें व चीन देशचे दिवा म्हणोन उंच किमतीचें कापड असतें त्या वस्त्रांचे पोशाख होते. आणखीही बहुत प्रकारचे जिन्नस देऊन पाहाणारांचे नेत्रांस व तमासबिनाचे नेत्रांस तेजस्वी करितां झाला. सर्व जवाहिरांतून एक हिरा मोठा होता. वजन पावणे आठ तोळे होते, कीं जवाहीर पारखणारास त्या हिऱ्याचे किंमतीची परीक्षा करण्यास अक्कल चालत नव्हती. रामराज यांणीं तें सर्व आणलेले जिन्नस अति आदरानें घेतले. रामराज यांणींही पादशाहाचे चित्त समाधान करण्यांत अंतर न करितां पादशाही योग्यतेचे पोशाख व पादशाहाचे योग्यतचीं वस्त्रें देऊन पादशाहाचे फार फार चित्त समाधान करिता झाला. विजयानगरवाला रामराजा ब्राह्मण व विजापूरचा पादशाहा मुसलमान होता. परंतु रामराज याचे मातुश्रीस अली आदिलशाहा आपले मातुश्रीसारिखे मानित होता. ती अली आदिलशाहा यास पुत्रवत मानित होती. यासंबंधानें रामराज यांणीं अली आदिलशाहा याचे बंधुत्वाचे नातें होय यास्तव रामराज बोलिला कीं, आपण आपले मातुश्रीची भेट घ्यावी. मातुश्रीचे मनांत आपले भेटीची इच्छा फार आहे. राणीसाहेब याजकडून विश्वासूक उत्तम चालीच्या स्त्रियांनींही येऊन विनंती केली, कीं एकांतात राहाणारी महान प्रतिव्रता व ऐश्वर्याचे व दौलतीचे महालांत राहणारी जी राणीसाहेब, कीं जी राजा अजितराय याची कन्या होती, तिणे अली आदिलशाहा याजला भाऊ मानिला होता, तिच्या कन्या आपले भटीची बहुत इच्छा ठेवितात. याजकरितां अंतःपुरांत, म्हणजे जनानख्यान्यांत, स्वारी येऊन राणीसाहब वगैरे सर्वांस भेटून संतोष करावा. त्यावरून अली आदिलशाहा यांणीं अंतःपुरांत जाऊन निर्भय व निःसंशयपणें महालांत गेला. तेव्हां राणीसाहेब यांणीं आपले कन्यांसहित व आणखी किल्येक नातलग स्त्रियांसहित पादशाहास सामो पुढें येऊन पादशाहावरून सत्का करणें करिता जवाहिरानें तबक भरून ठेविलें होतें तें पुढें आणून सत्का केला, म्हणजे पादशाहावरून ओंवाळून टाकिलें. नंतर मातुश्रीचे नात्यानीं पूर्ण आवडीनें भेटी घेऊन पादशाहास बसण्याकरितां सहस्रावधि शोभेनें गादी शोभिवंत केली होती त्या गादीवर पादशाहा याजला बसविले. पूर्ण चित्तसमाधानानें व खातरजमेनें पादशाहासी बोलण्याचा आरंभ करून वर्तमान विचारिती झाली. मनापासून पूर्ण भरंवसा देऊन व जरूरीचे समयीं इकडून साह्य होईल अशी पादशाहाची खातरजमा करून, जरूरीचे कारण पडेल ते समईं आम्हाकडून आपलें साह्य होईल असें बोलून, भारी किंमतीचे पोशाख व जवाहीर व मोतीं व जडावदार दागिने तयार केले होते ते सोन्याचे तबकांत मोतीं, लाल माणकें व पोवळीं भरून तबकासुध्धां पादशाहा

याजला नजर केली आणि निरोप दिला. पादशाहा तेथून पूर्ण संतोषानें व अति आनंदानें निघोन आपले डेऱ्यास येऊन पोंहचला. ते समई अली आदिलशाहा पादशाहा याजकडील सर्व सरदार व सेवकजन यांणीं ईश्वराचा स्तव केला, कीं हे ईश्वरा या भयंकर स्थानापासून सुरक्षित पार पडणेविषयीं हजारो संशय होते असे असतां तूं आपले कृपेनें संतोषयुक्त व सुरक्षित मुक्कामाचे जाग्यास आणोन पोंहचविलेस, असें म्हणोन पादशाहावरून सदके केले. याचकांस व गोरगरीबांस अत्यंत दानधर्म केला. भूमीवर मस्तक ठेऊन अत्यंत नम्रतेनें ईश्वरास नमस्कार घातले. यानंतर रामराज याजकडील जे जे सरदार व कारभारी व अमीर लोक व विजयानगर येथील सर्वत्र मनुष्यें जीं पादशाहास मुजरा करण्यास येत होती त्या त्या एक एक मनुष्यास आदिलशाहा याचे जवाहीर व रोख ऐवज व पोशाख बक्षिस देण्यानें ज्यास जितकें सामर्थ्यें करून ओझें उचलेल तितके नेत होते. विजयानगर येथें पादशाहाचे मुक्काम होते तोंपर्यंत नित्य याप्रमाणे चाललें होतें. पादशाहाचे बक्षिस देण्यानें दौलतदार झाला नाहीं असा पुरुष विजयानगर येथें एकही राहिला नाहीं. आदिलशाहाचा मोठा खजिना विजयानगर येथे बक्षिस देण्यांत खर्च झाला. विजयानगर येथील हरएक गल्लींत व रस्त्यांत चहूंकडे पादशाहाचे बक्षिस देण्याचे व औदार्याचे सर्वत्र वर्णन करित होते. त्यानंतर हरएक कामांत पादशाहाचे कामांत आम्ही साह्य करूं असें सर्वांनीं रामराजे यापासी कबुल केलें. ज्यासमयीं आपल्यास जरुर पडेल व कुमकेचें कारण पडेल तेव्हां आपला इषारा येतांच किंचतही अवकाश न करितां फौज घेऊन येऊन पोंहचतो व शत्रूचे पारिपत्य करीन असा रामराज याणीही करार केला. अली आदिलशाहा यांणीं निरोप घेऊन विजापूरास येता झाला. विजापूर येथें येऊन पोंहचल्यानंतर शत्रूंचे पारपत्य करण्याकरितां लढाईचे सरंजामाची तयारी व मुलूख घेणें व शत्रुचा सूड घेण्याची तयारी करिता जाहला. थोडकेच दिवसांत युध्याचे सामानाची सिध्यता करून अहमदनगरचे मालकाचे आसपासचे जागीं बंड झालें. त्या बंडावर जाऊन युध्य करणेचा संकल्प निश्चयांत आणिला. कारण कीं, अली आदिलशाहा प्रथम तक्तावर बसला त्यासमयीं हुसेन निजामशाहा यांणीं सर्वांप्रमाणे मित्रता व दोस्तीचे चालीनें मुबारकबादीचे चालीप्रमाणें वांकडेपणामुळें निरोप किंवा पत्र पाठविलें नाहीं. यास्तव व दुसरे कारण हें कीं, इमादशहा याचा मुख्य कारभारी तफावलखान याजबरोबर हुसेन निजामशाहा याणीं आदिलशाहा याचे इलाख्यांत येऊन फार खराबी केली होती. त्याचा असा इरादा होता कीं, आदिलशहा याचा एकंदर मुलुक आपले हस्तगत करावा.

४. अली आदिलशाहा याणीं रामराज यास समागमे घेऊन फौजेची तयारी करून निजामशाहा याजवर चालून जाणें व अहमदनगरचे सरहद्दींतील मुलुकाची खराबी करणें :

अली आदिलशाहा याणीं युध्ध करणे करितां वगैरे सर्व सिध्धता झाल्यानंतर गोड बोलणारा एक वकील हुसेन निजामशाहा याजकडे पाठऊन निरोप कळविला कीं, जर करितां पुरातन मित्रता व पूर्वापार दोस्ती आहे तसीच असावी अस मंजूर असल्यास सोलापूरचा किल्ला व किल्यावरील संपूर्ण पदार्थ आमचे हवाली करावे व आपले मित्रांचा उपकार वागवावा. नाहींपेक्षां तुम्ही आपलें राज्य बुडविण्याची व दुःख भोगण्याची मार्गप्रतीक्षा करित बसावें. हुसेन निजामशाहा याणीं हा भयंकर निरोप एकून घाबरून ज्या बोलण्यांत मित्रतेचा नाश व्हावा अशीं दुर्भाषणें बोलूं लागला. अली आदिलशाहा याजकडील वकिलास अपमान करून माघारा पाठवितां झाला. आदिलशाहा कांहींतरी निमित्ताची वाट पहातच होता. निजामशाहा याचें कटोर उत्तर ऐकतांच फौजेची ढाल उभी करून मुक्कामाचे जाग्यापासून निघतां झाला.[२] वर्तमान कळविणें करितां कोणी एक गृहस्थास बिजयानगर येथें पाठविला. त्यावरून रामराज कराराप्रमाणें तिळप्राय अवकाश न करितां फौज घेऊन विजापुराकडे चालता झाला. विजापुरापासून अडीच कोसांवर ज्या गावीं रामराज याणी मुकाम केला होता तेथें उभयतां पादशाहांचीं म्हणजे रामराजे याची भेटी झाली. उभयतां पादशाहा एकत्र होऊन शत्रूवर चालते झाले. आदिलशाहा व रामराज एकत्र होऊन चालून येत आहेत हें वर्तमान कळतांच निजामशाहा व तफावलखान शुध्धीवर येऊन पळून जाणेचे विचारांत पडले. तफावलखान याणीं निजामशाहाचे समागमें आदिलशाहाचे इलाख्यांत येऊन मुलुकाची खराबी केली होती. सबब तफावलखान भयाभीत होऊन आधींच पळाला व निजामशाहासही राहण्याचें धैर्य निघेना. सबब तोंड चुकऊन पळाला. तेव्हां आदिलशाहा याणीं त्याचा पाठलाग करून पाठोपाठ दौड करित होते. रामराजही आदिलशाहाचे स्वारीचे पाठीमागे चालून दौड करित होता. उभयतांचे म्हणजे रामराज व आदिलशाहा याचे, लष्कराचे स्वारसिबंदी लोक याणीं असा दिवस यावयास्तव पादशाहाचे सेवेंत वय खर्च केलें होते, तो दिवस आज आला. सबब आदिलशाहा व रामराज या उभयतांचे फौजेनीं लुटालुट व शत्रूचे फौजेवर जुलुम करणें आरंभिलें. निजामशाहा याचे सरहद्दींत चालून गेले. लुटण्याविषयीं कोणत्याही प्रकारे तिळप्राय अंतर करित नव्हते. रामराज यास येथपर्यंत गर्व व अभिमान झाला होता कीं

२. हा प्रसंग ९६६ हि. (१५५८–५९ इ. स.) तील आहे.– ब्रि. फि. ३, पृ. १२०.

आदिलशाहा याची स्वारी पुढे होती, तेव्हां ज्या ठिकाणीं पाणी व हवा चांगली दिसेल तेथेंच आदिलशाहाकडील स्वारीचे लष्कर उतरावयाची जागा कायम करित होते. छते व पडदे देऊन बाड लावीत होते. रामराज याजकडील कामदार पाठीमागून येऊन पोंहचून आदिलशाहाचें लष्कर उतरलें असेल तीच जागा रामराज यास उतरावयास पाहिजे म्हणोन जबरदस्तीनें आदिलशाहाचे डेरे तेथून काढून उपटून तेथें रामराज याचे लष्कराचे डेरे ठोकून बाड लावित होते. असेंच एकें दिवशीं असें झालें कीं, आदिलशाहाचे लष्कराचे डेरे तीन वेळा मुक्कामाचे जाग्यावरून उपटून रामराज याजकडील डेरे उभे करित होते. आदिलशाहा प्रसंग जाणून मसलतीकरितां निरुपाय होऊन ही गोष्ट सहन करित होता. रामराज याचा संकल्प एवढाच होता असें नाहीं. बहुधा आदिलशाहा याचा संपूर्ण मुलुख व राज्य देखील हस्तगत करावें असा होता. पहात होता कीं, आपलेविषयीं यवन लोकांचे अंतःकरणांत जरब कोठपर्यंत प्रवेशली आहे. हरएकप्रकारें याच कारणास्तव निजामशाहा याचे मुलकांत लूट करित पुढें पुढें जात होते. निजामशाहा याजला अहमदनगर येथें राहण्याचा धैर्य निघेना. सबब दौलताबादेकडे जाण्याचा मार्ग धरिला. एके किल्यावर चढून तेथें बंदोबस्तानीं राहिला. रामराज याणीं दौलताबादेपर्यंत लुटणें व नाना प्रकारची खराबी केली. या राजधानींतील उभे व आडवे बाजूंत कोणतींच गांवें खेडीं सुरक्षित राहूं दिलीं नाहींत. अहमदनगरचीही संपूर्ण जिराईत व बागाईत धुळदशांत मिळविली. घराच्या मोठमोठ्या इमारती संपूर्ण मोडून टाकिल्या. संपूर्ण लहान घरांस आग लावली. तेथील दौलतदारांचे मोठमोठ वाडे उखडून जिन्नस कापसासुध्धां वगैरे एकंदर सामान सरंजाम विजापूरास आणिला. शेवटीं निजामशाहा याणीं आदिलशाहा याजशीं सख्य केलें. कल्याण म्हणोन गांव होता त्या गांवची आस्था सोडून, म्हणजे कल्याण हा गांव आदिलशाहास देऊन, युध्ध करणें सोडिलें.[३] यानंतर तीन च्यार महिन्यांत मुलकाची खराबी व पृथ्वीचा नाश येथपर्यंत झाला होता तेव्हां आदिलशाहा याणीं रामराज यास परत जाणेचा बोध करून आदिलशाहाकडील मंडळी व हरएक मनुष्यें विजापुरास येऊन पोंहचले.

### ५. आदिलशाहा याणीं पुनः दुसरे वेळ रामराज व आपण एकत्र होऊन फौज घेऊन निजामशाहा यावर चालून जाणें व शहादुर्गाचा किल्ला बांधण :

हें मोठें प्रकरण झाल्यानंतर निजामशाहा याणीं मनांत पश्चाताप पावून समजुतीवर घेतलें. दुसरे वर्षी कुतुबशाहासीं सख्य केलें. मित्रता मजबूत होण्या-

३. हे ९७१ हिजरींत (१५६३–६४ इ. स. त) घडलें.– मु. घो. ध. ब., पृ. १९९.

करितां आप्तविषयींपणाचेंही नात्यास संनिधपणाचें नातें लावितां झाला. आपली कन्या जमाल बिबी ईजला ईब्राहीम कुतुबशाहा याजला देऊन, लग्न करून, नातें बापलेंकाचें प्रीतीसारिखें जोडिलें. दुसरे वर्षी कुतुबशाहा व इमादुल्मुल्क यांस घेऊन अली आदिलशाहा याचे इलाख्याकडे चालूं होऊन कल्याण या शहरावर घेरा देऊन हल्ला केला. आदिलशाहा यास उभयतां शत्रूनीं दंगा आरंभिल्याचें वर्तमान कळलें. तेव्हां रामराज याजकडून साह्य इछिता झाला. एक संभाविता मनुष्य रामराज याजकडे पाठवून, यासमयीं आपण साह्य करावें म्हणोन कळवितां झाला. रामराज याजला लोकांस लुटावयाचा व जबरदस्तीनें लोकांचे मुलुक घेण्याचा स्वभाव लागलाच होता. मुसलमान लोकांस पीडा करणेंविषयीं निमित्त पहातच होता. यास्तव तेचसमयीं ही गोष्ट कबूल करून दोन लाख पायदळ सिबंदी व पन्नास हजार स्वार घेऊन निघोन आदिलशाहा याचे स्वारींत येऊन मिळोन उभयतां फौजेसुध्धां पुढें चालू झाले. शत्रूचे लष्करापुढें एक दोन कोसांचे अंतरावर उतरले. यद्यपि उभयतांमध्यें परस्पर युध्ध होत होतें परंतु रामराज याणें आंतून निजामशाहाशीं सख्य करून मित्रता ठेऊन युध्धाचे कामांत ढिलाई करित होता. यांतील तात्पर्य त्याचें हें होतें कीं, निजामशाहा याशीं सख्य व्हावें. त्या गोष्टीचे पोटीं आपला उपयोग करून घ्यावा असें पहात होता. आदिलशाहा रामराज याचे या चालीवरून व युध्धार्थ ढिलाई करण्यावरून चिंताग्रस्त झाला, कीं रामराजच जर करितां शत्रूचें साह्य करितो तर शत्रूचा पराभव कसा होईल! यांत आपले कामाची खराबी आहे. यास्तव रामराज याचे साह्याची व मदतीची आस्था सोडून ईश्वराचे कृपेवर भरंवसा ठेऊन आपले जमातीसहित शस्त्रानिशीं सिध्ध होऊन जातीनेंच निजामशाहाचे फौजेवर चालून गेला. धैर्य धरून शस्त्राग्नि प्रदिप्त केला. अति शौर्य व पराक्रम केला. पूर्वी कुतुबशाहा याणीं आदिलशाहा याचे भारी वजन समजून आदिलशाहा याचा पक्ष सोडिला नाहीं. निजामशाहा याचे संगतीपासून आपण जातीनें एकीकडे राहिला होता. निजामशाहा फौजेसुध्धां आदिलशाहावर चालून जाऊन आदिलशाहा याशीं कित्येक वेळेस मजबूत लढाया केल्या. शेवटीं रामराज यासमयीं साह्य करणार नाहीं अशा संशयानें निजामशाहा याचें धैर्य सुटलें. युध्धांतून एकटाच पळाला. आदिलशाहा याणीं अत्यंत पराक्रम करून निजामशाहा याजवर कठीण समय आणिला. असा कीं, निजामशाहा याणीं आपला प्राण वांचला हाच अलभ्य लाभ जाहाला असें जाणिलें. आपले लष्करांतील सामान सरंजामाची आस्था सोडून बाहेर पळून गेला. तेव्हां हत्ती, घोडे वगैरे बहुत धन–दौलत, सामानसरंजाम, पादशाही जरीपटका व निशाणें, चौघडे, माहीमरातब व खास निशाण हिरवें रंगाचें, कीं जे गुजराथचे पादशाहानीं दिलें होतें तें, व निजामशाहा यास राज्याधिकाराचे सामानसरंजाम होते ते सर्व आदिल-

शाहा याचे हातीं लागले. अली आदिलशाहा यशस्वी व विजयी झाला. त्या तारिखे-पासून आदिलशाहा यांणीं आपलीं निशाणें हिरवे रंगाचीं केलीं. यापूर्वी आदिलशाहा याची पिवळीं निशाणें होतीं. यानंतर आदिलशाहा यांणीं रामराज याजला परत जाण्याविषयीं सांगून निरोप देऊन अली आदिलशाहा सोलापूरचे हद्दींत येऊन पोंहचला. मसलतीचे कारणास्तव सोलापूरचा किल्ला हस्तगत करणें पाठीवर टाकून आणखी केव्हां तरी किल्ला घेतां येईल असें ठरवून किल्यावर हल्ला केला नाहीं. याजकरितां कीं, यासमयीं किल्ला घेऊन यशस्वी व्हावें तर, कदाचित न जाणो रामराज याजला गर्व व अभिमान बहुत झाला होतो यास्तव, रामराज किल्ला हस्तगत करील. यामुळें तो किल्ला घेणें पाठीवर टाकिलें. परंतु त्यासमयीं रामराज याजला कळऊन ज्या महालामध्य नलदुर्ग म्हणोन पुरातन किल्ला, पूर्वींचे राजांपर्की एका राजानें बांधिला होता व त्या किल्ल्याचे इमारतीची फार पडापड झाली होती तो किल्ला, पुनः धोंडे व चुना घालून, पाया भरून आणून, पूर्ण मजबूत बांधून त्या किल्याचें शाहदुर्ग असें नांव टेविलें. त्या किल्ल्यावर लढाऊ मनुष्यें व सरंजाम दारूगोळी वगैरे बहुत भरून आदिलशाहा आपण विजापुरास येता झाला. रामराज यांणींही कूच करून परत जाते वेळेस मुसलमान पादशाहाचे इलाख्यांतील मुसलमान व हिंदु लोकांच्या जागा जबरदस्तीनें हस्तगत करून कित्येक जागा आपलेकडील लोकांस दिल्या. आपला भाऊ व्यंकटाद्रि याजला थोडीसी फौज देऊन मुसलमान लोकांचे गांव लुटावयाकरितां श्रीकृष्णातीरी टेविला आणि आपण विजयानगरास जाता झाला. आदिलशाहा यांणीं त्याच वर्षी गिष्वरखान याच्या बागेंत, कीं ज्या बागेमध्यें प्रथमचे दिवशीं उतरला होता तेथेंच, मुक्काम करून शहरचे व आसपासचे लोकांकडून नजरा व सत्के करून घेता झाला. त्या जाग्यावर गांव वसविता झाला. त्या गांवाचे नांव शाहापूर असें ठेविलें. थोडकेच दिवसांत त्या कीर्तिमान पुरुषाचे, म्हणजे अली आदिलशाहा याचे, यत्नें करून त्या गांवची इतकी वसाहात झाली कीं, तें गांव एक मोठें शहराप्रमाणेंच जाहाले. असें म्हणतात कीं, दुसरे सुलतान इब्राहीम याचे कारकीर्दीत शाहापूरची खानेसुमारी केली होती. ९,००,००० नऊ लक्ष घरें मोजणीस लागलीं होतीं.

## ६. रामराज यांणीं गर्दी करणें व मुसलमान पादशाहा यांणीं त्याचे वाईट वागणुकीस्तव निवारण करणें :

रामराज याजला फिरावून याजप्रमाणें सामान सरंजाम नसतां पादशाहाशीं बदलून गर्व व अभिमान फार झाला व गर्वाची हवा व अभिमानाची संतप्तता त्याचे

धातुस्थानीं म्हणजे मस्तकांत भरली. मीच एक शूर आहे, मजपरता कोणीच नाहीं असा संकल्प त्याचे मनांत आला. फिराबून म्हणोन महागर्विष्ट व अति अभिमानी झाला होता. त्याणी अंतकाळपर्यंत गर्वांतच दिवस घालविले. बुडते वेळेस मात्र ईश्वरास करुणा भाकिली. तेव्हां ईश्वरानें आपले क्रोधाचे चाबूकानें त्याचें पारपत्य करून एक नेत्राचे पातें लेवतें न लवतें इतक्या अवकाशांत त्याच्या गर्वाचा पर्वत पिंजलेले कापसाप्रमाणें करून मुसलमान लोकांचे धर्माची प्रबळता प्रसिध्द केली. त्या फिराबूनाप्रमाणें रामराज यालाही अभिमान झाला. या सारांशांतील तात्पर्य हें आहे कीं, रामराज हा मूळचा बिजयानगर येथील राजेलोकांचे चाकरलोकांपैकीं होता. थोडकेच दिवसांत कालचक्राचे व दैवयोगाचे साह्यानीं कोणाचे वसिल्याशियाय, व कोणी मना करणारा नसतां, निर्भयपणें बिजयानगरचे तक्तावर बसला. बिजयानगरचे मुलकाचा प्रबल पादशाहा झाला. बिजयानगर हें मोठें शहर होतें. वस्तीही बहुत आबादान होती, कीं बिजयानगर इलाख्यांत शहरें, पुरें व तर्फेतर्फेचे गांव इतके होते कीं, एक हजार कोसपर्यंत बिजयानगरचे इलाख्याच वसाहतीची लांबीरुंदी होती, कीं कित्येक पर्वत व कित्येक समुद्राच्या खाड्या वस्तींत आल्या होत्या. बिजयानगरचे ताब्यांतही कित्येक मुलक विस्तीर्ण होता. असें म्हणण्यांतहि आहे कीं, साठ बंदरे, कित्येक किल्ले, व कित्येक सोन्याच्या, हिऱ्यांच्या व पाचेच्या खाणी बिजयानगरचे तालुक्यांत होत्या. मोठे किंमतीचेही बहुत जिन्नस या मुलकांत उत्पन्न होत होते. बिजयानगरचे एकंदर मुलकाचा वसूल वीस कोटी होन येत होता. हमेषा नित्य चार लक्ष स्वार व नऊ लक्ष सिबंदी वाड्यापुढें तयार होऊन उभी राहात होती. ज्या समयीं दक्षणचे सर्व हद्दींतील जागा एका मुसलमानाचे दीपेंकरून उज्वलित होती, म्हणजे हीच एक बाहामनी पादशाहाची मात्र राजधानी होती. हमेषा बाहामनी पादशाहा लोक ईश्वराचे कृपेंकरून हिंदु पादशाहासीं युध्द करित होते. तेव्हां मुसलमान पादशाहा बहुत करून यश पावत होते. केव्हां शिकस्तहि होत होती. परंतु स्थिरता नव्हती. त्यानंतर बाहामनी पादशाहाची दौलत खराबींत आली. बहुत पादशाहा झाले. एका अधिकारावर पाच सहा पादशाहा दक्षण देशांत उठले. हमेषा आपआपणांत कज्या व युध्दप्रसंग करित होते. परस्परे एकमेकांची खराबी करणेविषयीं यत्न करित होते. आपला उपाय व हित दुसऱ्याचे घातांत पाहात होते. या मुसलमान पादशाहा लोकांस निरूपाय झाला तेव्हां शत्रू पराभव होण्याकरितां रामराजाशीं सख्य करणें व रामराज याजकडून साह्य इछिणें प्राप्त झालें. याप्रकारें रामराज याचे बदमस्तीचे व गर्वाचे साहित्याची सिध्दता जाहाली, कीं जेव्हां आदिलशाहा याचे साह्य करित होता तेव्हां दुसरे किल्येकांवर याच मुलुकांत फौज घेऊन चालून जात होता. मुसलमानास उपद्रव करणार नाहीं व मसिदी मोडणार नाहीं असा अली आदिलशाहासी

करार ठरला असतां, व मसिदी मोडूं नयेत व मुसलमानांस उपद्रव करूं नये व कुरान परिफची अमर्यादा होऊं नये अशी पादशाहाची मनाई असतां, मसिदी पाडित होता व कुरान परीफची फार अमर्यादा करित होता. परत जातेसमयीं हजारो माणसें हिंदु व मुसलमान जातीपैकीं परमुलुकांतील कैद करून नेत होता. अली आदिलशाहा याचे इलाख्यांतील गांव दांडगेपणानें व जबरदस्तीनें घेऊन आपले आप्तविषयांस देत होता. खास या दुसरे वेळचे प्रवासांत आदिलशाहा याचे साह्यार्थी निमित्त करून अहमदनगरापर्यंत प्रवेश करून दौलताबाद व जुन्नरपर्यंत मुसलमानांची खराबी व पायमाली केली होती. रामराज यास फारच गर्व व अभिमान झाला. त्याची मिजानजी निखालस बदलली. पहिले स्वभाव होते ते निखालास सोडले. पांच पादशाहाचे पांच वकील रामराज याजपासीं हमेशा हुजूर राहात होते. पूर्वी त्या वकिलांशीं रामराज सख्य ठेवित होता, मेहेरबानगी व लोभ करित होता, एकांतांत बोलावित होता व त्यांसीं संतोषानें भाषण करित होता. ती चाल एकंदर सोडून केव्हां केव्हां त्या वकिलांस दरबारांत येऊं देत होता व त्यांशीं क्रोधानें व शत्रुत्वानें भाषण करित होता. नित्यचा दस्तुर सोडून फार वेळ उभे करून नंतर बसण्याविषयीं हुकूम देत होता. स्वारी निघाली म्हणजे स्वारीपुढें त्या वकिलांचा चालण्याचा पाठ होता. त्याप्रमाणें ते वकील तयार होऊन जिलेबींत चालण्याविषयीं आले असतां पुढें चालण्यास लौकर हुकूम देत नव्हता. मुसलमान लोक रामराज यास दृष्टीस केवळ नीच व असमर्थ दिसत होते. या मुसलमान लोकांपासून निर्भय व निःसंशय होऊन गर्वाचे व मीच एक थोर असें जाणण्याचे मद्यानीं धुंद होऊन या सर्व अयोग्य वर्तणुकीचा व अमर्यादेचे उत्पत्तिस्थान होत होता. अली आदिल-शाहा यांणीं यद्यपि रामराज यासीं मित्रतेनें वागणुकीचे व सख्यत्वाचे करार असे मजबूत केले होते, कीं दुसऱ्या कोणते मुसलमान पादशाहाचे हातून व्हावयाचे नाहीं, परंतु रामराज याचे हल्लीचे गर्वावरून व अपवित्र चालीवरून अली आदिलशाहा त्रास पावून फार कंटाळला व क्रोधायमान होऊन व मुसलमानीचे अभिमानानें संतप्त होत होता. धर्माचें व पृथ्वीचें कल्याण व्हावयाचें नाहीं असें जाणित होता. यास्तव रामराज याचा फडशा करण्याशिवाय दुसरें इछित नव्हता, म्हणजे रामराज याचा नाश झाल्यावांचून धर्मस्थापना व पृथ्वी संरक्षण व्हावयाचें नाहीं असें जाणित होता. यास्तव मसलतगार पुरुष व खरे मित्रतेचे पुरुषास पुसले आणि बोलिला कीं, आधीं दुर्बुध्धीवान अधर्मी हिंदु लोकांशीं युध्ध करणें मुसल-मान लोकांस योग्य आहे. यास्तव धर्मस्थापक मुसलमान पादशाहास तर हिंदु लोकांचे पारपत्य करणें विहितच आहे. व्यवहार दृष्टीनेंही पहातां हा अधर्मी पुरुष गर्वाचे व अभिमानाचे मद्यपानानें धुंद झालेला, म्हणजे रामराज पुढें मोका-वल्यास आला नाहीं तोंच, त्याचे मस्तकाचे प्यालयापासून गर्वाची धुंदी उतरावी,

म्हणजे रामराज यास ठार मारावा. नाहीं पेक्षां मुसलमान लोकांचे वाचणें व राज्याचा बंदोबस्त कदापि व्हावयाचा नाहीं. याजकरितां आमचे श्रेष्ठ धैर्य त्या संकल्पावर आलें आहे. आमचे हिमतीनें हा सत्य संकल्प केला आहे कीं, ईश्वराचे आधाराचा कमरबंद कमरेस मजबूत बांधून या अधर्म व जीवें मारण्यायोग्य पुरुषासी, म्हणजे रामराज यासी, युध्द करावे व रणभूमीचें युध्दफल पावावें. जर करितां ईश्वराचे कृपेकरून आम्हांस यश आल्यास मुसलमान लोकांचे धर्मास तेज वाढविणारा होईन. सर्व मुसलमान लोकांस या कपटी पुरुषाचे दुष्ट व पीडक युध्दापासून सोडवीन. जरकरितां कार्यभाव विपरित झाल्यास स्वतः रणभूमींत युध्दपराक्रमांत मरण पावून स्वर्गांतील यशस्वी पुरुषांतील मी एक यशस्वी पुरुष होईन. दोनीकडूनही उत्तमपणाच आहे. त्यांतून कोणते तरी एक प्राप्त होईल. तुम्ही दौलतीचें कल्याण इछिणारच आहांत. तेव्हां येविषयीं तुमचे विचारास कसें येतें? असे विचारलें. तेव्हां गीष्वरखान लारी व अबुदुराब सिराजी हे उभयताहि दौलतींतील पूर्ण विश्वासू चाकर व दौलतीचे कल्याण इछक सेवक होते. त्याणीं विनंती केली कीं, रामराज हा मोठा दौलतदार व श्रेष्ट ऐश्वर्यवान आहे. कारण कीं, रामराज याजपासीं बहुत फौज व सिबंदीही अत्यंत व खजिना भारी आहे. रामराज याचा मोठा धाक पृथ्वीस आहे. यास्तव संपूर्ण सरदारांचे मदतीशिवाय त्याशीं युध्द करणेचे संकल्पांत कांहीं उपयोग नाहीं. त्याशिवाय आपणच जातीनें चालून जाऊन त्याशीं युध्द करणें हे मरणमूळ आहे. तें बरें आहे कीं, आधीं आपआपणांत सरदार लोक जमवून घ्यावेत. नंतर युध्दाचा संकल्प करावा. आदिलशाहा याजला ही अक्कलेची गोष्ट पसंत आली. आणि हें त्यांचें बोलणें मान्य केलें. परंतु निजामशाहा याचे अंतःकरण आदिलशाहापासून दुःख पावलें होतें. यामुळें निजामशाहा कपट वागवित होता. त्या मसलतीचे विचारांत होता. जमावांत उत्तमपणा हा कीं, कुतुबशाहा विजयानगरवाले हिंदूचे म्हणजे रामराज याचे संनिधानाचे कारणामुळें उपद्रवानें फार त्रास पावून सर्वदा मनांत जळत होता. संताप पावत होता. हें ईश्वरापासीं सर्वकाल मागणें मागत होता, म्हणजे हे ईश्वरा रामराज याचा घात कधीं करशील, अशी प्रार्थना करित होता. निजामशाहाहि युध्द प्रसंगांत वारंवार अपजय पावून शिकस्त होऊन निजामशाहाचा माल व मुलुक लुटला गेला होता. हत्ती, घोडे, निशाणें, छकडे व राजधानीचें संपूर्ण सामान शत्रूंचे हातीं घालवून नंतर चिंताग्रस्त व क्रोधायमान रहात होता. संतापानें आपले हाताचीं मनगटें व बोटें चावित होता. येविषयींचा सूड घ्यावा यदर्थी कसी मसलत करावी असा विचार करित होता. तेव्हां जाणिलें कीं, आदिलशाहा याचे प्राबल्य रामराज याचे पाठबळावर व आश्रयावर आहे. रामराज मध्यभागीं आहे तोंपर्यंत आपला मनोरथ पूर्ण होणें सर्वोपरि कठीण

आहे. आधीं रामराज याचा फडशा करण्याचा विचार केला पाहिजे. नंतर जेव्हां आदिलशाहाचें पाठबळ नाहींसें होईल तेव्हां हरएक प्रकारें आदिलशाहा याचा सूड घ्यावा. हेंहि जाणत होता कीं, रामराज याचा नाश करणें आदिलशाहा याचे आश्रयाशिवाय व्हावयाचें नाहीं. असें जाणून, निरुपाय होऊन, आदिलशाहा यासीं सख्य करिता झाला. त्यासीं अत्यंत मित्रतेचा भाव दाखऊन कुतुबशाहा यासीं मिळाला. अक्कलवान वकील लोक आदिलशाहा याजकडे पाठविले आणि सख्य करविलें. सोलापूरचे किल्ल्याकरिता उभयतांमध्यें भांडण व युध्द होत होतें. त्या किल्ल्याची किल्ली पाठऊन निरोप पाठविला कीं, यवन लोकांस, कीं जे यवन लोक ईश्वराचे आधारावर व पैगंबराचे आश्रयावर व बारा इमाम याचे आधारावर परिणामाचे दिवसीं म्हणजे अंतकाळीं परलोकीं योग्यता पावतात त्यांस योग्य आहे कीं, वैर व शत्रुत्व परस्परें पृथ्वींतील कित्येक कामांकरितां एकमेकांत अंतर आणणारें होतें. त संपूर्ण दूर करून मित्रता व साफ दिली धारण करून, एकमेकांत मिळून शत्रु शस्त्रधारी हिंदु लोक, कीं जे प्रपंच व परमार्थाचे शत्रु आहेत, त्यांचा नाश करून त्यांचा गर्व व अभिमान दूर करावा. संपूर्ण मुसलमानांस हिंदु लोकांचे उपद्रवापासून निर्भय करावें, म्हणजे बहुधा करण्यांत या पृथ्वींत कीर्ति परलोकीं उत्तम फल प्राप्त होईल. या उत्तम कार्याचें फल बहुत दिवस या लोकीं कायम राहील. आश्रय मागतों ईश्वरापासीं. कारण कीं, प्रपंच व परमार्थाची सल्ला न ऐकल्यास आपलीच अपकीर्ति व बदनामी होईल. त्या दुष्ट व अयोग्य पुरुषापासून आपली जबरदस्ती व खराबी पत्करावी लागेल. प्रत्यक्ष धर्माचें नुकसान व परलोकीं अकल्याणकारक कर्म असून, थोडकेच दिवसांत सत्य आहे कीं, तो अधर्मी व कपटी पुरुष, म्हणजे रामराज, हा हळुहळू तुम्हां व आम्हांपैकीं हरएकास आपले हाताखालीं आणून, हस्तगत करून, आकाशावर जबरदस्तीचा व अधर्माचा झेंडा उभा करील. एकाहि मुसलमानास दक्षणेंत कांहीं साहित्य बाळगून राहूं देणार नाहीं. आदिलशाहा यानीं ही मनांतील गोष्ट ऐकली. तेव्हां या करण्यांत आपले मनोरथ पूर्ण होतील असें समजला आणि ही गोष्ट कबूल केली. प्रतिज्ञा व शर्ती बळकट केल्या. या प्रतिज्ञा सिध्धीस जाण्याकरितां व मजबूत होण्याकरितां मित्रतेमध्यें शरीरसंबंधाचा संबंध उभयतांमध्यें आरंभिला. तेव्हां उभयतांचे रजामंदीनें, म्हणजे स्वसंतोषें, व उभयतांचे विचारानें निजामशाहा याची कन्या चांदबिबी सुलतान ही आदिलशाहा यास व बिबी हदिया सुलतान, कीं जी आदिलशाहा याची बहीण ती निजामशाहा याचा पुत्र शाहाजादा मूर्तजा यास देण्याचा करार ठरला. रामराज याचा नाश करण्याचे कामाचा करार त्या गोष्टीवर ठरला कीं, लग्नसमारंभाचे कार्यांतून फुरसत झाल्यानंतर, उभयतांकडील लग्नसमारंभ झाल्यावर, एकमेकांचे साह्यानीं चांगले साहित्य सामान लढाईचे घेऊन दौलतीचें निशाण युध्दार्थी बिजयानगरावर उभे करितां येईल.

## ७. अली आदिलशाहा याचें लग्न चांदबिबी सुलतान ईशीं व बिबी हदिया सुलतान ईचें लग्न शाहाजादा मूर्तजा निजामशाहा याचा पुत्र यासी होणें :

निरंतर उभयतांकडहि संतोषाचे व आनंदाचे साहित्याची तयारी होऊं लागली. एकाच तिथीस विजापूर व अहमदनगर येथील आरास तयारी व उभयता राजधानीची सिध्धता झाली. दोन्हीही शहराचे दरवाजे, भिंती, रस्ते व बाजाराची जागा इंद्रभुवनासारखी तयार झाली. हरएक लहान मोठे गृहस्थ, तरूण वयाचे व वृध्ध, इकडील तिकडील संतोष पावोन लग्न समारंभ आहे याजकरितां खजिन्याची व जामदारखान्याची कुलुपें उघडून जवाहीर, दागिने व पोशाख सर्वांत शोभिवत दिसण्याकरितां आंगावर घालिते झाले. हरएक गल्लींत व रस्त्यांत लग्नाचा गलबला व संतोषाचा ध्वनि आकाशापर्यंत पोंहचला. नाचणारे कलावंतीणींचे ताफे सुस्वर वाद्यांचे जागोजाग व घरोघर उभे राहून नाच होऊं लागले. सुस्वर गाणें गायन करणारे गवईलोक याणीं हरएक वाड्यांत व माडीवर गायन करून मनरंजन करित होते. गायन अशा प्रकारचें करित होते कीं, त्या गायनानें गायनसमर्थां वाहते पाण्याची व उडते पक्षाची गती स्तब्ध केली. खाशा मजलसींत व श्रेष्ठ सभेंतील बिछाइतीवर मोतीं व जवाहीर बहुत ओतीत होते. हरएक खासे व सर्वत्र लोक कचेरींत जवाहीर व मोतीं ओतीत होते. त्याचा विस्तार किती लिहावा ? कारण कीं, सभेचे आरासीची शोभा सविस्तर लिहिण्यापासून लेखणी थकित आहे. कचेरींत जवाहीर व मोतीं ओतण्याचे वर्णन करण्यापासून जिव्हा थकित आहे. भारी लग्नसमारंभ झाला. तो लग्न समारंभ तीन महिनेपर्यंत कचेऱ्या वगैरे सारखा थाट झाला. लग्नसमारंभ झाल्यानंतर उभयता नोवऱ्या मुलींस जिकडील तिकडे सारख्या पाठविते झाले. चांदबिबी सुलतान ही नोवरी दैवबान व पादशाहाची स्त्री राणी होऊन विजापूर शहरचें अधिपत्य पावती झाली. बिबी हदिया सुलतान श्रेष्ठत्वास पावोन अहमदनगर येथील अधिपत्य पावती झाली. लग्न समारंभांतून फुरसत झाली तेव्हां शत्रूवर चालून जाऊन युध्ध करण्याचा करार ठरला होता. त्याप्रमाणें युध्धाचे सामानाची थोडकेच दिवसांत तयारी केली. जशी सिध्धता असावी तसा सामानसरंजाम तयार करून युध्धार्थी सिध्ध झाले. युध्धाचे मोकदम्याचे व राज्य हस्तगत करण्याचे आरंभीं बोलण्याचा करार असा ठरला कीं, प्रथम या कामाचा आरंभ करणारा व या कामाची सांखळी हालविणारा रणभूमींतील पंचानन, युध्धाचे अरण्यांतील व्याघ्र, नवग्रहापैकीं मंगलाचे स्वभावाचा युध्धाचे मैदानांतील शूर, पराक्रमवान व बाहादूर अली आदिलशाहा याणीं व्हाव, म्हणजे लढाईस आधीं अली आदिलशाहा याणीं पुढे व्हावें. त्यावरून त्या रूस्तुमासारखे दबदबेदार, म्हणजे प्रखर व सुवराव म्हणोन पादशाहा मोठा जरबदार व महा बळवान झाला. त्यासारखा, सामर्थ्यवान पादशाहा याणीं,

म्हणजे आदिलशाहा यार्णी, मिष्ट भाषण व मृदु वाक्य बोलणारा वकील याजला रामराज याजकडे पाठविला. निरोप सांगितला कीं, मुदगलचा व रायचूरचा किल्ला, कीं हे दोन्ही किल्ले जबरदस्तीनें रामराज याचे हातीं गेले आहेत ते, त्यार्णी परत द्यावे. त्या दोन किल्ल्यांचा इरादा सोडावा व मित्रता धारण करून रहावें. नाहींपेक्षां युध्धास सिध्ध व्हावें. हा कठीण निरोप गर्विष्ठतेचे मद्याचे त्या बदमस्तानें म्हणजे मदिरामदांधानें म्हणजे रामराज यार्णी ऐकिला आणि अत्यंत क्रोधायमान होऊन क्रोधयुक्त हास्य केलें. त्याचे उत्तरार्थी या बैतेंतील तात्पर्यार्थ बोलतां झाला : " मजला हालऊं नको, जोंपर्यंत पृथ्वी हालणार नाहीं " : यांतील भावार्थ हा आहे कीं, मजला हलविलें असतां सर्व पृथ्वी हलेल. " हेंच सांगतो तुला, पुनः हेंच सांगतो तुला : १ : " असें बोलून वकील याजला त्याच घटिकेस प्राणदानाचा उपकार करून, म्हणजे जिवें न मारितां, बाहेर घालऊन दिला. तेव्हां मुसलमान व पादशाहा लोकांचे जितके वकील हमेषा हुजूर दरबारांत राहात होते त्यांजलाही घालऊन देण्याचा हुकुम दिला.

## ८. आदिलशाहा, हुसेन निजामशाहा, इब्राहिम कुतुबशाहा व अली बरीद यार्णी एकत्र होऊन बिजयानगरावर फौज घेऊन जाणें, यार्णी रामराज याशीं युध्ध करणें व रामराज याची शिकस्त होऊन सर्वांनीं फतेहमंद होणें, म्हणजे विजई होणें :

बिजयानगर येथून नवीन गेलेला वकील व तेथें राहत होते ते असे एकंदर वकील निघून आल्यानंतर हुसेन निजामशाहा व इब्राहिम कुतुबशाहा व अली बरीद बहुत फौज व लढाईचें सामान साहित्य भारी घेऊन आपले राजधानीचे स्थानापासून निघून विजापुराकडे चालू झाले. या कामांत बुरहान इमादुल्मुल्क याचे निजामशाहा यासी वांकडे होतें. या कारणास्तव त्याचे संगतींत मिळाला नाहीं. युध्ध करण्याचे फळापासून दैवहीन राहिला. जेव्हां तिन्हीही पादशाहांचे फौजेनें आदिलशाहाचे तालुक्यांत पाय ठेविला आणि तालीकोटचे आसपास डेरे ठोकले आणि उतरले तेव्हां आदिलशाहाकडून पादशाही योग्यतेनुरूप मेजवानीचें सामान, खाण्याचे पदाथ नाना प्रकारचे, प्राशन करण्याचे पदार्थ अनेक तऱ्हेचे, तऱ्हेतऱ्हेचीं फळें, मेवामिठाई, तरतऱ्हेचे उत्तम पदार्थ पाठवावयायोग्य, मिठाई, हलवा, वगैरे बहुत प्रकारचे, जेवणाचे बहुत प्रकारचे पदार्थ, प्राशनाचे कित्येक जिनस, सुगंधी पुष्पें नाना प्रकारचीं, अत्तर गुलाब वगैरे गंधी सामान तऱ्हेतऱ्हेचे पाठविण्यांत आलें. येथपर्यंत मेजवानीचे सामानाची गर्दी

करून दिली कीं, जवाहिरांचीं व द्रव्याचीं तबकेच्यातबकें बिछायतीवर सोडलीं होतीं तीं कचेरी झाली, म्हणजे लोकानीं भरभरून नेलीं. त्या मेजवानीचे समारंभांत एक देखील मनुष्यांपैकीं चुकून राहिला असें झालें नाहीं. सर्वांस सारखा मेजवानीचा थाट जाहला. चौघेही मुसलमान पादशाहाची भेटी झाल्यानंतर उत्तम प्रकारचे चालीनें व उत्तम प्रकारचे मार्गानें तेथें राहाते झाले. परस्परें साह्याचे करारमदार झालेच होते. परंतु पुनः आणखी युद्धप्रसंगी ठरून कायम राहावे यदर्थी करार व प्रतिज्ञा समक्ष ठरण्यांत आणिल्या. हरएक मुसलमान पादशाहानीं आपआपले सरहद्दींत आज्ञापत्रें पाठविलीं कीं, हरएक तर्फेतून सरबराईचें सामान, गल्ला, सरपण, कडबा व भाजी वगैरे सरंजाम जो लागेल तो बिनीवाल्याकडे रूजु होऊन हरएक पादशाहाचे लष्करचे बिनीपुढें बाजार भरावा. असे हुकुम रवाना करून तेथून लष्करची यशस्वी ढाल उचलून बिजयानगराकडे चालू झाले.[४] जव्हां चौघेही पादशाहा फौजेसुद्धां एकत्र होऊन कूच करून इकडे युध्धार्थी येतात असें वर्तमान रामराज यास कळलें तेव्हां कदापि लीनता धारण न करितां व चित्तांत किंचितही भय न धरितां आपले गर्विष्ठपणाचे व बदमस्तीचे चालीवरच हट्ट करणारा होऊन राहिला. लढाईचे सामानाची व फौज जमविण्याची तयारी केली आणि प्रथम आपले बंधुस २०,००० वीस हजार लढाऊ स्वार व १,००,००० लक्ष पायदळ सिबंदी लोक, बरकंदाज, पर्वतासारखे दिग्गज ५०० पांचशें हत्ती समागमें देऊन लढाईस रवाना केले. त्याचे पाठीमागून आपले दुसरे बंधूस चाळीस हजार स्वार व दोन लाख सिबंदी लोक, बरकंदाज व एक हजार हत्ती पर्वतासारखे समागमें देऊन रवाना केले. आज्ञा केली कीं, मुसलमान लोकांची फौज येऊन पोंहचण्याचे पुर्वी श्रीकृष्णेच्या कांठीं जाऊन पोंहचून उताराच्या वाटा बंद कराव्या. मुसलमानांचे फौजेस नदी उतरून यावयाचें सामर्थ्य न होय, अशी बंदी करावी. अशी आज्ञा करून त्यानंतर पाठीमागून रामराज आपण जातीनें भारी लष्कर व फौज लढाऊ टोळधाडीसारखी असंख्य घेऊन, आपले करनाटक सरहद्दींतील जमेदार लोकांसहित एक लाख स्वार, पांच लाख सिबंदी लोक बरकंदाज व तिरंदाज घेऊन युध्धास चालू झाला. फौजसुध्धां पुत्र दोन व आपण असे फौजेच्या तीन तुकड्या केल्या. पुढील फौजेनीं हुकुमाप्रमाणें नदीचे उताराचे मार्ग बंद करण्याकरितां उताराचे जागीं किल्ल्यासारखे फौजेचे बुरूज व बुरूजामध्यें तोफा दारूगोळा भरून, सिकंदर पादशाहानें कोट मजबूत बांधिला होता त्या प्रमाणें, मजबुती करून असा बंदोबस्त केला कीं, त्या फौजबंदीचे कटावांत नदी उतरून प्रवेश करावयास सशयास व अंदेशास

४. २० जमादिलावल ९७२ हिजरी ( २६ दिसेंबर १५६४ ) विजयनगराकडे निघाले.
—ब्रि. फि. ३, पृ. १२६.

देखिल मार्ग नव्हता. मग स्वार सिबंदीपैकीं मनुष्य कोठून सिरेल ? असा बंदोबस्त केला. जेव्हां मुसलमानांची फौज श्रीकृष्णातीरास येऊन पोंहचली तेव्हां उताराच्या वाटा बंद झाल्या असें समजलें तेव्हां उतरून जाण्याची मसलत करून पाण्यांतील पोहणारे जलमार्गांतील अभ्यासी जासूद लोक बातमी आणण्यास पाठविले, कीं डावे उजवेकडे व खालीं वरतीं तीन च्यार मजलीपर्यंत जाऊन लष्कर उतरावयास मार्ग कोणीकडे आहे किंवा नाहीं येविषयीं चौकसी करून यावें, म्हणोन रवाना केले. जलमार्गांतील अभ्यासी जासूदलोक तीस चाळीस कोसापर्यंत चहूंकडे जाऊन पाण्याची तहकीक चौकसी करून आले. असें वर्तमान जाहीर केलें, म्हणजे सांगितलें, कीं, आम्ही पाहून आलों. त्यांत यद्यपि दोन तीन ठिकाणीं उताराची जागा आहे, परंतु जी वाट लष्कर व बाजारबुनगे तोफा व डेरे राहुट्या हत्ती उंट सुध्धां निर्भयपणें उतरावयाजोगीं आहे ती वाट रामराज याजकडील फौजेनीं बंद केली आहे. असें वर्तमान ऐकून धर्मवान पादशाहा लोक फारच विचारांत पडले. अक्कलवान कारभारी लोंक कामें काजें केली होतीं त्यास एकांतीं बोलाऊन या प्रकर्णी मसलत विचारिते झाले, तेव्हां मोठमोठे संकटाचे प्रसंग अनुभविलेले अक्कलवान लोक याणीं बहुत विचार करून, विचाररूप पानबुड्यास उपाय तत्क्षण समुद्रांत सिरवून विचाराचें मुक्ताफळ हातीं आणिलें कीं, म्हणजे असा विचार ठरविला कीं, येविषयींचे संकटाची गांठी सुटणें खास ठकविद्येचे मार्गावर आहे, म्हणजे ठकविद्य-शिवाय सात्विकपणानें या संकटांतून पार होणें कठीण आहे. खुद्द अधर्मी लोकांशीं युध्ध करणार सैदुल अंबिया वलद मुरसलिन म्हणजे वसुलिल्लाचे व पैगंबराचे सरदार हजरत महंमद पैगंबर याचा या प्रकर्णी हादीस आहे कीं, लढाई करणें हेंही एक मकरच आहे व तें ˜ आहे कीं, सर्वत्र लोकांत दुसरे मार्गाचे उतारानें उतरून जातात असा भाव बाह्यात्कारी दाखऊन बंद केलेले मार्गापासून निघोन दोन तीन मजली पुढें जाऊन डेरे राहुट्या व तंबु ठोकून किरकोळ सरंजामसुध्धां बाह्यात्कारी लष्कर उतरल्यासारखा भाव दिसण्याकरितां उभे करावे व कित्येक हजार भोंपळे पोहण्याचे व टोकरे वगैरे पोंहण्याचें सामान सिध्ध करावें म्हणजे बहुधा रामराजया-कडील लष्कर सुध्धां मंडळी समजतील कीं, मुसलमान लोक जीव ची आशा सोडून दुसरे मार्गानें उतरून जाण्याचा संकल्प ठेवितात. याजकरितां त्यांची वाट धरून बंद केली पाहिजे. अस समजून मुद्दाम तेथून निघून मुसलमानाचे लष्करासन्मुख येऊन तो मार्ग बंद करण्याचा विचार करितील. रामराजयाच्या अशा गफलतीचे संधींत व फुरसतींत आपलेकडील स्वारांची फौज फौजेंतून उठून निराळे राखावी आणि भोळ-सराप्रमाणें भाव दाखऊन रामराज याजकडील फौजेनें वाटा बंद केलेल्या सोडून तेथून निघून दुसरेकडे गेले म्हणजे तेथ ती आपली फौज पाठवावी, म्हणजे ते कोणाचा आट-काव न होता निर्भयपणें त्या मार्गानें उतरून ज्या ज्या जागीं रामराज याजकडील फौजेनीं

किल्ल्यासारखे मजबूद बंदोबस्त करून मुसलमानांचे फौजेनें उतरून यावयाविषयीं वाटा बंद केल्या होत्या तीं ठिकाणें हस्तगत करून तेथें बंदी करावी व पहारे बसवावे. नंतर आपली संपूर्ण फौज सहज व निर्भयपणें पाण्यांतून उतरून जाईल. या ठकविद्येशिवाय दुसरी उत्तम युक्ति लक्षांत येत नाहीं. मुसलमान पादशाहा यांणीं ही मसलत पसंत करून त्याप्रमाणें करिते झाले. दुसऱ्या वाटेनें उतरून जातो असें सर्वांत वर्तमान जाहीर करून संपुर्ण फौज बाजारबुनगे सुध्धां मुक्कामाचे जाग्याहून कूच करून नदी-तीरानींच कित्येक मजली करून एके ठिकाणीं मुक्काम करून पाण्यांतून उतरून जाण्याचे सामानाची तयारी करिते झाले. तेव्हां विजयानगरवाले यांचे लष्करांत बोभाटा झाला कीं, मुसलमान लोकांनीं ही वाट सोडून येथून कूच करून दुसरीकडे गेले. तेव्हां आम्ही या वाटा व हे मार्ग बंद करून काय फळ आहे ? मुसलमान लोक ज्या मार्गानें उतरून जाण्याचा इरादा करतील तेथें बंदी व अटकाव केला पाहिजे. अशी मसलत करून त्या बंद केलेल्या वाटा सोडून तेथून निघून मुसलमान लोकांचे फौजेचे तोंडावर जाऊन पोंहचून उताराच्या वाटा व मार्ग मोटा यत्न करून बंद करिते झाले. तेव्हां ईश्वराची इच्छा मुसलमान लोकांचे संरक्षणार्थ झाली. आरबी वाक्याचा अर्थ : "त, म्हणजे हिंदु लोक, इच्छा करितात कीं ईश्वराचे तेजाचा आपले मुखाचे वायूनीं फुकून लोप करावा व ईश्वर इच्छितो कीं, हिंदूस वाईट वाटलें तत्रापि आपले तेज परिपूर्ण राखावें." तेव्हां ईश्वराचे मनोगत मुसलमान लोकांची फत्ते करण्याकडे व हिंदु लोकांची, म्हणजे रामराज याची, शिकस्त करण्याकडे होते. तेव्हां रामराज याजकडील लोकांनीं हुशारीचा कायदा त्याग करून प्रथम उताराच्या वाटा बंद केल्या होत्या त्या मार्गाचे भय व बंदोबस्ताविषयीं गाफिल राहिले. कोणी एक शिपाई किंवा स्वार एक मनुष्य देखील पहिले उतार बंद केलेले मार्गावर ठेविले नाहीं. मुसलमान पादशाहा लोकांनीं निश्चय ठरविल्याप्रमाणें कित्येक फौज, निवडक फौज व निवडक घोडे मोठे जलद जोरदार व स्वार मोटमोठ्या लढाया केलेले व महा बळवान होते ते आपले फौजेंतून निवडून काढून तुटक करून मध्यरात्रीचे समयीं उताराच्या वाटा व मार्ग बंद केलेले होतें ते विजयानगरवाले मोकळे टाकून गेले होते त्या मार्गावर पाठऊन एकाएकी येलगार केला. तेव्हां ती फौज कोणी अटकाव करणारा नाहीं असें पाहून निर्भयपणें पाण्यांतून उतरून ज्या ज्या ठिकाणीं रामराज याजकडील फौजेनीं बंदी करून मजबुती केली होती त्या त्या जागा मुसल-मानी फौजेनीं हस्तगत केल्या आणि त्या वाटा धरून बंदी मजबूत केली. नंतर मुसलमान लोकांची संपूर्ण फौज कूच करून गेली होती तिकडून परत येऊन सावकाश-पणें आनंदानें सर्व सामान व खटल्यासुध्धां नदी उतरून अलीकडे आली. जेव्हां रामराज याजकडील फौजेस कळलें कीं, मुसलमान पादशाहाचे लष्कर नदी उतरून अलीकडे आलें तेव्हां आपले यत्नाची फलश्रुती मुठींत वारा धरल्यासारखी झाली, म्हणजे इतका यत्न करून व्यर्थ झाला, असें समजून व आपण काम केलेलें उलट झालें,

आपण चुकलों, फार गाफिली झाली असें जाणून पश्चाताप पावते झाले. मुसलमान फौजेनीं रात्रीस छापा घालून कार्यसिध्धी केली. येणेंकरून विजयानगरवाले यांणीं अत्यंत भयाभीत होऊन सारी रात्र घाबरेपणांत व धांदलींत गुजरली. घोड्यावरून देखिल उतरले नाहींत. तव्हां प्रात:काळ झाला. मुगुटवान सूर्य पूर्व दिशा तत्क्षण तेजरूपी सिंहासनावर आरूढ होऊन उष्णतेची अदालत केली, म्हणजे सूर्योदय जाहला. तेव्हां मुसलमान पादशाहा यांणीं युध्धाचा प्रारंभ करून सफ बांधिले,[५] म्हणजे शिपायांच्या ओळी लाविल्या. चवघा पादशाहांकडील हरएक फौजेंत बारा निशाणें उभीं केली. हरएक निशाणावर आयता लिहिल्या त्या नसरमीनल्लाह फतह करीब असीयेते मोठे अक्षरान लिहून हरएक निशाणावर बारा इमामापैकीं एक इमामाचें नांव लिहिलें होतें. उजवे बाजूस अली आदिलशाहा यांणीं फौजेची पक्की बंदोबस्ती पर्वतासारखी अचल ठेविली. डावे बाजूस कुतुबशाहा व अली बरीद यांणीं पक्की बंदोबस्ती केला. मुध्यभागी हुसेन निजामशाहा याणी बंदोबस्त ठेवला व हत्ती लढाऊ येत ठ त्याप्रमाणें जागोजाग उभे केले. तोफा सांखळ्या लाविलेल्या दारूगोळा भरून सन्मुख उभ्या केल्या. ईश्वरावर व पैगंबरावर भरंवसा ठेऊन शत्रूवर चालून जाते झाले. या प्रकारें कीं, त्याचे जरबेनें मोठे मोठे पर्वताचें काळीज भयानें फाटलें व फौजेचे गर्दीचे धक्यानीं, कीं रक्त प्राशन करणारा नवग्रहांतील भयाभीत होऊन पांचवे आकाशाचे पडद्यांत घुसला व रणवाद्यांचे भयंकर आवाजानें महंमुद याचे गुंबजाप्रमाणें म्हणजे महंमुद याचे गुमटांत पुकारलें असतां प्रतिध्वनी होतो त्या प्रमाणें, आकाशांत प्रतिध्वनी गडगडूं लागले. शूरांचे भयंकर हाका मारण्यानें व वीरांचे भयप्रद मारा मारा धरा धरा म्हणोन हांका देण्यानीं पक्षांस अरण्यांत वास करणें पिंजऱ्यांत प्रतिबंध पावण्याहून अधिक यातना व जलचरें व मच्छ वगैरे समुद्रांत राहणें मच्छ मारणाराचे जाळ्यांत पडून बंधन पावण्याहून अधिक दु:ख झालें, असी गर्दी झाली. रामराज याजकडील मंडळीनें पाहिलें कीं, मुसलमानांकडील फौज संपूर्ण सिध्ध होऊन लष्करची तयारी करून येत आहे. रामराज हा गर्वाचे बदमस्तीचे योगानें मुसलमानी फौजची लढाई मुलांचे खेळासारखी जाणीत होता. त्यांत कांहीं संकट नाहीं सहज आहे असें जाणीत होता. असें जाणणें हेंच गर्वाचें व बदमस्तीचें फळ आहे. फौजेची युध्ध रचना न करितां व किरकोळ खटले बाजारबुनगे फौजेंतून येकीकडे न काढितां परस्परें समरंगणीं भिडते झाले. उभयतांची सेना एकमेकांत मिसळून मुसलमानी फौजेशीं सन्मुख झाली. त्या समयीं रामराज रत्नखचित सिंहासनावर बसला होता. रामराज याजला त्याजकडील संनिध राहणारे लोकांनीं कितीही समजून सांगितलें कीं, हा समय युध्धाचा आहे, या समयीं घोड्यावर बसावें; परंतु रामराज यांणीं हें बोलणें मान्य

---

५. जमादिलावल ९७२ हि. (दिसेंबर १५६४) लढाईस तयार झाले—मु.घो.घ.ब,पृ.२००.

न करितां या सांगण्याचा धिःकार करून बोलला कीं, या लढाईस युध्ध कोण म्हणते? हें युध्ध नव्हे. हा मुलांचा खेळ आहे. हे आतांच पळून जातील. मुसलमानांकडील फौज निर्भयपणें हिंदु लोकांचे फौजेवर येऊन पडली. तेव्हां शस्त्राग्नि प्रदिप्त झाला. उभयतांचेही शूर परस्परें मिसळले. युध्ध कसें असतें तो पराक्रम दाखवित होते. एखादे वेळेस मुसलमानांकडील फौजेंतील लोक तीरानीं व भाल्यानीं जीव तल्लक्षण पक्षी शत्रूचे म्हणजे हिंदु शरीराचे पिंजऱ्यांतून उडवित होते, म्हणजे ठार मारित होते. केव्हां हिंदु लोक राक्षसी स्वभावाचे मुर्खपणा व दांडगेपणा करून मुसलमानी फौजेचे लोकांचे प्राण घत होत. रामराज याणीं मुसलमान लोकांची सलाबत पाहून मनांत आणिलें कीं, मुसलमानी फौजेचे हातून आमचें काय होणार असें समजत होतां, परंतु हें विपरित दिसतें. असें कळतांच शुध्धीवर येऊन रत्नजडित सिंहासना-वरून खालीं उतरून सोन्याचे खुरचीवर बसला. शामियाना म्हणजे तंबूच्या पुढें च्यार खांब देऊन चांदणी उभी करितात ती चांदणी मखमली कलाबुती विणकरी व कला-बुतीनें शिवलेली व त्या चांदणीचे चार कोपऱ्यांस भारी किंमतीचे मोत्याचे चार घोस बांधलेले लटकत आहेत व त्या चांदणीवर सोन्याचे सूर्य दुरून चमकावयाजोगे चांदणीचे माथ्यावर लाविले. चांदणी उभी करून त्या चांदणीखालीं सोन्याचे खुरचीवर बसून आज्ञा केली कीं, आमचे दोन बाजूस रुप्याचे व सोन्याचे पुतळयाचे दोन ढीग घालावे. त्याप्रमाणें दोन ढीग घालून रत्नजडित तबकें जवाहिरानें व पोशाखानें भरून ठेविलीं. शूरांस व शिपाईलोकांस इनाम व बक्षीस द्यावयाचे ठराविलें. आज्ञा कली कीं, जो कोणी शूरत्व व सिपाईगिरी करून तरवार लाऊन यशस्वी होऊन मजपासीं येईल त्याजला जवाहिरानें भरलेलें तबक बक्षीस देईन. त्याचा दरजा व पदाधिकार वाढवीन. असें जाहीर केल्यावरून इतक्या गोष्टीवरच रामराजाचे फौजेंतील शूर व शिपाई स्वार सिबंदी लोक याणीं संतोष पावून स्वामीसेवेकरितां युध्धांत प्राण खर्च करण्यास व जीवावर उदार होण्यास तयार होऊन रणभूमींत युध्धार्थी पाय ठेविते झाले. शूरत्व करूं लागले. विजयानगरचे बरकंदाज, म्हणजे बंदुकीचे निशाण न चुकूं देतां गोळी मारणारे लोक, असे होते कीं, सूर्याचे किरणांतील बारिक अणुरेणु दिसतात त्या अणुरेणूस बंदुकीचे गोळीनें उडवीत होते. तेव्हां त्या रणभुमींत बंदुकीनें मनुष्यांची मस्तकें उडवावयाचें अशक्य काय ! मस्तकें चेंडुसारखीं उडवून जमिनीवर पाडणार नाहींत कीं काय ? बाणदार हुकमी बाण लावणार केशांचा अग्रभाग देखील बाणाचे निशाण लावण्यांत चुकू देत नव्हते असे होते. तेव्हां त्या रणभूमींत मृत्यु प्रळयाचे संकट उभें करणार नाहींत कीं काय ! व्याघ्रासारिखा पराक्रम करणारे शूर मुसलमान पादशाहाकडील, कीं जे रणभूमींत प्राण खर्च करण्याची आवड ठेवित होते, त्याणीं दर हल्ल्यांत यमदुतासारिखे त्या मृत्युग्रस्तांवर म्हणजे रामराज याजकडील फौजेवर दौड करून प्रेतांचे ढिगारे घालित होते. दर हल्लेंत पडझडीचे वायुप्रमाणें, म्हणजे ज्या वायूनीं

वृक्षांचीं पानें व फळें व पुष्पें झडून वृक्ष सडे होतात त्या प्रखर वायुप्रमाणें, त्या नाशीवंतांवर पोंहचून वसंत ऋतुप्रमाणें वृक्षाची पत्रें व पुष्पें झाडीत होते, म्हणजे रामराज याजकडील फौजेंतील शूरांस जीवें मारण्याचा प्रळय करित होते. विजयानगरवाले आपण बहुत जमात आहों व युध्ध पराक्रम केला असतां रामराज बहुत बक्षीस देईल या गर्वांनीं सरदार लोक याणीं शस्त्रानीं तोडातोडी करण्यांत तिळमात्र अंतर न करितां पूर्ण यत्न केला. पांच हजार बाणदार याणीं एकदम बाण सोडिले. तसेच पृथ्वी-प्रलय करणाऱ्या तोफांची लागोपाठ सरबत्ती केली. विजयानगरवाले सिपाई प्यादे कीं, जे पिशाच्यासारखे उत्पत्तीचे होते, त्यांणीं तरवारी मारणें व बुंदुकीची सरबत्ती करणेविषयीं पूर्ण धैर्य धरून अति दांडगेपणा व मुर्खपणानें मुसलमानाकडील फौजेवर गर्दी करून जाऊन फौजेवर पडले. दंगा आरंभिला. शेवटीं रामराज याजकडील फौजेचे हल्ल्यानीं मुसलमान लोकांचे डावे बाजूकडे कुतुबशाहा व अली बरीद फौज घेऊन उभे होते ते उधळले. नितामशाहाचे लष्करासी छाटा म्हणजे अंतर पडिला. प्रथम सामन्यासमयीं जागा धरली होती ती कुतुबशाहा व अली बरीद याणीं सोडली. हे वर्तमान निजामशाहास कळलें. नंतर निजामशाहा याणीं एक संभावित अमीर म्हणजे मानकरी याजला कुतुबशाहा व अली बरीद यांजकडे पाठवून त्याजला आपणाकडे बोलावून घेतलें. एकत्र होऊन विजयानगरवाल्यावर हल्ला करून प्रथम जागा धरली होती ती धरून कायम केली. शस्त्रानें तोडण्यांत व युध्ध करण्यांत शूरत्व बज्यावित होते. जेव्हां निजामशाहा याणीं पाहिलें कीं, विजयानगरवाले फार दांडगावा करण्यांत कायम आहेत तेव्हां आतां मुसलमानांचे फौजेस दृष्ट लागेल असें जाणून मरणास उदार होऊन जागा धरून कायम होता तो जागा सोडून चालूं झाला. हिंदु लोकांत ज्यास रणखांब म्हणतात तो रणखांब उभय सेनेचे मध्यभागीं उभा करण्याचा हुकूम दिला रणखांब उभा करण्याचें कारण हें आहे कीं, या रणखांबापासून मरणाचें भय धरून माघारे परतण्याविषयीं पाय टेवणार नाहीं किंवा मी आपला प्राण युध्धांत देईन किंवा शत्रूचा प्राण घेईन अशा प्रतिज्ञेकरितां रणखांब गेवावा लागतो तो रोविला. या युध्धप्रसंगांत निजामशाहा याजबरोबर निजामशाहा याच्या खाशा स्त्रिया म्हणजे लग्नाच्या बायका शंभर होत्या. तेव्हां या प्रसंगीं हरएक स्त्रियांपासीं एक खोज्या नागवी तरवार करून ठेविला होता. कारण कीं, कार्यभाव विपरित दिसल्यास म्हणजे निजामशाहा वारला असें दिसल्यास त्या खोज्यानीं हरएक सदरहू स्त्रियांस लागलेच तरवारीनें तोडून टाकाव्या. रामराज याणीं असा भाव अवलोकन केला तेव्हां खास जाणिलें कीं, मुसलमान लोक युध्धार्थी कायम झाले. असें जाणिलें तेव्हां आपल्या शिपाई लोकांस अधिकच युध्ध करण्याविषयीं बोध करित झाला. बहुत आशा दाखविता झाला. युध्धांत पराक्रम केल्यास मी बहुत द्रव्य बक्षिस देईन अशी आशा दाखविता जाला. शस्त्राग्नि प्रदिप्त केला. त्या धांदलीचे व गर्दीचे समयांत अली आदिलशाहा याणीं उजवे बाजूकडून रामराज याचा वडील बंधु तिमराज

होता त्याचे सामन्यावर जाऊन युध्य आरंभिलें. विजयानगरवाल्याची बहुत तोडातोडी केली होती. सबब तिमराज यास बहुत धाक पडला व घाबरला. तेव्हां अली आदिलशाहा याजपुढें युध्दास टरवत नाहीं व पुढें उभें राहाण्याचा दम निश्चत नाहीं असें जाणून तिमराज याणीं जागा सोडली. तिमराज याणीं जागा सोडतांच आदिलशाहानें फौज घेऊन तिमराज याजवर गर्दी केली. तेव्हां तिमराज हा रामराज याजकडे पळतां झाला. तेव्हां आदिलशाहा याणीं त्याचा पाठलाग करून मारित ठोकित पाठी लागून तिमराज याजला रामराज याजवर घालविला. पुनः हिंदु लोकांचे फौजेचे पाठीमाग जाऊन बाजारबुनगे धरून ठोकाठोक व तुडवातुडव करून रामराज यादर चालून गेला. बाजारबुनग्यांचीही गर्दी रामराज याजवर घालविली. रामराज याजला पाठीमागून गर्दी उसळली व धांदल झाली यावरून वर्तमान कळलें कीं, आदिलशाहा फौजेसह मारामारी करून पाठीमागून येत आहे. तेव्हां जाणिलें कीं, मी लढाईंत धरला गेलों. कारण कीं, पुढें निजामशाहा व कुतुबशाहा यांची फौज व पाठीमागें आदिलशाहा व डावे उजवे बाजूकडून बाजारबुनगे वगैरे लष्कर येऊन पडलें. अशी गर्दी करून कठीण प्रसंग आणिला कीं, एकमेकांस बाहेर हो म्हणण्याचा देखिल मार्ग बंद झाला. तेव्हां रामराज निरूपाय होऊन शस्त्र धरण्याविषयीं मनांत निश्चय करितां झाला. सरदार लोकांस युध्य करण्याविषयीं बहुत बहुत आशा दाखऊन बोध करित होता व धैर्य धरित होता. त्या मोठे धांदलीचे व गर्दीचे समयीं निजामशाहा याजला ही गर्दी आदिलशाहा याणीं केली आहे अशी खबर नव्हती. तिमराज यांस पुढें घालवून त्याचा पाठलाग करून, तिमराज याजला रामराज यांचे आंगावर घालऊन, उभयतांचे पाठीमागें गर्दी करून, त्यांची फौज जर्जर करून, पुर्ण सलावतीनें आदिलशाहा युध्य करित येत आहे, असें वर्तमान माहित नाहीं. परंतु इतकें मात्र निजामशाहाचे मनांत आलें कीं, आदले उभय बाजूस आदिलशाहा फौजेसुध्धां होता. तो कोणीकडे उधळून गेला हें कळत नाहीं. उजवी बाजू रिकामी पडली येणेंकरून मनांत भयाभीत होऊन चिंतेंत पडून खिन्न होता. अशा चिंतेच्या अवस्थेंत होता तेव्हा त्याच समयीं रुमीखान, तोफखान्याचे सरबत्तीवरील दरोगा म्हणून मुख्य कामगार होता तो, निजामशाहापासी येऊन हजर झाला. तेव्हां निजामशाहा याणीं त्याजला विचारिलें कीं, तोफखाना कोठे आहे ? रुमीखान बोलला कीं, हजर आहे. दोन तोफा फार मोठ्या तर आतांच हजर आहेत. असा रुमीखान याचा अर्ज ऐकतांच निजामशाहा बोलला कीं, काय पहातोस मुल्कमैदान तोफेंत खुर्दा भरून बार टाकून बत्ती दे. जेव्हां या हुकुमावरून रुमीखान याणी सदरहू तोफ पुढें वोढून तोफा डागणें आरंभिलें तेव्हां हिंदु लोकांची फौज वसंत ऋतुचे वायूनीं वृक्षांची पत्रें झडून पडतात अशा प्रकारें मरण पावती झाली. रुमीखान दरोगा हा हत्तीवर बसला होता आणि तोफा पुढें चालवून तोफा डागित फौजेसुध्धां पुढें चालू झाला. तेव्हां त्या तोफांचे सरबत्तीपुढें जाण्याचें कोणाचेंच सामर्थ्य नव्हतें.

जेव्हां अशीच गर्दी करित करित बिजयानगरवाल्याचे फौजेंत येऊन पोंहचला तेव्हां एके ठिकाणीं बहुत माणसें जमलीं आहेत असा जमाव पाहून रुमीखान यांणीं तात्काळ त्या जमातीवर हत्ती ढकलला. कर्मधर्मसंयोगें त्या जमातींतच रामराज होता. तोफा मारणाराचे व तोफेचे भयेंकरून व मस्त हत्तीचे गर्दीनें संपूर्ण मनुष्यें एकमेकांवर पडून आपले सरदाराची म्हणजे रामराज याची आस्था सोडून हरएक मनुष्यें पळून जाती झालीं. आरबी वाक्याचा अर्थ : " अंतकाळीं आपला भाऊ किंवा आपली मातुश्री किंवा आपला बाप असला तरी त्याचा त्याग करून मनुष्यें पळून जातात. " असा दिवस दिसून आला तेव्हां रामराज त्या धांदलीचे समयीं संपूर्ण मनुष्यांचें धक्क्यानें लाथाबुक्क्यांचें ठोकाठोकीनें जखमी पुरुषाप्रमाणें व घायाळासारिखा एके जागीं पडला होता. तेव्हां रामराज याचे जवळचे माणसांपैकीं कोणी एक माणूस देखिल रामराज याजपासीं राहिलें नव्हते. परंतु दलपतराव म्हणून एक ब्राम्हण, कीं तो ब्राम्हण रामराज याजकडील संपूर्ण संनिध राहणारे सेवकांपेक्षां फारच लोभांतील सर्वदा संनिध राहणारा होता, तो मात्र एक ब्राम्हण त्या समयीं रामराज याजला धीर देण्याविषयीं इमान सांभाळून होता. पुरी सोबत देण्याची पर्त बज्यावित होता. अशा समयांत रुमीखान यांणीं हत्ती ढकलून नीट रामराज यावरच चालून आला. तेव्हां दलपतराव यांणीं जाणिलें कीं, हा हत्तीवरील गृहस्थ नीट रामराज यावरच चालून आला. रामराजास खास जिवें मारितो असें जाणून धीर देणेचे चालीनें अति त्वरेनें संरक्षणार्थ तो ब्राम्हण रामराजावर पडला. मोठ्यानें बोरडला व म्हणाला कीं हां हां असें करूं नको व संकट आणूं नको. ज्यावर तूं चालून आला आहेस तो हा सामान्य पुरुष नव्हे. हा बिजयानगरचा धणी ज्यास रामराजा असे म्हणतात तो रामराजा आहे. या समयीं तूं जर करितां स्नेह संपादून दोस्तीचे मार्गानीं हा राजा वाचविल्यास येविषयींचे प्रत्युपकारार्थ, म्हणजे उपकार फेडणेंकरितां, हा राजा तुझी योग्यता फार वाढवील व तुजला संपूर्ण कारभारी केला आहे त्याहून एक मोटा सरदार करील. रुमीखान यांणीं हा रामराज असें नांव ऐकतांच हत्तीस इषारा केला आणि रामराज याजला हत्तीचे सोंडेंतून धरून उचलून हत्तीवर घेतला. तेव्हां रुमीखान याजला चित्तांतील मनोरथाचें मुक्ताफळ हातीं लागलें, म्हणजे मुख्य रामराजा हातीं लागला, तेव्हां रुमीखान यांणीं हत्ती माघारा फिरविला आणि वायुसारिखा व विजेप्रमाणें जलदीनें हत्ती पळवून आपले फौजेंत आला. रामराज याजला जिवंत आणून निजामशाहाचे हवालीं केला. निजामशाहास कधींच प्राप्ती व्हावयाची नाहीं अशा अलभ्य लाभाचे प्राप्तीनें अत्यंत संतोष पावून रामराज याजला निजामशाहा यांणीं आपले जवळ सन्मुख बसविला. त्याशीं बोलूं लागला. निजामशाहा याणी विचारिलें कीं, रामराज तुमची अवस्था कशी काय आहे व तुम्ही कसे आहांत ? असें वर्मी बोलणें ऐकून रामराज यांणीं कांहींच उत्तर दिलें नाहीं. आपले हातानीं कपाळावर मारून घेतले. कपाळावर हाणून घेण्यांतील भाव हा

आहे कीं, जे माझे कपाळीं लिहिलें होतें तें मी फळ पावलों. असें परस्परें निजामशाहा व रामराज याचें भाषण होत आहे तों अशा समयांत हकीम कासम बेग तबरीनी म्हणून निजामशाहाचे संनिध राहणारा संभावित व विश्वासू सेवकांपैकीं होता तो फार घाबरून निजामशाहाचे पुढें धाऊन आला आणि विनंती केली कीं, हा बोलण्याचा समय आहे कीं काय? बोलत बसण्याची वेळ नव्हे. जलद ह्या रामराजास शूळावर चढऊन जिवें मार आणि आपले चित्तास याचे भयापासून मुक्त कर. नाहींपेक्षां आदिलशाहा रामराजासीं पुत्राचें नातें ठेवितो व रामराजास तीर्थरुपा-सारखा मानितो यास्तव बापलेंकाचे नात्याचा संबंध लाऊन पुर्ण धैर्यानें फौजेस घाबरें करून पाठीमागून गर्दी करित येत आहे. आदिलशाहा आला म्हणजे आतांच तुमचे हातून रामराजास हिराऊन घेईल. तुमचे हातीं राहूं देणार नाहीं. मग कार्यभाव कसा होईल हें ईश्वरास माहीत. निजामशाहा यांणीं असें हकीम याचे बोलणें ऐकतांच उत्तम प्रकारचे समजून आज्ञा केली. त्याजवरून रामराज याचें मस्तक कापून शूळास टोचून बिजयानगरवाल्याचे लष्करासन्मुख तो रामराज्याचे मस्तकासहित शूळ सर्वांस जाहीर होण्याकरितां उभा केला.[६] बिजयनगरवाले हिंदु लोकांनीं जेव्हां आपला मालक मस्तक कापून शूळावर दिला असा अवलोकन केला तेव्हां सर्वांस खास कळलें कीं, राजा खास मारला गेला. हे शूळावर मस्तक चढविलेलें खास रामराजाचेंच आहे. मुसलमानी फौजेची फत्ते झाली आहे. असें जाणून आपला मोड झाला असें समजून भुमीस पाय न लागे इतक्या त्वरेनें पळते जाहाले नसते तर अद्यापि उभयतांकडीलही शस्त्रांचा प्रळय व्हावयाचा होता. कारण कीं, लक्षावधी हिंदु लोक मुसलमानांस मारण्याकरितां वें युध्धप्रसंग करून मुसलमान लोकांचा फडशा करण्यास सिध्ध होते.

## ९. हिंदूकडील फौजेचा मोड झाला त्या फौजेचा मुसलमानी फौजेनीं पाठ-लाग करणें व लुटीचा बहुत माल मुसलमान लोकांचे हातीं लागणें :

जेव्हां हजारो हिल्यानीं, म्हणजे सिपानीं, तरवारींचे घावांतून त्या प्रलयांतून जीव वाचऊन हिंदु लोक पळाले होते त्यांचा मुसलमानाकडील यशस्वी शिपाई लोक नीं पाठलाग करून त्यांस तोडातोडी व कैद करूं लागले. जिकडे जिकडे मुसलमान लोक दौड करित होते तिकडे तिकडे हिंदु लोकांच्या कतारींच्या कतारी मारित होत. जिकडे जिकडे हल्ला करित होते तिकडे तिकडे हत्यारानीं तोडलेले माणसांचे मुडद्यांचे ढिगारे घालित होते. कित्येक हिंदु लोक तरवारीनें तोडिले कीं, त्यांचे रक्तानें रणभुमी कित्येक कोस तांबडे रंगाचे पिकाचे शेताप्रमाणें जाहाली. बारा कोसपर्यंत रणभुमींत

६. २ जमादिलाखर ९७२ हि. (५ जानेवारी १५६५) रामराजाचा मृत्यू– बु. इ. मासिर व २० जमादिलाखर (२३ जानेवारी) तारिख इ. महंमद कुतुबशाही. Indian Antiquary, Vol. L, p. 146.

प्रेतें, घायाळ मनुष्यें, अर्धमेलीं माणसें, घोडे, हत्ती, उंट, सोन्याचे दागिने, जवाहीर व कित्येक पदार्थ भारी किंमतीचे असे अगणित जिनसांचे अंथरूण झालें होतें. मुसलमान पादशाहाकडील यशस्वी लष्करवाल्यांनीं सोन्यारूप्याचे दागिने, जवाहिर, घोडे, तरवारी वगैरे शस्त्रें व तरवारीचा वगैरे मस्तकास घाव घालून जखमा करितात तो धाव लागूं नये याजकरितां लोखंडी टोप असतात ते टोप व चिलखतें व कुणब्रिणी व सेवक घेतले. कित्येक लुटीचे पदार्थ हरण करण्यानीं हरएक मनुष्यें कधींच पोटासाठीं रोजगार धंदा करण्याची गरज नाहीं अशा प्रकारचे सावकार झाले. मुसलमान पादशाहानीं लष्करांत दौंडी पिटविली कीं, हत्ती, तोफा, निशाणें, लष्करच्या ढाला निशाणासारख्या थोर थोर असतात त्या, चौघडे व पादशाही मर्तब्याचे जे जे पदाथ असतील ते ते असे इतके मात्र कोणी घेऊं नये. बाकी कांहीं एक सरकारकरितां ठेऊं नये, ज्याच हातीं जे लागेल रोख ऐवज, जवाहिर, पोशाख, उंची कापडें व मालमत्तासुध्धां, जो जें लुटील त्याजला तें माफ आहे. कोणी कोणाचे हिरोन घेतलेले जिन्नस हिराऊन घेऊं नयेत. त्यावर सरकारांतून पत मागण्याचा उपद्रव व्हावयाचा नाहीं. एक हजार हत्ती, एक हजार तोफा व आणखी कित्येक पदार्थ पादशाही मर्तब्याचे असे बहुत जिनस लुटीपैकीं मुसलमान पादशाहाचे सरकारांत जमेस आले. याशिवाय दुसरे कित्येक पदार्थ रोख ऐवज व जिन्नस वगैरे संपूर्ण लोकांस माफ झाले. रणभुमीपासून अनागोंदीपर्यंत, कीं अनागोंदीपासून दहा कोस बिजयानगर आहे तेथपर्यंत, मैदान व सेतें हिंदु लोकांचे प्रेतांनीं भरलीं होतीं. तेव्हां हिशेब लिहिणार कारकून जलद कलमी होते. त्यांणीं जिवें मेलेले माणसांचे मुडद्यांचे व जखमा लागून घायाळ झालेले मनुष्यांची मोजदाद लिहिण्यांत बारा दिवसपर्यंत मोठा यत्न करून लिहिणें तयार केलें. रणभुमींत एक लक्ष मनुष्यांचे मुडदे व जखमा लागून घायाळ झालेले असे यादीचे गणतीस लागले. हें मोठें यश आलें. नंतर मुसलमान पादशाहा यांणीं अति नम्रतेनें भुमीवर मस्तक ठेऊन नमन करून ईश्वराचा स्तव करिते झाले. वीस दिवस लढाईचे मैदानांत मुक्काम करून हिंदु लोकांचे फौजेची तोडातोडी करून बहुत श्रम केले होते. यास्तव तेथें विसांवा घेते जाहाले. जखमा लागून घायाळ जालेले माणसांस मलमें लाऊन व जखमा सिऊन वांचविण्याविषयीं यत्न करिते झाले.

## १०. मुसलमान पादशाहा यांणीं बिजयानगरावर चालून जाणें व बिजयानगर लुटणें :

त्यानंतर बिजयानगराकडे येऊन मोठे मोठे मजबूद पाये भरून बांधलेल्या इमारती, थोर थोर हवेल्या, वाडे, देवालयें व मोठे मोठे महाल बांधलेले

होते ते पाडून जमीनदोस्त करून धुळदशेस मिळविलें. त्या दुष्ट व अधर्मी पुरुषानें, म्हणजे रामराज याणें मसिदी पाडून खराबी जितकी केली होती त्याचे शंभर पट अधिक खराबी करून देवालयें पाडणेंविषयीं यत्न करून नाश केला. विजयानगर हें शहर फार थोर व बहुत वस्तीनें व भरभराटींत होतें. हजार वर्षांत कधींच परक्याचे लष्करानें त्या शहरांत पाय ठेविला नाहीं. तेथील राहणारे अमीर लोक, साहुकार, रयत संपूर्ण जातीचे लोक, फकीर वगैरे बहुत संतोषयुक्त सुखी व आबादान होते. त्याणीं पृथ्वीप्रलय करणारे संकटाचे भयानें ज्या ज्या पासीं जे जे होते त्याणीं ते ते आपले जिन्नस मुसलमान लोक लुटतील यास्तव घरांत पुरून तळघरांत, विहिरींत, हौदांत बुडऊन टाकून छपवून ठेविले होते. बहुत करून मोठमोठे गृहस्थ द्रव्यवान होते त्याणीं आपले कुटुंब समुदाय बायका मुलें व प्रपंच सुपें टोपली वगैरे जिंनस घेऊन पर्वताच्या विवरांत, कीं त्या शहरचे आसपास डोंगरांत मोठमोठीं विवरें होतीं त्यांत, ठेऊन छपून राहते झाले. मुसलमान लोकांची फौज तेथें येऊन पोंहचली तेव्हां त्याणीं लुटावयास आरंभ करून जितके दृष्टोत्पत्तीस आलें तितकें संपूर्ण निःशेष लुटलें. तेव्हां मुसलमान लोकांस बातमी कळली कीं, बहुत माल कित्येक लोकांनीं जमिनींतें पुरला आहे. असें कळतांच त्यांचे पाठी लागून घरें, इमारती व दुकानें खणून काढूं लागले. तेव्हां मुसलमानांकडील लोकांस या योगानें बहुत माल सांपडत होता. इतक्यामध्यें एके दिवसीं निजामशाहा विजयानगर हे शहर संपूर्ण हिंडून पहावें म्हणोन सर करावयास निघून विजयानगरचे रस्त्यारस्त्यानें व गल्लीगल्लीनें हिंडत होता. तेथें एके ठिकाणीं आदिलशाहाचे लष्करापैकीं बाजारी लोक व फकीर लोकांचा मेळा जमून त्या लोकांनीं एके जाग्याहून एक तांब्याची घागर सोन्यानें, जवाहिर, दागिने व मोतीं भरलेली उकरून काढून त्या शहरचे कुसु पडलेले खिंडारांत बसून वाटून घेत होते. इतक्यामध्यें निजामशाहाचे लष्कराचा मेळा त्या लोकांचे वाटून घेण्याचे समयांतच येऊन पोंहचला. त्या लोकांत दांडगावा, जबरदस्ती व मारामारी करून बळें आपणही वाटणी घ्यावी म्हणोन दांडगावा करूं लागले. यास्तव उभयतांमध्यें म्हणजे आदिलशाहाकडील व निजामशाहाकडील मंडळींत कज्या लागून तरवारी नागव्या करून लढाईस प्रारंभ झाला. उभयतांकडीलही कित्येक मनुष्यें ठार झालीं. कित्येक कैदी झाले. त्यामध्यें दोन असामी सैद तिरमीजी होते. ते त्यांचे मारामारींत ठार झाले. आपक आबदाल म्हणोन फकीर तकियाचा धणी मोठा वाली कीर्तीवान पुरुष होता. तीस चाळीस मुरीद म्हणजे ज्ञानवान पुरुष त्याजपासीं होते. त्या फकीरासही त्याच मारामारींत पाठीमागून तरवारीचा घाव बसला. तो फकीर त्या घावानीं पाठीमागून नरड्यापर्यंत कापला गेला. परंतु नरड्याची मुख्य सीर, कीं ज्या शिरेमध्यें जीव रहातो ती सीर, तुटली नव्हती. सबब त्याची जखम सिऊन मलमपट्या दिल्या. आयुर्दाय बाकी होता. यास्तव तो फकीर वांचला. दहा वर्षेपर्यंत जिवंत होता. इतका गळा कापला असतां वांचला हें ईश्वरी सामर्थ्य

सर्वांस कळलें. निजामशाहा याणीं हा प्रकार अवलोकन केला आणि आपले कारभारी लोकांस आज्ञा केली कीं, या खिडारांत असे कज्जे होऊन मारामारी होऊं लागेल व नित्य विनाकारणी एकमेकांचे प्राण घेऊं लागतील, या योगानें हळुहळु मोटमोठे सरदारांत वैर वाढेल, बहुत करून या योगानें पादशाहा लोकांतही वैर उत्पन्न होईल, यास्तव एक काम केलें पाहिजे कीं, त्या योगानें असा दंगा होणें बंद होईल. असें ठरवून तेथेंच उभें राहून निजामशाहा याणीं आपले लष्करास हुकूम केला कीं, काटे व केरकचरा व कडबा व जळाऊं लांकडे बहुत जमा करून हरएक घरांत, इमारतींत व बाजारांतील दुकानांत भरून आग लाऊन द्यावी. त्याप्रमाणें करून आगी लाविल्या. तेव्हां संपूर्ण इमारती व घरें कापसासारखी जळून जमीनदोस्त झालीं. या योगानें घरोघरचे तळ व फरशा उघड्या पडून भिंती वगैरे पडून गेल्या. या कारणानें घरोघरच्या जमिनी खणून माल हुडकूं लागले तेव्हां कोठें कोठें पुरून ठेविलेले सांपडत नव्हते. परंतु बहुत करून जेथें जेथें हुडकीत होते तेथें तेथें माल सांपडत होता. सहा महिने मुसलमानी फौजेचा मुक्काम विजयानगरांत झाला. हजार कोसपर्यंत विजयानगरचे आसपासचे कसबे, गांव व खेडीं वगैरे होतीं तीं संपुर्ण खराब व उजाड होऊन धुळदशेस मिळालीं. तिमराज हा रामराज याचा वडील बंधु त्या युध्द प्रलयांतून हजारो युक्तींनीं वांचला होता. तो पिलगुंड्याचे किल्ल्यांत आश्रय धरून राहिला. रामराज याचा पुत्र होता त्याणीं आपले घरचे आप्तविषयीं मंडळ घेऊन अनागोंदीपासून तीन कोसावर एका पर्वतांत मोठे खोल विस्तीर्ण विवरांत घुसून कालक्रमणा करित होता.

## ११. विजयानगरचे आसपासचे डोंगरांतील विवरें व झरोके आहेत त्यांचे सविस्तर वर्णन :

विजयानगराचे संनिध व विजयानगराचे आसपास पर्वत आहेत. त्या पर्वतांत मोठमोठीं खोल विवरें व झरोके आहेत, कीं आठ दहा कोसापर्यंत त्या विवरांचे आंत मार्ग चालून गेले पाहिजे. ते मार्ग प्रकारांतर आहेत, कीं कित्येक जागीं फार अडचण व कित्येक जागीं मोठा रस्ता व कित्येक जागीं अंधार, कीं त्या जागीं मशालीशिवाय पुढें पाय ठेवतां यावयाचा नाहीं. कित्येक जागीं प्रकाश दिसतो अशा प्रकारें कीं, त्या उजेडांतून आकाश देखील कित्येक जागीं दिसते. बहुत करून विजयानगरचीं मनुष्यें भयाभीत होऊन तर्फेतर्फेचे गावोंगांव परागंदा झाली. कित्येक मनुष्यें अशाप्रकारचे विवरांचे आश्रय करून राहून त्या विवरांतच प्रपंच करित होते. जे जे समुदाय विवरांत घुसून दिवस घालवित होते तीं मनुष्यें रात्रीं पर्वताचे विवरांतून बाहेर येऊन पाणी

व गल्ला व प्रपंचसंबंधी जे जे जिन्नस लागतील ते ज्या ज्या मनुष्यास ज्या ज्या जागीं माहिती होती तेथून घेऊन विवरांत जात होते. मुसलमान लोकांस ही खबर लागली. तेव्हां मुसलमान लोक त्या लोकांस धरण्याकरितां वाटा धरून टपून बसत होते. जेव्हां तीं मनुष्यें विवरांतून बाहेर येत होतीं तेव्हां त्याजला पकडून मुसक्या बांधून नेत होते. त्या मनुष्यांपासून कांहीं घेतल्यासिवाय त्याजला सोडित नव्हते. असेंच रफिउद्दीन शिराजी, कीं तो त्या प्रकर्णांत होता, तो आपलें वर्तमान सांगतो कीं, मलाही असाच प्रसंग आला होता, कीं एके दिवशीं विजयानगरवाले विवरांतून बाहेर पडले. त्यांपैकीं दोनचार गृहस्थ मी पकडले होते. त्या मनुष्यांस फार इजा दिल्यानंतर बोलले कीं, अमक्या पर्वतांत एक विवर आहे, कीं त्या विवरांत माझी बायकामुलें व माल एकंदर पदार्थ आमचे आहेत. जर करितां आम्हांस जिवें न माराल तर तेथपर्यंत आमचे समागमें या, म्हणजे तुम्हास बहुत द्रव्य देतो. संपूर्ण मनुष्यांस आशा लागली आहे. वास्तव आम्हीं कित्येक मनुष्यें जमून त्यापैकीं लोकांस घेऊन त्या विवरांत चाललों. जेव्हां थोडासा मार्ग चालून गेलों तां बहुत झरोके दिसों लागले, कीं हरएक झरोक्याने मार्ग निरनिराळे जात होते. तें पाहून आम्ही विचारांत पडलों कीं, न जाणों परत येते वेळेस मार्ग सांपडणार नाहीं. वाट चुकूं किंवा याच विवरांत घाबरून राहूं किंवा या मनुष्यांचे हातीं सांपडून कैद होऊं व जिवें मारले जाऊं. याजकरितां सावध होऊन कित्येक कोळसे घेतले व दोन तीन समया दीप लावून उजेडाकरितां घेतल्या. विवरांत चालूं झालों. जागोजाग धोंड्यावर बोटानीं खुणा करित होतों. कारण कीं, परत येते वेळेस याच खुणावरून परत बाहेर येऊं व वाट चुकणार नाहीं. जेव्हां पुढेंसे गेलो तां पाहिलें कीं, कित्येक जागीं बहुत अंधार पडला आहे व कित्येक जागीं मस्तकावर झरोक्यांतून उजेड दिसत होता. अशा प्रकारें, कीं आकाश देखील दिसत होतें. स्वच्छ प्रकाश दिसत होता, कीं आनंदानें खुशाल वाट चालावी. सरासरी कोस सव्वा कोसपर्यंत असेच त्या भयंकर विवरांत गेलों. एके जागीं जाऊन पोंहोंचलों कीं, त्या टिकाणी आंत शिरण्याचे झरोके लहान होते. त्या झरोक्यांतून चार गजपर्यंत मोठे संकटानें बसून व घुसून चालून जावे लागते. ते दोघे कैदी, कीं त्यांचे दंडास काढण्या लाऊन आम्हीं मुसक्या बांधल्या होत्या ते, त्या लहान झरोक्यांतून आंत निघून गेले. आम्ही मनांत आणिलें कीं, त्यांचे पाठीमागून आपणही जावें. मोठा ओरडा झाला व विवराचे आंतून बहुत मनुष्यांचा गलबा ऐकूं आला. शस्त्रांचे आवाजही ऐकूं येत होते. त्या दोघा गृहस्थांचे दंडास काढण्या लाविल्या होत्या त्याही त्याणीं आंतल्या आंत तोडून टाकिल्या. दोघे गृहस्थ आंत निघून गेले व गलबा होत होता तो अधिकच झाला. त्यावरून आम्ही जाणिलें कीं, या विवरांत मनुष्यें फार आहेत. असें जाणोन आम्ही भयाभीत झालों, कीं जर करितां या विवरांत आपण जरासे पुढें चालून गेलों तर ते सर्व आम्हांवर चालून येऊन आम्हांस धरतील, जुलुम करतील, आम्हांस

कैद करितील किंवा जिवें मारतील. अल्प द्रव्यासाठीं आपला जीव द्यावा लागेल. असें जाणून निरुपाय होऊन, निराशा व नाउमेद होऊन तेथून परतलों. ज्या मार्गानें दगडावर काळ्या कोळशाच्या खुणा करित आंत आलों होतों तोच मार्ग धरून जिवंत बाहेर आलों. त्या जिल्ह्यांतील संपूर्ण पर्वतांस बहुतकरून याच प्रकारचे झरोके, विवरें व खळगे आहेत. विजयानगरचे संनिध अनागोंदी म्हणोन एक मोठा कसबा आहे. तसेंच विजयानगरचे आसपास मोठमोठीं धरणें पाण्याची आहेत. आदिलशाहा याणीं विजयानगरची खराबी केल्यानंतर त्या कसब्यांत इमारती केल्या, कसबा मोठा वसविला आणि कौल दिला. आपलेकडील गुमास्ता तेथें नेमून वसाहत करण्याविषयीं आज्ञा केली. कित्येक दिवसांत तो कसबा आबादान जाहाला. रयत लोक व सुखवस्तु त्या कसब्यांत येऊन त्या कसब्याची भरवस्ती करिते झाले. यानंतर तीन वर्षेपावेतों रामराज याचा पुत्र, कीं जो त्या युध्द प्रलयांतून वाचून एके विवरांत, कीं तें विवर त्या किल्यापासून सात आठ कोसांवर प्रसिध्द आहे त्या विवरांत, धुसून आपले कुटुंबाचे माणसांसुध्दां दिवस घालवित होता तो मध्यरात्रीं त्या विवरांतून बाहेर पडून तो किल्ला घेतां झाला. त्या कसब्यावर मालक झाला. आदिलशाहाकडील गुमास्ते होते त्याजला त्या कसब्यांतून बाहेर हांकून लाविले. रफीउद्दीन षिराजी याचे म्हणण्यांत आहे कीं, हा वेळपर्यंत, कीं तारिख १०१७ एक हजार सतरा (१६०८–१६०९ इ. स.) पर्यंत, रामराज याचा पुत्र बायकांमुलांसुध्दां त्या किल्यांत राहिला आहे. त्या किल्याचा, कसब्याचा व त्या कसब्यांतील तर्फेतील गांवांचा वसूल घेऊन प्रपंच करित आहे. रामराज युध्दांमधें मृत्यु पावला. त्याचे मरणाची तारिख कित्येक विद्वानांनीं कित्येक प्रकारें वर्णिली आहे. ते प्रकार " फतेहुदीन मर्गेलईन : " याचा अर्थ मुसलमानाचे धर्माची फत्ते झाली व रामराज मेला असा होतो. हींच अक्षरें अबजदचे हिशेबानीं गणिलीं असतां रामराज मृत्यु पावल्याची तारिख ९७२ ( १५६४–१५६५ इ. स. ) निघती.[६] गुलाम अल्ली इस्तराबादी हा महंमद कासम फिरिश्ता याचा बाप मोठा चतुर झाला. त्याणीं रामराज युध्दांत वारल्याची तारिख लिहिली कीं, ' कतल रामराज, ' याचा अर्थ मृत्यु पावला असा होतो. कतल रामराज इतकीं अक्षरें पारसी अक्षरांनीं लिहून त्या नावांचे अक्षरांतील जीम हें अक्षर टाकिलें म्हणजे बाकीचीं अक्षरें अबजदचे हिशेबानीं गणिलीं असतां ९७२ ( १५६४–१५६५ इ. स. ) अंकाची बेरीज येते. या तारिखेस रामराज मेला. रामराज कत्तल केल्यानंतर, म्हणजे जिवें मारल्यानंतर धाक पडण्याकरितां व भयाभीत होण्याकरितां रामराजाचें कापलेलें मस्तक पहावयाकरितां इमादुल्मुल्क पादशाहाकडे पाठविलें. कारण कीं, इमादुल्मुल्क हा मुसलमान पादशाहा असून अली आदिलशाहाचे जमातीस साह्य झाला नाहीं. निजामशाहाचे तालुक्यांत लुटालुट करून दंगा करित होता, यास्तव रामराजाचें मस्तक त्याजकडे पाहण्याकरितां पाठविलें. अली आदिलशाहाची तारिख ' शमसीर अल्ली बुर्द ' याचा अर्थ हा अहो

कीं, अली आदिलशाहाची तरवार श्रेष्ठ होती असा अर्थ होतो किंवा अल्ली आदिलशाहाची तरवार होती असाही अर्थ होतो व असा होतो कीं अल्ली आदिलशाहाची तरवार अल्ली पैगंबर याचे तरवारीप्रमाणें होती. अक्षरें अब्जदचे हिशेबानीं गणिलीं असतां अली आदिलशहाची फत्ते जाल्याची तारिख ९७२ (१५६४–६५ इ.स.) निघती. हीच फत्ते जाल्याची तारिख होय. कारण कीं, रामराज मेला तेच वेळेस आदिलशाहाची फत्ते झाली. सबब त्याचे मरणाची व आदिलशाहाची फत्ते होण्याची एकच तारिख आली.

## १२. निजामशाहा व कुतुबशाहा यांणीं विजयानगरहून परत जाणें :

या पूर्वी मुसलमान पादशाहांमध्यें परस्परें करारमदार ठरले होते कीं, विजयानगरची फत्ते होऊन आपली फत्ते झाली म्हणजे चार किल्ले नामांकित, कीं त्यापैकीं रायचूर मुद्गल हे दोन किल्ले आदिलशाहास देवावे. जेव्हां आदिलशाहाचे मनोरथ पूर्ण झाले तेव्हां बाह्यात्कारानीं निजामशाहा व कुतुबशाहा या उभयतां पादशाहानीं तिमराज याजकडे वकील पाठविले आणि चार किल्ले इकडे हवालीं करून द्यावे म्हणून सांगून पाठविलें. तिमराज मी किल्ले देत नाहीं असे म्हणत होता. हे उभयतां पादशाहा लढाईस तयार होऊं लागले. आदिलशाहा यांणीं या कामांतील भाव समजून चिंतेत पडला. परिणाम असा दिसून आला कीं, निजामशाहा व कुतुबशाहा हे उभयतां पादशाहा आदिलशाहास किल्ले देविण्याविषयीं यत्न करित नाहींत. किल्ले आदिलशाहास देवावे असा यांचे मनांतील भाव नाहीं. उगाच बाह्यात्कारी भाव दाखवितात. नाहीं पेक्षां किल्ले मी हवाली करित नाहीं असें म्हणण्याचे तिमराज याचे काय सामर्थ्य आहे! तेव्हां हेच तिमराजास शिकवितात. किल्ले तुम्हीं देऊं नका असें तिमराजास शिकऊन बाह्यात्कारी तिमराज किल्ले देत नाहीं यास्तव त्यांशीं लढाई करावी असा भाव दाखवितात. यांतील कारण हें आहे कीं, किल्ले आदिलशाहास द्यावयाचा पूर्वीचाच करार आहे हें खरें. परंतु हालीं त्या उभयतांचे मनांत आलें कीं, हे मोठमोठे किल्ले आदिलशाहास दिल्यास व आदिलशाहा या किल्यांचा धणी झाल्यास आदिलशाहाची दौलत व ऐश्वर्य फारच वाढेल. या योगानें आदिलशाहास अधिकच सामर्थ्य येईल. मग आदिलशाहापुढें ठरण्याचे सामर्थ्य आम्हांस राहणार नाहीं. जेव्हां ही गुप्त मसलत प्रगट झाली तेव्हां निजामशाहा भयाभीत झाला, कीं जर करितां आदिलशाहा आपणाशीं बदलून वैरभावानें आपलेवर उलटल्यास आपल्या मुलुकास सुरक्षित परत देखील जाऊं देणार नाहीं. बहुत कठीण प्रसंग येईल. यास्तव निजामशाहा यांणीं परत जाण्यास

आदिलशाहापासी निरोप मागण्याविषयीं एक खोटें निमित्त रचून कित्येक खोटीं नवीन पत्रें लिहून तयार केलीं आणि आदिलशाहाकडे पाहवयास पाठविलीं. निरोपही सांगून पाठविला कीं, अहमदनगराहून पत्रें आलीं आहेत कीं, इमादुल्मुल्क पातशाहा वगैरे यांणीं आमचे अहमदनगरचे सरहद्दींत येऊन बहुत खराबी करित आहेत. सरकारचे मर्जीस आल्यास आम्हांस परत जाण्यास रजा देण्याविषयीं आज्ञा व्हावी, म्हणजे तिकडे जाऊन बंडखोर लोकांचे पारपत्य करूं. असा निरोप पाठविला. आदिलशाहा यांणीं जाणिलें कीं, हे पादशाहा येथें राहिले असतां किल्ले वगैरे घेणेचे आपले कामाची नासाडी करितील. यास्तव निजामशाहा व कुतुबशाहा व अली बरीद यांजला आपले मुलुकास परत जाण्याविषयीं रजा देण्याचें ठरऊन निरोप देण्याकरितां भेटीची कचेरी केली आणि सर्वांस परत जाण्याकरितां निरोप दिला. तेव्हां ते बहुत संतोषानें, आनंदानें व मोठे समाधानानें एकमेकांचे निरोप घेऊन एकमेकांस विचारून निघते झाले. कुतुबशाहा आपले मुलुकास जाता झाला. निजामशाहा अहमदनगरास जाता झाला.

## १३. आदिलशाहा यांणीं सावकाशपणें व सुलभपणें चार किल्ले हस्तगत करणें आणि विज्यापुरास परत येणें :

हे पादशाहा निघोन गेल्यानंतर आदिलशाहा यांणीं रायचूरचे किल्ल्यावर फौज घेऊन जाऊन हल्ला केला. किल्ल्यांतील राहणारांस थकविलें. किल्ल्यांतील माणसांस दाणा व पाणी मिळेनासें झालें, तेव्हां निरूपाय झाले. कोणीकडूनच दाणापाण्याची मदतगारी होईल अशी आस्था राहिली नाहीं. किल्ल्याचे तर्फेतर्फेतील संपूर्ण अमीर लोक व सरलष्कर वगैरे सर्वत्र कौल देऊन आदिलशाहास रूजू झाले. सर्वांनी आदिलशाहापाशीं जाऊन आम्ही आपले चाकर आहों असें म्हणोन मुजरे करून पायांवर मस्तकें ठेविलीं. तेव्हां आदिलशाहानीं या सर्वांस पादशाही चालीनें अभय देऊन संतोष केले. सर्वांस मोठमोठे किंमतीचे पोशाख देऊन सत्कार केले. ज्या ज्या लोकांकडे जे जे गांव पूर्वीपासून होते तें त्यांचे त्यांजकडे हवाली केले. त्या लोकांनींही सेवकपणा धारण करून आशेंत राहिले. चारीही किल्ल्यावरील लोक कोणीकडूनही मदत येत नाहीं, निराशा झाली, असें समजून अली आदिलशाहा याचे दैवाचा उत्कर्ष व मनोरथाची पूर्णता या प्रकारची पाहिली. तेव्हां ते च्यारीही किल्ल्यांवरील राहणारे लोक सेवकपणाचे मार्गानें आदिलशाहापासी येऊन पायांवर मस्तकें ठेविलीं. चारीही किल्ल्यांचे कुलुपांच्या किल्ल्या आदिलशाहापासी नजर केल्या, म्हणजे दिल्या. आदिलशाहा यांणीं त्यांजलाही कृपावंत होऊन पादशाही चालीनें मोठे मोठे किंमतीचे पोशाख

देऊन सत्कार केले. आदिलशाहा यांणीं आपलेकडील नवीन कामदार त्या लोकांबरोबर देऊन किल्यांवर पाठविले. किल्यांचा बंदोबस्त नीट राखावा म्हणोन व किल्ल्यांतील इमारतीची दागदुजी नीट राखावी म्हणोन ताकीद केली. हा बंदोबस्त केल्यानंतर आदिलशाहा यांणीं खुद जातीनें ऐश्वर्य घेऊन त्या चारीही किल्ल्यांवर जाऊन किल्ले पाहिले. किल्ल्यांचे इमारतींची पडझड नीट करून किल्ल्यांची मजबुती फार राखावी म्हणोन आपलेकडील कामदारांस साफ ताकीद करून यशस्वी लष्कराच्या ढाला विजापुराकडे निघण्यास फिरविल्या. जेव्हां अति आनंदानें व पूर्ण संतोषानें विजापुरास येऊन पोंहचला तेव्हां ईश्वरानीं या प्रकारची कृपा केली यदर्थी धर्म करण्याकरितां खजिन्याचे दरवाजे उघडून गोरगरीब फकीर लोक व संपूर्ण सुखवस्तु लोकांस अत्यंत धर्म करून संतोष केले. सर्वांस असे तालीवार केले कीं, सर्वत्र लोक रात्रंदिवस आनंद करित होते व संपूर्ण संतोषांत व सुखांत दिवस घालवित होते.

### १४. अल्ली आदिलशाहा यांणीं किष्वरखान याजकडून विजापूरचा किल्ला बांधविणें व सदरहू किष्वरखान याजकडूनच जुमा मसीद बांधवणें व शहरांत नळ बांधून पाणी आणणें :

जेव्हां ईश्वराचे कृपेंकरून अली आदिलशाहा याची दौलत व ऐश्वर्य वाढलें तेव्हां चहूंकडील जागोजागचीं पृथ्वीतींल मनुष्यें पादशाहाचे दरबारांत जमलीं आणि कोणते वेळेस काय होईल असें या कालचक्राचे भयास्तव विजापुरचा आश्रय जोडून संसार व प्रपंच स्वस्थ व सुखानें करित होते. परंतु शत्रूच्या भयाचा धाक निरंतर वागवित होते, कीं न जाणों शत्रू लोक जमात जमऊन अहमदनगरचे प्रकर्णाबद्दल सूड घेण्याकरितां येतील. कारण कीं, आदिलशाहा यांणीं दोन वेळ फौज घेऊन जाऊन अह्मदनगरची खराबी व धुळदशा करून टाकिली होती. सबब हें वैर मनांत येऊन वैरी लोक चालून येतील याजकरितां आदिलशाहा यांणीं शहराभोंवती मजबूत चुनेगच्ची व धोंडे घालून कोट बांधिला. या कोट बांधण्याचे कारखान्याचे कामावर मुख्य कामदार किष्वरखान याजला नेमिला. संपूर्ण गांवोगांवचे गवंडी बहुत चतुर व पाथरुट जलद धोंडे घडणारे बोलावून बहुत शहाणे व कुशल कामदार मनुष्यांची जमात जमविली. त्यावर देखरेखीस कामगार गुमास्ते नेमून कोटाचे हरएक तुकड्यावर सरकारांतून एक एक सरदार अमीर लोकांपैकीं नेमिला. तेव्हां किष्वरखान यांणीं या कामांत फार यत्न करून व बहुत श्रम करून अडीच वर्षांत शहराभोंवती कोट तयार केला. कोटाचा घेरा सहा फरसख जाहाला. फरसख या शब्दाचा अर्थ कुंबुललुगांत व कंजफलुगांत व मुंतखबुललुगांत व बुरहान काते व ज्याहानगिरी इतके ग्रंथांत पहातां

एक फरसखचे तीन मील व एक मील जलद चालणारे उंटाचीं चार हजार दोनृशें वीस पांवडें. उंटाचे एक पांवडांत एक गज व एक गजाचीं बोटें चोवीस. परंतु तळाथासी लाऊन जेथून बोटांचा आरंभ असतो तेथुनच रूंदीचे जागेची चोवीस बोटें व चार बोटांची एक मुठ व साहा मुठींचा एक हात असें वर्णिलें आहे. कोटाच्या भिंतीची रूंदी आठ गज व कोटाचे भिंतीची उची वीस गज व बुरजांची संख्या एकशेंवीस व हरएक बुरुज मजबूत व पक्के किल्ल्यासारिखे आहेत. सहा हजार कंगोरे कोटाचे घेन्यावर काढिले आहेत. कोटास सत्तर चोरदिंड्या जरुरीचा समय आलेस उपयोगी पडाव्या याजकरितां राखून पुनः धोंडे व चुना घालून मजबूत करून टाकिल्या आहेत. कोटास सहा दरवाजे ठेविले आहेत. जो दरवाजा किल्ल्याकडे तोंड करून केला आहे त्या दरवाज्याचें नांव मक्का दरवाजा असें प्रसिध्द आहे. बाकीचे दरवाजे, कीं ज्या ज्या दरवाज्यानजीक जा गावें आहेत त्या त्या गांवाचे नावांनीं प्रसिध्द आहेत. कोटाभोंवते खंदक बहुत रुंद व खोल असे खंटले आहेत, कीं त्या खंदकांतील पाणी कधींही कमी होत नाहीं. कोट बांधण्याचें काम सन ९७३ ( १५६५-१५६६ इ. स. ) सालीं शेवटास गेलें. अमीर लोक व वजीर लोक द्रव्यवान व साहुकार लोक व संपूर्ण मनुष्यानीं निर्भयपणें इमारती बांधणें आरंभिलें. मोठमोठे वाडे व हवेल्या बहुत मेहनतीनें बांधिल्या. जो किल्ला अली आदिलशाहाचा बाप इब्राहिम आदिलशाहा यांणीं किल्ल्याभोंवते दोन कोट व दोन खंदक पाण्यानें भरलेले असा बांधिला आहे तो किल्ला शहराचे मध्यभागीं आहे. शहरचे कोटांतील मोटमोठ्या बागा करणें आरंभिल्या. थोडकेच दिवसांत त्या बागांचें काम शेवटास जाऊन बागा तयार झाल्या. पहिले बागेचें नांव इब्राहीमची बाग असें ठेविलें. असें नांव पडण्याचें कारण हें आहे कीं, बारा बाग लहान लहान पुर्वीचे होते. ते एका बागेंतच जमविले. सबब बारा इमामाची बाग असें नांव पडलें. दुसरें बागेचें नांव उलवीची बाग असें ठेविलें. तिसरे बागेचे नांव अल्लीची बाग असें ठेविलें. अमीर लोक, दौलतींतील कारभारी लोक वगैरे हरएक कोणी सर्वांनीं आपआपले घरासंनिध चित्त समाधानाकरितां व शोभेकरितां बागा केल्या. शहराभोंवतेही आसपास बहुत बागबगीचे झाले, कीं त्या संपूर्ण बागेंतून नाना प्रकारची फळफळावळ थंडीचे हंगामांतील व उष्णकाळचे हंगामांतील बहुत मिळतात. किष्वरखान यांणींही अली आदिलशाहा याचे हुकूमावरून पाण्याचा नळ पांच कोसावरून मार्गानें जागोजाग कठीण कठीण धोंडे फोडून, धोंडे घडऊन, शहरांत नळ बांधून आणून किल्यानजिक मोठा हाऊद बांधिला आहे. त्या हौदास कारंजे असे म्हणतात. सर्वदां पाण्यानें भरलेला आहे. शहरची संपूर्ण मनुष्यें त्या हौदाचे पाणी नेऊन तृप्त होतात. विजापुरचे पाणी व हवा पूर्ण सामर्थ्यदायक व समसमान आहे, म्हणजे विजापूरचे पाण्यानें व हवेनें मनुष्यांस बळ अधिक येतें. प्रकृति न बिघडतां नीट रहातात. विज्यापुरांतील राहणारे लोक सर्वकाळ आरोग्य व प्रकृतीचे असतात. जठराग्नि प्रदिप्त

राहून क्षुधा म्हणजे भुक बहुत लागती. शहराबाहेर मोठा कसबा भर वस्तीनें आबादान झाला आहे. असें वाटते कीं, हा कसबा मोठे एक बंदरच झालें आहे. त्या कसब्याचें नांव शाहापूर असें आहे. चहूंकडील तर्फेतर्फेकडून हरएक मुलकाचे सौदागर लोक हरएक प्रकारचे जिन्नस आणून, शाहापुरांत विकून, तेथें आणखी नाना प्रकारचे जिन्नस खरेदी करून, जागोजाग विकावयास नेत होते. उंच उंच किंमतीचे बहुत जिन्नस शाहापुरांत उत्पन्न होतात. ज्या वेळेस हा कसबा वसला तेव्हां विजापुर शहरास व या कसब्यास अडीच कोसांचें अंतर होतें. हलीं तो कसबा विजापुर शहराशीं मिळून गेला आहे. प्रथमचे अंतराची खुण हीच हौद व खंदक आहेत. मुलकामुलकाचे हुन्नरमंद म्हणजे गुणवान मनुष्यें व बहुत लोक जमले. या कारणास्तव नाना प्रकारचे जिनस उत्पन्न होतात व जुमा मसीद, ही किष्वरखान यार्णाच कारखान्याची देखरेख ठेऊन, बहुत थोर व मजबूत व शोभायमान बांधली, कीं त्या मसिदीचे मजबुतीस व उत्तमपणाचे साम्यतेस दृष्टांतच नाहीं. अशी अनुपम्य जुमा मसीद तयार झाली.

## १५. आदिलशाहा यार्णी कर्नाटकावर फौज पाठवणें व निजामशाहा यार्णी वगैरे वैरत्वावर उठणें :

विजयानगरची खराबी केल्यानंतर व रामराज युध्धांत मेल्यानंतर विजयानगरचे ताब्यांतील संपूर्ण मुलुक श्रीकृष्णातीरापासून लांब रुंद सेतुबंध रामेश्वरापर्यंत बहुत विस्तीर्ण होता. तो हरएक अमीर लोक व फौजदार व हरएक गांवचे किल्ल्यांचे किल्लेदार होते. ज्या ज्या कडे जे जे गांव किंवा किल्ले व मुलुक होते त्यार्णी ते ते जुलमार्नी आपणच बळकाऊन त्या त्या जागेचे मालक आपणच होऊन त्या स्थानावर मजबुतीचा झेंडा उभा करून जागोजागचे पादशाहा आपणच होऊन एकमेकांशीं नम्रतेनें वागत नव्हते, म्हणजे कोणी कोणास मानित नव्हते. रामराजाचा भाऊ तिमराजही पिलगुंड्यांत राहून थोडासा मुलुक हस्तगत करून थोडक्यांतच संतोष मानून दिवस गुजरित होता. जेव्हां अली आदिलशाहा पादशाहावर ईश्वराची कृपा होऊन आदिलशाहाचे मनोगतानुरूप दौलत व ऐश्वर्य प्राप्त झालें तेव्हां कित्येक दिवस आनंदांत व संतोषांत घालऊन संपूर्ण मनुष्यास आपले बहुत बक्षिस व देहनगीचे छायेखालीं सुखरूप व आनंदांत ठेवीत होता. कित्येक दिवसानंतर पुनः युध्ध करणें व लढाई करून मुलुक घेण्याचा संकल्प आदिलशाहाचे मनांत आला. इछिलें कीं, खुद जातीनेंच पिलगुंड्याकडे जाऊन युध्ध करून शातीधर्माचा व दौलतीचे पादशाही हुकुमाचे झेंडे उभे करावे. असें मनांत आलें तेव्हां पूर्ण विश्वासू मदारुल महाम किष्वरखान याणी विनंती केली कीं, हिंदु लोकांचे मुलुकांत असा कोणी दौलतदार

पादशाहा नाहीं कीं, तिकडे फौज घेऊन आपणच जातीनें जाणें प्राप्त आलें. पादशाही तख्तासंनिध उभे राहणारे सेवकांपैकीं कोणतेही एका सेवकास आपण आज्ञा करितील तो सेवक हें काम करील. असी विनंती केली तेव्हां आदिलशाहा याणीं हा मतलब मनांत आणून सिपहसालार किष्वरखान याजला सिपहसालरी हा हुदा देऊन वीस हजार स्वार हत्यारबंद तरवार लावणारे समागमें देऊन तिकडे रवाना केला. जेव्हां ही खबर तिकडील पादशाहाचे ऐकण्यांत आली तेव्हां कुतुबशाहा याणीं गोड बोलणारा वकील निजामशाहाकडे रवाना करून निरोप पाठविला कीं, विस्तीर्ण मुलुक, कीं ज्यांत सुवर्णाच्या वगैरे खाणी आहेत असा बहुत वसुलाचा मुलुक, विजापुरचे दक्षणचे बाजूस आहे त्या मुलुकास कोणी दौलतदार सामर्थ्यवान धणी नाहीं. हल्लीं ऐकण्यांत येतें कीं, आदिलशाहा याणीं फौज देऊन युध्धाकरितां किष्वरखान याजला तिकडे रवाना केला आहे. आदिलशाहाकडे इतका मुलुक हल्लीं आहे तोच आम्हांस आदिलशाहा पुढें ठरणें कठीण आहे आणि हल्लीं जो मुलुक घेण्याकरितां किष्वरखान गेला आहे तोही मुलुक आदिलशाहाचे हातीं लागल्यास आदिलशाहाचे सामर्थ्य व ऐश्वर्य फारच वाढेल. मग आम्हांस त्याची सेवा करणें प्राप्त येईल. या संकटांत पडावें लागेल. आतां ती युक्ती बरी आहे कीं, या समयीं फौज घेऊन आदिलशाहाचे मुलुकावर चालून जावें. जर करितां प्राप्ती झाल्यास कांहीं मुलुक आदिलशाहाचा आपण घेऊं. हें न झाल्यास किष्वरखान फौज घेऊन मुलुक घेण्याकरितां गेला आहे तो तरी आपले धाकानें मुलुक न घेतां माघारा परत जाईल. या योगानें आदिलशाहाची दौलत व ऐश्वर्य वाढणें बंद होईल. निजामशाहा याजला कुतुबशाहाची मसलत बहुत पसंत येऊन वराड देशचे मालकास म्हणजे कुतुबशाहास आपलासा करून उभयतां एकत्र होऊन विजापुरचे मुलुकावर चालून आले.

### १६. आदिलशाहाचे मुलुकावर तिघेही पादशाहानीं फौज घेऊन चालून जाणें व किष्वरखान याणीं करनाटकाहून परत येणें व तिघेही पादशाहाची शिकस्त होणें :

निजामशाहा, कुतुबशाहा व मदारुल महाम इमादुलमुल्क पादशाहाचा पुत्र तफावलखान हे तिघेही पादशाहा एकत्र होऊन आदिलशाहाचे मुलुकावर फौज घेऊन चालून आले. आदिलशाहास हें वर्तमान कळतांच त्या तिघाही पादशाहांवर अति त्वरित, किंचितही विचार न करितां, विजापुराहून निघोन त्या पादशाहांचे मार्ग धरण्याकरितां सन्मुख चालून गेला. शाहादुर्गचे किल्ल्यावर जाऊन राहिला. त्या तिघाही पादशाहास हे वर्तमान कळलें. तेंव्हां शाहादुर्गाकडून येण्याचा रस्ता सोडून दुसरे मार्गानीं शाहरानजीक येऊन पोंहचून शाहापुरचे हौदावर येऊन उतरले. मनांत असें आणिलें कीं, एवढें शहर भर वस्तीचे व या शहरांत बहुत मनुष्यांचा समुदाय असें आबादान असून

या शहरांत शहरचे बंदोबस्ताकरितां फौज व लष्कर कांहींच ठेविलें नाहीं. शहराचे भोंवते जे ज किल्ले आहेत त्यां किल्ल्याचें काम अद्यापि शेवटास गेलें नाहीं. याजकरितां हें शहर सहज हातीं लागेल असा संकल्प करून चालून आले. आदिलशाहा तर पूर्ण मजबुदी व बंदोबस्त करण्यांत फार सावध होता. या तिघाही पादशाहाचें भय किंचितही मनांत न आणितां शाहदुर्गचे किल्ल्यावर जाऊन राहिला. फौज शहरचे बंदोबस्ताकरितां रवाना केली. आदिलशाहाकडील अमीर लोक यांणीं ते तिघेही पादशाहा येऊन पोंहचले नाहींत तों एक दिवस आधींच शहरांत येऊन पोंहचून बुरजांचा व किल्ल्याचा व वाड्याचा व दरवाज्याचा पक्का बंदोबस्त मजबूत ठेवणेंकरितां आपआपणांत वाटून घेऊन हरएक दरवाज्याचा बंदोबस्त ठेविला. खास निशाणाकडील सहा हजार स्वार भालेकरी शहरचे मध्यभागीं ठेविले. याजकरितां कीं, ज्या बाजूनीं शत्रूबळ करितील त्या बाजूस त्या स्वारानीं मदत करून शत्रूचें पारपत्य करावें. त्यानंतर तिसरे दिवसीं ते तिघेही पादशाहा फौज तयार करून शहरानजिक येऊन पोंहचले. शहराभोंवते फिरूं लागले. कारण कीं, ज्या जाग्यांहून संधी सांपडेल व जेथून रिघाव होईल तेथून गर्दी करून शहरांत यावें, यास्तव सभोंवते फिरत होते. जेव्हां किल्ल्याचे बाजूनीं थोडासा मार्ग चालून शहराकडे आले तों किल्ल्यावरून तोफ डागिली. त्या तोफेचे गोळ्यानीं एक हत्ती व दोन घोडे जायबंदी झाले. तेव्हां सारवड दरवाज्याकडे नजीक येऊन पोंहचले. तेव्हां कित्येक अमीर लोक त्या दरवाज्याचे बंदोबस्तावर होते ते शत्रूवर चालून जाऊन थोडेसें युध्द करून आपले जाग्यावर परत आले. नंतर ते पादशाहा शहराभोंवते फिरत फिरत मनगोळी दरवाजानजीक येऊन पोहचले. तेव्हां त्या दरवाजाचे बंदोबस्तावर जे शिपाई होते ते शत्रुवर चालून जाऊन त्या शिपायांनीं खुप लढाई केली. त्या शिपायांत एक सरदार हिंदु मनुष्य हिंदुराव म्हणोन आदिलशाहाचे फौजेपैकीं देवांगनासारिखें उड्डाण करून जाणारे दोन हजार घोड्यांचा धणी होता, कीं त्यापैकीं केवळ लहान लहान घोडीं होतीं तीं देखिल तीनशें होनांचे किंमतीचा होतीं. त्या हिंदुराव सरदारानें आपली फौज एकीकडे गुप्त राखून स्वतः जातीनें तीनशें स्वारांनिशीं शत्रूचे फौजेवर चालून जाऊन जंग गुरजी म्हणजे धाऊन जाऊन तोडातोडी करून परत यावें, आणि पुनः आणखी धाऊन तोडातोडी करावी, असा वरचेवर हल्ला करण्यास जंग गुरीजी असें म्हणतात, या प्रकारचें युध्द करून शत्रकडील फौजेंतील माणसांस ठार मारित होता. तों अशा समयांत ती गुप्त ठेविलेली फौज धांऊन येऊन शत्रूंवर जाऊन शत्रूंचे फौजेस मागून व पुढून शत्रू तोडातोडी करून युध्द केलें. लढाईत शत्रूकडील हत्ती व घोडे जे जे हातीं लागत होते ते ते आपले फौजेंत आणोन ठेवित होते. याप्रमाणें कित्येक कोसपर्यंत भर उन्हांत मारित ठोकित नेलें. शत्रूंकडील फौजेस पाणी कोठेंच मिळू नये येविषयीं पुर्वी बंदोबस्त ठेविलाच होता. त्यामुळें पाणी कोठेंच मिळेना व सुर्याचे उन्हाचा संताप सोसेनासा झाला. तेणेंकरून मनुष्यांत व

जनावरांत कांहींच सामर्थ्य व शक्ती राहिली नाहीं. प्राण जाण्याचा समय आला. अशा समयांत एकाएकीं दुरून शत्रुकडील फौजेची दृष्टी इलाहपुरचे हौदावर गेली. तेव्हां शत्रूंचे फौजेंतील स्वारांचे मनांत आलें कीं, त्या हौदावर जाऊन पाणी प्यावें. तों कामीलखान व नासिरुल्मुल्क व मीर महंमद मुकरबखान हे इलापुरचे दरवाजाचे हवालदारापैकीं होते. त्यांणीं जलदी करून त्या स्वारांस पाणी न मिळे असा हौदाचा पक्का बंदोबस्त केला. उन्हानें व तान्हेनें स्वार व घोडे थकले. तेव्हां आदिलशाहा याजकडील अमीर लोकांनीं ही अवस्था ओळखून त्या शत्रूचे फौजेचे सभोंवते वाटा धरून लुटालुट करण्यास आरंभ केला. धरा धरा व मारा मारा म्हणोन हरळ्या देऊं लागले. शत्रूंकडील फौजेंतील कित्येक अमीर लोक ठार झाले. कित्येक जखमी झाले. कित्येक कैद झाले. कर्मधर्मसंयोगें इतक्यामध्यें पूर्व दिशेकडून मोठा धुरळा उठला. त्या धुरळ्यांतून फौज दिसों लागली. शत्रूकडील व आदिलशाहाकडील दोनी फौजेस मोठा धाक पडला, कीं हे भगवान ही आणखी कोणाची फौज व कोणीकडून आली. जेव्हां ती फौज नजिक येऊन पोंहचली, तेव्हां किष्वरखान वीस हजार स्वारांनिसीं निर्मळ या गांवाहून परत येऊन शत्रूचें पारपत्य करण्याकरितां याच समयीं खुद्द जातीनें येऊन पोंहचला. तेव्हां आदिलशाहाकडील फौजेस किष्वरखान येऊन पोंहचण्याचें धैर्य व सामर्थ्य दुप्पट आलें. किष्वरखान व आपण मिळोन शत्रूंचे फौजेवर चालून जाऊन लुटालुट करून फडशा करणें आरंभिलें. दिडशें हत्ती व चार पांच हजार घोडे वगैरे बहुत सामान किष्वरखान याचे हातीं लागलें. निजामशाहा वगैरे शत्रूंचे फौजेची मोठी शिकस्त झाली; कीं या प्रकारचा मोड कधींच झाला नव्हता. मौलाना इनायतुल्ला हा निजामशाहाचा मोठा संभावित गृहस्थ नामांकित संनिध राहणारा व दौलतींतील मुख्य कारभारी होता. तो त्या गर्दींत पीरजाद या नांवाचा शिपाई आदिलशाहाकडील होता त्याचे हातीं सांपडून धरला गेला. परंतु इनायतुल्लाचा पुर्वीपासून पिरजाद शिपायाशीं स्नेह होता. यामुळें पिरजाद यांणीं मौलाना इनायतुल्लाहाचे अत्यंत संरक्षण करून आपला घोडा नव्या दमाचा होता तो इनायतुल्लास देऊन निघून जाण्यास वाट दाखऊन निजामशाहाचे लष्करांत रवाना केला. आणखीही मौल्लाना जमालुद्दीन म्हणोन निजामशाहाचा खजीन्यावरील मुख्य कामदार होता. तोही कित्येक सेवकांनिसीं कैद झाला. कामीलखान हा निजामशाहाचे पुरातन चाकरांपैकीं होता. तो यासमई आदिलशाहाचे दौलतीकडे येऊन मोठे पदवीस पाऊन सरलष्कर जाहाला होता. यास्तव त्यांणींही पुर्वीचे यजमानाचे म्हणजे निजामशाहाचे चाकरीचे इमानावर नजर ठेऊन ते संपूर्ण निजामशाहाकडील लोक कैद झालेले त्यारशीं मेवे मिठाइच्या वगैरे डाल्या समागमें देऊन निजामशाहाकडे पाठविले. कामिलखान यांणीं निजामशाहास निरोप सांगून पाठविला कीं, आपले फौजेवर मोठें संकट आलें होतें. सांप्रत आदिलशाहाचे फौजेस किष्वरखान येऊन पोंहचण्यानें सामर्थ्य व हुशारी व जोर एकपट होता तो

दसपट आला. मी सेवक आपला आहे. माझे हातून जितकें सामर्थ्य होतें तितकें आपले सेवेचे इमानावर दृष्टी ठेऊन यत्न केला. किष्वरखान यांणीं कदापिही कैद झालेली मंडळी सोडली नसती. आतां या गोष्टींत फार चांगलें आहे व हें बरें आहे कीं, आपण आजच आपले मुलुकास परत निघून जावें. सुरक्षितपणें या घातक स्थानापासून बाहेर जावें. हें न ऐकल्यास न जाणों घटकेंत नाना प्रकारचे खेळ करणारे कालचक्राचे खेळ पुनः उलटेल. मग आपणास बाहेर निघण्याचें देखिल सामर्थ्य राहणार नाहीं. असा निरोप सांगून पाठविला. त्यावरून निजामशाहा यांणीं कमालखानाची ही मसलत पसंत करून दुसरे दिवशीं आपलें संपूर्ण लष्कर घेऊन कूच करून आपले मुलुकास जातां झाला. तेव्हां किष्वरखान यांणीं आदिलशाहाचे संपूर्ण कारभारी लोकांस मसलत विचारली कीं, समय हाच आहे व अशी संधी पुनः प्राप्त होणार नाहीं. कारण कीं, शत्रु लोक शिकस्त होऊन परत जात आहेत. त्यांचें लष्कर संपूर्ण भयाभीत होऊन हवालदील जाहाले आहे. कोणांतच हिंमत राहिली नाहीं. बहुत जखमी व घाबरे झाले आहेत. जर करितां आपले विचारास आल्यास व आपण साह्य केल्यास मी त्या सर्वांस धरून आणतों. असें विचारिलें. तेव्हां शाहा अबदुल हसन वलद शाहा ताहेर व दुसरे कित्येक गृहस्थ या मसलतीस राजी झाले नाहींत आणि मना करणारे मात्र झाले. याजकरितां शत्रूंची फौज उलटून प्रबळ झाल्यास एकंदर दक्षणचें राज्य होईल असें बोलले. तेव्हां किष्वरखान हे कारभारी लोक मना करित असतां जातीनेंच आपली खासी जमात घेऊन त्यांचा पाठलाग केला. शत्रुचे फौजेस पाठीमागून व पुढून ठोकाठोकी करून कैदी लोक सुटून गेलेले होते ते आणखीही बहुत लोक कैद करून, ते कैदी घेऊन, घोडे व उंट वगैरे समान जें जें हातीं लागलें तें घेऊन, निजामशाहा वगैरे लोकांस त्यांचे सरहद्दींत घालविलें. शत्रुची फौज जेव्हां आपले मुलुकांत गेली तेव्हां किष्वरखान व शाहा अबदुल हसन वगैरे शाहादुर्गचे किल्ल्याकडे जाऊन आदिलशाहाची भेटी घेऊन मुजरे केले. तेव्हां पादशाहानी मोठ्या योग्यतेनें भारी किंमतीचे पोशाख किष्वरखान याजला दिले. किष्वरखान यास समागमें घेऊन पादशाहा आपले राजधानीचे स्थानास म्हणजे विजापुरास जाणेस निघाला. बहुत आनंदानें व यशस्वीपणानें मनोरथ पूर्ण होऊन विजापुरास येऊन पोंहचून आनंदांत व संतोषांत निमग्न होता झाला.

## १७. पुनः निजामशाहा वगैरे याणीं जमात जमवून फौज घेऊन आदिलशाहाचे इलाख्यावर चालून येणें :

शत्रूचे मनोरथ पूर्ण झाले नाहींत. वारंवार रदस्त होऊन लढाईत मोड झाले आणि अपेश आले. पुनः युध्ध करणेंही सोडित नव्हते. मोड होऊन परत आले कीं,

लागलेच वैरभाव व कपट मनांत येऊन आदिलशाहाचा नाश करण्याचा विचार करित होते. त्याप्रमाणें पुन: तिघेही पातशाहा एकत्र होऊन युध्धाची मजबूत तयारी करून आदिशाहाचे मुलुकावर चालून आले. तेव्हां आदिलशाहा यांणीं किष्वरखान याजला थोर थोर कित्येक अमीर लोक समागमें देऊन शत्रूचें पारपत्य करण्याकरितां रवाना केले. किष्वरखान यांणीं आहसनाबादचे किल्ल्याचा आश्रय धरून लढाईची तयारी केली. उभयतांत दररोज लढाई होत होती. उभयतांकडीलही बहुत मनुष्यें लढाईत ठार होत होतीं. एके दिवशीं शत्रू लोकांनीं आपआपणांत बेत ठरविला कीं, आज बहुत धैर्य धरून एकादिली करून लढून किल्ल्यावर हल्ला करून, आदिलशाहाकडील अमीर लोकांचे व किष्वरखान याचे वांकडे होते यामुळें, लढाईचे समयीं किल्ल्याचे माचीस शिरले. तेव्हां शत्रू लोकांस सधी सांपडली. लढाईस मजबूद होऊन सायंकाळ-पर्यंत युध्ध केलें. किष्वरखान खुद जातीनें शत्रूवर चालून जात होता. शेवटीं तिघा पादशाहापुढें एकट्याचा दम ठरेनासा झाला. तेव्हां किष्वरखान किल्ल्यानजिक परत येऊन पोंहचला. बाकी फौज खंदकाचा आश्रय धरून राहिली. किष्वरखान यांणीं किल्ल्यावरील लोकांस बहुत वेळ वारंवार ताकिद सांगून पाठविली कीं, किल्यावरून तोफा व बंदुकीची सरबती करावी. असें सांगून पाठविलें. परंतु ते किल्ल्यावरील लोक हे किष्वरखान याशीं वांकडेपणाच ठेवित होते. यामुळें त्या किल्यावरील लोकांनीं तोफा व बंदुकीची सरबती करणेंविषयीं ढिलाई केली. जेव्हां रात्रीचा समय येऊन पोंहचला आणि हरएक लोक जागोजाग निधोन गेले तेव्हां किष्वरखान यांणीं किल्ल्यावरील मुख्य मुखत्यार कामगारास त्याच रात्रीं धरून जीवें मारून टाकिला. जेव्हां हें वर्तमान आदिलशाहास कळलें तेव्हां तात्काळ आदिलशाहा यांणीं खुद जातीनें बहुत जलद जाऊन शत्रूंचे फौजेवर हल्ला केला. तेव्हां त्या शत्रु लोकांस आदिलशाहाचे पुढें युध्धास ठरण्याचें सामार्थ्य राहिलें नाहीं. यामुळें ते परत निघून जाते झाले. तेव्हां आदिलशाहा बहुत संतोष पावून अति आनंदानें विजापुरास जाता झाला.

## १८. किष्वरखान यांणीं महादुर्गचा किल्ला बांधणें, कीं तो किल्ला धारूर येथें प्रसिध्ध आहे. किष्वरखान ठार होणें. आदिलशाहा यांणीं पश्चाताप पावणें :

सिपहसालर किष्वरखान हा त्या काळांतील सर्व शूरांहून अधिक शूर व पराक्रमवान होता. दिवसेंदिवस मोठमोठीं उत्तम कामें व फत्तेहमंदिचीं कर्में अति उत्तम किष्वरखान याजकडून होत होतीं. आदिलशाहाकडून बक्षिस व इनाम दिवसें-

दिवस त्याजला मिळूं लागलें. ही चालच आहे कीं, ज्या ठिकाणीं ईश्वराचे कृपेंकरून पादशाहाचे मेहरबानगीनें ज्याचे दैवाचा उदय होईल व जो गृहस्थ संपूर्ण मनुष्यांत दैववान होईल त्यावर सर्वत्र कपटाची नजर ठेवितात. त्याचें अकल्याण व्हावें येविषई त्याचे घातास प्रवर्तक होतात. त्याचा उणापक्ष व्हावा यदर्थीं संपूर्ण लोक बहुत यत्न करितात. असी चालच आहे. दरबारचे संपूर्ण कारभारी व कामदार यांणीं किष्वरखानाचे कपटाचा वृक्ष आपलें चित्त तत्लक्षण शेतांत लाविला, म्हणजे संपूर्ण कारभारी लोक किष्वरखान याचे कपट वागऊं लागले, वांकडेपणावर उठले आणि वारंवार किष्वरखान याचे उगेच वांकडेपणाचे प्रकारानें सरकारचे कानावर घालित होते. याजकरितां किष्वरखान कंटाळून त्याणीं आपले कल्याणाचा मार्ग त्या गोष्टींत पाहिला कीं, या लोकांची सोबत सांडून दूर जाऊन राहून या लोकांचे वाईटपणांतून पार पडावें. गुप्तपणानें आदिलशाहाचे सेवेचे इमानावर नजर ठेऊन आदिलशाहाचे कामावर व आपले कीर्तीवर दृष्टी टेवावी. याजकरितां आदिलशाहास अर्ज करविला कीं, शाहादुर्गापासून अडीच कोसांवर निजामशाहाचे मुलुकासंनिध एका गावांत पुरातन किल्ला होता. त्या किल्याचे नांव महादुर्ग होते. त्या किल्यापैकीं हली कांहीं एक खुण देखील बाकी राहिली नाहीं. जर करितां आपली आज्ञा झाल्यास तो किल्ला पुनः नवीन थोडकेच दिवसांत मजबूत बांधून किल्याचें काम शेवटास नेईन. कारण कीं, त्या किल्याचे आश्रयानीं निजामशाहाचा मुलुक वारंवार घ्यावयास टीक पडेल. असा अर्ज केला. तेव्हां दरबारांतील कारभारी लोक हे विरुध्ध बोलूं लागले व कित्येक टीक आहे असें म्हणो लागले. तेव्हां आदिलशाहा यांणीं आज्ञा केली कीं, या प्रकर्णीं कुरानांत प्रश्न पाहिला पाहिजे. कुरानांत जसें निघेल तसें अमलांत आणावें. इतक्यामध्यें त्या कचेरींतील त्या जमातीमध्यें पुर्ण अक्कलवान व मोठा विद्वान मोठा मौलाना इऊनुद्दीन मकसुद सिराजी, कीं जो अफझलखान या नामे करून प्रसिध्ध होता तो तेथें हजर होता. आदिलशाहा यांणीं त्यास आज्ञा केली कीं, किष्वरखान विचारित आहे येविषयीं कुरान शरीफ मध्यें प्रश्न पहा. जेव्हां मशारनिल्हे अफलझलखान यांणीं यदर्थीं कुरानची किताब उघडली तेव्हां प्रश्न पाहिला तो ज्या पानावर प्रश्न पाहिला तो त्या पानाचे सफ्याचे वरलेच ओळींत घाताचा मजकूर निघाला. तेव्हां अफजलखान बोलला कीं, हें काम करूं नये. कारण कीं, हें काम केल्यास घाताशिवाय दुसरें फळ प्राप्त व्हावयाचें नाहीं. असें सांगितले असतां किष्वरखान आपला हट्ट सोडीचना. थट्टा करून बोलला कीं, प्रश्न सांगण्यांत कपटाचा संशय येतो. कारण कीं, अफजलखान हा निजामशाहा वगैरे शत्रु लोकांशी संबंध ठेवितो. यामुळें असें बोलतो. असें किष्वरखान याचें बोलणें ऐकून त्या कचेरींतील मंडळी बोलली कीं, कुरान हें काम मना करण्याविषईं आज्ञा करितें व ककमुल्ल म्हणजे ईश्वराचे वाक्य तें या कामास घात सुचवितें. किष्वरखान आपला हट्ट सोडित नाहीं असें सर्व बोलले. तेव्हां आदिलशाहा यांणीं आज्ञा केली कीं, किष्वरखान जाणें व कुरान जाणें. जें पाहिजे तें करो. होणें असेल तसें होईल. त्यानंतर

किष्वरखान बहुत अमीर लोकांसहित किल्ला बांधणेची तयारी करून महादुर्गाकडे जाता झाला. किल्ला बांधण्याविषयीं हुकुम करून एक एक बुरूज बांधण्याचे एक एक अमीर लोकांस सांगितलें. तेव्हां हरएकानीं किल्ला मजबूत बांधणेविषयीं अत्यंत यत्न करून मेहनत करूं लागले. परंतु आंकुसखान हा किष्वरखान याशीं सर्वाहून अधिक कपट व वांकडेपणा ठेवित होता. त्यानीं आपले आलगेंत म्हणजे आपले किल्ल्याचे भितीस दिंडी खिंडारासारखी ठावली. तात्पर्य थोडकेच दिवसांत किल्ला बांधणेचें काम शेवटास गेलें.[७] हल्लीं तो किल्ला धारून येथें प्रसिध्ध आहे. किल्ला बांधिल्यानंतर किल्याचें बंदोबस्ताचे तयारीकरितां तोफा व बंदुकी व मजनीम म्हणजे लांकडाची मोठी कळ करून, त्या कळींतून धोंडे व माती व अग्नि गोफणींतील धोंड्याप्रमाणें शत्रूंचे फौजेवर किल्यावरून उडवितात त्यास म्हणतात, त्या कळा व गोलंदाज वगैरे जागोजागचे किल्या-वरून आणून जागोजाग बंदोबस्ताचे कायद्याप्रमाणें रचना केली. किल्यांत किरकोळ सामान चाळीस हजार खंडी गल्ला किष्वरखान यानीं निजामशाहाचे मुलुकांतून लुटून आणून किल्ल्यांत जमा केला. निजामशाहा तर सर्व काळ आदिलशाही लोकांचे वैरतेचें बीज आपले चितांत पेरून त्या बीज्यास पाणी पाजीत होता, म्हणजे सर्वदा अधिकच वांकडे-पणा वागवित होता. हल्लीं किष्वरखान याचे दांडगाई करून अधिक अधिकच वांकडे-पणानें भरून युध्धाचे सामानाची व लष्कर जमविण्याची तयारी करिता झाला. यानंतर तिघेही पादशाहाकडील फौजेसहित निजामशाहा किष्वरखान याजवर चालून आला. तेव्हां किष्वरखान त्या तिघेही पादशाहांपुढें युध्धास ठरण्याची हिंमत धरून किल्ल्याचे बुरूज व बाऱ्या हत्यारानीं व दारूगोळयानीं मजबूत भरून आपण मोकाबल्यावर जाऊन युध्ध करण्याकरितां उभा राहिला. जें वर्तमान होईल त्या प्रकर्णी विनंतीपत्रें लिहून वरचेवर आदिलशाहाकडे रवाना करित होता. त्या पत्रांतील मजकूर असा होतां कीं, तिघेही शत्रू, म्हणजे निजामशाहा वगैरे, एकत्र होऊन, आपले फौजेसुध्धां चालून येऊन, लुटालुट व फंदफितूर व युध्ध करण्याचे विचारांत आहेत. याजकरितां सरकारास विनंती ही आहे कीं, दरबारांतील संपूर्ण अमीरलोकांस हुकूम व्हावा कीं, लष्करासुध्धा सिध्ध होऊन विद्युल्लतेसारखे अति त्वरित येऊन पोंहचून सेवकाचें साह्य करणें. किल्ल्याचे बंदोबस्ताविषयीं त्यानीं मनापासून झटावें. आपणही खुद दौलत व ऐश्वर्यासहित विजापुराहून निघोन तीन च्यार मजली इकडे चालून येऊन समुद्राचे कांठी डेरे टाकावे, म्हणजे आपले चरणप्रतापाने प्रसादेंकरून शत्रूंचा नाश होईल. असें विनंतीपत्र पाठविलें. त्याजवरून आदिलशाहा यानीं आज्ञा केली. त्यावरून अमीरलोक फौजेसुध्धां खुद जातीनें त्या किल्ल्यानजिक येऊन पोंहचले. हे अमीरलोक यद्यपि किष्वरखान यांचे साह्यार्थी आले परंतु त्या संपूर्णांची

७. ९७५ हि (१५६७–६८ इ. स.) त महादुर्ग – धारूर जवळ – किल्ला बांधिला. बु. इ मा., पृ. १४६, म. भा..

वागणुक किष्वरखानाशीं वांकडेपणाची होती. कारण कीं, आदिलशाहाचे अमीरलोक ऐनुल्मुल्क व नूरखान व शाहा अबदुल हसन व दुसरे कित्येक अमीरलोक किष्वरखान याशीं वांकडेपणा व कपट वागऊन किष्वरखान यांची दौलत अधिक वाढावी असें इच्छित नव्हते. यास्तव किष्वरखान याची आज्ञा कदापि मानित नव्हते. किष्वरखान यांशीं मित्रतेनें वागत नव्हते. शाहा अबदुल हसन हा तर मनापासून निजामशाहाचा मित्र होता. यामुळें हरएक कामांत निजामशाहाकडे लक्ष ठेऊन मित्रता कायम टेवित होता. त्याणीं किष्वरखानाचें साह्य करण्याकरितां आपण जाऊं नये असें आदिलशाहास सांगून पाठवून मनाई केली. महादुर्ग येथें अमीरलोकांसही टकविद्येची ममलत सांगितली, कीं किष्वरखान याचें साह्य करण्यांत तुम्हांस कांहीं एक उपयोग नाहीं. कदाचित किष्वरखान यास फत्तेहमंद यशस्वी झाल्यास त्याची दौलत व पदवी फारच वाढेल. मग तुम्हीं सर्वत्र त्याचे हाताखालची मंडळी व्हाल. आतां तें बरें आहे कीं, येथून निघून निजामशाहाचे मुलुकांत जाऊन निजामशाहाचे राज्यांत गर्दी करून लुटालूट करावी, म्हणजे निजामशाहाचे अमीरलोक घाबरून व हवालदील होऊन आपली अबरू संरक्षण व्हावी यदर्थीं युध्धास प्रवर्तक होणार नाहींत. अमीरलोक युध्धास उभे रहाणार नाहींत. असें झालें म्हणजे निजामशाहासही युध्धाचें सामर्थ्य रहाणार नाहीं. मग निरुपाय होऊन येथून निघून आपल्या मुलुकास जाईल. अमीरलोक या अबदुल हसन याचे बोण्यावरून फसून किल्याचा घेरा सोडून अहमदनगरास जाते झाले. तेथें जाऊन दंगा आरंभिला. निजामशाहास हें वर्तनान कळलें कीं, आदिलशाहाकडील अमीरलोक सर्व किष्वरखान यास सोडून गेले आणि आमचे मुलुकांत जाऊन लुटालूट करित आहेत. असें जाहीर झालें तेव्हां मुलुक लुटिताहेत या गोष्टीची परवा न धरितां आधीं किल्यावर गर्दी केली. प्रबल युध्ध केलें. किष्वरखान पुढें चालून गेला व वाघासारखी लढाई केली. दर हल्लेस शत्रू प्रबल होऊन हल्ला करित होते. किष्वरखान मस्त वाघाप्रमाणें त्या लोकांवर दौड करून त्याजला मागें हटवित होता. परागंदा करित होता. आपलें हातून कित्येक तीरांचे भाते तीर मारण्यानीं रिकामे करित होता. एक तीर देखील चुकूं देत नव्हता. तेव्हां एके दिवशीं शत्रुलोकानीं, म्हणजे निजामशाहा यांणीं वगैरे, करार ठरविला कीं, आज मोटें पादशाही युध्ध करून कैवाराचे घेऱ्यांतील टिपक्याप्रमाणें किल्ला घेरून मोठा जोरदार हल्ला करावा. फत्ते करावी.. याच करारा-प्रमाणें दारुण युध्ध केलें. हल्लेवर हल्ला लागोपाठ केला. किष्वरखान याणीं किल्याचे दरवाजापुढें उभे राहून शत्रूचे निवारणार्थ यत्न करित होता. दर हल्लत शत्रुकडील कित्येक लोक ठार मारित होता. कित्येक जखमी करून घाबरवित होता. अशा समयांत शत्रुकडील फौजेनीं किल्ला घेरला व जेथून सधी सांपडेल तेथून किल्यांत

शिरावें असा बेत ठरविला. जेव्हां अंकुसखान यांणीं द्वेषानें किल्ल्याचे भिंतीस किल्ला बांधते वेळेस खिंडारे गुरें जनावरें येण्याजाण्यास राखले होतें त्या खिंडाराचें आलंगे नजिक येऊन पोंहचले. त्या खिंडारांतून किल्ल्यांत शिरले. किल्ल्यावरील राखणारे यांणींही किष्वरखान याचे द्वेषास्तव त्याजला किल्ल्यांत शिरण्यास मनाई न करितां ढिलाई केली. जेव्हां निजामशाहाचे शिपाई निर्भयपणें त्या खिंडारांतून किल्ल्यांत शिरले तेव्हां किष्वरखान मैदानांत मोठे शूरत्वाचे युध्ध करित होता. शुरत्वाची व युध्धपराक्रमाची शर्त बजावीत होता. अशा समयांत किष्वरखान याजला एकाएकी हें वर्तमान कळलें कीं, निजामशाहाचे शिपाई लोक किल्ल्याचे आंत शिरले. असें वर्तमान ऐकतांच अति चिंताग्रस्त झाला. उमेद खचली आणि मरणास उदार होऊन घोड्यावरून उतरून पायानेंच चालून जाऊन बहुत शुरत्वानें युध्ध करूं लागला. अधिकाधिकच हल्ला करून शत्रूचे समुदायाचे समुदाय ठार करित होता. बहुत लोकांस जखमी करून आपले पाठीमागें पृथ्वींत कीर्ती रहावी येतदर्थ हें शुरत्व करित होता. परंतु ईश्वराचें सहाय्य किष्वरखान यांजकडे नव्हते. यामुळें त्याजला हरएक हल्लेंत अत्यंत यत्नांत उपयोग झाला नाहीं. इतक्यामध्यें अशी लढाई झाली कीं परस्परें तीर मारणारे लोक परजन्याचे वृष्टीसारखा तीराचा वर्षाव करित होते. अशा समयांत शत्रूकडून एक तीर सुटून किष्वरखान याचे सन्मुख खडकावर आदळून तेथून उडून किष्वरखान याचे पोटांत नाभिस्थानाखालीं एक हातभर शरीरांत घुसला. तेव्हां किष्वरखान त्या तीराचे जखमेनें भुमीवर पडला. त्याचे लष्करही परागंदा झाले. शत्रूनीं धाऊन येऊन किष्वरखानाचे मस्तक कापून निजामशाहाजवळ घेऊन गेले. तेव्हां निजामशाहा याणी आज्ञा केली कीं, किष्वरखान याचे कातडें काढून त्या कातड्याचे भोतांत गवत भरून सर्व लष्करांतून फिरवावे, म्हणून आज्ञा केली. त्याप्रमाणें केलें. ऐकण्यांत आहे, किष्वरखान शस्त्रें घेऊन सिध्ध झाला, घोड्यावर बसूं लागला तेव्हां एका गृहस्थाचे हातीं 'खाज्या आफीन शिराजी' याची किताब दिवान आफीन होती ती किष्वरखान यांणीं त्याजपासून त्या किताबींत प्रश्न पाहून किताब उघडली. तेव्हां ज्या पानावर प्रश्न पहिला त्या पानावरचेच ओळींत ही बैत निघाली. बैतेचा अर्थ : "जो गृहस्थ कीं प्रातःकाळीं त्याचे मस्तकावर जडावदार मुगुट होता : व सायंकाळीं पाहिले तो मृत्तिकेची वीट उशाखालीं आहे ; म्हणजे प्राण जाऊन प्रेत भुमीवर ठेवलेले आहे" असा प्रश्नांतील भाव समजोन खिन्न खाला. निरूपाय होऊन घोड्यावर बसला आणि युध्धास गेला. शेवटीं त्याचा परिणाम त्या प्रकारचा झाला, कीं ते वर्णन सदरी जाहालेच आहे. प्रश्नांत मातीची वीट उशास घेतली असे आले होते. परंतु त्या विचाऱ्यास म्हणजे किष्वरखानास मरण समयीं मातीची वीट देखील ऊशास मिळाली नाहीं. किष्वरखान वारल्यावर निजामशाहा संतोषयुक्त होऊन किल्यावर चढून आला. तो किल्ला

आपलेकडील विश्वासू संभावीत कामदाराचे हवाली केला. या आनंदास्तव कैदी लोकांच्या जमाती निजामशाहापुढें आणित होते. त्या जमातीस कैदी व जखमी सर्व लोकास पोशाख देऊन सोडून देत होता. संपूर्ण कैदी लोकापैकीं ' याकुद ' या नांवेकरून एक आफसी चाकर किष्वरखानाचा होता. निजामशाहानें आज्ञा केली कीं, किष्वरखानाचे शरीर कातडे सोलून टाकलेले आहे ते याकुदाचे हवाली करावे. तेव्हां याकुद याणी अर्ज केला कीं, सर्व लोकांस जसे पोषाख देऊन खावंदानीं निरोप दिले तसे किष्वरखानाचे शरीरासही सरकारांतून पोषाख मिळावा. या बोलण्यांतील भाव हा आहे कीं, किष्वरखान याचे शरीर सोलऊन त्याचे शरीराचे कातड्यांत गवत भरले आहें तें कातडे मेहरबान-गी करून देविल्यास दफन करण्यास टीक पडेल, हा भाव आहे. ते मनोगत निजामशाहा यार्णी ओळखून आज्ञा केलीं कीं, किष्वरखानाचे शरीराचे कातडे याकुद मागत आहे त्याजला द्यावे. जेव्हां कातडे शरीरावर घातलें तेव्हां पुन: आज्ञा केली कीं, किष्वर-खानाचे मस्तक कापून ठेविले आहे तेंही त्याचे शरीरावर टेऊन प्रेत विजापुरास घेऊन जावे. शहरांत किष्वरखान याणीं केलेली बाग आहे त्या बागेंत त्याचें प्रेताचे दफन करावे, अशी आज्ञा केली. त्यानंतर निजामशाहा किल्ला घेण्याचे कामातून मोकळा होऊन आदिलशाहाचे अमीर लोक अहमदनगरांत लुटालूट करित होते त्यावर चालून गेला. हल्ला करून त्याजलाही घेरलें. तेव्हां ते सर्व अमीरलोक हात पाय आपटून धैय धर-धरून पुढे चालून आले. मोटी लढाई केली. परंतु ते सर्व लोक, अमीरलोक व सरदार यार्णी आपआपणांत वांकडेपणा येऊनच आपले यजमान याचे राजधानींत मोठे विघ्न आरंभिले. त्या कर्माचे शिक्षेस्तव तेही फल पावते झाले. ऐनुल्मुल्क याजवर तरवारच मारिली. नूरखान हा कैद झाला. जेव्हां हे किष्वरखान ठार होण्याचे व किल्ल्यावरील सर्व सामान व हत्ती व ऊंट वगैरे शत्रुनी लुटून नेले असें वर्तमान आदिलशाहा याजला कळलें तेव्हां आदिलशाहास बहुत पश्चाताप वाटला. क्रोधायमान होऊन बोलला कीं, किष्वरखान याणी अफजलखान याचे सांगणें मानिलें नाहीं तेव्हां कुराननी आपले आज्ञाभंगाचा चमत्कार दाखविला. असे बोलला आणि मसलत ठरविता झाला कीं, निजामशाहा वगैरे शत्रूवर चालून जावें. जेव्हां वर्तमान एकिलें कीं, निजामशाहा वगैरे शत्रू आपले मुलुकास निघून गेले तेव्हां बेत तूर्त राहता करून पुढें पाहून घेतां येईल असें ठरविता झाला.

## १९. अंकुसखान याणें सरदारांबरोबर आपली यशस्वी फौज देऊन उदोनीचा किल्ला घेण्याकरितां रवानगी करणें व उदोनीचा किल्ला घेणें :

यानंतर शाहा अबदुल हसन बादशाहा ताहर याचे मसलतीनें, कीं शाहा अबदुल हसन याजला, किष्वरखान वारल्यानंतर, जुमलतुलमुल्कीचे पद मिळाले होतेच. वकिलु-

सलतनत असेंही पद प्राप्त जाहाले होते, म्हणजे तो अबदुल हसन आदिलशाही दौलतींतील मुख्य वकील जाहाला होता. त्याणी उदोनीचा किल्ला घ्यावयाकरितां विचार ठरविला. तो किल्ला बहुत मजबूत व पक्का होता, कीं यापुर्वी कोणतेच मुसलमान बादशाहाचे हाती किल्ला लागला नाहीं. तो किल्ला बहुत विस्तीर्ण व फार उंच पर्वतावर बांधला आहे. त्या किल्ल्यावर थोर थोर इमारती व गोडे पाण्याचे झरे बहुत आहेत. सिवरायाचे कारकीर्दीपासून जो राम विजयनगरचे तख्तावर बसत होता तो राम मुसलमान बादशाहाचे भयापासून बचाव व्हावा याकरितां त्या किल्ल्यावर बंदोबस्ती मजबूत करून किल्ल्याचे बुरुजांत शिसे ओतून बुरुज पक्के बांधले होते. अंकुसखान आठ हजार स्वार व बहुत सिबंदी व पुष्कळ तोफा समागमे घेऊन त्या किल्ल्याकडे रवाना केला. त्या समयीं किल्ल्यावरील मालक रामराजाकडील अमीर लोकांपैकींच एक संभावीत अमीर होता त्याणीं रामराजा वारल्यानंतर तो किल्ला व त्या किल्ल्याचे ताब्यांतील एकंदर मुलुक घेऊन, जबरदस्त होऊन, कोणाचीच चाकरी न करितां आपणच मालकी करित होता. त्याणीं मुसलमानाकडील फौजेचे पारपत्य करण्याकरितां अंकुसखानासी कित्येक लढाया दिल्या. परंतु दर लढाईत त्या किल्ल्यावरील मालकाचा मोड होत होता. शेवटीं गल्ला वगैरे खाण्यापिण्याचे जिनस बहुत संचय किल्ल्यावर करून किल्ला बंद केला होता. लढाई फार दिवस लांबली. नित्य युध्द होत होते. किल्ल्यावरील संचय सरला. यामुळें निरुपाय होऊन त्या किल्ल्यावरील मालकानीं भयाभीत होऊन आमचा प्राण घेऊं नये, जिवास अभय असावें असें मागणें मागून तो किल्ला अंकुसखानाचे हवालीं केला. तेव्हां अंकुसखान याणी किल्ला घेऊन फत्ते केली. यावरून आदिलशाहास बहुत आनंद होऊन आणि बाकीचे किल्ले व त्या त्या किल्याचे ताब्यांतील मुलुक घेता झाला. पुढें येऊन तसेंच हळहळू विजयानगरचे तर्फेतील संपूर्ण मुलुक हस्तगत करून त्या हिंदु लोकांचे मुलुकास मुसलमानी दीपेकरून प्रकाशवंत करिता जाहाला, म्हणजे हिंदु लोकांचे मुलुकांत मुसलमानी हुकूम झाला. हिंदु लोकांचे देवांची बहुत देवालयें पाडून जमीनदोस्त करून त्या जाग्यावर मसिदी बांधून निमाज पढणें व बांग देणेचे मुसलमानी झेंडे उभे केले.

## २०. अबदुल हसन व चंगिरखान याचे यत्नानें सरहद्दींत आदिलशाहा व निजामशाहाची भेट होणें व उभयतांचे सख्यतेचे करार मदार ठरणें :

पूर्वीं यद्यपि विचारवान कामदाराचे उत्तम विचाराचे योगानें आदिलशाहा व निजामशाहा या उभयतांचे दौलतींत उभय पक्षी मित्रतेचे व दोस्तीचे करार मदार ठरण्यांत आले होते परंतु त्या गोष्टीचा कांहीं उपयोग झाला नाहीं. त्या करार

मदाराचे योगानें अधिकच कपट व वैर मात्र वाढलें. उभयतां बादशाहाची परस्पर युध्दें होण्यानें संपूर्ण पृथ्वीची बहुत खराबी होत होती. मुलकाची व वस्तीचीही बहुत खराबी व पायमल्ली होत होती. साराश, बादशाहा अबदुल हसन बादशाहा ताहर व खान अमीरला उर्फ चुंगतखान हा निजामशाहाचा मदारूल महाम व पेशवा म्हणजे मुख्य भरंवशाचा कामगार या उभयता कामगारानें विचार ठरऊन उभयता बादशाहाचे व दोस्तीचा व मित्रतेचा विचार ठरविते झाले. उत्तम प्रकारचें भाषणानें व नाना प्रकारचे योग्य बोलण्यानें सरहद्दांत उभयतां बादशाहाचे भेटीचा योग घडऊन उभयताचे मनांतल वांकडेपणा व वैरभाव काढून टाकिते जाहाले. सख्यतेचे व मित्रतेचे करार मदार त्या गोष्टीवर ठरविते जाहाले, कीं आदिलशाहा याणी विजयानगरचा मुलुख पाहिजे तितका हस्तगत करावा. निजामशाहा याणी बेदरचा व वऱ्हाडचा मुलुक मनास वाटेल तितका घ्यावा. नंतर लढाया व युध्दें उभयताचे वांकडेपणामुळें व मुलुख थोडा यामुळें परस्पर होत होती ते दूर करावे. इत:पर लढाया आपआपसांत करूं नयेत. बहुत वर्षांचा वांकडेपणा व कपट उभयतांत होते ते सोडून द्यावे. येथून पुढें मित्रता व दोस्ती धारण करून रहावे म्हणजे या योगानें ईश्वराचे सर्व प्राणीमात्रांस व शहरोशहरांस व देशोदेशांस सुख व दिलदारी होईल. जेव्हां विचार उभयता बादशाहात करारमदारानिसी मजबूत व पक्का ठरला तेव्हां उभयता बादशाहा अति संतोषानें व आनंदानें परस्परें एकमेकांचे निरोप घेऊन आपआपले मुलुकास जाते झाले. निजामशाहा याणी या ठरलेल्या विचाराप्रमाणें फौजेची तयारी करून वऱ्हाड देशावर लष्कर घेऊन चालून जाता जाहाला. तेव्हां वराड येथील सर्व कामदार लोक तफावलखान याचे जबरदस्तीचे व बेमानपणाचे योगाने बहुत त्रासले होते. कारण कीं, तफावलखान याणीं आपले खावंदास कैदेत व बंदीशाळेत टेऊन आपणच जबरदस्तीनें मालक झाला होता. यास्तव तेथील सर्व कामदार बेदील जाहाले होते. त्रासले होते. यामुळें त्या लोकांनीं तफावलखान याची मित्रता व चाकरी सोडून निजामशाहासी मित्रता धारण करून मिळाले. निजामशाहा याणी तफावलखानास धरून त्याजला त्याचे अमार्गाचे वागणुकीची शिक्षा देता जाहाला. वऱ्हाडचा संपूर्ण मुलुक कांहीं एक संकट न पडतां व लढाई व मारामारीनें तोडातोडी न करितां हस्तगत केला. इकडून आदिलशाहाही तयारी करून फौज घेऊन विजयानगरचा मुलुक घेण्याकरितां रवाना झाला. जे जे किल्ले मार्गांत होते ते एकेक किल्ले घेऊन पिलगुंड्याचे किल्यानजीक जाऊन पोंहचला. त्या किल्यांत हल्ला केला. हिंदु अमीरलोक, कीं त्या हिंदु लोकांस पारागीर असे म्हणतात ते व त्यासच नाईकवाडी असे म्हणत होते व ते लोक शिपाईगिरीत व शूरत्वात फार सामर्थ्य ठेवित होते ते प्रथम रामराज मेल्यानंतर आदिलशाहाचा सेवकपणा धारण करून आदिलशाहाचे हुकूमात नम्रतेनें वागत होते. आदिलशाहाची

आज्ञा मोडीत नव्हते. आदिलशाहाचे फौजेपुढें होऊन हरएक कामांत माह्य करित होते. शत्रुचा मुलुख लुटून शत्रुचे मुलकाची बहुत खराबी व पायमली करित होते. लुटीचे बहुत सामान, घोडे, हत्ती व उंट बहुत हस्तगत करून या तयारीनें फार मजबूत व फार सामर्थ्यवान झाले होते. त्याच लोकांचीं हली बहुत सामान व फार द्रव्य जमले यामुळें गर्व व अभिमानाची धुंदी दुप्पट चढली. यामुळें आपले खावंदासी बदलणेची चाल धारण केली. सेवकपणाची व चाकरपणाची पुर्वीची चाल होती ती सोडून गर्वाचे दांडगेपणानें मार्ग चालू केले. मुसलमानाचे यशस्वी फौजेस गल्ला व खाण्यापिण्याचे जिन्नस देऊं नये म्हणोन मनाई केली. मुजाहीम आडथळा करणारे झाले. किल्लेवाल्याची मदत करण्याविषयीं तत्पर राहून किल्यांत गल्ला व ऐवज पोंहचवीत होते. शुरत्वाचे व धैर्याचे लक्षणानें नाना प्रकारचे वाहने व चोरीचे मागही बहुत धारण केले होते. या हिंदु जातीचे एकंदर लष्कर कित्येक जमेदार संभावित व कित्येक हलके जमेदार एकंदर फौजेचा सुमारे पंधरा हजार स्वार भाले मारणारे व तरवार लावणारे होते. वास्तव आदिलशाहा यांणीं या समयीं किला घेणें नीट नव्हे असा विचार करून ही गोष्ट आणखी एखादे वेळेस सिध्धीस नेतां येईल असें ठरऊन तेथून कुलबुर्ग्याकुडे जाण्यास स्वारीचा मोहोरा फिरऊन येणें करित करित विजापुरास येऊन पोंहचला.

## २१. पुन्हा हिंदु लोकांचे मुलकावर फौज घेऊन जाणें व अबदुल हसन याजला वकीलीचे कामावरून काढून मुस्तफाखान इर्दस्तानी याजला वकीलीचे पद देणें :

कित्येक दिवसानंतर नवीन तयारी करून पुन्हा तो मुलुक घेण्याकरितां फौज घेऊन जाणें ते प्रथम तोरगलच्या किल्ल्यावर, कीं त्या किल्ल्यावरील मालक आपले धण्यासीं बदलून मस्त झाला होता. तो किल्ला थोडकेच दिवसांत घेऊन फत्ते करून किल्ल्यावरील बेमान मालकाचे पारपत्य केले. तेथुन धारवाडचे किल्ल्याकडे हाल फिरऊन तो किल्लाही कित्येक महिन्यांत हस्तगत केला. तेव्हां या प्रकरणांत शाहा अबदुल हसन यांणीं बहुत व्यतेय केले. सबब त्याजला वकिलीचे कामावरून बरतर्फ करून मुस्तफाखान याजला मुख्य वकील केला. 'वकिलु सलतनत' असे पद दिलें. त्याचे नांव सय्यद कमालुद्दीन हुसेन असे होते. तो कमालुद्दीन आपले मुलकाहून येऊन कुतुबशाहाचे राज्यधानींत योग्यता पावला. मोठे पदवीस चढून मुस्तफाखान असें पद मिळविलें. तेथील 'वकीलु सलतनत' असं त्या दौलतींत पद मिळविलें. बहुत दिवस तेथेंच नेकीनें म्हणजे सत्कीर्तीनें दिवस घालविले. रामराज वारल्यानंतर

कुतुबशाहापासून निरोप घेऊन विजापुरास आदिलशाहापासीं येऊन योग्यता पावला. हलुहळू सव त्या राजधानीचे मुलकी कामांत मुख्य कामदार झाला. त्याचे उत्तम विचाराचे व मसलतीचे योगानी विजापुरची दौलत दिवसेंदिवस अधिक वाढत होती. कर्नाटकचे संपूर्ण गर्विष्ठ लोक व माजुरी लोकांस आपले कामाचे युक्तीनें चाकर करून आज्ञेत ठेविलें. कर्नाटक तर्फेतील मुलुख व शहरें आदिलशाहाचे राजधानींत जमेस आले व आदिलशाहाचे मुलुकाची विस्तीर्णता केली.

## २२. बंकापुरचा किल्ला घेऊन फत्ते करणें :

जेव्हां धारवाडचे प्रकर्णापासून फुसरत झाली व धारवाडचा किल्ला हस्तगत करण्यापासून आदिलशाहाचे चित्ताची स्वस्थता झाली तेव्हां मुस्तफाखान ईरदस्तानी याचे विचारानें बंकापुरचा किल्ला घेण्याकरितां फौज गेऊन चालता झाला. त्या किल्यावर हल्ला केला. त्या किल्यावरील किल्लेदार रामराज याचा तांबुलदार, म्हणजे विडे देणाग, मोठा नामांकित राजा होता त्याणीं रामराजा वारल्यानंतर तो किल्ला व त्या बंकापुरचे किल्याचे ताब्यांतील एकंदर हस्तगत करून आपणच मालक व मजबूत आहो असे मानित होता. आपले मुलुकाचे धण्याची चाकरी करित नव्हता. हली तर मुसलमानी फौज तो किल्ला घ्यावयाकरितां येऊन पोंहचली. यास्तव त्याणी आपले पुत्रासमागमे एक हजार स्वार तरवार लावणारे व दहा हजार सिबंदी शस्त्रधारी देऊन किल्याचे बंदोबस्ताकरितां बाहेर टेविला. आपण बहुत जिन्नस व सामानसुध्धां त्या किल्यांत, कीं तो किल्ला सर्व दक्षण देशांत मजबूत होता त्या किल्यांत, मजबुतीनें राहिला. त्याचे पुत्रानीं बहुत काट्याचे अडचणीचे जाग्यांत व ज्या ठिकाणीं वृक्षाची निबिड दाटी अशा पर्वताचे अडचणीचे बारींत, कीं नी बारी त्या किल्यानजिकच होती, त्या अडचणीचे जाग्याचा, आश्रय करून मुसलमानी फौजेवर हल्ला करणे आरंभिले. डावे उजवे बाजूकडून मुसलमानाचे फौजतील लोकांस कैद करूं लागला. ठार मारणें आरंभिलें. मुसलमानाचे फौजेस गल्ला वगैरे किरकोळ जिन्नस व कोणी वसूल देऊं नये अशी मनाई केली. किल्यांतील मालकानी पिलगुंड्याचे मालकास, कीं तो मालक रामराजाचा बंधु होता व भावाचे ठिकाणीं म्हणजे रामराजाचे स्थानीं तो राजपद पावला होता आणि पिलगुंड्याच्या किल्याम आपले राजधानीचे स्थान केले होते त्याजकडे, विनंतीपत्रें पाठविलीं कीं, मी आपला पुरातन सेवक आपण पालन केलेला चाकर आहे. यद्यपि या समयीं गर्विष्टपणानीं व बदमस्तीनें मी काम चालविलें परंतु हली मी आपले अपराधाचे व बदमस्तीचे कामापासून शुध्धीवर येऊन, म्हणजे आजपर्यंत अमार्गात वर्तणुक केली ते सर्व सोडून, करार टरवितो कीं, आतां येथून आज-

पासून आपली सेवा करून राहीन. आपली आज्ञा कधीही न मोडतां आपले चाकरींत निमग्न राहीन. आपणास विनंती हीं आहे कीं, माझे अन्याय क्षमा करून या समयीं आपण फौजेसुध्धां इकडे येण्यास आनमान न करितां तिकडील सर्व अमीर-लोक व जमेदारास आज्ञापत्रें पाठवावी, म्हणजे ते सर्व लोक येऊन या सेवकास मदत करून मुसलमानाची फौज या मुलुकांतून घालऊन देतील. नाहींपेक्षां प्रदिप्त अग्नि हलुहळू चहूंकडेच लागेल, म्हणजे हे मुसलमान लोक असेच हलुहळू सर्व मुलुक घेतील. अशीं विनंतीपत्रें लिहिलीं. तेव्हां पिलगुंड्याचे खावंदानीं, म्हणजे रामराजाचे बंधूनीं, अत्यंत क्रोधायमान होऊन त्या विनंतीपत्राचे उत्तर क्रोधमिश्रित लिहिलें कीं, तूं प्रथम बेमानपणा व निमकहारामी केलीस. गर्व व अभिमान बहुत केलास. यामुळें तुझें दुर्गुण पाहून दुसरे आणखी कित्येक लोकानींही बेमानपणा व निमक-हरामी केली. तेव्हां संपूर्ण निमकहराम चाकरांनी इकडील चाकरी करणें सोडिलें. आज्ञा मानीनासे झाले. असें असतां हली तर्फेतर्फेचे हरएक अमीरलोकास आम्ही आज्ञापत्रें लिहून पाठविलीं आहेत कीं, तुझ्या कुमेकेस पोंहचून किल्याचा बंदोबस्त ठेवावा. मुसलमान लोकाचे हातीं युध्धपराक्रमानें किल्ला जाऊं देऊं नये. अशीं आज्ञापत्रें पाठविलीं. तेव्हां त्या तर्फेतर्फेतील अमीरलोक व पारागीर याणी त्या पिलगुंड्याचे मालकाचे आज्ञापत्राप्रमाणें मुसलमानी फौजेवर लष्कर घेऊन येऊन गर्दी केली. मनुष्याच्या येण्याजाण्याच्या वाटा व वसूल व खाण्यापिण्याचे जिन्नस बिलकुल म्हणजे निखालस बंद केले. असें असतां डावे उजवे बाजूकडून मुसलमानी फौजेवर दौड करून त्या लोकांस ठार मारित होते. कान व नाके कापित होते. रात्रीचे समयीं मुसलमानी लष्करांत चोराप्रमाणे येऊन लुटालूटही करित होते. जे हातीं लागेल ते लुटुन नेत होते. तेव्हां मुसलमान लोकांचे ते संपूर्ण लष्कर या उपद्रवानें, हिंदु लोकांचे काहारानें, खाण्यापिण्याचे जिन्नस न मिळा-ल्यानें व भारी दुष्काळ पडण्यानें प्राण जाण्याचा समय येऊन त्रासून परत जाण्याची मसलत टरविते झाले. तेव्हां मुस्तफाखान याणी आपले लष्करास हिंमत व धैर्य देऊन, भरोसा व आधार दिल्हा. आपण पूर्ण विचारानीं व अकलेनी एक मसलत मनांत आणोन सहा हजार स्वार त्या तर्फेतील हिंदु अमीर लोकांचे, कीं जे प्रथम वैरभाव ठेवित होते व जंगेगुरीजी, म्हणजे वरचेवर धाव धाऊन येऊन हल्ला करावी अशा, प्रकारचे युध्ध या मुसलमान लोकाहून अधिक जाणीत होते, त्या सहा हजार स्वारांस बहुत द्रव्य व पोषाख वगैरे बक्षिस देऊन संतोष व आनंदयुक्त करून तेच स्वार आपले चाकर केले. त्या हिंदु लोकांचे सामन्यावर नेमिले कीं, ज्या समयीं तुम्हांशिवाय दुसरे लोक आमचे फौजेवर चालून येतील तेव्हां तुम्ही त्यांचे निवारण करून त्यांचा उपद्रव आम्हांस लागूं देऊं नये. वसुल व खाण्यापिण्याचे जिन्नसही बहुत सावधगिरीनें व बंदोबस्तानें आमचे लष्करांत पोंहचवित जावें असें टरविलें.

आणखी आठ हजार सिबंदी शस्त्रधारी व मोठे जवानमर्द धैर्यवान हिंदु लोकांचे लष्करास किल्याचे सभोंवते नेमिले. तेव्हां असें दिसों लागलें कीं, दोन किल्ले मजबूत झाले. असा बंदोबस्त केला व त्या आठ हजार सिबंदीस ताकिद केली कीं, रात्री व दिवसा डोळ्यास डोळा न लाविता, म्हणजे निद्रा न घेतां, हुषार रहावें. एका मनुष्यास देखिल आमचे लष्करात येऊं देऊं नये. रसद व खाण्यापिण्याचे जिन्नस वगैरे किल्यांत जाऊं देऊं नये. असा विचार ठरविल्यानंतर त्या चोरटे लोकांची व चोरांची चोरी व लुटालूट बंद झाली. लष्करांत गला वगैरे जिन्नस पाहिजे तितका निर्भयपणें येऊन पोंहचूं लागला. जिनसाची पुर्ण स्वस्तता झाली. मुसलमानी फौज हवालदील झाली होती त्यास भरोसा आला. आनंद पावले. मोठे डाकेनें किल्यावर हल्ला केला. किल्लेवाल्यावर मोठे संकट आणिलें. किल्यांतील गला वगैरे खाण्यापिण्याचे जिन्नस होते तेही सरले. तर्फेतर्फेकडून कुमकीकरितां अमीरलोक आले होते तेही त्रासून आपआपले घरास जाते झाले. तेव्हां किल्यांतील मालक निरुपाय होऊन मित्रतेचे व सख्य करण्याचे बोलणें बोलूं लागला. माझा प्राण वाचवावा, मजला जिवें मारूं नये, प्राणदान द्यावें असें अभय मागून किल्ला हवालीं करून दिला. आपण किल्याचे बाहेर निघोन गेला. तेव्हां आदिलशाहा व मुस्तफाखान यांणीं ईश्वरानीं यश दिल्हे यदर्थी ईश्वराचा स्तव करून नमन केलें. तेच दिवशीं किल्यावर चढले. जाताच आधीं त्या किल्यावर मोठे देवालय, बहुत वर्षे त्या देवाची सेवा व पुजा व नैवेद्य चालला होता तें देवालय, तिकडील तर्फेतर्फेचे गावास प्रसिध्ध होते ते देवालय, पाडून जमीनदोस्त करण्याविसी हुकुम झाला. त्या जाग्यावर मोटी मसीद बांधली. आधी खुद पादशाहाच धर्मनिती जाणणारा व दिवाणही सुलक्षणी. याजकरितां किल्यावरील मसीद बांधते वेळेस परलोकी उत्तम प्राप्ती व्हावी यास्तव त्या मसिदीचा पाया खणिला. त्या पायांत आदिलशाहा यांणीं आपले हातांनीं दोन धोंडे टाकिले. नंतर पाया भरून काढिला आणि मसीद बांधली. खतीब व मवजन म्हणजे बांग देणारे फकीर व इमाम त्या मसिदीकडे नेमणुका ठरऊन नेमिले. निमाज व बांग देणे व मुसलमानी धर्माचे सर्व अधिकार चालू झाले. ही चाकरी मुस्तफाखान इरदस्तानी यांणीं आपले उत्तम विचारानें व आपले मसलतीनें बजाविली. यास्तव आदिलशाहाची कृपा व मेहरबानगी मुस्तफाखान याजवर दिवसेंदिवस अधिकच होऊं लागली. मुस्तफाखान याचा रुतबा व पदाधिकार फारच वाढला. येथपर्यंत योग्यता वाढली कीं, आदिलशाहा जें खासे मोर्तब हमेषा आपले बोटांत ठेवित होता तें मोर्तब मुस्तफाखान याचे हवाली केलें. आज्ञा केली कीं, मुलकी व माली एकंदर कामदारावर तुम्हास नीट दिसेल व मर्जीस येईल त्या कागदावर तुम्ही या मोर्तबानें मोहर करित जावी. पुनः आमचे हुकुमाचा अक्षेप घेऊ नये. असी आज्ञा करून मोर्तब हवाली केल्यानंतर आदिलशाहा त्या किल्यांत राहून संतोष व आनंदांत निमग्न झाला.

मुस्तफाखान याजला बहुत लष्कर समागमें दऊन बाकीचे किल्ले व मोठी मोठी स्थानें, कीं रामराज याजकडील अमीरलोक याणी जागोजाग किल्ले व मुलुक हस्तगत करून मजबुतीचा दम मारतात म्हणजे आम्हीच मालक आम्हास कोणाची चाकरी करणें जरूर नाही असें मानितात, ते किल्ले व गाव वगैरे जागा, हस्तगत करण्याकरितां रवाना केला. तेव्हां मुस्तफाखान याणी कुफरस्थानांत, म्हणजे हिंदु लोकांचे मुलुकांत पाठऊन हळुहळू एक एक किल्ला त्या तर्फेतील अमीरलोकाकडून सोडऊन हस्तगत केला. मुसलमानी झेंडे उभे केले. पुरातन देवालयें बहुत पाडिलीं. त्या देवालयांचे जाग्यावर मसिदी बांधल्या. निमाज पढणें, बांग देणें व मुसलमानी धर्माची कर्में चालू झालीं. असें सांगण्यांतही आहे कीं, त्यावेळेस दोनतीनसें देवालयें पाडलीं. चार पांच हजार मुर्ती, काशाच्या, पाषाणाच्या, रुप्याच्या व सोन्याच्या मिळोन, फोडिल्या. परलोकीं सत्कर्माचे उत्तम फल प्राप्त व्हावे याजकरिता अली आदिलशाहा याणी कित्येक देवाच्या मुर्ती खुद्द आपलेच हातानीं फोडिल्या. मज्याहिद, म्हणजे योध्धा म्हणजे लढाई करणारा, व गाजी म्हणजे युध्धपराक्रमानें पृथ्वी घेणारा, असें आपले नांव ठेऊन घेतलें. त्यानंतर तो सर्व मुलुक फत्ते करून हस्तगत केलेला मुस्तफाखान यास जहागीर दिल्हा. आपण कित्येक दिवसपर्यंत तेथें राहून तीन वर्षांनंतर दौलत व ऐश्वर्यानिसी आपले राजधानीचे स्थानीं विजापुरास येता झाला. मनसबे वकालत, म्हणजे वकिलीचे पद, व आमिरे जुमलगी, म्हणजे संपूर्ण अमीर लोकांतील मुख्य अमीर, असे रुतबे, म्हणजे पदे, इनायतुल रबादिज्जा मकसुद षिराजी उर्फ अफजलखान याजला देता जाला.

## २६. अफजलखान षिराजी याचे थोडेसें वर्तमान :

अफजलखान याचा बाप पारस देशचे अमलदारापैकी होता. योग्य पुरुष व अकलवान असामी षिराज येथील संपूर्ण मालक व कामदार व थोर थोर गृहस्थ मोठी मोठी कामे त्याचे म्हणजे अफजलखानाचे बापाचे विचाराने व मसलतीने करित होते. त्या समयीं अफजलखान आठ वर्षांचा होता. तेव्हां आठ वर्षांचे वयातच बाप वारला. तेव्हां अफजलखान यास विद्याभ्यास करण्याची फारच आवडी उपजली. विद्या शिकण्याविषयीं बहुत मेहनत व यत्न केला. त्या समयांतील मुख्य विद्वान, कीं त्याचे साम्यतेचा तसा दुसरा कोणी विद्वान नव्हता असा जो एक अद्वितीय फतहल्लाह षिराजी, कीं तो त्या समयांतील व त्या जमान्यांतील संपूर्ण विद्वानांहून अधिक विद्वान होता, याजपासी दोन वर्षें विद्याभ्यास करण्यांत घालविली. तेव्हां थोडकेच दिवसांत संपूर्ण विद्याभ्यास करणारे होते त्याहून अधिक होऊन सर्वांवर चढ केला

आणि पूर्ण विद्वान झाला. कालचक्राचे गतिस्तव, म्हणजे रोजगार करण्याकरितां वतनाचे जागाहून निघोन हिंदुस्थानास जाता झाला. अली आदिलशाहाचे कारकीर्दीत विजापुरास येऊन राहिला. विजापुरांतही विद्याभ्यास करणें आरंभिले. कितिएक विद्याभ्यास करणोर, कीं जे पिराज येथून त्याचे समागमे आले होते व कितेक दक्षणचे विद्याभ्यास करणारासहित, विद्याभ्यास करण्यांत निमग्न झाला. तेव्हां दरबारांतील कितेक संभावित थोर थोर कामदारानी अफजलखान याचे विद्येचें व अकलेचे व लक्षणाचे तारिफीची अली आदिलशाहापासी प्रसिध्धी केली. बहुत तारिफ केली. अफजलखान याची अशी तारिफ केली कीं, अफजलखान याजला निरंतर संनिध ठेवावा अशी पादशाहास आवडी उपजली. तेव्हां अफजलखान यास पादशाहापासी आणोन भेटविला. सरकारचे फार पसंत आला. दौलतींतील मोठे मोठे कामदाराचे आग्रहास्तव पादशाहाची चाकरी कबूल केली. सरकार कचेरींतील हुजूर कामदारात दाखल झाला. दरबारांतील संपूर्ण कारभारी मंडळांत प्रमुख झाला. त्याचा प्रमुखपणा येथपर्यंत येऊन पोंहचला कीं, तो माली व मुलुकी कामांत पुर्ण जाणता होता व कोणतेच काम त्याचे विचार व मसलतीचे सल्लेसिवाय चालू होत नव्हते. बहुत अकलवानपणा व पूर्ण जाणतेपणामुळें त्याचा रुतबा व पदवी वाढत होती. शेवटीं तो अफजलखान अमीर जुमलगी म्हणजे संपूर्ण अमीरलोकांतील मुख्य अमीर व वकिलु सलतनत म्हणजे दौलतींतील मुख्य वकील झाला. त्यार्णी सरकारी कामदार होतांच आधीं विद्वान लोक व शास्त्र जाणणारे जमा करणें व अकलवान व समजदार माणसें व विचारवान लोक जमा करणें आरंभिले. मुलुकाची वसाहती, म्हणजे लागण वगैरे, व रयतेची मामोरी, म्हणजे आबादानी, केली. शिपाई लोकांस व फौजेस बहुत दिलभरंवसा देऊन सुख देता झाला. दरबारांतील संपूर्ण कामदार व कारभारी लोकांस आपले सुलक्षणाचे व कृपेचे पाशांत आणोन सर्वांस आपली आज्ञा पालन करणे, म्हणजे हुकुमांत वागणारे, केले. असे हुकुमात ठेविले कीं, संपूर्ण कामदार लोक अफजलखान याचे आज्ञेशिवाय कोणतेच काम करित नव्हते. त्या अफजलखानानी तीनसे ब्राम्हण जातीचे हलकारे व सातसे जासूद बातमी पाठविणारे ठेविले. तेव्हां ते जासूद लोक मुलुकातील व तर्फेतर्फेतील पादशाहाचे वर्तमान ज्या वेळेचे त्या वेळेस जसे जसे असेल तसे तिळप्राय कमजाजती न करितां पोंहचवित होते. अफजलखान यार्णी मोठी मोठी कामें व थोर थोर मर्तब्याची कामें अकलवान व विद्वानांशिवाय दिल्ही नाहीं. पाहा अबदुल हसन गर्वाचे व अभिमानाचे व फंदफितुराचे कारणास्तव आपले बंधुसहित कैद झाला. मुस्तफाखान व कामिलखान हे उभयता मोठे मातबर वजीर होते. त्याजला वजीरीचे कामावर असी मोकळीक दिल्ही होती कीं, ते आपआपले जागीं संतोषानें व आनंदाने सुखात दिवस घालवीत होते. त्याविसी किंचितही वांकडेपणा आदिलशाहाचे मनांत येत नव्हता. मुरादखान याजला कोकणचे मुलुखाचे

हवालदारीवर नेमिला, कीं तो मुलुक दर्याकिनाऱ्यावर बहुत विस्तीर्ण व बहुत उत्पन्नाचा आहे, त्या मुलखावर कायम केला. मातबरखान याजला, कीं त्याणीं बहुत दिवस पेशवाईचें काम केलें होतें त्याजला, सरनोबतीचे पद दिल्हे. शेख सालीम याजला सरखेलीचे पद दिल्हे. तो शेख सालीम मोठा विद्वान व अकलवान नजफमुलुचा होता, कीं त्याणी षिराजीमध्यें विद्याभ्यास बहुत केला. या कारणास्तव माली कामे, म्हणजे एकंदर खजिन्यावर हुकुम व लष्कराचा बंदोबस्त हीं दोन कामें, त्याजकडे ठेविली. चहूंकडील वसूल करणेचा अमल लतीफखान नसाई मुलुखचा, कीं तो सर्वांहून चतुर बोलणारा होता व तो कविता करित होता. त्या कवितेचे शेवटीं आपले नाव वसली असें घालित होता. मुलकी कामे सदर खानास, कीं तो लार येथील सैयद लोकाचे वंशापैकी होता, त्याचे हवाली केली. मुलकाचे व किल्ल्याचे दारोगीचे काम शेख नुरुद्दीन महंमद लारी याजकडे दिल्हे, कीं मुलकामुलकाचे व किलयाकिलयाचे वर्तमानाची विनंतिपत्रे त्याजकडे येत जावीत. त्याणीं पादशाहास मजकूर कळऊन त्या त्या कामाचे बंदोबस्त करून त्या माणसास रवाना करित जावें. खानसाकरीचे पद, दक्षणचे रहाणारे त्यास चापनगीर असे म्हणतात ते पद, व खासगी महालाकडील खजिनदारी व हवालदारी रफिउद्दीन षिराजी याजला, कीं तो अफजलखानाचा चुलत बंधु आहे त्याचे, हवाली केले. असो. तात्पर्य हें आहे कीं, सर्व कारखान्याचे कामदार विद्वान व अकलवान होते. इंद्रभुवनासारखे सभेंत जसे पाहा कमालुद्दीन फतहुल्लाह षिराजी, कीं त्याजला अकलहादी आषर म्हणजे मंतीकचे विद्येंत अकलेचे प्रकार दहा वर्णिले आहेत असे असतां याजला अकरावी अकल जाणणारा असे लिहित होतें, म्हणजे मोठा अकलवान असे मोजित होते. शेख महंमद तराबलीस मुलुकचा, कीं तो माआकुलात व मनकुलात म्हणजे अकलेची व बोलण्याचे म्हणजे अनुभविक व शाब्दिक कामामध्यें त्या दिवसांतील तो अद्वितीय होता. मीर इनुद्दीन फजलुलल्लाह इनिदी व मिताने सरफीन मलाई आसफहानी द मीर मुरपदअली व संपूर्ण दक्षणेत नवायत या जातीचे रहाणारे विद्वान होते त्यार्णां विजापुर येथें ही नहव, सर्फ, तफसीर, फिलाह व हासीद या विद्येचा अभ्यास करून आपणास त्या काळांतील प्रमुख विद्वान जाणित होते. हमेषा हजर होते. सर्वदा विद्येची चर्चा व संवादांत निमग्न होते. विद्याभ्यास करणारेही बहुत होते. ते पाहा कमालुद्दीन याचे सेवेंत व त्याचे घरीं नित्य संथा म्हणजे विद्या शिकणेचा पाठ घेत होते. संवाद करणें चालत होते. हे संपूर्ण विद्वान पाहा कमालुद्दीन याचे सेवेंत जमा होत होते. विद्येची चर्चा व संवाद करित होते. तात्पर्य, ही जमात कीं हरएक यापैकी, विद्वान होते. ते संपूर्ण अफजलखान याचे विचार व मसलतीनें दरबारांत येऊन जमा झाले होते. यापुर्वी अफजलखान याची योग्यता व अधिकार विद्येमध्यें किती

आहे हें कोणीच जाणीत नव्हते. जेव्हां अफजलखान याणीं ही मंडळी जमविली तेव्हां अफजलखान याचे विद्येची व गुणाची योग्यता सर्वांस कळली. ज्या दिवशीं षिराज येथून शाहा कमालुद्दीन याजला विजापुरास आणावयाकरितां माणसें रवाना केला त्या दिवसापासून शाहा कमालुद्दीन याणी षिराज येथून येऊन आदिलशाहाची भेटी घेतला त्या दिवसापर्यंत कमालुद्दीन याजला आणविण्याबद्दल चाळीस हजार होन खर्च झाले होते. केव्हां केव्हां आदिलशाहाची स्वारी विद्या शिकण्याचे शाळेंत येत होती. एके दिवशीं अफजलखान याचा विद्येप्रकर्णी वाद शाहा फतीलल्लाह यासी झाला. ते प्रकर्ण आदिलशाहाचे कानावर घातलें. तेव्हा आदिलशाहा याणी आज्ञा केली कीं, ज्या समयीं अफजलखान विजापुरास आला तेव्हां त्याची विद्वानपणाची योग्यता किती आहे ती ओळखील असा कोणी नव्हता. अफजलखान याणी ही विद्वान मंडळीची जमात जमविली याचे कारण हेंच होतें कीं, या मंडळीकडून आपले विद्येची योग्यता प्रसिध्ध करावी असें होतें. ही विद्वान लोकांची सभा व नित्य विद्येची चर्चा अली आदिलशाहा जिवंत होता तोपर्यंत सारखी चालली होती. दोनशे चाकर लोक विद्वान, सुज्ञ व ग्रंथ जाणणारे त्यास कचेरीत नेमिले होते त्याची गणतीच नव्हती. अफजलखान एवढा विद्वान व पूर्ण सुज्ञ असोन पादशाहाचे सर्व मुलकाचे बंदोबस्ताचे काम करूं लागला. आदिलशाहा याणीं आपले राजधानींतील वकिलीचें काम अफजलखान यास देऊन वकिलु सलतनत असें पद दिले. तीनसे ब्राह्मण लोक हरकारे, म्हणजे ज्यास हलकारे म्हणतात, व सातसे जासूद बातमी कळविण्याकरितां ठेविले. नित्य सर्व पादशाहाचे व आपले सर्व हद्दींतील अमलदारांचे कारकुनांचे व अमीर लोकांचे वर्तमान तपसीलवार आदिलशाहास कळवित होते. एके दिवशीं आदिलशाहा याणीं आज्ञा केली कीं, अफजलखान जेव्हां मुलकी कामांत आला तेव्हांपासून पृथ्वींतील कारभार कसा करावा व पृथ्वीसंरक्षण कसें करावें हें मजला कळूं लागलें आणि राजधानीचें सुख पावता झालों.

## २४. मुस्तफाखान आर्बस्थानी याचे थोडेसे वर्तमान : आरादस्थानी

मुस्तफाखान आर्बस्थानी, कीं त्याचे मुळचें नांव सयद कमालुद्दीन हुसेन असें होते. आर्बस्तानचे मुलुकांतील सयद जारा म्हणजे सैद कुलीचा वंशस्थ होता. बहुत योग्य व मोटा विद्वान व सुलक्षणिक होता. तो रोजगाराकरितां हिंदुस्थानास जाता झाला. इब्राहीम कुतुबशाहाचे कारकीर्दीत गोलकुंड्यास येता झाला. कुतुबशाहा याणीं कमालुद्दीन बहुत विद्वान आहे असे जाणोन त्या विषयीं विचार करून दिवसे-दिवस नाना प्रकारचे इनाम व बक्षिसें देऊन त्याची योग्यता वाढविता झाला.

मुस्तफाखान याणी आपले अकलेनी व मसलतीचे हुषारीनें मुलुकाची वसाहत, लष्क-रचा जमाव व रयत लोकास सुख करिता झाला. असा करिता झाला कीं, संपूर्ण शिपाई लोक व रयेत लोक आबादान होऊन मुस्तफाखान याची तारिफ व स्तव करिते झाले. थोडकेच दिवसांत मुलकी व महाली संपूर्ण कामे एकंदर अशी हातीं आणिली कीं, कुतुबशाहा त्याचे अक्कल व हुषारीमुळें त्या कामांत कांहींच दखलगिरी करित नव्हता. सर्व मुखत्यारी यावरच टाकिली होती. जें काम मुस्तफाखान करित होता तें समय ओळखून प्रसंगास्तव मुस्तफाखान याचे मनोधारणाकरिता कुतुबशाहा तें काम कबुल करित होता आणि यत्न करून सिध्धीस नेत होता. जेव्हां कुतुबशाहाचे राज्य अशा प्रकारचें मजबूत झालें होतें कीं, दुसरे पादशाहा, कीं ज्याचे राज्य कुतुबशाहाहून पसंत अधिक होते तें पादशाहा देखिल, याचे डोळापुढें व जरबपुढे योग्यतेस ठरत नव्हते. कुतुबशाहा केव्हां केव्हां खुद्द जातीनें जीं जीं कामें सहज करित होता तेणेंकरून मुस्तफाखान याजला नीट वाटत नव्हते. जेव्हां मुस्तफाखान कुतुबशाहाचे वकिलीचे कामावर बहुत दिवस होता तेव्हां सामान व जमात मुस्तफा-खान याजपासी बहुत जमली होती. या कारणास्तव त्याजला बहुत गर्व व अभिमान झाला. हळुहळू त्याचा वांकडेपणा अंतःकर्णात आला. तेव्हां संकट उत्पन्न करणारे व खटली लावणारे नाना प्रकारचे बखेडे उत्पन्न करण्याकरितां सिध्ध झाले. मुस्तफाखान व कुतुबशाहा या उभयतांत विरूध्ध आलें. कुतुबशाहाचे मनांत संशय उत्पन्न झाला. मनांत आणिलें कीं, मुस्तफाखान याजला कामावरून बरतर्फ करून दुसरे कोणीतरी त्याचे जाग्यावर कामावर ठेवावा. मुस्तफाखान याजपासी बहुत जिन्नस व रोख एवज अत्यंत होता तो लुटून घ्यावा असे मनांत आणिलें. हें वर्तमान मुस्तफाखान याजला कळलें तेव्हां या दरबारांतून आपल्यास निघोन जाण्यास सुटका कशी होती या विचारांत पडला. हरएक प्रकारचे बहान्याने आपले सुटकेचा विचार पहात होता. परंतु सुटकेचा योग घडून येईनासा झाला. अशा समयांत कुतुबशाहा व रामराज या उभयतां पादशाहांत युध्ध प्रकर्णी सवाल जबाब आपसांत चालू झाले. हा मनसुबा चालला होता तेव्हां ईश्वराचे येथील कामदार म्हणजे ब्रम्हदेव आदिंकरून मुस्तफाखान याचे सुटकेचा विचार करिते झाले. हा समय मुस्तफाखान याणी अलभ्य लाभाचा असा जाणोन नाना प्रकारच्या आशा दाखऊन व बहुत प्रकारे शिकऊन कुतुबशाहाचे मनांत लढाई करण्याचा भाव आणोन देता झाला. युध्धाविषयीं रामराजावर कंबर बांधावी म्हणजे या करण्यांत इहलोकी कीर्ति व परलोकी उत्तम फल प्राप्ती आहे असा बहुत प्रकारें बोध करित होता. तेव्हां कुतुबशाहानें या कामाचा विचार ठरऊन ही गोष्ट कबूल केली. वकिलाचा पोषाख त्याजला दिला. मुस्तफाखान यानी निरोप घेतेसमई मुजरा करून विनंति केली कीं, हे खुदावंत मज वृध्ध चाकरावर मेहेरबानगी करून मजला एक करारपत्र लिहून द्यावे कीं, मनोरथ पूर्णताशय प्राप्ती

झाल्यानंतर व हिंदु लोकांची शिकस्त झाल्यानंतर या सेवकास म्हणजे मजला मेहरबानगी करून मक्केस जावयास निरोप द्यावा, म्हणजे मक्का मदिना व पवित्र बारा इमामाचे स्थानीं जाऊन यात्रा करून व नवस फेडून आपले आयुष्य चिरकाल व दौलत हमेषा रहावी एतदर्थी आसिर्वाद देण्यात निमग्न राहीन. कुतुबशाहा याणी त्याची विनंती मान्य करून कौलनामा म्हणजे करारपत्र लिहून देऊन पूर्ण संतोषानें अहमदनगरास जाण्यास निरोप दिल्हा. तेव्हां मुस्तफाखान याणी निजामशाहाकडे जाऊन सर्व मनांतील गोष्टी ठरविण्यांत आणिल्या. त्यानंतर उभयता शाहा म्हणज निजामशाहा व कुतुबशाहा एकत्र होऊन रामराजावर चालून गेले. अशा प्रकारें कीं, येविषयींचे सविस्तर वर्णन सदरी झालेंच आहे. त्याप्रमाणें उभयता बादशाहा यशस्वी होऊन मनोरथ पुर्ण झाले. तेव्हां मुस्तफाखान याणी तो समय अलभ्य लाभाचा अशी वेळ पुन्हा यावयाची नाहीं असें जाणोन आदिलशाहाचा मुख्य कारभारी किष्वरखान व निजामशाहाचा मुख्य कारभारी मौलाना इनाइतुल्ला या उभयता कारभाऱ्याचा आश्रय करून वसिल्यानें निरोप घेणेंविषयीं कुतुबशाहापासी रदबदली करिता झाला. आधी खुद्द आपणच कुतुबशाहास विनंति केली कीं, ईश्वरानें कृपा करून आपले मनोगतानुरूप आपले मनोरथ पूर्ण केले, आपली फेड केली व परलोकी उत्तम फल प्राप्ती व्हावी व आपली दौलत निरंतर रहावी असे ईश्वरानीं केलें. आतां माझी विनंति आहे कीं, करार ठरल्याप्रमाणें मजला मक्केस जाण्यास रजा देण्याची आज्ञा झाली पाहिजे. कुतुबशाहा याणी आज्ञा केली. आम्ही आपले राजधानीस परत गेलो म्हणजे निरोप देऊं. मुस्तफाखान समजत होता कीं, हा पादशाहा आपले राजधानीचे शहरास पोंहचला, म्हणजे कदापि निरोप द्यावयाचा नाहीं. प्राणच घेईल. असें जाणोन निरुपाय होऊन येविषयीं आग्रह करून उभयतां मुख्य कारभाऱ्याकडून ही विनंती करविता झाला. त्याणीही एतदथा बहुत यत्न केला. यद्यपि कुतुबशाहा रजा देत नव्हता तत्रापि किष्वरखान व मौलाना इनाइतुल्ला याणी अति यत्न करून आग्रह केला. तेव्हां कुतुबशाहा याणी निरुपाय होऊन अति आग्रहास्तव निरोप दिल्हा. मुस्तफाखान याची बायकामुलें व सर्व सामान व खजिना गोलकोंड्यामध्यें होता. त्याचीही सुटका झाली पाहिजे यास्तव किष्वरखान व इनाइतुल्ला हे उभयता मुस्तफाखान याचे घरमंडळी व खजिन्याची सुटका होणेविषयीं कुतुबशाहापासी यत्न करिते झाले. कुतुबशाहा याणी मुस्तफाखान याचे एकंदर सामान व मंडळीसुध्धां त्याजला निरोप देऊं नये म्हणोन नाना प्रकारचे अडचणीची उत्तरें केलीं. परंतु या उभयतां कारभाऱ्यांनीं मुस्तफाखान याचीं बायकामुलें सोडून देणेविषयीं फार आग्रह केला. त्यावरून कुतुबशाहाचे मनांत अंदेशा आला कीं, किंचित ढिलाई झाल्यास म्हणजे थोडासा गाफिलपणा झाल्यास आदिलशाहा व निजामशाहाकडून नाना प्रकारचीं संकटे उत्पन्न होतील. निरुपाय होऊन हजारो खिन्नतेनें निरोप देता झाला. मुस्तफाखान विजयानगराहून

निघून कलबुर्ग्यास येऊन राहिला. तेव्हां बायकामुलें वगैरे घरमंडळी व सामान व द्रव्य बहुत व अत्यंत होतें ते गोलकुंड्याहून कलबुर्ग्यास सुरक्षित येऊन पोंहचले. सर्वांस ही गोष्ट प्रसिध्ध आहे कीं, ओझ्याचे बैल आठ हजार व बारा हजार एका माणसास एक ओझें उचलेल अशीं ओझीं रोख ऐवज व जडजवाहिराची होती. कारण कीं, वीस लाख होनाहून अधिक द्रव्य होतें. इतकें द्रव्य कुतुबशाहापासी पेशवाईचे कामांतच मिळविलें होतें. मुस्तफाखान याजला निरोप दिल्यानंतर कुतुबशाहा थाणीं अत्यंत क्रोधायमान होऊन मुस्तफाखान याचा वाडा पाडून जमीनदोस्त करावा म्हणोन हुकूम दिल्हा. त्यावरुन सर्व वाडा पाडला. मुस्तफाखान याचे वाड्यापैकीं एक स्वयंपाकघर राहिलें होतें. तें त्या काळांतील पादशाहा लोकांचे वाड्याएवढे होते. तात्पर्य मुस्तफाखान बायकामुलें व सामान व द्रव्य सुध्धां विजापुरचे राजधानींत येऊन अली आदिलशाहाचे छायेंत, कीं जी छाया भयाभीत झालेले लोकांस आश्रयदायक आहे तेथें, आश्रय धरून राहिला. आदिलशाहा याणी त्याजला रहावयास मोठा वाडा दिल्हा. त्याचे नेमणुकीस दोन हजार स्वार दिल्हे. बहुत दिवस अमीरीचे कामावरच होता. किष्वरखान वारल्यानंतर व अबदुल हसन कैद झाल्यानंतर आदिलशाहाचे पेशवाईचे पद त्याजला मिळाले. या राजधानींतील मदारुल महाम म्हणजे सर्व कामाचा त्यावर भरंवसा असा मुख्य कारभारी व पूर्ण विश्वासू झाला. मजबुतीचा झेंडा उभा केला. त्याची मुखत्यारी व प्रमुखपणा येथपर्यंत येऊन पोंहचला कीं, हुकूम देण्याचे कामांत कुलमुखत्यार होता. अशी मुखत्यारी त्याजला दिली कीं, आदिलशाहा मुख्य सिका आपणापासून दूर ठेवित नव्हता व कोणाचे स्वाधीन करिता नव्हता आणि सर्व काळ आपले हाताचे बोटांत आंगठीप्रमाणें ठेवित होता तो सिका मुस्तफाखान याचे हवाली केला. हरएक कापास व हरएक मसलतीस मुस्तफाखान जिकडे जाईल तिकडे तो सिका समागमे नेत होता. जेव्हां हुजूर रहात होता तेव्हां तो सिका मुस्तफाखान याचे घरी रहात होता. आदिलशाहाचे पेशवाई व मुलकी कामांतही इतके सामान व जमात जमविली कीं, त्या कालांतील कोणतेच पादशाहा एकापासी देखिल तितका खजिना सामान सरंजाम नव्हता. गुजराथचे समुद्रापासून बंगालचे समुद्रापर्यंत एकसे हपशी जहाजे त्याचे हुकुमात व हस्तगत होती. जहाजवाल्याचे पोटापाण्याचा सर्व बंदोबस्त ठेऊन त्या कारकीर्दींतील थोर थोर पादशाहा रुमचा सुलतान सुलेमान पादशाहा व इरानचा तह्मासिफ पादशाहा व हिंदुस्थानचा अकबर पादशाहा असे मोठे मोठे पादशाहाकडे पत्रें येण्याजाण्याचा राबता ठेऊन, प्रतिवर्षी फडफर्मास नाना प्रकारचे उत्तम जिन्नस त्याजकडे पाठवित होता. त्या पादशाहांकडूनही नानाप्रकारचे फडफर्मास व उत्तम पदार्थ व भारी किंमतीचे पोषाख त्याजला येत होते. अकलवानपणा व राजधानींत नफा करणेपणा उत्तम विचारवानपणानें मेवाड व कर्नाटकचा मुलुक

खारपाण्याचे समुद्रापर्यंत असा बंदोबस्त ठविला कीं, तर्फेतर्फेचे संपूर्ण हिंदू जातीचे अमीर लोक, कारागीर लोक व त्या सरहद्दींतील राजे लोक मुस्तफाखान याची चाकरी पत्करून हुकुमांत राहिले होते. जे जे लोक गर्विष्ठपणानें व अभिमानानें हुकुमांत वागत नव्हते त्या बेमान व अभिमानी लोकांवर फौज घेऊन जाऊन त्याजला जीवें मारून निर्मुळ फडशा करित होता. त्या मुलुकास मुसलमानी रंगाने रंगवित होता, म्हणजे त्या मुलुकांत मुसलमानी हुकूम चालू करित होता. हिंदु लोकांचे देवांची देवालयें पाडून जमिनदोस्त करून त्या देवालयांचे ठिकांणीं मसिदी बांधित होता. इमाम व खतीब व मर्जन म्हणजे बांग देणारे नेमून निमाज पढणें चालवित होता. जे जे गृहस्थ सेवकपणा धारण करून पुढें येऊन आम्ही मुसलमानाचे चाकर म्हणवित होते त्यावर कांहीं हक व कारभार म्हणजे प्रतिवर्षी तुम्ही अमुक द्रव्य देत जावें असें ठरऊन त्याचा मुलुक त्याजकडे कायम ठेवित होता. ठरल्याप्रमाणें प्रतिवर्षी करभाराचा ऐवज सरकार खजिन्यांत दाखल होत जावा असा बंदोबस्त केला. मुस्तफाखान याचे बहुत यत्नानें विजयानगरचा बहुत मुलुक आदिलशाहाचे राजधानींत येऊन आदिलशाहाचा मुलुक बहुत वाढला, कीं दक्षणचे कोणतेच पादशाहास तितका मुलुक प्राप्त झाला नाहीं. परंतु अली आदिलशाहा फार गर्विष्ठ, अभिमानी व क्रूर होता. थोडासा गुन्हा झाला असता त्या गुन्हेगारीस बहुत शिक्षा करित होता व मुसक्या बांधणे व जीवें मारणे व हात किंवा कान कापणेविसी फार कठोर व अविचारी होता. असेच एकेसमई आदिलशाहाचे वैद्यशाळेंतील जे हकीमानी म्हणजे वैद्यानीं एक मिसकाल म्हणजे सव्वाचार मासे भार मोमियाई, म्हणजे औषध गुणकारक चांगले असते त्या औषधाची पुडी, कोठे गमाविली होती. कितेक दिवसानंतर वर्तमान कळलें कीं, तें औषध फरास व मुदतबखुखान्याकडील मुदतबखी, म्हणजे स्वयंपाक करणारे आचारी, लोकास सांपडले आणि ते औषध फरास व मुदतबखी याणीं वाटून घेतले होते. अशी बातमी लागली तेव्हां त्या लोकांस शोधून काढिले. या चोरीचे कामांत बावीस असामी होते. त्याजला धरून असा मार दिल्हा कीं ठार झाले. प्रेतें बाहेर निघालीं. कामाचे बंदोबस्ताविषयीं असा होता कीं, साठ वर्षेपर्यंत दक्षिणेंत थोरपणानें व मनोरथ पूर्णतेनें राज्य भोगिलें. त्याचे मुदतबखखान्यात म्हणजे स्वयंपाकघरांत चिनीचे भांडे देखिल फुटलें नाहीं. जर करितां एखादे वेळस कोणाचे हातून चिनीच भांडे फुटल्यास तेच वेळेस त्या भांड्याचे मोबदला दुसरे भांडे भरून घेत होता. शेवटीं अली आदिलशाहा वारलेनंतर सात महिन्यांत किष्वरखान याचा पुत्र, धाकटा किष्वरखान म्हणोन प्रसिध्ध होता, त्याणी च्यार महिनेच मुख्त्यारीचे काम वहिवाटीले होते. त्या धाकटे किष्वरखान यास बंकापुरांत ठार मारिला. त्याचे सर्व सामान व माल लुटून नेला.

## २५. मोठे हिऱ्याचें वर्णन :

जे समयीं भोज तिरमल राजा याणीं अली आदिलशाहास सहा लक्ष होन् रोख पाठविले तेव्हां विनंति केली कीं, आपली स्वारी विजयानगरापर्यंत येऊन रामराजावर गर्दी करून राजपदावरून काढून मजला, कीं मी या मुलकाचा वारिसदार व मालक आहे यास्तव मजला, आपण येऊन तख्तावर बसवून कायम करावे. असें केले असतां मी बहुत द्रव्य देईन. अशी विनंती लिहिली. त्यावरून आदिलशाहा याणीं त्याचे विनंतीप्रमाणे तिकडे जाऊन विजयानगरासंनिध जाऊन पोंहचला. तेव्हां भोज तिरमल हा तिमराज याचे ठकविद्येनें ठकून आदिलशाहा याजला परत जाणेविषयीं अर्ज करून रोख आठ लाख होन व एक मोठा हिरा फार थोर भारी वजनाचा आदिलशाहाकडे पाठवून आदिलशाहास निमे वाटेतून माघारे फिरविले. अली आदिलशाहा ज्या समयीं रामराजाचे भेटीस गेला तेव्हां तोच हिरा आणखी कितेक उत्तम पदार्थासहित रामराजास दिल्हा व तो हिरा वजन पंधरा मिस्काल, एका मिस्कालाचे मासे चार होतात तेव्हां या हिशेबानें वजन, मासे ६० झाले. या हिंशेबानीं तोले पाच ५ होतात व पंधरा मिस्काल एकवीस दिरम भार व एक दिरम ... ... मासे भार असा वजनाचा, चौकोनी व माणसाचे तळहाता येवढा. त्या हिऱ्याचे मध्यभागी एक काळा तीळ होता. ज्या हिऱ्यावर काळा तीळ असतो तो हिरा फार दुःखदायक असतो. त्या हिऱ्यास पीडा करणारा असे परीक्षक म्हणतात. तो हिरा अकल्याण करणारा आहे असे समजतात. त्या हिऱ्याचे दुःखदायक व अकल्याणकारक गुण दिसोन आले. हे सर्व मनुष्यास प्रसिध्ध आहे कीं, तो हिरा बिजयानगरचे किसनराव रायाचे सरकारांत आला तेव्हां थोडकेच दिवसांत किसनराव राजा तरुणपणाचे वयांत व सुख संतोषाचे दिवसांत शरीरास रोगराग पीडा न होतां एकाएकी या मृत्युलोकाचा परित्याग करून परलोकवास करिता झाला, म्हणजे वारला. थोडकेच दिवसांत त्याचे घराण्याची मंडळी हिऱ्याचे गुणानी वाताहात झाली. तोच हिरा इबराहीम आदिलशाहाचे खजिन्यांत आला. तेव्हां थोडकेच दिवसांत इबराहीम आदिलशाहा नाना प्रकारचे रोगानें रोगग्रस्त होऊन पडला. तेव्हां संपूर्ण मुलकाचे वैद्य लोकांनी बहुत उपाय केले. परंतु कोणतेच औषधास गुण आला नाहीं. आयुर्दाय होता तोपर्यंत बहुत दिवस पीडा भोगून परलोकी गमन करितां झाला, म्हणजे वारला. अली आदिलशाहा याणीं पुन्हा तोच हिरा विजयानगरास नेऊन रामराजास दिल्हा, हिरा देऊन चार वर्षे झाल्यानंतर, रामराजावर प्रसंग गुजरला. कसा गुजरला तो सर्वांस प्रसिध्ध झाला. रामराजाचे राज्य व घरमंडळी सुध्धा समूळ वाटोळे झालें. तो मजकूर सदरीं लिहिलाच आहे. कांहीं दिवस गुजारल्यानंतर अली आदिलशाहा याजला वर्तमान कळविलें कीं, कोणी एक गृहस्थ गोव्याचे बंदरात तो हिरा आणोन विकित आहे. गोव्याचा

मालक तो हिरा खरिदी करण्याकरितां सिध्ध होऊन हिऱ्याची परिक्षा करणारास बोलावून त्या हिऱ्याची किंमत ठरविते झाले. साठ हजार होन किंमत ठरली. तेव्हां गोव्याचा मालक विचारांत पडोन बोलला कीं, पुरातन कालचा पादशाहा आमचा धणी आहे. त्याचे हुकुमाशिवाय हा हिरा खरिदी करितां येत नाहीं. साठ हजार होन हे बहुत द्रव्य झाले. इतके द्रव्य घेऊन एवढासा धोंड्याचा तुकडा, म्हणजे हा हिरा, खरिदी करणेविसी आमची अकल चालत नाहीं. हिऱ्याचे धण्यास बोलले कीं, तुम्ही कांहीं दिवस येथें रहावें, म्हणजे पादशाहाची परवानगी आणोन खरिदी घेऊं. असे वर्तमान अली आदिलशाहास कळलें. तेव्हां तो हिरा आपण आणावा अशी अली आदिलशाहा यास आवड उत्पन्न झाली. तेव्हां आसीकबी म्हणजे स्त्री, कीं त्या काळांतील ती स्त्री मोठी ठकबाज होती व नाना प्रकारचे ठकविद्येचे हुन्नर जाणीत होती, तिजला गोव्यास रवाना केली. ही हरएक प्रकारचे ठकविद्येने व नाना प्रकारचे ठकबाजीनें हिऱ्याचे मालकास विजापुरास आणावा म्हणोन रवाना केली. तेव्हां आसीकबी इणे गोव्यास जाऊन हिऱ्याचे मालकाची भेटी घेतली. त्यास कांहीं द्रव्य देऊन ठकवून विज्यापुरास येण्यास कबूल केलें. इतक्यामध्यें त्याचे आप्तविषयीं मंडळी पैकीं कोणा एकास हें वर्तमान कळलें कीं, याजपासी मोठा हिरा आहे. तेव्हां त्या गरीब बिचाऱ्यास मध्यरात्रीं बिछान्यावर निजला होता व झोंप लागली होती अशा अवस्थेंत ठार मारिला. तो हिरा हरण करून गोव्याहून पळून गेला. असें हें वर्तमान कळतांच पादशाहा, कीं त्याचेच नातलग त्या हिऱ्याकरितां एकामागे एक पाठी लागले होते तेव्हां आसीकबी या प्रकर्णावरून चिंतेंत पडून त्या हिऱ्याचा बहुत शोध करिती झाली. शेवटीं त्या हिऱ्याचा पत्ता मुजफराबादेकडे लागला. तेव्हां तिकडे गेली. ज्याणी हिरा नेला होता त्या ग्रहस्थाचा ठिकाण लाविला आणि विजापुर येथें पादशाहाकडे आणिला. आदिलशाहा याणी त्या हिरेवाल्याचे मन समाधान करून, म्हणजे त्यांचे मनोगतानुरुप त्याजला द्रव्य देऊन, तो हिरा त्याजपासून खरिदी घेतला. हें वर्तमान प्रसिध्ध झालेच होते कीं, तो हिरा फार अकल्याणकारक व फार घातक आहे. तेव्हां तो हिरा कित्येक दिवस ओसाड जागेत पुरून ठेविला. शेवटीं अली आदिलशाहा याचे मनांत आले कीं, तो भारी किंमतीचा हिरा घातक गुणाचा आहे, तो बारा इमामचे एखादे जागीं देऊन टाकावा, म्हणजे या हिऱ्याचे सर्व दुर्गुण जाऊन चांगला होईल व कल्याणप्रद व सुखकारक लक्षणाचा होईल. आदिलशाहाचे लक्षांत हें आलें नाहीं कीं, आंगस्वभाव व उपजत स्वभाव आहेत ते वरच्या उपायानीं जात नाहींत. जाळावे हा अग्नीचा स्वभाव आहे. अग्नीपुढें कुरानाची किताब ठेविली तत्रापि हे कुरान आहे, या कुरानास कसें जाळावें असें कांहीं एक मनांत न आणिता जाळीलच जाळील. असो. शेवटीं तो हिरा आठवा इमाम अली मुसा सलील्लाह आलेहे वआ-

लीही वसलम याजकडे पाठविणेचे ठरवून तहमासिप या पादशाहाकडे पाठविला, कीं आपण हा हिरा आठवे इमामाचे स्थानीं पोंहचता करावा. तो हिरा जेव्हां तहमासिप पातशाहापासी येऊन पोंहचला तो पादशाहानीं कांहीं दिवस आपल्यापासी ठेऊन घेतला. तेव्हां तो पादशाहा तहमासिप थोडकेच दिवसात मरण पावला. तेव्हां इस्मालशाहा त्याचा मुलगा, बाप वारल्यानंतर खुरासानचे तख्तावर बसला. तोही एक वर्ष पांच महिन्यानंतर मृत्यु पावला. तो वारल्यानंतर त्याचा भाऊ सुलतान महंमद म्हणोन होता तो इरानचा पादशाहा झाला. त्याणी चार कुबे म्हणजे शाहामृगाचे अंड्यासारखे चार गोलदार चार घोष जडावदार करून हजरत इमाम श्रेष्ठ आठवे इमाम याचे सदुक कबरेवर बांधणेकरितां तयार करून आणि तो हिरा त्या घोषापर्की एका जडावदार घोषावर जडून रवने मिनोऱ्याकडे पाठविला. तेव्हां त्या कल्याणप्रद कबरेवर बांधिला. तेव्हां तो घोष बांधून तीन वर्षे पुरी झाली नव्हती तोंच अबदुल्लाखान उजबक समरकंद येथून निघून अत्यंत फौजेसहित खुरासान या मुलकावर चालून आला आणि तो संपूर्ण मुलुक हस्तगत केला. एके दिवशीं दुस षहरास, कीं त्या षहरांत सदरहू पवित्र इमामाची कबर प्रसिध्ध आहे ते शहर हस्तगत केलें. तेथें बहुत मनुष्यें कत्तल केलीं. खास रवने मुबारकमध्यें चार हजार सयद लोक व सुखवस्तु, कीं जे संकटाचे व दंग्याचे भयास्तव रवन्यामध्यें आश्रय धरून राहिले होते ते, संपूर्ण कत्तल झाले. असे कत्तल झाले. कीं, त्या कत्तल झालेले मनुष्याचे रक्त त्या रस्त्यांतून वाहते झाले. कितेक सामान व पादशाही मर्तब्याचे जिन्नस रवने मुबारकमध्यें जमले होते तितके त्या काळांतील कोणतेच पादशाहापासीचे खजिन्यांत नसेल ते सामान लुटून नेले. त्या संपूर्ण सामानापैकीं तो हिरा अबदुलखान याचे खजिन्यांत दाखल झाला. तेव्हां थोडकेच दिवसांत अबदुल्लाखान मरण पावला. त्याचा पुत्र अबदुल मोमीनखान आपले बापाचे जागीं कायम झाला. त्या हिऱ्याचे घातुक लक्षणानें सत्वरच मारला. त्यानंतर तो हिरा एका गृहस्थाचे हातीं गेला. याणे तो हिरा रुम देशास नेला. तेव्हां रुम मुलुकाचा पादशाहा सुलतान महंमद हा तरुण वयांतील भरजवानींत व ज्यास इनसाफ करणारा व धर्मवान असोन अशा अवस्थेत वारला. त्या दिवसापासून तो हिरा रुमचे मुलुकांत जाऊन रुमचे राजधानींतील कारभारांत बहुत प्रळय केला. प्रथम रुमचे अमीर लोकांत आपसांत वैर उत्पन्न केलें. दुसरे रुमचे लष्करांत व इराणचे लष्करांत चार वेळ युध्ध झालें. दर हल्लेस इराणचे लष्करवाल्यानें रुमचे लष्करावर गर्दी करून प्रबळता केली. तिसरे रुमचे अमीर लोक शाहा आबास बिन सुलतान महंमद बिन शाहा तहमासिप यासी भेटले आणि जिवावर उदार होऊन चाकरीची कंबर बांधून आजुर बायज्यान व परवान या हद्दींतील मुलुक शाहा तहमासिप वारल्यानंतर रुमी लोकांचे हाती गेला होता तो शाहा आबास याचे हवालीं पुनः केला. त्या हिऱ्याचा वाईटपणा बहुत दिवस रुमचे मुलुकांत राहिला. ईश्वर त्या हिऱ्याचे संकटापासून रक्षण करो.

## २६. अली आदिलशाहा याणी मरण पावणे :

अली आदिलशाहाची बहीण तानी बिबी सुलतान या नांवाची अली बरीद याजला देऊन विवाह केला होता. तिजला पोटीं कांहीं संतती न होतां वारली. तेव्हां तिचे हिशाचे जिन्नस तिचे पाठीमागे जडजवाहिर व रोख ऐवज वगैरे बहुत अली बरीद याचे घरी राहिले. जेव्हां कुरान परीफमध्यें मैत माणसाचे जिन्नस मेल्यावर पाठीमागे रहातात त्याचे विभाग परत देण्याचे पर्याय चार प्रकारे वर्णिले आहे. प्रथम पर्याय जी स्त्री किंवा कोणी पुरुष मरेल त्याचे जिन्नस त्याचे आईबापास परत द्यावे. दुसरा पर्याय मयताचे जिन्नस रहातील ते, त्या गावांतील उत्तम चालीचा गृहस्थ असोन कर्जाचे पेंचांत येऊन कर्जदार त्याचे घरदारासुध्धां लिलाव करित आहेत अशा पेंचांत येऊन ज्याचा फडशा होत आहे त्यास मैताचे जिन्नस माल वगैरे असतील ते देऊन त्याजला त्या संकटातून सोडवावें. तिसरा पर्याय ज्या ठिकाणी हमरस्त्यावरील नदी नाल्याचा पुल बांधलेला शिकस्त होऊन, म्हणजे मोडकलीस येऊन, मार्ग बंद झाला असेल त्या ठिकाणीं तो मैताचा माल खर्च करून ते पूल वगैरे दुरुस्त करून मार्ग चालते करावे, किंवा मसिदी वगैरे प्रसिध्ध स्थानाच्या इमारती मोडकळीस आल्या असतील त्या नीट कराव्या, किंवा ते द्रव्य खर्च करून नवीन बांधाव्या. चौथा पर्याय ज्या स्त्रीनें किंवा पुरुषानें अंतकाळी ज्यास द्यावें म्हणोन सांगितलें असेल, किंवा जसे करावे म्हणोन सांगितलें असेल, किंवा लिहून ठेविले असेल त्याप्रमाणें तो मृत्युलेख किंवा मृत्युवाक्य कोणताच शास्त्रार्थ न पाहातां सिध्धीस न्यावें. शास्त्रार्थावरून एक वकील आपले बहिणीचे जिन्नस व जडजवाहिर व माल वगैरे राहिलेले मागून आणावयाकरितां आदिलशाहा याणीं अली बरीद याजकडे पाठविला होता. तेव्हां अली बरीद याणीं तिचे जडावदार जवाहिराचे जिन्नस न देतां बाकीचे सर्व जिन्नस परत दिल्हे. तेव्हां बहिणीचे जिनसांचा दावा बाकी राहिला होता. तेव्हां तारिख ९८८ (इ. स. १५८०) रोजीं कामीलखान याणीं या गोष्टीचे आदिलशाहास स्मरण देऊन पुनः ठरविण्यात आणिले आणि आदिलशाहा पादशाहास विनंती केली कीं माझा व अली बरीद याचा पुर्वीपासून स्नेह आहे. आपला हुकुम झाल्यास मी तिकडे कोणास पाठऊन आपले बहिणीचे जडजवाहिर वगैरे जिन्नस अली बरीद याजपासी राहिले आहेत ते परत आणवितो. तेव्हां आदिलशाहा बोलला कीं, आमचा एकंदर ऐवज अली बरीद याजकडे वाजवी येणें आहे तो ऐवज व जडजवाहिर वगैरे कुरान परीफचे शास्त्रार्थाप्रमाणें त्याजपासून परत घ्यावा. असें बोलला. कामीलखान याणीं या बोलण्यावरून परवानगी झाली असें समुजून अली आका सरखेल याजला आदिलशाहा याजकडे आणून त्याजला वकिलीचे काम देऊन बेदरास रवाना केला. तेव्हां अली आका चार

महिन्यानंतर परत आला. आदिलशाहाचे बहिणीचे जवाहिरापैकी कांहीं जवाहिर व दोन सेवक खोजे, कीं जे दोघे सेवक आदिलशाहाचे बहिणीचे सेवेंत व चाकरींत हमेषा होते त्या सुध्धां, आणोन पादशाहापासी हजर केले. आदिलशाहा यार्णी रात्री दोन सेवकापैकीं एका सेवकास, कीं तो मोठा हुषार होता त्याजला, एकांती बोलावून आणिला, कीं त्याजपासून आपले बहिणीचे जवाहिर बाकी येणें राहिले आहे त्याचा शोध लावावा. यदर्थी बोलाऊन आणिला. तो सेवक खोज्या हलके उत्पत्तीचा असा होता, कीं पादशाहाचे संनिध येऊन पोंहचला व पादशाहापासी पादशाहाचे चाकर लोक प्रत्यक्ष उभे राहिले होते असे असता पादशाहाचे छातीवर असे जोरानी पेषकबज मारिले कीं, ते पेषकबज छाती फोडून पाठींतून बाहेर निघाले. तेव्हां पादशाहा त्या जाग्यावरून उठोन जखमी घायाळ होऊन अंगणात येऊन पडला. तेव्हां जवळ मनुष्यें होतीं तीं मोठ्यानी ओरडली. रफीउद्दीन पिराजी, कीं तो महालाकडील हवालदारी, खानसाकरी व खजिनदारीचे कामावर नेमिला होता तोही सांगतो कीं, त्या समयीं मी बाहेर होतो व अफजलखानही तेथें कित्येक कामदारासहित बसला होता. सर्व तेच वेळेस आपआपले घरास निघाले होते. ते किल्याचे दरवाज्यापर्यंत जाऊन पोंहचले नसतील तोंच आरडा ओरडा झाला. तें ऐकून मी दाराचे आंत येऊन पाहिले तां पादशाहा जखमी होऊन रक्तानें भरून पडला आहे. अफजलखानही घरास जात होता तो माघारा फिरून धांवत धांवत आला. त्यार्णी अवस्था जेव्हां पाहिली तेव्हां आदिलशाहाचे हाताची नाडी पाहिली आणि ओरडला कीं, हे काय संकट प्राप्त झालें? आम्हां सर्वांचे मस्तकावर माती पडो, असें बोलला. नंतर मी पादशाहास उचलून तख्तावर निजविला आणि बाहेर आलो. पादशाहास ज्या खोज्यानें मारिला तो खोज्या जेथें पादशाहास मारिला त्याच महालात एकांत जागीं राहिला होता. एके गृहस्थानें मनांत आणिलें कीं, आंत जाऊन त्या खोज्यास धरून त्याचे पारपत्य करावे. असे मनांत आणिले. त्या खोज्यानी त्या महालाचे दार लाऊन बंद केले होते. दुसरे दिवशीं त्या खोज्यास ठार मारिलें. दुसरे खोज्यास पादशाहाचे सेवक लोकांनीं धरून तेच दिवसीं ठार मारिला. शहरचे संपूर्ण लोकांस आदिलशाहा ठार जाला.[८] हें वर्तमान कळतांच त्याच रात्रीं मंडळीचा बहुत समुदाय येऊन किल्याचे दरवाज्यापुढें जमला होता. कारभारी लोक, संभावित व अमीर लोक लहान थोर वगैरेही दरवाज्यापाशीं जमले. परंतु कोणासही दरवाज्याचे आंत जाण्याचा राबता झाला नाहीं. प्रातःकाल झाल्यानंतर एक गृहस्थ दरवाज्यापुढे येऊन ओरडला कीं, कारभारी लोक संपूर्ण

८. अली आदिलशाहाचा मृत्यु– २४ सफर ९८८ (९ एप्रिल १५८०)– मुघोघव, पृ. २०९; बु इ. मा., म. भा., पृ. २०५.

मंडळी दरवाजापुढें जमली आहे. वकिलु सलतनत अफजलखान याजला सलाम सांगून निरोप सांगताहेत कीं, आम्ही संपूर्ण आज रात्रीं येथे पाण्यासिवाय मछ तडफडतो याप्रमाणे धाबरेपणांत व तळमळीत संपूर्ण रात्र घालविली. आपण कोणते विचारांत आहात व कोणते चिंतेत आहात व कोणता मनुष्य योग्य पाहून तक्तावर बसविणें ठरविले आहे ? आम्ही संपूर्ण कारभारी लोक आपले मर्जीप्रमाणेंच सेवेंत वागावयाजोगें आहों. हे ऐकून अफजलखान बोलला कीं, मी तुम्हा सर्व मित्रांचा सेवक आहे. आपल्यास योग्य दिसेल व ज्या पुरुषास तक्तावर आपण बसवाल त्या गोष्टीस आपण मुख्त्यार आहात. कारभारी लोकांनीं जव्हा उत्तर ऐकिलें तेव्हां आपआपणांत विचार करून प्रतिज्ञा व निश्चय नाना प्रकारचे मजबूत करून मीर् मुर्तजाखान आंजु याजला पाठविला. दरवाज्यानजिक येऊन कचेरी केली आणि बोलला कीं, शाहा कमालुद्दीन फत्तुल्लाह तुम्हांकडील वकील होऊन त्याणीं संपूर्ण कारभारी लोकांत निश्चय ठरविण्यांत आणला आहे कीं, शाहाजादा इब्राहिम् म्हणोन अली आदिलशाहाचा पुतण्या म्हणजे भावाचा मुलगा आहे त्याजला, कीं तो खरा वारसदार आहे, अली आदिलशाहा पादशाहानींही वारंवार जिवंतपणींच आपले पाठी-मागे वाली आहे म्हणजे तक्ताचा धणी आमचा पुतण्या इब्राहीम याजला, करावा असी आज्ञा केली आहे. पादशाहानीं त्याचे पालन पुत्रवत केलें आहे त्या इब्राहिम याजला तक्तावर बसवावा. वकिलु सलतनतपणाचें काम पुर्वीप्रमाणें आपलें आपण करावें. बाकीची पदें ज्या प्रकारें आपले मनोगत असेल व ज्यास द्यावयाची मर्जी असेल तीं तीं पदें त्या त्या पुरुषांस द्यावींत. अफजलखान बोलला कीं, आतां यापुढें मुख्त्यारीचे कामाचा मी धनी होणार नाहीं. दुसरे कोणी तरी नेमावें. यावरून मुर्तजाखान बोलला कीं, एक वेळ आपण या कामांत मन घालावें आणि आपल्यास जें चांगले दिसेल तें करावें. तेव्हां अफजलखान बोलला कीं, बहुत मनुष्याचा समुदाय जमला आहे. जर करितां किल्याचा दरवाजा उघडावा तर सर्व मनुष्यांची गर्दी होईल. न जाणो कदाचित या गर्दी होण्याचे पोटीं एखादे संकट उभें राहील. आतां ते नीट आहे कीं, तीन चार गृहस्थ मुख्त्यार करून आंत घेऊन यावेत. तेव्हां शाहा कमालुद्दीन फत्तुलाह व कामीलखान व मुर्तजाखान व मंजलखान, किषवरखान याचा धाकटा पुत्र कीं जो कामीलखान याचा जावई होता तो, असे इतके गृहस्थ आंत आले. आपआपणासीं एकमेकांत बोलून ममलत करून जनानखान्याचे दरवाज्यांत जाऊन पोंहोचले. इब्राहिम आदिलशाहास घरांतून बाहेर आणून, बुरजावर गादीची बैठक आंथरून, त्यांत श्रेष्ठ मसनदीवर त्याजला बसऊन आदिलशाहाही पादशाही मर्तब्याची हिरवे रंगाची कलाबुती छत्रें चामेरे त्याचे मस्तकावर धरलीं. दरबारांतील कामदार व कारभारी मंडळींनीं मुजरे करून मुबारकबादी देते जाहाले. नजर नजराणा करिते जाहाले. त्यानंतर बाहेरून संपुर्ण मनुष्यानीं मुजरे व स्तव करून परत जाते झाले. यानंतर शाह

कमालुद्दीन फतुल्लाह संपूर्ण कारभारी केला. कामदार, कचरींतील संपूर्ण लोक, विद्वान व गुणवान असे शहरांतील संपूर्ण मंडळीस या समागमें घेऊन अली आदिलशाहाचें प्रेतास स्नान घालून कफन करून, म्हणजे प्रेतावर वस्त्र घालून, पादशाहाचे प्रेत बापाचे रवन्यांत, कीं तो रवना शहरांत प्रसिध्द आहे तेथें, नेऊन शनवारीं तारिख २४ माहे सफर सन ९८८ ( ९ एप्रिल १५००) रोजीं त्या रत्नास म्हणजे अली आदिशाहास भूमींत पुरलें. सन एक हजार अठावन्न ( १६४७-१६४८ इ. स.) रोजीं सुलतान महंमद आदिलशाहा दबीर याणी अली आदिलशाहाचे कबरेवर चौखंडी बांधिली. रफिउद्दीन शिराजी याचे सांगण्यात आहे कीं, असें प्रसिध्द आहे कीं, अली आदिलशाहा हा कामीलखान याचे इशाऱ्यानें मरण पावला होता. त्या प्रकर्णी कारण असें होते कीं, कामीलखान जेव्हां मुल्की कामावर राहिला तेव्हां कामीलखान यास बहुत गर्व व अभिमान जाहाला आणि मींच सर्वांत शाहणा असें मानीत होता. तेव्हां कल्होरचे किल्यांतील, कीं तो किल्ला कामीलखानाचे जहागीरींत होता त्या किल्यांतील, रहाणारापैकीं एक सैयद होता. त्याजला कामीलखान याजकडील मंडळीनें त्याजवर कांहीं दूषण ठेऊन त्या सैयदाचे पायांत बेड्या ठोकून कैदेंत ठेविला. त्या जुलुमाचा बोभाटा बहुत वेळ आदिलशाहाचे कानावर गेला होता. आदिलशाहा याणें चार वेळ कामीलखान याजला आज्ञा केली कीं, सैयद लोकांस इजा देणें हें योग्य नव्हे. याजला कैदेंतून सोडावा. कामीलखान याणें ही पादशाहाची आज्ञा मान्य न करितां पादशाहाचे हुकूमाप्रमाणें काम केलें नाहीं. त्या सैयदास कैदेंतून सोडण्याचे काम ढिलाईवर टाकिलें. तेव्हां एके दिवसीं आदिलशाहा एके ठिकाणीं जात होता. तेव्हां कामीलखानही पादशाहाचे समागमें होता. तेव्हां त्या कैदी सैयदाचा बाप वृध्द तेथें जाऊन पादशाहापुढें ओरडला कीं, हे पृथ्वीच्या धण्या कामीलखान याणीं मोठा जुलूम करून माझे पुत्रास बहुत दिवस कैदेंत ठेविला आहे. आदिलशाहा त्या म्हातारे पुरुषाचे रडणें ऐकतांच घाबरून अत्यंत क्रोधानें संतप्त झाला आणि आदिलशाहा याणी एक लाथ मोठें जोरानीं कामीलखान याजला मारिली, कीं कामीलखानाचे पाठीमागे रफीउद्दीन होता त्याचे आंगावर त्या लाथेचे जोरानें जाऊन पडला. नंतर पादशाहानें यद्यपि कामीलखानाचे समाधान करण्याकरितां नाना प्रकारचे जडजवाहिर व पोषाख वगैरे बक्षिस, दिल्हे व त्याचे पद त्याजकडेच ठेविले परंतु कामीलखान याणीं वाकडेपणा आपले कपटी अंतःकरणांत ठेऊन संधीचा समय पाहून त्याणीं पादशाहास मारविला. ईश्वर जाणे महंमद कासम फिरिस्ता इस्तराबादी याणीं अली आदिलशाहाचे मरणाचे प्रकर्ण दुसरेच प्रकारानीं वर्णिले आहे. परंतु हें प्रकर्ण कित्येक दुसरीं प्रकर्णें रफिउद्दीन शिराजी याणीं प्रत्यक्ष पाहिलेलीं होतीं व महंमद कासम फिरिष्ता याणी ऐकिलेली होती. तेव्हां दिसतच आहे, मिसर याचा अर्थ : " प्रत्यक्ष पाहिल्याची बरोबरी ऐकण्यास कशी येईल ? " कारण कीं, रफिउद्दीन हा

रामराजाचे युध्दाचे पूर्वी पांच वर्षे आपले मुलुकाहून येऊन आदिलशाहाचे दरबारांत चाकरीस राहिला. उत्तम प्रकारचे सेवेंत योग्यता पावोन रात्रंदिवस पादशाहापासी हुजुर हजर होता. एकवीस वर्षे अली आदिलशाहाची चाकरी कली. सर्व प्रकर्ण रफि-उद्दीन यार्णी प्रत्यक्ष आपले दृष्टीनें पाहिलें. हें प्रकर्ण त्याणी निःसंशयपणें लिहिल. महंमद कासम याचा मजकूर भिन्न पडतो. मेळ मिळत नाहीं. कारण कीं, महंमद कासम हा लढाईचे प्रकर्ण झाल्यानंतर बहुत वर्षांनीं या दरबारांत येऊन राहिला आणि पाहिजे तसा मजकूर लिहिला. इनसाफ पहाणाराचे अवलोकनांत प्रत्यक्ष सिध्द आहे. महंमद कासम हा जितका निजामशाहाचा थोरपणा रहाणेंविषयीं यत्न करित होता तितका आदिलशाहाचे थोरपणाविषयीं यत्न करित नव्हता. याजकरितां ग्रंथ लिहिणारानीं कित्येक ठिकाणीं रफिउद्दीन शिराजी यार्णी वर्णन केलेले कथाभाग महंमद कासम इस्तराबादी यार्णी वर्णन केलेल्या मजकुराहून अधिक समजून स्वीकार केले. असें हें लढाईचे प्रकर्ण व आदिलशाहाचे युध्द रामराजासी झालेल प्रकर्ण युसुफ आदिलखान याचे उत्पत्तीचा मजकूर व आणखी कित्येक ठिकाणचें वर्णन केलेले सोडून दिल्हे.

## २७. मयत अली आदिलशाहाची उत्तम लक्षणें व श्रेष्ठ स्वभाव त्याचे मरणाच्या सुचना :

रफिउद्दीन शिराजी हा खानसाकरी व हवालदारीच काम व महालाकडील हवालदारी व खजिन्याचे कामावर नेमिला होता. त्याने एकवीस वर्षे अली आदिलशाहाचे चाकरींत घालविली. सर्व काल आदिलशाहापाशीं बोलण्याचालण्यात हुजूर रहात होता. त्यार्णी त्या दयावंत पादशाहाची कित्येक लक्षणे व स्वभाव पाहून अवलोकन करून लिहिण्यांत आणिले. त्यापैकीं थोडेसे याठिकार्णी लिहिण योग्य दिसलें. सबब तो रफिउद्दीन शिराजी वर्णन करित आहे कीं, अली आदिलशाहा बहुत दयाळु प्रकृतीचा व फकिरासारखे रहार्णीचा होता. खाण्यापिण्याचे किंवा सुखाचे इच्छेंत प्रतिबंध पावलेला नव्हता. संपूर्ण मनुष्यांवर प्रीती, धर्म व बक्षीस देण्याविषयीं अद्वितीय होता. त्याचे धर्म करणेचा व बक्षीस वगैरे देणेचा सर्व पृथ्वींत बोभाटा प्रसिध्द झाला. तेव्हां संपूर्ण पृथ्वींतील मनुष्यें दरबारांत जमून त्याचे उपकाराचे व धर्माचे ताटांतून उच्छिष्ट नेत होते, म्हणजे सर्व मनुष्यें बक्षिसें इनामें मिळवित होतीं. विद्वान लोक, गुणीजन शास्त्रज्ञ, कविता करणारे, अकलवान लोक, सलाह देणाराचे समुदाय, आणखी पारस देशचे, आराक, आजुर्बांवज्यान, आर्बस्थान व संपूर्ण मुलुकाचे लोक येत होते. थोरपणा पावून मनोरथ पूर्ण होऊन आपआपले

वतनास परत जात होते. येथपर्यंत कीं, मजला माहित आहे मिराज येथील राहाणारे कीं मिराज ही माझी जन्मभूमी आहे व मी तेथेंच वाढलो तेथील हजारो लोक, येऊन बहुत सामानसरंजाम घेऊन परत गेले. एके दिवशीं स्तुती करणारा फकीर कलिंदर या नांवाचा येऊन त्या फकिरानें एक कुरान षरीफची किताब आदिलशाहास दिली. तेव्हां आदिलशाहा यांणीं त्या फकिरास समागमें घेऊन आपले श्रेष्ठ खजिन्यांत आणिला. तेथ एक संदुक मोठ तांब्याचे भांड्यानें भरलेला होता, कीं त्या कित्येक तांब्याचे भांड्यांत पांच पांच हजार होन होते. कित्येक भांड्यांत दहा हजार होन होते. तो संदुक उघडून त्या फकिरास आज्ञा केली कीं, तुझी शक्ति असेल तितके यांतून घे. तेव्हां त्या फकिरानें पांच हजार होनांचे भांडे उचललें. आणखीही त्या भागिदारांपैकीं एक गृहस्थ निलजी म्हणोन होता त्याणें येऊन विनंती केली कीं, माझे येथें लग्न आहे याजकरितां लग्नास कांहीं खर्चाची सरकरांतून मदत व्हावी. असी विनंती केली, त्या समयीं ऐशीं हजार होन कोणीकडून आलेले हुजुर ठेविले होते. त्या पागीदास आज्ञा केली कीं, यांतून तुला जितकी इछा असेल तितके उचल. अशी आज्ञा केली. तेव्हां त्याणें सोळा थैल्या उचलल्या. एकएका थैलींत एकएक हजार होन होते ते भारी वोझे होते. सबब सोळा थैल्यांचे वोझे उचलेना. तेव्हां कांहीं थैल्या मस्तकावर घेतल्या व कांहीं खांद्यावर व कांहीं ओट्यांत घेतल्या आणि पूर्ण संकटाने चालू झाला. तेव्हां कित्येक थैल्या खालीं पडल्या. त्या जमा करूं लागला. तेव्हां दुसरेही कित्येक त्याच वेळेस त्याजपासी येऊन पोहचले. तेही त्याजला उचलूं लागत होते. त्या थैल्यांतून कांहीं होन आपणास काढून घेत होते. चार हजार होन त्यापैकीं दुसरेंचे हाती लागले. याच प्रकारें बहुत प्रकर्णें आहेत. तीं संपूर्ण प्रकण जमा करून एके ठिकाणीं लिहावित तर एक मोटें दफ्तर पाहिजे. नित्य दौलतीकडील कारभारी व कामदार व हुजुरचे सेवक लोक, कीं जे मुजरा करावयास येत होते ते, हर कोणी तीन चार मनुष्याची कामें विनंती करून देत होते. खजिन्यापैकीं किंवा मुलकांपैकीं किंवा शेतकी जमिनीपैकीं प्रतिवर्षीं इनाम चालावें असें करून देत होते. सारांश, शहर खजिना, जडजवाहिर व पोषाख वगैरे जितके जमत होते तितके या धर्म करण्यानें व बक्षिस देण्यानें थोडकेच दिवसांत खर्च होत होते. त्याचा स्वभाव असा होता कीं, चाकर लोकांसी संनिध राहून हलक्याची सोबत धरित होता. हलके मनुष्याचे सोबतींत वेळ घालवित होता. हलके मनुष्याशीं येथपर्यंत स्नेह ठेवित होता कीं, जो हलालखोर त्याचा शेतखाना निर्मल करित होता त्या हलालखोरास देखिल विश्वास वाटत होता कीं, पादशाहा मजवर जितकी मेहरबानगी ठेवितो तितकी मेहरबानगी कोणावरच नसेल. केव्हां असें होत होतें कीं, पादशाहा कांहीं गोष्टी बोलूं लागले म्हणजे त्या बोलण्यांत कोणी विरुध्ध भाषण करणारा होता आणि

म्हणत होता कीं, हे खुदावंत आपण बोलता हा मजकूर असा नाहीं कारण कीं, आपण कांहीं अर्ज ऐकून घ्या आणि आमची विनंती पुरी लक्षांत आणा, नंतर इतराजी करावयाजोगी जागा दिसल्यास इतराजी करित जावी असे बोलत होता. यांतील भाव हा कीं, पादशाहानीं जी आज्ञा केली ती सर्वांनीं मान्य करावी. त्यास विरुध्ध भाषण करूं नये. परंतु सलगीमुळें असे बेआदब बोलत होते. त्या पादशाहाची कृपा व मेहरबानगी येथपर्यंत होती कीं, मजकडे खानसाकरीचे पद होतें तेव्हां मजला आज्ञा केली कीं, आमचे मुतबखात म्हणजे स्वयंपाकघरांत जिवंत जनावरें मारित जाऊं नयेत. यांत कोणता उपयोग आहे कीं, एका आमचे जिवासाठीं कित्येक जिवंत जनावरांचे गळे कापता. जसे सर्व लोक बाजारांतून मांस विकत घेतात तसे तुम्हीही बाजारांतून खरिदी करून आणित जावें. पादशाहा अशी आज्ञा करित होते कीं, आमचे खासे जेवणाचे पदार्थ एका खापराचे भांड्यांत म्हणजे चिनीचे वगैरे भांड्यांत आणीत जावें. बाकी चालीप्रमाण यद्यपि असलें तत्रापि चिंता नाहीं. जेवण, पोषाख व बिछाईत प्रकर्णीं कधींही प्रीतीपुर्वक गरज ठेवित नव्हते. जडजवाहिर वगैरे आंगावर घालून नटण्यांत गुंनत नव्हते. आदिलशाहा बहुतकरून गादी वगरे कांहीं एक न आंथरता भुमीवरच बसत होते. त्या काळांतील फकिरी चालीत व मोकळेपणांत व कोणतेही पदार्थांत न गुंतण्यांत असे होते कीं, त्याचे साम्यतेचा तसा दुसरा कोणीच नव्हता. सर्वांसी मोठ्या मर्यादेनें व श्रेष्ठत्वानीं होते. ईश्वराशीं बहुत नम्रतेनें होते. क्षुधेचे वेळेस जे खाण्याचे पदार्थ दृष्टी पडतील ते खात होते. एखादे वेळेस जेवणाचे पदार्थ बिघडल्यास म्हणजे खारट किंवा मळमळीत झाल्यास व बेचव किंवा तिखट झाल्यास तो पदार्थ खातेवेळेस कंटाळा करित नव्हते. आनंदानें खात होते. कधी एखादे वेळेस पंगतीचे जेवणारे व संनिध रहाणारे पुरुषानें जेवणाचे पदार्थ खारट किंवा आंबट किंवा बेचव म्हटल्यास आज्ञा करित होते कीं, अन्नदाता ईश्वर याणीं अन्न तयार करून ते खाण्याचे जिन्नस आपलेकडे पाठवितो. तेव्हां ते पदार्थ कांहीं एक नांव न ठेवितां बहुत प्रीतीनें भक्षण करावे आणि ईश्वराचा स्तव करावा म्हणजे खाण्यापिण्याची वृध्धी होती. क्षुधेचे वेळेस जें अन्न पुढें येईल त्याचा कंटाळा करूं नये. कारण कीं, ज्या वळेस जें अन्न मिळेल त्यास नांव ठेवणें व वाईट म्हणणें हा बेमानपणा होतो. येविषयीं दृष्टांत हा आहे कीं, एके दिवशीं कित्येक काकड्या शेतांत उत्पन्न होतात त्या हुजुर आणिल्या होत्या. त्या काकड्या मी छिलून वरचे साल काढून सोज्वळ करून एका काकडीच्या च्यार फाकळ्या करून पादशाहापुढें ठेवित होतो. त्या काकड्या बहुत प्रीतीनीं पादशाहानीं पाच साहा भक्षण केल्या. शेवटीं एक काकडी त्या काकड्यांपैकीं घेऊन त्या काकडीच्या तीन फाकी पादशाहानीं खाऊन त्या काकडीपैकींच चवथी फाक एक मजला दिली. आज्ञा केली कीं, तुम्ही एक फाक खा. त्या आज्ञे-

वरून मी त्या काकडीची एक फाक घेऊन मुखांत घातली. खाऊ लागतो तो अशी कडू लागली कीं, केवल विषच होते. त्या काकडीप्रमाणें मी कधींच कोणता जिन्नस कडू चाखला नव्हता. येणेंकरून मजला आश्चर्य वाटलें कीं, अशा प्रकारच्या कडू काकड्या पादशाहानीं कशा खाल्ल्या असतील ? कारण कीं, त्या काकडीचे एका फाकीनें माझे काळजापासून मस्तकापर्यंत आग भडका केली. चमत्कार हा कीं, पादशाहाचे जिव्हेस कांहींच कडवटपणा वाटला नाहीं. काकडीचे बाहेरील उत्तम रंगावरच पादशाहानीं काकड्या उत्तम मानिल्या. शेवटीं त्या काकड्यापैकीं एक फाक मजला दिल्ही आणि आपले सेवकास ताकीद केली कीं, ही गोष्ट कचेरींतील कोणतेही मनुष्यास कळली असता तुजला शिक्षा होईल. अशी ताकीद केली. एके दिवशीं मजला आज्ञा केली कीं, दस्तरखान पसरा. अशी आज्ञा केली. आपण पायानें शतपावली करित होते. जेव्हां मी दस्तरखान पसरून तयार केलें तेव्हां आपण दुसऱ्या कचेरींत गेले होते. तेथें मी खबर देण्याकरितां गेलो. तेथे जाऊन पाहिले तों तेथें कित्येक चाकर लोक खजिन्याकडील व सर्वतखान्याकडील जेवणाचे पदार्थ पुढें घेऊन खात आहेत. पादशाहाही त्याच चाकर लोकांत बसले आहेत व त्या चाकर लोकांबरोबर भोजन करित आहेत. ते जेवणाचे पदार्थ जोंधळ्याची भाकरी व आंबाड्याची भाजी होती. कारण कीं, दक्षणचे रहाणारे लोक आंबाडीची भाजी शिजऊन भाकरीशी खातात. त्या चालीनें पादशाहा जेवित होते. तेथें मी गेलो. तेव्हां मजला पाहून पादशाहानीं आज्ञा केली कीं, तुमचा उपकार न घेतां आम्ही आपले पोट भरले. जेवणाविषयीं व असेच पोषाखाविषयीं फार प्रीती ठेवित नव्हते. पादशाहाचे चाकरीवरील हुजरे वगैरे चाकर लोक हुजुर रहातात त्या चाकर लोकाकरितां कुयाप म्हणून पांढरे बारीक कापड असते त्या कापडाचे पोषाख पाच होन किंवा सहा होनास मिळते ते कापड घेऊन शिववून त्या चाकर लोकांस आम्ही देत होतो. पादशाहाचा खासा पोषाख दोन होनाचे कापड खरिदी करून शिवित होतो. यांतील तात्पर्य चाकर लोकांचा पोषाख सहा होनाचे किंमतीचा व पादशाहाचा पोषाख दोन होनाचे किंमतीचा, इतक्या उदासीनपणानें पादशाहा रहात होता व कमरेस जडावदार व सुवर्णाचा पट्टा असावयाचा तो तांब्याचा, लोखंडाचा, पितळेचा व काशाचा मिसळ करून त्यावर एका एका जिनसाचे तारेचा, रुप्याचे तारेचा लपेट देऊन तयार करून तो पट्टा कमरेस बांधित होते. मस्तकावर टोपी फकिराप्रमाणें घालित होते. चौघडी चादर फकीर लोकाचे गोधडीप्रमाणें खांद्यावर घेत होते. त्या चादरीचे पदर छातीवर सोडित होते. पायांत कातड्याचा जोडा घालित होते. कारण कीं, पादशाहा लोकांचे पायांतील जोडा कलाबुती व जवाहिराचे नक्षाचा असतो तो न घालिता—चर्मी जोडा घालित होता. सर्वदा या प्रकारचे पोषाख करून राहात होते. व हातांत सोटगे ठेवित होते, आपले नांव अली आदिलशाहा असें असतां अली पेर कलिंदर

असें नांव फकिरी हुद्याचे वागवित होते. बिछायतीवर व माडीवर बसण्याची गरज ठेवित नव्हते. यद्यपि मोठा वाडा व बहुत थोर इमारत बांधिली होती तत्रापि नित्य आंथरण्याचा गालिचा बहुत वर्षांचा जुना दरबारांत आंथरलेला होता त्याच गालिच्यावर बसत होते. परंतु जेव्हां दुसरेकडील पादशाहाचे वकील किंवा कोणी कारभारी भेटीस येत होते त्या वेळेस मात्र बिछाईत व मसनदीची सरकारी गादी मुद्दाम आंथरवून त्या बिछाइतीवर मखमली गालीचे कलाबुती विणकरीचे व रेशमी गालीचे कलाबुती नकशीचे आंथरवून व लोड व तक्के मांडून दरबारांतील कचेरी शोभायमान करित होते. अशा प्रकारें कचेरीचा थाट करित होते कीं, तसा कोठेंच होत नव्हता. सर्वांसी बहुत मर्यादेनें सोबत ठेवित होते. ताजीमतवाजीचा बंदोबस्त बहुत ठेवित होते. एके दिवशीं पादशाहा यांणीं भोजन झाल्यानंतर हकीमुल्मुल्क याचे आंगासी टेकून बसले होते. तेथें मी उभा राहिलो होतो. तेव्हां पादशाहानीं माझा पदर धरून वोढून आज्ञा केली कीं, खाली बैस. त्या आज्ञेवरून मी खाली बसलो. तेव्हां पादशाहानीं आज्ञा केली कीं, सर्व लोक मजला काय म्हणतात व माझी योग्यता कशी ओळखली आहे, असें विचारिलें. तेव्हां मी अली आदिलशाहाचे पूर्ण कृपेचे व अत्यंत मेहरबानगीचे लक्षण ओळखून अमर्यादपणें उत्तर दिल्हे कीं, सर्व मनुष्यानीं आपण जसे आहांत त्या प्रकारें आपणास अद्यापि ओळखिलें नाहा. हे उत्तर पादशाहास बहुत पसंत आलें. संतोष पावोन हास्यवदन होऊन मजला पोटासी धरले आणि आज्ञा केली कीं, तूं हें जें बोललास तें विस्तारपूर्वक सांग. तेव्हां मी विनंती केली कीं, हे खुदावंत आपणामध्यें बहुत विद्या व गुण आहेत. ते मनुष्याचे समजुतीस कसे येतील? आपण जेव्हां चाकर लोकांत असतां तेव्हां केव्हां केव्हां मुसाफरीसारिख्या गोष्टी सांगता. केव्हां केव्हां जे साधु लोक ईश्वराचे ज्ञान जाणणारे मोठे सिध्ध कीं, ज्यास देहावर स्मरण नाहीं असे साधु लोक बोलतात, तसे आपण बोलता, कीं त्या बोलण्यावर कोणाचाच तर्क चालत नाहीं. जेव्हां विद्वान लोकांत आपण बसतां तेव्हां विद्येच्या नाजुक गोष्टी व अकलेच्या गोष्टी बोलता. तेव्हां असें वाटतें कीं, हा कोणी एक विद्वानच आहे, कीं पूर्ण विद्या शिकला आहे आणि कचेरीतील सर्वांस संतोष करित आहे. ज्या वेळेस आपण अकलवान, मसलतगार, विचारवान व चहूकडील पादशाहांचे वकीलांसी बोलण्यास आरंभ करितां तेव्हां असें वाटते कीं, या काळांतील हा सिकंदर पादशाहाच आहे कीं काय? कां कीं, आरस्तुसारिखे भाषण करित आहे. ज्या पुरुषामध्यें इतकीं लक्षणें व इतक्या विद्या असतील तो मात्र योग्यता ओळखील. पादशाहाची किताबीवर फार आवडी होती. फार पारसी किताबी पहात होते. हरएक प्रकारच्या व हरएक प्रकर्णाच्या किताबी मिळविल्या होत्या. किताबखाना फार शोभायमान जमला होता. त्या किताबखान्यांत खुषनवीस म्हणजे चांगले अक्षर लिहिणारे लेखक साठ आसामी होते. सोनेरी काम

करणारे, रेखाटणारे, किताबी बांधणारे व चितारी किताबखान्यांत सर्व कामदार आपआपले कामावर होते. त्या किताबखान्यापैकीं निवडक किताबाच चार संदुक सर्वकाळ कोठे प्रवासास गेले असता किंवा मुक्कामी स्वारी आली तत्रापि ते संदुक आपणापाशीं ठेवित होते. इतक्यामध्यें नेहमी प्रवास करित होतें त्या प्रमाणें एके दिवशीं प्रवासाहून येऊन सायंकाळीं मुक्कामास स्वारी पोंहचली. मोठा पाऊस पडूं लागला. तेव्हां लष्करची चुकामुक झाली. पादशाहा मुक्कामास येऊन पोहचले. तेव्हां किताबीचे संदुकाचे स्मरण झालें. तेव्हां शोध केल्यानंतर कळण्यांत आले कीं, खजिन्याबरोबर ते चार संदुक किताबीचे दुसरे मार्गानी जाऊन अमुक गावांत उतरले आहेत. असें कळतांच पादशाहा अत्यंत क्रोधायमान होऊन आज्ञा करिते झाले कीं, बहुत वेळ ताकीद केली कीं किंताबीचे संदुक आम्हापासून दूर नेऊं नयेत. अशी ताकिद केली असता त्या ताकीदीचा कांहीं उपयोग झाला नाहीं. तेच वेळेस चनकधार पावसांत एक अमीर किताबीचे संदुक आणावयाकरितां पाठविला. किताबीचे संदुक आले नाहींत तोंपर्यंत पादशाहास चैन पडत नव्हते. तेव्हां संध्याकाळी कोमड्याची अंडी उकड-लेलीं आणावीत म्हणोन आज्ञा केली. ते समयीं मी त्या कोमड्याची वीस अंडी रुमालांत बांधून पाण्यास उकळी आली होती त्या कडकडित पाण्यांत तो रुमाल झोके देऊन तसाच ऊन ऊन अंड्याचा रुमाल आणीत होतो. ती अंडी फोडून त्या अंड्यातील पिवळे असते ते चमच्यांत घेऊन पादशाहा खात होते. केव्हां अकरा अंडी केव्हां बारा अंडी खात होते. पहाटेचे रात्रीस अंडी आणावीत म्हणोन पादशाहानीं आज्ञा केली. तेव्हां अटकळीप्रमाणें वीस आंडी उकडून मी आणली. तेव्हां त्या संपूर्ण अंड्यांतील पिवळे असते ते अंडी फोडते वेळेस ते पिवळे फुटके निघाले. परंतु दोन अंड्यांतील पिवळे सबंध निघाले. ते दोन पिवळे गोळे हातीं लागले तेवढेच दोन खाल्ले. पुन: आणखी वीस अंडी उकडून आणिली. त्या अंड्यांतीलही पिवळे सबंध निघाले नाहीं. सर्व अंड्यांतील पिवळे फुटकेच निघाले. परंतु एका अंड्यांतील पिवळे न फुटतां निघाले. तेवढेच भक्षण केले आणि आज्ञा केली कीं, मला असें वाटतें कीं, आमचे दैवच अधिक राहिले नाहीं, म्हणोन असें झालें. आपले आयुष्य कधीं सरणार हें पादशाहास कळत होतें. केव्हां केव्हां बोलण्यामध्यें मरणाचा मजकूर प्रसिध्ध करित होते. तसेच एके दिवशीं जेवावयास बसले होते तेव्हां नियाजमदखान यासी चहू-कडील वर्तमानाच्या गोष्टी बोलत बसले होते. तेव्हां शेवटीं पादशाहाचे बोलण्यांत असा भाव आला कीं, हली बेवीस वर्षें झाली कीं, मी ईश्वरापाशी जी गोष्ट मागितली होती ते मनोरथ ईश्वर पुर्ण करित नव्हता. त्या गोष्टीचे उत्तर ईश्वरापासून आत्तांच येऊन पोहोचले कीं, तूं जे मागितले होतेस ते तुजला दिलें, असें बोलले. तेव्हां मी अमर्यादपणें पादशाहास विचारिलें कीं, तें काय आहे ! तेव्हां पादशाहा बहुत संतोषानें व मोठे आनंदानें बोलले कीं, तो मजकूर आमचे मरणाचा आहे.

अशी पादशाहाची आज्ञा ऐकतांच मी आपले प्रश्नावरून बहुत पश्चाताप पावलो आणि बहुत खिन्न व चिंताग्रस्त झालो. मजला पाहून पादशाहानीं आज्ञा केली कीं, तू फार मुर्ख झाला आहेस. जो पदार्थ मी फार वर्षं बहुत आशा करून ईश्वरापाशीं मागत होतो त्याचें उत्तर आज मिळालें असें असतां तू खिन्न होतोस ! नंतर ' कांहीं दिवस गुजरल्यावर महालाकडील एक कुणबीण येऊन पादशाहाचे कानांत कांहीं गोष्ट बोलली. तेव्हां मजकडे पाहून पादशाहानीं आज्ञा केली कीं, ' आमचे खासे स्त्रियांस नेसावयाकरितां पोषाख मागित आहे. तुम्ही द्या, ' अशी आज्ञा केली. तेव्हां मी विनंती केली कीं, ' कोणते रंगाचा व कसला पोषाख द्यावा. आज्ञा होईल तसला देईन.' तेव्हां पादशाहानीं आज्ञा केली कीं, ' पांढरा पोषाख दे. कारण कीं, दक्षण देशांत चालच आहे कीं, विधवा बायका पांढरा पोषाख करितात.' महालाकडील कुणबीण पुन: पोषाख मागूं लागली. तेव्हां मी बोलिलो कीं, पादशाहानी या प्रकारचा पोषाख देण्या-विषयीं आज्ञा केली आहे. तेव्हां ती स्त्री कुणबीण कपाळावर हाणून बोलली कीं, ' आमचे धण्यास कसें काय झालें आहे कीं, अशीं भाषणें करितात ! ' त्यानंतर ती वेळ टाळून पुन: मी अर्ज केला कीं, ' आपले आज्ञेवरून आपले खासे स्त्रियांस पांढरे पोषाख दिल्हे. परंतु आपल्या खाशा स्त्रिया पांढरे पोषाखास अशुभ म्हणजे अकल्याणकारक जाणितात. जर करितां आपलीच आज्ञा झाल्यास रंगित पोषाख देईन. ' हे ऐकून पादशाहानीं आज्ञा केली कीं, ' आम्ही सांगितलें तसेंच आहे. आम्ही निघोन चाललों. तुजला वाटेल तसले रंगाची वस्त्रें दे, ' असें बोलले. एके दिवशीं पूरकोटांत एक बाग दोन खंदकाचे मध्यभागीं आहे तेथें एक मसीद बांधलेली आहे, कीं त्या मसीदींत एक हजार तेहतीस समया लागताहेत कीं दीपाची गणती सांपडत नाहीं. याजकरितां त्या मसिदीस नेदेगालिब असे नांव ठेविलें आहे. या मसिदीसंनिध पादशाहा उभे राहिले होते आणि बोलिले कीं, ' माझा आजा इस्माईल आदिलशाहा याची तरवार त्याणी आपले स्मरणाकरितां ठेविली आहे. ती खजिन्यांत आहे. ती तरवार आणा.' अशी आज्ञा केली. तेव्हां तरवार आम्ही आणिली. ती तरवार पादशाहानीं घेऊन मेणांतून उपसोन कित्येक वेळ तरवारीकडे पाहून आज्ञा केली कीं, ' आम्ही आज ही तरवार कंबरेस बांधतो. पुन: कधींच बांधणार नाहीं. नंतर ही तरवार मसजदगालिब मेहराबींवर बांधून ठेवा ' असें बोलले. रफिउद्दीन शिराजी हा वर्णन करित आहे कीं, अद्यापि ती तरवार मसजदगालबचे महराबीवर आहे. नंतर त्याच कित्येक दिवसांत एके रात्रीं अफजल-खानासहित बसले होते. अफजलखान यास आज्ञा केली कीं, चार हजार होन मौलाना लुतफी खान साकरी याचे हवाली करावे. त्याजला सांगावे कीं, हें द्रव्य शिराज येथे नेऊन मीर सैयद अहमद बिन इमाम मुसा कानम रजियल्लाह आलहुमा याचे रवना इमारती नीट करण्यास व त्या रवन्याकडील चाकर लोकांस खर्च करावे. तेव्हां मी उभा राहिलो होतो व ही आज्ञा अफजलखान यास केली. यावरून मजला

मोठे आश्चर्य वाटलें कीं, ही आज्ञा पादशाहानीं खजिन्यावरील कामदारास कां नाहीं केली ! याजवरून असें वाटतें कीं, पादशाहा समजले असतील कीं, खजिन्यांत कांहीं एक शिल्लक राहिली नाहीं. असें पादशाहानीं ओळखून मजला आज्ञा केली कीं, 'तूं कांहीं चिंता करूं नको. आमचे खजिन्यांतील द्रव्य आम्ही जिवंत आहों तोंपर्यंत पुरेल.' अशा प्रकारचे अपशब्द फारच तीन चार महिन्यांत बोलत होते कीं, मी जातो. मी लौकर जातो. असे बोलत होते. केव्हां केव्हां मी विचारिलें कीं, कोठें जातां. त्यावरून माझे चित समाधान करण्याकरितां कधीं मका मआनया येथे जातो व केव्हां मदिना मिनोरा येथें जातो असें म्हणत होते. केव्हां आज्ञा करित होते कीं, मला एक नांव माहित आहे कीं, महिन्याचे चौदावे तारिखेचे रात्रीं कोणी चांदण्यात उभे राहील व डोळे झाकील व ते नांव कित्येक वेळ उच्चारील आणि डोळे उघडील तर, जरकरितां त्याचे आयुष्य कांहीं बाकी आहे तरी त्याची सावली नखसिखापर्यंत संपूर्ण दिसती व आयुर्दाय सरला असल्यास मस्तकासिवाय बाकीची सावली दिसती, असें आहे. या प्रकारानें मी पाहिलें. तों सांप्रत मी आपली सावली मस्तकाशिवाय पाहिली. ज्या दिवशीं मी तख्तावर बसलों तेव्हां एक कोटी पन्नास लक्ष होन रोख, तसेच राजधानीचे सामान सरंजाम, जवाहिर, वस्त्रें, हरएक कामाची हत्यारें व भारी किंमतीचे पोषाख वगैरे सणगे बेहद व अगणित होती. आणखी विजयानगर, किल्नार, कर्नाटक व मनेवाड हा मुलुक, कीं तो मुलुक बहुत उत्पन्नाचा व बहुत थोर व श्रेष्ठ प्रसिध्ध आहे तो मुलुक, आदिलशाहाचे राजधानींत जमेस आला. यांतील भाव हा कीं, आधींच संपत्ती मोठी त्यांत आणखी हे मुलुक जमेस आले तेव्हां राज्य फारच वाढलें. त्यामुळें आदिलशाहाचे बक्षिस देणें व धर्म करणें येथपर्यंत वाढलें होतें कीं ज्या दिवशीं आदिलशाहा वारले ते दिवशीं जो वकील अकबरशाहाकडून ऐनुलमुल्क म्हणोन कित्येक दिवस येऊन राहिला होता त्याजला ते दिवशीं निरोप देऊन रवाना करण्याकरितां वाटखर्चापुरतें देखिल द्यावयास खजिन्यांत द्रव्य राहिलें नव्हतें. यास्तव तो वकील विजापुरास आहे तोंच आदिलशाहा वारला. तेव्हां तुम्ही निघून जावें असें सांगितल्यावरून तो निघून गेला. आदिलशाहाचे मरणाची तारिख ग्रंथकारानें अब-जदचे हिशेबानें जुल्मदीद या अक्षरांत बांधिली. अक्षरांचा अर्थ आदिलशाहावर जुलूम झाला. असा अर्थ होतो. हींच अक्षरें सदरहू हिशेबानीं बेरीज केली असतां नऊशें आठेऐंशींची ( इ. स. १५८० ) बेरीज येती, म्हणजे या सनांत अली आदिलशाहा वारला असें होतें. मुल्ला महंमद रजा जहिदी अलीमुर्तेखलेस म्हणजे मुल्ला महंमद हा कविता करित होता. त्या कवितेचे शेवटीं आपले नांव पहीद असें घालीत होता. त्याणीं या पादशाहावरून एक फारसी भाषेंत मरशा केला. त्या मर्शाचे शेवटचे बैतेचा दुसऱ्या मिसऱ्यांत अली आदिलशाहाचे मरणाची तारिख बांधली. त्या मरशाचा अर्थ लिहिला जात आहे. अर्थ . . " अरे अरे ! यम दूतानीं आपले हातानें ज्यास व

The numerical value is 988 AH

इनसाफरूपी बागेतील : शूरत्वाचा वृक्ष पाडिला व मुरवतीची ढाली तोडिली. ॥ १ ॥ पादशाहीपणाचे आकाशावर हे वर्तमान प्रसिध्ध झाले : कीं दान धर्माचा सूर्य गुप्त झाला व दातृत्वाचा चंद्र आच्छादित झाला. ॥ २ ॥ आदिलशाहा या आडनांवाचा व अली या नांवाचा : कीं त्याच कारकीर्दीत जुलूम कोणीच ऐकिला नाहीं ॥ ३ ॥ असल्या नीतीनें वागला कीं, प्राणोत्क्रमण संकटानें न व्हावें : कालचक्ररूपी कलालाचे हातून मृत्युची शराब प्राशन केली. ॥४॥ ब्रह्मदेवानीं त्याची तारिख लिहिण्याकरितां : दफ्तरांत लिहिले कीं, "पृथ्वीचा धणी वारला." हा शाहेजहान पुदषहीद इतक्या पारसी अक्षराचा अर्थ झाला. शाहेजहान पुदषहीद इतकी पारसी अक्षरें अबजदचे हिशेबानीं बेरीज केली असतां नऊशें आठेऐशीं (इ. स. १५८०) सन निघतो. या सनांत वारला. ॥५॥ " इब्राहिम आसदखान याचे लिहिण्यांत आदिलशाहा तक्तावर बसले त्याच साली सन ९६५ नऊशें पासष्ठ ( १५५७–५८ इ. स. ) या सनांत आसदखान वारले असें आहे. शाहादुर्गचा किल्ला मीर जम-मी तुल्ला याणीं सन ९६६ (१५५८–५९ इ.स) सालीं बांधिला. विजापुरासंनिध शाहापुर आहे तें सन ९६७ ( १५५९–६० इ. स. ) सालीं बांधिलें. पाण्याचा कारंज हाऊद किश्वरखान याणीं सन ९६७ ( १५५९–६० इ. स. ) सालीं बांधिला. शाहा बुरूज व महा बुरूज सन ९६७ ( १५५९–६० इ. स.) सालीं बांधिले. हिन्यामहाल सन ९६८ ( १५६०–१५६१ इ. स. ) सालीं बांधिला. कंकणमहाल सन ९६९ ( १५६१–१५६२ इ. स. ) सालीं बांधिला. विजयानगरची फत्ते व रामराज याणी कत्तल होणें सन ९७२ ( इ. स. १५६४–६५ ) सालीं झालें व रायचुर व मुदगल या दोनहि किल्ल्यांची फत्ते याच सालीं झाली. विजापुर येथील कोट सन ९७३ ( इ. स. १५६५–६६ ) सालीं बांधला. धारवाडचा किल्ला किश्वरखान याणीं सन ९७५ ( १५६७–६८ इ. स. ) सालीं बांधला व बंकापुरचा किल्ला सन ९८१ ( १५७२–१५७४ इ. स. ) सालीं बांधला. फिदकची बाग सन ९७६ ( १५६८–६९ इ. स. ) सालीं बांधली. बारा इमामाची बाग सन ९७४ ( इ. स. १५६६–६७ ) सालीं बांधिली. जुमा मसीद सन ९८५ ( इ. स. १५७७–७८ ) सालीं बांधिली. त्या मसिदीची तारिख ज्या बैतेत लिहिली आहे त्या बैतेचा अर्थ : " सर्व मासिदी केवळ ईश्वराची सेवा करण्याकरितांच आहेत. तेव्हां मासिदीमध्यें ईश्वराचे स्मरणांत तुम्ही दुसरे कोणाचे स्मरण करूं नका. "

२८. लष्करची गणती :

स्वार ८०,००० ऐशीं हजार व सिबंदी याहून आधिक व हत्ती ७३५.

बुस्तान पाचवें

# इब्राहिम आदिलशाहा

## १. इबराहिम आदिलशाहा बिन तहमासिप बिन इबराहिम आदिलशाहा याचें वर्णन :

पूर्वी कथाभाग वर्णिला आहे. ज्या दिवशीं आली आदिलशाहा तक्तावर बसले ते दिवशीं त्याणी आपला बंधु तहमासिप याचे डोळे काढून नजरबंदीचे कैदेंत ठेविला. तहमासिप पादशाहा यास दोघे पुत्र झाले. त्यापैकीं एकाचें नांव इबराहिम व दुसऱ्याचें नांव इस्माईल असें होतें. आली आदिलशाहा या उभयतांवर मनापासून ममता करून पूर्ण प्रीतीनें पालन करित होता. तेव्हां अशा समयांत प्रारब्धीं लिहिल्याप्रमाणें ईश्वरी हुकूम येऊन पोहचला. यामुळें खोज्याचे हातून मोठी काहारी जखम लागून जीव तत्क्षण घन यमदूत आले होते त्याचे हवालीं केलें, म्हणजे आली आदिलशाहा वारला.[१] दौलतीकडील कारभारी व कामदार लोकानें दुसरे दिवशीं राजधानीचे कचेरीस व पादशाही सभेस आदिलशाहास तक्तावर बसऊन शोभायमान करिते झाले.[२] ते समईं इबराहिम आदिलशाहा याचे वय नऊ वर्षांहून[३] अधिक झालें नव्हते. त्याचे लहानपणाचे वयांत योग्यता व अकल व श्रेष्ठत्वाची रहाणी ही संपूर्ण लक्षणें त्याचे आंगीं होतीं. त्याचे बालदशेचे कपाळावर प्रौढतेची चिन्हें प्रगट दिसत होतीं. तेव्हां तक्तावर बसला ते दिवशीं प्रातःकालापासून सायंकाळपर्यंत सर्वांच्या भेटी घेण्यांत व सर्व कामदार व कारभारी लोकांचे मुजरे घेण्यांत निमग्न होता. ज्या वेळेस कचेरींतून उठला तेव्हां हुजुरचे सेवक लोकानीं अंतःपुराचे दरवाज्यापर्यंत पादशाहास पोचविलें. त्या संपूर्ण सेवकांपैकीं एका सेवकानें विनंती केली कीं, आज फार वेळपर्यंत बसण्यानें सरकारास फार श्रम झाले असतील व श्रीमंताचे शरीर थकले असेल. आतां थोडीसी विश्रांती घ्यावी, ' अशी विनंती केली. तेव्हां मुक्ताफळासारखा अक्षराचा वर्षाव करणारे आपले जिव्हेनीं आज्ञा करिते झाले कीं, ' सांप्रत जें काम माझे हवाली झालें आहे त्या कामांत शरीरास सुख देणें, म्हणजे स्वस्थ निजणें, सामावत नाहीं. ' अशी आज्ञा केली. परंतु वय लहान यामुळें माली ( महाली ) व मुलकी कामें करूं शकत

१. ९ एप्रिल १५८०–मुधोघच, पृ. २०९. २. १५७९ इ. स.–ब्रि. फे. ३, पृ. १४२.
३. ब्रि. फे. पृ. ३, १४४.

नव्हता. तक्तावर बसते समई दरबारांतील कित्येक अमीर लोकांनीं मनास वाटेल तशी एकमेकांवर गर्दी करून राजधानीचा लगाम आपले मुख्त्यारपणाचे हातीं आणिला.

## २. कामिलखान याचे मुख्त्यारपणाचें, स्वसत्तात्मकपणाचें व मुलुक हस्तगत करण्याचें वर्णन :

प्रथम कामिलखान या दौलतींतील अमीरलोकांपैकीं होता, तो मजकूर पूर्वी लिहिलाच आहे. पूर्वी कामिलखान याणी उत्तम प्रकारें सरकार सेवा करून दौलतींतील कामांत विश्वासू व प्रमुख झाला होता. माली व मुलकी कामावर मुखत्यार झाला होता. पादशाहाचे हुजूरचे राजधानीचा बंदोबस्त व संपूर्ण चाकऱ्या व संपूर्ण इलाकेदाराचे पदवीवर व सर्व विश्वासू लोकांवर इत्यादिक कामावर सरमुनीम झाला आणि किल्लाहि कामिलखान याणी आपलेकडील कामदारांपैकीं एका कामदाराच्या हवालीं केला. कामिलखान याणी प्रथम उत्तम चाल धारण केली व तहमासिप याचा पुत्र इबराहिम आदिलशाहाचे पालन करणें आली आदिलशाहाची स्त्री चांदबिबी सुलतान इजकडे योजिले. दौलतीकडील संपूर्ण कारभारी लोक याजला अभयपत्रें पाठऊन सर्वांस दिलभरंवसा देता झाला. हळुहळू थोडकेच दिवसांत कामिलखान याजला गर्व व अभिमान बहुत होऊन पादशाहाचे श्रेष्ठ खजिन्यांत घालमील करणें आरंभिले आणि एक एक संदूक उघडून त्या संदुकांतील उंच उंच भारी किंमतीचे जिन्नस बाहेर काढीत होता आणि ते जिन्नस दुसरे संदुकांत ठेवीत होता. रफिउद्दीन हा खजिन्याकडील हवालदार होता. तो कामिलखान संदुकांतील जिन्नस काढून दुसरे संदुकांत ठेवीत होता ते सर्व यादीवर मांडून ठेवीत होता. यामुळें कामिलखान त्याजवर फार रागास येत होता. बोलत होता कीं, 'तूं कां मजसी जिद करतोस व वाद घालतोस?' असे बोलून एकांतीं लोकांकडून रफिउद्दीनास धाक घालवीत होता. 'आम्ही जी घालमील करूं ती तूं यादीवर लिहून ठेवणेंचें कारण नाहीं' म्हणोन रफिउद्दीन यास लिहिण्याविसीं मना करीत होता. बहुत सामान हरएक बाहान्यानीं सरकारचे खजिन्यांतून कामिलखान याणी नेले व कित्येक दुसरे संदूक निवडले होते. परंतु खजिन्यांतून बाहेर नेण्यास संधी सांपडली नाहीं. खजिन्यांतील द्रव्य महालाकडील कुणबिणी बायकांसही देणें आरंभिलें. महालाकडील कित्येक लोकांस दरमहा खजिन्याकडून तैनाती होत्या. दर महिन्याचे महिन्यास त्याजला पोहचत होत्या. कामिलखान याणी खजिनदारास सांगितलें कीं, 'बेहडयाप्रमाणें हरएकाच्या तैनाती निरनिराळया फडक्यांत बांधून त्या मनुष्याचें नांव

त्या गाटोडीवर लिहून आणा म्हणजे मी खुद जातीनें समक्ष एक एक गैर लायक ध्यानांत आणोन पगार वाटणी करीन'. असे सांगितलें तेव्हां खजिनदार याणी कामिलखान याचे सांगण्याप्रमाणें निरनिराळे पगार फडक्यांत बांधून कामिलखान याजपासी आणोन हजर केले. तेव्हां कामिलखान याणी तो ऐवज घेऊन जनानखान्यांत गेला. महालाकडील चाकरीचे एकेक कुणबिणीचें नांव घेऊन आपले जवळ बोलाऊन आपले हातानीं पगार देत होता. तेव्हां संपूर्ण तैनातदार लक्षांत आणोन जमातीपैकीं विस आसामी बायका चाकरीच्या निराळया निवडून एकीकडे बसविल्या. बाकीच्या जमाती कांहीं पादशाहजाद्याच्या थोरले महालाकडील व कांहीं थोर थोर लोकांचे वंशाकडील व कांहीं पादशाहाचे आप्तविषयीं मंडळीकडील होत्या. हरएकाचे महाल निरनिराळे होते. त्याजला तैनातीकरितां गांव व परगणे दिल्हे होते. कामिलखान याणी कारकूनलोकांस हुकूम केला कीं, 'कचेरीकडील संपूर्ण लोकांचे पगार व किताबी ठेवणाराचे पगार व हुजरे मंडळींचे पगार अमानत ठेवावे. नंतर आम्हीं एक एक मनुष्य लक्षांत आणून कामाचे उपयोगी कोण हें पाहून नंतर त्याजला पगार देऊं.' असें चालविलें. चांदबिबी सुलतान इची अमर्यादा करून चांदबिबीसी दांडगेपणाची कठोर भाषणें बोलणें व वागणूकहि अयोग्य तऱ्हेची करणें आरंभिलें. याजकरितां दौलतीकडील संपूर्ण कामदार व सर्वत्र कारभारी व दरबारांतील अमीरलोक व पादशाहाचे महालाकडील संपूर्ण चाकरीची माणसे कामिलखानासी वाईटपणानें व कपटानें वागूं लागलीं. कामिलखान दौलतींत नसावा, याजला घालवून द्यावा येविषयीं यत्न करीत होते. चांदबिबी सुलतान इणें बायकोचा पोषाख म्हणजे लुगडें व चोळी व कापुस व राहाट असे थोरले किषवरखान, कीं जो अमीर होता त्याचा पुत्र हाजो किषवरखान, याजकडे पाठऊन निरोप पाठविला कीं, 'कामिलखान हा वकिलीचे श्रेष्ठ योग्यतेचे पदवीलायख नाहीं व हें काम तुझे बापाची मिरास आहे. तें वकीलीच काम तुझें तुजला दिल्हे आहे. हें तुझे तूं कर. आपले धण्याची कीर्ती संरक्षण करण्याकरितां यत्न करून त्या नमकहरामाचे, म्हणजे कामिलखानाचे, संकटापासून सर्वांस निर्भय कर. या दुष्टाचे हातून सर्वांस सोडीव. कामिलखानाचे पारपत्य फार जल्द कर. नाहींपेक्षां लुगडे चोळी पाठविली आहे हें लुगडे नेसून चोळी घालून कापुस व राहाट पाठविली आहे तो घेऊन कापुस कातण्यांत निमग्न होत जा'. असा निरोप पाठविला तेव्हां किषवरखान याणी निरोप व आज्ञा समजून घेऊन कित्येक कारभारी मंडळ आपल्याशी मिळऊन घेऊन त्याचे पारपत्याविषयीं यत्न करीत होता. हें वर्तमान कामिलखान याचे कानावर येत होतें. परंतु कामिलखान याचे कानांत भ्रांतीचे व निदर्वीपणाचे कापसाचे बोळे होते. यामुळें त्या कानास कांहीं एक ऐकूं येत नव्हते, म्हणजे कामिलखान याचे दैव फिरलें. सबब हा मजकूर लक्षांत येईनासा झाला. सबब कदापि ही गोष्ट चित्तांत न आणितां उपायाची विचारणा न

करिता झाला व ही मसलत मुलाचे खेळासारिखी मानिली. आपले एकांतांतील मंडळीसी बोलत होता कीं, 'पादशाहाचे माणसांनीं कशी माझी पाठ घेऊन मजला भेडसावीत आहेत आणि मनांत आणितात कीं, या खेळानें भयाभीत व्हावें आणि कारभार सोडून घरीं बसावे असें इच्छिततात. परंतु ही गोष्ट कशी घडेल ? हलालखोर वगैरे कीं जे नीच उत्पत्तीचे जातीचे आहेत ते मिरासीकरितां जीव देतात. मी या कामांतून कसा निघेन ? हें करणें मानीतच नाहीं व याचें भय वागवीत नाहीं. कारण कीं, या राजधानीचा मी वारिसदार आहे व ही राजधानी माझी मिरास आहे.' वेड्या वेड्यासारिखी बहुत भाषणें करीत होता, भ्रांतीचे व निर्दैवीपणाचे निद्रेनीं त्याजला घेरलें होते. दर घटकेस बातमी येऊन पोहचत होती कीं, अमुक अमुक गृहस्त एकत्र होऊन अमके जागी जमले आहेत. असें वर्तमान कळलें तत्रापि त्याची कांहींच परवा ठेवीत नव्हता. अफजलखानहि स्नेहाचे मार्गांनी व ममतेने याजला बोध व मसलती सांगीत होता. त्याचे कामाविषयीं सला सांगण्याकरितां बहुत यत्न करीत होता. परंतु कामिलखान याणी या शिकविण्यास व बोधास ही मुलाचेच खेळासारिखे व गर्जेस्तव असे शिकवितात असें मानिलें. जेव्हां मसलत ठरण्यांत आली आणि कामिलखानास जिवें मारण्याकरितां शत्रु लोक त्यावर चालून आले त्या वेळेस कामिलखान पादशाही महालांत अमीरीचे कामांत निमग्न होता. जेव्हां फार मनुष्यें जमून चालून आलीं असें पाहिलें तेव्हां कोटावर जो दरवाजा होता त्या दरवाजानीं बाहेर पळून गेला आणि त्या दरवाज्यास बाहेरून कडी लाऊन बंद केला, कीं या दरवाजानीं कोणी पाठलाग करूं नये. यास्तव कडी लाविली आणि आपण पूरकोटावरून जाऊन एक लांब दोरी किल्ल्याचे कंगोऱ्यावर मजबूत बांधून ती दोरी धरून खालीं उतरला. तेव्हां त्या घसरण्यानें जखमी झाला आणि खंदकाचे चिखलांत व राडींत कंबरेइतका बुडाला. तेव्हां तेथून शतावधी संकटानें बाहेर निघोन शहरचे कोटाचे दरवाजापर्यंत येऊन पोहचला. दरवाजा लागलेला होता. सबब शहरचे कोटावर चढून कित्येक बाहान्यानी खंदकांत उडी टाकली. तेव्हां एक चाकर हापसी जातीचा होता. तो कामिलखान यासी स्नेह ठेवीत होता. तो अति त्वरेनें घरास पळत जाऊन कामिलखानास घोड्यावर बसऊन घरास जावयाकरितां एक घोडा घेऊन आला. त्याणी कामिलखानाचे शरीर राडीनें भरलें होतें तें धुवोन पोषाख बदलून कोणाचे ओळखीस न यावे अशा प्रकारचा पोषाख करऊन कांहीं द्रव्य व थोडेसे जवाहीर घेऊन कल्होर येथें जाता झाला. कारण कीं, कल्होरचा मोकासा कामिलखानाचा होता. याजकरितां तेथून निघोन दुसरे मुलखाचा आश्रय करिता झाला. कामिलखानाचा आयुर्दाय बाकी राहिला होता. यास्तव पादशाहाचे महालाकडून निघण्याचे आरंभापासून घरीं जाऊन आपले लष्करांत पोहचे तोंपर्यंत कोणा एकासहि त्याची बातमी लागली नाहीं. विजापुर येथें किषवरखान

याणी चारपाचशें शिपाई शस्त्रधारी घेऊन कामिलखानास मारावयाकरितां किल्यांत चालून आला. तेव्हां कामिलखान याजकडील निसबतीचे शिपाई होते ते जे जे शिपाई मनाई करण्याकरितां पुढें चालून येत होते त्याजला ठार मारून कत्तल करून कामिलखान ज्या महालांत होता तेथें आले आणि पाहिलें तों तेथें कामिलखान नाहीं. नंतर बहुत शोध करून पादशाहाचे महालांत हुडकून पाहिलें. परंतु कोठे शोध लागला नाहीं. तेव्हां निरोपाय झाले. किल्याचे बंदोबस्ताचे काम किषवरखानाकडे झाले आणि सर्वांस कामिलखानाचे पीडेपासून सुटका झाली. इतकेमध्यें बातमी कळली कीं, कामिलखान कोटावरून बाहेर उतरून आपले घरास आपले फौजेंत जाऊन तेथूनहि पुढें निघोन गेला. अशी बातमी लागतांच फौज तयारच होती. कामिलखान याजवर चालून जाणें ठरविलें आणि विजापुराहून आठ दहा कोसावर शहरापासून बाहेर जाऊन पोहचले. तों कामिलखान लढाईस तयार होऊन उभा राहिला आणि रणभुमींत शूरत्व व पराक्रम करूं लागला. शेवटीं बागावत म्हणजे आपले धण्यावर उलटून पडणें या बेमानपणाचा व निमक-हरामीपणाचा दीप फायद्याचे व यशाचे तेजापासून तेजहीन आहे, म्हणजे जो आपले धण्यावर उलटोन पडून आपले खावंदाचा घात इच्छितो त्याजला कदापि यश यावयाचे नाहीं. कामिलखानाची फौज एकंदर हवालदील होऊन परागंदा झाली आणि कामिलखान एकटाच राहिला. कामिलखान याणी जेव्हां पाहिलें कीं, या रणभुमींतून व या हल्लेंतून बाहेर निघोन जाण्याचे सामर्थ्य नाहीं तेव्हां त्याच रणभुमींत चहूंकडे पळावयास आरंभ केला. कामिलखान जिकडे जिकडे पळत होता तिकडे तिकडे बहुत माणसांस ठार मारीत होता. अशी दौडादौडी केली कीं, त्याचा पाठलाग करण्यास घोडे व घोड्यावरील स्वार दोघेहि थकले. तेव्हां एके गृहस्थानें पाटीमागून येऊन भाल्याचे फाळानें मारून कामिलखानास घोड्यावरून खालीं पाडिला. तेव्हां पिरबचा या नांवेंकरून एक शिपाई जवानमर्द प्रसिद्ध होता तो कामिलखानाचें मस्तक कापण्याकरितां पुढें चालून गेला. तेव्हां कामिलखानाच्या हातांत तरवार होती. त्या तरवारीनें पिरबचा याचे छातीवर असा वार केला कीं, त्याचे आंगावरील चिलखत तुटोन दस्तन्या तुटोन त्याचे छातीवर जखम झाली. तत्रापि शेवटीं कामिलखानाचें मस्तक कापून हूजूर आणिलें. कामिलखानाचें संपूर्ण सामान सरंजाम खालसांत आणिलें. त्याचे संपूर्ण सामान व माल वगैरे सर्व किषवरखान याणी घेतलें. कामिलखान याणी मुख्त्यारीनें कारभार दोन महिने व दहा रोजच केला होता.

### ३. किषवरखान याणी परराज्यांतील मुलुक हस्तगत केला व हुकूम किती दिवस चालविला तें प्रकर्ण :

जेव्हां कामिलखानाचे घालमिलींतून सुटका झाली व चित्तास स्वस्थता झाली तेव्हां बंदोबस्त करणारे कामदारांनीं राजधानीचा बंदोबस्त केला. प्रथम संपूर्ण कामदार लोक वकिलीचें पद आपल्यास मिळावें म्हणोन एकमेकांत आपसांत भांडत होते. ते चार पांच गृहस्थ होते. दरबारांतील संपूर्ण कामदारांचे मनांत पेशवाईचें काम आपल्यासच असावें असें होतें. किषवरखान, मुर्तजाखान, आंजू व त्याचा बंधु शहा कासम, गालबखा सरनौबत व मातबारखान हे या प्रकर्णी आपआपणांत भांडत होते. एकमेकांशीं कपट ठेऊन वाकडेपणा पाहात होते. ज्या रात्रीं आली आदिलशाहा वारला त्या रात्रीं संपूर्ण कामदार व दौलतीकडील कारभारी लोक उजडे तोपर्यंत वाड्यांतच होते. आपआपणांत मसलत करीत होते आणि वकिलीचें पद कोणास द्यावें असें ठरवितें वेळेस जो तो गृहस्थ वकिलीचें पद मलाच द्यावें अशी सल्ला देत होते. कोणीच दम धरीत नव्हता. तीन चार दिवस असेच मसलतींत गुजरले. शेवटीं कामाचा परिणाम येथ-पर्यंत येऊन पोहचला कीं, सरकारचे वाड्यांतच या मंडळींत मारामारी व तोडातोडी चालू झाली. अफजलखान या समयांत आपले घरीं एकांत स्थळ स्वीकारून बसला होता. तो अफजलखान या मंडळींचे मसलतींत कदापि येत नव्हता. मार्गप्रतीक्षा करीत होता कीं, हें कालचक्र आपले निळे रंगाचे पडद्यांतून काय चमत्कार व कोणता खेळ प्रगट करितें हें पाहावें, म्हणजे कालचक्राची गती कशी फिरते हें पाहावें. जेव्हां पांचवे रोजचे रात्रीस निद्रा लागली तेव्हां किषवरखान खुद जातीनें अफजलखानाचे निद्रास्थानीं गेला. बहुत काकुलती येऊन बोलला कीं, 'आपले व माझे गुरुशिष्य-पणाचें नातें आहे. मी आपण शिकविलेला आपला शिष्य व आपले कृपेनें पाळलेला आहे. यास्तव या संकटाचे समई माझा हात धरावा, म्हणजे मला आश्रय द्यावा. मजला साह्य व मदत करण्यापासून निर्दैवी ठेऊं नये, म्हणजे माझें साह्य करण्यास अंतर करूं नये. एखादी श्रेष्ठ युक्ती व विचार काढावा. नाहींपेक्षां मजवर मोठा कटीण प्रसंग आला आहे. जे संपूर्ण कारभारी लोक माझे पूर्ण लोभाचे होते व मजवर पूर्ण प्रीती करीत होते तेच कारभारी लोक याचसमई माझे रक्त प्राशन करणेंकरितां तृषित होऊन माझा प्राण घेणेस उठले आहेत. आता मजविषयीं दया येऊं द्यावी व आपण गुरू आहांत व मी आपला शिष्य आहे यास्तव या समई आपले शिष्याचे फिर्यादीची दाद घ्यावी.' असें बोलल्यावरून अफजलखान या बोलण्यांत मन घालीनासे झाले. 'मला येविषयींची गरज नाहीं व मीं या कामांत पडावयाचा नाही असें आग्रहाचे बोलणें बोलले. तेव्हां किषवरखान याणी फार आग्रह करून

काकुलती आला कीं, 'आपण जर करितां या समई या कामांत मन न घातल्यास व कामाची सला न सांगितल्यास या करण्यांत सर्वांचे प्राण जातील आणि राजधानीचे कारभारांत बहुत घालमेली होतील. या समई या कामांत आपण मन न घालणें व अंगानिराळे टाकणें योग्य नाहीं.' असें बोलला तेव्हां अफजलखान याणी निरोपाय होऊन ही गोष्ट कबूल केली आणि किषवरखानासी मिळाला. दुसरे दिवशीं जेव्हां कचेरी झाली व मसलत व विचार ठरण्याचा दरवाजा उघडला, म्हणजे मसलत करूं लागले, तेव्हां किषवरखान त्या समयांत गालबखान सरनौबत यास मोठ्यानें वोरडून बोलला कीं, 'काय पाहातोस ! उठ, उभा रहा, त्वरित सिध्द हो आणि करार ठरल्याप्रमाणें काम कर.' असें बोलला तेव्हां गालबखान याणी तेच वेळेस मुर्तजाखान व त्याचा बंधु शाहा कासम या उभयतांस कचेरींतून उठवोन दुसरीकडे ओढून नेऊन कैद केलें. दोन तीन दिवसानंतर किल्यावर पाठविलें. माआतेबरखान याजला त्याचे मुलाबाळासुध्दां शहरांतून काढून दिल्हे. तेव्हां तो अकबरशाहाकडे हिंदुस्थानास चालता झाला. किषवरखान याणी आपले संनिधचे मंडळीस घेऊन एकांताचे स्थानीं आला आणि अफजलखान यास एकांतीं बोलाऊन पोटाशीं धरिलें. आपण या कामांत अनमान करूं नये म्हणोन बहुत प्रकारें आग्रहपूर्वक विचारिता झाला. जे कैद झाले व ज्यांचे पारपत्य केले त्या जमातीच्या वागणुकी व मसलती सविस्तर सांगता झाला, कीं 'या चार पांच दिवसांत फार दंगा व फंद चालले होते. जो तो आपले-सच वकिलीचें काम व्हावें म्हणत होता. राजधानीचें काम नीट चालावें असें कोणीच करीत नव्हते. या सर्वांचे मसलतींतील तात्पर्य तें होते कीं, इब्राहिम आदिलशाहास मातुश्रीसुध्दां मक्केस रवाना करून द्यावे, शाहा फततुल्लाह यास कैद करावे व अफजलखान यास कत्तल करावे, म्हणजे तुम्हांस ठार मारावे किंवा तुमचे डोळे काढावे, आणि रफिउद्दीन शिराजी यास धरून त्याजपासून खजिन्याचा हिशेब घ्यावा. मिया आली याचा पुत्र इस्माईल आदिलखान म्हणोन आहे तो बहुत दिवस गोव्याचे बंदरांत होता व तेथेंच जन्मला व तो हाली विजापुर येथें आहे त्याजला तक्तावर बसवावा. मुर्तजाखान याजला पेशवाईचें काम द्यावें व किषवरखान व शाहा कासम या उभयतानीं एक विचारें राजधानीचीं कामें व वजीरीचें काम करीत जावें. बाकीची पदें हर एकाची योग्यता पाहून जसा अधिकार असेल तशीं द्यावी. जेव्हां इब्राहिम पादशाहा पूर्ण अकलवान, कीं त्याजला, आली आदिलशाहा मयत याणी हद म्हणजे आम्ही वारल्या-नंतर त्याजला, गादीचा मालक करावा असे वारंवार सुचविलें आहे तो इब्राहिम पादशाहा वैरी लोकासी मिळून राहिला आहे त्याजला त्याचे मातुश्रीसुध्दां काढून देऊं व या दौलतींतील पूर्वापार जुनाट कामदार आहेत, कीं ज्यांणीं स्वामी सेवेंत

जिवादारभ्य श्रम करून उत्तम प्रकारें सेवा केल्या आहेत व याजकडोन इमान सांभाळून वागण्याशिवाय व प्राण अर्पण करण्याशिवाय दुसरी चाल गैरशिस्त घडलीच नाहीं, त्यांचा मनोभंग करून व असे जुनाट कामदार आहेत त्यांजला जीवें मारून टाकूं अशा मसलती करितात. तेव्हां मग हे बाकीचे कामदार व हे अमीर-लोक संपूर्ण लष्कर व मुलुख आमचा हुकूम कसा चालू देतील ? खास असे आहे कीं, मजलाहि कामिलखानाचे पाठीमागें घालऊन देतील. आतां तो समय आहे कीं, आपण या राजधानींतील कामांत मन घालून ही राजधानी पुन्हां शोभिवंत करावी. अशा प्रकारें कीं, शत्रूनें वरचढ होऊ नये असें करावें. तर्फेतर्फेतील पादशाहा, कीं जे निरंतर वैरभाव वागवीत होते ते, हाली फारच दुराशा धरून मुलुक हस्तगत करावयाकरितां तयार होऊन सर-हदींत येऊन पोहचून खराबी करण्याचे विचारांत पडले आहेत. याजकरितां आपण आता अशी मसलत करावी कीं, ते शत्रु लोक सामर्थ्यहीन होऊन निराशा व नाउमेदपणानें परत जावेत.' असें बोलला तेव्हां अफजलखान याणीं उतर दिले कीं, 'मजला कित्येक दिवस दुखण्यानीं असें हैराण केलें आहे व मी दुखण्यानीं असा गळून गेलो आहे कीं, माझें मन या पृथ्वींतील कारभाराचे विचारांत लागत नाहीं. या सर्वांत बरे आहे कीं, कित्येक दिवस घरीं राहून औषध उपाय करीन. कदाचित ईश्वराची कृपा झाल्यास व तेणेंकरून आरोग्यता प्राप्त झाल्यास मग आम्ही तुमचे मसलतीचे व विचाराचे बाहेर नाहीं. जें काम सांगाल त करूं.' असें बोलले तेव्हां किषवरखान बोलला कीं, 'हाली हा समय तसा नाहीं, कीं आपण कामांतून मन काढण्याचें बोलता व काम करीत नाहीं म्हणता व मजला या कित्येक घातक शत्रुच्या हातीं देता. येणेंकरून आमचे यजमानाचे राजधानीचे परिणामांत बहुत बखेडे होतील व शत्रुचे हंसे होईल. आपण कितीहि केलें तरी मी आपल्यास सोडावयाचा नाहीं.' जेव्हां अफजलखान याणी पाहिलें कीं, किषवरखान याचा फारच आग्रह पडला, आतां मला काम नको म्हणणें चालत नाहीं आणि मनांत असा विचार आणिला कीं, जर करितां मी याहून अधिक ढिलाई करीन तर प्राणास दगा होईल असें जाणोन, निरोपाय होऊन कबूल केलें आणि बोलिला कीं, 'तुमचे विचाराबाहेर आम्ही नाहीं.' असें बोलला तेव्हां किषवरखान याणीं पुन्हा उठोन आणखी मिठी घातली आणि अफजलखान याचे पाय धरले. उभयतांचे अंत:कर्णातील वाकडेपणा संपूर्ण जाऊन निर्मळ होऊन उभयतांहि सरकारी कामें करण्यांत निमग्न झाले. जे वैरभाव वागवीत होते त्या मंडळीसही नाना प्रकारचे संतोष करून व भरोसा देऊन ज्या ज्या मनुष्याकडे जीं जीं पदें होतीं तीं पदें व ज्यांचेकडे जीं कामें होतीं तीं सर्व त्यांची त्यांजकडे कायम ठेविलीं. कित्येक लोकांकडे अमीरीचीं कामें दिल्हीं. इतक्यामध्यें सरहद्दींतील चहूकडून

वर्तमान आलें कीं, निजामशाहा व कुतुबशाहा व विजयानगरचे हिंदू राजे यांणी सरहदींत फौज पाठऊन फंदफितूर करीत आहेत. असें वर्तमान आलें तेव्हां फार जरूर कारण प्राप्त झालें कीं, त्या शत्रुसमुदायाचे पारपत्य करण्याकरितां फौज पाठवणें भाग आलें. जेव्हां राजधानीचे कामाचा बंदोबस्त करणेचा नुकताच प्रारंभ होता व अद्यापि दौलतीकडील कामें मनोदयानुरूप ठरलीं नव्हतीं तोंच किषवरखान यांणीं असा विचार पाहिला कीं, हे चहूंकडून विघ्न उभें राहिलें आहे याचें निवारण अफजलखानाचे पक्के मसलतींशिवाय व पूर्ण विचाराखेरीज कदापि व्हावयाचें नाहीं. असें जाणोन निरोपाय होऊन खान मशारनिल्हे यास सांगता झाला कीं, 'तुम्हीं बहुत फौजेनिशीं व जमातीसुध्धां शत्रुलोकांवर चालून जावें आणि वाजवी रीतीनें पारपत्य करून सरहदींतून घालऊन द्यावेत. आपले मुलखाचे मैदान या काटे व कचऱ्यापासून निर्मळ करावें', म्हणजे शत्रूचा पराभव करावा.

## ४. शत्रुचे पारपत्यावर चालून जाणेंकरितां किषवरखान याणी अफजलखान याचे समागमें फौज नेमणें :

अफजलखान फौज तयार करून समागमें घेऊन शत्रुचे पारपत्यावर चालता झाला. प्रथम कुतुबशाहाचे सरहदीकडे जाऊन कित्येक दिवस बरोबरीची तयारी उभयतांनीं केली. नित्य उभयतांमध्यें युध्द होत होतें. तेव्हां आदिलशाहाचे राजधानींतील अमीरलोक ऐनुलमुल्क व अंकुसखान व हपसी जातीचे अमीर येखलासखान व दिलावरखान असे अमीरलोक हरएक तर्फेकडून फौज घेऊन येऊन पोहचले. शत्रूचे लोक इच्छित होते कीं, तिघेहि फौजेसुद्धां बातमी न कळूं देतां अफजलखानावर हल्ला करून त्याजवर गर्दी करावी. असा बेत केला होता हें वर्तमान अफजलखान यांणीं जाणून बहुत हुषार होऊन फौजेची मजबुती करून युध्द करिता झाला. शस्त्रांचे जाते फिरुं लागलें, म्हणजे शस्त्रें चालूं झालीं. उभयतांकडील शूर मनापासून शूरत्त्व व पराक्रम करीत होते आणि रणभूमीमध्यें रुस्तुमसारखा हल्ला करून पेनन व आसफयार या उभयता पादशाहांचे युध्दाची वर्णनें कालचक्राचे सफ्यापासून धोवून टाकीत होते, म्हणजे तें वर्णन या युध्दापुढें शोभेनासें करीत होते. शेवटीं ईश्वरकृपेंकरून यशस्वी जयाचा वायू आदिलशाहाचे ध्वजावर वाहता झाला आणि कुतुबशाहाचे फौजेचा मोड झाला.[४] बहुत सामान सरंजाम हत्ती उंट घोडे वगैरे आदिलशाहाचे फौजेचे हातीं लागले. नंतर अफजलखान व संपूर्ण अमीरलोक याणी त्यासमई असा विचार मनांत आणिला कीं,

४. १५८० इ. स.– ब्रि. फि, ३, पृ. ३३३–४.

आपण त्वरा करून निजामशाहाचे फौजेवर चालून जाऊन त्याचेहि पारपत्य करावें. असें ठरऊन निजामशाहाचे फौजेसंनिध जाऊन पोहचले. निजामशाहाकडील लष्करवाले गाफिलपणें, आतां कांही भय नाहीं असें मानून, जमाव सोडून एक एक अंतऱ्याअंतऱ्यानीं उतरले होते. निजामशाहाकडील शूर बहेजाद–उल–मुल्क सरनौबत म्हणोन त्याचा सरलष्कर होता. त्याणी युद्धाकरितां तयारी करून आदिलशाहाचे फौजसन्मुख चालून आला आणि बकऱ्याचे किंवा कोणते एखादे जनावराचा गळा कापला म्हणजे ते जनावर हातपाय झाडते त्याप्रमाणें आदिलशाहाचे फौजेपुढें धडपड करून दौडी केल्या. शेवटीं थकून निरोपाय झाला. आदिलशाहाचे फौजेपुढें धीर निघेना तेव्हां माघारा मोहरा फिरविला आणि पळूं लागला. निजामशाहाची बाकीची फौज हवालदील होऊन पळाली. त्या फौजेपैकीं कित्येक जखमी झाले व कित्येक परागंदा झाले. या लढाईचे यशांतहि बहुत हत्ती व घोडे आदिलशाहाचे लष्कराचे हातीं लागले. ह्या दहा दिवसामध्यें दोन वेळ दोनीहि युध्धांत आदिलशाहाची फत्ते झाली.[५] निजामशाहाची बाकीची फौज परागंदा झाल्यानंतर त्या फौजेंतील लोकांनीं धारवाडच्या किल्याचा आश्रय केला होता. अफजलखान याणीं मनांत आणिलें कीं, निजामशाहाकडील फौजेचा मोड होऊन त्या मंडळींनीं व सैद मूर्तजा यकदेजी याणीहि धारवाडच्या किल्याचा आश्रय केला होता. त्यावर अशा समयांतच हल्लेंत हल्ला करून आपण जातीने त्यावर जाऊन पडावें असा विचार केला. तेव्हां अमीरलोकांनीं या गोष्टीस अफजलखानास सला दिल्ही नाहीं. या विचारास मान्य झाले नाहींत व बोलले कीं, ' दिवसेंदिवस हर घटकेघटकेस शहराकडील म्हणजे विजापुराकडील वर्तमान येऊन पोहचते कीं, किष्वरखान याणीं शत्रूचे पारपत्यावर फौज रवाना केल्यानंतर आपणच मालक व्हावें अशा विचारांत पडून सर्वोपरी आपलेच कल्याण करून घेणें आरंभिलें आहे. आपलेकडील लोकांत, म्हणजे आपले आप्तविषयीं मंडळ व आपले निसबतीचें लोकांस, मुलकामुलकाचे व किल्याचे बंदोबस्ताचे कामावर पाठऊन आपली खराबी करावी असा यत्न करिताहे. असें असतां हाली या दोन फत्ते थोडके थोडके दिवसांतच झाल्या हें वर्तमान ऐकून किष्वरखान इतका गर्विष्ट अभिमानी झाला आहे कीं, तसा कोणीच नसेल. किष्वरखान याणी जुनाट पुरातन चाकरलोकांचा उच्छेद करणें आरंभून सर्व आपले आप्तविषयीं मंडळींतील लोक जमा करीत आहे. आतां या समई तो विचार बरा आहे कीं, आम्ही कांहीं दिवस शहादुर्गचे किल्यांत राहातो म्हणजे हत्ती घोड्यास विसावा होईल आणि दुसरें हें कीं, अमीरलोक यांजला येणेविसीं आज्ञापत्रें गेलीं आहेत तेही या समई येऊन पोहचतात. नंतर सर्व अमीरलोकांचे विचारास

५. ९८८ हि. =१५८० इ. स.– ब्रि. फि. ३, पृ. २६३.

आल्यास शत्रुवर चालून जाऊं.' अशा समयांत अमीरलोकांचे नावें आज्ञापत्रें येऊन पोहोचलीं. कारण कीं, आज्ञापत्र किषवरखान याणीं चांदबिबी सुलतान इचे हुकुमाशिवाय पत्रें पाठविलीं होतीं कीं, निजामशाहाचे फौजेंतील हत्ती तुम्ही लुटून आणिले आहेत ते इकडे पाठऊन द्यावेत, म्हणोन पत्रें पाठविलीं होतीं. येणेंकरून सर्व अमीरलोकांचें अंतःकर्णांत किष्वरखान याजविसी वाकडेपणा आला आणि येणेंकरून सर्व अमीरलोकांचे अंतःकरण अधिक अधिकत्त दुखवलें. त्या अमीरलोकांनीं आपआपणांत मसलत केली कीं, एक विनंतीपत्र लिहून चांदबिबी सुलतान याचे सेवेंत पाठऊन विनंती करावी कीं, मुस्तफाखान याजला बंकापुरचे सुभ्याहून आणऊन राजधानीचा कारभार त्याजकडे देण्याविसी आज्ञा व्हावी. कैलासवासी पादशाहाचे कारकीर्दीप्रमाणें मुस्तफाखान याजला जुमलतुलमुल्क व वकिलुःसलतनत हीं दोन पदें द्यावीं. याणी गर्वाचे मद्यपानानें धुंद झालेले मैदानांतील पुरुषाचे म्हणजे किषवरखान याचे, कीं तो किषवरखान आम्हा सर्वां सेवकांस पूर्ण त्रास देणारा आहे त्याचे, सेवेची पुन्हा आशा धरूं नये. असें लिहिण्याचा विचार ठरविला तेव्हां या मसलतीपैकीं थोडीशी बातमी किषवरखान याचे कानावर गेली. आधींच स्वता गर्व व अभिमानानें परिपूर्ण झाला होता त्यांत हाली हें वर्तमान ऐकण्यानीं निखालस भय व विचार परित्याग करून जुलुम करणेचे मैदानांत पाऊल पुढें ठेविलें. मुस्तफाखान याजकडे कांहींएक अपराध नसतां त्याचे पारपत्य करण्याचा विचार करिता झाला. दुसरेहि कित्येक लोक या मसलतींत होते त्यांचेहि पारपत्य करण्याची मसलत करिता झाला.

## ५. मुस्तफाखान आरदस्तानी याजवर किषवरखान याणी फौज पाठवणें :

जेव्हां राजधानीचे कामांत किषवरखान याची पूर्ण मजबुती व प्रबलता झाली तेव्हां दौलतीचे कल्याण इच्छिणारे पुरातन सेवक लोक होते त्या एक एक सेवक लोकास कामावरून बरतर्फ करून त्या जुने कामदाराचे जाग्यावर आपले निसबतीचे विश्वासू लोक नेमीत होता. अमीरलोकांचे मसलतीची बातमी समजण्यावरून मुस्तफाखान याजविसीहि किषवरखान याचे मनांत मोठा संशय येऊन मुस्तफाखानाचे पारपत्य करण्याचा विचार करिता झाला. पांच अमीरलोक बंकापुरानजिक मिलनोरचे किल्यांत मुस्तफाखान रहात होता त्याजवर रवाना केले. तेव्हां किषवरखान याजकडील अमीरलोक व मुस्तफाखान याजकडील मनुष्यांमध्यें कित्येक लढाया झाल्या. शेवटीं मुस्तफाखान जेर झाला आणि युध्धापासून माघारा परतला. हिंदु लोकांकडील एक किल्याचा आश्रय करूं लागला. तेव्हां किल्यावरील

रहाणारे लोकांनीं किष्वरखानाची फौज संनिध येऊन पोहचली या कारणास्तव किल्लेचा दरवाजा मुस्तफाखान याजला किल्यावर येण्याकरितां मोकळा ठेविला नाहीं. मुस्तफाखान याजला किल्यावर चढऊन घेण्याकरितां एक दोर किल्यावरून खालीं सोडला. जेव्हां मुस्तफाखान याणीं ती दोरी हातानीं मजबूत धरून अर्धा किल्ला चढला होता तोंच किष्वरखान याचे फौजेंतील लोकांस हें वर्तमान कळतांच किष्वरखान याजकडील लोक तेथें जलद जाऊन पोहचून मुस्तफाखान याचे पाय धरून वोढून तळास आणून पकडून बंकापूरचे किल्यांत कैद केला. कित्येक दिवसांनंतर त्याजला ठार मारिला. सांगण्यात असें आहे कीं, एक ब्राह्मण जोशी बंकापुरचे मुलकांत होता त्याजला ज्योतीष्याचे गणितानीं उभय लोकीचें भूत भविष्य वर्तमान कळत होतें. पुढें ज्या ज्या दिवशीं जें जें होणार जें भविष्य जसें असेल तसें वास्तविक मजकूर कांहीं एक कमजाजती न करितां सांगत होता. त्याचे प्रश्न पाहाण्यांत कधींही अंतर येत नव्हतें. असेच पुर्वी जोसी मजकूर याणी बंकापुरचा किल्ला घ्यावयाचे आधीं प्रश्न सांगितला होता कीं, वीस वर्षांनंतर हा किल्ला मुस्तफाखानाचे कारणानें हिंदु राजे लोकांचे हातून बाहेर जाईल. इतक्यामध्यें वीस वर्षांची मुदत गुजारल्यानंतर जोसी याणी सांगितलें होतें त्याप्रमाणें प्रसिध्ध घडून आलें. हा प्रश्न जेव्हां पुर्वी मुस्तफाखान याजला कळला होता तेव्हा मुस्तफाखान याणी जोसी मजकूर याजला आणावयाकरितां हुकूम दिल्हा होता. जेव्हां तो जोशी येऊन हजर झाला तेव्हां मुस्तफाखान याणीं त्यावर अत्यंत कृपा केली. बहुत नम्रतेनें जोसी मजकूर यास विचारिलें कीं, ‘ माझी दैवदशा कशी आहे ? हें पुरें लक्षांत आणून प्रश्न सांगावा. ’ असें विचारिलें तेव्हां जोसी याणीं त्याची दैवदशा गणित करून चित्तांत आणून मुस्तफाखान याजपुढें मस्तक भुमीवर आदळून घेतलें. तेव्हां मुस्तफाखान याणीं त्याचें बहुत चित्तसमाधान करून जोशी यास बोलला कीं, ‘ तुझे प्रश्नांत आलें असेल तसें प्रश्न निःसंशय सांग. त्या प्रश्नापैकीं कांहीं एक किंचितहि सांगणें गुप्त ठेऊं नको. ’ तेव्हां जोसी बोलला कीं, असा प्रश्नभाव आहे कीं, ‘ अमके वर्षी विजापुरचे राहणारांपैकीं कोणी एक गृहस्थ येऊन तुझा प्राण घेणेचा संकल्प करून तूं ज्या किल्यांत राहतोस त्याच या बंकापुरचे किल्यांत तुझा प्राण घेईल. तो तुझा प्राण घेणारा पुरुषहि थोडकेच दिवसांत पळून जाऊन तेलंग देशांत जाईल आणि तेथें एके मनुष्याचे हातून तरवारीची जखम लागून ठार होईल.’ शेवटीं जोशी याणीं सांगितलें होतें त्याप्रमाणेंच मुस्तफाखान हा किष्वरखान याचे

हातून ठार झाला व तो किषवरखानहि गोळकुंड्यामध्यें त्याच दिवसीं (वर्षी ?) वरितच मारला गेला.

## ६. चांदबिबी सुलतान इजला वाड्यांतील महालांतून जबरदस्तीनें व बलात्कारानें किषवरखान याणीं वोढून साताराचे किल्यांत पाठऊन कैद केली :

मुस्तफाखान बहुत संभावित वजीर होता, कीं त्यासारिखा दौलतींत कोणीच नव्हता. असा योग्य पुरुष असोन त्याजला कैद केल्यानंतर किषवरखान याजला गर्व व अभिमान उत्पन्न झाला. गर्विष्टपणानें चांदबिबीचे पारपत्याचे विचारांत पडला. कारण कीं, चांदबिबी सुलतान ही त्याच संकल्पांत होती. कलबबेक (कदाचित ?) तिचा संकल्प या सर्वांहून अधिक होता. चांदबिबी सुलतान इचे मनांतील संकल्प भाव हा होता कीं, किषवरखान याणी निरंतर आज्ञेंत राहून सेवकपणाचे इराद्यानें चाकरी करून इबराहिम सुलतान पादशाहा याजला घरीं आणोन पालन करण्याकरितां आपले हवालीं करावा आणि महाली व मुलकी कामें आपले हुकूमाप्रमाणें करीत जावीं. परंतु किषवरखान ही गोष्ट मान्य करित नव्हता. कोणतेंहि काम करणेंविसी आज्ञा झाली असतां तें काम आळसावर व दिवस-गतीवर टाकीत होता. अशा समयांत मुस्तफाखान याजला कैद केल्याचें वर्तमान येऊन पोहचलें. तेव्हां चांदबिबी सुलतान इची किषवरखानावर बहुत इतराजी होऊन किषवरखानास बहुत क्रोधानें व वाकडेपणानें हलकेपणाचे भावमिश्रित शब्द त्याजला बोलली. किषवरखान याचें पूर्ण यत्नानें पारपत्य करण्याचा विचार करून जे पादशाही चाकर लोक मोठे मोठे वकिलीचे व अमीरीचे पदवीस पोहोचले होते त्या कारभारीयासी येविषयींची मसलत करिती झाली. सर्व कारभारी लोकांचे अंत:कर्ण किषवरखानावरून फिरविती झाली, म्हणजे तुम्ही कोणी किषवरखानाचे लगल्यानीं असो नये असा सर्व कारभारी लोकांस बोध करिती झाली. सर्वांचीं अंत:कर्णें आपल्याशीं मिळऊन घेतलीं व किषवरखानाचे पारपत्यावर सर्वांस नेमिलें. या विचारांत होती कीं, किषवरखानाचे पारपत्य केल्यानंतर इब्राहिम आदिलशाहा याजला आपलेपाशीं आणोन त्याचे पालन करावें. इबराहिम याजवर मातुश्रीप्रमाणें ममता व लोभ करावा आणि आपले मातुश्रीप्रमाणें, कीं हुसेन निजामशाहाची स्त्रीचा पुत्र मुर्तजा निजामशाहा याणी राजधानीचे प्रारंभी सहा वर्षे राजधानीचा कारभार करून काम चालवीत होता त्याप्रमाणेंच त्याणीं इबराहिम आदिलशाहाचेंहि राजधानीचा कारभार करून कामें चालवावी. अशी मसलत केली तेव्हां हें वर्तमान

किषवरखान याजला कळलें. तेव्हां चांदबिबी सुलतान ही न जाणो एखाद संकट उभें करील, मग त्या संकटाचा परिहार कठीण पडेल या भयास्तव–मिसऱ्याचा अर्थ : "होणार गोष्ट झाली नाहीं तोंच त्या गोष्टीचा उपाय करून ठेवावा." असें जाणोन चांदबिबी सुलतान इजला कैद करण्याचा संकल्प दृढतर केला. चांदबिबी सुलतान इणें वाड्याचे बाहेर निघो नये अशी तिजला बंदी केली. तेव्हां चांदबिबी सुलतान इजला वाड्याचे बाहेर निघो देईनासे झाले. पादशाहाकडील खोजे व राबत्यांतील वृध्ध पुरुषांस चांदबिबी सुलतान इजला जबरदस्तीनें व बलात्कारानें बाहेर ओढून आणावी याजकरिता पाठविलें. तेव्हां वृध्ध पुरुषांनीं मर्यादा सांभाळिली आणि चांदबिबी सुलतान इची अबरु घेऊं शकले नाहींत. नंतर किषवरखान याणी आपले निसबतीचे खोजे व वृध्ध पुरुष चांदबिबी सुलतान इचे कांहीं एक थोरपणाचे भय न धरितां महालांतून बाहेर ओढून आणिली आणि पालखींत बसऊन पूर्ण बेअबरुपणानें शहरांतून बाहेर काढून सातारचे किल्यांत पाठविली, कीं चांदबिबी सुलतान इचे चाकरीचे हुजरे व चाकरीच्या बायका कुणबिणी दिवसा बाजाराचे-मधून सर्वांदेखता सेवक लोक उघडे बोडके आरडत वोरडत घेऊन जात होते, हें सर्वांनीं पाहून तात्काळ सर्व लोक आरडा वोरडा शोक करूं लागले. चांदबिबी सुलतान इजला अशा अवस्थेनें शहरांतून नेऊन गेले ते दिवशीं शहरांतील संपूर्ण मनुष्यें चिंताग्रस्त होतीं. शोक करीत होती कीं, आली आदिलशाहा ठार झाला ते दिवशीं देखील सर्वांनीं इतका शोक केला नाहीं इतका शोक केला. संपूर्ण लहान थोर मनुष्यें किषवरखानास छी थुः करुं लागली. येथपर्यंत, कीं किषवरखानाची बायकामुलें देखील व संपूर्ण शहरचे लोक गलोगलींत व रस्त्या-रस्त्यानीं व बाजारांत मोठ्यानीं वोरडून किषवरखानास दुर्भाषणें करीत होतीं. चांदबिबी सुलतान इजला शहरांतून काढून दिल्हे. ती स्वारी निघाली ते समई सर्वत्र उघड बोलत होते कीं, किषवरखान हा केवळ जबरदस्त यजीदच आहे. कारण कीं, यजीद याणी पैगंबर मुस्तफासल्लिलाह आलेही वसल्लम याचे पुत्रास मारिले तसेच यानीं मुस्तफाखानास ठार मारून मातुश्री चांदबिबी इजवर जबरदस्ती करून अदावतीनें कैद केली आणि संपूर्ण मुलखास घाबरें केलें आहे. थोडक्यांत आलें होतें कीं, सर्व मंडळीनीं किषवरखानावर गदा करून पादशाहाचे हुकुमाशिवाय किषवरखानास धोंडेमार करावा आणि ही शिक्षा त्याचे अपराधास योजावी त्याजला योग्य होते. कारण कीं, जरकरितां किषवरखान याणीं मध्यरात्रीं चांदबिबी सुलतान इजला महालांतून बाहेर ओढून शहराबाहेर काढिता तर कोणा एकासहि हें वर्तमान न कळतें. या प्रकारें शहरांतून बाहेर काढून दुसरे दिवशीं तेथून सातारचे किल्यावर पाठविता तर इतकी अपकीर्ती झाली नसती. असेंही कर्म न करितां गर्विष्ट, अभिमानी व निर्भय होऊन संपूर्ण मनुष्यांत अयोग्यपणास व

दुर्निमितास पात्र झाला व दुसरे कर्म हें केलें कीं, राणीकडील महालांतील संपूर्ण चाकरीच्या बायका जबरदस्तीनें धरून आपले आप्तविषयीं मंडळींचे हवालीं केल्या. यजमानाचे मर्यादेवर, मिठावर व खाल्लेले अन्नावर कांहींच दृष्टी ठेविली नाहीं. त्याचे माजुरपणापैकीं ही एक गोष्ट आहे कीं, एके दिवशीं इब्राहिम पादशाहाचे खजिन्यांत येऊन किष्वरखान याणी जडावाचे दागिन्यांचे संदूक उघडून थोडेसे दागिने जडावदार सुलतान इब्राहिम पादशाहाचे मातुश्रीचे आंगावर घालण्याकरितां राणीकडील सेवकाचे हातून महालांत पाठविले. तेव्हां पादशाहाची मातुश्री दागिन्याचे तबक पाहतांच हलके किंमतीचे दागिने पाठविले आहेत असें समजून किष्वरखानावर रागानें संतप्त झाली कीं, मी इतक्या हलके योग्यतेची आहे कीं काय व माझी योग्यता इतकी कमी होती यास्तव असे हलक्या किंमतीचे दागिने पाठविले! याहून भारी किंमतीचे पाठविता तर त्याचे पदरचें काय जात होतें असें बोलून तें तबक आणणारास बहुत शिक्षा केली. मातुश्रीचा क्रोध किंचित शांत झाला तेव्हां इब्राहिम पादशाहा याणी मातुश्रीस विनंती केली कीं, 'हे मातुश्री, जितकें आमचे राज्य आहे तें तर आमचेंच आहे व याशिवाय राज्य हस्तगत झाल्यास त्यावरहि आमचीच सत्ता आहे. मग आपण कां चिंता करिता व मनांत कशाकरितां खिन्न होता,' असें बोलला. हीं अक्षरें उगीच नोहेत. सोन्याचे शाहीनें लिहून ठेवावया-जोगीं आहेत. त्या समईं इब्राहिम आदिलशाहाचे लहान वय असोन त्या अकलवान पादशाहाची भाषणें अशींच कित्येक योग्य व बहुत पसंत प्रसिध्ध होत होतीं. असेंच त्याच देशांत मातुश्रीनीं इब्राहिम पादशाहास विचारिलें कीं, तुम्ही जेव्हां कचेरींत बसता तेव्हां उगेच स्तब्ध रहाता. कोणाशीं बोलत नाहीं. असें विचारिलें तेव्हां पादशाहानीं विनंती केली कीं, 'कचेरींत असा कोण आहे, कीं मी त्यासी भाषण करावें? कित्येक चाकर लोक आहेत ते केव्हां केव्हां मजला विनंती करितात तेव्हां मी त्याचें उतर देतो. माझेसारिखा कोणी आणा म्हणजे मी त्यासी बोलत जाईन. दुसरे हें कीं, राजधानीची योग्यता व अधिकार मोठा आहे व पादशाहाचीहि योग्यता भारी आहे. कचेरीमध्यें जे पादशाहा जितके श्रेष्ठतेनें व योग्यतेनें राहिले तितकी या पादशाहाची योग्यता व जरबही अधिक वाढेल. एक मीच या रीतीनें रहावें असें नाहीं. जो कोणी पादशाहा होईल त्यानीं याच चालीनें वागलें पाहिजे. आम्ही तर अल्प वयाचे व मुलच आहों.'

७. किष्वरखान याणीं विजापुराहून निघोन अह्मदनगरास जाऊन राहणें आणि तेथून कुतुबशाहाचे मुल्कास जाऊन राहणें व किष्वरखान याणीं मृत्यु पावणें प्रकर्ण :

अफजलखान याणी लागोपाठ दोन वेळ शत्रुचा मोड करून आपण यशस्वी व विजयवान झाला होता. तिसरे वेळींहि इच्छित होता कीं, शत्रुकडील लष्करवाले पळून धारवाडचे किल्यांत आश्रय करून राहिले होते त्यावर जलद जाऊन हल्ला करून तशीच लागोपाठ फत्ते करावी. अमीरलोकांसहि तुम्ही युध्धाविषयीं अनमान व आळस करूं नये म्हणोन बहुत आशा दाखऊन युध्धार्थी अत्यंत आग्रह करीत होता. त्या अमीरलोक याणीं किष्वरखानाचे वाकडेपणाचा व मगरूरीचा दस्त-ऐवज, म्हणजे निमित्त धरून अफजलखानाचे मसलतीस मोडता घालीत होते. त्या अमीरलोकपैकीं कित्येक लोक अफजलखानाचे मनोधारणास्तव असेंहि बोलत होते कीं, या दौलतीकडील कित्येक पुरातन सेवक अमीरलोक व पुरातन पालन केलेले या राजधानींतील लोक आहेत, व वर्तमानहि असे आहे कीं, ते लोक आज उद्या इतक्यांत येऊन पोहचतात. ते आले म्हणजे त्या सर्वांचें एकपणानीं पूर्ण सामर्थ्यांनीं शत्रूवर चालून जाऊं, हें बरें दिसतें. अशा या विचारांत होते. तोंच कितिएक दिवसानंतर ते अमीरलोक आपआपल्या जमातीसुध्धां यऊन पोहचले व कित्येक अमीरलोक वाटेंतूनच अफजलखानाचे व कित्येक सरदारांचे भेटीस आले. ते पूर्ण खेदयुक्त व उद्विग्न चित्तानें व दुःखित अंतःकरणानें व रूदन करीत आरडत ओरडत आले, कीं या आमचे निर्लज्यपणावर व बेअबरूपणावर धिःकार असो. असें म्हणत होते कीं, ‘अद्यापि आमचे शरीरांत प्राण कसा राहिला आहे! अद्यापि आम्ही जीव कां ठेविला आहे! आज आम्ही असें दुःख भोगीत जगलो यापेक्षां मेलों असतो तर बरें होतें. एका मुर्ख निर्लज्य पुरुषानें बेमानपणा कोठपर्यंत केला आहे. अपकीर्ताची व खराबीची मृतीका आमचे मस्तकावर किती उधळून राणीसाहेब याजला, कीं जी मुर्तजा निजामशाहाची बहीण व राज्य व तक्ताची धणीन व आम्ही बहुत वष तिचे अन्न खाल्ले आहे व या श्रेष्ठ अमीरपणाचे पदवीस त्याणीच आम्हांस चढविलें आहे असे असतां अशा संकटानीं व अशा बेहुरमतीनीं शहरांतून निघोन गेली. आज आम्हांस जीव देण्यापेक्षां किंवा शत्रुचा सूड घेण्यापेक्षां दुसरें कोणतच कर्तव्य नाहीं. आज आमचा मरणाचा दिवस आहे किंवा आज आमच्या न्याय व इनसाफाचा दिवस आहे.’ असें बोलून किष्वरखानाचे पुत्रावर व बंधूवर चालून गेले. कारण कीं, किष्वरखानाचा पुत्र व बंधु हे उभयतां त्याच लष्करांत सर्व अमीरलोकापैकीं श्रेष्ठ अमीरच होते. किष्वरखानाचा बंधु मोगलखान याजकडे सरखलींचें पद होतें व किष्वरखानाचा

पुत्र कमालखान हा सरनौबतीचे हुद्यावर होता. उभयतांहि त्या वेळेस आपआपले जमातीसुध्धां तयार होऊन उभे राहिले होते. त्या उभयतांवर अमीरलोक वगैरे अत्यंत क्रोधानें व पुर्ण संतापानें धाऊन जाऊन त्या उभयतांस धरून आणिलें आणि शाहादुर्गाचे किल्यांत कैद केलें. यानंतर येखलासखान हा दौलतखानासुध्धां व आणखी कित्येक अमीरलोकांसहित किष्वरखानाचे पारपत्य करण्याकरितां विजापुराकडे चालता झाला. हें वर्तमान किष्वरखानास समजलें. तेव्हां भयाभीत व घाबरा होऊन पुत्राचे व बंधुचे मोकळीक होणेचे विचारांत पडला. कित्येक त्याचे जवळचे राहणारे लोक बोलले कीं, 'अमीरलोकांनीं व सेवकांनीं जें काम केलें आहे त्यांत तुमचा बंधु पकडला आहे व कैद केला आहे. उघडच दिसतें कीं, हें कर्म अफजलखान याचे मसलतीशिवाय कदापि व्हावयाचें नाहीं. अफजलखानाचा बंधु रफिउद्दीन येथें आहे. त्याजला पकडून कैद करावा म्हणजे तुमचे बंधूस व पुत्रासहि सोडून देतील.' तेव्हां या मसलतीवरून किष्वरखान याणी रफिउद्दीन याजला धरण्याकरितां व कैद करण्याकरितां बोलावणें पाठविलें. आणखी कितिएक मसलत जाणणारे लोक किष्वरखानास बोलिले कीं, 'या समई अफजलखानाचा बंधु रफिउद्दीन याजला धरणें व कैद करणें योग्य नोव्हे. आतां तुम्हांस तें मात्र करणें जरूर आहे कीं, अफजलखान बहुत फौजेसुध्धां याजकरितां सरहादींत येऊन बसला आहे, कीं आपले बंधूस म्हणजे रफिउद्दीन याजला धरण्याचे वर्तमान कळतांच कांहीं एक विचार न पहातांच तुम्हांवर चालून येईल. सांप्रत तुमची फौजेची तयारी तितकी नाहीं, कीं अफजलखान यासी युध्धास पुढें याल. शहरचीं माणसें तुम्हांस बहुत कंटाळली आहेत व मनामध्यें त्रास पावलीं आहेत. ते लोक कदापि तुम्हांसी मिळावयाचे नाहींत. मग बहुत कठीण प्रसंग प्राप्त होईल. यापेक्षां एखादा उत्तम विचार काढावा व तो विचार हा आहे कीं, अफजलखान याचे बंधूस समक्ष बोलाऊन त्याचे बहुत चित्तसमाधान करावें. नाना प्रकारचे विचारानें त्यासी आर्जवाची बोलणीं बोलून त्याजला काकुलती या आणि त्याजपासी येविसी शफत व क्रिया घ्या कीं, तुमचे शत्रुशीं मित्रता व सख्य करणार नाहीं. जितकें सामर्थ्य आहे तितका यत्न करून तुम्हांकडील मंडळी सोडून देण्याविषयीं यत्न करीन. आज या मुलकामध्यें ज्या ग्रहस्थापासून तुम्ही साह्याची व मदतगारीची इच्छा होती तो ग्रहस्थ त्या मंडळी वेगळा नाहीं.' अशी मसलत सांगितली तेव्हां किष्वरखान याणी ही मसलत उत्तम आहे असें जाणून रफिउद्दीन याजला आपले संनिध बोलाऊन आणिलें. सविस्तर मजकूर सांगून त्याजला बोलला कीं, 'आम्हांस या राजधानींत आपलेशिवाय दुसरे कोणीच नाहीं. आम्ही निराश्रित झालों आहों. यास्तव आपलेपासून येविषईं शफत व क्रिया घ्यावी अशी इच्छा आहे. यास्तव कीं, आमचे घाताचे वेळेस आपण आमचे शत्रुमंडळीपैकीं कोणाशींच मिसळून साह्य

करूं नये व आमचे कामाचे उपयोगाविषई कदापि अंतर करूं नये.' रफिउद्दीन याणी प्रसंगास्तव व समय वोळखून कित्येक प्रतिज्ञा करून शफत वाहिली. रफिउद्दीन याचे शफथेवर त्याचा बंधु अफजलखान याणी आपली शक्ति आहे तोपर्यंत उपयोग करण्याशिवाय पाऊल टाकलें नाहीं. सारांष, येखलासखान बहुत फौजेसुध्धां किषवरखान याचा घात करावा यदर्थी विजापुरासंनिध येऊन पोंह्चला किषवरखान यद्यपि बाह्यात्कारी अब्रू व थोरपणा राह्ण्याकरितां प्रथम सन्मुख चालून आला परंतु जाणिलें कीं, येखलासखानापुढें आपला दम निघणार नाहीं. त्यापुढें धैर्य ठरणार नाहीं. तेव्हां धीर धरून बहुत द्रव्य चोरून घेऊन मुस्तफाखान व कामीलखान याणी दोन तीन संदूक भारी किंमतीचे जवाहिरांनीं व जडावदार भारी किंमतीचे दागिन्यांनीं भरलेले व साठ हार मोत्याचे कामीलखानाकरितां, कीं त्या मोत्याचे हारांची किंमत एक दोन लक्ष होनांची होत होती, ती घेऊन तो मार्ग सोडून दुसरे मार्गानीं निजामशाहाचे मुलकास पळून गेला. किषवरखान येऊन पोह्चण्याचे पूर्वीच अहमदनगर येथें किषवरखानाचे बदचालीचें वर्तमान सर्व लहान-थोरांचे ऐकण्यांत व बोलण्यांत आलेंच होतें. यास्तव तेथील मनुष्यांचें मनांत वाकडेपणा आलाच होता. इतक्यामध्यें किषवरखान येऊन पोह्चला. हें वर्तमान सर्वांस कळलें. तेव्हां विजापुरचे फजितीपेक्षां अधिक फजिती करूं लागले. यास्तव तेथें राहणेचा दम निघेनासा झाला. तेव्हां तेथून निघोन कुतुबशाहाचे मुलकास गेला. तेथेंहि या अपकीर्तीचे प्रसिध्धीस्तव पादशाहापासी जाण्यास राबता झाला नाहीं. तेथें मुस्तफाखान याजकडील आर्दस्तानी मनुष्यांपैकीं एक मनुष्य होता. त्याणी किषवरखान याजला तरवारीनीं वार केला. त्या वारानें मस्तकापासून पायापर्यंत तुटला आणि ठार झाला. सत्य आहे कीं, वाईट कर्म केलें आणि त्याप्रमाणें त्याजला फळ प्राप्त झालें नाहीं असा कोण आहे? किषवरखान याणी पेशवाईचें काम चार महिने व बारा दिवसच केलें.

## ८. आदिलशाहाचे राजधानीचे कामकाजाचा कारभार येखलासखान याणी हस्तगत करणें आणि प्रबल होणें प्रकर्ण :

येखलासखान आणि दुसरे अमीरलोक हापसी व दक्षणी जातीचे याजला जेव्हां किषवरखान पळून गेल्याचें वर्तमान कळलें तेव्हां पूर्ण भरंशानीं विजापुरास येऊन इबराहिम आदिलशाहा पादशाहाचे सेवेंत हजर होऊन जर हरएक अमीरलोक आपआपले योग्यतेनुरुप भारी किंमतीचे पोषाख व पदाधिकार पाऊन योग्यतेस चढले तर येखलासखान याजला वकिलीचें पद प्राप्त होऊन त्याणी माली व मुलकी

कामाची मुखत्यारी आपले हातीं आणिली. येखलासखान याणी पादशाहास अर्ज केला कीं, 'किषवरखानाची आप्तविषयीं मंडळी व किषवरखानाचे निसबतीचे लोक जागोजागचे किल्यांत व गांवोगांवीं इलाख्यांत आहेत. हुकुम झाल्यास ते लोक बरतर्फ करून त्या लोकांचें जाग्यावर हुजरून दुसरे कामदार आम्ही पाठवितो.' असा अर्ज केला तेव्हां पादशाहानीं आज्ञा केली कीं, 'अफजलखानाचा, बंधु रफिउद्दीन याचे विचारें प्रसंगास्तव वागणुक करावी.' अशी आज्ञा करून तेच वेळेस सातारचे किल्यावरून चांदबिबी सुलतान इजला आणविणेविषयीं हुकूम पाठविला. त्यावरून चांदबिबी सुलतान विजापुरास येऊन पोहचली. तेव्हां येखलासखान याणीं पूर्ववत पादशाहाचें पालन करणें चांदबिबी सुलतान हिजकडे नेमिलें. सरकारचा शिका किषवरखानाचे बरोबर गेला होता, ह्यास्तव विचारांत पडले होते कीं, शिका आणविण्याविषयीं कसें करावें. तेव्हां रफिउद्दीन याणी विनंती केली कीं, कलयमग (?) घोंड्याचा शिका आहे त्या शिक्यावर अक्षरें 'असदुल्लाह अल्‌गालब आलिहि सन अहीतालब' अशीं लिहिलीं आहेत. तो शिका कैलासवासी पादशाहाचे बोटांत होता व केव्हां हुजुरचे आज्ञापत्रांवर त्या शिक्यानेंहि शिके ठोकीत होते. तो शिका सरकारचे खजिन्यांत सांप्रत आहे. अशी विनंती केल्यावरून तो शिका खजिन्यांतून आणावा म्हणोन आज्ञा केली. त्यावरून तो शिका रफिउद्दीन याणीं आणून हजर केला. मयत पादशाहाचे... ... ... भरऊन पादशाहास दाखविणेंकरितां आणिला. तव्हां पादशाहाची आज्ञा झाली कीं, हाच शिका चालू करावा. बहुत दिवस त्याच शिक्यानें वागणुक चालली. किषवरखान गोलकुंडयामध्यें मुस्तफाखान याजकडील मंडळीपैकीं एक ग्रहस्थाचे हातून मारला गेला. तेव्हां किषवरखानाचे सेवकानें तो शिका गोलकुंड्याहून आणून विजापुरास हजर केला. तेव्हांपासूनच शिक्यावर वागणुक चालली. येखलासखान नित्य सरकारवाड्यामध्यें बैस होता. माली व मुलकी काम करीत होता. सेवक लोकांस संनिध बोलाऊन किल्याचे व मुलखाचे बंदोबस्ताचे कामावर नेमून दिवसेंदिवस त्याचे संरक्षण करीत होता. येखलासखान मुळचाच नीच मनुष्य व दुर्गुणी व अयोग्य चालीचा होता. यास्तव त्याणी किषवरखानाचे संबंधी मंडळीस पीडा करणें आरंभिलें. पूर्वीं किषवरखान याणीं आपलेकडील सेवकलोकांपकीं एक सेवक याकुतखान या नांवाचा हापसी जातीचा पूर्ण विश्वासुक होता त्याजला पादशाहाचे चाकरीवर नेमिला होता. त्या सेवकास येखलासखान याणी आधीं धरून त्यास तोडून याचे शरीराचे तुकडे तुकडे केले आणि ते तुकडे शहरचे हरएक दरवाजावर पाठऊन दर दरवाजावर एक एक तुकडा बांधविला व ज्या ज्या ग्रहस्थाची योग्यता किषवरखान याणी वाढऊन पालन केलें होतें ते संपूर्ण ग्रहस्थ जीवें मारिले. किषवरखानाची बायकामुलें व त्याची मातुश्री व

त्याचे सेवकलोक धरून बेत ठरविला कीं, हलालखोर व चांभार वगैरे नीच जातीस तीं बायकामुलें व किषवरखानाची मातुश्री देऊन टाकावी. असा बेत ठरऊन त्या हलालखोर वगैरे मंडळीस बोलाऊन आणून कचेरींत हुकूम दिला कीं, 'किषवरखान याची बायकामुलें किल्यांत आहेत तीं आणून या हलालखोर वगैरे मंडळीस देऊन टाकू. कारण कीं, किषवरखान यांणी पादशाहा राणीचे माहालांतील चाकरीच्या वगैरे बायका धरून हरएक मनुष्यास देऊन टाकिल्या होत्या.' आपलेकडील मनुष्यांस हा हुकूम सिध्धीस नेण्याविषयीं वरचेवर ताकिद करीत होता. दर घटकेस फारच आग्रहास पेटत होता. त्या समई किषवरखानाचे बोलण्यास व इराद्यास बाध ठेवणारा होऊन या कामाची मनाई करणारा होईल असा कोणीच नव्हता. परंतु मीर रफिउद्दीन यांणीं ईश्वराचें संनिधान प्राप्त व्हावें यास्तव किषवरखानाचे बोलण्यास व करण्यास बाध ठेवण्याविषयीं सिध्ध झाला. त्याच्या करण्यास अडथळा करणारा होऊन बोलला कीं, 'किषवरखानानें अमार्ग वर्तणुक केली कीं पादशाही महालांतील कुणबिणी व चाकरीच्या बायका धरून असल जातीचे मनुष्यास वाटल्या व त्या लोकांनीं शास्त्राप्रमाणें त्या लोकांचे पालन केलें. या प्रकारची वर्तणुक केली. येणेंकरून सर्व पृथ्वींत किषवरखानाची अपकीर्ती झाली व सर्व मनुष्यांनीं त्याजला दूषण ठेविलें आणि या अमार्ग वागणुकीच्या कर्मास्तव किषवरखान ठार जाहाला. थोरले किषवरखानाचे स्त्रीनें या राजधानीचे संरक्षणार्थ प्राण वोवाळून टाकिला, म्हणजे जिवादारम्य श्रम केले. ती स्त्री धाकटे किषवरखानाचे बायकांसुध्धां, कीं ज्या स्त्रिया थोराच्या व कुलीनाच्या वंशाच्या आहेत त्यांजला, आपण तर चांभारांस व हलालखोरांस देऊन टाकिता. मनांत विचार करा कीं, या करण्यांत वाईटपणा व अपकीर्ती होईल.' असें बोलला तेव्हां येखलासखान या प्रकारचे भाषणावरून रफिउद्दीनावर अत्यंत क्रोधायमान होऊन बोलला कीं, 'धाकटा किषवरखान हरामखोर व दौलतीचे अकल्याण इच्छिणारा होता. त्याचें याहून अधिक पारपत्य करावयाजोगें आहे.' तेव्हां रफिउद्दीन बोलला कीं, 'किषवरखान केल्या कर्माचे फल पावले. परंतु किषवरखानाचे बायकामुलांकडे काय अपराध आहे? ईश्वराचे कांहीं तरी भय धरा. ईश्वराचे सेवकांचें तेज व आबरु राखा.' या प्रकारें बहुत बोलणें जाहाल्यानंतर तो वेळ टाळिला व रात्रीस महालाकडील सेवकांस ताकिद केली कीं, मोठे प्रातःकाळीं नीच जातीचे जमातीस व किषवरखानाचे बायकांस आणून हजर करून सदरहू असामी दरबारांत मंडळी जमलीं नाहीं तों आणून हजर करावी. कारण कीं, कचेरीचीं मंडळी जमलीं म्हणजे या करण्यास अडथळा करतील. याजकरितां कीं किषवरखानाच्या बायका कचेरींतील मंडळी जमली नाहीं तों त्या नीच जातीचे जमातीस देऊन टाकीन. अशी ताकिद केली. ही बातमी जेव्हां रफिउद्दीन याजला कळली तेव्हां त्याणीं सारी रात्र

जागेपणांत घालविली आणि मोठे प्रातःकाळीं येखलासखान येऊन पोहचण्याचे पूर्वी किल्यांत आला होता आणि कचेरींत हजर जाहाला. जेव्हां येखलासखान याणी कचेरींचे दिवाणखान्यांत येऊन रफिउद्दीन पूर्वींच येऊन बसला आहे असें पाहिलें तेव्हां येखलासखान याचा चेहरा उतरला आणि येखलासखानाचे चेहऱ्यावर क्रोधाचे चिन्ह प्रगट जाहालें, म्हणजे रफिउद्दीन याजला पाहून येखलासखान क्रोधायमान जाहाला. आपलेकडील लोकांस बोलला कीं, 'किषवरखानाच्या बायका आणा व हलालखोर वगैरे नीच जातीचे मंडळीस आणोन हजर करा, म्हणजे त्या बायका त्या नीच जातींचे मंडळीस देऊन टाकूं.' असें बोलला तेव्हां रफिउद्दीन पुन्हां मसलतीस प्रतिबध्धक होऊन पुढें येऊन बोलला कीं, 'ईश्वराची शफत, ही तुमची वर्तणुक मजला पसंत येत नाहीं. तुम्हांस हें कर्म योग्य आहे असें मला वाटत नाहीं. या गोष्टीस मी कदापि अनुमोदन द्यावयाचा नाहीं. हें कर्म कराल तर तुम्हांस ईश्वराची व पैगंबराची शफत आहे. हा संकल्प मनांत धरिला आहे तो निखालस सोडून द्यावा.' असें रफिउद्दीन बोलला, परंतु येखलासखान बहुत बदमस्त व गर्विष्टपणाविषयीं आग्रही होता. यास्तव रफिउद्दीन याजकडील मंडळीपैकीं एक ग्रहस्थ रफिउद्दीनास बोलला कीं, 'तुम्हांस काय कारण पडलें आहे. असें बोलण्याविषीं काय गरज आहे. कारण कीं, हा येखलासखान केवळ पिशाच्च अति क्रोधायमान, कीं त्याजला गर्वाची इतकी भुल पडली आहे कीं कोणासच मानित नाहीं. कोणीच त्याचे खातरेंत नाहीं, तुम्हीं उगाच कां अडथळा करितां? येखलासखानानें पाहिज तसें करावें व त्याचे कर्म तो जाणो' असें बोलला. तेव्हां रफिउद्दीन याणी त्याजला उत्तर दिल्हे कीं, 'या समई पादशाही दरबारांत असा कोणी मनुष्य नाहीं, कीं हरएक प्रकर्णी अकल चालवील. यास्तव मला बोलणें प्राप्त आहे. कारण कीं, अब्रु व तेज संरक्षण करीन. येखलासखान याणी कितीही मजवर राग केला तरी मी त्याचा उपाय करणार नाहीं. परंतु ही वाईट वर्तणुक करूं देणार नाहीं.' सारांश, रफिउद्दीन याणी ईश्वराचें संनिधान व पवित्र ईश्वराचे सांनिध्य प्राप्त होण्याकरितां, म्हणजे ईश्वर प्रीत्यर्थ, या प्रकर्णी बहुत यत्न व हल्ला करून येखलासखानास त्या दुष्ट संकल्पापासून फिरविला. नंतर रफिउद्दीन याणी थोरले किषवरखानाचे घरमंडळीस किषवरखानाचे घरीं रवाना केलें. धाकटे किषवरखान याच्या दोघी स्त्रियांचे समागमें दोन पुरातन सेवक देऊन त्या स्त्रिया त्यांचे बापाचे व भावाचे हवालीं केल्या, म्हणजे माहेरी पाठविल्या. बाकीचीं मनुष्यें जीं सेवेच्या उपयोगी होतीं तीं पादशाहाचे मातुश्री साहेबाचे म्हणजे चांदबिबीचे चाकरीवर ठेविलीं. दुसरे कित्येक वृध्ध व अशक्त होते ते मोकळे करून सोडून दिल्हे. थोरले किषवरखानाचा धाकटा पुत्र मंजलखान म्हणोन होता. त्याजला धरून आणिला. येखलासखाने याणी मजलखानाचे डोळे काढावे म्हणोन हुकूम दिल्हा. तव्हां रफिउ-

द्दीन यांणी त्याजलाहि, म्हणजे मंजलखानासहि शतावधी यत्नानीं त्याजला, संकटांतून सोडविला. अशा समयामध्यें अब्दुल मोमीन मोगलजादा मोगलाचे कुळीचा, कीं त्या मोगलास किपवरखान याणी अमीनखान असा किताब, म्हणजे रुतबा, देऊन मुस्तफा-खानाचे कामावर बंकापुराकडे पाठविला होता त्याचे पत्र येऊन पोचले. कारण कीं, तें पत्र त्या मोगलानीं आपला सरदार किपवरखान याजला लिहिलें होते. तें पत्र जेव्हां उलगडोन पाहिलें तेव्हां त्या पत्रांत लिहिले होतें कीं, ‘ बंकापुरचे कामांतून मोकळा जाहालो. हाली बेळगावचे किल्याकडे चालू होतो तेथील काम आटपून पनाळ्याचे किल्याकडे जाईन. तेथीलहि काम सत्वर आटपून थोडकेच दिवसांत हुजुर येऊन पोहोचेन. ’ जेव्हां कचेरींतील लोकांवर या गुप्त मजकुरानें उघडपणाचा पोषाख उघडला नाहीं म्हणजे कचेरींतील लोकांचे समजुतींत हा गुप्त मजकूर आला नाहीं. तेव्हां येखलासखान बोलला कीं, ‘ अमीनखान फौजेसुध्धां हरएक किल्याकडे जातो. यांतील कारण काय असेल, किपवरखानानीं त्याजला कोणती कामें करण्याकरितां कामावर नेमिला असेल, कीं अमीनखान याणीं तीं कामें शेवटास लाविलीं व शेवटास लावीन असें बोलला. ’ रफिउद्दीन पिराजी बोलला, ‘ किपवरखान याणी अमीनखान यास काय काम सांगितलें व काय हुकूम केला आहे ही जरी मजला खबर नाहीं तत्रापि या पत्राचे मजकुराचे सुचनेवरून असें समजुतींत येतें कीं, अमीनखान हा या शहरचे आसपास रहाणारे लोकांस जीवें मारण्याकरितां नेमिला आहे. तेव्हां तर मुस्तफाखान हा बंकापुरामध्यें मारला गेला. परंतु बेळगांवास मुस्तफा बंद असे म्हणतात. त्या बेळगांवास यास्तव जात आहे कीं, शाहा अब्दुल हसन व त्याचा भाऊ शाहा रफिउद्दीन हुसेन हे उभयता तेथें कैद जाहाले आहेत त्याजला जीवें मारण्याकरितांहि नेमिला असेल. नंतर अमीनखान पनाळ्या किल्याकडे जातो. यांतील कारण हें कीं, मुर्तजाखान आंजु व त्याचा भाऊ शाहा कासम हे उभयतां पनाळ्या किल्याकडे कैद जाहाले आहेत. कदाचित त्या उभयतांसहि जीवें मारण्या-करितां नेमिला असेल. ’ असें बोलला तेव्हां कचेरींतील लोकांनीं रफिउद्दीनाचें बोलणें सत्य मानिलें. येथपर्यंत कीं, अमीनखानाचा भाऊ मुर्तजाखान व त्याचा भाऊ या चौघांस जीवें मारण्यास चालू जाहाला नव्हता तोंच कालचक्राचें मनोगत पुन्हां उलटलें, म्हणजे जेव्हां अमीनखान हा किपवरखानाचे हुकुमावरून मुस्तफा-खानास कत्तल करून, म्हणजे जीवें मारून, परतला आणि लष्करात येऊन पोचत होता तों त्यापूर्वी मुस्तफाखानास हिंदु लोकांचे किल्यापैकीं एका किल्याचे तळास पकडून बंकापुरांत कैद करून परत हुजुर आला होता. तेव्हां खुदावंत म्हणून हापसी जातीचा हा त्या लष्करांत सरलष्कर होता. त्या सरलष्करानीं वर्तमान ऐकिलें कीं, अमीनखान हा मुस्तफाखानास जीवें मारून आला आहे. असें समजतांच खुदावंतखान याणी अमीनखानास धरून अमीनखान याचे शरीराचे

तुकडे तुकडे करून तें मांस कावळे व घारींस टाकिलें. येखलासखान यास हें वर्तमान कळल्यानंतर येखलासखान याणीं शाहा अबदुल हसन व शाहा रफिउद्दीन हुसेन व त्याचा पुत्र शाहा ताहर व शेख मुर्तजाखान आंजु व त्याचा भाऊ शाहा कासम याजला परत येण्याविसा आज्ञापत्रें बेळगांवास व पन्हाळ्यास पाठविलीं. तेह्मां सदर असामी अति त्वरित व सुरक्षितपणें व सुखरूपपणें विजापुरास आले.

## ९. निजामशाहाची मोड झालेली फौज पुन्हां जमून येऊन अफजलखानावर चालून जाणें व अफजलखान याणीं विजापुरास जाणेंकरितां माघारे परतणें :

यापूर्वीं किषवरखान याणीं कुतुबशाहा व निजामशाहाची फौज घालऊन देण्याकरितां लष्कर तयार करून अफजलखान सरलष्कर याजसमागमें तें लष्कर रवाना केलें होतें. तेव्हां अफजलखान याणीं ईश्वराचे साह्याचे योगानें नऊ रोजांत दोन वेळ शत्रूवर चालून जाऊन यशस्वी व विजयराज जाहाला होता. यानंतर आदिलशाची फौज विस्कळित होऊन कांहीं फौज किषवरखानाचे समागमें गेली व कांहीं फौज किषवरखानाचे पारपत्याकरितां विजापुराकडे आली व कांहीं मुस्तफाखानाचे कामावर बंकापुराकडे नेमिली गेली. अफजलखानापाशीं फारच थोडी फौज राहिली होती. अशा समयांत संधी साधून निजामशाहाची फौज मोडलेली पुन्हां जमून आदिलशाहाचे फौजेवर चालून आली. तेव्हां त्या फौजेपुढें आपले धैर्य ठरत नाहीं असें समजून अफजलखान विजापुरास माघारा आला.

## १०. ऐनुलमुल्क याणीं ह्पसी लोकांस कैद करणें आणि बेड्या ठोकणें प्रकर्ण :

अद्यापि पेशवाईचें काम कोणाकडे ठरलें नाहीं तोंच चाकरलोक इच्छित होत कीं, पेशवाईचें कामावर त्यापैकींच कोणी मालक असावा. दक्षणी लोक व दुसरे अमीरलोक ऐनुलमुल्क यास पेशवाईचें काम असावें म्हणोन राजी होते. शाहा अबदुल हसन व मुर्तजाखान आंजु याणीं खुद आपल्यासच पेशवाईचें काम व्हावें यास्तव बहुत संकट भोगिलें होतें. जेव्हां या कारभारी लोकांमध्यें पेशवाईचे कामाबद्दल आपआपणांत वाकडे आलें होतें व जो तो मलाच पेशवाईचा कारभार मिळावा म्हणोन बोलूं लागला म्हणोन निरोपाय जाहाला या कारणांनीं राजधानीचीं

कामें खास त्वरित उलगडेनासीं झालीं. ऐनुलमुल्क याजपाशीं संपूर्ण अमिरलोक सर्व कारभाऱ्यांपेक्षां फौजेची तयारी व सामानाची पूर्ण मजबुती होती. याजकरितां हरएक कामदार व कारभारी लोक नित्य ऐनुलमुल्क याचे कचेरींत हजर होत होते. तेव्हां एके दिवशीं ऐनुलमुल्क याणीं संधी साधून सेवकांपैकीं चार सेवक यखलासखान, हमीदखान, दिलावरखान हापसी व शहराबखान तुरकी या चार सेवकांस, कीं हे चौघेहि सेवक श्रेष्ठ अमीरींचे व श्रेष्ठ दौलतदारीचे पदवीस पावले होते यांजला, पकडून कैद केलें. पायांत बेड्या ठोकल्या. बाकीच्या लोकांवर कामगार नेमिले. ऐनुलमुल्क याजला चौघांचे भय कितीकसें होतें. जरी ही जमात हापसी व तुरकी व हिंदु मिळोन एक हजार सेवक होते परंतु हे संपूर्ण लोक जवानमर्द, शूर, धैर्यवान व घोड्यासुध्धां तयार होते. हे संपूर्ण लोक आपआपणांत एकदिली व एक विचारानें वागत होते. निरंतर कारखान्यांतील कामावर नेमिलेले होते. कारखान्यांतील कामगारांशीं बहुत स्नेह ठेऊन बहुत दौलतीस चढलेले होते. चौघांचे बोलण्यावर कामाच्या वेळेस तीन चार हजार मनुष्यें शूर व जवानमर्द, कीं तेहि दहा पंधरा हजारावर हुकुम ठेवीत होते व ते जमत होते. याजकरितां या जमातीचे भय बहुत वागऊन ऐनुलमुल्क इच्छित होता कीं, या जमातींतील मुख्य कामदारांस घालऊन देऊन हरएकास किल्यावर कैद करण्यास पाठवावें. कारण कीं, े लोक हुजुर नसावे आणि आपणच स्वस्थपणें व निर्वैरपणानें मुख्य वकिलीचें कामावर प्रबल व्हावें.

## ११. मकसुदखान याणीं ऐनुलमुल्काचे कैदेंतून हापसी लोकांस सोडून देणें आणि पुन्हां कामावर जाणें :

जेव्हां निजामशाहाकडील लोकांस आदिलशाहाकडील फौज परागंदा व विस्कळित झाल्याचें व आदिलशाहाचे राजधानींतील कामाचा बखेडा झाल्याचें वर्तमान कळलें तेव्हां निजामशाहाचा सरलष्कर बेहजादुलमुल्क याणी आपली फौज विसकटली होती ती जमा करून महंमद कुली कुतुबशाहाचे फौजेसहित, कारण कीं कुतुबशाहा त्याचे थोडक्येच दिवसांत तेलंग देशचे राज्य हस्तगत करून तेथील तख्तावर बसला होता तो कुतुबशाहा तेथे संनिध होता त्याचे फौजेसुध्धां, त्वरित येऊन आदिलशाहाचे फौजेचा पाठलाग केला. जेव्हां संनिध येऊन पोचले तेव्हां जे अमीरलोक फौजेसुध्धा कोटाचे बाहेर उतरले होते ते कोटाचे आंत आले. फार धांदल झाली. तेव्हां फौज व अमीरलोक येऊन उतरण्यास्तव जाग्याची तजवीज करण्याकरितां अफजलखान यास आंत पाठविलें. तेव्हां ऐनुलमुल्क व आंकुमखानहि आंत येऊन नाकेबंदी

करते झाले. चार अमीर लोक पकडले होते त्यांजलाहि मेण्यांत बसऊन समागमें घेतलें. अशा समयांत सेवक लोकांची जमात, कीं जी दांडगेपणानें व कपटानें सिध्द होती त्या जमातीनें किल्यावरील मुख्य कामदार दस्तुरखान होता, तो ऐनुलमुल्कासी स्नेह ठेवीत होता. या दोषास्तव त्या दस्तुरखानास धरून कैद केला आणि आर्क किल्याचा दरवाजा बंद करून युध्धाविषयीं तयार जाहाले. पादशाहाचे सेवक लोकांपैकीं एक सेवक, कीं त्याचें नांव मकसुदखान असें होतें तो, घोड्यावर बसून निघाला व कित्येक दुसरे सेवक लोक कितिएक हत्तीवर बसून व कितिएक घोडेस्वारहि त्याचे पाठीमागून रवाना जाहाले. जेव्हां आल्हेपुरचे दरवाजानजिक येऊन पोहचले तेव्हां चौघेहि कैदी अमीर लोकांसी दृष्टादृष्टी झाली. मकसुदखानाची नजर मेण्यावर पडतांच मकसुदखान याणीं अति त्वरेनें तेथें जाऊन ऐनुलमुल्काचे व मेण्याचेमध्यें प्रतिबध्धक, म्हणजे अडथळा करणारा, झाला. त्या चौघे कैदी लोकांस मेण्यांतून खालीं उतरून बेड्या तोडून त्यांजला घोड्यावर बसऊन किल्याकडे चालता झाला. पादशाहापाशीं आणून पोहचविल. एनुलमुल्क याणीं हा प्रकार अवलोकन केला तेव्हां खास जाणिलें कीं, पादशाहाचे सेवकांची ही जमात आप-आपणांत स्नेह ठेवितात व एकदिल व एक विचारानें आहेत. याजकरितां न जाणो कीं, कार्यभाव विपरित होईल असें जाणून एक पळभर देखील तेथें रहाणें नीट नोहे असें पाहून माघारा फिरला. गांवास जाण्याचा मार्ग धरिला. बाकीचे अमीर लोक व कारभारी लोकांस येखलासखानाचे सोबतीनें स्नेहानें वागण्यास मनाई करीत होता. येखलासखान यासी जे स्नेहानें वागले होते त्यांचा धिःकार करीत होता. तात्पर्य मिळोन फार दंगा उत्पन्न झाला आणि या राजधानींत बहुत धांदल व बखेडा झाला.

## १२. हलके मनुष्याचे सांगणें कबूल करण्यानीं अफजलखान याणीं कैद होणें :

याच समयांत जमात जमून जाण्यानीं, कीं जी जमात कांहींच खातरेंत नव्हती ती जमात, पुढें चालून आली आणि जमातींतील लोक बोलूं लागले कीं, ‘ पादशाहास विनंती केली कीं, अफजलखान जो बाहेर बसला आहे यांतील भाव समजुतींत येत नाहीं, कीं कोणते विचारांत व काय मसलतींत आहे. आतां या समईं उत्तम विचार तो आहे कीं, अफजलखानास धरून एकीकडे बसवावा, म्हणजे विघ्न टळेल ’ अशी विनंति केली. त्यावरून पादशाहा त्या मुर्खांचे मनोगतावरून बोलला कीं, ‘ बरें आहे. ’ महालाकडील कामदारांपैकीं इमामुलमुल्क म्हणोन संभावित

होता तो अफजलखानाकडे येऊन बोलला कीं, 'तुम्हांस पादशाहा बोलावितात.' त्यावरून अफजलखान उठला व चालता झाला. कांहीं पावलें चालला असेल तोंच त्याजला धरून एकीकडे नेऊन कैद करून बसविला. सारांश, चहूंकडून असे समय उद्भवले, म्हणजे उत्पन्न झालें, कीं कोणीकडूनच उत्तम विचाराची गोष्ट दिसोन येत नव्हती.

## १३. चांदबिबी सुलतान हिणें हापसी लोकांस कामावरून बरतर्फ करणें व वकिलीचें काम शाहा अबदुल हसन यास देणें :

पादशाहा या दंग्याचे व धांदलीचे समयांत खुद जातीनें चांदबिबी सुलतान इचे महालांत या संकट निवारणार्थ कशी मसलत करावी म्हणोन विचारावयाकरितां गेले आणि ह्याविषयीं मसलत व विचार ठरविते झाले. चांदबिबी तर त्या कामांत मोठी अकलवान होती. तिणें जाणिलें कीं, हा संपूर्ण दंगा व धांदल हरएक तर्फेकडून झाली आहे. हें संपूर्ण या सेवकांनीं कामाची वोढावोढ मांडली आहे व ज्याणीं त्याणीं आपणांसच कारभार व्हावा असें आरंभिलें या कारणास्तव असें झालें आहे. अमीरलोक, दक्षणी लोक व मुसलमान लोक हे हापसी जातीचे हुकुमास राजी नाहींत. हापसी लोकांचे बोलण्यावर विश्वास ठेवित नाहींत. शत्रुचे पारपत्या-विषई एकदिलपणानें व एक विचारानें वागत नाहींत. यास्तव विचार करून हापसी जातीचे अमीरलोकांस एकांतीं बोलाऊन सविस्तर वर्तमान त्याचें अंतकरणांत भरावयाजोगें चांदबिबी सुलतान हिणें सांगताच त्या हापसी जातीचे गर्विष्ठ व मुर्ख तीघे सरदारांनीं राजधानीचा कारभार सोडून देऊन आपण फटकून राहिले. तिघांहि सरदारांनीं मनापासून विनंति केली कीं, 'आपले मनांत ज्यास कारभार द्यावा असें नीट दिसत असेल त्याजला द्यावा आणि राजधानीचीं कामें चालवावी' अशी विनंति केली. यावरून चांदबिबी सुलतान हिणें अबदुल हसन व मुर्तजाखान या उभयतांस जवळ आणिलें. अबदुल हसन याजला वकिलीचें कामाचीं वस्त्रें देऊन राजधानीचीं कामें चालवीत होता.

## १४. अफजलखान याणीं ठार होणें व रफिउद्दीन सिराजी याणीं कैद होणें :

जेव्हां ही संपूर्ण जमात वाकडेपणावर होती व अफजलखान अकलवान व शहाणा होता यास्तव सर्वदा विचारांतच होते. सर्व लोकांनीं आपआपणांत करार

ठरविला कीं, अफजलखानास या दौलतींतील संपूर्ण लहान थोर मनुष्यें पक्केपणानें मान्य आहेत, म्हणजे अफजलखान असावा व त्याचें हुकुमांत आपण वागावें असे सर्वांचें मनांत आहे व मनापासून अफजलखानावर प्रीती करितात. जसें कामीलखान पेशवा म्हणजे मुख्य कारभारी होता व त्याचे विचारानें सर्व कामें होत होतीं व किषवरखान त्याचे आज्ञेंत राहून कामीलखानाचे हुकुमाप्रमाणें वर्तणुक करीत होता, हाली हापसी लोकांचीहि दृष्टी त्या कामावर आहे. परंतु अफजलखानाचें फार भय वागवितात. अफजलखानाचा कारभार आपणांस मिळावा अशी इच्छा करितात. हालीं त्या अफजलखानास कैद केला आहे. त्याजला दुःखप्रद भापणांनीं सर्प दंश करावयाचा आहे, म्हणजे त्याजला जीवें मारावयाचा आहे. नंतर अब्दुल हसन बोलला कीं, ‘अफजलखान ठार झाल्याशिवाय आमचे चित्ताची स्वस्थता व्हावयाची नाहीं. हापसी लोकांचेहि पारपत्य होत नाहीं.’ जेव्हां अफजलखानाचे दंग्यापासून मोकळे होऊं तेव्हां स्वस्थ अंतःकर्णानें राजधानीचें कामांत मन घालूं, असें बोलला. नंतर सर्व लोकांचा विचार अफजलखानास व अफजलखानाचे बंधूस जीवें मारावें असा विचार ठरला. तेव्हां रफिउद्दीन याजला कैद करण्याचा हुकूम घेऊन त्याजला धरून आणावयाकरितां कोणी एकास पाठविलें. त्यासमई रफि-उद्दीनाचे सेवकांनीं त्याजला हें भय जाणविलें होतें. तेव्हां ईश्वरी संकेत करून कसा योग घडून येतो हा पहावा म्हणाले. तेव्हां रफिउद्दीन हा एकटा मुतबख-खान्यांत मार्गप्रतीक्षा करीत बसला होता. अशा समयांत एकाएकीं तो गृहस्थ म्हणजे रफिउद्दीन याजला आणावयाकरितां पाठविला होता तो, येऊन बोलला कीं, तुझें स्मरण पादशाहा करीत आहे. हें श्रवण करून रफिउद्दीन मुठींत प्राण धरून म्हणजे भयाभीत होऊन घाबरून निघाला. पादशाहा त्यावेळेस दरवाजाचे बुरजावर बसले होते. तेथें पादशाहापाशीं रफिउद्दीनाकडील मंडळीपैकीं कोणी नव्हता. रफिउद्दीनाच्या मुसक्या बांधून पादशाहापाशीं आणिला. रफिउद्दीन आजपर्यंत हुजूर पादशाहाचे चाकरीवरच होता व खजिना व मुतबखखाना रफि-उद्दीनाचे हवालीं होता. रात्रंदिवस पादशाहापाशीं हजर होता व सर्व काळ पादशाहापाशीं भाषण करीत होता. असें असतां पादशाहा रफिउद्दीनास मुसक्या बांधून आणिलेला पाहतांच तात्काळ खुर्चीवरून उठले व अत्यंत क्रोधायमान झाले. कचेरींतील लोक रफिउद्दीनाचे लोक संपूर्ण वाकड्यावरच होते. त्या सर्वांनी पादशाहाची क्रोधायमान मर्जी पाहून शिपायांस इशारा केली. त्याजवरून शिपायांनीं रफिउद्दीनास तेथून ओढून कैदखान्यांत आणिला. रफिउद्दीन जेव्हां कैदखान्यांत येऊन पोंहचला तेव्हां आपला बंधु अफजलखान, हा कैदेंत होता, त्याची अवस्था पाहिली तों लोखंडाची बेडी गळयामधें व हातांत व पायांत भारी वजनाची मजबूत घातलेली असा बसला आहे. या योगानें असा अपमान झाला कीं, तसा कोणाचाच

झाला नसेल. याहून अधिक अपमान पुढें कोणाचाहि होणार नाहीं असा झाला. आकाशापासून पृथ्वीपर्यंत अशी गोष्ट कधीं घडली नाहीं अशी या समईं ईश्वरसत्तेनें प्रारब्धयोगानें घडली. यानंतर रफिउद्दीन याणीं पाहिलें तों लोहार बसले आहेत आणि लोहारांनीं जो पोषाख माझे बंधूचे, म्हणजे अफजलखानाचे, आंगावर पांघरविला आहे तोच मजलाहि पांघरवावा असें इच्छितात. त्याप्रकारें दिसोन आलें, म्हणजे या लोहारांनीं जसें माझे बंधूचे गळ्यांत, हातांत व पायांत बेड्या टोकल्या आहेत तशाच मजलाही ठोकितात असें दिसोन आलें. इतक्यामध्यें एकाएकीं एक मनुष्य तेथें दारांतून आंत आला. त्याणीं अफजलखानास बोलाविलें. त्यावरून अफजलखान उठोन उभा राहिला. ईश्वराचे आज्ञेस मी राजी आहे असें बोलला आणि बाहेर गेला. तों त्याजला मारून त्याचे शरीराचे तुकडे तुकडे केले व ते तुकडे बाजारांत नेऊन टाकिले. त्या मार्गानें जो मनुष्य येत होता तो ते पाहात होता आणि बहुत खेद करित होता. पुरते न्याहाळून पाहात होता. एक दिवस आणि एक रात्र तें अफजलखानाचें प्रेत बाजारांत पडलें होतें. अफजलखानाची आप्तविषयीं मंडळी कित्येक कैदेंत होतीं व कित्येक छपून राहिली होती. दुसरे दिवशीं शाहा फतेवुल्लाह शिराजी याचे शागीर्दानें तें प्रेत बाजारांतून उचलून नेलें आणि त्या प्रेतास स्नान घालून त्याचें कफन दफन वगैरे केलें. अफजलखान वारल्याची तारीख अबजदचे हिशेबानीं 'मजलुम' या अक्षरांत निघते व 'मजलुम' या अक्षरांतील दिल म्हणजे मध्यभागाचे अक्षर लाम आहे तें या अक्षरानें बदल होतें. सदरहू अक्षरें अबजदचे हिशेबानीं गाणिलीं असतां नऊशें आठ्यैशीची बेरीज येते, म्हणजे नऊशें आठ्यैसी हिजरी सनांत ( १५८० इ. स. ) अफजलखान मारला गेला ही तारीख निघते. यानंतर रफिउद्दीन याजलाहि जीवें मारण्याचा हुकूम कामगारांनीं घेतला. परंतु ईश्वराची कृपा यावर होती. आयुर्दाय अवशेष राहिला म्हणोन वांचला. कित्येक कामदार मंडळींचे रदबदलीचे योगानें तो प्राण जाण्याचे संकटापासून सुटला व मोकळा होऊन पहिलेच कामावर कायम झाला. तीस वर्षेपर्यंत सुलतान इब्राहिम पादशाहाचे सेवेंत अब्रूनें व योग्यतेनें दिवस घालविले. कोणीहि रफिउद्दीना-विषयीं सरकारांत वाकडेपणाचा मजकूर समजविला असतां सरकारांनीं मनावर घेतला नाहीं. दिवसेंदिवस श्रेष्ठ कामें त्याजला प्राप्त होऊन पादशाहापासून योग्यता पावत होता. विजापूरचे राजधानीचे कामांत पंधरा सोळा वर्षेपर्यंत कायम राहिला.

१५. हापसी अमीर लोक येखलासखान, हमीदखान व दिलावरखान या तिघांहि अमीर लोकांनीं शाहा अबदुल हसन यासी एक विचारानें

राहून दौलतींतील कारभार करून शेवटीं या तिघानीं शाहा अबदुल हसन याजला धरून कैद करणें प्रकर्ण :

जेव्हां सदरहू हापसी लोक ऐनुलमुल्क याचे साह्यानीं कैदेतून सुटले तेव्हां ऐनुलमुल्क याणीं एक सेवक लोकांचा एक विचार पाहून भयाभीत होऊन गावास निघोन गेला. नंतर कामाचे व कारभाराचे मुख्त्यारीची सत्ता हापसी लोकांचे हातीं आली. मुलकी व मालीचे कामाचें पद येखलासखान याजला झालें. ही अमीर लोकांत श्रेष्ठ पदवी प्राप्त होऊन राजधानीचा कारभार मुख्त्यारीनें करूं लागला. कोणतीहि मसलत ठरूं लागली म्हणजे हमीदखानाचा विचार घेतल्याशिवाय ती मसलत ठरत नव्हती. अमीरलोक एक विचारें राहून पादशाहाचे आज्ञेंत वागून शाहा अबदुल हसन याचे विचारें राजधानीचीं कामें करीत होते व शत्रुचें पारपत्य करीत होते. असा कामाचा प्रारंभ चालला होता तों अशा समयांत शत्रुलोकांनीं आदिलशाहा पादशाहाचे राजधानीविषयीं वाकडेपणाची दृष्टी ठेऊन दांडगेपणानें विजापुराचेसंनिध येऊन उतरून नित्य शहरचे दरवाजाचे आसआप येऊन युध्ध करीत होते. आदिलशाहा पादशाहाचे खासे सरखेल मंडळीखेरीज तीन हजार मनुष्यें चिलखत बखतरवाले हरएक तीन हजारहि शूर होते व ते सर्व पादशाही चेल्यापैकीं होते. यापरती दुसरी जमात विजापुरांत नव्हती. येखलासखान मोठा शूर, धैर्यवान व पराक्रमी पुरुष होता. याणीं दररोज जमात घेऊन निर्भयपणें या शूर लोकांवर चालून जात होता आणि रुस्तुमासारखा युध्य करीत होता. दर हल्लेंत शत्रुकडील जमातीच्या जमाती तरवारीनें ठार मारीत होता. आणि शहर-लोकास शहरचे कोटापासून घालऊन देत होता. इतक्यामध्यें प्रारब्ध योगानें येखलासखान याचें हातावर जखम झाली. त्या योगानें हात कामांतून गेला होता. नंतर तरवार देखील उचलेनासी झाली. सबब जखमी होऊन घरीं बसला व औषध उपाय करण्यांत निमग्न झाला. तेव्हां दुसरे लोकांच्या जमातीच्या जमाती बाहेर चालून जात होत्या. नित्य धैर्य धरून युध्ध करीत होत्या. बहुत दिवस या प्रकारचे दिवस गेले तेव्हां शत्रु लोकांचे मनांत खास आलें कीं, किल्ला फार मजबूत व बहुत बंदोबस्तीचा आहे. यास्तव आपला डावाचा पाश या लोकांवर चालू होत नाहीं व कार्यभाव घडून येत नाहीं असें जाणिलें तेव्हां अत्यंत खिन्न होऊन शहर विजापुरची आस्था सोडून आपपासचे मुलकांत जाऊन लुटालुट करणें आरंभिले व लुटून खराब करणें व निखालस फडशा करणें चालविलें. हाजी किफवरखान हा विजापुराहून पळोन जाऊन अहमदनगर येथेंहि कोठेंच न राहतां गोलकुंड्याकडे जाऊन राहिला होता. अशा समयांस कुतुबशाहाचे लष्करांत मिळोन संकट उत्पन्न करणारा व अयोग्य मसलती शिकविणारा होता. त्या वर्षांत किफवरखान याचे अयोग्य मसलत

शिकविण्यानें विजापुरचे आसपासचे गांवोगांवची बहुत खराबी झाली. कित्येक दिवसानंतर परजन्यकाळ प्राप्त झाला. यामुळें शत्रुच्या फौजा आपआपल्या गांवास निघोन गेल्या. हापसी तिघे अमीर लोक कित्येक दिवस मित्रतेनें व एक विचारानें राहून राजधानीचा कारभार करित होते. हुजुर जे तुरकी लोक व दुसरे अमीर लोक रहात होते त्यांजला व दक्षिणी लोकांचा बहुत समुदाय जमला आहे व हे लोक मजबूत झाले आहेत असें जागून सदरहू हरएक लोकांस जागोजागचे किल्याचे बंदोबस्ताचे कामावर नेमून फुटाफूट करून पाठविले. मकसुदखान म्हणोन एक सरदार त्या जमातीपैकींच होता व या मकसुदखानानींच त्या तिघा हापसी अमीर लोकांवर बहुत उपकार करून कैदेतून मोकळे केलें होते. कित्येक दिवस ते तिंघे अमीर लोक मकसुदखानाचा उपकार जाणित होते. शेवटीं मकसुदखानाविषयीं मनांत अंदेशा आणून त्याचे पारपत्याविषयीं सिध्द झाले. कित्येक दिवस शाहा अबदुल हसन याचे विचारानें वर्तणुक करून शेवटीं त्याचाहि अंदेशा व भय चित्तांत आणिलें. कारण कीं, शाहा अबदुल हसन हा आपली संधी पाहात होता आणि त्याणी चितांत संकल्प धरिला होता, कीं या हापसी लोकांचे पारपत्य करून आपणच पेशवाईचें कारभारावर श्रेष्ठपणानें मजबूत व्हावें. हापसी लोकांस त्याचे चित्तांतील भाव संपूर्ण कळला तेव्हां धैर्य धरून चालून जाऊन शाहा अबदुल हसन याजला धरून कैद करून किल्यावर पाठविला. नंतर दुसऱ्याचे साह्य न इच्छितां स्वतां ते हापसी अमीर लोक राजधानीची कामें चालवित होते. या तिघांहि अमीर लोकांमध्यें दिलावरखान हा मोठा अकलवान, संभावित, वृध्द व योग्य पुरुष होता. मोठा लिहिणार होता. हमीदखान हा भोळसर पुरुष व नेकचालीचा व दयावंत पुरुष होता. हमीदखानाचे योगानें त्या समयीं सागर या देशांत बिनअपराधी लोक येखलासखान याचे संकटापासून बहुत बाचले. हमीदखान नसता तर येखलासखान याचे हातून बहुतेक मनुष्यांचे घरांची खराबी जाहाली असती. सारांश या तिघाही हापसी अमीरलोकांनीं आपआपणांत विजापुरचे मुलकाचे तीन हिसे करून तिघांनी वाटून घेऊन दोन वर्षेपर्यंत याचप्रकारें एक विचारें कारभार केला.

**१६. कुतुबशाहाचा सरलष्कर मिर जंबल ( मीर जुमला ? ) याणी आदिलशाहा पादशाहाचे सरहादींत फौज घेऊन चालून येणें, आदिलशाहा पादशाहा यानीं दिलावरखान सरलष्कर याजसमागमें फौज देऊन त्याचें पारपत्यावर पाठवणें प्रकर्णी वर्णन :**

अशा समयामध्यें महंमद कुली कुतुबशाहा याणीं आपली तयार जाहालेली फौज सरलष्कर मिर जंबल ( मीर जुमला ? ) इस्तराबादी याजसमागमें, कीं तो

सरलष्कर सांप्रत मुस्तफाखान या पदवीनें प्रसिध्ध आहे त्याजबरोबर, देऊन आदिलशाहाचे सरहादींत पाठविली आणि फंद फितुराचे संकट उत्पन्न करिता झाला. तेव्हां या शत्रूचें पारपत्य करणें व मुलुक संरक्षण करणें यास प्राप्त आहे. यास्तव त्या तिघांहि हापसी लोकांनीं पादशाहाकडून ऐनुलमुल्क व आंकुसखान व दुसरे कित्येक अमीरलोक, कीं जे हवालदील परागंदा जाहाले होते, त्यांचें नांवें अभयरूप आज्ञापत्रें घेऊन पाठविलीं. हरएकाचे पूर्वापार इलाक्याचे गांव होते ते त्यांचे त्यांजकडे बाहाल केले. या करणेनें जेव्हां हरएक अमीरलोकांस अभय व आधार मिळाले तेव्हां सर्व अमीरलोक हुकुमाप्रमाणें फौजेसुध्धां संपूर्ण सरकारांत येऊन जमले. तेव्हां आदिलशाहा पादशाहा यांणीं येखलासखान याचे विचारानें अमीरलोकांस सरलष्कर दिलावरखान याजसमागमें फौजेसुध्धां कुतुबशाहाचे पारपत्य करण्याकरितां सरहादींत रवाना केलें. येखलासखान खुद जातीनें कित्येक फौजेसुध्धां हुजूर सेवेंत राहिला. दिलावरखान जेव्हां शत्रुचे फौजेसंनिध जाऊन पोचला तेव्हां पाहिलें तों शत्रुची फौज अडचणीचे जागीं व बंदीचे स्थानीं दोन पर्वताचे मध्यभागीं आश्रय धरून राहिली आहे आणि लाकडाचा कोट असा बांधिला कीं, परक्याचे फौजेस त्यांतून रिघाव होणें कदापि घडूं नये. असा कोट मजबूत बांधून त्यांत शत्रु लोक राहिले आहेत. परजन्यकालाचे दिवस येऊन पोहचले होते. युद्धाचे काम लांबणीवर पडलें. सहा महिनेपर्यंत उभयतांचीहि फौज बरोबरीनें उतरली होती. सहा महिने झाले. नंतर दिलावरखान यांनीं उतम प्रकारची मसलत करून शत्रूचे फौजेचे आसपास घेरा दिल्हा. आणि त्या फौजेवर सर्वोपरी बंदी केली. असें संकट उभे केलें कीं, शत्रु लोकांस त्या जागीं रहाण्यास धैर्य धरवेनासें झालें. तेव्हां निरोपाय होऊन रात्रीचे समयीं कूच करून आपले मुलुकाचा मार्ग स्वीकारिते झाले, म्हणजे आपले मुलखास निघोन जाते झाले. दिलावरखान यांणीं आदिलशाहा पादशाहाकडील अमीरलोकांसहित शत्रूवर चालून जाऊन पाठलाग करून शत्रूचे फौजेवर जाऊन पोहचला. शत्रु लोकांस यद्यपि युध्धापुढें टरण्यास भयाभीत झाले होते तत्रापि या वाक्याप्रमाणें करिते झाले: पारसी बैतचा अर्थ: "संकटाचा समय येऊन पोचून पळण्यास मार्ग नाहींसा झाला म्हणजे तो मनुष्य निरुपाय होऊन तरवारीस हात घालून, म्हणजे उपसोन, प्राणावर उदार होतो," तसें झालें, आणि जंगे गुरजी, म्हणजे धाव घालून येऊन हल्ला करून आणखी पळून जावे व पुन्हां आणखी परतून येऊन हल्ला करावा या प्रकारचे युध्धास जंगे गुरजी असें म्हणतात असें, युध्ध करून अरण्यांत शिरले. तेव्हां सायंकाळपर्यंत हत्ती व घोडे बहुत सामान सरंजाम आपले प्राण वाचविणेंकरितां देऊन शत्रु लोक अरण्यांत शिरोन आपला प्राण वाचविते झाले. आदिलशाहा पादशाहाकडील अमीरलोकांचे हातीं लुटीचे एकशेंवीस हत्ती सांपडले व घोडे व दुसरा सामान सरंजाम सांपडला त्याची गणती नव्हती. हमीदखान

याजकडील लोकांत व येखलासखान याजकडील मनुष्यांत एका हत्तीबद्दल कज्या लागला. शेवटीं त्या कज्याचे योगानें परस्पर चाकर लोकांत युध्धारंभ झाला. दिलावरखान याणीं दुसरे दिवशीं पादशाहाकडे विनंतीपत्रें पाठविलीं. येखलासखान याणीं जेव्हां वर्तमान ऐकिलें व विनंतीपत्रांतील भाव जाणिला कीं, आतां दिलावरखान त्वरित निघोन हुजुर येऊन पोचेल. येखलासखान याचे मनांतील भाव होता कीं, दिलावरखान याणीं हुजुर येऊं नये आणि आपण दुसरे मनुष्याचें कोणी नसोन एकट्यानेंच राजधानीचा कारभार करावा. येखलासखान इच्छित होता कीं, किल्याचे बंदोबस्ताचे काम दिलावरखान याचे आप्तविषयीं मंडळीपैकीं त्याजकडील निसबतीचा हैदरखान म्हणोन होता त्याजकडे होते त्याजला बर्तर्फ करून येखलासखान आपणाकडील निसबतीचे लोकांपैकीं एका मनुष्याकडे तें काम नेमिलें. तेव्हां या कारणास्तव दिलावरखान याचें नावें आज्ञापत्र पाठविलें. त्या आज्ञापत्रांत हा मजकूर होता कीं, दिलावरखान याणीं फौजेसुध्धां कांहीं दिवस तेथेंच मुक्काम करून रहावें, म्हणजे वारंवार फौजा आणविणेंविषयीं पत्रें येणार नाहींत. यास्तव दिलावरखान याणीं तेथून निघो नये व लुटीचे हत्ती अमीरलोकांचे हातीं लागले आहेत तितके हुजूर रवाना करावे असा मजकूर होता. दिलावरखान याणीं हें आज्ञापत्र पोह्चल्यानंतर सर्व अमीरलोकांस जमा करून हें आज्ञापत्र सर्वांस वाचून दाखविलें आणि बोलला कीं, तुम्ही या पत्रांतील येखलासखानाचे मनांतील कांहीं भाव समजला कीं काय ? या आज्ञापत्रांत येखलासखान याचे मनोभावांतील याशिवाय कांहीं अभिप्राय दिसत नाहीं कीं तुम्हांसी मी कज्या करावा आणि माझ्यांत व तुमच्यांत वाकडेपणा यावा व मी येथें रहावें हुजुर येऊं नये आणि आपण मी इकडे आलो अशी संधी पाहून मजकडील हैदरखान म्हणोन होता त्याजला किल्याचे कामावरून बर्तर्फ करून येखलासखान याणीं आपले निसबतीचे लोकांपैकीं कोणी एका मनुष्यास किल्याचे बंदोबस्ताचें काम देऊन आपण राजधानीचा कारभार करावा असें आरंभिलें आहे. ह्यास्तव या प्रकर्णी सर्व बंधुवर्गच आहांत. तेव्हां या प्रकर्णी तुमचे विचारास कसें येतें ? असें बोलला तेव्हां अमीरलोकांकडे लुटीचे हत्ती प्रवासामुळें होते व अरण्य आहे आणि आपण सर्व दिलावरखान याचे ताबेदारींत आहों असें पाहून हें वाक्य म्हणते जाले. पारसी मिसऱ्याचा म्हणजे बैतेचा अर्थ : "जे आपले विचारास आलें तोच आम्हां सर्वांचा विचार आहे. या समई जें आपल्यास योग्य दिसत असेल तसें करावें. आम्ही सर्वत्र आपले ताबेदारींत आहों." असें बोलले तेव्हां दिलावरखान बोलला कीं, दहा रोजाची वाट पांच दिवसांत चालून जाऊं. असें बोलून लागलाच घोड्यावर बसून येलगार करण्याकरितां चालू झाला. सर्व अमीरलोकहि फौज घेऊन त्यासमागमें गेले. नित्य दर मजलीस व दर मुकामी दिलावरखान याजला तेथेंच राहावें कोठें जाऊं नये अशा मजकुराची

आज्ञापत्रें येत होतीं. असें असतां दिलावरखान याणीं तें कांहींच मनावर न घेतां मार्ग चालण्यांत बहुत त्वरा करित होता. विजापुरापासून तीन कोसावर पादशाहाकडील संभावित सेवक लोकांपैकीं एक ग्रहस्थ दिलावरखान याजला भेटून बोलला कीं, पादशाहाची आज्ञा अशी आहे कीं, उदईक आपण शहरांत यावें. कारण कीं, आज भेट घेणें व शहरांत येणेंस दिवस चांगला नाहीं. असें बोलला तेव्हां दिलावरखान बोलला कीं, 'माझा मुहूर्त व माझे कल्याणाचा तोच समय आहे कीं खावंदाचे चरण पहावें.' असें बोलून घोडा जलद हांकला आणि शहरांत येणेंविषयीं अति त्वरा केली. ही बातमी येखलासखान याजला समजली तेव्हां येखलासखान याणीं तात्काळ पादशाहापाशीं बंदोबस्त ठेऊन अमीरलोकांची व दिलावरखानाची समारंभानें भेट घेऊन शहरांत आले. येखलासखान व हमीदखान या उभयतामध्यें पहिले भेटींतच हत्तींबद्दल वाकडे आलें होतें तें अधिकच वाकडे आलें. येखलासखान याणीं दिलावरखान व हमीदखान हे उभयतां गांवास गेले होते अशी संधी पाहून उभयतांचे पाठीमागें सरकारचीं आज्ञापत्रें व हुकूम घेऊन सर्व कारभारियांपेक्षां अधिक मुलुक आपल्यास मिळविला होता आणि फौजहि बहुत जमली होती. सर्व कारभारी लोकहि एकमेकांचे साह्य करून अधिक मुलुक मिळविण्याकरितां बहुत फौज जमऊन अधिक मुलुक मिळवावा व येखलासखान याहून अधिक योग्यता व मुलुक मिळवावा असें करिते झाले. अशी बहुत आशा अधिकअधिकच मुलुक मिळवावे हा स्वभाव त्या कारभारी लोकांचे प्रकृतींत प्रबल झाला. यास्तव वैरभाव उत्पन्न जाहाला आणि स्नेह व मित्रता निखालस राहिली नाहीं. याणीं या कारभारी लोकांस कपटें व एकमेकांवर बदलणेंचे भाव उत्पन्न जाहाला आणि परस्परें एकमेकांचा अंदेशा येऊं लागला. सदरहू कारभारी लोक ज्या समयीं दरबारांत येत होते तेव्हां हरएक कारभारी लोक आपआपले जमातीसुध्धां हुषारीनें येत होते. संकट उत्पन्न करणारे लोक व कज्जे करणारे पुरुष कज्जे लावण्याकरितां व परस्परें विरुद्ध आणण्याकरितां एकमेकांत अग्नि प्रदिप्त करित होते, म्हणजे कज्जे लावित होते. एकमेकांचे चाकर लोक आपआपणांत दुर्भाषणें करित होते. बहुत वाकडे पडून युध्धाची व लढाईची तयारी होत होती. असें त्याचें भय प्राप्त झालें होतें कीं, किल्यांतच एकमेकांवर तरवारी चालवाव्या व एकमेकांत मोठी तोडातोडी होऊन प्राण घेणें प्रसिध्ध व्हावें असें झालें. येखलासखान याचा हमीदखानाकडे लुटीच्या हत्तींबद्दल मोठा तगादा होता व येखलासखान याणी फार मुलुक घेतला याबद्दल येखलासखानासी हमीदखान वाकडेपणा ठेवित होता. दिलावरखान या उभयतामध्यें कज्याचा अग्नि प्रदिप्त करित होता व केव्हां केव्हां मुलकाबद्दलहि येखलासखानाकडे तगादा करित होता. तात्पर्य मिळोन या करण्यानीं परस्परें वैरभाव उत्पन्न होऊन कामाचा संतोष मोडून राजधानीचा कारभार संकटावर पडला, म्हणजे बखेडा झाला.

१७. येखलासखान याजला कामांतून काढण्याविषयीं दिलावरखान व हमीदखान याणीं एकत्र होऊन एक मसलत करणें व भांडण व युध्द जाहाल्यानंतर येखलासखानास दोन महिने कैद करणें :

येखलासखानास कामावरून काढून देण्याबद्दल उभयतांनीं म्हणजे दिलावरखान व हमीदखान याणीं एक विचार केला व येखलासखान याणी आपआपणांत मुलुक बरोबर वाटून घेतल्याशिवाय किल्यांत येऊं नये म्हणोन ठराऊन येखलासखानास किल्ल्यांत येण्याविषयीं मनाई केली आणि दिवसेंदिवस अधिकअधिकच युध्याचे सामान जमवीते झाले. येखलासखान याणी शस्त्रें तोफा व बंदुकी व गोलंदाज वगैरे शहरचे कोटावरून खालीं उतरून आणून किल्याकडे निपाण धरून जागोजाग रचना केली. रस्ते बंद करून नाकेबंदी केली. दिलावरखान व हमीदखान हे उभयतांहि किल्याचे दरवाजांत बसून शस्त्रांची तयारी करून सिध्ध झाले. हैदरखान याणीं किल्यावर तोफा डागणारे व बंदुकी मारणारे ठेऊन तोफांची व बंदुकीची तोंडें येखलासखान याचें घराकडे करून नित्य हरएक तर्फेकडून, म्हणजे येखलासखान व दिलावरखान ह्या उभयतांकडून, तोफा व हत्यारें चालू होऊन युध्ध होत होतें. या उभयतांचे युध्धांत गोरगरीब मनुष्यें, फकीर, रयत लोक वगैरेंची बहुत पायमाली व खराबी होत होती. असेच एके दिवशीं मौलाना महंमद इस्तराबादी हा एके सौदागराचे दुकानीं बसला होता तोंच एकाएकीं येखलासखान याजकडील तोफेचा एक गोळा मौलाना मशारनिल्हे याचें सेवकापैकीं सहा असामी चाकरांवर येऊन पडला. यायोगें ते चाकर लोक एकमेकांवर पडून शरीराच्या ठिकऱ्या ठिकऱ्या होऊन ठार जाहाले. असेच एके दिवशीं औषध विकणाराकडील पांच असामी सेवक एकापुढें एक असे बसले होते. एक तोफेचा गोळा येऊन त्या गोळ्यानें त्या पांची सेवकांस त्याचे शरीराची हाडें कोणीकडे नेऊन टाकिलीं त्याचा ठिकाणा नाहीं. नित्य या प्रकारें खराबी होत होती. शेवटीं दिलावरखान व हमीदखान याणी येखलासखानासी साह्य म्हणजे सख्य करावें असें ठरऊन विचार करिते झाले कीं, एखादे कारण उपयोग केलेंले पाहिजे. ह्यास्तव मसलत ठरविण्याकरितां संभावित मनुष्यांपैकीं चार ग्रहस्थ सरज्याह, शेख सालीम, मौलाना दोस्त महंमद रफिउद्दीन षिराजी या चौघांस येखलासखान याजकडे पाठऊन निरोप सांगितला कीं, या समई तर शत्रु लोक संधी पाहून सरहादीवर येऊन उतरून मार्गप्रतिक्षा करित आहेत, कीं या राजधानींत एखादे संकट उभे रहावें व एकाएकीं हला करून ही राजधानी हस्तगत करावी अशी वाट पाहाट बसले आहेत. तुम्हीं तर हें संकट उभे केलें आहे. दौलतीचे कल्याण इच्छिणारास योग्य नाहीं. न जाणो कदाचित राजधानींत एखादे संकट उभें राहील आणि सर्व मुलुक हातांतून जाईल. शत्रु लोक हसूं लागतील व

हें आपले कपाळीं अंतकालपर्यंत राहील. याजकरितां असें केलें पाहिजे कीं, आपण तिघे बंधु या दौलतींतील पालन केलेले आहों. ह्यास्तव आपण तिघेहि आपआपणांत मिळोन जितका मुलुक तिघांकडे मिळोन आहे तो भाऊ हिशाप्रमाणें वाटून घेऊं. आपण वडील बंधु आहांत. आम्ही आपले स्वसंतोषें एक लक्ष होन आपले स्वारी खर्चाबद्दल देतो. आपण हें संकट उभे केलें आहे तें विझवावें आपणास योग्य आहे. आमची सर्वांची सला व नेकनामी यांतच आहे. असा निरोप पाठविला. त्यावरून सदरहू चौघेही संभावित गृहस्थांनीं येखलासखान याचे घरीं जाऊन हा मजकूर सविस्तर मिष्ट भाषणांनीं व उत्तम प्रकारचे बोलण्यांनीं कळऊन हरएकानीं दौलतीचे कल्याणाचे इच्छेचे मार्गांनीं उत्तम प्रकारें बोध केला. यजमानाचें कल्याण इच्छिण्याची शर्त बजाविली. परंतु येखलासखान याणें या चौघांचेहि बोलणें किंचितहि मानिलें नाहीं. तो क्रोधायमान पंच्यानन, म्हणजे येखलासखान, या बोलण्यानें मार्गावर आलाच नाहीं. अधिकच क्रोधायमान झाला. शस्त्रें घेऊन, तयारी करून अधिकच युध्द करिता झाला. जे जे अमीरलोक दूर दूर होते त्यांजला विजापुरा-संनिध येवोन चाकर लोकांचे वर्तमान समजून घेतले. तेव्हां प्रथम बोध करण्याचे व दौलतीचे कल्याण इच्छिण्याचे मार्गांनीं येखलासखान याजकडील हरएकास व येखलासखान यासहि उत्तम प्रकारच्या नीती व उत्तम फल देणारे बोध शिकविते झाले. परंतु येखलासखान याचे माजुरपणा व दांडगेपणामुळें त्या अमीरलोकांचे शिकविण्याचे यत्नांस फळ आलें नाहीं. तसेच रात्रंदिवस दोन महिनेपर्यंत युध्द करित होते. चहूंकडील लोक व गावोंगावचीं मनुष्यें मिळोन तोफा व बंदुकी किल्या-कडे उडवित होते. यायोगें बहुत मनुष्यें खराब झालीं. शेवटीं दिलावरखान हा अकलवान मनुष्य, विचारवान व हितकारक होता. मनुष्यांस इजा होऊं नये ह्यास्तव बहुत संरक्षण करित होता. सर्व मनुष्यांवर बहुत मुरवतीनें लोभ करित होता. सर्वांसी सख्य ठेवित होता. सर्वांची अंतःकरणें दिलावरखानाकडेच होतीं. दिलावर-खान याणी येखलासखानाचे फौजेस पादशाहाकडून लालूच दाखविली, भय घातलें व आपलेकडूनहि बक्षीस देण्याचे व इजा देण्याचे लक्षणानें आशा व भय घातलें, म्हणजे येखलासखान याचे फौजेस सांगितलें कीं, तुम्ही पादशाहासी बदलून वागल्यास पादशाहाकडून व मजकडून बहुत सजा मिळेल, म्हणजे पारपत्य केलें जाईल. पादशाहाचे हुकुमांत वागल्यास पादशाहाकडोन व मजकडून बहुत बक्षीस मिळेल, असे भाव दाखविले. तेव्हां येखलासखान याची फौज एकाएकीं शहरचे दरवाजांतून, म्हणजे वेसींतून, बाहेर पळोन गेली. परंतु त्यापैकीं कांहीं लोक, कीं जे पूर्वापार येखलासखानाचे हुकुमांत वागत होते ते, येखलासखान याजपाशीं राहिले. मुनुलमुल्क व आंकुसखान हे उभयतांहि प्रथमच येखलासखान याचे घरापाठीमागें येऊन उतरले होते. तेथून निघोन दिलावरखान व हमीदखान याजपाशीं येऊन

पोहचले. दिलावरखान याणी आपली तयार झालेली फौज घेऊन निघोन येखलासखानाचे घरासंनिध येऊन रात्रीं तेथें मुकाम केला. कांहीं जीं मनुष्यें येखलासखान याचे सेवेंत राहिलीं होतीं तीं सर्व मनुष्यें ही अवस्था पाहून पळून गेलीं. येखलासखान एकटा राहिला. येखलासखान हा त्याच रात्रीं आपले पुत्रासहित कोणास बातमी न कळूं देतां हमीदखान याचें निजावयाचे जागीं आला. तेव्हां दिलावरखान याजला नीट वाटणार नाहीं या भयास्तव येखलासखानाचें वर्तमान ऐकून घेण्याकडे लक्ष दिल्हें नाहीं. येखलासखानास हमीदखान इतकें मात्र बोलला कीं, खातरजमा असूं द्या. तुम्हांस दगा व्हावयाचा नाहीं. परंतु तुम्हांस दिलावरखान मक्केस घालऊन देतील. असें भाषण ऐकून येखलासखान पुर्ण भरंवशानें आपले जाग्यावर आला. दुसरे दिवशीं दिलावरखान याणी शहरचे वेसीवर हुकूम सांगून पाठविला कीं, वेसींतून येखलासखानास बाहेर जाऊं देऊं नये. असा हुकुम देऊन आपण स्वतां हमीदखानासहित मोठे ऐश्वर्यानीं व बहुत डौलानीं घोड्यावर बसून येखलासखानाचे दरवाजापुढोन चालून जाऊन दरबारांत आला आणि पादशाहास मुजरा केला. अशा समयांत खबर येऊन पोहचली कीं, येखलासखान हा पुन्हां हमीदखानाचे घरीं येऊन बाहेर बसला आहे. अशी बातमी कळतांच दिलावरखान याणी पादशाहाकडील हुजऱ्यास पाठऊन येखलासखान याजला निरोप कळविला कीं, तुम्ही आपले घरास जाऊं नये. मक्केस जाण्याची तयारी केली म्हणजे आम्ही पादशाहाकडून बहुत मेहरबानगीनें मक्केस जाण्यास तुम्हांस निरोप देववितो. असा निरोप पाठविला. त्यावरून येखलासखान याणे आपले घरीं जाऊन मक्केस जाण्याची तयारी करून निरोप घेऊन मक्केस जाण्याची त्वरा करून चालता झाला. तेव्हां अहंमदखान म्हणोन खजिन्यावरील कामदार होता त्यास कित्येक शिबंदीसुध्धां येखलासखानाबरोबर नेमिला. जेव्हां मुर्तजाबाद येथें जाऊन पोहोचला तेव्हां येखलासखानास अहंमदखान बोलला कीं, पादशाहाचा हुकूम असा झाला आहे कीं, समुद्रांतून चालून जाण्याची हवा येऊन पोहोचे तोंपर्यंत तुम्हीं कांहीं दिवस मुर्तजाबाद येथेंच राहावें, असें सांगितलें. नंतर येखलासखान बायकामुलांसुध्धां मुर्तजाबाद किल्यांत कैद करून ठेविला. कित्येक दिवसानंतर कोणी एका मनुष्यास पाठऊन येखलासखानाचे डोळे काढविले. दिलावरखानाकडे मुख्त्यारी होती तोंपर्यंत येखलासखान बायकामुलांसुध्धां मुर्तजाबादचे किल्यांत कैद होऊन राहिला होता. दिलावरखान गेल्यानंतर ईब्राहिम आदिलशाहा पादशाहा याणी येखलासखानास बायकामुलांसुध्धां हुजूर आणऊन येखलासखानास तैनात करून दिली. तेणेंकरून येखलासखान याणी जीवमानपर्यंत सुखांत दिवस घालविले आणि सन १००६ एक हजार सहा ( इ. स. १५९७–९८ ) सालीं येखलासखान वारला.

## १८. कित्येक दिवसानंतर हमीदखानासहि कैद केलें :

त्यानंतर येखलासखान कैद झाला. दिलावरखान व हमीदखान हे उभयताहि त्या दिवसांत एकमेकांत स्नेहानें व मित्रतेनें होते. नित्य सरकारचे वाड्यांत येऊन उभयतां मिळून राजधानीचीं कामें दिलावरखान करित होता. हमीदखान आपल्यास सरसरनौबतीचें पद मिळावें असें इच्छित होता. सरसरनौबतीचें पद मिळालें म्हणजे निरंतर राजधानीचीं कामें करित जावीं असा मनांत इरादा ठेवित होता. सर्व मनुष्यांसहि संशय होता व खरेंहि वाटत होतें कीं, सरसरनौबतीचें पद हमीदखानासच मिळेल. ह्याविषयीं सर्वत्र मार्गप्रतिक्षाहि करित होते. कित्येक दिवसांनंतर दिलावरखान याणीं आपला पुत्र कमालखान याजला पादशाहापाशीं आणून कमालखानास सरसरनौबतीचीं वस्त्रें देवविलीं. तेव्हां सर्वांस सत्य कळून आलें कीं, दिलावरखान हा आपणच प्रबल व्हावें या विचारांत खास आहे. सरकारी कामकाजाचे हुकूम करण्याचें कामांत दुसरा कोणी नसावा आणि आपण एकट्यानेंच कारभार करावा असें इच्छितो. कमालखानास सरसरनौबतीचीं वस्त्रें दिल्हीं. येणेंकरून हमीदखान बहुत खिन्न जाहाला व दिलावरखान व हमीदखान या उभयतांत वैरभाव व वाकडेपणा उत्पन्न झाला. दुसरे दिवशीं दिलावरखान याणी पादशाहाकडून कोणी एकास हमीदखानाकडे पाठऊन निरोप सांगून पाठविला कीं, सरकारचे हुकुमाशिवाय तुम्हीं आपले घराचे बाहेर जाऊं नये, दौलतीकडील सामान सरंजाम, घोडे, हत्ती, शस्त्रें वगैरे जे आहे ते सर्व जिन्नस हुजूर पाठऊन द्यावे. असा निरोप पाठविला. हमीदखान याणी मनांत आणिलें कीं, घोड्यावर बसून हत्ती व घोडे समागमें घेऊन शहराबाहेर निघोन जावें. असें मनांत आणिलें तों बातमी कळली कीं, शहरचे हरएक वेसीवर ताकिद जाऊन पोचली कीं, वेसींतून हमीदखान याजला बाहेर जाऊं देऊं नये. असें समजलें तेव्हां येणेंकरून शतावधी चिंतेनें व खिन्नतेनें खिन्न होऊन पुढें काय होईल तें पहावें अशी मार्ग-प्रतिक्षा करित खेदयुक्त घाबरून घरीं बसला. दुसरे दिवशीं हमीदखानकडे दौलती-कडील सामान सरंजाम होता तो सर्व सरकारांत गेला. बोलण्यांत असें आहे कीं, दौलतीकडील इतका सामान सरंजाम जमला होता कीं, घोडे, हत्ती, शस्त्रें वगैरे हमीदखान यानें जे जमविले होते त्याचे निमे किंवा चतुर्थांश देखील कोणते अमीर-लोकापैकीं एकापाशींहि जमले नव्हते. थोडकेच दिवसानंतर दिलावरखानानीं हमीद-खानास एके किल्यावर पाठऊन कैद केला आणि दिलावरखान याणी मीच मालक झालो, मजसारिखा दुसरा कोणीच नाहीं, असा गर्वाचा ध्वज उभा केला. राजधानीचे कारभारांत प्रबल झाला. सर्व कामाची मुखत्यारी आपले हातीं ठेविली.

## १९. दिलावरखान याणी विजापुरचे राजधानींतील वजीरीचें काम मुख्त्यारीनें आठ वर्षेंपर्यंत करणें प्रकर्ण वर्णन :

दिलावरखान हा बहुत अकलवान, शाहाणा व मोठीं मोठीं कामें केलेला होता. ऐशीं वर्षेंपर्यंत पादशाहाचे व अमीरलोकांचे चाकरींत दिवस घालऊन त्याजला बहुत श्रेष्ठता प्राप्त झाली होती. दिलावरखान याणी मुख्त्यारीनें कारभार केला. त्या दिवसांत राजधानीचे कामाचा असा पक्का बंदोबस्त केला कीं, तसा कोणी करितील असें वाटत नाहीं. दिलावरखान याणी पुरातन श्रेष्ठ अमीरलोकांशीं शरीरसंबंधाचें नातें जोडून कित्येकांचे येथें आपल्या कन्या देऊन व कित्येक अमीरलोकांच्या कन्या आपले येथें करून सर्वांस आपले आप्तविषयींपणाचा संबंध जोडिला. जे थोर थोर संभावित शिपाईलोक प्रसिध्द होते त्यांसीहि शरीरसंबंध जोडून बहुत योग्यता मिळविली. आपले सर्व पुत्रांस मोठे मोठे मर्तबे व पदाधिकार देऊन बहुत योग्यतेस चढऊन वडील पुत्र महंमदखान यास श्रेष्ठ अमीरीचे पद देऊन पादशाहास 'कुरान षरीफ' व 'गुलीस्तान बुस्तान' या किताबी शिकविणेंकरितां नेमिला. दुसरा पुत्र कमालखान यास अमीरीचें व बक्षीगिरीचें पद देऊन पादशाहापाशीं चेंडु दांडु वगैरे नाना प्रकारचे खेळ खेळण्याकरितां नेमिला. तिसरा पुत्र खैरातखान याजलाहि श्रेष्ठ अमीरीचें पद देऊन पादशाहाचे संरक्षणार्थ नेमिला. चौथा पुत्र अबदुल कादर याजला विजापुरचे बंदोबस्तावर नेमिला. या हरएक पुत्रांपाशीं दोन दोन हजार घोडे व दिलावरखान याणी आपलेपाशीं सहा हजार घोडे ठेविले. बल्लूलखान याजला, कीं तो बल्लूलखानहि दत्तक घेतला होता त्याजलाहि, श्रेष्ठ योग्यता देऊन शंभर असामी चाकर लोक मोगल अशक्त व वृध्द साठ असामी हबशी जातीचे, कीं कोणताच त्या चाकरलोकांत दावा ठेवणारा नव्हता ते सेवक लोक, पादशाहाचे चाकरींत नेमिले. जे गरीब लोक आली आदिलशाहाचे कारकीर्दींत इराक, खुरासन, रूम व शाम येथून येऊन जमले होते ते चाकरीपैकीं लोक, कारकून मंडळ, अमीरलोक व शिपाई मंडळ असे होते ते सर्व मिळोन पांच सहा हजार होते ते संपूर्ण निघोन गेले. परंतु कांहीं लोक हुजूर कामावर होते तेहि बरतर्फ करून त्या कामावर आपलेकडील लोक नेमिले. केवळ पादशाहाचे चाकरीवर जे सेवक होते ते मुलांस दूध पाजणाऱ्या दाया व कुणबिणी पादशाहाचे सेवेंत व पादशाहाचे मातुश्रीचे सेवेंत होत्या त्या सर्व बरतर्फ करून त्या चाकरीवर दिलावरखान याणी आपलेकडील नेमिल्या. दरवाजाचे देवडीवरहि असेच देवडीवान म्हणजे पहाऱ्याचे शिपाई आपलेकडील नेमिले. कारभाराचा असा बंदोबस्त केला कीं, आपले मंडळीखेरीज दुसरा कोणी कोठेंच राहूं नये. शाहा अबदुल हसन हा येखलासखानाचे हुकुमानें एके किल्ल्यांत कैद जाहाला होता तेथें हुकुम पाठऊन शाहा अबदुल हसन

याचे त्या जाग्यावरच डोळे काढविले. तेणेंकरून शाहा अबदुल हसन हा अंध जाहाला. परंतु कोणते दिवशीं काय करील हा नेम लागत नाहीं या धाकास्तव कित्येक दिवसानंतर शाहा अबदुल हसन याजला जीवें मारिला. चांदबिबी सुलतान इचाहि माली व मुलकी कामापासून हुकूम कमी केला. हुकूम केला कीं, कोणीच चांदबिबी सुलतान इचे हुकुमांत वागूं नये. षियाचा धर्म उच्छेद केला व सुनी धर्म चालू केला. इमाम हनफीचे धर्मास साह्य करूं लागला व सामर्थ्य देऊं लागला. पादशाहा याणीहि दिलावरखानास अशी मुख्त्यारी व आश्रय दिल्हा कीं, कोणीच जवळचे किंवा दूरचे मनुष्यांनीं मनांत आणो नये कीं, दिलावरखानाचे सेवेंत व आज्ञेंत वागूं नये. अशी दिलावरखानास मुख्त्यारी दिल्ही. दिलावरखान याचा वडील पुत्र बहुत विद्वान होता. त्याजला विद्येचे संवादाकरितां हुजुर हजर ठेविला. तो विद्याभ्यास करणारे व कविता करणाराचे सोबतींत राहत होता. सर्व काळ पादशाहाचे सेवेंत राहून विद्येचे संवाद करण्यांत निमग्न होता. दिलावरखानहि विद्वान होता. विद्याभ्यास करण्याची संगती ठेवित होता. कित्येक विद्वान लोक गुजराथ व लाहूर वगैरे येथून आणऊन त्याजला कचेरींत जमा केले होते. त्या लोकाशींहि संगती ठेवित होता. फियाहाचे म्हणजे न्याय व धर्मशास्त्राचे वाक्याचा निर्णय करित होता. ही विद्वान लोकांची सर्व जमात सरकारचे वाड्यांत नित्य जमून तपसिर कहीर म्हणजे कुरानाची टीका आहे त्या टीकेचा वगैरे हादीस म्हणजे पैगंबराचे वाक्याचा संवाद करण्यांत व हे ग्रंथ पहाण्यांत निमग्न होत होता. सर्वांशीं योग्यतेनें, म्हणजे ते तेज्यानें, राहून स्नेह ठेवित होता. आठ वर्षेपर्यंत दिलावरखान याणी याच प्रकारें कारभार केला.

## २०. दिलावरखान याचे यत्नानें इब्राहिम आदिलशाहा याचे लग्न महंमद कुली कुतुबशाहा याचे बहिणीशीं होणें व इबराहिम आदिलशाहा याचे बहिणीचें लग्न मुर्तजा निजामशाहा याचे पुत्राशीं होणें :

दिलावरखान याणी पादशाहा लोकांत एकमेकांत परस्परें शरिरसंबंधाचें नातें जोडावें यदर्थी यत्न करून सख्य व मित्रता करविता जाला. इब्राहिम कुतुबशाहाची कन्या इब्राहिम आदिलशाहा पादशाहाकरितां मागणें केलें. इब्राहिम आदिलशाहाची बहीण मुर्तजा निजामशाहाचे पुत्रास योजिली. परंतु नाना प्रकारचीं संकटें उत्पन्न करणार लोक व फंदफितूर करून खराबी करणारे लोकांनीं संकट उत्पन्न करून दिलावरखानाचा संपूर्ण यत्न निरर्थक केला. पादशाहामध्यें वाकडेपणा योग्य नव्हे असें असतां एकमेकांत वाकडेपणा आणिला. असे कीं निजामशाहा व कुतुबशाहा या

शरीरसंबंधाचे कारणानें खिन होऊन शरीरसंबंधाचे कामास व मित्रतेस ढिलाईवर टाकिते झाले. या प्रकारें कीं, निजामशाहा यांणी बहुत दिवसापुर्वी पवित्रपणाचे डबींतील भारी किंमतीचे मोत्याचा व निर्मळपणाचे उंचस्थानावरील तेजस्वी सूर्याची पालखी म्हणजे इब्राहिम आदिलशाहा पादशाहाची सख्खी बहीण खदीज्या[६] सुलतान इची पालखी किल्याचे बाहेर ठेऊन सरकारवाड्यांतील महालांत नेली नव्हती. सदरहू पालखीसमागमें जें लष्कर गेलें होतें ते हलके हलके लोक निघोन विजापुरास आले व थोर थोर लोक अहमदनगर येथें चिंताग्रस्त व घाबरून राहले होते. कुतुबशाहाहि शरीरसंबंधाचें काम ढिलाईवर टाकित होता. होय होय, पाहूं पाहूं असें म्हणोन नादावर टाकित होता. कारण कीं, आदिलशाहा खुद जातीनें ऐश्वर्यासहित सरहादींत परत येऊन या श्रेष्ठ कामास नमुन्यांत आणावें तों पूर्वी कुतुबशाहाचे मुलखाचे सरहादींत जाऊन एक संभावित ग्रहस्थास पवित्रपणाचे पडद्यांत व निर्मळपणाचे महालांत बसणारी चांदबिबी सुलतान, कीं ती चांदबिबी हली पादशहाची राणी आहे व ती महंमद कुतुबशाहाची बहीण[७] आहे तिजला बोलावणेकरितां पाठविला. कुतुबशाहा याणी रवानगी करणेंविषयीं बहुत अनमान करून तूर्त रवानगी करित नाहीं अशीं नाना प्रकारचीं बोलणीं बोलला. दर घटकेस नवे नवे बाहाने केले. परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. जेव्हां आदिलशाहाची फारच जबरदस्ती पाहिली व त्याचे जबरेपुढें आपले बल व सामर्थ्य वजन करून पाहिलेनंतर तात्काळ चांदबिबीचे रवानगीविषयीं अनमान करणें व नाना प्रकारचे बाहानें करणें सर्व सोडून कुतुबशाहा याणीं सेवकपणा धारण केला. दक्षणेंतील राजे लोकांचे कायद्याप्रमाणें, चाली होत्या त्या अन्वयें व पादशाही चाली ठरलेल्या आहेत त्याप्रमाणें पृथ्वी संरक्षण करण्याचे व राजधानीचे माहालांत बसणारी आपली प्राणप्रिय बहीण हिजला कुतुबशाहा याणीं हत्तीवर अंबारींत बसऊन पडदे सोडून समागमें विश्वासू सेवक लोक व दौलतीचे कल्याण इछिणारे चाकर लोक देऊन रवानगी केली-आदिलशाहा यांणी त्या शहरचे संनिधच संतोषाचें स्थान त्या सरहदींतच पसंत करून संतोष व आनंद भोगण्यास आरंभ केला. संतोषाची व आनंदाची कचेरी व आल्हाद व हर्षाची सभा अशी केली कीं, त्या संतोषाचा व आनंदाचा गलबा म्हणजे ध्वनी, श्रेष्ठ आकाशावर पोंहचविला व संतोषाचा व खुषहालीचा ध्वनी सातवे आकाशावर पोंहचविला, म्हणजे त्या समारंभाची कीर्ति दूर गेली. चाळीस दिवसपर्यंत कचेरीची तयारी करण्यांत व संतोष व आनंदकारक सभेचे सिध्धतेंत दिवसेंदिवस अधिक अधिकच समारंभ होत होता. थोर थोर

६. खुदजा सुलतानाचें लग्न–९९२ हि. = १५८४ इ. स.–ब्रि. फि. ३, पृ. १५८ व ३६३–३६६.

७. मलिका जहानचें लग्न, ९९४ हि. = १५८६ इ. स.–ब्रि. फे. ३, पृ. १५९.

किंमतीचे पोपाख व उंचे उंचे जिंनस बक्षिस देण्याचें उभयता पादशाहाकडून उभयतांकडील कारभारी मंडळास, कामदारांस, सरकारी चाकर लोकांस व उभयतांकडील आप्तविषयीं मंडळास ज्याचे ज्याचे जसे जसे आधिकार होते तसे योग्यतेनुरूप मिळत होते. धर्मशास्त्राप्रमाणें उत्तम समयीं लग्न होऊन कल्याणप्रद दोन ग्रह एके स्थानीं झाले, म्हणजे वधु वर एकत्र झाले. हे कल्याणप्रद कार्य झाल्या-नंतर व हा लग्न समारंभ जाहाल्यानंतर आदिलशाहा पादशाहा निजामशहाचे मुलुकाकडे चालू झाला. जेव्हां निजामशाहाचे सरहादींत जाऊन पोहचला तेव्हां एक अकलवान संभावित गृहस्थ वकिलीचें काम देऊन निजामशाहाकडे पाठविला. नीति-बोध सांगण्याचे मार्गानीं मसलत सांगोन निजामशाहाशीं बोलणें करविलें. तेव्हां निजामशाहा याणी आपलेपाशीं सामानाची भरती नाहीं यावर व आदिलशाहाचे फौजेपुढें आपली फौज सामन्यास ठरणार नाहीं या गोष्टीवर नजर ठेऊन गर्व व अभिमान सोडून सख्य करिता झाला. आदिलशाची सख्खी बहीण पवित्रपणाचे पडद्यांत राहणारी, निर्मळपणाचे माहालांत राहणारी, राजधानीचे डबींतील मुक्ताफळ व ऐश्वर्याचे आकाशावरील सूर्य, म्हणजे बिबी खदीय्या मुलतान इजला, वाकडेपणा-मुळें लग्न न करितां ढिलाईवर टाकलें होतें तिजला अति श्रेष्ठत्वानें व बहुत योग्यतेनें पवित्रपणाच्या पडद्याचे आंत बसवून धर्मशास्त्राप्रमाणें लग्न करिता झाला. दोन शुभ ग्रह एके स्थानीं येते जाले, म्हणजे नवरा व नवरी एकत्र जाहाली. पालखीबरोबर आदिलशाहाकडील जी जमात गेली होती त्या सर्वांस बक्षीस व पोपाख देऊन परत जाण्यास निरोप दिल्हा. बहुत उत्तम उत्तम पदार्थ व अत्यंत चांगलें चांगलें जिंनस नजर नजराण्याचे चालीप्रमाणें दौलतीकडील मर्यादा जाणणारे वकिलासमागमें आदिलशाहाकडे पाठऊन विनंती करिता झाला कीं, सरहादीवर जी आपली फौज उतरली आहे तेणेंकरून रयतेचा व गांवोगांवचे रहाणारे लोकांचा बहुत खराबा झाला आहे याजकरितां त्या फौजेस परत जाणे विषयीं आपण आज्ञा करावी, म्हणजे सर्व शहरास मुखास पडेल. अशी बिनंति करविली तेव्हां आदिलशाहा याणी हीं दोनी कर्मे, म्हणजे दोनीहि लग्न समारंभ झाले नंतर, मनोरथ पूर्णतेनें आपले दौलत व ऐश्वर्यासहित यशस्वी व विजई होऊन विजापुरास येता जाला.

## २१. दिलावरखान याची प्रबलता यद्यपि झाली होती तत्रापि पादशाहाचे जरबेनें नेत्रास पाते लागे न लागे तों दिलावरखान नीचत्वास पावला :

दिलावरखान याची प्रबलता सर्व लोकांस व पादशाहास या प्रवासांत येथपर्यंत प्रसिध्द झाली कीं, पादशाहा याणी दिलावरखान याचे प्रबलतेमुळें लग्नाचें कार्य या

निरोपायपणास्तव कबूल केलें. नाहीं पेक्षां या पादशाहा लोकांपाशीं युध्धास उभे राहण्यास सामान सरंजाम बहुत होता. दिलावरखानाची प्रबलता आदिलशाहावर व आदिलशाचे राजधानींत अत्यंत झाली होती, कीं आदिलशाहा पादशाहास दिलावरखानाचे आज्ञेशिवाय व हुकुमावांचून पाणी देखील प्राशन करावयास मिळत नव्हतें. मग दिलावरखानाचे हुकुमाशिवाय दुसरें काम कोठून होईल! इतकी सत्ता व या प्रकारची मुख्त्यारी व पृथ्वीवर हुकुम व धणीपणाचे अशा ऐश्वर्याप्रत प्राप्त झाली आहे कीं, दिलावरखानाचा इतका सर्व गर्व व अभिमान असोन आदिलशाहास थोडासा संशय येण्यावरून नेत्रांस पातें लागे न लागे तो गळून व दूर होऊन दिलावरखान कामावरून निघाला. येविषयीं तपशीलवार मजकूर असा आहे कीं, पूर्वीचे मोकदम्यावरून जाहीर होतें कीं, दिलावरखान याणी बंदोबस्त केला तो एकंदर कामांत, दरबारांत, महालांत, जनानखान्यांत व मुलखांतील तर्फेतर्फेचे गांवोगांव असा पक्का बंदोबस्त केला कीं, परक्या मनुष्यास कदापि प्रवेश होणें राहिला नाहीं. परंतु त्याची धन्य अमान्य वर्तणुक, कीं असे श्रेष्ठ लोक मिळाले असून व या प्रकारें मनोरथ पूर्ण झाले असतां, दिलावरखानाचे चित्तांत दुष्ट संकल्प आला आणि दिलावरखान याणी इच्छिलें कीं, इब्राहिम आदिलशाहास पदच्युत करून, म्हणजे राजपदावरून दूर करून, त्याचा बंधु इस्माईल म्हणोन मुस्तफाबादचे किल्यांत कैदेंत होता त्याजला तेथून आणून तख्तावर बसवावा असें इच्छिलें. इतक्यामध्यें या त्याचे गुप्त संकल्पाची बातमी जाहीर झाली. सर्व मनुष्यांचे बोलण्यांतहि या बातमीचा भाव प्रगट झाला. येथपर्यंत कीं, एक महिनापर्यंत मनुष्यें आपआपणांत मिळोन हीच गोष्ट बोलत होते व जागोजाग याच कथेची चर्चा करित होते. सर्वत्र दिलावरखानाचा गिल्ला व बोभाटा सरकारांत कळवित होते. दिलावरखानाची ही गुप्त मसलत प्रगट झाली होती. पादशाहाचे मातुश्रीचे कानावर गेली त्या रात्रीं पादशाहा व पादशाहाची मातुश्री अत्यंत चिंताग्रस्त व खिन्न होऊन मुखास अन्नाचे घासाची ओळख केली नाहीं, म्हणजे त्या रात्रीं उभयतांहि अन्न सेवन केलें नाहीं व निद्राहि घेतली नाहीं. या प्रकर्णी चिंता व खिन्नता महालांतील सर्व लोकांस प्राप्त झाली. जवळचे व दूरचे मनुष्यास अयोग्य वर्तमान ऐकण्यानीं सर्व चिंतेत पडले होते. हुजुरचे चाकर लोक होते ते निरोपाय होऊन स्तब्ध राहिले. असें होण्याचें कारण काय व हें प्रकर्ण कशाकरितां झालें येविषयीं कोणी वोट देखील उघडित नव्हते. परंतु पादशाहाचे शिपाई लोक व चाकर लोक वगैरे दिलावरखानाचे या बदचालीवर व बेमानपणावर स्तब्ध न राहतां त्याजला दूषण ठेऊन संपूर्ण सेवक लोक एकाएकीं एकदांच त्याजपासून निघोन गेले. दिलावरखानाचे भय व धाक मनांतून सोडून दिलावरखानाचा कंटाळा केला व सूड घेण्याविषयीं सिध्ध झाले. हरएक मनुष्यें हातांत शस्त्रें घेऊन घरांतून बाहेर निघोन गलीत,

रस्त्यावर, बाजारांत व दुकानांत दुतर्फा तयार होऊन बसत होते. पादशाहाचे हुकुमाचे सूचनेची वाट पहात होते. महालाकडील बंदोबस्ताकरितां ज्या कामाच्या बायका दिलावरखानाच्या निसबतीच्या नेमणुकीस होत्या त्या स्त्रियांनीं तें रात्रीचें सविस्तर वर्तमान सांगितलें कीं, रात्रीं पादशाहा व पादशाहाची मातुश्री चिंताग्रस्त होऊन उभयतांनीं सारी रात्र निद्रा घेतली नाहीं असें सांगितलें. नंतर दुसरे दिवशीं दिलावरखान याणी दरबारांत येऊन जरुरीचीं कामें आटोपल्यानंतर नित्य पाठाप्रमाणें पादशाहास मुजरा करण्याकरितां येऊन पादशाहास विनंति केली कीं, मजला कांहीं जरुरीची विनंति करावयाची आहे, कीं एकांती विनंति करावी असें बोलला. तेव्हां पादशाहा आपले खासे महालांत जाऊन गैर राबता करून दिलावरखान याजला बोलावणें पाठविलें. रफिउद्दीन सांगताहे कीं, त्या समईं मजला दुसरेनें चाकरीवरून पादशाहानीं हुजूर आणऊन जामदारखान्याचें काम व खाशाचे पोशाख ठेवण्याचें काम मजकडे सांगून माझी योग्यता पहिलेपेक्षां अधिक वाढविली. ज्या समईं दिलावरखान सरकारांनीं बोलाविलेवरून पादशाहाचे हुजूर एकांती जात होता तेव्हां मीहि दिलावरखानाचे समागमें पादशाहाचे महालाचे पडद्याचे पाठीमागेपर्यंत जाऊन पोंहोचलो. दिलावरखानाची तीं एकांतीचीं भाषणें ऐकिलीं. दिलावरखान पादशाहापाशीं आला तेव्हां त्याणीं पादशाहास अर्ज केला कीं, माझे ऐकण्यांत आलें आहे कीं, रात्रीं आपले चित्तांत व आपले मातुश्रीचे चित्तांत संशय येऊन आपणास उभयतांस चिंता प्राप्त झाली होतीं, कीं त्या चिंतेनें आपणास निद्रा घेऊं दिली नाहीं व अन्नहि खाऊं दिलें नाही. याचें कारण काय होतें तें माझे समजुतींत येत नाहीं. यास्तव सरकारांनीं आज्ञा करावी. त्याजवरून पादशाहानीं जें वर्तमान ऐकिलें होतें तें सविस्तर सांगितलें. तेव्हां तें ऐकून दिलावर-खान तात्काळ खिन्न होऊन निरोपायपणें कपाळावर हाणून घेऊन बोलला कीं, मी असा दौलतीचा कल्याण इच्छिणारा व इमानी सेवा करणारा प्रत्यक्ष असोन कारण कीं अद्यापि या बदचालीचा संशय सरकारास आहे! सरकारची मर्जी. अशी विनंति करून मुर्दासारिखा रडत ओरडत तेथून निघोन आपले घरास जाण्याची वाट धरिली. दिलावरखान याचे घरीं कारकून, कचेरीचे लोक व संपूर्ण कामदार तेथें जमून बसले होते त्या ठिकाणीं दिलावरखान याणीं येऊन मोठमोठ्यानें ओरडून त्या मंडळीस बोलला कीं, कोणी एकानींहि आजपासून माझे घरीं येत जाऊं नये. सर्वांनी सरकारचे किल्यांत जमा होत जावें. मीहि तेथेंच येऊन काम पहात जाईन. असें बोलला. दरवाजावरील देवडीवानासहि ताकिद कारभार केली कीं, आजपासून कोणासच आमचे वाड्यांत येत जाऊं देऊं नये. अशी ताकिद करून आपण पांच दिवस मंडळींचे गवगव्याचे भयास्तव घरापासून बाहेर पाय ठेविला नाहीं व कोणास घराचे आंतहि येऊं दिल्हें नाहीं. मनांतील भाव हा

होता कीं, किल्यांत यावें परंतु किल्याकडील कामदार काय म्हणतील हें न कळे. किल्याकडील कामगार रूमीखान म्हणोन होता. तो रूमीखान पूर्वी दिलावरखानाचा कारभारी होता. या रूमीखानाचे मातुश्रीनें इब्राहिम आदिलशाहा पादशाहाचे तीर्थरूप तहमासिप पादशाहा याजला दूध पाजिलें होतें. या कारणास्तव रूमीखान योग्यतेस चढोन अमीरीचे पद पावला आणि पादशाहानीं किल्याचे बंदोबस्ताचे काम रूमीखानाचे हवालीं केलें होतें. रूमीखानाची कन्याहि दिलावरखान याणी आपला पुत्र अबदुल कादर याजला केली होती. तोहि किल्याचा बंदोबस्त दिलावरखानाचे हुकुमाप्रमाणें करित होता. असा विश्वास असतां या पांच रोजांत किल्याचे आंत दिलावरखान गेला नाहीं. रूमीखानहि या पांच रोजांत खुद जातीनें किल्याचे आंत आला नाहीं. बहुतकरून सर्व कामदार व दरबारांतील मुत्सद्दी लोक आपले आपले घरीं बसून राहिले होते. रफिउद्दीन बोलत आहे कीं, मीही प्रत्यक्ष मजकडे सरकारचे जामदारखान्याचे व सरकारचे पोषाख नित्य ठेवणें व देणेंचे काम असून जामदारखान्यांत गेलों नाहीं. नित्य नवा पोषाख करण्याची चाल असोन पांच रोजांत सरकारास दुसरा पोषाख काढून दिल्हा नाहीं. हें सर्व या भयाचे व या धाकाचे कारणास्तव, कीं वाड्यांत गेलें असतां काय होईल व कसें अधिक उणें घडेल हें न कळे. यास्तव कोणीच वाड्यांत गेलें नाहीं. त्या समईं यद्यपि लिहिणारे कामदार आपआपले घरीं राहिले होते परंतु तरवारवाले शिपाईलोक जिवावर उदार होऊन हातांत तरवारी वगैरे शस्त्रें घेऊन तयार झाले व पादशाहाचे हुकुमाची वाट पाहात होते. जर करितां किंचित इषारा पादशाहाचे हुकुमाचा कोणीकडून तरी मिळाला तर दिलावरखानाचे वाड्यावर गर्दी करून दिलावरखानाचा मुलाबाळांसुध्धां फडशा करिते. पांचवे दिवशीं दिलावरखानाचा पुत्र अमीर हुसेन म्हणोन सर्व मुल्काचे कामावर मुख्त्यार होता. हाहि दिलावरखानाचा मानिलेला पुत्र होता. तो व सैद इस्माईल म्हणोन दिलावरखानाचे मुख्य कारभारीयांचा सरदार होता व दिलावरखानाचा पूर्ण विश्वास सैद इस्माईल याजवर होता. तो व रूमीखान कसा होता येविषयींचें वर्णन सदरी आलेंच आहे. या सर्वांनीं मिळोन दिलावरखानापाशीं येऊन हें संकट व हें विघ्न उत्पन्न होण्याचें कारण काय म्हणोन विचारिलें व कल्याणाचे इच्छेचा मार्ग धारण करून श्रेष्ठ श्रेष्ठ बोध व नीति सांगते झाले. परंतु दिलावरखानाचे अंतःकर्णांत या बोध व नीतीचा किंचित प्रवेश झाला नाहीं. तेव्हां सर्वत्र दिलगीर म्हणजे चिंताग्रस्त होऊन उठले. महंमदखान म्हणोन दिलावरखानाचा वडील पुत्र होता. त्याणी पुढें येऊन विनंति केली कीं, हें उत्पन्न झालेलें काय संकट आहे व हें प्रसिध्ध झालेलें कोणतें विघ्न आहे, कीं जेणेंकरून दरबारचा व दरबारचे मंडळीचा एकंदर रंग बदलला आहे? सर्व शिपाई व शूर लोक ढाला तरवारी घेऊन तयार झाले आहेत पादशाहाचे हुकुमानें

इशाऱ्याची म्हणजे सूचनेची वाट पाहात बसले आहेत, कीं एका क्षणांत आमचे घराची धुळदशा करून आमची बायकामुलें हालालखोरास देऊन टाकावी अशी वाट पहात बसले आहेत. ईश्वर प्रीत्यर्थ आम्हावर व तुम्ही आपले प्राणावर दया करा आणि या कामांत उपयोग होय असा एखादा अकलेचे मार्गांनीं विचार काढावा, म्हणजे या संकटांतून पार पडून कांहीं दिवस संसार करूं. नाहींपेक्षां मी विनंति केलीच आहे या प्रमाणें उदईक प्रातःकालीं कळून येईल असें बोलला. दिलावरखान ते दिवशीं तीन चार घटका रात्रपर्यंत फिकरींत पडोन कामाचे उपयोगी पडे अशी युक्ती काढूं असें बोलत होता. या नंतर एका गृहस्थास रुमीखान याजकडे पाठऊन निरोप सांगून पाठविला कीं, आज जें कांहीं आपण बोललात त्या प्रकर्णीं मित्रतेचे चालीनीं आपल्यास जसें योग्य दिसेल तसें करण्यांत यावें. रुमीखान याजला भय होतें. यास्तव येविषयीं खुद जातीनें किल्याचे आंत जाऊं शकला नाहीं. एक वृध्ध पुरुष विश्वासू समजदार बहुत अकलवान असा होता. त्याजला पादशाहाचे मातुश्रीकडे पाठऊन विनंति करविली कीं, सर्व लोकांचीं कामें बहुत दिवस बंद झालीं आहेत व सर्वत्र घाबरले आहेत व या दगदग्यांत पडले आहेत. सरकारचा दरबार व दिवाणी कारभार एकंदर स्तब्ध व निस्तेज झाला आहे. याजकरितां ईश्वर प्रीत्यर्थ एखादा विचार काढावा कीं, जेणेंकरून राजधानीचा बंदोबस्त नीट रहावा व शत्रु लोकांचे हांसे न होय असें करावें. दौलतीचा खांब, म्हणजे राजधानीचा मुख्य कारभारी, दिलावरखान तर पूर्ण खिन्नतेनें व लज्जायमानपणानें व अबरू कशी राहील या विचारांत व प्राण वाचत नाहीं अशा फिकरींत पडून काम कारभार सोडून घरीं बसून राहिला आहे. येणेंकरून सरकारचे राजधानींत मोठें विघ्न उभें राहिलें आहे. याजकरितां हें मनांत आणोन एखादी युक्ती काढावी कीं, पृथ्वीचे आश्रयभूत पादशाहा याणी उदईक प्रातःकाळीं दिलावरखानाचे घरापर्यंत जाऊन दिलावरखानाचें चित्त समाधान करून चिंतेत पडोन राहिला आहे त्याजला उठऊन संतोष करून दिलभरोंसा देऊन दिलावरखानास किल्यांत घेऊन यावें, म्हणजे दिलावरखानास दुपट अबरु चढून त्याचें चितास पूर्ण भरंवसा येऊन राजधानींतील सर्व काम कारभार करणेंत निमग्न होईल, असें झाल्यानंतर आपण व दिलावरखान मिळोन राजधानीचा एकंदर बंदोबस्त करण्यांत निरंतर यत्न करित जावें. अशी विनंति करविली तेव्हां पादशाहाचे मातुश्रीनींहि रुमीखानाची विनंति मान्य करून त्याप्रमाणेंच करिती झाली. दुसरे दिवशीं आदिलशाहा घोड्यावर बसून दिलावरखानाचे दरवाजापर्यंत गेले तेव्हां दिलावरखान वाड्यांतून धांवत बाहेर येऊन पादशाहाचे चरणावर मस्तक ठेविलें. पादशाहाचे घोड्याची रिकिब धरून शहराकडे चालू झाले. शहरचे वेसीबाहेर येऊन पोहचले तों इतक्यामध्यें पादशाहाची पालखी येऊन पोहचली.

तेव्हां पादशाहा घोड्यावरून उतरून पालखींत बसले. दिलावरखानास घोड्यावर बसऊन उभयतां मिळोन किल्यांत आले. नंतर पादशाहा याणी दिलावरखानास पोषाख द्यावयाकरितां आणावयास आज्ञा केली तेव्हां दिलावरखान याणे विनंति केली कीं, सरकारानीं मजला द्यावयाकरितां जो पोषाख आणविला आहे तो राहता करून जरकरितां माझें पालन करावयाचेंच सरकारचे मनांत असेल तर या समई जो पोषाख सरकारचे अंगावर आहे तोच कृपा करून द्यावा, म्हणजे येणेंकरून सेवकाचा प्रतिपाळ करण्याची च ल व अत्यंत कृपा सर्व लोकांस जाहीर होईल. अशी विनंती केली तेव्हां पादशाहा उठोन आंत गेले आणि दुसरा पोषाख करून तो पोषाख दिलावरखानाकरितां बाहेर पाठविला. नंतर दिलावरखान याणे तो पोषाख अंगावर घेऊन पूर्ण संतोषानें व आनंदानें आपले घरास येता झाला दुसरे दिवसापासून राजधानींतील काम कारभार पहाण्यांत निमग्न झाला. तें विघ्न, कीं जें प्रसिध्द झालें होतें तें, निःशेष नाहींसें झालें. सर्वत्र लोक भयापासून सुटले. अशी गोष्ट झाली तेव्हां दिलावरखानास व सर्व लोकांसहि प्रसिध्द कळोन आलें कीं, दिलावरखानाची प्रबलता व माजुरपणा अति झ ला होता तो पादशाहाचे थोडकेंच क्रोधाचे लक्षणां ा निवारण झाला.

## २२. हें प्रकर्ण झाल्यानंतर जरब व भय दिलावरखानास प्राप्त होणें व दिलावरखान याणें आपले बचावाचा यत्न करणें :

दिलावरखान हें महा भयंकर प्रकर्ण एकाएकीं उत्पन्न झालें होतें तें निवारण झाल्यानंतर पुन्हां उत्तमपणें कारभार करूं लागला, दिलावरखान याची दैवदशा व प्रारब्धयोग आजपर्यंत नीट होता. असें असतां धाक व भय दिलावरखानास प्राप्त झालें तेव्हां आपले संरक्षणार्थ पहिलेपेक्षां अधिक सावधगिरीची मजबुती करिता झाला. शिपाई लोक व शिबंदी जमा करूं लागला. पहीले स्वारशिबंदीपेक्षां पांच सहा हजार स्वार निवडक नवीन चाकरीवर ठेविले. बहुत द्रव्य खर्च करून घोड्याचे व हत्तीचे संपूर्ण सामान कलाबुती व मखमली व कुमाष म्हणोन भारी किंमतीचें कापड असतें त्या कापडानें सर्व सामान तयार केलें. तसेच तरवारी व हत्यारें उत्तम उत्तम जमऊन फौज बहुत तयारीनें तयार केली. यानंतर दिलावरखान याणी आदिलशाहास अर्ज केला कीं, हे महाराज मी स्वामीसेवेंत प्राणखर्च करण्याकरितां फौज जमविली आहे. ही फौज सरकारानीं पहाण्यांत आणावी. अशी विनंति केली तेव्हां पादशाहा शहरचे कोटाचे बुरजावर बसले. तेव्हां दिलावरखान याणी स्वार, शिबंदी व हत्ती संपूर्ण फौज तरवारी व हत्यारबंद पूर्ण

उत्तमपणानें तयार व शोभिवंत केली होती ती फौज पादशाहाचे सन्मुख उभी केली. ती अवलोकन करून पादशाहा अत्यंत संतोष पावोन ‘ शाबास शाबास ’ अशी आज्ञा करिते झाले. दिलावरखानास व दिलावरखानाचे पुत्रास पोषाख, घोडे, हत्ती व आदिलशाहा याणी आपले कंबरेस बांधावयाची खासी तरवार व पादशाहानीं कमरेस बांधावयाचा खंजीर व जडावदार शिरपेंच व माणकाच्या व हिऱ्याच्या व पाचेच्या आंगठ्या व पादशाहानी आपला खासा घोडा बसावयाचा भारी किंमतीचा व खुषांग म्हणजे चांगले रंगाचा व स्वरुपवान जडावदार जीन व लगामसहित व मोत्याची चवरी व घोड्यावर चार जम्यावर चार जमे असे एकावर एक असे सात भारी किंमतीचे उंचे कापडाचे तरेतरेचे रंगाचे कित्येक घोड्यावरील एकंदर सामानाची किंमत दोन लक्ष होन होती, त्या घोड्यासहित ते दिवशीं दिलावरखानास व त्याचे पुत्रास बक्षिस दिल्हे. असेच त्या वर्षी पांच वेळ याच प्रकारचे सरकारांतून दिलावरखानास पोषाख वगैरे बक्षिस मिळालें. त्या दिवशीं सरकारांतून ईनामपत्र पादशाहाचे निशाणीचें मिळविलें. त्या पत्रांत लिहिलें होतें कीं, ‘ सरकारांतील कारकून व कामगारांस कळावें कीं, खान आलीनषान दिलावरखान याणी दौलतीचें कल्याण ईच्छिण्याचे व उत्तम सेवेचे मार्गानी प्रसंगी उपयोगी पडावयाजोगी फौज निवडक व उत्तम जमा केली आहे. दिलावरखान याजला आम्ही जो मोकासा ईनाम दिल्हा आहे तितके गावचे वसुलानी या फौजेच्या खर्चाचा निर्वाह होत नाहीं. याजकरितां स्वामी कृपाळु होऊन दुसरा मुलुख पाच हजार स्वारांस खर्चास पुरावयाजोगा नवीन दिलावरखान यास आम्ही दिल्हा आहे, तो त्याजकडे चालवावा. ’ असें इनामपत्र लिहून दिल्हें. नंतर त्या हुकुमान्वयें शंभर गांव थोर थोर बहुत वसुलाचे कारभारी व चाकर लोक व मुत्सद्दी मंडळाचे घेऊन दिलावरखानास दिल्हे. नंतर दिलावरखान याणी पादशाहाचे फौजेपैकीं पांच हजार स्वार कमी केले आणि तितकेच स्वार म्हणजे पांच हजार स्वार दिलावरखान याणी आपले वाढविले. सारांष, दिलावरखानाचे सर्व करण्यांतील व हिंमतींतील तात्पर्य हें होतें कीं, आपली मजबुती करावी व पादशाहाकडील फौज कमी करावी, म्हणजे निरंतर पादशाहा जबरदस्तीनें राहून दिलावरखानाचे पारपत्य करण्याचा संकल्प कदापि पादशाहानीं करूं नये. याजकरितां हें असें केलें. दिलावरखान याणी राजकारणाचें पाऊल पुढें ठेविलें. असा विचार करिता झाला कीं, अहमदनगर येथील निजामशाही मुलकावर चालून जाऊन प्रबल होऊन तेथील संस्थानावर आपले कडील एखादा कामदार नेमावा.

## २३. दिलावरखान याणी आपली मजबुती होण्याकरितां बुऱ्हाण निजामशाहाचे साह्य करणें :

बुऱ्हाणशाहा बिन हुसेन निजामशाहा याणी आपला बंधु मुर्तजा निजामशाहाची अंदेशा मनांत आणून आली आदिलशाहाचे कारकीर्दींत बुऱ्हाणशाहा विजापुरास येऊन आश्रय धरून राहिला होता. तेव्हां आली आदिलशाहा पादशाहा याणी बहुत कृपेनें व मेहरबानगीनें बुऱ्हाणशाहाचे पालन करून आली आदिलशाहा ईच्छित होता कीं, बहुत यत्न करून बुऱ्हाणशाहास अहमदनगरचे तक्तावर बसवावे. परंतु आली आदिलशाहाची हयात म्हणजे आयुर्दाय पूरला नाहीं. यामुळें आदिलशाहाचे मनांतील सर्व इच्छा गुप्त राहिल्या. आली आदिलशाहा वारल्यानंतर बुऱ्हाणशाहा याणी ईब्राहिम आदिलशाहाचे राजधानीचे प्रारंभी आदिलशाहाचे अमीरलोकांत आश्रय जोडून बहुत यत्न करून काम कारभार केला. परंतु बुऱ्हाणशाहाचे दुर्दैवाचे रात्रीचा पदर अद्यापि बंद होता. बुऱ्हाणशाहाचे मनोरथ सफल होण्याचे प्रातःकाळचे शुभ्र वर्णाचे, म्हणजे सफेत रंगाचे, जाहिरीस बहुत अवधी पाहिजेसा होता, म्हणजे बुऱ्हाणशाहाची अद्यापि दुर्दैवाची दशा सरली नव्हती. मनोरथ पूर्ण होण्याची वेळ आली नव्हती. यामुळें बुऱ्हाणशाहा निरुपाय होऊन विजापुराहून निराशायुक्त निघोन हिंदुस्थानास जाता झाला. अकबरशाहाचे राजधानींत जाऊन राहिला. बुऱ्हाणशाहाचा विजापुरचे कित्येक अमीरलोकांसी व कारभारी मंडळीसी परिचय व वोळख व मित्रता फार झाली होती. याजकरितां विजापुरचे मंडळीस पत्रें पाठविण्याचा दरवाजा मोकळा ठेऊन, म्हणजे निरंतर पत्रें पाठऊन, बुऱ्हाणशाहा वारंवार आपले गरसोईचा मजकूर लिहून पाठवित होता. अशा समयांत दिलावरखानास आपल्या कामाविसी पूर्ण हिंमत व मजबुती प्राप्त व्हावी हें कारण होतें. यास्तव दिलावरखान याणी मनांत आणिलें कीं, निजामशाही लोक आपलेसे करून घेऊन आपली पूर्ण मजबुती करावी. दिलावरखान समजला होता कीं, निजामशाही सरकारांतील कामदार लोकांपैकीं बहुत संभावित जमालखान म्हेदवी म्हणोन होता. त्याणी त्या राजधानींत बहुत धांदल व पीडा प्राप्त झाल्यानंतर ईस्माईल म्हणोन बुऱ्हाणशाहा मशारनिल्हे याचे पुत्रास, कीं तो पुत्र बारा वर्षांचे वयाचा कैदेंत होता त्याजला, कैदेंतून मोकळा करून राजपदावर बसऊन राजधानीचे मुखत्यारीचा लगाम आपले हातीं आणोन, म्हणजे आपण मुखत्यार झाला होता. त्या इस्माईल पादशाहाचा बाप बुऱ्हाणशाहा प्रवासाचे दशेंत बहुत वर्षें अहंमदनगरचा पादशाहा आपण व्हावें व राजपद आपणास मिळावें याजकरितां तळमळीचे अश्रु नेत्रांतून टाकित होता, म्हणजे चरफडत होता. सर्व काळ अपूर्ण मनोरथाचे म्हणजे नाऊमदीचे व निरुपायाचे विषाचा प्याला प्राशन करित होता, म्हणजे कधींच

बुऱ्हाणशाहाचे मनांतील संकल्प सिध्धीस जात नव्हता. दिलावरखान याणी जाणिलें कीं, बुऱ्हाणशाहा येथील विजापुरचे कित्येक कारभारी मंडळास पत्रें पाठवित आहे असें जाणिलें. ज्या ग्रहस्थास बुऱ्हाणशाहाचें पत्र येत होतें त्याजला दिलावरखान याणी एकांती बोलाऊन पत्रांतील मजकूर दिलावरखान याणी समजून घेऊन दिलावरखान त्याजला बोलला कीं, या पत्राचें उतर बुऱ्हाणशाहास असें लिहावें कीं, आपले पत्रांतील सर्व मजकूर आदिलशाहाचा मुख्य कारभारी दिलावरखान आहे त्याजला मी कळविला आहे. दिलावरखान याणी ही गोष्ट कबूल करून सांगितलें आहे कीं, मी मदतीविषयीं व साह्य करण्यास सिध्ध आहे. परंतु अकबरशाहाचें एक अज्ञापत्र माझे नांवे व एक पत्र खानदेशचा पादशाहा आलीखान याचे नावें व आणखी कित्येक पत्रें सरहदींतील अमीरलोकांचे नावें बुऱ्हाणशाहाचें सर्वांनीं साह्य करावें अशा मजकूराचीं घेऊन आपण अति सत्वर अहमदनगरास जावें. मीहि फार जलद ईब्राहिम आदिलशाहाचे समागमें अहमदनगरास येऊन पोहचून बहुत यत्न करून अहमदनगरचे राज्यपदावर तुम्हांस कायम करितो असें उत्तर लिहावें म्हणोन सांगितलें. त्याप्रमाणें लिहिलें. तें उत्तर या मजकुराचें जेव्हां बुऱ्हाणशाहास पोहचलें तेव्हां हें खुशालबरीचें पत्र येऊन पोहचतांच पत्रांत लिहिल्याप्रमाणें अकबरशाहाची आज्ञापत्रें घेऊन व समागमें कित्येक फौज घेऊन दक्षिण देशाकडे येता झाला. जेव्हां असार येथें व बरहाणपूर येथें येऊन पोहचला तेव्हां खानदेशचा राजा आलीखान याणी सामोरे येऊन बुऱ्हाणशाहास बहुत समारंभानें शहरांत आणिलें. राजधानीचें सामान व पादशहीचे जरूर कारणीक पदार्थ जमऊन बुऱ्हाणशाहास तक्तावर बसविलें. हिरवे रंगाची छत्रें, म्हणजे मोरचेल व मोराच्या पंखाच्या आबदागिऱ्या वगैरे छत्रें, त्याचें मस्तकावर धरलीं. संपूर्ण मनुष्यांनीं मुजरा करून नजरा कराव्या असा राजा आलीखान याणी हुकूम केला. आपली फौज जमविणें व कामें करणें चालविलें. दिलावरखान यास बुऱ्हाणशाहा खानदेशास येऊन पोहचले येविषयींचे खानदेशचा राजा आलीखान याणी बुऱ्हाणशाहाचे साह्याविषयीं बहुत उत्तम प्रकारचा यत्न करण्याचें वर्तमान येऊन पोहचलें. तेव्हां दिलावरखान याणीहि बुऱ्हाणशाहाचे मदतीविषयीं तयार होऊन ईब्राहिम आदिलशाहाचे समागमें बहुत फौज घेऊन निजामशाहाचे मुलकाकडे चालता झाला. आदिलशाहाचे फौजेची बिनी शाहादुर्गचे किल्यासंनिध येऊन पोहचली तेव्हां आदिलशाहास शाहादुर्गचे किल्यावरील पाणी व हवा पसंद येऊन तेथेंच संतोष व आनंदांत त्याच आनंद वृध्धीकारक स्थानांत रहावें असें पृथ्वीपती आदिलशाहा पादशाहाचे मनांत आलें. पादशाहाची स्वारी कांहीं दिवस तेथेंच राहिली. दिलावरखानाचे मनांतील संकल्प या कामांत आपलीच प्रबलता व मजबुती व्हावी असा होता. यास्तव दिलावरखान याणी मनांत आणिलें कीं, आपले निसबतीचे लोकांपैकीं कोणास तरी विजापुरचे बंदोबस्ताचे

कामाचे मुख्त्यारीवर व विजापुरचे किल्याचे बंदोबस्तावर नेमावा. पादशाहाची मातुश्री सर्व काल माझा मतलब व माझे मनांतील विचार कांहींच सिध्धीस जाऊं देत नाहीं. यास्तव त्या मातुश्रीची व पादशाहाची फुटाफूट करून तिजला पादशाहापासून दूर ठेवावी असें मनांत आणोन चोरांचे व दरवडेखोरांचे जमातीस ईषारा म्हणजे सुचना केली कीं, विजापूर शहरांत दररोज रात्रीं घरोघर व हरएक दुकानांत दरवडे घालून सर्व लुटीत जावें. अशी सुचना केली. त्या प्रमाणे चोरटे लोकांचे जमातीनें केलें. शहरचे रहाणारांची सर्व मालमत्ता लुटून नेत होते. जेव्हां असा बहुत प्रळय होऊं लागला तेव्हां शहरचे राहणारे लोक रडत ओरडत निघोन व शिपाई लोक घाबरून व भयाभीत होऊन नित्य आदिलशाहाचे वाड्यांत येऊन फिर्याद करित होते. दिलावरखानाचे मनांतील संकल्प चालू झाला. तेव्हां दिलावरखान याणी पादशाहास विनंति केली कीं, रुमीखानाचे हातून शहरचा कांहींच बंदोबस्त होत नाहीं. चोरटे लोक रुमीखानास मानित नाहींत. सरकारचे मनास आल्यास माझे निसबतीचे लोकाचे, कीं जो कोणी शहरचे किल्याचा पक्का बंदोबस्त जसा असावा तसा ठेवणारा पाहून, मी नेमितो अशी विनंति केली. तेव्हां आदिलशाहा याणी आज्ञा केली कीं, रूमीखान हा पुरातन चाकर व कुटुंबांतील सेवक आहे. बरतर्फ करावयाजोगा नाहीं. त्याजलाच आम्ही ताकिद करितो म्हणजे हुशार राहून शहरांतील मालमत्ता लुटून नेणारे चोरट्यांचें चांगलें पारपत्य करील आणि कामाचा बंदोबस्त असा करील, कीं चोरटे लोकांचा उपद्रव शहरांतील रहाणारांस लागूं नये अशी रूमीखानास ताकिद करतो, म्हणोन पादशाहानीं आज्ञा केली. दिलावरखान याणी आपले कारणास्तव हें संकट उत्पन्न करून या प्रकारची विनंती केली होती. परंतु हा संकल्प सिध्धीस गेला नाहीं. यास्तव दिलावरखान निरोपाय झाला. विचार केला कीं, मीं विनंति केली परंतु रूमीखानास बरतर्फ करावयाचे नाहीं अशी पादशाहानीं आज्ञा केली. हे पादशाहाचे मातुश्रीचे सुचनेवरून अशी आज्ञा झाली आहे तेव्हां दुसरी युक्ती काढून आपले बायकामुलांस जमातीसुध्धां विजापूराहून लष्करांत बोलाऊन आणिलें. जेव्हां शाहादुर्ग येथून पुढें जाणेंचें ठरलें तेव्हां पादशाहाचे मातुश्रीस विनंति करविली कीं, आतां आपलें लष्कर शत्रुचे सामन्यावर पुढें चालून जात आहे. या कामांत परिणाम कसा होईल तो कळत नाहीं. मी देखील आपले बायकांमुलांस शाहादुर्गचे किल्यांत ठेविनो. आता त्या गोष्टींत बरें आहे कीं, शत्रुवर चालून जाऊन लढाई करून आम्हीं परत येईपर्यंत आपणहि ऐश्वर्यासहित शाहादुर्गचे किल्यांत राहावें, अशी विनंति केली. पादशाहाचे मातुश्रीनी ही विनंति कबुल केली नाहीं. दिलावरखानाची ही मसलत मोडून आज्ञा केली कीं, आपले प्राणप्रीय पुत्रापासून कदापि दूर रहाणार नाहीं. कालचक्राचे गतीनें जी माझी दशा होणार असेल तीच माझी होवो. दिलावरखानाची ही मसलत देखिल चालली नाहीं तेव्हां निरोपाय

होऊन खिन्न झाला. आपले बायकामुलांस शाहादुर्गाचे किल्यांत ठेऊन आपण आदिलशाहाचे स्वारी समागमें शत्रुचे फौजेवर चालून जाता झाला.

## २४. आदिलशाहा व निजामशाहाचा परस्परें सामना चालू होणें व पुन्हां आदिलशाहाचे फौजेचा मोड होणें व आदिलशाहास चिंता प्राप्त होणें :

जमालखान हापसी याणी बुऱ्हाणशाहाचा पुत्र ईस्माईल याजला तक्तावर बसऊन आपण खुद राजधानींतील मुख्य वकीली व पेशवा, म्हणजे मुख्य कारभारी, झाला होता. तो ईस्माईल निजामशाहाचे समागमें बहुत फौज घेऊन उभयता पादशाहाचे म्हणजे बुऱ्हाणशाहाचे व आदिलशाहाचे सामन्यावर जाऊन युध्ध करण्याकरितां अहमदनगराहून निघोन आधीं आदिलशाहावर चालून आला आणि आदिलशाहाचे लष्कराचे बरोबरीस येऊन आपले लष्करचे डेरे ठोकले. कित्येक दिवस परस्परें दररोज युध्ध होत होतें. उभयतांकडीलहि जमात त्या युध्धप्रसंगांकरून बहुत खराब होत होती. एके दिवशीं मोठे दारुण युध्ध झालें. प्रातःकाळपासून सायंकाळपर्यंत लढाई झाली. रात्र झाली तेव्हां उभयतानींहि पूर्ववत आपआपली फौज आवरून आपआपले लष्करचे मुकामाचे जाग्यांवर परत जाते झाले. दुसरे दिवशीं पुन्हां युध्धाचा अग्नि प्रदिप्त झाला व शस्त्ररुपी जाळें फिरूं लागलें. उभयतांकडीलहि शूर व जवानमर्द व बहादूर पुरुष वरचेवर हल्ला करित होते. शूर व पराक्रमवान पुरुष युध्ध ज्वलनतेंत शूरत्व व पराक्रम करित होते. शूरांचे रक्तानें घोड्यांचे सुंब तांबडे करित होते, म्हणजे घोड्यांचे सुंब रक्तांत बुडेत इतकें रक्त वाही. परिणामीं यशाचा वायू आदिलशाहाचे ध्वजाकडे वाहता झाला. निजामशाहाचे फौजेचा मोड होऊन परागंधा झाली. आदिलशाहाकडील हिंदु अमीरलोक सात आठ हजार शस्त्रधारी शूर स्वारांचे जमातीसुध्धां आदिलशाहाकडील फौजेपुढें चहूंकडून शत्रूची फौज वेढून लुटालुट करणेंकरितां नेमिले होते. या अमीरलोकांनीं निजामशाहाकडील फौजेंतील लुटालुट करून लुटीचे बहुत जिन्नस हस्तगत करून निघोन गेले. त्या लुटीचे मालापैकीं दोनशें हत्ती व दोन हजार घोडे होते. जमालखान त्या धांदलींत खुदावंतखानासहित, कीं तो खुदावंतखान जमालखानाचा जावई होता त्यासहित, ईस्माईलखानाचे समागमें त्या युध्धांतून एकीकडे फुटोन निघोन एके जागीं छपून राहिला होता त्या जमालखानास जेव्हां वर्तमान कळलें कीं, हिंदु अमीरलोक फत्ते झाल्यानंतर व लुटीचे बहुत जिन्नस हातीं लागल्यानंतर बाहेर निघोन गेले, आदिलशाहाचे बाकीचे लष्करहि निर्भयपणें व स्वस्थ चित्तानें लुटालुट करण्यांत निमग्न झालें, दिलावरखानापाशीं थोडीशी फौज राहिली आहे, फार जमात

नाहीं. अशी बातमी लागली तेव्हां तो जमालखान आपले धन्यासहित त्या छपून राहिलेल्या जाग्यांतून बांहेर निघोन हळूच चालू झाला. अशा समयांत ऐनुलमुल्क व आंकुसखान हे उभयतां दिलावरखानाचे मुख्यपणा व मालकपणाचे कारणास्तव त्रासले होते. यास्तव उभयतांनीं या युध्धांतून पाय बाहेर काढून, म्हणजे आपण उभयतां एकीकडे फुटोन राहून, दुसरीकडे जागा धरून राहिले होते. त्या उभयतांनी आदिल-शाहाची फत्ते झाली असें ऐकून फत्तेमंदीची मुबारकबादी घ्यावयाकरितां पादशाहा-पाशीं येऊन हजर होण्याचा ईरादा करिते झाले. आदिलशाहाकडे येते वेळेस वाटेंत जमालखानाची फौज भेटली तेव्हां परस्परें युध्ध चालू झालें. निजामशाहाचे फौजेची प्रबलता झाली तेव्हां ऐनुलमुल्क व आंकुसखान या उभयतांनीं पनांस साठ हत्ती व कित्येक घोडे व अमीरीचा कित्येक सामान सरंजाम जागचेजागीं टाकून अति सत्वर पळून गेले. तेव्हां प्रथम जमालखानाचे हत्ती व घोडे कित्येक सामान लुटींत गेले होतें व निजामशाहाचे फौजेचा मोड बहुत झाला होता आणि निराशा होऊन भयाभीत झाले होते त्या जमालखानाची फत्ते अनायासें ईश्वर कृपेकरून झाली. तेव्हां जमाल-खान यास बहुत संतोष व आनंद झाला. ही बातमी दिलावरखानास समजली आणि आपलें लष्कर परागंदा झालें आहे असें समजला. जमालखान आपलेवर चालून येतो असें जाणिलें तेव्हां दिलावरखान याणी तेथें दम धरून राहाणें अयोग्य असें जाणून जमालखानाचे देखत पळत निघाला. आदिलशाहा पादशाहापासीं येऊन पोहचून पादशाहास विनंति केली कीं, आपलेकडील लष्कर परागंदा व विस्कळित झालें आहे. गर्विष्ठ व अभिमानी, म्हणजे ऐनुलमुल्क व आंकुसखान, यांचा मोड झाला. शत्रु लोकांस पुन्हां बळ चढून शत्रूकडाल फौजेनें बळ बांधिलें. आतां तेथें ठरून राहण्यांत उपयोग नाहीं. अशी विनंति करून आदिलशाहाचे समागमें तेथून चालू झाला. जेव्हां आपले लष्कराचे मुकामाचे जाग्यांत येऊन पोहचले तेव्हां तेथें येऊन पाहिलें तो बाजारबुणगे व किरकोळ खटले संपूर्ण निघोन गेले आहेत. असें पाहिलें तेव्हां तेथूनहि निघोन शाहादुर्गास येते झाले. सारी रात्र अरण्यांत व डोंगरांत भकलून फिरून अठरा कोस मजल काढून थकून व बेजार होऊन दुसरे दिवशीं दोन प्रहरीं दिवसास शाहादुर्गास येऊन पोहचले. यद्यपि आदिलशाहाची वाट चालण्यामुळें डोंगर चढता व उतरता खाचखळग्यांत अंधारे रात्रींत घाबरेपणानें व जलदीनें चालण्यानें कांहीं सामानसरंजाम वाटेंतच गहाळ झाला व कांहीं ओझें फार, सबब ओझींच्या ओझीं जागोजाग पडलीं. याजकरितां बहुतेक मनुष्यापाशीं कांहींच सामानसाहित्य नाहीसें झालें होतें. येथपर्यंत कीं, दिलावरखानाचे पुत्राचे देखील निजावयाचे तंबू राहुट्या वगैरे कांहीं एक आलें नव्हतें. शहर व वस्तीची जागा नजिकच होती. कसेंहि करून रातोरात चालून सर्वांनीं मिळोन एके ठिकाणीं रात्र गुजरली. तों सर्वांकरितां सर्व सामानसरंजाम विजापुराहून येऊन पोहचला. तिकडे ईस्माईल निजाम-

शाहाहि थोडेसे फौजेसुध्दां लढाईचे जाग्यावर बहुत भयाभीत होऊन सारे रात्र जागून सर्वांनीं अन्नापाण्याशिवाय रात्र घालविली. निजामशाहाकडील सर्वांस आंथरूण पांघरूणें घोड्याचे व हत्तीचे झुलीशिवाय दुसरे कांहीं एक नव्हतें.

## २५. जमालखान याणी ईस्माईलशाहाचे समागमें फौज घेऊन बुऱ्हाणनिजामशाहावर चालून येणें व जमालखान व खुदावंतखान याणी कत्तल होणें, म्हणजे ठार होणें :

जेव्हां ईस्माईल निजामशाहा याचा मुख्य कारभारी जमालखान मेहदवी यास वर्तमान कळलें कीं, आदिलशाहाचे फौजेचा कालचक्राचे उलटण्यानें मोड होऊन युध्धाचे जाग्यापासून माघारे फिरून शाहादुर्गास जाऊन पोहचले अशी बातमी कळली तेव्हां जमालखान याणी आपले कामाचा उपयोग त्या गोष्टींत पाहिला कीं, तेथून परतून विजेसारखे व वायुप्रमाणें जलदी करून अहमदनगराकडे धाऊन जाऊन फौजेच्या लढाईचे सामान सरंजामाचो तयारी अहमदनगर येथून करून बुऱ्हाणशाहावर येलगार करण्याकरितां चालून जावें. बुऱ्हाणशाहाचे साह्य करण्याकरितां आदिलशाहा येऊन पोहोचला नाहीं तों बुऱ्हाणशाहाचें काम आटपून, म्हणजे बुऱ्हाणशाहास जीवें मारून, मधीऌ व्याधी काढून टाकावी. असा संकल्प करून तेथून अति सत्वर अहमदनगरास गेला. तेथें जाऊन शस्त्रांची व लढाऊ सामानसरंजामाची जी तयारी होती तितकें सामान घेऊन वऱ्हाड देशावर चालू झाला. त्या आधींच बुऱ्हाणशाहा याणी राजा आलीखान यासहित वऱ्हाडचे अमीरलोक व सरदारहि जितके त्या सरहद्दींत होते त्यासुध्धां जमालखान यास खबर न लागूं देतां आपल्याशीं मिळऊन घेऊन त्या अमीरलोकांस व सरदारांस नाना प्रकारच्या वायदे मुदती करून, म्हणजे आपण सर्वांनीं माझा उपयोग केल्यास मीहि तुमचा बहुत उपयोग करीन अशी त्यांजला आशा लावून, ते लोक आपलेसें करून घेतले होते. दिलावरखान याणी दहा हजार स्वार कमानदार, म्हणजे शूर संधान करणारे व युध्ध करणारे व लढाईंत माघारे न फिरणारे असे शूर, शाहादुर्गाहून बुऱ्हाणशाहाचे पाठीमागून रवाना केले. मजबूत ताकिद केली कीं, अति सत्वर जाऊन बुऱ्हाणशाहाचे फौजेंत मिळून जमालखानाचा निर्मूळ फडशा करण्यांत अति यत्न करावा. या प्रकर्णी कोणतेहि सबबीनें तुम्हीं अंतर करूं नये अशी ताकिद केली. जमालखान याजला आदिलशाहाची फौज बुऱ्हाणशाहाचे साह्यार्थ बुऱ्हाणशाहाचे पाठीवर रवाना झाली आहे असें वर्तमान कळलें. तेव्हां जमालखान याणी अति जलदी करून मजलीच्या मजली काढून आदिलशाहाची फौज येऊन पोहचण्यापूर्वी चार पांच दिवस आधींच

बुऱ्हाणशाहाचे लष्कराचे आसपास येऊन पोहचला. तेथें वर्तमान कळलें कीं, वराडचे अमीरलोक व त्या सरहद्दींतील संपूर्ण सरदार लोक बुऱ्हाणशाहाची आज्ञा पालन करून बुऱ्हाणशाहाचे समागमें युध्याविषयीं सामन्यावर सिध्ध झाले आहेत. असें वर्तमान कळतांच येणेंकरून जमालखानाची मोठी निराशा झाली व उमेद खचली. सारांश, जमालखान आपले प्राणावर उदार होऊन मरणास सिध्ध झाला. दीपावर पतंग पडतात त्याप्रमाणें बुऱ्हाणशाहाचे कलब म्हणजे मध्यभागाचे फौजेवर येऊन पडला. रुस्तुमाप्रमाणें व मोठे पराक्रमवान शूराप्रमाणें युध्य करिता झाला. साला म्हणजे रुस्तुमाचा आजा व त्रिमान म्हणजे रुस्तुमाचा पणजा याचे युध्य कांहींच नव्हे अशी लढाई करिता झाला. पारसी अर्धें बैतेचा अर्थ : "कालचक्र म्हणालें कीं, शाबास व फिरीश्ते बोललें कीं, वाहवा" असें युध्य केलें कीं, बुऱ्हाणशाहाचे कलब म्हणजे मध्यभागाची फौजेची फळी मोडली व मैमाना व मेसरा म्हणजे डावे व उजवे बाजूचे फौजेसहि तोडातोडी केली. बुऱ्हाणशाहास जीवें मारावें असा समय संनिध आला होता. तोंच एकाएकीं आदिलशाहाची फौज ईकडून व राजे आलीखान याची फौज तिकडून येऊन पोहचली. ईस्माईल निजामशाहाची फौज चोहीकडून वेढिली तेव्हां जमालखान याणी आपला जावई खुदावंतखान यासुध्धां या उभयानींहि त्या भयंकर युध्य प्रसंगांत जीवाची आशा सोडून वेड्यासारखे हल्ला करूं लागले. हे उभयता म्हणजे जमालखान व खुदावंतखान जिकडे जिकडे दौड करित होते तिकडे तिकडे मोठे मोठे शूरांस ठार करित होते. जमालखान व खुदावंतखान याणी बहुत यत्न केला कीं, कोणीकडून तरी वाट मिळावी, म्हणजे या युध्यांतून बाहेर पळून जाऊं. परंतु पळावयास सामर्थ्य झालें नाहीं. शेवटीं जमालखान व खुदावंतखान या उभयतांवर मोठा प्रसंग आला. स्वार म्हणजे घोड्यावरील मनुष्यें व घोडे असे दोनहि थकले. तेव्हां त्या युध्यांत ब्रम्हलिखिताप्रमाणें म्हणजे अमके दिवस अमका मनुष्य वाचेल व अमुक कारणानीं अमुक जागीं मरेल असें सर्वांचे कपाळीं ब्रम्हदेवानें लिहिलें आहे, त्या लेखाप्रमाणें घातक तीर जमालखानाचे कपाळावर येऊन लागला. तेणेंकरून खराबीचे मृत्तिकेवर पडला, म्हणजे जमालखान याचे मस्तकावर जखम झाली तेणेंकरून तो मरण पावला. शूरांनीं जमालखान व खुदावंतखान याची मस्तकें कापून बुऱ्हाणशाहाचे घोड्याचे सुंबापुढें आणून टाकिलीं तेव्हां जमालखानाची बाकीची फौज परागंदा झाली, म्हणजे पळून गेली. ईस्माईल-शाहाचे घोड्याचा लगाम धरून त्याचे बापाचे म्हणजे बुऱ्हाणशाहाचे पायापासी आणून सोडला तेव्हां बुऱ्हाणशाहा याणी अति कळवळून व बापाचे ममतेचे चालीनीं आपला पुत्र ईस्माईलशाहा याजला पोटाशीं धरून परस्परें मस्तक हुंगलें. कारण कीं, आपला नातलग युध्यांतून वांचून भेटला म्हणजे वडिलानीं त्याचें मस्तक हुंगावें, म्हणजे पुनर्जन्म झाला असा भाव आहे, या प्रमाणें केलें आणि उभयता बहुत

संतोषानें चमले. राजा आलीखान खानदेशचा पादशाहा याणी त्या युध्धांत व त्या धांदलींत दोनशें हत्ती, दोन तीन हजार घोडे व आणखी बहुत सामान सरंजाम लुटून सात आठ कोस दूर जाऊन उतरला. या अंदेशानें दूर जाऊन राहिला कीं, बुऱ्हाणशाहाची दौलत फार वाढली व बुऱ्हाणशाहापाशीं फौजहि बहुत जमली आहे यास्तव न जाणो आपल्यावर चालून येईल आणि हत्ती, घोडे व सामान सरंजाम लढाईंत लुटून आणिले आहेत ते परत घेईल. या संशयास्तव राजा आलीखान दूर जाऊन उतरला. बुऱ्हाणशाहा याणी या गोष्टीविषयीं डोळेझांक करून, म्हणजे ही गोष्ट मनांत न आणितां, कित्येक उत्तम पदार्थ नजर नजराणा वगैरे राजा आलीखान याजकडे पाठऊन चालता झाला. अहमदनगरास उत्तम समई पोहचून तेथील तक्तावर बसला.[८] राजधानीचा लगाम निरोपद्रविक, म्हणजे दुसरे कोणाचाहि उपद्रव नाहीं असा, आपले मुखत्यारीचे हातीं आणिला, म्हणजे आपण स्वसत्तेनेंच कारभार चालविला. आपला पुत्र ईस्माईल याजला लुहागडचे (लोहगडचे) किल्यावर, कीं त्या किल्यावरचा ईस्माईल याचा बंधु ईब्राहिम म्हणोन कैद झालेला होता तेथेंच, ईस्माईल याजला कैद केला.

## २६. ईब्राहीम आदिलशाहा याणी दिलावरखान याचें पारपत्य करणें प्रकर्ण :

जेव्हां दिलावरखान याणी आपले कामाचा असा पक्का मजबूत बंदोबस्त केला, कीं त्याप्रमाणें कोणी करितील असा संशय देखील नसेल असा केला. ईब्राहीम आदिलशाहापाशीं संपूर्ण आपले निसबतीचे लोक ठवीले. राणीचे महालाकडील सर्व चाकरीच्या बायकांमुलांसुध्धां पाजणाऱ्या दाया देखिल आपले निसबतीच्या ठेविल्या. सरकारचे दरबारांतील कारकून व कामदार दिलावरखानाचे चाकर झाले होते. त्याची आज्ञा पालन करून होते, येथपर्यंत कीं एकेका मनुष्यास देखिल पादशाहापाशीं दिलावरखानाचे कोणी नसता विनंति करण्यास प्रवेश नव्हता. याजकरितां दिलावरखान याचें पारपत्य करणेस सर्वोतोपरी कठीण झालें तेव्हां पादशाहा याणी दिवस कठीण व प्रसंग विपरित व दिलावरखान याची वागणुक व बेआदबी फार बहुत दांडगेपणा व माजुरपणा यास्तव जलदी न करितां सबुरी करून ईश्वराचे कृपेचे ईच्छेनें चिंतेचीं अक्षरें आपले चित्ताचे चित्ताचे पाटीवरून पुसून टाकित होता, म्हणजे आपले चित्तास समाधान ठेवित होता. आरबी बैतेचा अर्थ : " ईश्वरावर भरंवसा ठेवितात त्यांजला अन्य प्रयोजन म्हणजे ईश्वराशिवाय ईतराचे आर्जव करण्याचें कारण पडत

८. ९१८ हि.– १५८९ इ. स. – ब्रि. फे. ३, पृ. २७८–८४, १६३–६६.

नाहीं ", या वाक्याप्रमाणें ईश्वराचे आधारावर पूर्ण भरंवसा ठेऊन ईश्वरापाशीं यशाची प्रार्थना करित होता. या स्वारींत दिलावरखान याणी फारच दांडगेपणा केला व गर्व व आभिमान जो झाला होता त्यास अंतर नाहीं. यावरून पादशाहाचें चित्त दिलावर-खानाचे पहिले व हलीचे अमार्ग वर्तणुकीनी व बदचालीनी अत्यंत दुखवलें व फार त्रासलें. दिलावरखानाचे पारपत्य करण्याचा संकल्प व दिलावरखानाचे पीडेंतून आपली सुटका होण्याचा विचार करिता झाला. संधी साधण्याची मार्गप्रतीक्षा करित होता. हली या लढाईत मोड झाला येणेंकरून पादशाहास फारच खिन्नता व बहुत चिंता प्राप्त झाली. दोनशें हत्ती व पांच हजार घोडे आणि पादशाहीचा सरंजाम दिलावरखान याचे व त्याचे पुत्राचे योगानें लुटींत जाऊन खराबी झाली. दिलावरखान यास सर्व मनुष्यें येथपर्यंत दूषण ठेवित होती व बदचालीचा खराब मनुष्य म्हणोन नांवे ठेवित होती कीं, दिलावरखान बाजारांतून जात होता तेव्हां महा थोर व वृध्ध पुरुष मोठ-मोठ्यानें ओरडून दिलावरखानास दूषणें ठेवित होते. शिव्या देत होते. कारण कीं, दिलावरखान मुख्त्यारीनें काम करित होता. परंतु पादशाहाची दिलावरखानावर ईतराजी आहे व दिलावरखानास पादशाहा फार त्रासला आहे हें वर्तमान गावांतील सर्व मनुष्यांस कळलें होतें. यामुळें सर्वत्र निर्भयपणें दिलावरखानास शिव्या देत होते. पादशाहा येथपर्यंत त्रासले होते कीं, दिलावरखानास कामांतून काढून टाकावा असें चित्तांत वागवित होते. पादशाहानीं ईश्वरी मनोगत जाणोन या संधींत दोन सेवक हिंदु जातीचे, कीं त्या दोघे सेवकांस कोणीच ओळखित नव्हते व सेवक पादशाहाचे मातुश्रीपासी चाकरीवर होते, त्यांजला गुप्तपणें एनुलमुल्क कनआनी, म्हणजे कनआन देशचा राहणारा, मोठा अमीर होता व आंकुसखान व आलीखान, कीं हे तिघेही अमीरलोक दिलावरखानास कंटाळले व त्रासले होते, त्या तिघां अमीरलोकांकडे पाठविले. निरोप सांगून पाठविला कीं, त्या बेमानाचे, म्हणजे दिलावरखानाचे, गर्वानीं व माजुरपणानीं हलीं आमचें चित्त फार त्रासलें आहे. कारण कीं, दिलावरखान याणी आपला मतलब सिध्धीस नेणेंकरितां बहुत दिवस आम्हांस हरएक कारणानीं रानांत व अरण्यांत फिरवित आहे. कोणतेंहि कामाविषई आम्ही त्याजला आज्ञा केली असतां बहुत यत्न करून आम्हांसी निग्रह करून आज्ञा मोडतो. याचे कारभाराचे योगानें कामाचे परिणामीं राजधानींतील सामान सरंजाम हत्ती व घोडे वगैरे सर्व लुटींत घालविले आणि सांप्रतहि अद्यापि गर्व व अभिमानानीं सर्वांस इजा व दुःख देत आहे. तुम्ही तिघेही या दौलतींतील पुरातन सेवक आहांत. आमचे बाप व आज्या-पासून सेवा करित आलात. इकडील दौलतीचे निरंतर कल्याण इच्छून इमानी वागत आलात. हलीहि जसें इमानास येईल व ज्यांत कीर्ति राहील तें करावें. जर करितां तुमचे सलंस आल्यास आम्ही तुम्हापासी येऊन पोहचतो. कारण कीं, तुम्ही इमानी व विश्वासू आहांत. आम्ही तुम्हापाशीं येऊन पोहचलो म्हणजे तुम्ही व आम्ही मिळून

दिलावरखानाचें पारपत्य करण्याचा यत्न करूं. ‘हिंमत मर्दा व मदत खुदा’ अशी म्हण आहे. ती सत्य आहे कीं, दिलावरखानाचें पारपत्य याच समई आम्ही करित नाहीं तें याच वाक्यावर हिंमत धरून तुम्हाला कळविलें आहे. याच समई शाहा-दुर्गास राहून दिलावरखान याचें पारपत्य करावें तर तो विजापुरास जाईल. तथील किल्ला हस्तगत करून आम्हांस निम्खालस जेरीस आणील. ईश्वर जाणें कीं, तो तुमची कशी दशा करील हेंहि कळत नाहीं. असा निरोप ऐकून ऐनुलमुल्क याणी पादशाहाची बहुत तारिफ व स्तुती करून बोलला कीं, सरकारची मर्जी जर करितां दिलावरखानाचे बदचालीवरून व अमार्ग वर्तणुकीच योगानीं त्रासली असल्यास व सरकार दिलावर-खानाचे दांडगेपणानीं व अयोग्य कर्मानीं कंटाळलें असल्यास ‘आलहम दुलिल्लाह,’ म्हणजे आम्ही सिध्द आहों. आम्ही आपले इमानी चाकर लोक आहों. आम्हां सेवकांकडे सरकार स्वारी येऊन आम्हांस थोरपणा द्यावा व आम्हीं दिलावरखानाचे अयोग्य वागणुकीचा बदला, म्हणजे सुड, कसा घेतो हें स्वामीनीं अवलोकन करावें अशी बोलणीं झाल्यानंतर असा करार ठरला कीं, माहे रजबचे पंधरावे तारिखेचें (९ मे १५९०)[९] रात्रीं, कीं सदरहु तारिखेची रात्र हरएक कामास यशस्वी व उत्तम फलदायक आहे त्या रात्रीं, प्रातःकाळींचे अरूणोदयाचे पहाटेची निमाज पढणेचें वेळेस व ईश्वरी स्मरण करण्याचे समई तिघेहि अमीरलोकानीं आपआपली फौज तयार करून पादशाहाची स्वारी येण्याची मार्गप्रतीक्षा करित होते, कीं त्याच समई पाद-शाहानीं आपले वाड्यांतून म्हणजे तबूंतून निघोन ईकडे यावें, अशी वाट पाहात होते.

## २७. आदिलशाहा याणी करार ठरल्याप्रमाणें सदरहु तारिखेचे रात्रीं त्या तिघे अमीरलोकांकडे जाणें व दिलावरखान याणी आपले पुत्रासहित पळून जाणें :

आदिलशाहा करार ठरल्याप्रमाणें सदरहु रात्रीं प्रातःकाळचे दोन घटका रात्रीचे सुमारें वाड्यांतून म्हणजे तंबुंतून बाहेर निघाले. पादशाहानीं आपले मनांतील मसलत कोणास सांगितली नाहीं. कफषदारखान, म्हणजे जोडे उचलणारा, हा सरकारचे हुजऱ्यापैकीं सेवक होता. त्याजला आज्ञा केली कीं, आमचा बसावयाचा घोडा आण. अशी आज्ञा केली तेव्हां कफषदारखान याणी मोतददारास ताकीद केली कीं, सरकारचा बसावयाचा घोडा जलद आण. तेव्हां मोतददार याणी तो हुकूम न ऐकतां बोलला कीं, दिलावरखानाचे हुकमाशिवाय घोडा आणतां येत नाहीं. असें बोलला तेव्हां कफषदारखान याणी तीळमात्र अवकाश न करितां जलद मोतददाराचे अंगावर धाऊन

९. ब्रि. फे. ३, पृ. १६७–८.

येऊन मोतद्दाराचे तोंडावर अशा जोराने चपराकी मारिल्या कीं, त्या मारण्यानीं मोतद्दार बेशुध्द होऊन पडला. तेव्हां दुसरे मोतद्दारानीं ही अवस्था या प्रकारची पाहिली तेव्हां सर्व मोतद्दारानी सर्व घोडे तयार करून आणलें. तेव्हां पादशाहा हुजुरे मंडळासहित घोड्यावर बसून वाड्यांतून म्हणजे तंबूंतून बाहेर आले. आलीयासखान म्हणोन पादशाहाचे दाईचा भतार होता. तो त्या रात्रीं पादशाहापाशीं पाहाऱ्यावर होता. त्याणे पादशाहा निघतात असें ओळखून पादशाहापुढें धावत आला. पादशाहास कोठें निघालात असें विचारिलें. तेव्हां पादशाहानीं आज्ञा केली कीं, ही वेळ बोलण्याची नव्हे. तूं आपले निसबतीचे लोकांसहित घोड्यावर बसून आमचे स्वारीबरोबर चल. तेव्हां आलीयासखान आपले निसबतीचे स्वार घेऊन स्वारी समागमें निघाला. आलीयासखान याचे निसबतीचे स्वार शंभरास कांहीं कमी होते तितके घेऊन निघाला. जेव्हां तंबूपुढील बाजारांतून स्वारी बाहेर जाऊन ऐनुलमुल्क, आंकुसखान व आलीखान यांचे लष्कर उतरलें होतें त्या जाग्याचे आसपास, कीं तेथून त्या तिघांचें लष्कर सरासरी अर्ध कोस राहिले होते, तेथपर्यंत पादशाहाची स्वारी जाऊन पोहचली. तेव्हां ते तिघे अमीरलोक प्रथमचे सुचनेप्रमाणें तयार होऊन तात्काळ आपआपली तयार फौज घेऊन पादशाहापाशीं येऊन पोहचले. पादशाहाचे डावे व उजवे बाजूस ओळी धरून उभे राहिले. तों त्याच वेळेस शाहादुर्गांत सर्वांसह पादशाहाची स्वारी निघोन गेली असें कळलें तेव्हां खास मंडळ, जरीपटक्याकडील व निपाणाकडील लोक, कचेरींतील कामदार, सरनौबत वगैरे लोक जे पादशाहाचे डेऱ्यांत बसले होते व त्या संपूर्ण मंडळांत रफिउद्दीन षिराजी व महंमद कासम हे उभयताहि होते ते संपूर्ण हत्यारबंद व तयार होऊन पादशाहाचे सेवेंत, म्हणजे पादशाहाकडे, परत निघाले. या प्रकारें कीं, या रात्रीं तेच घटकेस पादशाहापाशीं तीन हजार लोक जमले. कित्येक हत्ती रस्त्यांत उभे केले. कारण कीं, जर करितां दिलावरखान चालून आल्यास त्यावर हत्तीनें गर्दी करून हत्तीचे पायाखालीं चिरडून टाकावा. यास्तव उभे केले होते. दिलावरखान या रात्रीं, कीं दिलावरखानाचे वय ऐंशी वर्षांहून अधिक झालें होतें असें असतां दिलावरखान, एका दक्षिणी मनुष्याचे लेकीचे रुपाचें वर्णन ऐकून ती मुलगी प्रत्यक्ष पाहिली नसतां वर्णनावरूनच त्या मुलीवर आषक्त, म्हणजे मोहित, झाला होता. तो दिलावरखान पादशाहाची स्वारी निघोन गेली, त्या रात्रीं त्या मुलीस आणून एकांतीं क्रीडा, म्हणजे विषयविलास, करित होता. त्यानंतर पादशाहा वायुसारिखे जलद चालणारे घोड्यावर बसून बाहेर निघोन गेले तेव्हां दिलावरखान याणी नवा पाहुणा आणोन, म्हणजे नूतन परस्त्री आणोन, त्या स्त्रीसी क्रीडा करित दिलावरखान भ्रांतीचे बिछान्यावर त्या स्त्रीसहित आपले निद्रिस्त देवाप्रमाणें निजला होता. उभयतांसहि झोंप लागली होती. दिलावरखान याजपाशीं सर्वकाळ सन्निध राहणारे चाकर लोकांनीं बहुत यत्न करून दिलावरखानास जागें

करून पादशाहाची स्वारी सरकारी तंबूचे डेऱ्यांपुढील बाजारांतून निघोन गेल्याचें सविस्तर वर्तमान त्याजला कळविलें. तें वर्तमान कळतांच दिलावरखान व त्याचे पुत्रांनीं तात्काळ स्वारीची तयारी करून पांच हजार स्वार व बहुत हत्ती घेऊन अरुणोदयाचे समई म्हणजे प्रातःकाळचे दोन घटका रात्रीचे सुमारस पादशाहाकडे या संकल्पानें चालू झाले कीं, खासे मंडळ व निपाणाकडील कामगार व अमीरलोक जे पादशाहाचे स्वारीसमागमें गेले होते त्याणी दिलावरखानाचे जरबेनें भयाभीत होऊन पादशाहास सोडून देऊन पळून जाऊन पादशाहास दिलावरखानाचे हवालीं करून द्यावा. दिलावरखान याणी पूर्ववत मुख्त्यारींनें कारभार पहावा. याजकरितां चालून गेले. जेव्हां दिलावरखान मोठे बंदोबस्तानें व बहुत दबदब्यानें ऐश्वर्य घेऊन संन्निध जाऊन पोहचला तेव्हां आपली फौज एक तीर मारण्याचे अंतरानें ठेऊन आपण खुद जातीनें शंभर स्वारांनिशीं व चार हत्ती उत्तम घेऊन नजिक जाऊन पोंहचला. पादशाहानीं दिलवरखानास न येऊं देण्याकरितां व आला असतां तुडवून मारण्याकरितां रस्त्यावर हत्ती उभे केले होते. परंतु हत्तींचे महातांस दिलावरखानाचे जरबेपुढें दम निघेना तेव्हां सर्व महात हत्तींस घेऊन वाट सोडून एकीकडेस झाले. तेव्हां दिलावरखान पादशाहाचे संन्निध येऊन घोड्यावरून न उतरतां वर बसूनच बहुत अमर्यादेनें व पूर्ण दांडगेपणानें बोलणेस आरंभ करून पादशाहास विचारिता झाला कीं, इतक्या रात्रीं या समईं कोणाचे सांगण्यावरून, म्हणजे कोणास विचारून व कशाकरितां बाहेर निघोन आलात. हे फार अयोग्य कर्म केलेत. हें कांहीं चांगले नव्हे. आपण आतांच परत आपले डेऱ्यास चलावें. असें बोलला तेव्हां पादशाहा हें अमर्याद भाषण ऐकून क्रोधानें संतप्त झाला. दिलावरखानास कांहीं एक उत्तर दिल्हें नाहीं. आपले जवळचे लोकांस आज्ञा केली कीं, काय पहातां, या अमर्याद पुरुषाचे पारपत्य करा. अशी आज्ञा केली तेव्हां पादशाहाचे लष्करापैकीं खाशा जरीपटक्याकडील कामगार, कीं त्याचे नांव आदबखान[१०] असें होतें तो, आदबखान अशी आज्ञा होतांच विजेप्रमाणें जलद आपला घोडा उठवून दिलावरखानावर तरवार मारली. यद्यपी त्या तरवारीची जखम दिलावरखानावर लागू झाली नाहीं तत्रापि दिलावरखान धैर्य धरून भयाभित झाला असतां घोड्याचा लगाम माघारा फिरविला नाहीं. तेथेंच उभा राहिला. तेव्हां आदबखान याणे मनांत आणिलें कीं, पुन्हां दिलावरखानावर तरवार चालवावी. असें चित्तांत ठरऊन तरवार मारण्यास हात उगारला तों त्या तरवारीचे चमकण्यानेंच घोडा दोन पायावर चक्री येऊन दिलावरखान घोड्यावरून पडला. तेव्हां दिलावरखानाकडील हत्तीवरील महातानीं इमानावर नजर ठेवून हत्ती पुढें आणिला. दिलावरखानाचे व आदिलशाहाकडील लोकांचे मध्यभागीं उभा केला. कारण कीं, मधें हत्ती उभा केला म्हणजे पादशाहाकडील लोकांचा उपद्रव न होतां दिलावरखानास

१०. Adeena khan – ब्रि. फि. ३, पृ. १६८.

फुरसत सांपडून घोड्यावर बसवावयास अवकाश पडावा. याजकरितां मधें हत्ती घातला. दिलावरखानाचा जांवई शाहा अहंमद सिफवी याणी आपला घोडा दिलावरखानास घोड्यावर बसण्याकरितां संनिध्र आणिला आणि सांगितलें कीं, या घोड्यावर बसून या फौजेंतून जलद बाहेर निघा. कारण कीं, हा येथें उभा राहण्याचा समय नाहीं. त्यावरून दिलावरखान घोड्यावर बसून बाहेर निघोन गेला. दिलावरखान याचे फौजेनीं ही अवस्था पाहून चिलटें उडून जातात त्याप्रमाणें तात्काळ परागंदा होऊन पळून गेली. तेव्हां दिलावरखान आपले दोघे पुत्र, अहंमदखान व खैरतखान यांसहित बेदरास जाता झाला. तेथून अहमदनगरास बुऱ्हाणशाहा पादशाहाकडे निघोन गेला. तेथें जाऊन पोहचला तेव्हां बुऱ्हाणशाहानें दिलावरखानास बहुत योग्यता देऊन अमीरीचें पद दिलावरखानास दिलें. कोणतीहि मसलत दिलावरखानास विचारिल्याशिवाय करित नव्हता. कचेरींतील सर्व कामदारापेक्षां दिलावरखानासी मित्रता ठेविली. दिलावरखानाचा तिसरा पुत्र कमालखान म्हणोन होता तो त्या दिवसांत पळून गेला होता. त्याजला दुसरे दिवशीं मृत्यूनें परत ओढून आणिला. तो कमालखान पूर्ण विश्वासानें पूर्ववत पादशाहाचा लोभ असेल असें जाणोन विजापुरचे पादशाहाचे लष्करासंनिध्र येऊन पोहचला. विजापुर सरकारचे कामदारांस ही वातमी लागली तेव्हां तेच वेळेस स्वारशिबंदीची जमात त्याजवर पाठऊन कमालखानास[११] ठार मारिला.

## २८. आदिलशाहा याणी पूर्ण संतोषानीं व मनोरथपूर्ण होऊन आपले डेऱ्यास परत येणें व आपले राजधानीचे तख्तावर बसून पूर्ण मजबुतीनें राजधानीचा कारभार चालविणें :

कालचक्रानें आपले हातानें उपद्रवाचा कांटा, तो गृहस्थ बेमान आपले धण्यावर बदलणारा व फिरून पडणारा म्हणजे दिलावरखान, आदिलशाहा पादशाहाचे दौलतीचे पदरांत होता तो उपटून काढला, म्हणजे दिलावरखान निघोन गेला. त्यानंतर तिघेहि अमीरलोकांस भारी किंमतीचे पोषाख दिले. बक्षीस व इनाम देऊन संतोष केलें. मोठे प्रातःकाळींच ऐश्वर्य व दौलतीसहित पूर्ण विजयी होऊन फौजेसहित बहुत थाटानीं संतोष व आनंदयुक्त पादशाहाची स्वारी आपले डेऱ्यांत येती झाली. डेऱ्यांत येऊन पादशाहा पूर्ण मनोरथानें तक्तावर बसले. एकांत स्थळीं गैर राबत्यांत बसावयाचा पाठ होता तो बंद करून सर्वांस यावया जावयास राबता खुला केला. तेव्हां सर्व मनुष्यें अति नम्रतेनें व बहुत लिनतेनें श्रेष्ठ ईश्वराचे देवडींतील मातीवर कपाळ

११. दारासुन येथें– ब्रि. फि. ३, पृ. १६९.

दारासूं = दारासिंव = धाराशीव = उस्मान

घासून, म्हणजे सर्वांनी ईश्वरास मुजरा करून ईश्वराचा स्तव करिते झाले. नंतर पादशाहास सर्व मुबारकबादी, म्हणजे पादशाहा तक्तावर बसून नवीन राज्य कारभार चालवितो त्या समई सर्वांनीं पादशाहाच्या स्तव करावा व चहूकडोन पादशाहाचे स्तवाची पत्रें यावींत यास मुबारकबादी असें म्हणतात ती मुबारकबादी, देते झाले. पादाशाहापुढें सर्वांनीं नजरा केल्या. ज्या दिवशीं प्रातःकालाचे रात्रीं पादशाहाची स्वारी बाहेर निघोन गेली होती त्या रात्रीं ज्या ज्या मनुष्यांनीं पादशाहाचे दौलतीचे कल्याणार्थ यत्न केले व प्रसंगीं कामाचे उपयोगी पडले त्या त्या मनुष्यांस बहुत बक्षीस पोषाख व द्रव्य देऊन संतोष केलें. दुसरेहि कित्येक लोक जे दौलतीचें कल्याण इच्छिणारे राजधानींत होते त्या हरएक मनुष्यास योग्यतेनुरूप कामावर व पदाधिकारावर कायम केलें. याच दिवशीं पादशाहाचे कल्याणप्रद दौलतींतून हरामखोर लोक पळून गेले. नंतर बुऱ्हाणशाहाची फत्ते झाल्याचें व जमालखान ठार झाल्याचे वर्तमान येऊन कळलें तेव्हां इनसाफवान पादशाहांनीं बुऱ्हाणशाहास मुबारकबादीचीं पत्रें पाठऊन आपण उत्तम समई विजापुराकडे निघोन तारीख २२ माहे रजब सन ९९८ (१७ मे १५९० इ. स.) रोजीं येऊन दाखल झाले.

## २९. त्या दिवशीं चमत्कारिक प्रकर्ण झालीं तें वर्णन :

त्या दिवशीं मोठी फत्ते झाली तेव्हां पादशाहा दरबारांतून, म्हणजे कचेरींतून, खासे महालांत गेले. तेव्हां चमत्कारिक काम होतें ते घडण्यांत आलें व तें काम हें आहे कीं, दिलावरखान हा हानफी धर्मांचा होता. त्याणी षिआचा धर्म बरतर्फ करून, म्हणजे वर्ज्य करून, आसहाब, म्हणजे पैगंबरासंन्निध राहाणाराचे, नांवें खुतबा पढणें ठरविलें होतें. तेव्हां बहुतेकांस हा संशय होता कीं, पादशाहा हानफी धर्मांचा आहे. कित्येकांस असा संशय होता कीं, जेव्हां या पादशाहाचा श्रेष्ठ चुलता व कीर्तिमान बाप, कीं त्याचें नांव आली आदिलशाहा तहमासीप म्हणोन होते, हे षिआ धर्माचे होते. तेव्हां हे पादशाहाहि बुध्वा चुलत्याचे व बापाचे चालीचेच होतील. षिआ धर्मांची चाल खास आहे असें सर्वांस सत्य वाटलें. सर्वांनीं निश्चय केला कीं, पादशाहा षिआ धर्मांचेच आहेत तेव्हां सुनी धर्मांचे बहुत लोक त्या समयांत षिआ धर्मांचेच आम्ही आहोंत असें बाह्यात्कारीं दाखवित होते. बहुतेकांनीं यत्न केला कीं, बांग देणारे लोकांनीं त्या दिवशीं दोन प्रहरचे निमाजीचा बांग षिआ धर्माचे मार्गांनीं दिल्हा. 'आषाहा दो आंना आली यजूवली युल्लाहा' असा कलमा बांग देण्यांत दाखल केला. पादशाहा अंतरबाह्य केवळ सुनी धर्माचेच होते. हें वर्तमान

कळतांच पादशाहा क्रोधायमान झाले व आज्ञा केली कीं, ज्या मनुष्यांनीं त्या कामास म्हणजे पिआचे धर्मास साह्य केलें व सदरहु धर्मास जो मनुष्य कारण झाला त्याजला बहुत दुःख द्यावें. त्याचें फार पारपत्य करून त्याजला कैद करावें. अशी आज्ञा केली. परंतु शेवटीं समजलें कीं, हे लोक सुनी धर्माचे असून बाह्यात्कारी पिआचा धर्म दाखवितात असें समजलें. तेव्हां पादशाहा हांसले व त्या लोकांचे पारपत्य करण्याविसी आज्ञा दिली होती तो हुकूम रहाता करून सर्वांचे अन्याय माफ केले. बहुत दिवस त्या लोकांस पिआयान मसलहती असें म्हणत होते, म्हणजे प्रसंगास्तव आम्ही पिआचे धर्माचे आहो असे मसलतीनें दाखवित होते. सबब पादशाहा त्या लोकांस पिआयान मसलहती असें नांव ठेऊन संतोष करित होते. या समयापरयंत शहर विजापूर येथें आसब्राचे नांवें खुतबा पढत होते व सुनी धर्म कायम ठेविला या गोष्टीवर ईश्वराचा स्तव आहे, म्हणजे सुनी धर्म ईश्वरास प्रीय आहे.

## ३०. विजापुरास परत आल्यानंतर आदिलशाहा याणी आपणच जातीनें राजधानीची कामें चालविणें प्रकर्ण :

विजापुरास येऊन पोहचल्यानंतर पादशाहा खुद जातीनें राजधानीचीं कामें चालऊं लागले. नित्य दरबारांत येऊन तक्तावर बसून सर्वांस येण्याजाण्यास राबता मोकळा करित होते. तेव्हां सरकारचे कारभारी व दौलतीकडील कामदार व स्वारशिबंदी व खासगीकडील मंडळ व रयत लोक हुजूर येऊन मुजरा करित होते. ज्यांचें मनांत जो मजकूर होता त्याविषयीं तो अर्ज करित होता. पादशाहा त्या मनुष्यांचे अर्ज ऐकून घेऊन बंदोबस्त करित होते. पदाधिकार वाटले. रूमीखानास पेशवाईचें, म्हणजे मुख्य कारभारीपणाचें, पद दिले व सरसरनोबतीचे पद दिले व असेंच संपूर्ण चाकरीचे लोक व पुरातन आपले सेवकांस योग्यतेनुरूप हरएकास पदाधिकार व चाकऱ्या हवालीं केल्या. गांवोगांव किल्याचे बंदोबस्ताच्या कामावर हुजुरून कामदार व समजुतदार माणसें नेमून रवाना केलीं. राजधानींतील कायदा दिवसेंदिवस उत्तमपणानें व बहुत दुरुस्तपणानें चालत होता. अशा समयांत कित्येक बरतर्फ केलेल कामदारानीं आम्हांस कामांत घेत नाहींत असें मनांत आणिलें. पूर्ववत आपले हातीं मुख्त्यारीचा लगाम राहिला नाहीं असें समजले. तेव्हां संकट उभे करणारे होऊन या दौलतीचें कल्याण ईच्छिणारे तर्फेतर्फेतील पदशाहा लोक होत त्याजला हळुहळू पत्रें पाठविण्याचा पाठ चालविण्यास आरंभ केला. नाना प्रकारचीं संकटें उभी करण्याविषयीं मसलती शिकऊं लागले. दिलावरखान तर चित्त दुखवले-लाच होता. मनांत जळत होता. रात्रंदिवस विजापुरचे मुख्त्यारीनें कारभार केला त्या

गोष्टी स्मरण करून पाणी पित होता, म्हणजे सर्वकाळ पहिले कारभाराचे स्मरण होत होतें. यास्तव दिलावरखान याणे संकट उत्पन्न करण्यास सामर्थ्य देऊन बुऱ्हाण-शाहास सर्वांहून अधिक भकलविले. घटके घटकेस आदिलशाहावर चालून जावें हीच मसलत शिकवित होता. तो भोळसर निर्मळ मनाचा, म्हणजे बुऱ्हाणशाहा, आणि आदिलशाहा याणीं या अधिकारास आपले या गोष्टीवर नजर न ठेविता व पूर्वीचे बहुत उपकार बुऱ्हाणशाहावर केले होते ते सर्व उपकार बुऱ्हाणशाहा विसरून व आदिलशाहाचा उपकार आम्हावर कांहींएक नाहीं असें समजोन फौज जमऊन आदिलशाहाचे मुलखावर चालून आला.[१२] आदिलशाहाचे सरहदींत येऊन पोहचून बहुत खराबी करण्यास प्रारंभ केला.

## ३१. आदिलशाहा याणी बुऱ्हाण निजामशाहाचे पारपत्यावर फौज रवाना करणें :

आदिलशाहा याणी लष्करास हुजूर येऊन हजर होण्याविसीं आज्ञा केली. तें लष्कर जमलें तेव्हां अमीरलोक लष्करचे तयारीयुध्यां रुमीखानास सरलष्करी देऊन रुमीखानासमागमें रवाना केले. तेव्हां आदिलशाहाची फौज सरहदीवर पोहचून निजामशाहाचे मोकाबल्यावर जाऊन उतरली. नित्य उभयतांत युध्ध होत होतें. उभयतांकडीलहि बहुत मनुष्यें ठार होत होतीं. दिलावरखान तर गल्लीत उडणारा कोल्हा होता, म्हणजे हलका मनुष्य होता. दर घटकेस निजामशाहास नवीन संकट व फंदफितूर करण्याच्या वाटा दाखवित होता. इतक्यामध्यें मोठे संकट उत्पन्न करण्याची रीति मनांत आणोन आपले खंबिरीकरितां व फौजेस आश्रय व्हावा याजकरितां भीवरेचे किनाऱ्यास एक किल्ला बांधावा म्हणोनहि शिकविलें. बुऱ्हाणशाहा याणी आपले राजधानींतील दिलावरखान यास मुख्य कारभारी केला होता. दिलावरखानाचे विचारानें जें करणें तें करित होता. यास्तव तेथें राहून त्या जाग्याचे नाजिकच पूर्वीचा एक किल्ला बांधलेला पडला होता. तोच रात्रंदिवस यत्न करून मजबूत केला. त्या किल्यावर चाकर व शिबंदी लोक ठेवून त्या लोकांस किल्याचे बंदोबस्ताविषयीं व साह्यार्थ ताकिदी करित होता. जेव्हां बुऱ्हाणशाहा याणी किल्ला मजबुत करून त्या किल्यावर शिबंदी वगैरे लोक ठेऊन बहुत बंदोबस्त केला आहे अशी बातमी आदिलशाहा पादशाहाचे कानावर आली तेव्हां या गोष्टीची भिती व अंदेषा कांहींएक समुद्रासारिखे आपले विस्तीर्ण अंतःकर्णांत न आणितां आपले जाग्यावर स्वस्थ निर्भय राहून ईश्वरावर भरंवसा ठेऊन राहिले. आपले मुखानें ईश्वरी वाणीसारिखे

१२. जमादासानी १००० हि. = मार्च १५९२. ब्रि. फि. ३, पृ. १७०.

बोलिले कीं, यद्यपि बुऱ्हाणशाहा यांणीं पर्जन्यकाळचे दिवसांत बहुत श्रम व मेहनत करून किल्ला बांधणेविसीं बहुत यत्न करित आहे परंतु या कामाचा परिणाम लहान लहान मुलें मातीचे वाडे व ईमारती करून खेळतात आणि खेळ समाप्त झाला म्हणजे सेवटीं मोडून टाकितात तसेच बुऱ्हाणशाहानीहि आपले हातानीं किल्हा बांधिला आहे, तोही आपले हातानींच पाडून टाकील. या यत्न करण्यांत बुऱ्हाणशाहास श्रम व मेहनती शिवाय दुसरी कांहींच फलप्राप्ती होणार नाहीं. असें बोलून पादशाहा खुद जातीनें आपले राजधानींत स्वस्थपणें राजधानीचीं कामें करण्यांत सष्कराचे मदती-विषयीं विचार करून रात्रंदिवस आनंदांत व संतोषांत घालवित होते. कांहींएक अंदेशा असा, कीं या प्रकारचा बलवान शत्रु बहुत तयारीनिशीं सरहदीवर बसून फंदफितूर करण्यांचे विचारांत आहे, आपले फौजेस एक मोठा आश्रय होण्याबदल किल्ला बांधिला आहे, या किल्याची पूर्ण मजबूती करित आहे व बुरहाणशाहाच्या बगलेत या प्रकारचे फंदफितुर करणारा शत्रु दिलावरखान आहे तो हरएक प्रकारची संकटें उत्पन्न करित आहे. येविषयींचे कांहीं एक भय पादशाहानीं मनांत न आणित पूर्ण स्वस्थपणें व अति निर्भयपणें रात्रंदिवस सोंगट्या व बुदबळें खेळण्यांत आपला संतोष प्राप्त करून घेत होता. संपूर्ण लोक या कामांत चिंताग्रस्त व आश्चिर्य मानित होते, कीं या प्रकारचा प्रबल शत्रू अशी सामान व सरंजामाची तयारी करून आपले कामांचे विचारांत ईतका सावध आहे व हे पादशाहा शत्रूचें पारपत्य करण्याचें विचारापासून गाफिल, म्हणजे भ्रांत, झाले आहेत. खेळांत निमग्न होऊन या प्रकारचे स्वस्थ अंतःकर्णानीं बेफिकीर बसले आहेत. हरएक मनुष्यें या प्रकर्णीं आपआपले विचाराप्रमाणें निरनिराळया विचाराप्रमाणें कोपानें भाषणें करित होते. दिलावरखानाचे मनांत असें आलें कीं, या विजापुराचे राजधानींत शत्रूचें पारपत्य करील असा कोणी राहिला नाहीं. या दिवसामध्यें विजापुरचे दरबारांतून मी बाहेर निघालो यामुळें दरबारांत असा बखेडा व या प्रकारची सुस्ती झाली आहे. यायोगें दौलत बुडण्याचें चिन्ह दिसत आहे. यास्तव पुन्हा मी कामावर यावें अशी पादशाहा मार्गप्रतिक्षा करित आहेत. मी यावें असें त्यांचे मनांत आहे. असें दिलावरखान यांणीं मनांत आणिलें. परंतु पादशाहानीं कशी आपली अवस्था केली व व आणखीही कशी करितील हा विचार मनांत न आणितां भ्रांतपणें याच विचारावर नजर ठेऊन संपूर्ण सेवकांतून एक विश्वासु मनुष्यास जागृत दैववान, म्हणजे उत्तम दैववान, आदिलशाहा पादशाहाकडे पाठऊन निरोप सांगून पाठविला कीं, पारसी बैतेचा अर्थ : “ यद्यपी मी दूर आहे तत्रापी हिंमतीचे संनिधपणाचे बिछान्यापासून दूर नाहीं. मी तुमचाच चाकर आहे व तुमचाच स्तव, म्हणजे तारिफ, करणारा आहे. ” यांतील भावार्थ हा आहे कीं, ‘ जरी मी सरकारापासून या राज्यांत निघोन आलों तत्रापि मजला येणेविसीं आज्ञा झाल्यास मी आपला चाकरच आहे. मी

आपल्या संनिधच्च आहे. आज्ञा होतांच येऊन पोहचतो. हे धणी साहेब, मी बाह्यात्कारी आपले देवडींतून कितीही दूर असलों तत्रापि अंतरयामेंकरून आपले जोडे उचलणारे चाकरांपैकींच मी आहे.' या विनंती करण्यांतील तात्पर्य हें आहे कीं, आपला शत्रु बुऱ्हाणशाहा फौज जमऊन बहुत सावधगिरीनें तयार होऊन आला आहे. आपण या गोष्टीच्या कांहींच विचार न करणें हें या समई योग्य नाहीं. आपले सुस्तीचे व गाफिलपणाचे योगानें शत्रु प्रबळ होऊन नाना प्रकारे बडबडतात. याजकरितां येविषयीं कांहीं विचार केला पाहिजे. मी स्वामीसेवेकरितां प्राणखर्च करणारा सेवक आहे. मजला आपली जी आज्ञा होईल त्या आज्ञेस प्राण खर्च करून हजर होईन. असें विनंतिपत्र लिहिलें. तेव्हां ईनसाफ करणारा व अकलवान पादशाहानीं त्या दिलावरखानाचें विनंतिपत्राचें उत्तरही मुखीस ठकवणेचें मार्गानें लिहून पाठविलें कीं, 'हलीं तुम्ही केवळ दौलतीचे खांबच आहांत. आम्ही तुमची योग्यता ओळखिली नाहीं. आतां आम्हांस कळोन आलें कीं, तुम्ही या दौलतींतील पूर्ण विश्वासु आहात. तुम्हांशिवाय राजधानींतील कांहीं एक कामें चालत नाहींत. यास्तव आजपर्यंत ज्या गोष्टी होऊन गेल्या त्यापैकीं कांहींएक मनांत न आणितां आपण ईकडे येऊन पूर्ववत या राजधानींतील हरएक कामांतील कारभार पहावा.'

## ३२. इबराहीम आदिलशाहाचे दरबारांत दिलावरखान याणी येणें, व शिक्षा पावणें व खेलण्याचे किल्यांत कैद होणें प्रकर्ण :

पादशाहाचा असा निरोप येऊन पोहचतांच या निरोपावरून दिलावरखान बहुत संतोष पावोन पुन्हां एक विश्वासुक मनुष्य पादशाहाकडे पाठविला. त्या बरोबर सांगून पाठविलें कीं, 'जर करितां आपण माझें जिवास व मालास अभय देण्याविसीं आण भाक देऊन दगा न कराल तर मस्तकाचे पाय करून आपल्या सेवेंत येऊन हजर होईन.' यावरून इबराहीम आदिलशाहा याणी आण भाष्य व करार मदार ठरऊन अभयपत्र पाठविलें. नंतर बुऱ्हाणशाहा वारंवार येविषयीं मनाई करित असतां व आदिलशाहा पादशाहाकडे जाऊन मिळण्याविसी परवानगी देत नसतां, कारण कीं दिलावरखान फारच माजला होता त्यामुळें हें न ऐकतां, पुन्हां विजापुरचे राजधानींतील मुख्त्यारीनें कारभार करावा व पादशाहास राजपदावरून काढावा या आशेनें बहुत आग्रह करून बुऱ्हाणशाहापासून निरोप घेऊन आपला पुत्र महंमदखान यासहित निघोन विजापुराकडे चालता झाला. ज्या दिवशीं विजापुरास येऊन पोहचण्याचा दिवस ठरविला या दिवशीं विजापूर शहराची संपूर्ण मनुष्यें पांच सहा कोश दिलावरखानास सामोरे जाण्याकरितां पळत गेलीं. सर्वांनीं दिलावरखानावरून द्रव्य

अनुकूलतेनुरूप बोवाळून टाकिलें. अमीरलोक याजकडूनहि मनुष्यें मुबारकबादी द्यावयाकरितां व आपण आलात यांत सर्व कल्याण आहे असें म्हणावयाकरितां सामोरीं गेलीं. " सर्व कर्णे दिलावरखानाविषयीं विषप्रद प्राणघातक होतें. विजापुरची सर्व मनुष्यें दिलावरखानास जाऊन भेटलीं असें वर्तमान आदिलशाहास कळलें तेव्हां पादशाहानीं जाणिलें, जर करितां दिलावरखान पांच दिवस विजापुरांत येऊन राहील तर पहिलेपेक्षां दिलावरखान अधिकच पीडा करील. बहुतच प्रबल होईल. ज्यासमईं पादशाहा बारा ईमामाचे बागेंत जाऊन भर संध्याकाळचे वेळेस आर्म किल्याकडे निघाले त्या समईं दिलावरखान पादशाहाचे संनिध येऊन मुजरा करून पादशाहाचे घोड्याची रिकीबी धरून किल्यापर्यंत येऊन पोहचला. तेव्हां दिलावरखानास ढेलजेंत बसविला. तेव्हां शहरची संपूर्ण मनुष्यें दिलावरखानास पहावयाकरितां हुजूर येऊन दिलावरखानाची भेटी घेते झाले. पादशाहास ही सूचना कळली तेव्हां दिलावरखानास एकटा एकीकडे बसविला. जेव्हां पादशाहाचा चेहरा रोजची चाल सुटून बदलला असें दिलावरखानानें पाहिलें तेव्हां जाणिलें कीं, मी आलों नसतों तर बरें होतें. माझें येण्यांत चांगले झालें नाहीं असें जाणोन पश्चाताप पावता झाला. परंतु या गोष्टीचा आतां उपयोग नाहीं. पादशाहानीं त्याच घटकेस ज्या मनुष्यास दिलावरखान याणी डोळे काढण्याचें कामांत तयार केला होता त्याजलाच आज्ञा केली कीं, आपली कुशलता करून दाखीव, म्हणजे दिलावरखानाचे डोळे काढ अशी आज्ञा केली. तेव्हां ही आज्ञा ऐकून दिलावरखान फारच काकुलती आला व पाया पडूं लागला. अर्ज केला कीं, पादशाहानीं मला अभयपत्र दिल्हें असतां अशी विपरित आज्ञा होती हें चांगलें नाहीं, अशी विनंती केली. तेव्हां आदिलशाहा पादशाहा याणी दिलावरखानास उत्तर दिल्हें कीं, आमचे अभयपत्र व आण भाक तुझे प्राणाचे व मालाचें नुकसान होणेविषयींचे आहे. डोळे काढण्यांत प्राणाचे व मालाचें नुकसान नाहीं. दुसरे कीं, हें आणखी एक वचन दिल्हे आहे कीं, मी तुझा कांहीं नाश करणार नाहीं. त्यास हलीं हा मनुष्य तुझे डोळे काढित आहे. मी जातीनें तर काढित नाहीं. जो गृहस्थ तुझे डोळे काढितो तो कांहीं मी नोहे. असें पादशाहानीं उत्तर दिल्हें. नंतर तो डोळे काढणारा गृहस्थ आपले कामांत निमग्न झाला, म्हणजे दिलावरखानाचे डोळे काढावयास गेला. एका पलसांत, म्हणजे नेत्रास पातें लागतें न लागतें इतक्या अवकाशांत, दिलावरखानाचे डोळे काढून अंध केला आणि हुकुमाप्रमाणें खेळण्याच्य किल्यांत दिलावरखानाचे कित्येक चाकरांसहित दिलावरखान कैद झाला. नंतर दहा वर्षें पर्यंत कैदेंत वाचला व त्या कैदेंत पुत्रही झाले. दहा वर्षांनंतर दिलावरखान मरण पावला.

## ३३. बुरहान निजामशाहावर हल्ला करून आदिलशाहाकडील फौजेची फत्ते होणें व बुऱ्हाणशाहा याणी आदिलशाहास सख्य करण्याचा निरोप पाठऊन आपण नवीन बांधलेला किल्ला आपणच मुळापासून खणून पाडून टाकणें :

बुऱ्हाणशाहा याणी बहुत श्रम करून किल्ला बांधला. किल्याचे बंदोबस्ताचा सामान सरंजाम व खाण्यापिण्याचे जिन्नस गांवोगावांहून व जागोजागचे दुसरे किल्यांतून आणोन सदरहू किल्यांत जमा केले आणि पूर्ण मजबूती केली. आदिलशाहा पादशाहास हें वर्तमान कळतांच यम आज्ञेप्रमाणें आपले लष्कराचे सरदारास हुकुम सांगून पाठविला कीं, हा हुकुम दाखल होतांच किंचितहि अवकाश न करितां बहुत जमात घेऊन शत्रूचे पारपत्य करण्याची तयारी करून तुम्ही बुऱ्हाणशाहाचे कल्ब म्हणजे मध्यभागचे फौजेवर चालून जाऊन हल्ला करावा. शत्रूचे फौजेंत प्रळय करून द्यावा.[१३] जर करितां या कामांत किंचित ढिलाई केली असतां व या लढाईत तीळमात्र सुस्ती केली असतां अशी प्रतिज्ञा आहे कीं, तुम्हांवर सरकारची इतराजी होऊन तुमचे पारपत्य केलें जाईल. याजकरितां बहुत विचार करावा कीं, चोरटे लोकांत म्हणजे चोर कैद केले आहेत त्या मंडळींत बहुत दिवस हातांत पायांत व गळ्यांत बेड्या पडोन बाजारांतून वोढित वोढित आणोन फाशी द्यावयाचे जागीं नेऊन ठार मारण्यापेक्षां शूर समुदायांत शूरत्वानीं व सत्कीर्तीनें मरण पावणें चांगलें. असा हुकूम सांगून पाठविला. तो हुकूम सरलष्कर याणी संपूर्ण अमीरलोक जमा करून त्यांजला सरकारचे या आज्ञापत्रांतील मजकूर वाचून दाखविला. तो ऐकतांच सर्वांनीं मित्रतेचे चालीनें एकदांच सर्वत्र बोलले कीं, मनापासून व जीवापासून आम्ही सरकारचे हुकूमांत आहों. आपण ज्या वेळेस घोड्यावर बसाल व लढाईस तयार व्हाल तेव्हां आम्हांहि सर्वत्र हजर आहों असें बोलले. दुसरे दिवशीं प्रातःकाळीं रूमीखान याणी युध्धाचे वाद्य वाजविलें. संपूर्ण अमीरलोकांसहित लढाईस तयार होऊन घोड्यावर बसला. निजामशाहाचे लष्करापैकीं नुरखान दक्षणी अमीरूल उमराव वराडचा राहाणारा व बुऱ्हाणशाहा याणीं पालन केलेला होता. तो निजामशाहाचे फौजेपैकीं निवडक व मुख्य मुख्य शूर असे दहा हजार स्वारांनीसीं आदिलशाहावर चालून आला. तेव्हां शस्त्रांचे जातें फिरूं लागलें, म्हणजे शस्त्रें चालू झालीं. उभयतांतील फौजेमध्यें समुद्राच्या लाटा उसळतात असे शूर दौड करूं लागले. त्या प्रळयसमुद्रांत सुखाची व विश्रांतीची नौका म्हणजे नाव चिंतेच्या भोवऱ्यांत बुडाली, म्हणजे सुख नाहींसें होऊन सर्वांस दुःख प्राप्त झालें. उभयतांकडील शूरांनीं त्या युध्धांत बहुत शूरत्व व पराक्रम बहुत यत्नें करून अत्यंत

१३. साबान १००० हि.=एप्रिल १५९२.–ब्रि. फि, ३, पृ. १७३.

केला. सायंकाळचा समय आला तेव्हां एकमेकांचे प्राण घेणें चालू झाले होतें. आदिलशाहाकडील शूरांनीं जेव्हां पाहिलें कीं, अस्तमानचा समय आला व या समईं आळस केला असतां संधी हातांतून जाईल, म्हणजे अशी संधी पुन्हां येणार नाहीं, असें जणोन सर्वांनी एकदील होऊन मोठ्यानें हारळया दिल्ह्या आणि रूस्तुमाप्रमाणे शत्रूकडील फौजेवर म्हणजे बुऱ्हाणशाहाचे लष्करावर हल्ला केला. स्वामी सेवेस जसा प्राण खर्च करावा तसा करिते झाले, म्हणजे सर्वांनीं एकदम जिवाची आशा सोडून दिल्ही. तेव्हां बुऱ्हाणशाहाचे फौजेस आदिलशाहाचे फौजेपुढें धैर्य टरेनासें होऊन बुरहानशाहाचे एकंदर फौजेनीं पळून जाण्याचा विचार ठरऊन युध्य संग्रामांतून पळून जाते झाले. नुरखान हा दुसरे दोन तीन अमीरलोकासुध्धां टार झाला. बाकीचे शिपाई राहिले. त्याणी आपला सरदार नुरखान ठार झाला असें अवलोकन केलें तेव्हां सर्व अरण्यांत पळून जाते झाले. तेव्हां आदिलशाहाकडील शिपाई लोक याणी त्या पळालेल्या फौजेचा पाठलाग करून एकशेंसाठ हत्ती व एक हजार घोडे व असंख्य शस्त्रे लुटून घेऊन यशस्वी व विजयी होऊन परत येते झाले. तेव्हां रूमीखान याणी फत्ते झाल्याचें पत्र हत्ती व घोडे लुटून आणिल्यासहित पादशाहाकडे रवाना केलें. पादशाहा याणी भारी किंमती पोषाख व बक्षीस देण्याचे जिन्नस उंच किंमतीचे सरदारांस दर पोषाखावर ज्याचीं त्याचीं नांवें लिहून पोषाख पाठऊन मोठी ताकिद केलीं कीं, रात्रंदिवस पूर्वींपेक्षां बहुत हुषारी व सावधपणा ठेऊन शत्रूवर बहुत प्रबलता व अत्यंत जबरदस्ती ठेवावी. शत्रूचे फौजेभोवतीं तयार होऊन तकवा करित जावा, म्हणजे फिरत जावें. बाहेरुन कांहींच जिन्नस शत्रुचे लष्करांत पोहचूं देऊं नये. शत्रूचे लष्करांतून कोणास बाहेर जाऊं देऊं नये. युध्यास प्रारंभ केल्यास बहुत हुषारीनें व खबरदारीनें युध्य करित जावें, म्हणजे ईश्वरकृपेंकरून शत्रू त्वरित या योगानें जेरीस येतील. आदिलशाहा पादशाहाकडील सरदार लोक याणी कित्येक दिवस याच हुकूमाप्रमाणें वागणुक केली. तेव्हां बुऱ्हाणशाहावर व त्याचे लष्करावर मोठा कठीण प्रसंग गुजरला. यामुळें बुऱ्हाणशाहाचे लष्करांतील मनुष्यें या लढाईंत बहुत दिवस प्रवासांत गुजरले. फार नुकसानहि झालें. येणेंकरून प्राण देण्यापर्यंत त्रासून रात्रीस पळून जात होते. तेव्हां बुऱ्हाणशाहा याणी लष्कराचे पळून जाणें व फौजेचा दुष्ट संकल्प जाणिला. तेव्हां जेरीस येऊन व निरोपाय होऊन आदिलशाहाशी सख्य करावें असें मनांत आणिलें. अकलवान वकील आदिलशाहाकडे पाठऊन सख्य करण्याचा निरोप सांगून पाठविला. आदिलशाहानीं एक महिन्यापर्यंत चालढकलीवर व आळसावर ही गोष्ट ढकलून आम्हांस सख्य करण्याची गरज नाहीं म्हणोन हेका धरून राहिला होता. तेव्हां बुऱ्हाणशाहा याणी कुतुबशाहा व आलीखान या उभयतांचा येवीसी आश्रय करून आदिलशाहांत व आपणांत बोलण्यास वशिला केला. आदिलशाहा याणी बहुत हाट व आग्रह केल्यानंतर या उभयतांचे रदबदलीमुळें

सख्य करण्यास राजी झाला. परंतु ठरविलें कीं, बुऱ्हाणशाहा याणी नवीन किल्ला बांधला आहे तो किल्ला पूर्वी मी जसे आपले मुखानीं सांगितलें होतें त्याप्रमाणें तो किल्ला बुऱ्हाणशाहा याणी मुळापासून खणून पाडून टाकावा. त्या किल्याची जागा जमिनीबरोबर साफ करून टाकावी, म्हणजे पुन्हां त्या किल्याचा आश्रय धरून फंद फितूर होणार नाहीं. असा करार ठरलेवर सख्य होईल अशी आज्ञा केली. तेव्हां बुऱ्हाणशाहा याणी करार कबूल करण्याविसी अनमान केला व बहुत दिवस ही गोष्ट कबूल केली नाहीं. परंतु जेरीस आला होता. यास्तव शेवटीं कबुल केली. सदरहु किल्ला पाडून जमिनीबरोबर केला आणि अहमदनगराप्रती जाता झाला.

## ३४. बुरहान निजामशाहा पादशाहा याणी करार केला असतां तो करार मोडणें व बेमानपणा करणें आणि आदिलशाहाचा बंधु ईस्माईल याजला भकलऊन, म्हणजे नाना प्रकारच्या दुरबुध्धी शिकऊन बाहेर काढणें :

बुऱ्हाणशाहा याणी लढाईत हा मोठा मोड झाल्यानंतर बहुत खिन्न व पश्चाताप पाऊन मनामध्यें बहुत कपट व दुर्बुध्धी धरीत होता. तेव्हां कित्येक दिवसानंतर कपटाचा अग्नि बुऱ्हाणशाहाचे अंतःकर्णांत आगटित प्रदिप्त झाला, म्हणजे बुऱ्हाणशाहा याणी दुष्ट संकल्प मनांत आणिला. वैरभाव धारण करून करार मदार ठरविले होते ते सर्व मागें टाकून, म्हणजे मनांत न आणून, ईब्राहीम आदिलशाहाचा बंधु ईस्माईलशाहा मुस्तफाबादचे, म्हणजे बेळगांवचे, किल्यांत कैदेंत होता त्याजला गुप्तपणें पत्र पाठवून आपले वारिसदाराचे मुलुख घेण्याचे व इब्राहीम आदिलशाहावर चालून जाणें प्रकर्णी मसलती शिकऊन येविसी बहुत प्रकारें ईस्माईलशाहा याजला आस्था उत्पन्न केली. फौज तयार करण्याचे मदतीस द्रव्य बहुत व पुष्कळ सामान ईस्माईलशाहाकडे पाठविलें. ईस्माईलशाहा याजला पूर्ण सामर्थ्य दिलें. किल्यावरील शिबंदीसहि ईस्माईलशाहा तक्तावर बसणार याजकरितां सर्वांनीं ईस्माईलशाहाचे हुकूमावर वागावें असें करार ठरऊन हे संतोषाचे वर्तमान सांगून पाठऊन ईस्माईलशाहाचे कुमकेविषयी व मदतीस सिध्ध केले. ऐनुलमुल्क व आंकुसखान याजला, कीं या उभयतांची जागीर त्या किल्यानजिकच होती त्याजलाहि, ईस्माईलशाहाचे मदत करण्याविषयीं आस्थायुक्त भाव सूचऊन पत्र लिहिलें कीं, ' तुम्ही उभयतांहि आदिलशाहाचे दौलतींतील संभावित थोर अमीरलोक आहांत व अशी संधी पुन्हां येणार नाहीं. ही आलभ्य लाभाची वेळ आहे असें जाणून ईस्माईलशाहा याजला कैदेंतून मोकळें करून संपुर्ण सामानसरंजामाची तयारी करून किल्यांतून बाहेर आणावें.

आदिलशाहाकडील संपूर्ण चाकर लोक व अमीरलोक याजकडून करार मदार करून घेऊन व हें संतोषाचें वर्तमान सांगून सर्वांनीं ईस्माईलशाहाचे हुकुमावर चालावें असें करून विजापुरकडे चालू व्हावें, म्हणजे आम्हीहि कुतुबशाहास घेऊन फौजेची तयारी करून खुद जातीनें तेथें येऊन पोहचतो.' ईस्माईलशाहास इब्राहीम आदिलशाहाचे राजधानीचे तक्तावर बसवून ऐनुलमुल्काचे चित्तांत हा पूर्वींचा भाव होता व नित्य ईश्वरास प्रार्थना करित होता कीं, आदिलशाहाचे राजधानींत कांहींतरी घालमील व्हावी व ईबराहीम आदिलशहाचे हदींतील गावांत व आदिलशाहाचे हुकूमांतील मुलुखांत, म्हणजे आदिलशाहचे दौलतींत, दुसरा कोणीतरी पादशाहा येऊन पोहचावा. तसेंच विजापूरचे राजधानींत संपूर्ण अमीरलोक होते त्यास गुप्तपणें बहुत निरोप पाठऊन खुप खबरीचें वर्तमानानीं आशाबध्ध करून, म्हणजे त्याजला आवड उत्पन्न करून, या प्रकर्णाविषयीं सर्वांनीं एकदिलीनीं असावें, अशीं सर्वांचीं अंतःकर्णें आपल्यासी मिळऊन घेतलीं. बुऱ्हाणशाहा याणी या विघ्नार्थ बहुत मनुष्यें तयार केलीं. ही मसलत पकी ठरविण्यांत व हा विचार मजबूत करण्यांत एक वर्ष घालविलें. सावंतराव नायकवाडी याणी, कीं तो सावंतराव किल्याकडील शिबंदीचा सरदार होता त्याणी, ईस्माईलशहा याजविषयीं करार मदार केले. सावंतराव याणी किल्याकडील सर्व शिबंदी बहुत यत्नें करून आपलेकडे मिळऊन घेतली. सावंतराव याणी आपली कन्या ईस्माईलशाहास नजर देऊन आप्तविषयीपणाचें नातें बहुत मजबूत केलें आणि किल्यावरील मुख्य कामदारास संधीचा समय साधून धरून कैद करून किल्ला घेतला.[१४] आदिलशाहाचे चित्तावर या बातमीचे प्रतिबिंब पडलें तेव्हां, म्हणजे आदिलशाहास बातमी कळली तेव्हां, शत्रूचें पारपत्य करण्याचा विचार करून, फौज जमऊन, आलीयासखान (एलिआसखान) याजला सरलष्करी देऊन बेमान लोकांचे व धण्यावर फिरून पडणारे मनुष्यांचे पारपत्य करण्याकरितां रवाना केला. तेव्हां आलीयासखान याणी खुद जातीनें तेथें जाऊन पोहचून हल्ला केला. कैवारांतील घेऱ्याचे मधील ठिपका असतो त्या प्रमाणें किल्ला सभोंवता घेरून किल्यांतील राहाणारे लोकांस येणेंजाणेंचा रस्ता बंद केला. आदिलशाहा पादशाहा याणी आलीयासखान याचे मदतगारीवर व बळावर वारंवार ऐनुलमुल्क व आंकुसखान याजला हुकूम व आज्ञापत्रें पाठविलीं, कीं तुम्ही जलदी किल्यानजिक जाऊन पोहचून आलीयासखान व तुम्ही मिळोन बेमानाचे पारपत्याविषयीं व किल्ला सोडऊन घेणेंविषयीं यत्न करावा. अशीं आज्ञापत्रें पाठविलीं परंतु आदिलशाहाचे मनांत हें नाहीं आलें कीं, ऐनुलमुल्क व आंकुसखान हे उभयतांहि ईस्माईलशाहासी गुप्तपणें मित्रता व एकविचारपणा धारण करून आहे. हें लक्षांत आलेंच नाहीं. ऐनुलमुल्क व आंकुसखान पादशाहाचे आज्ञापत्र येऊन पोहचतांच

१४. बेळगांवचा किल्ला ९ रमजान १००२ (१२ मे १५९३) रोजीं घेतला.— ब्रि. फि. ३, पृ. १७७.

आदिलशाहाचे दौलतीचे पूर्ण अगत्य आहे असा ब्राह्यात्कारीं भाव दाखऊन लष्कराची तयारी करून आलीयासखान याचे मदतगारीवर उभयतांनीं फौज रवाना केली. आलीयासखान यासी मिळोन किल्यावर हल्ला केला. अंतरयामींकरून शत्रूशीं मित्रता व सख्यत्व धारण करून शत्रुची मदतगारी करूं लागले. शत्रुचे लोकांस बळ देऊं लागले. रात्रीस ऐनुलमुल्क व आंकुसखान या उभयतांकडील फौजेतील लोक गल्ला व सामान सरंजाम जरूरीचे कारणाचा आपले मोर्च्यांतून आणोन जागा धरून उभे राहिलेले जाग्यांतून किल्यांत पोंहचवित होते. विश्वासू लोकांस द्रव्य व सामान सरंजाम समागमें देऊन विजापुरास पाठऊन जे जे गृहस्थ यासी मित्रता ठेवित होते त्यांस व हुजुरचे चाकर लोकांसहि ईब्राहीम आदिलशाहाशीं वैर धारण करण्याविसी आशा व लोभ दाखऊन फितावेिले. या प्रकारें कीं विजापूरचे किल्यांतील मुख्य कामदार खुरपीदखान म्हणोन तुरकी चाकर होता तोहि या कामांत शत्रू लोकांसी मिळोन ईस्माईलशाहाकडील लोकांस आपले घरीं आश्रय देऊन ईस्माईलशाहाची मित्रता धारण करून रहाणेंविसीं विजापूर शहरचे संपूर्ण मनुष्यें फितविण्याविषयीं बहुत यत्न केला. खुरपीदखान एक एक मनुष्यापासून या प्रकर्णी करार मदार व आण भाक करून घेत होता. तिकडून बुन्हाणशाहा कुतुबशाहा याणीहि सरहदीवर फौजा पाठऊन फंदफितूर व खराबी करूं लागले. आदिलशाहा या चहूंकडील संकटाचे वोहरांत तात्काळ कृपा करणारे ईश्वराचे कृपेवर भरंवसा ठेऊन किंचितहि भय व घाबरेपणा न बाळगितां आपणास पूर्ण मजबुती व स्वस्थपणांत येऊन रात्रंदिवस संतोषांत व आनंदांत घालवित होता. तों ईतक्यांत वर्तमान येऊन कळलें कीं, ऐनुलमुल्क आजपर्यंत गुप्तपणें विचार करित होता व हालीं निस्सीमपणें ईस्माईलशाहासी मिळोन, सर्प कात टाकिली म्हणजे नव्या दमाचा होतो असा, नव्या दमाचा होऊन ईस्माईलशाहास किल्यांतून मोकळा करून ईस्माईलशाहावर छत्रचामरें धरलीं.[१५] ईकडील दौलतींतील सांप्रत जो जो सामान सरंजाम व द्रव्य वगैरे जें कांहीं गुप्तपणें ठेविलें होतें तें सर्व ईस्माईलशाहास नजर करून ईस्माईलशाहास तख्तावर बसविलें. या प्रकारें कीं, संपूर्ण मनुष्यें ईब्राहीम आदिलशाहास जसे मुजरा करितात त्याच प्रकारें सर्वांकडून ईस्माईलशाहास मुजरा व सलाम करविले. आंकुसखान वगैरे लहान लहान अमीरलोकहि आपआपले तयारीनिसीं ऐनुलमुल्कासी मिळोन एकंदर सुमारें पंचवीस हजार मनुष्यें ईस्माईलशाहापाशीं जमा झालीं. आलीयासखान फौजेसुध्धां ह्या वेळपर्यंत किल्याचे हल्लेवरच यत्न करित होता. त्याणी ऐनुलमुल्क वगैरे बेमान व निमकहराम लोकांचे या प्रकारचें प्राबल्य व दंगा पाहिला तेव्हां आलीयासखान याणी किल्यावरील हल्ला करणें सोडून ईब्राहीम आदिलशाहापाशीं हुजूर येऊन

१५. ९ रमजान १००२ हि. ( १९ मे १५९४ ) रोजीं इस्मायलनें बेळगांवचा किल्ला घेतला व उघड बंड पुकारलें. –ब्रि. फि. ३, पृ. १७७.

पोहचला. मुर्तजाचादेंत म्हणजे मिरजचे किल्यांतील शिबंदी लोक ईब्राहीम आदिलशाहा-वर बदलून ईस्माईल यासी मित्रता धारण करून ईस्माईलशाहाचे सेवेविषयीं कंबर बांधून ईस्माईलशाहाचे नांवें खुदबा पढले. अशा समयांत इब्राहीम आदिलशाहास बातमीदारांनीं खबर सांगितली कीं, बुऱ्हाणशाहा याणी ईस्माईलशाहाचे साह्य करण्याकरितां आपले घरचे मुख्य मुख्य कारभारी रवाना करून आपणहि सत्वरच आपले रहावयाचे जाग्यांतून, म्हणजे अहमदनगर येथून, निघताहे.[१६] अशी बातमी कळविली. याच दिवसांत वाटेंत बातमीदारांनीं पत्र धरून आणिलें. तें पत्र देवनाईक म्हणोम अमीरीचें पद पावला होता त्याचे पुत्रानीं ऐनुलमुल्काचे पत्राचें उत्तर लिहिलें होतें. तें पत्र वाटेंत धरून आणिलें. त्या पत्रांत हा मजकुर होता कीं, 'आपले पत्र पावलें. आपले पत्रांत लिहिलें कीं, तुम्ही काय कामांत आहांत ? तुम्हांस सांगितलें होतें त्या विषयीं काय केलें ? तें कळलें पाहिजे. कारण कीं, रुमीखान शहरांत बसून आपल कामांत हुषार आहे. शहरचे सर्व मनुष्यांपासून करार मदार क आण भाक टरऊन घेऊन करार ठरविला आहे कीं, ईस्माईलशाहा शहरानजिक येऊन पोहचतील तेव्हां जर करितां संधी साधल्यास ईब्राहीम आदिलशाहास कैद करावें किंवा ईब्राहीम आदिलशाहास तरवारीनें ठार मारावें. असा करार ठरविला आहे. मी शहराबाहेर राहून आपले कामांत हुषार आहे. सर्वांस वश करून घेतलें आहे. आपले येण्याची मार्गप्रतीक्षा करित आहे. आपण सत्वर येऊन पोहचावे. कारण कीं, ईकडील सर्व कामें संकेताप्रमाणें सिध्धीस गेलीं असतां कांहीं एक होणें बाकी राहिलें नाहीं.' तात्पर्य हें संकट व हा दंगा असा वाढला होता कीं, सर्वांची उमेद खचली. सर्व मनुष्यांत विचार असा ठरला कीं, पांच सहा दिवसांत ईस्माईलशाहा विजापूर शहर घेतो. विजापूराचा मालक होतो. जेव्हां कार्यभाव येथपर्यंत येऊन पोहचला तेव्हां ईब्राराहीम आदिलशाहा याणी दयावंत व कृपावंत ईश्वराचे आधारावर विश्वास व भरंवसा ठेऊन स्वस्थपणें न घाबरतां निवांत राहिला. ईश्वराचें स्मरण करून अंतःकर्णांत विचार ठरऊन हमीदखान हाफ्सी याजला दिलावरखान याणी कैद केला होता त्या हमीदखानास पादशाहानीं बहुत योग्यतेस चढविलें होतें त्याजला हुजूर बोलाऊन सरलष्करीचीं वस्त्रें देऊन बाकीचे अमीरलोक, कीं जे शत्रूसी मिळाले नव्हते, त्यासुध्धां, व खासखेल म्हणजे मुख्य जरीपटक्याकडील कामदार व कित्येक चाकर लोक समागमें देऊन फंदफितूर करणारे बदचालीनीं वागणारे शत्रुलोकांवर हमीदखान सरलष्कर यास रवाना केलें. हमीदखानास कित्येक मसलती व विचार शिकऊन ताकिद केली कीं, तुम्ही विजेसारखे व वायुप्रमणें जलद जाऊन हे फितुरी लोक त्यासी जाऊन मिळाले नाहींत तों कांहीं एक विचारांत न पडतां शत्रू लोकांचे मध्यभागचे

१६. हि. १००३ (१५९४–५ इ. स.) बुऱ्हाण निजामशाहा बेळगांवास जाण्याकरितां निघाला. –बि. फि. ३, पृ. २८६.

फौजेवर चालून जाऊन हल्ला करावा. या फितुरी लोकांस संधी सापडूं देऊं नये. जर करितां या प्रकर्णी दोन दिवसांची ढिलाई किंवा सुस्ती केल्यास या लोकांस फुरसत सांपडेल. सत्य जाणावें कीं, त्या फुरसतींत संपूर्ण फौज आपलीसी करून घेतील. यास्तव त्या फितूरी लोकांस फुरसत सांपडू देऊं नये.

**३५. फंदफितूर करणारे लोकांचे पारपत्यावर हमीदखान यास नेमणें, हमीदखान याणीं त्या लोकांवर प्रबळ होणें, ऐनुलमुल्क याणी कत्तल होणें, म्हणजे ठार होणें व ईस्माईलशाहाचे डोळ्यांत डोळे काढण्याची सलई फिरवण्याचे ईजेनें ईस्माईलशाहा याणी मृत्यु पावणें प्रकर्ण :**

तारीख २४ माहे रबिलावल सन १००३ बुधवारी (२७ नवंबर १५९४) हमीदखान अमीरलोकांसहित नेमिलेल्या कामावर चालू झाला. तारीख २८ माहे मजकूरीं (१ दिसेंबर १५९४) इकडे आदिलशाहानीं रूमीखान, आलीयाखान व आजिजखान हे मोठे अमीर नामांकित होते व पादशाहास या अमीरलोकांचा आंदेशा आला होता यास्तव सदरहू अमीरलोकांस व देवनाईक व आषाजीपंडीत या उभयतांकडे मुलकी कामाचा अधिकार होता त्या सर्वांस कामावरून बरतर्फ करून धरून त्यांस कैद केलें. हमीदखान पादशाहाचे हुकुमाप्रमाणें शत्रूचे संनिध जाऊन पोहचला. हमीदखान याणी बाह्यात्कारीं युध्याचा भाव दाखऊन ऐनुलमुल्क याजला निरोप सांगून पाठविला कीं, मी ईतके सामानसरंजामानिसीं येऊन पोहचलो आहे, हें लढाईकरितां आलों आहे असें नाहीं. मी चालून आलों ही पादशाहाची आज्ञा पालन केली असे बाह्यात्कारीं भाव दाखविण्याकरितां पुढें चालून आलो आहे. परंतु अतःकर्णापासून आपली मित्रता व दोस्ती कायम ठेविली आहे. शाहाजादा ईस्माईलशाहा याची सेवा मनांत मजबुत ठेविली आहे. परंतु त्या गोष्टींत बरें आहे कीं, या कामांत अति त्वरा करून निजामशाहा कुमकेस व मदतीवर येऊन पोहचला नाहीं तों ईस्माईलशाहास पादशाही तक्तावर बसऊं, म्हणजे कोणाचा उपकार नसतां आपले पूर्ण मनोरथ करून घेऊं, म्हणजे कोणाचा उपकार आपलेवर नाहींसा होईल. असा निरोप सांगून पाठविला. ऐनुलमुल्क याणी ईस्माईलशाहाचे दैवाचा उत्कर्ष पाहून हमीदखानाच्या ठकविण्यावर ठकून बहुत संतोष पावला. हमीदखानास आपला मित्र आहे असें समजून हमीदखानास निरोपाचें उतर सांगून पाठविलें कीं, आम्ही आपले येण्याचीच मार्गप्रतीक्षा करित आहों. आपण सत्वर येऊन पोहचावें, म्हणजे आपले मजकुराची नवरी तुम्ही व आम्ही मिळोन प्रसिद्धपणाचें पदावर बसऊं, म्हणजे ईस्माईलशाहास तक्तावर बसऊं. असें उतर सांगून पाठविलें. त्या समई शाहाजाद्यासहित

बेदरीं व रायबागेंत डेरे व तंबू ठोकून फौजा नेऊन तयारी करण्यांत निमग्न होता. इतकेंत हमीदखान फारच संनिध येऊन पोह्चला. तेव्हां ऐनुलमुल्क बहुत संतोष व आनंदयुक्त होऊन हमीदखान मकरबाज व कपट वेशानें चालून आला आहे हें कांहींच मनांत न आणितां भ्रांत, म्हणजे हमीदखानाचे समारंभाकरितां कचेरी पूर्ण थाटाची करून भारी किंमतीच्या मसनदी, म्हणजे पादशाहानीं बसण्याच्या गाद्या आंथरून, ईस्माईलशाहासहित ऐनुलमुल्क कचेरींत बसला होता. हमीदखान याणी आपले लष्करची पूर्ण तयारी करून तोफा व गोलंदाज वगैरे सामान सरंजाम हत्यारें व आतपबाजीचीं हत्यारें, म्हणजे बाण वगैरे, जे समागमें होतें तितकें तयार करून सदरहू एकंदर सामान सरंजाम समागमें घेऊन हमीदखान चालू झाला. संनिध जाऊन पोह्चतांच हमीदखान याणी आतपबाजीचीं हत्यारें, म्हणजे बाण व बंदुकी व तोफा वगैरे, शत्रूवर म्हणजे ईस्माईलशाहा व ऐनुलमुल्क वगैरे समुदायावर चालू केली. एकाएकीं तोफा डागल्या तेव्हां त्या शत्रूकडील फौज, म्हणजे ईस्माईलशाहाची फौज, गाफिल व आतां कांहीं भय नाहीं असें मानून आपआपले कामांत निमग्न झाली होती ती फौज भयाभीत होऊन परागंदा झाली. पळून गेली. तेव्हां ऐनुलमुल्क वेड्यासारखा घाबरून ईस्माईलशाहास घोड्यावर बसऊन जलद या प्रळयांतून एकीकडे काढून न्यावें या विचारांत पडला. ईतक्यामध्यें ईब्राहीम आदिलशाहाकडील शिपाई लोक ही फुरसतीची वेळ पाहून ईस्माईलशाहावर व ऐनुलमुल्कावर धाऊन गेले. हत्तीकडील पीलखान्यावरील कामदारांचे समागमें पन्नास साठ हत्ती होते ते हत्ती त्या कामदारांनीं त्या मोड झालेले लोकांवर, म्हणजे ईस्माईलशाहा व ऐनुलमुल्कावर चालवले, म्हणजे आंगावर घालविले, त्या धांदलींत एक मोठा हत्ती ऐनुलमुल्काचे घोड्यावर धाऊन आला. त्यायोगें ऐनुलमुल्काचे मांडीस मोठा धका बसून ऐनुलमुल्क जखमी होऊन घोड्यावरून जमिनीवर पडला. पुन्हां घोड्यावर बसण्याचे सामर्थ्य राहिलें नाहीं तेव्हां ईब्राहीम आदिलशाहाकडील हत्तीवरील महातांनीं ऐनुलमुल्कास जमिनीवरून हत्तीस ईपारा करून हत्तीचे सोंडेनें उचलून घेऊन पकडला. ऐनुलमुल्कानीं आपली अवस्था या प्रकारची विपरित पाहिली तेव्हां व आपली एकंदर फौज पळून गेली, मोठी शिकस्त झाली असें अवलोकन केलें तेव्हां ऐनुलमुल्काचा पुत्र गालबखान म्हणोन होता त्या गालबखानास ऐनुलमुल्क बोलला कीं, अरे मुर्खा, काय उभा राहिलास ? येथें उभे रहाण्याचा हा समय नोहे. आपलीं बायकामुलें एकंदर खटले व खजिना घेऊन जलद या धांदलींतून व या गर्दींतून बाहेर पळ असें बोलला तेव्हां गालबखान आपले बापाचें मरण समईचे बोधावरून बायकामुलें, खजिना, पन्नास हत्ती, कांहीं घोडे व बहुत सामान सरंजाम घेऊन त्या युध्ध प्रसंगातून आपण बाहेर निघोन दिलगुंड्यास पळून जाण्याचा मार्ग धरीला. अंकुशखान बेमान नकमहराम होता.

ऐनुलमुल्काचा मिलाफी होता. तोहि ऐनुलमुल्काचे पुत्राची मित्रता धारण करून गालबखानासमागमें पिलगुंड्यास निघोन गेला. ऐनुलमुल्क व ईस्माईलशाहा हे उभयतां ईबराहीम आदिलशाहाकडील शूरांचे हातीं सांपडून कैद झाले तेव्हां तेच वेळेस इबराहीम आदिलशाहाचे शिपाई लोकांनीं ऐनुलमुल्काचे मस्तक कापून तें मस्तक हुजूर पाठविलें, म्हणजे इबराहीम आदिलशाहाकडे पाठविलें. तेव्हां तें ऐनुलमुल्काचे मस्तक कित्येक दिवस भाल्यास टोचून विजापुरचे किल्याचे दरवाज्या-पुढें सर्व मनुष्यांस जरब पडण्याकरितां उभें करून ठेविलें होतें. ईब्राहीम आदिल-शाहाचे हुकूमावरून डोळे काढण्याची सळई ईस्माईलशाहाचे डोळ्यांत फिरविली. तेव्हां ईस्माईलशाहा तेच वेळेस त्या डोळे काढण्याचे ईजेनेंच मरण पावला. ईस्माईलशाहा कोणते तारखेस मरण पावला हे कळावयाकरितां त्याचे मरणाची तारिख निघावी याजकरितां फारसी बैता करून त्यांत ईस्माईलशाहा मरण पावल्याची तारिख बांधिली आहे. त्या बैतेचा अर्थ लिहिला जात आहे. पारसी बैतेचा अर्थ : " ईश्वराचा स्तव असो. त्या कामांतील पादशाहाचे म्हणजे ईबराहीम आदिलशाहाचे लोकांनीं : पादशाहाचे विचारानें शत्रुलोकांचीं मस्तकें नाश पावलीं : प्रारब्धानीं ऐनुलमुल्क कोणते तारखेस मेला येविसीची तारिख कळण्याकरितां कापले व आणिले : दौलतीकडील शस्त्रानें जुलुम करून व शत्रूस चिंता प्राप्त करून मस्तक कापलें : " असा बैतेंतील अर्थ होतो. परंतु सरज व रोगम म्हणजे नीम हें अक्षर व गैन हीं दोन अक्षरें आबजदचे हिशेबानीं गणिलीं असतां नीमचे तीन व गैनचे एक हजार मिळोन बेरीज एक हजार तीन होतात. म्हणजे एक हजार तीन (इ. स. १५९४–९५) या सनांत ऐनुलमुल्क मरण पावला. ईबराहीम आदिलशाहाचे दौलतींत या प्रकारचें विघ्न सर्व शहरास घाबरे करावयाजोगें व सर्व लोकांस संकटानें घेरलें होतें तें विघ्न ईश्वराचे कृपेनें व साह्यानीं अशा सुलभ प्रकारानें निवारण झालें कीं, सर्व पृथ्वींतील मनुष्यें या विघ्नाचे पीडेंतून मोकळीं झालीं. तेव्हां ईबराहीम आदिलशाहा पादशाहानीं हें तात्काळ श्रेष्ठ कृपादान ईश्वरानीं केलें याजकरितां ईश्वरास नमस्कार करून दानास व बक्षीस देण्यास सिध्ध होऊन गरीबगुर्बास म्हणजे भिकारी लोक व फकीर लोकांस दानधर्मेंकरून दरिद्राचे पीडेंतून मोकळें केलें. त्या दिवशीं ज्या ज्या मनुष्यांनीं मित्रतेची व ईमानीपणाची शर्त बजाविली होती त्या त्या मनुष्यांस तऱ्हेतऱ्हेचे पोषाख व नानाप्रकारचे बक्षीस व ईनाम ज्याची जशी योग्यता होती तसे त्यास देऊन सर्वांस आनंदविलें ईस्माईलशाहाचे साह्य करण्या-करितां बुऱ्हाणशाहा याणी अहमदनगराहून निघोन एक मजल अहमदनगर सोडून मुक्काम केला होता. तो तेथें वर्तमान कळलें कीं, ऐनुलमुल्क ठार झाला व ईस्माईलशाहाहि मरण पावला. अशी खबर ऐकून अति लज्जित होऊन परत जाता झाला. ऐनुलमुल्काचा पुत्र व आंकुसखान पिलगुंड्यास निघोन गेले होते त्याणी

हिंदु लोकांचा आश्रय करून दिवस कंढित होते. कांहीं दिवस गुजरल्यानंतर आंकुसखान हा ईब्राहीम आदिलशाहांचे हुकूमावरून आदिलशाहापाशीं हुजूर येऊन पोहचला. पुन्हां नवीन कृपा संपादन करून अमीरीचे कामावर कायम झाला.

३६. बुऱ्हाणशाहाचा पुत्र ईब्राहीम निजामशाहा याणी आपला बाप बुऱ्हाणशाहा वारल्यानंतर ईब्राहीम आदिलशाहाचे मुलकावर फौज घेऊन चालून येणें, त्याचें पारपत्य करण्याकरितां ईब्राहीम आदिलशाहा याणी फौज घेऊन चालून येणें, आदिलशाहाची फत्ते होणें व ईब्राहीम निजामशाहाची शिकस्त होणें म्हणजे मोड होणें प्रकर्ण :

बुऱ्हाणशाहाची प्रकृत फारच बिघडली[१७] तेव्हां त्या आजारानें म्हणजे रोगाचे पीडेचें प्रबलतेनें आपण वांचत नाहीं अशी निराशा झाली. तेव्हां बुऱ्हाणशाहाने आपला वडील पुत्र ईब्राहीमशाहा, आजपर्यंत लुहागडचे (लोहगड) किल्यांत कैद केलेला होता, त्याजला कैदेंतून मोकळा करून बोलाऊन आणिला. त्याजला आपला वलीहाद म्हणजे आपले पाठीमागें तक्ताचा मालक हा करावा असें ठरविलें. बुऱ्हाणशाहा वारल्यानंतर[१८] दौलतीकडील कारभारी मंडळींनीं राजधानीकडील मुख्य कामदारांनीं ईब्राहीमशाहास राजपदावर बसविला. तो ईब्राहीमशाहा फार जलद मनाचा (?) होता व त्यास जवानीचा फारच गर्व होता. कोणते वेळेस काय होईल याचा नेम नाहीं येविषयीं कालचक्राचे गतीचे अनुभवाची खबर ठेवित नव्हता. आपले बापाची, म्हणजे बुऱ्हाणशाहाची, शिकस्त आदिलशाहासी युध्द करण्यांत वारंवार झाली यास्तव मनामध्यें कपट धारण करून कपटानें आदिलशाहाचा घात करावा असा विचार करित होता. निरंतर या प्रकारची कची भाताची हंडी शिजवित होता, म्हणजे नित्य असे दुर्बुध्दीचे विचार करित होता. ईतक्यामध्यें त्याचे कारकीर्दींत दक्षिणी लोक व हापसी लोक फार जमले होते. त्या अविचारी लोकांनीं दौलत व मुलुक खराब होण्याजोगीं प्रकर्णें निवडून काढून तीं प्रकर्णें चालू करिते झाले. आदिलशाहाचे वकील त्या हदींत होते त्या वकिलासी कजे व भांडाभांडी करून व्यर्थ त्या वकिलास दुर्भाषणें करित होते. इब्राहीम निजामशाह नाना प्रकारचे फंदफितूर करण्याच्या मसलती शिकऊन ईब्राहीम निजामशाहा

१७. आवेच्या विकारानें बुऱ्हाण निजामशाहा आजारी झाला. हि. १००३ च्या रजब महिन्यांत (= मार्च १५९५) –ब्रि. फि. ३, पृ. १८४.

१८. १८ साबान १००३ हि. (१८ एप्रिल १५९५) रोजीं बुऱ्हाण निजामशाहा वारला. –ब्रि. फि. ३, पृ. २८७.

याणी आधी गुप्तपणें कपट धारण केलें होतें त्यांत या मंडळींनीं अशा मसलती शिकऊन सदरहू कपट अधिक वाढविण्यांत आणिलें. तेव्हां ईब्राहीम निजामशाहा याणी फौजेची तयारी करून ईब्राहीम आदिलशाहाचे सरहद्दींत येऊन फंदफितुर व खराबी करण्यास आरंभ केला. त्यानंतर आदिलशाहा याणी त्या शत्रुलोकांचे पारपत्य करणें व त्या खराबी करणार फंदफितूर व बदचालीचे लोकांस शिक्षा करणें हें आपणांस प्राप्त आहे असें जाणोन अमीरलोकांस व लष्कर हजर होणेंविसीं आज्ञापत्रें पाठविलीं. त्या हुकूमाप्रमाणे फौज जमली. तेव्हां दौलतीचा पाय सुदैवपणाचे रिकिबींत ठेऊन, म्हणजे आदिलशाहा घोड्यावर बसून, सरहदीकडे चालते[१९] झाले. त्या शत्रु लोकासंनिध खुद जातीनें जाऊन जलद पोहचून आपले लष्करचे तंबू व डेरे शाहादूर्गांचा आश्रय धरून ठोकले. आपली यशस्वी फौज शत्रुलोकांवर नेमिली तेव्हां उभय पक्षीं युध्धास प्रारंभ झाला व शस्त्र तल्लक्षण जातें फिरूं लागले, म्हणजे शस्त्रांनीं तोडातोडी चालू झाली. यायोगें दर रोज बहुत मनुष्यें ठार होत होतीं. हा प्रलय बहुतच वाढला. आदिलशाहा पादशाहा याणी मोटे मोटे शूर युध्ध प्रसंगास मागें न हटणारे अशा शूरांस एके दिवशीं हुकूम केला कीं, या युध्ध प्रसंगात नित्य बहुत मनुष्य खराब होतात आणि आपला मनोरथ सिध्धीस जात नाहीं. याजकरिता असें केलें पाहिजे कीं, उदईक सर्व जमातीनीं एकदील व एकहिंमत होऊन एकदम जाऊन हल्ला करावा व पादशाही युध्ध प्रसिद्ध करावें, म्हणजे मोठें दारुण युध्ध करावें, म्हणजे आपले मनोरथ पूर्ण होतील. आपला जय व आपली फत्ते होईल. अशी आज्ञा केली. तेव्हां या हुकुमाप्रमाणें दुसरे दिवशीं करार ठरल्या अन्वयें आदिलशाहाकडील शूर यशस्वी तयार होऊन लढाईचे जाग्यावर चालून आले. तेव्हां शत्रुकडील फौजाहि तयार होऊन आली. उभयतांकडील फौजेची युध्धरचना झाली. उभय सेनेमध्यें शस्त्राग्नि प्रदिप्त झाला. उभयतांकडील शूर हल्ला करून मिसळते झाले, शूर लोकांच्या आरोळ्या आकाशापर्यंत जाऊन पोहचल्या, म्हणजे शूर मोठ्या आरोळ्या देऊं लागले. युध्धप्रसंग मोठा दारुण झाला तेव्हां जेरदस्त कोण व जबरदस्त कोण हें कांहींच कळत नव्हतें. पिलखान्याकडील कामदार मकसुदखान हा आदिलशाहाचे दौलतीकडील गुर्जी म्हणजे गुर्ज देशचे राहणारे चाकर लोकांपैकीं होता. त्याणी त्या धांदलींत व त्या गर्दीत साठ सत्तर लढाऊ हत्तीनिसीं पुढें चालून जाऊन सदरहु हत्ती शत्रुलोकांचे फौजेवर घातले. तेव्हां त्या राक्षसाप्रमाणें हत्तींचे तुडवातुडवीचे गर्दीनें शत्रूकडील फौज कित्येक घायाळ व जखमी होऊन चित्त्याचे व वाघाचें भक्ष झाले, म्हणजे या त्या रणभुमींत जे धका-बुकींत जेर होऊन पडले त्यांजला वाघानीं फाडून खाल्ले. कित्येक जखमी व घायाळ होऊन शत्रुकडील फौजेंतील लोक पळून गेले. उत्तम प्रकारचे ग्रह आले आहेत असें

१९. २० साबान १००३ हि. (=२० एप्रिल १५९५) रोजीं विजापुराहून बहमनहळळीस आला. –ब्रि. फि. ३, पृ. १८४.

समजतांच व ग्रहदशा दुष्ट फलदायक होती. तसें झालें म्हणजे आदिलशाहास जिंकून आपण यशस्वी होऊं असें निजामशाहाकडील लोकांचे मनांत होते. परंतु कार्यभाव विपरित होऊन निजामशाहाकडील शिकस्त झाली. त्यासमई पिलखान्याकडील मकसूदखानाची नजर एके गृहस्थावर गेली. तो गृहस्थ घोड्यावर बसलेला व त्याचा घोडाहि चांगला व हातांत तरवारहि उत्तम प्रकारची असा पाहिला. परंतु हा कोण गृहस्थ आहे हें समजुतींत आलें तेव्हां मकसूदखान याणी हत्तीवरून मोठे जोरानीं एक तीर त्या गृहस्थावर मारिला. २० तेव्हां तो तीर त्या गृहस्थाचे खांद्याखालील हाडावर लागून खांद्यांतून घुसून पार निघोन गेला. तो तीर त्या गृहस्थास लागून कोणीकडे गेला हें कळलें नाहीं. सारांश, या नंतर शत्रुकडील संपूर्ण फौजेंत अशी गर्दी व प्रळय झाला व आदिलशाहाकडील फौजेचे दैवाची फत्ते झाली व आदिलशाहास यश आले तेव्हां शत्रुकडील फौज परागंदा होऊन निजामशाहाचा मोड झाला. तेव्हां आदिलशाहाकडील शूरांनीं यशस्वी व विजयी होऊन निजामशाहाकडील बहुत सामान संरजाम व अत्यंत मालमत्ता लुटून घेऊन परत येते झाले. जासूद लोकांनीं प्रथम हल्लेचे समई आदिलशाहाकडील फौजेनीं निजामशाहाचे लष्करावर चालून जाऊन उभयतांची फौज परस्परें मिसळली व आदिलशाहाकडील फौजेचे व निजामशाहाकडील फौजेचे अंतर न दिसेनासें झालें. तेथें बातमीकरितां जासूद लोक उभे होते त्यांणी हें पाहिलें होतें. तेव्हां त्या जासूद लोकांनीं येऊन आदिलशाहास हें वर्तमान कळविलें की, आपले कडील फौजेचा मोड झाला व शत्रुकडील फौजेचें प्राबल्य झालें. तेव्हां आपलेकडील संपूर्ण अमीरलोक त्या शत्रूचे भयेंकरून जागोजाग छपून राहिले. जिवंत राहिले आहेत किंवा मेले हें कांहीं समजुतींत येत नाहीं. असें वर्तमान सांगितलें. यानंतर जासूद लोकांकडून वरचेवर वर्तमान येऊं लागलें. तेव्हां ईब्राहीम आदिलशाहाकडील कारभारी मंडळ पादशाहापासी हुजुर होते ते संपूर्ण अंतःकर्णांत खेद पावोन अत्यंत चिंतेंत पडले. स्वस्थ अंतःकर्णाचा व तेजस्वी मनाचा पादशाहा, म्हणजे ईबराहीम आदिलशाहा, त्यासमई पूर्ण स्वस्थपणानें व कायम मिजाजीनें राहून, म्हणजे सर्व भयाभीत झाले असतां आपण निर्भय राहून, कांहींएक घाबरपणा चित्तांत आणिला नव्हता. पूर्ण संतोष व आनंदानें सर्व घाबरलेले कारभारी मंडळास पादशाहानीं आज्ञा केली कीं, ईश्वरी वाणीस जाणांर माझें चित्त या प्रकर्णी उलटी साक्ष देत आहे, म्हणजे जासूद लोक वर्तमान सांगतात व तुम्हीं तेंच सत्य मानून घाबरलात, परंतु असेंच होइल असें माझें चित्तास सत्य वाटत नाहीं. साहस करणारा जो ईश्वर त्या ईश्वराचा मजला पूर्ण भरंवसा आहे

२०. "On the 16th Amardad (29 July 1595), a battle was faught about 40 miles from Ahmednagar in which he (Ibrahim Nizamshah) was killed by an arrow." – Akbar-Nama, E & D, VI, p. 97. Before the beginning of August 1595.– ब्रि. फि. ३, पृ. २९१–२९३.

कीं, तुम्हांस सत्वर आपली फत्ते जाल्याचें वर्तमान येऊन पोहचून तुम्ही सर्वत्र संतोष पावाल. अशी पादशाहानीं सर्वांस आज्ञा केली व पादशाहा असें बोलत होते तोंच संतोषाचें वर्तमान सांगणारे बातमीदार आले. त्यांणीं श्रेष्ट दौलतीकडील, म्हणजे इब्राहीम आदिलशाहाचे दौलतीकडील, फत्ते झाल्याचें व वाईट परिणामाचे शत्रुची शिकस्त व मोड झाल्याचें वर्तमान सांगितलें. तें वर्तमान ऐकतांच पादशाहा व पादशाहापासीं हजर होते ते एकंदर कारभारीमंडळ संतोष पावले. त्या कचेरींतील लोकांनीं हें वर्तमान ऐकतांच स्वस्थ अंत:कर्ण पुण्यवान पादशाहाचा स्तव केला व सर्वांनीं पादशाहास आसीर्वाद दिल्हे, म्हणजे तुझे निरंतर कल्याण असो असें म्हणते झाले. मध्यरात्रीं पुन्हां जासूद लोकांनीं खबर आणिली कीं, शत्रुचे फौजेचा मोड होऊन शतावधी संकटानें शत्रुलोक परांड्याचे किल्याकडे निघोन गेले. इबराहीम निजामशाहाचे खांद्यावर तीर लागून जखमी होऊन किल्याचे आसपास गेला तोंच घोड्यावरून पडला आणि मरण पावला. असें वर्तमान सांगितलें तेव्हां दयावंत आदिलशाहा पादशाहा चिंताग्रस्त होऊन फार हळहळला. ईबराहीम निजामशाहाचा मुलुख लुटूं नये म्हणोन आदिलशाहानीं आपले फौजेस आज्ञा करून लुटणेंविसीं मनाई केली. आपण यशस्वी व विजई होऊन आदिलशाहाची स्वारी परत येती झाली.[२१]

## ३७. ईबराहीम आदिलशाहा पादशाहा याणी संतोष व आनंदानीं विजापुरास परत येणें व दुसरे कोणाचें साह्य न इच्छितां पादशाहानीं आपण खुद जातीनेंच राजधानीचीं सर्व कामें चालविणें प्रकर्ण :

जेव्हां यशस्वी पादशाहा म्हणजे आदिलशाहा फत्तेमंदीनें, पूर्ण विजयानें, बहुत संतोषानें व आनंदानें शाहादुर्ग येथून परत येता झाला आणि तारीख ३० माहे जिल्हेज सन १००३ ( २६ ऑगस्ट १५९५ ) रोजीं समुद्र किनाऱ्यास येऊन पोहचून आपले सूर्यासारखे तेजस्वी अकलेनीं ठरविलें कीं, हे मोहरमचे दहा दिवस येथेंच समुद्र-किनारेस घालऊन पैगंबराचे ताबुत करावेत. नंतर विजापुरास जावें. याजकरितां तेथेंच कांहीं दिवस मुकाम झाले. विजापुर येथील सर्व कामदारांस आज्ञापत्रें पाठविलीं कीं,आम्ही मोहरमचे दहा दिवस झाल्यानंतर विजापुरास येऊं. याजकरितां शहरची शोभा व आरास जशी असावी तशी आईन बंदी म्हणजे शहरांतील संपूर्ण भिंती वगैरे रंगवून व खांब मढवून बहुत आरास करावी. या करण्यास थोडा बहुत खर्च पडेल असा कांहीं एक अंदेशा न करितां जशी आरास करावयाचे मनांत येईल तसें व शहर जसें

२१. १३ मोहरम १००४ हि. ( ९ सप्टेंबर १५९५ ) रोजीं इब्राहिम आदिलशाहा विजापुरीं आले. –ब्रि. फि. ३, पृ. १८७.

शोभिवंत करावयाचें असेल तसें करावें. अशीं आज्ञापत्रें पाठविलीं तेव्हां त्या हुकुमा-प्रमाणें विजापूर येथील कारभारी मंडळींनीं बहुत यत्न करून अत्यंत शोभेनें व फारच आरास करून शहर शोभिवंत केलें. किल्याचे दरवाज्यापासून ओल्हेपुरचे दरवाज्या-पर्यंत कोशसवाकोशाची अंतरा आहे, तेथपर्यंत बाजार रस्ता आहे. तेथपावेतों भिंतीचे दारांस व गिलाव्यांचे व धोंड्याचे भिंतीस मखमलीनें व कलाबुतीनें रूम व शाम देशचे कुमाष म्हणोन भारी किंमतीचें कापड असतें त्या कापडानें मढऊन अशा प्रकारें शहर शोभीवंत केलें कीं, ती शोभा जे जे पहात त्या पहाणारांचे नेत्रास अधिक तेज येत होतें. सदरहू शोभा पाहाणारांचे प्रकृतीस बहुत आनंद व सामर्थ्य येत होतें. या शहरची आरास व शोभा पाहाणाराचे चित्त तत्क्षण भ्रमर त्या शोभा पाहाण्यानें उडत येऊन पराधीनपणें शहरचे स्तव करण्याचे शब्द करण्यांत पंख उडवित होते, म्हणजे जो पाहील त्यास बहुत आनंद होत होता. किल्याचे दरवाजाचे पुढील मैदानांत मोठे मोठे गुणवान मनुष्यांनीं बहुत आवडीनें लाकडी कोच व खुर्च्या वगैरे बसावयास मांडून नानाप्रकारचे शोभेनें शोभिवंत केलें. बाजाराची शोभा याच प्रकारें व पूर्ण स्वच्छता व अत्यंत शोभेनें शोभिवंत झाली. हरएक दुकानांत तीन चार तरुण गृहस्थ व बहुत रूपवान लावण्य रूपाचे ईराक देशचे व खुरासन देशचे व रुमशाम येथील विद्वान व चतुर लोक पूर्ण शोभेनें नटून बसून काम कारभार करित होते. आल्हेपूरचे दरवाज्यापासून दोन अडीच कोशपर्यंत दुरस्ता कोच व खुर्च्या मांडून व त्यास मखमलीनें व कलाबुतीनें मढऊन हरएक रवन्यापुढें व बागेपुढें, कीं ज्या बागेमध्यें नाना प्रकारचे वृक्ष चित्तहरण करणारे व नाना प्रकारचीं झाडें मनोरंजन करणारीं तऱ्हेतऱ्हेचे रंगाचे पुष्पानीं दाटलेलीं व तऱ्हेतऱ्हेचे फळांनीं सफलित होते त्यापुढें मांडले. व हरएक महालांत व वाड्यांत सुस्वर गायन करणारे गवईलोक स्वर्गीचे गाणाराप्रमाणें, म्हणजे गंधर्वां-सारखें, गायन करित होते, किं त्या गायनाचे सुस्वरेंकरून पाण्याची वाहाती गती स्थिर होत होती, पक्षाचे उडणें बंद होत होतें, म्हणजे उत्तम प्रकारचें गायन करित होते. याचप्रकारें कलावंतिणी रूपवान, कीं पाहतांच मनुष्यें भुलत होतीं अशा कलावंतिणी, नाच करणाऱ्या बहुत थाटानें दागदागीने व जडजवाहीर घालून बहुत नटून हरएक जागीं वाड्यांत व महालांत नाच करून हरएक नखऱ्यांत व आदा करण्यांत मनुष्याचें चित्ताची शिकार करित होत्या. हरएक भाव करण्यांत भोळसर मनुष्यास तर वेडेच करित होत्या. निःसंशय या दक्षण देशांत कोणत्याच शहरची अशी शोभा व आरास कधींच झाली नाहीं. सारांश, मोहरमचे दहा दिवस झाल्यानंतर ईबराहीम आदिलशाहा समुद्र किनाऱ्याहून आपली लष्करची ढाल उभी करून ऐश्वर्य व दौलतीसहित पूर्ण मनोरथानें विजापुराकडे चालू झाला. तारिख १४ माहे मोहरम सन १००४ ( ९ सप्तेंबर १५९५ ) रोजी पर्वतासारिखे मोठ्या घोड्यावर

बसून स्थिर स्थिर व सावकाश चालत स्वारी आली. चहूंकडे पहात पहात व ज्या ज्या कारागिरी व चमत्कार उत्तम प्रकारचे जे ज्या रस्त्यामधें केले होते ते सर्व पहात पहात विजापूर शहरचे किल्यांत स्वारी दाखल झाली. आनंद महाल म्हणोन पादशाहाचा खासा महाल, कीं तो महाल याच पादशाहानीं बांधविला आहे व आनंद महाल बहुत शोभेनें व अत्यंत उत्तमपणानें बांधिलेला होता व त्या आनंद महालाचे सभोंवतें बाग बहुत टवटवीत व त्या बागेंतील वृक्षहिं बहुत शोभिवंत व पानानें टवटवित व सफलित होते व अद्यापी त्या बागेचा बंदोबस्त सहस्त्रावधी शोभेनें शोभिवंत ठेविला होता त्या आनंद महालांस, ईबराहीम आदिलशाहा पादशाहानीं आपले कल्याणप्रद चरणानीं स्वर्गास लाजविणारा केला, म्हणजे पादशाहाची स्वारी आनंद महालांत उतरली. शहरची गलोगलींतील व रस्त्यातील व बाजारांतील आरास व शोभा पाहून बहुत संतोष होऊन फारच 'शाबास शाबास' अशी आज्ञा करिते झाले. दौलतीकडील कामदार, कारभारी मंडळ, अमीरलोक, नामांकित शिपाईलोक, शिबंदी, संपूर्ण कामगार, सर्व चाकर लोक व कचेरींतील लोकांस योग्यतेनुरूप पोषाख देऊन व बहुत बक्षिसें देऊन संतोष केलें. फकीर, औलीया, शेख, विद्वान, गुणीजन व कविता करणारे लोकांस बहुत बक्षिस देऊन संतोष केलें, गरीबगुरबा, म्हणजे भिकारदुकार लोक, पादशाहाचे दानधर्मानें प्रपंचाचे चिंतेंतून सुटले. यानंतर पादशाहा पूर्ण स्वस्थपणानें तक्तावर बसून संतोष व मनोरथपूर्णतेंत निमग्न होऊन खुद जातीनें राजधानीचीं कामें शेवटास लावित होते. नित्य दोन घटका दिवस आला म्हणजे वाड्यांतून निघोन दरबारांत येऊन तक्तावर आठवे घटकेपर्यंत बसून पादशाही काम कारभार पहाणेंत निमग्न होत होते. जागोजागचे व तर्फेतर्फेचे पादशाहालोकांकडून व अमीरलोकांकडून कागदपत्र येत होते ते, तशाच लोकांच्या अर्ज्या, तक्तासंनिध राहणारे हुजुरचे चाकरलोकांच्या फिर्यादी व सर्वांच्या अर्ज्या पादशाहा खुद आपण जातीनें वाचून पहात होते. त्या अर्ज्यांतील व पत्रांतील अभिप्राय आपले चित्तांत आणोन हरएक प्रकर्णी हुकूमाचे शेरे करित होते. संपूर्ण माली व मुलकी राजधानीचीं कामें पादशाहा आपण खुद जातीनें पाहून दुसऱ्याचें साह्य न इच्छितां आपले चित्तास वाटेल तसें, व तेंहि खरें आहे कीं जो अकलवान आहे त्याणी आपले विचारास येईल तसें करावें म्हणजे त्यांतच कल्याण आहे, त्याप्रमाणें पादशाहा करित होते. तेव्हां राजधानीची कामें कांहीं दिवस याचप्रकारें चाललीं. थोडकेच दिवसांत पादशाहानीं आपले राजधानीचा बंदोबस्त ठेविला, कीं राजधानींत कांहींएक बखेडा झाला नाहीं.

३८. निजामशाहा याणी चांदबिबीशी वैर धारण करणें, बाहादुरशाहा याणी किल्यावर हल्ला करणें व आदिलशाहा याणी रफीउद्दीन शिराजी याजला उभयतांचें सख्य करण्याकरितां रवाना करणें :

जेव्हां निजामशाहाकडील अमीरलोकांनीं आपला धणी ईब्राहीम निजामशाहा याजला मृत्युमुखीं घातला, म्हणजे मारविला आणि अभ्रांतील ढगाप्रमाणें जलद पळून अहमदनगरास गेला, असें झाल्यानंतर त्या जमातीपैकीं मंजूखान म्हणोन ईमराहीम निजामशाहाचा मुख्य वकील होता, त्याणी किल्ला व खजिना बळकाऊन आपले निसबतीचे लोक राजधानीचे हरएक कामावर नेमून जबरदस्तपणाचा झेंडा [२२] उभा केला, म्हणजे जबरदस्त झाला. तेव्हां दुसरे अमीरलोक मंजूखानाचे वैरत्वावर व वाकडेपणावर उठले. शेवटीं दक्षिणी अमीरलोकांत व हापसी अमीरलोकांत लढाईस प्रारंभ झाला. हापसी लोक जबरदस्त झाले तेव्हां मंजुखान फार घाबरून किल्याचा आश्रय धरून राहिला. भयास्तव शाहाजादा शाहा मुराद म्हणोन अकबर पादशाहाचा पुत्र, कीं तो शाहा मुराद आपले बापाकडोन अहमदाबाद हस्तगत करून गुजराथ येथें राहिला होता, त्याजकडे विनंती पत्रें पाठवून अहमदनगरचा किल्ला आपले हवालीं करितो असा करार करून आपण येथपर्यंत आलें पाहिजे म्हणोन विनंतीपत्र लिहिलें. तेव्हां तो शाहा मुराद अकबराचा पुत्र, संधी पहातच होता. त्याणी या विनंती पत्रावरून हाच समय अलभ्य लाभाचा असें जाणून तात्काळ तीळप्राय अवकाश न करितां तीस हजार हत्यारबंद स्वारांनिसीं दक्षण देशावर चालून आला. [२३] अहमदनगरासंनिध येऊन पोहचला. [२४] तेव्हां

२२. शाहा ताहिरचा मुलगा अहमद यास दौलताबादेहून आणून निजामशाही तख्तावर मिआन मंजूनें १० जिल्हेज १००३ हि. (६ आगष्ट १५९४) रोजीं बसविलें. –ब्रि. फि. ३, पृ. २९३.

२३. "The Prince Morad left Ahmedabad on 20th Aban 40th Julus ( 2 Nov. 1595 ) and rested at Broach. He left Broach for the Deccan on 22nd Khurdad 40th Julus ( 1 May 1596 )"– 'Akbar-Nama', E. D. p. 92.

२४. "On the 23rd of Rubbee–oos-Sany of 1004 A. H. ( 16th Dec. 1595 ) the Prince Moorad Mirza appeared on the Northern face of Ahmednagar," Br-ter 3, p. 298, "On the 19th Azur ( 1 Dec. 1595 ), Prince was at the fort of Chand, 30 kos from Ahmednagar.... On the 8th Dai ( 19th Dec. 1595), the army encamped half a kos from the city....'– Akbar-Nama चांदवड

किल्ला हवाली करून घ्यावा म्हणोन मंजुखानास मागणें केलें. शाहाजादा या हदींत शत्रूवर व हापसी लोकांवर प्रबल झाला होता. यास्तव सदरहू शाहाजादा येण्यापूर्वींच मंजूखान हा शाहाजाद्यापुढें निरोपाय झाला. किल्ला न देणेविसीं आग्रह धरिला. मनाई करूं लागला. परंतु हिंदु लोकांचे फौजेपुढें धैर्य ठरेना. दम निघेनासा झाला तेव्हां आपले शक्तीनुरूप किल्यामध्यें गल्ला व खाण्यापिण्याचे जिन्नस व शिबंदी लोक बहुत व द्रव्यांह बहुत जमा करून किल्याची मजबुती करून त्या किल्यांत विश्वासू मनुष्यें ठेऊन त्या विश्वासू मनुष्यांचे हवालीं किल्ला करून मंजूखान किल्याबाहेर आला. तेव्हां शाहाजादा याणी किल्यावर हल्ला करावा म्हणोन हुकुम दिल्हा. चांदबिबी सुलतान ही मोठी शूर, पराक्रमवान, विचारवान व अकलेंत पूण श्रेष्ठ होती. तिणें किल्यांतील शिबंदी लोक आपले हुकुमांत घेऊन मोंगलाचे पारपत्यावर चालू झाली मंजूखान याणी चांदबिबी सुलतान इचें साह्य करण्याकरितां अहमदनगर येथील फौज जमविण्याचा विचार करून बहुत यत्न केला. कामाची खराबी फार झाली होती. अमीरलोकहि मंजूखानास फार त्रासले होते. यास्तव मंजूखानाचे यत्नांनीं उपयोग झाला नाहीं. सबब निरोपाय होऊन विश्वासू लोकांचे समागमें विनंती पत्र बहुत करुणायुक्त लिहून देऊन ईब्राहीम आदिलशाहाकडे पाठऊन आपण साह्य व मदतगारी करावी म्हणोन विनंती करविली. असेच चांदबिबी सुलतान इनेंहि मदतीविषयीं पत्रें पाठविलीं. तेव्हां आदिलशाहा याणी आप्तविषयीपणा व शरीरसंबंधाचे नात्यावर दृष्टि देऊन असा विचार ठरविला कीं, लढाऊ फौज पाठऊन व निजामशाहाकडील अमीरलोक, कीं जे आपआपणांत व आपले धण्यासी कपट व वैर वागऊन कामाची खराबी केली होती त्या, अमीरलोकांस आदिलशाहा याणी आपले यत्न करून सख्य करून चांदबिबी सुलतान ईचें साह्य व कुमक करण्याकरितां व निजामशाहाची राजधानी बहुत बंदोबस्तानी संरक्षण करावी म्हणोन त्यास आज्ञा करून येविषयीं आदिलशाहानीं अत्यंत यत्न केला. जेव्हां ईआतिकदुदवला सुहीलखान म्हणोन महालाकडील खोज्या मोठा शूर व अमीर संभावित होता, युध्ध करण्यांत पूर्वीचे मोठे मोठे शूरांचे मध्यभागास तोडणारा होता, म्हणजे पूर्वी थोर थोर शूर झाले त्यापेक्षां हा अधिक होता व बहुत वेळ युध्धांत यशस्वी व विजयी झाला होता, तो सुहीलखान बहुत दिवस सर्व अमीरलोकांचे कपटास्तव व वाकडेपणामुळें त्रासला होता.

E. D. p. 92–93. मंजूखान शुक्रवार रबिउल – आवल (२३ दिसेंबर १५९५) रोजी सैन्यासह बीडकडें पळाला. ‘ बुन्हाने–मासीर, ’ पृ. २८६, मराठी भाषांतर, रबिउलसानीं २८ शनवार रोजीं (३० दिसेंबर १५९५) अभंगखान अहमदनगर किल्याचे तटाजवळ जाऊन हल्ला चढविला.–पृ. २९३ सदर. रज्जबचे सुरुवातीला शुक्रवारीं रात्रीं (१।२ मार्च १५९६) किल्याचे तटास सुरुंग लावला. पृ. २९९ सदर.

कारण कीं, गरजवंत कि येक अमीरलोकांनीं त्याजला भय घातलें होतें कीं, झाडोले (!) व तुझी योग्यता सर्व लोकांहून अधिक वाढली याजकरिता पादशाहा तुजला धरून कैद करण्याचे विचारांत आहेत. असें भय घातलें तेव्हां सुहीलखान या कारणास्तव भयाभीत होऊन दूर जाऊन शाहादुर्गांत राहून पादशाहाकडे हुजूर येत जात होता. अशा समयामध्यें अहमदनगरचे राजकारण उभें राहिलें. आदिलशाहानीं रफीउद्दीन षिराजी याजला आज्ञा केली कीं, तूं आपले कामावर आपले पुत्रापैकीं कोणी नेमून तूं खुद जातीनें जलद अहमदनगरास पोहच. अमीरलोकांमध्यें परस्परें वैरभाव व युध्ध प्रसंग उत्पन्न झाला आहे व ते अमीरलोक आपले धण्यासी बदलून दौलतीचे अकल्याण इच्छित आहेत. त्या सबबेनें राजधानींत बखेडा झाला. याजकरितां आम्हांकडोन बहुत नीति व उपयोगी पडावयाजोगें बोध शिकऊन त्या अमीरलोकांस ताळ्यावर आण, म्हणजे ते अमीरलोक आपआपणांत एकदिल होऊन शत्रूचे पारपत्य करण्याचा यत्न करितील. आधीं शाहादुर्गास जाऊन सुहिलखानाची भेटी घेऊन सुहिलखानाचे मनांत जें कांहीं वैषम्य, म्हणजे वाकडेपणा, व भिती आली आहे त्याविषयीं आम्हांकडून खातरी करून व पुर्ण दिलभरंवसा देऊन त्याचे चित्तांतून वाकडेपणा काढून टाक. या दोन प्रकर्णांत प्रसंग पडेल तसें करून कार्यभाव नमुन्यांत आणावा. रफीउद्दीन सांगत आहे कीं, " त्यासमई सरकारचे सेवेची बहुत कामें मजकडे नेमीलीं होती. असें कीं, शहर विजापूर येथील बंदोबस्ताचें मालकपणाचें काम, ईबराहीम आदिलशाहाचा पुत्र फतहखान याचे अमीरीचे मुख्य पेशवाईचें काम, फतहखान याचा मुख्य शिक्का माझे हवालींच केला होता व दोनशे हत्ती व सातशे ऊंट व दीड हजार घोडेहि माझे नेमणुकीस होते. हत्ती उंट व घोड्याचे चंदी वैरण व रतीब करितां मोठे मोठे गांवचा वसूल एक लक्ष होन येत होता. कारकून लोक तर्फेतर्फेतील गांवचे मामलेदार अर्ज्या व विनंतीपत्रें वगैरे जे कागदपत्र हुजूर पाठवित होते ते कागद व जागोजागचे खबरीचे कागदपत्र जासूद लोक आणित होते ते एकंदर कागदपत्र मजपाशींच जमा होत होते. मी हुजूर नेऊन समजावित होतो. ही सर्व कामें सरकारचे हुकूमावरून मी आपले सेवकांपैकीं एका सेवकाचे हवाळीं करून मी मसलतीवर चालून गेलों. जेव्हां षाहादुर्गासंनिध जाऊन पोहचलो तेव्हां सुहिलखान अडीच कोशपर्यंत मजला सामोरे येऊन परस्परें भेटी झाली. सुहिलखानाचे वाड्यापासीं जाऊन पोहचलों तेव्हां त्याचा वाडा पाहिला. तो फारच उंच व विस्तीर्ण असे मोठे ईमारतीचा पाहिला. त्या वाड्याचे सभोंवते कनाथी व मंडप उभे केले आहेत. पातशाही कचेरीप्रमाणें बिछायती पूर्ण शोभेनें आंथरून त्या मजलसींत संभावित मनुष्यें व शिपाई लोक व शागीर्दपेशे व खिदमदगार कायद्याप्रमाणें श्रेष्ट अमीरलोकहि बसून व उभे राहून कामांत निमग्न आहेत. त्याचा कारखाना पूर्ण जरबदार व तेजस्वी पाहिला. सुहिलखान याणी ताजीम तवाजू घेण्यांत तीळमात्र अनमान केला नाहीं. कचेरींतील समारंभ झाल्यानंतर मी

वर्तमान विचारिलें. यावर आपले कारणाचा मजकुर लक्षांत आणोन सविस्तर वृत्तांत सुहीलखानानें सांगितला. ज्या ज्या कारणापासून सुहीलखानाचे अंतःकर्णांत भय व वाकडेपणा आला होता तो त्याणी मजला संपूर्ण सांगितला. तेव्हां मी त्याजला पृथ्वीपती पादशाहाचे आज्ञेवरून जसें पादशाहानीं सांगितलें होतें त्याचप्रमाणें करुणायुक्त व कृपामिश्रित भाषणें बोलून त्याचे मनांतील वाकडेपणा काढून टाकिला. त्याचे मनांत अंदेशा आला होता तो मी निवारण केला. कित्येक गोष्टी सख्य करण्याच्या बोलण्यांत आणोन मी बोललो कीं, पृथ्वीपती पादशाहाची तुम्हांवर फार मेहरबानगी आहे, तुम्हाविसी फार संतोष आहे, तुम्हास फार ईच्छितात व तुमची पादशाहा बहुत तारिफ करितात. तुमचा धाक व जरब मोगल लोकांचे अंतःकर्णांत अशी प्रवेशली आहे कीं, तुम्ही या सरहदींत आहां तोंपर्यंत युध्ध करण्याच व लढाई करण्याचें मोंगलाचें सामर्थ्य नाहीं. तात्पर्य असें होतें कीं, सुहीलखान त्या सरहदींत होता तोंपर्यंत मोंगललोकांनीं कधींहि युध्ध केलें नाहीं. आपण या दौलतींतून मन काढल्यापासून मोंगललोकांनीं बहुत खराबी केली. हें माझें उत्तम प्रकारचें बोलणें पादशाहाचे मेहेरबानगीयुक्त भाषण सुहीलखान याणी एकून बहुत संतोष होऊन सुहीलखान याणी मी सरकारचा चाकर आहे व मजला पादशाहाचे सेवेची बहुत आवड आहे असें बोलला. या प्रकारें सर्व मजकूर हूनलि सुहीलखान याणें सदरहू मजकुराचें विनंती पत्र पादशाहाकडे पाठविलें. तेव्हां पादशाहानींहि त्या विनंतीपत्रांचें उत्तराचें आज्ञापत्र बहुत कृपायुक्त व अत्यंत मेहरबानगीनें परिपूर्ण व त्या आज्ञापत्रांत खातरदारी व दिलभरंवशाचा मजकूर लिहून त्या पत्रासमागमें पोषाख व जवाहीर वगैरे देऊन तें आज्ञाप्रत्र सुहीलखानाकडे पाठविलें. याप्रकारें सुहीलखानाचे व पादशाहाचे सख्य झालें. या सुहीलखानाचें सख्य करण्याचे कामांतून मोकळा झालों. तेव्हां सुहीलखानाचे अंतःकर्णांत वैषम्य व वाकडेपणा आला होता तो सव माझे खातरी करण्यानें निवारण झाला. तेव्हां मी अहमदनगराकडे चालता झालों. जेव्हां निजामशाहाचा मुलुक पाहिला तों ओसाड, खराब, रयत सर्व निघोन गेलेली, सर्व मनुष्यें हवालदील व घाबरलेलीं, खेडीं व गांव पाहिले तों त्या गांवांस व खेड्यांस गासकुसूं व भिंती व घरावर वासे कौलें मात्र उरलीं आहेत. याशिवाय कांहीं दृष्टीस येत नव्हतें. अमीरलोक सर्व आपले धण्याशीं वाकडेपणा व आदावत धारण करून बदलले आहेत. अभंगखान हापसी हा कित्येक दुसरे हापसी व दक्षणी अमीरलोकांसहित हत्यारबंद वीस हजार स्वारांचे जमातीनिशीं किल्यांतून बाहेर राहून चांदबिबी व कैलासवासी ईबराहीमशाहाचा पुत्र बाहादूर शाहा, पाच वर्षांचा, जुन्नरचे किल्यात कैदेंत होता, त्याजला चांदबिबी सुलतान इणें त्या संकटांत व धांदलींत त्या किल्यांतून मोकळा करून आणोन राजधानीचे तक्तावर बसविला होता. त्या बाहादूरशाहाशीं व चांदबिबीशीं अभंगखान याणी कपट व अदावत

धारण करून, किल्यावर हल्ला करण्यास प्रारंभ करून, खाण्यापिण्याचे जिन्नस आपले येजमानाकडे पोहचूं नयेत असा बंदोबस्त करून बंदी केली होती, तों अशा समयांत मी संन्निध जाऊन पोहचलो तेव्हां अभंगखान कित्येक अमीरलोकांसहित फौज तयार करून समागमें घेऊन सामोरा आला. अभंगखान याणी आपले लष्कर व अमीर-लोकांचे लष्कर तयार केलें. यांत मतलब होता. तात्पर्य अभंगखान याणी आपली फौज पूर्ण तयारीनें तयार केली होती. त्या दिवशीं अभंगखान याचे जेवणखाण व निजणें वगैरे लष्करांतच झालें. दुसरे दिवशीं सैद आली तारिखी म्हणोन तेथील लोकांपैकींच होता तो सर नौबतास समागमें घेऊन चांदबिबी सुलतान ईजकडून आला. त्याणी मजला किल्यांत आणोन बाहादूरशाहाची भेटी केली. तेथें बहुत जमात श्रेष्ठ लोक व संभावित व कारभारी मंडळ किल्यामध्यें होते ते सर्व लोक घाबरलेले व हवालदील झालेले होते. त्यांचे मुखांनीं अभंगखान व अमीरलोक यांचे वाकडे-पणाच्या कित्येक हजार गोष्टी मी ऐकिल्या."

## ३९. बाहादूरशाहाचे व अमीरलोकांचे सख्य रफीउद्दीनाचे यत्नांनीं होणें :

नंतर मी सख्य करण्याचे कामांत पडून बहुत यत्न केला. त्या अमीरलोकांचे जमातीस आदिलशाहाकडून बहुत पारपत्याचे व शिक्षेचे पर्याय सांगोन ताकिद करून, म्हणजे तुम्ही असें गैरराहा वागल्यास पादशाहाकडून तुमचे पारपत्य केलें जाईल असें सांगोन, मोठी धाक घालून अमीरलोकांस ताळ्यावर आणिलें. सख्यतेचा करार करून घेतला. भेटीचे दिवशीं बाहादूरशाहा बुरुजावर बसले व अमीरलोक कोटाचे बुर्जाचे तळास येऊन सर्वांनीं सलाम व आदब बजाविली, म्हणजे सलाम केले. रात्र झाली होती. सबब ते दिवशीं ईतकेंच पुरें करून दुसरे दिवशीं लष्करांत निजामशाहाचे खासे बाड लागोन तंबू व डेरे ठोकले. तेथें निमतख्ती तक्त करून बाहादूरशाहाचा कमरबंद व ताज, म्हणजे मुगुट, त्या तख्तावर ठेविले. लष्करचे एक एक अमीरलोकांनीं व सरदारांनीं त्या तक्तापुढें येऊन सलाम करून बक्षिस व पोषाख घेते झाले.[२५] ही गोष्ट होण्यानीं लष्करचे सर्व लोकांस व किल्यावरील सर्व राहणारांस अत्यंत संतोष झाला. सर्वांनीं संतोषाचीं वाद्यें वाजविलीं. आदिलशाहाचे नांवानीं सर्वांनीं आसीर्वाद दिल्हे. आदिलशाहाची दौलत, ऐश्वर्य व कल्याण निरंतर असो असें सर्वत्र म्हणते झाले. कारण कीं, आदिलशाहाचे यत्नानें हें विघ्न व हें अरिष्ट विझलें. सर्वांस सुख

२५. बहादुरशाहाला निजामशाही गादीवर तख्तनसीन ११ ते १७ इस्फंदरमजच्या दरम्यान म्हणजे २० ते २६ फेब्रुवारी १५९६ मध्यें केलें. –'Akbar Nama,' E. D., p. 94.

व मुल्कास विश्रांति प्राप्त झाली. किल्यांतील माणसें किल्याबाहेर येऊन लष्करांत जाऊन आप्तविषयीं व सोयरे धायरे मंडळींच्या बहुत दिवस भेटी झाल्या नव्हत्या त्या सर्वांच्या भेटी घेऊन बहुत संतोष पावते झाले. सर्वत्र ईश्वराचा स्तव करिते झाले. लष्करांतील शिपाईलोकहि किल्यांत जाऊन बाहादूरशाहाचे सेवेंत आपआपले कामाकाजाच्या मजकुराचा अर्ज करून कामें करून घेत होते. कामकारभारावर कामदार नवे झाले. त्या नवीन कामदारांनीं राजधानीचीं व लष्कराचीं कामें पाहात जाऊन बंदोबस्त ठेवित जावा असा हुकुम झाला. यायोगें बहुत दिवस बंदोबस्तानें व वाजवी रीतीनें कारभार चालला. सर्वांस आतां आपलें चांगले होईल अशी आशा उत्पन्न झाली.

## ४०. पुन्हा फंदफितूर करणारे लोकांनीं सख्यतेचा करार मोडून नानाप्रकारचीं संकटें उभी करणें :

अशा समयामध्यें फंदफितूर करणारे लोकांस या सख्य होण्यांत उपयोग दिसेनासा झाला. तेव्हां फंदफितूर करण्यास प्रारंभ करून वैरपणाचा व शत्रुत्वाचा झेंडा, म्हणजे ध्वज, उभा करून तीन चार मामलेदारांस वगैरे धरून कैद केलें. या करण्यांत विझलेलें विघ्न पुन्हां उत्पन्न झालें. वाळलेला दोरा पुन्हां पिंजलेले कापसासारखा विसकटला. वाकडेपणा होता तोच पुन्हां प्रसिद्ध झाला. फंदफितुराचा बाजार भरला व किल्यांतील कामदारांनींहि शत्रुत्वाविषयीं कमी केलें नाहीं. लष्करवाले लोकांनीं किल्यांतील शिबंदीस नाना प्रकारचे ठकविद्येनें ठकऊन आपलेसें करून त्या शिबंदीसी करार ठरविला कीं, लष्करचे अमीरलोक तयार होऊन, ज्यासमई किल्ला घ्यावयास येतील तेव्हां तुम्ही लढाई न करितां किल्यावरून तोफा व बंदुकी डागूं नयेत. याच करारावरून ज्या दिवशीं अमीरलोक वीस हजार स्वारांनिसीं लष्करची तयारी करून किल्यावर चालून आले तेव्हां किल्यावरील शिपाईलोकांनीं करार ठरल्याप्रमाणें लढाई करण्यांत व तोफा व बंदुकी डागण्यांत ढिलाई करून स्वस्थ बसले. परंतु त्या किल्यावर कित्येक अमीरलोक शिपाई जे इमानी होते त्याणी शूरत्वांत कंबर बांधून शत्रूवर हल्ला करिते झाले. किल्याच्या दरवाज्यापुढें प्रळयाग्नीच्या ज्वाळा उठूं लागल्या. बाहादूरशाहा वयानें लाहान असून या प्रळयाचे समई किल्याचे बुरुजावर चढला आणि शिपाईलोकांस युध्द केलें असतां बहुत बक्षिस मिळेल अशी हिंमत देत होता. त्यासमयीं लष्करवाल्यांनीं तीन चार तीराचे भाते बाहादूरशाहावर सोडिले. तेव्हां एक तीर बाहादूरशाहावरील छत्रीचे दांड्यास लागून एकीकडे जाऊन पडला. तो तीर जमिनीमध्यें एक वीतपर्यंत घुसला. एक तीर खान्यासरा, म्हणजे जनानखान्याकडील खोज्या बाहादूरशाहाचे पाठीमागें उभा राहिला होता, त्याचे नरड्यावर येऊन लागला.

त्या खोज्याचे नरड्यांतून पार निघोन गेला तेव्हां तो खोज्या तेथेंच पडला व त्या तीराचे जखमेनें मरण पावला. दुसरे दोन तीन गृहस्थ जखमी झाले. असें असतां अशा गदात बाहादूरशाहा शिपाईलोकांस युध्ध करण्याविषयीं बहुत हिंमत देत होते. कित्येक तोफा व बंदुकी किल्यावरून शत्रुचे फौजेवर डागल्या तेव्हां शत्रुकडील बहुत मनुष्यें ठार झालीं. बाकी राहिले ते लोक माघारे फिरून आपले लष्करचे जाग्यास जाते झाले. जेव्हां फंदफितुर करणारे लोकांचा प्रळयाग्नी प्रदिप्त होऊन इतका खराबा झाला तेव्हां तो सख्य करण्याचा सर्व यत्न बरबाद झाला, म्हणजे व्यर्थ झाला.

## ४१. पुन्हां सख्य करणें व आणखी बिघाड होणें :

पुन्हां मी आणखी आळस न करितां यत्न केला. त्या जमातीस, कीं ज्याणी आपले धण्यास हल्लेंत घेरून खाण्यापिण्याची बंदी केली होती व आपले धण्याचा प्राण घेण्याचा बेत केला होता त्याजला, जरब व धाक घालून व नीति व बोध बहुत शिकऊन त्या जमातीस दिलभरंवसा दिल्हा कीं, सुलतान मुराद पादशाहा असंख्य फौजेसहित बहुत संकल्यानें तुमचे संनिधच बसून समय साधण्याची वेळ पहात आहे. तुम्हांकडून हीं कम अयोग्य, कीं ज्यावर अकलच चालत नाहीं व बहुत गैरशिस्त बदचाल बेमानपणाची, तुम्हांकडून प्रसिद्ध होत आहे. या करण्यांत मजला सत्य वाटतें कीं, थोडके दिवसांत सुलतान मुराद तुमचा मुलुख घेईल. उगीच कां पायावर कुऱ्हाड हाणून घेतां? धण्याचें घर व्यर्थ कां बुडवितां? व्यर्थ कां अपकीर्तीचा व बेमानपणाचा डाग कपाळीं लाऊन घेतां? कारण कीं, हें अपेश तुम्हांवर बहुत वर्षे राहील. अशा वाटेवर आणण्याच्या कित्येक गोष्टी सांगोन पुन्हां ताळ्यावर आणिलें व आणखी सख्य केलें. परंतु यावेळेस चांदबिबी सुलतान सख्य करण्यास राजी होत नव्हती. बोलत होती कीं, अभंगखान हापसी हा आमचे बापानीं पैका देऊन विकत घेतलेला चाकर आहे. वारंवार आमचे बापाचे व भावाचे कारकीर्दीत बेमानपणामुळें व बदचालीस्तव कैदेंत पडोन माझा धाकटा भाऊ वारल्यानंतर मीच त्याजला कैदेंतून सोडविला असोन व योग्यतेस चढऊन थोरपणास आणिला असोन त्या उपकाराचे फळ असें करून दाखऊन आमचाच जीव घेण्याचा संकल्प केला आहे. आमचा जीव घेण्याशिवाय याचे मनांत दुसरा कांहींएक भाव नाहीं. हें फौज तयार करणें व हा दंगा उत्पन्न करणें शुध्ध माझा जीव घ्यावयाकरितांच आहे. तेव्हां मला कसा विश्वास येईल व त्याचें सख्य करण्याविसीं मी कशी परवानगी देऊं. या उत्तम रमजानचे महिन्यांत (मे १५९६) किल्यावर हल्ला करून आमचे खाण्यापिण्याचा मार्ग बंद केला. या महि-

त्यांत मांस देखील कसलें असतें तें डोळ्यानेंहि पाहिलें नाहीं. मग खाण्यास कोठून मिळेल ? तेव्हां दुसरा जिन्नस मिळण्याची तर वार्ता देखील नाहीं. रमजानचा रोजा खोलण्याकरितां, म्हणजे दिवसभर उपोषण करून सायंकाळीं कांहींतरी पदार्थ तोंडात टाकून रोजा मोकळा करून नंतर ज्यास जसें अनुकूल पडेल तसें अन्न खातात तसा रोजा खोलण्याकरितां, त्या किल्यांत खारें पाणी फार वाईट आहे तें प्यावें व जुने पेवांतील दाणे कुजके असतील ते खावें असा आम्हांवर प्रसंग आणिला आहे. तेव्हां माझें चित्त त्या गृहस्थाचें सख्य करण्याविषयीं कशी परवानगी देईल. हाली मोंगल-लोकांचे एका बटकीचे देखील हुकुमांत राहीन, परंतु या बेमान चाकराचा धणीपणा करण्यास राजी नाहीं. अशी चांदबिबी बोलत होती आणि चांदबिबी सुलतान ईणें हा सर्व मजकूर शाहा मुराद शाहाजादा याजला लिहिला होता. त्या षाहा मुराद याणी हा मजकूर तपशीलवार आपला बाप अकबरशाहा याजकडे विनंतीपत्रांत लिहून पाठविला. अकबरशाहा याणीं जेव्हां आपले पुत्राचे विनंतीपत्र अवलोकन केलें तेव्हां तें विनंती-पत्र सुलतान सलीम याजपुढें, कीं तो सुलतानशाहा जहानगीर पादशाहा या नामेंकरून प्रसिध्द आहे त्यापुढें, टाकिलें. अकबरशाहा बोलला कीं, हा माझे दैवाचा उत्कर्ष आहे. यामुळें अशीं कामें प्रसिध्धींत येतात. आमचें लष्कर असें यशस्वी आहे[२६] कीं, जिकडें जाईल तिकडें पाहिजे तें करील. आमची फौज गेली म्हणजे काम आपे-आप होऊन येतें. जो मनोरथ असेल तो हात जोडून घडण्यांत येतो. तात्पर्य बहुत यत्न केल्यानंतर चांदबिबी सुलतान इजला अभंगखानाचे[२७] सख्य करण्याविसीं मी राजी केली. हरएक अमीरलोकांस सख्य करण्याकरितां पोषाख किल्यांतून बाहेर

२६. " They offered to elevate Bahadur, son of the son of Burha-nu-l-Mulk to the throne, with the title of Nizamul -Mulk, and as a vassal of the Imperial throne. The territory of Ahmednagar was to be confirmed to him, and the Province of Birar given up to the Emperor .... Notwithstanding the desparate state of the place, and the scarcity of provisions, these unworthy terms were agreed to, and a treaty was con-nцɔded on the 17th Isfandarmuz ( 26 Feb. 1596)."– 'Akbar-Nama,' E. D., p. 94.

रज्जब १० रविवार ( १९ मार्च १५९६ ) रोजीं चांदबिबीचे वकील बोलणे करण्याकरितां खानखानन व मुरादकडे गेले.–पृ. ३०५, 'बुऱ्हाने मासिर' मराठी भाषांतर–रज्जब २३ ( २३ मार्च १५९६ ) रोजीं युध्द थांबले. पृ. ३०८ सदर.

२७. यांतील अभंगखान व फिरिस्तांतील नेहंगखान एकच दिसतो.

पाठविले. यायोगें कांहीं दिवस हा दंगा व हें अरिष्ट शांत झालें. परस्परें अमीरलोक व शिपाईलोक किल्यांतून बाहेर येऊन लष्करांत राहिले. याजकरितां कीं सर्वांनीं एकत्र होऊन मोंगलाचे लष्करावर चालून जाऊन सुलतान मुराद याजला दक्षणचे मुलकांतून घालवून द्यावा, याजकरितां पोषाख पाठविले.

### ४२. सख्य करण्यापासून निराशा झाल्यानंतर रफीउद्दीन याणी विजापुरास परत येणें :

अशा समयामध्यें बाहादूरशाहाचे खासे मंडळापैकीं एक ग्रहस्थानीं एक दिवशीं कर्मधर्मसंयोगें माडीवर चढून पाहिलें तों किल्यांतील बहुत शिपाईलोक एकांतीचे आश्रयास बसले आहेत व त्यांपुढें द्रव्य बहुत पडलें आहे. ते लोक तें द्रव्य आपआपणांत वाटून घेत आहेत, असें पाहिलें. ही बातमी चांदबिबी सुलतान इजला लागली. तेव्हां चांदबिबी इणें येविषींचा तल्लास केला तेव्हां कळलें कीं, अभंगखान याणी बहुत द्रव्य किल्यांतील शिपाई लोकांस पाठऊन, हे लोक आपलेसें करून घेऊन, करार ठरविला आहे कीं, प्रसंगाचे समयीं किल्याचा दरवाजा अभंगखानास व त्याचे लष्करास आंत येणेंकरितां या लोकांनीं उघडावा, म्हणजे किल्यांत येऊन किल्ला घ्यावा. याजकरितां या लोकांस द्रव्य पाठविलें आहे. तें द्रव्य हे लोक वाटून घेतात. अशी बातमी लागली व त्या द्रव्य वाटून घेणारे शिपाईलोकांस ही खबर कळली कीं, अभंगखानाचा करार चांदबिबीस कळला व ती चांदबिबी आपणास बरतर्फ करणार आहे. अशी खबर लागली तेव्हां ते लोक भयाभीत होऊन त्या लोकांनीं आपणांपैकीं एक ग्रहस्थ अभंगखानाकडे पाठवून निरोप सांगून पाठविला कीं, आपण जो बेत ठरविला त्या गोष्टीची बातमी फुटली. कार्यभाग बिघडला. आतां तें बरें आहे कीं, उदईक मोठे प्रातःकाळींच तुम्ही किल्यावर चालून यावें. आम्ही दरवाजा उघडतो. येविषयीं सुस्ती व ढिलाई केल्यास आमचे प्राणावर संकट येईल. असा निरोप सांगून पाठविला. त्यावरून दुसरे दिवशीं मोठे प्रातःकाळींच अभंगखान फौजेसुध्धां तयार होऊन किल्यासंनिध येऊन पोहचला. दरवाजा उघडण्याची वाट पहात होता. आंतील शिपाईलोकांनीं किल्याचे दरवाजे चिखलानीं व धोंड्यानीं बंद केले होते आणि दिंड्या मोकळ्या ठेऊन त्या दिंड्यानीं येत जात होते. ते त्या शिपाईलोकांनी त्या दिंड्या उघडून एक ग्रहस्थ अभंगखानाकडे पळत पाठविला कीं, फार जलद या, आम्ही दिंडी उघडली आहे असें सांगून पाठविलें. अशा समयामध्यें चांदबिबी सुलतान ईजला ही बातमी कळतांच चांदबिबी ईणें कोणी एकास पाठऊन शिपाई लोकांकडील सरदार आपलेकडे

बोलाविला. कारण कीं, त्या शिपायांकडील सरदारांस बोलाऊन आणोन त्याजकडोन शिपाईलोकांस सर्वोपरी दिलभरंवसा देऊन ते लोक या दुष्ट संकल्पापासून फिरवावे असा हुकूम सांगून पाठविला. तेव्हां त्या शिपाईलोकांचे जमातीपैकीं कित्येक लोकांनीं आज्ञा मान्य करून चांदबिबी सुलतान ईजकडे हुजूर धाऊन गेले व कित्येक आज्ञा मोडून हट धरून तेथेंच तयार होऊन शस्त्रें घेऊन उभे राहिले. अभंगखान किल्या-संनिध येऊन पोहचून आंबरजीव म्हणोन हापसी चाकर अभंगखानाचे चाकरापैकीं होता त्याजला अभंगखान याणी संनिध बोलाऊन पुढें बातमी करितां पाठविला. त्यावेळेस चांदबिबी सुलतान ईणे कांहीं शिपाई यांची जमात पाठविली होती कीं बाकीचे शिपायास आणूं नये. त्या लोकानी कबूल करून उभे राहून युध्दाकरितां पुढें चालून आले व तीर व बंदुकी एकमेकांवर सोडिते झाले. शेवटीं बदललेले शिपायीलोकांस चांदबिबी सुलतान ईचे लोकांपुढें धैर्य ठरेनासें झालें तेव्हां मोड होऊन ते शिपाई दिंडींतून बाहेर निघोन पळोन गेले. आंबर म्हणोन शिपाई बातमी करितां आला होता तो एके दिंडींतून किल्यांत येऊन दुसरे दिंडींत जाऊन पोहचला आणि बोलला कीं, काय पहातां, किल्यांतील शिपाई लोकांची चांदबिबी सुलतान ईचे लोकापुढें शिकस्त होऊन किल्यांतून बाहेर पळोन गेले व चांदबिबी सुलतान ईचे लोक पाटलाग करित येत आहेत असें बोलला. किल्यावर मलिक संदल बरीद याजला मसनद-आली असें पद मिळालें होतें, तो मलिक संदल बरीदी हा दोनशें सेवक यांसहित हुके, म्हणचे तांब्याचे गोळे करून त्यांत दारू भरून ते गोळे बत्ती देऊन शत्रुवर फेकले, म्हणजे त्या गोळ्याचे मारानें बहुत खराबी होते व एका गोळ्यांतून बहुत गोळे निघतात. त्या गोळ्यांत दारु भरून केव्हां अभंगखानाचे लष्करावर टाकीत होते व किल्यावरील बदलेले लोकांचे जमातीवर फेकीत आहेत असा प्रसंग पाहून अंबर याजला किल्यांत जाण्यास दम निघेनासा झाला. त्या जाग्यावर उभे देखील राहवत नाहीं असें पाहिलें. कारण कीं, किल्यावरून आगीचा वर्षाव होत होता. यास्तव निरोपाय होऊन माघारा फिरला. तेव्हां अभंगखान याणी हिंमत धरून घोड्यावरून उतरून किल्याचे दरवाजानजिक होता, कीं आंत शिरावें, तों अशा समयांत तोफेचा गोळा किल्यावरून अभंगखानावर उतरून त्या गोळ्यानी अभंगखानाचे जवळच्या कित्येक मनुष्यांस ठार करून धुळदशेस मिळवीलें. तेव्हां अभंगखानासहि उभे रहाण्यास व किल्यांत जाण्यास मार्ग दिसेना. तेव्हां अभंगखान माघारा फिरून आपल्या लष्करचे मुकामाचे ठिकाणीं गेला. अंबरहि अभंगखानासमागमें गेला. किल्यावरील बेमान लोकहि संधी पाहून कित्येक बाहेर येऊन आपला प्राण वाचविते जाहाले. कित्येक लोक धरिले जाऊन कैद जाहाले. या लिहिण्यांतील व या विस्तारांतील तात्पर्य हें आहे कीं, ईश्वर जेव्हां ईच्छितो कीं, जें राज्य बहुत वाढले व शोभिवंत झाले आहे त्या राज्याचा नाश

व फडशा करावा असें ईच्छितो तेव्हां त्या राजधानींत असे कामाचे योग घडून येतात. त्या समई मनुष्यें राज्य सुरक्षीत रहाण्याविषयीं बहुत यत्न करितात. परंतु त्या मनुष्यांचे यत्नांस नाशाशिवाय दुसरें फल प्राप्त होत नाहीं. कल्याण करण्याची ईश्वराची इच्छा झाली म्हणजे काम, कीं ज्यांत अकल चालत नाहीं असेंहि कठीण असलें तत्रापि, सहजीं उत्तमपणानीं घडून येतें. दिवसेंदिवस अधिकच सुखाचे दिवस येतात. रफीउद्दीन शिराजी सांगत आहे कीं, मी चार महिनेपर्यंत अहमदनगर येथें याच निजामशाहाचे दौलतीचे बंदोबस्ताकरितां राहिलों. या चार महिन्यांत तीन चार वेळ बहुत यत्नांनीं परस्परें उभयतांचें सख्य झालें. पुन्हां आणखी तसेंच वाकडेपणा व वैर वाढले. तेव्हां मी निरोपाय झालों व वा सख्य करण्यापासून थकलों. अशा समयांत जागोजागचे सरहदींनून खबर येऊन पोहचली की, सुलतान मुराद याजकडील कित्येक अमीरलोक सरहदीवर येऊन पोहचून त्याणी खराबी करावयास प्रारंभ केला आहे. कित्येक लोक गांवें व परगणे त्या अमीरलोकांनीं घेतले व त्या अमीरलोकांस त्यांचे मदतगारीवर बहुत फौज येऊन पोहचत आहे. तें अमीरलोक अहमदनगरहि घेतील. तोंपर्यंत पूर्वीचे कज्जे व भांडणें व हलीचेहि वाकडेपणाचें प्रकर्ण तपशीलवार लिहून आदिलशाहास विनंतीपत्र लिहून पाठविलें. त्या विनंतीपत्राचें उत्तर आदिलशाहा याणी पाठविलें कीं, आतां तुम्ही तेथें याउपर राहूं नये. हा हुकूम दाखल होतांच इकडे हुजूर येऊन पोहचावें असें आज्ञापत्र आलें. तेंच आज्ञापत्र चांदबिबी सुलतान यास श्रुत करून मी निरोप मागितला. त्यावरून चांदबिबी सुलतान याणी निरोप दिल्हा. परंतु मजला विजापुराकडे जाण्यास संतोषानें व आवडीनें निरोप दिल्हा नाहीं. चांदबिबी सुलतान याणी मजला आज्ञा केली कीं, तुम्हीं येथें होतां तोपर्यंत तीन चार वेळेस कज्ये व अरिष्टे उभीं राहिलीं असतां तुम्ही यत्न करून हें अरिष्ट निवारण केलें व कजे विझविले असतां तुम्ही विजापुरास गेला म्हणजे येथ कोण आहे, कीं या बेमान लोकांशीं तुम्हांसारिखें बोलणें करील ? व तेहि तुमचे बोलण्यास जसें मान्य होत आले आहे तसें दुसऱ्याच्या बोलण्यास मान्य होतील असा दुसरा कोण आहे ? अशी बोलली. सारांश चांदबिबी सुलतान याणी खिन्नतेने निरोप दिल्हा. तेव्हां मी दुसरे दिवशीं अहमदनगर येथून सात आठ कोश येऊन राहिलों. कांहीं जरूरीचे कामारितां तेथेंच दोन तीन मुकाम झाले. तेव्हां लहान थोर अमीरलोक मजला पोहचविण्याकीरतां येऊन त्या अमीरलोकांनीं आपआपले मजकुराचीं विनंतीपत्रें लिहून माझे समागमें दिल्ही. नंतर मी तेथून निघोन विजापुराकडे चालता झालों. तेव्हां अहमदनगर येथील सरासरी वीस हजार मनुष्यें, स्वार व पायदळ, आपआपले बायकांमुलांसुध्धां व खटल्यासहित, कारभारी लोक, कामदार, विद्वान, गुणीजन व रयतलोक राजधानींत बखेडा झाला म्हणोन परागंदा होऊन घराची आस्था सोडून माझे समागमें

आले. कारण कीं, वाटेंतील भय बहुत होतें. याजकरितां माझें समागमें बध्यापूरापर्यंत सुरक्षित व सुखरुप येऊन भयांतून सुटले. ते लोक विजापूरचे मुलकांतील गांवोगांवीं राहिले. सर्व लोकांनीं रहाणेस आश्रय करून जागजागीं रहाते झाले. मी जेव्हां ईबराहीम आदिलशाहाचे दर्शन घेऊन भेटलों तेव्हां मजकडे जीं जीं कामें स्वामीसेवेचीं होतीं तीं तीं पादशाहानीं माझी मजकडे देऊन पादशाहा आपले मुखानें मुक्ताफलासारिखे आज्ञा करिते झाले कीं, या आज्ञेंतील भाव वर्णन केला असतां माझें योग्यतेहून शंभरपट अधिक पादशाहानीं थोरपणा दिल्हा. तो मजकुर तपशीलवार सांगावा तर मनुष्यास आश्चर्य वाटेल.

## ४३. आसार कुदसो आनवर सुदैववान याचे उतरणें, सैयद महंमद मुस्तफा सलीलाह ओलेहे वसल्लम याचे केश कस्तुरीच्या सुवासाचे विजापुर शहरांत येऊन पोहचण्याचे प्रारंभापासून वर्णन :

महंमद कासम फरीस्ता लिहित आहे कीं, तारिख १ पहीली माहे मोहरम सन १००५ (१५ आगष्ट १५९६) रोजीं जो धणी प्रसिध्द व त्या कामांतील जरीपटक्याचा मामला आहे त्यास, जो आपले स्वरूप कोणास न दिसो देतां वर्तमान सांगणारांनीं जेथें कोणाचा तर्क देखील चालत नाहीं अशा पडद्याच्या आंतून संतोषाचा व आनंदाचा ध्वनि अकलवानाचे कानांत पोहचविला, म्हणजे ईबराहीम आदिलशाहास स्वप्नांत ईश्वरानीं सुचविलें कीं, जो ईश्वराच्या कृपेचा व जो सय्यद जातीचा, ज्यावर ईश्वराची पूर्ण कृपा असा, जो मीर महंमद सालह हमदानी या शहरांत आला आहे, कीं ज्याच्या येण्यांत आकाशावरील राहणारे व नववे आकाशावर अनुष्टान करणारे आश्चर्य मानितात व चिंतेत पडले आहेत. आकाशावरील नक्षत्रगणानें त्या मीर महंमद याचे स्वरूपाचे तेज्यापुढें कचकोळ, म्हणजे फकीर लोक भिक मागते वेळेस पीठ घ्यावयाकरितां हातात पात्र घेतात त्या पात्रासारिखा, द्वितीयेचा चंद्र योजुन त्या नक्षत्रगणानें भीक्षा मागावयाकरितां आपले पाशीं ठेविला आहे, म्हणजे ज्या मीर महंमदाचे तेजापुढें चंद्राचेंहि तेज शोभत नाहीं, अशा तेजस्वी त्या मीर महमदाचें येणें विजापूर येथें झालें. या गोष्टीस आकाशावर राहणारे देखील अलभ्य लाभ मानितात तो मीर महंमद विजापूर येथें आला. त्या समागमें महंमद मुस्तफा सलीलाह वसल्लम याचे कित्येक केश, ज्यास कस्तुरीसारिखा सुवास आहे असे, आहेत असें स्वप्न पडलें. तेव्हां हें वर्तमान ऐकतांच ईबराहीम आदिलशाहा बहुत संतोष पावोन ईश्वराचा स्तव करून त्या मीर महंमद सालह याजकडे जाऊन त्या श्रेष्ठ पुरुषाची भेटी बहुत समारंभानें घेऊन त्या पैगंबराचे केशाचें

दर्शन घेता झाला. यायोगें ईब्राहीम आदिलशाहाची अंतर्बाह्य स्वच्छता ईसा पैगंबराप्रमाणें व युसफाचे रूपाप्रमाणे अति उत्तम सर्व लोकास प्रसिध्द झाली. काय सांगावें कीं, कित्येक पादशाहा त्या काळांतील सिकंदरसारिखे होते. त्याणी त्या पैगंबराचे श्रेष्ठ केशाचे दर्शन घेण्याविषयीं बहुत यत्न केला. परंतु दर्शन प्राप्ती झाली नाहीं. त्या अष्टपैलू रुप्याचे डब्यांत ते केश ठेवित होते ते केश त्या पादशाहास दर्शन देण्याकरितां त्या डब्यांतून बाहेर येत नाहींत. ईब्राहीम आदिलशाहा फरीउद्दीन पादशाहाचे योग्यतेस याणी मस्तकाचा पाय करून म्हणजे लोटांगण घालीत त्या केशास सामोरा गेला. पादशाहा संनिध राहणारे लोकांनीं उद व अंबर वगैरे सुवासिक पदार्थ त्या केशापुढे जाळोन त्या केशापुढें निमाज पढण्यास गजारा वोवाळून टाकिला, म्हणजे ईब्राहीम आदिलशाहा याणी त्या केशापुढें फात्या देऊन निमाज पढले. त्यांतील भाव हा आहे कीं, ते पैगंबराचे केश रुप्याचे आष्टपैलू डब्यांत ठेविले आहेत व त्या डब्यास झांकण बसविलेलें आहे. तें झांकण न उघडतां ज्यास दर्शन घ्यावयाचें असेल त्याणी त्या डब्या शेजारीं रुप्याचे भांड्यात गुलाबपाणी भरून ठेवावें आणि त्या केशाचे डब्यापुढें निमाज पढावी, म्हणजे दर्शन घेणारा अंतरबाह्य शुचिर्भूत, म्हणजे निर्मळ, व पुण्य असल्यास ते पैगंबराचे केश आपोआप कोणी त्या डब्याचें झाकण न उघडतां त्या डब्यांतून बाहेर निघोन ठेवलेले गुलाबपाण्यांत शिरून स्नान करितात. दर्शन घेतल्यानंतर निमाज पढावी म्हणजे ते केश जसे डब्यांतून बाहेर आले तसेच झांकण न उघडतां आपोआप आंत जातात. य प्रकारें दर्शन घेण्याकरितां जागोजागचे बहुत पादशाहांनीं सदरी लिहिलेंप्रमाणें गुलाब पाणी ठेऊन निमाज पढोन अति यत्न केले. परंतु ते केश बाहेर आले नाहींत. तेच विजापुरास येतांच व इब्राहीम आदिलशाहानीं निमाज पढतांच कुरानामध्यें ईश्वर आज्ञा करितात कीं, "जो पदार्थ ईश्वर आपले कृपेनीं प्रसिध्द करावयास इच्छितो त्याजला बंदी व मनाई करणारा कोणी नाहीं", अशी आयत आहे. आयत कुरानांतील ईश्वराचे वाक्यास म्हणतात. याप्रमाणें ते केश दर्शन घेतलें असतां परलोकीं यमाचे हातून सोडविणारे त्या रुप्याचे अष्टपैलु डब्यांतून, कीं त्या डब्यास एकहि छिद्र नाहीं असें असतां, ईब्राहीम आदिलशाहास दर्शन देण्याकरितां बाहेर आले आणि सूर्यासारिखा प्रकाश पडला. पैगंबराचे वियोगास एक हजार वर्षे झाल्यानंतर जादुगिरीप्रमाणें मोठा चमत्कार होऊन पुन्हां दर्शन दिल्हें. तेव्हां पादशाहा व फकीरलोक याणीं दर्शन घेऊन श्रेष्ठतेस पावते झाले. मीर महंमदसाहेब यास पादशाहानीं बहुत बक्षिस व ईनाम दिल्हें. त्यायोगें मीर महंमद बहुत संतोष पावता झाला. जेव्हा मोहरम सन १००५ पाचशें दहा तारिखेचे पहिले दिवशीं (१ मोहरम – १५ आगष्ट व १० मोहरम – २४ आगष्ट १५९६) ईब्राहीम आदिलशाहा पूर्वीचें चालीप्रमाणे पैगंबराचे ताबूत करण्यांत निमग्न झाला तेव्हां

आदिलशाहा याणी मीर महंमद यास विनंती केली कीं, हे दहा दिवस आपले आज्याचे, म्हणजे पैगंबराचे, दुःखाचे दिवस मी धारण केले आहेत. तर जर करितां माझे वाड्यास आपण आपले तेजानीं तेजस्वी कराल तर व या शहरांत कित्येक दिवस राहून मजला संनिधपणाचा लाभ दिल्हेस सर्वांस आम्हांस बहुत संतोष होईल. अशी विनंती केली तेव्हां मीर महंमद याणी कुरान षरिफ मध्यें ईश्वराचे वाक्य आहे कीं, "कोणी ज्यासमई आमंत्रणास व पाहुणेरा करण्यास आग्रह करील त्यासमई तुम्ही तो आग्रह न मोडतां कबुल करा," असें वाक्य आहे. याप्रमाणें ईबराहीम आदिलशाहाचा आग्रह कबुल करून ते कस्तुरीचे सुवासासारिखे केस समागमें घेऊन तो मीर महंमद विजापूरचे आर्क किल्यांत जाता झाला. ईबराहीम आदिलशाहा पादशाहा सामोरा येऊन नमस्कार करिता झाला. दौलतीकडील कारभारी मंडळास हुकुम दिल्हा कीं, सर्वांनीं मीर महंमद याजपासी सर्व काळ राहून त्याचे सेवेंत तत्पर रहात जावें. अशी आज्ञा करून पादशाहा आपण जातीनें केव्हां केव्हां मीर महंमद यास पाहून त्यास रोख ऐवज व जवाहीर वगैरे देत होते. यानंतर तो मोहरमचा महिना अखेर झाला व सफर महिन्याचा चंद्र ( १४ सप्टेंबर १५९६ ) चालू झाला तेव्हां मीर महंमद याणी मक्केस जाण्याचा निश्चय केला. तेव्हां पादशाहा आग्रह करिते झाले कीं, असेच पुन्हां येथें येणें व्हावें. या कारणास्तव रोख बारा हजार होन व कित्येक भारी किंमतीचे पोषाखाचे बस्ते व कित्येक उत्तम उत्तम पदार्थ मीर महंमद यास देऊन मक्केस जाण्यास निरोप देते झाले. तेव्हां तो मीर महंमद कुलीन पुरुष या पादशाहाचें बक्षिस देण्याचे उपकारानें लज्जित होऊन निरोप घेते वेळेस त्या पैगंबराचे केशापैकीं दोन केश कस्तुरीसारिखे सुवासाचे रुप्याचे डब्यांतून काढून पादशाहास देता झाला. ते केश अद्यापि रुप्याचे डब्यांत ठेऊन त्या डब्याचे झांकण मजबूत बसविलें आहे. गुरुवारचे रात्रीं श्रेष्ट प्रसादाचे दिवशीं त्या केशाचें दर्शन घेतात. त्या केशाचे प्रसादेंकरून पादशाहास बहुत वेळ यशप्राप्ती झाली. दिवसें-दिवस पादशाहाचे दैवाचा उदय आहे. याप्रमाणें हें वर्तमान समाप्त झालें.

## ४४. ईबराहीम आदिलशाहा याणी नवरसपूर म्हणोन नवीन शहर वसविणें प्रकर्ण :

सफल मनोरथ युक्त श्रेष्ठ योग्यतेचा सुदैववान ईबराहीम आदिलशाहा याची जेव्हां संपूर्ण कामें मनोरथाप्रमाणें घडून आलीं, ईश्वराची कृपा दिवसेंदिवस ईबराहीम आदिलशाहावर होत होती, पादशाहाचे अंतःकर्ण संपूर्ण संकटें व दगदग्यापासून व सर्व युध्धापासून निवांत झालें व पूर्ण संतोष व सर्वोपरी स्वस्थता

प्राप्त झाली तेव्हां नवीन शहर वसविण्याचा संकल्प पादशाहाचे मनांत आला. ईच्छिता झाला कीं, एक नवें शहर वसवावें, म्हणजे संपूर्ण मनुष्यांस सुखाची जागा, आश्रय स्थान, पृथ्वींत संतोषाची जागा व राहण्यास आधार होईल. याजकरितां सन १००८ हिजरी ( १५९९–१६०० इ. स ) या सालीं विजापुराहून दोन अडीच कोशाचे अंतऱ्यावर किल्याचे तर्फेस शहर वसविण्यास आरंभ केला. या शहर वसविण्याचे कामाच्या कारखान्याकडील कारभार नबाब शहानवाजखान, कीं तो शहानवाजखान बहुत दिवस मुल्की कामाचे अधिकारावर होता व दक्षण देशांत मुल्की कामाचे पदवीहून दुसरा अधिकार थोर नाहीं, त्याजकडे शहर वसविण्याचें काम नेमलें. तेव्हां शहानवाजखान याणी शहर वसविण्याचें कामांत बहुत यत्न करून हिशेब जाणणारे, अकलवान व इकलिदुस म्हणोन पूर्वी मोठा हिशेब करणारा झाला त्याप्रमाणें हिशेब जाणणारे लोक व गवंडी लोक बहुत चतुर व अकलवान व पाथरवट बहुत जलद धोंडे घडणारे व कातारी बारीक कातीव काम करणारे, कीं जे आपले कसबांत अद्वितीय व निरूपम होते ते, चहूंकडोन आणवून जमा करून, शहानवाजखान याणी त्या लोकांस कारखान्यावर नेमिलें. त्या लोकांकडून शहर वसविण्याचा नक्षा काढविला. त्या नक्षांत महाले, पूर व रस्ते, बाजार, ईमारती, मोठे मोठे वाडे, मंडप व दुकानें काढविलीं. त्याप्रमाणें लोकांनीं कारखान्यास आरंभ करून कारखान्याकडे कारखानदार व मजुरदार माणसें व कामाठी वगैरे नेमिले. तीं सर्व मनुष्यें मिळोन वीस हजार कारखान्यावर लागलीं. असेच कारकूनहि होते, कीं त्यांची संख्या लिहिली आहे. कित्येक पादशाहाचे खासगीकडील कारकून कामावर होते, कित्येक ईमारतींच्या कारखानेकडे व कित्येक कारभारी, कामदार, वजीरलोक, सिबंदी, सौदागर व सावकार वगैरे संपूर्ण लोकांकडे मिळोन जितके कारकून होते त्यांची गणती नव्हती. सरकारांतून वजीरलोकांचे मंडळ व दौलतीकडील कामदार व संपूर्ण चाकरलोकांस हुकुम झाला कीं, हरएकानीं आपआपणास रहावयाकरितां वाडे व सायबानी मंडप व खिडक्या व बागा आपआपले योग्यतेनुरूप कराव्या. अशी आज्ञा केली. कित्येक सरकारांतील खाजगीकडील मंडळीस, सरकार कचेरीकडील व माहालाकडील लोकांस व हुजूरचे चाकरलोकांस सरकारी खजिन्यांतून ईमारती बांधण्याकरितां खर्चास ऐवज दिल्हा. तेव्हां सरकारी खासे मंडळ व सर्व लहानथोर मनुष्यें या ईमारती वगैरे करण्याचे कामांत निमग्न होऊन ज्यास जसे वाटले तसे ईमारती उंच व विस्तीर्ण नाना प्रकारच्या तऱ्हतऱ्हेदार व बागबगीचे ज्याचे ज्याचे वाड्यानजिक जसजशी जागा होती तसतसे करिते झाले. शहानवाजखान याणी या वसाहतीचे कामांत व या शहरचे इमारतींचें काम शेवटास लावण्यास बहुत यत्न व मेहनत केली. थोडकेच दिवसांत शहरची अशी वसाहत तयार झाली कीं, हिंदुस्थानचे सर्व शहरांस हेवा देणारे व काषान व बादषान म्हणोन

शहरें आहेत त्यास उणेपणा आणणारें हें शहर आहे, म्हणजे हिंदुस्थानांतील जितकीं शहरें आहेत त्याहून व काषान व बादसान म्हणोन शहरें आहेत त्या शहरांहून हें शहर अधिक शोभायमान झालें. पादशाहाकरितां वाडा उंच व विस्तीर्ण व डौलदार, त्यांत नानाप्रकारची कारागिरी व कुशलता, त्या वाड्यास बहुत खिडक्या डोलदार भिंती व दरवाजे मंडपदार व त्या भिंती असमानी रंगाचे सोनेरी काम करून त्यावर चितार्‍यांनीं चित्रें काढिलीं तीं जसे जादुगिरीनें चमत्कारिक करितात अशा प्रकारचीं जादुगिरीच्या लेखणीनेंच काढिलीं आहेत असें भासत होतें, म्हणजे चित्रेंहि बहुत सुंदर काढिलीं. त्या वाड्याचे आंतून व बाहेरून याप्रकारचा नकष केला कीं, पुर्वी मानी व आरजंग म्हणोन मोठे चितारी झाले होते त्या चितार्‍यांचेहि नकषापुढें तेज राहिलें नाहीं. त्या वाड्याचे सभोंवते च्यारी बाजूनें बागबगीचे चमत्कारिक केले, कीं त्या बागेस जो पाहील त्या पहाणाराचे नेत्रांस तेज येत होतें व चित्तास समाधान बहुत होत होतें. त्या बागेंतून नानाप्रकारचीं पुष्पें व तर्‍हेतर्‍हेचीं फळें प्राप्त होत होतीं. सरकारचे वाड्यापुढें मोठे मैदान विस्तीर्ण, कीं त्या मैदानाचे चहूं बाजूंनीं दुमजला इमारती व त्या चहूं बाजूचे माडीस बहुत खिडक्या व सायबानी मंडप व त्या माड्या फार शोभायमान व बहुत साफ असा वाडा पादशाहाकरितां बांधला. त्या वाड्यापुढील चहुं तर्फेच्या माड्या अशा बांधल्या कीं, त्या माड्यांवर शिपाईलोक व चाकरलोक व सरनौबत मंडळ वगैरे सर्वांनीं बसत जावें, अशा बांधल्या. कारखानदार व कारकून लोक याजकरितांहि वेघली घरें बांधली. सरकारचे वाड्याचे पाठीमागें कित्येक दुसरे वाडे बहुत थोर थोर व पूर्ण शोभायमान व त्यावर सोनेरी रंगानें चित्रें वगैरे काढिलेले होते. पादशाहाचे वाड्याचे पिछाडीस खासे जनानखान्याकडील महाल बांधिले. सरकारचे वाड्यापुढें बाजाराचा रस्ता साफ व विजापुरापर्यंत एकसारखा बांधला. त्या रस्त्याचे दोन्ही तर्फेस दुकानें मोठीं मोठीं व तीं दुकानेंहि दुमजला व वरील मजल्यास खिडक्या व बाजारामध्यें नाना प्रकारचे जिन्नस व बाजार बहुत विस्तीर्ण व वाड्यापुढील बाजाराचे चौकास माणिक चौक असें नांव ठेविलें. त्या माणिक चौकाचे चारी बाजूंस बाजारचे रस्ते एक सारखे शहरचे वस्ती पर्यंत व त्या रस्त्याचे दुतर्फा दुकानें बहुत शानदार व शोभायमान व बाजारचे पाठीमागें अमीरलोक, दौलतीकडील कारभारी मंडळ, सौदागर लोक व सावकार मडळींच्या मोठ्या मोठ्या थोर थोर ईमारतींच्या वोळया बांधिल्या आहेत. सदरहू लोकांचे योग्यतेनुरुप मंडप व बागा तयार झाल्या आहेत. हाऊद लांब व रुंद बांधिले आहेत, कीं त्या हौदास निरंतर पाणी बहुत रुचकर व गोड व ते हौद हमेषा पाण्यानें भरलेले आहेत. त्या हौदांचे पाण्यानीं बागा व बगीचे, मनुष्यें व जनावरें हमेषा तृप्त होत आहेत. ते हौद बहुत खोल खणिले आहेत. त्या हौदांची जमीन धोंड्यानीं मजबूत बांधून

काढली आहे. त्या हौदांचे पाणी बहुत स्वच्छ व साफ, अति उत्तम व बहुत मधुर आहे. शहानवाजखान याणीं आपणाकरितां त्या शहरांत वाडा बांधला आहे तो वाडा स्तव व तारिफेहून बाहेर आहे, म्हणजे त्या वाड्याची तारिफ किती करावी ? त्या वाड्याची तऱ्हा व प्रकार फार चमत्कारिक केली आहे, कीं तो वाडा जो पाहील तो मनुष्य विचारांत पडतो. त्या वाड्याचे उंचीचे व विस्तीर्णतेचे कामांत बहुत यत्न केला आहे. दरवाज्यावर बहुत शोभा व माड्या बहुत चमत्कारिक व खिडक्या बहुत शोभायमान व स्वच्छ व साफ व तुळया बहुत लांबीच्या असा वाडा बांधला आहे. त्या वाड्याची अत्यंत शोभा आहे. त्या वाड्याचे भिंतीवरून असमानी सोनेरी रंगाची कारागिरी केली आहे व नाना प्रकारचीं चित्रें काढिलीं आहेत. तऱ्हेतऱ्हेचे कुशलतेनें चमत्कारिक वाडा बांधला आहे. त्या वाड्यापुढें चहूंबाजूस बागबगीचे बहुत टवटवित केलेले आहेत. निःसंशय जर करितां बोलावें तर याप्रकारचा वाडा व अशा बागा या पृथ्वींत कोठेंहि नाहीं. हेंच एवढें आहे असें म्हणाल तर शोभतें व सत्य आहे. ईराणचे व तुराणचे प्रवासी लोक, रूम व आरबस्थान येथील मुसाफर लोक व हिंदुस्थानचे संपूर्ण लोक येणार जाणार ज्या समई येथें जमले आणि त्या लोकांनीं तें शहर पाहिल्यानंतर बोलले व थकीत झाले कीं, आम्हीं सर्व पृथ्वींत फिरलों परंतु या शहरचे ईमारतीप्रमाणें कोणत्याच मुलकांत पाहिलें नाहीं व ऐकिलेंहि नाहीं. यद्यपि थोर थोर अमीरलोकांनीं लाखो रुपये खर्च करून वाडे व ईमारती मनरंजन व चित्तसमाधान व्हावयाजोग्या या शहरांत व विजापुरांत केल्या आहेत तत्रापि या शहरांतील शहानवाजखान याचे वाड्याप्रमाणें कोठेंच इमारत नाहीं. नबाब शहानवाजखान याणीहि विजापुरांत बहुत उत्तम प्रकारचा वाडा बांधला आहे, कीं त्या विजापुरांतील शहानवाजखानाचे वाड्याचे शोभेस उपमा नाहीं असा आहे, परंतु तो वाडा देखील या चमत्कारिक व ऐश्वर्यप्रद वाड्यापुढें कांहींच नोहेसा दिसतो.

## ४५. या नवीन वसविलेले शहरास नवरसपूर असें नांव ठेवण्याचें कारण :

ज्या दिवशीं हें नवीन शहर बांधिलें, म्हणजे ज्या दिवशीं या शहराचें काम सिध्धीस गेलें ते दिवशीं तोरवे म्हणोन विजापुरचेच हदींत गांव आहे तेथील रहाणारां-पैकीं एक गृहस्थानीं उत्तम मद्याचा म्हणजे दारूचा एक शिसा आणून ईबराहीम आदिलशाहा पादशाहास नजर केला. ईतक्यांत पादशाहानीं त्या शिशांतील मद्य प्राशन केलें. तेव्हां त्या मद्यासारखी गोडी चमत्कारिक व अति उत्तम पादशाहानीं कधींच पाहिली नाहीं व ऐकिली नाहीं. अशी गोडी पादशाहास त्या मद्याची लागली

त्या गोडीचें लक्षण काय सांगावें ? ती गोडी सर्व दुर्गुणांपासून पवित्र, कीं मद्याचे दर घोटास तऱ्हेतऱ्हेच्या रुच्या लागत होत्या. त्या मद्याचा खुमार म्हणजे भुल व धुंदी वगैरे चित्तास संतोष व आनंद नित्य प्राशन करणेचे मद्यापेक्षां दसपट अधिक प्राप्त झाला. नंतर पादशाहानीं शोध केला कीं, हें उत्तम मद्य कोठून आणिलें आहे व हें मद्य कोणते जागीं उत्पन्न झालें आहे. असें पादशाहा बोलले तेव्हां ज्या गृहस्थानें मद्याचा शिसा आणोन नजर केला होता तो गृहस्थ विनंती करिता झाला कीं, याच शहरांत हें उत्पन्न झालें आहे. हें ऐकून पादशाहास फारच संतोष व आनंद झाला आणि पादशाहानीं आज्ञा केली कीं, आज मजला कैफियती "नवरसीद" म्हणजे नवीन सुखप्राप्ती झाली. जेव्हां पादशाहाचे जिव्हेंतून ईश्वरी वाणीसारखीं अक्षरें त्या समई "नवरसीद" अशीं निघालीं—तेव्हां तींच अक्षरें या शहराचें नांव ठेवण्याविषयीं शकुनाची ठरऊन या नवीन वसविलेलें शहरास त्याच अक्षरांचे नांव ठेऊन नवरसपूर असें त्या शहराचें नांव ठेविलें. नवरस म्हणजे जे त्या शहरांत अमल चालू झाला तेव्हां महाली व मुलकी कामें सर्व नवरसचे अमलांतच वहिवाट चालवणेचे ठरऊन चालू केलीं, दाद फिर्यादीचे व हिशेबाचे दप्तरास हिसाबे नवरस असे नांव ठेविलें. पादशाहाची मिजान नवरसचे मन म्हणजे राजधानी तल्लक्षण बागेंतील नव उगवलेलें झाडासारिखें होऊन पादशाहास नवरस हा शब्द असा आवडला कीं, हरएक जागीं व हरएक पदार्थास नवरस हें नांव ठेविलें. पादशाहानीं आपले नांवाचा खासा शिक्का होता त्या शिक्यावरील अक्षरें रद्द करून येमनी धोंड्यावर नवरस ईब्राहीम अशीं अक्षरें कोरऊन शिक्का केला. आज पादशाहाचे किताबखान्यांतील हरएक किताबीवर नवरसे इब्राहीम असें नांव लिहिलेलें पहाण्यांत येत आहे. झेंडे व निशाणें होतीं त्यांस निशाणें नवरस व आलमे नवरस असे नांव ठेविलें, कीं तो झेंडा पिवळे रंगाचा आदिलशाहा पादशाहाचा आहे. त्या झेंड्यास निशाणें नवरस असें नांव ठेविलें. सर्व लोकांचे महालांतून अधिक शोभायमान पादशाहानीं आपला खासा महाल बांधिला आहे. त्या महालाचेंहि नवरस महाल असें नांव ठेविलें. गायन प्रकर्णी धृपदाचा ग्रंथ आहे. तो ग्रंथ पादशाहाचे फार प्रीतीचा आहे. त्या ग्रंथाचें देखील नवरस असें नांव ठेविलें. सर्वांस प्रसिध्ध आहेत त्या कारकीर्दीपासून जो खुर्दा व पैसे आहेत त्यापैकीं जो खुर्दा प्रसिध्धींत आहे त्या खुर्द्यावर फलुसे नवरस असें नांव प्रसिध्ध आहे. आपले राजधानींतील संपूर्ण रस्त्यास राहे नवरस असें नांव ठेविलें. नवरस महाल बहुत ऊंच व पूर्ण शोभायमान व बहुत उत्तम बांधलेला प्रसिध्ध आहे. ईद नवरस म्हणजे नवे तारिखेस गुरुवार येतो त्या दिवशीं ईद येती त्या ईदीचें नांव ईद नवरस असें ठेविलें. गाणारे व साजिंदे, म्हणजे सारंग्या वगैरे वाजविणारे, तबले मृदुंग वाजविणारे मंडळींचें नांव लष्करें नवरस असें ठेविलें. त्या काळीं पादशाहास नवरस हा शब्द फार आवडला. पादशाहानीं हरएक कामांत नवरस हा शब्द

कबूल केला आहे. हें जाणोन त्या कारकीर्दीतील लोकानींहि, कुरानांत आरबी वाक्य आहे त्या वाक्याचा अर्थ : "ज्या कारकीर्दीतील जो पादशाहा होतो त्या पादशाहाचे धर्माप्रमाणें सर्व लोक वागतात". या वाक्यावरून सर्व लोकानींहि, नवरस हा शब्द पसंत करून आपले सर्व कामांत नवरस हा शब्द चालू केला. जसें त्या पादशाहाचे नांवें जहूरी याणी पादशाहाचे तारिफींत दिबाच्या म्हणजे मंगलचरण केलें आहे त्या दिबाच्याचें नांव दिब्रोचय नवरस असें ठेविलें. महमद कासम ग्रंथ करणारा यानीं तारिखे प्रकर्णीं म्हणजे बखर प्रकर्णीं ग्रंथ केला आहे. त्या ग्रंथांचें नांव नवरस नोमय फिरिस्ता असें ठेविलें आहे. अबदूल कादर नवरसी अति उत्तम व जलद कविता करणारा याणी ज्या कविता केल्या त्या कवितेच्या समाप्तीस अबदूल कादर याणी आपले नांव नवरसी असें घेतलें आहे.

## ४६. इबराहीम आदिलशाहा याणी ईदे नवरस म्हणोन नवी ईद चालू केली त्या प्रकर्णीं वर्णन :

दर महिन्यांत नवे तारिखेस गुरुवार आला म्हणजे त्या दिवसास ईदे नवरस असें नांव ठेऊन नाना प्रकारचे समारंभ करित होते. नवरस महालांस बहुत आरास व शोभा करून तेथें सर्वांस येण्यास परवानगी देत होते. लष्करे नवरस, म्हणजे दाउदाप्रमाणें गाणारे, नाचणारे व बाजविणारे शक्तासारखे सुस्वर आवाजाचे मंडळ जमत होते. त्या कारकीर्दींत या गुणी जनांचे समुदायास आताचें असें नांव ठेविलें. ते सर्व लोक कंचनी या नामेंकरून प्रसिध्ध झाले, त्या कारकीर्दींत याच गुणीजनांची योग्यता फार वाढली होती. येथपर्यंत या लोकांस श्रेष्ठता प्राप्त झाली होती कीं, त्या विषयींचा विस्तार करितां येत नाहीं, म्हणजे विस्तार किती करावा ! थोर थोर कुलांतील बहुतेक व बहुत संभावित कुलीन लोक याच गुणीजनांचे समुदायांत शिरून थोरपणास चढण्याची उमेद ठेवित होते. याच आशेनें व बहुत आवडीनें या जमातींत शिरत होते. याजकरितां कीं जेव्हां थोडासा अभ्यास व थोडेसें परिज्ञान या गायन कलेंत व वाजविण्याचे विद्येंत झालें म्हणजे कचेरींत बसून या गुणीजनांचे समुदायास जें कांहीं बक्षीस मिळेल त्यांत इतके हिसेदार होत होते. ईदे नवरसचे रोजीं थोर थोर गाणार व श्रेष्ठ वाजविणार, कीं त्या कारकीर्दींत जे अति उत्तम गुणवान होते ते व संपूर्ण लहान थोर गुणीजन जमा होत होते. गायन करणें व वाद्यें वाजविण्याचा समारंभ त्या दिवशीं फारच होत होता. सर्व मनुष्यें आनंद पावत होतीं. कस्तुरी, केशर, अबीर, गुलाल, व अत्तर वगैरे संपूर्ण सुवासाचे जिन्नस त्या कचेरींत खर्च होत होते. त्यास अंत

नाहीं. बहुत उत्तम पदार्थ हरएक जिनसाचे, म्हणजे मेवा मिटाई वगैरे, सर्वांस वाटित होते. तेव्हां ज्यास जितकी शक्ती होती तो गृहस्थ तितके खात होता व नेत होता. तसेंच भोजनाचे पदार्थ अति मिष्ट, म्हणजे फार गोड, नानाप्रकारचे षड्रस पक्वान्नें त्या कचेरींत प्राप्त होत होतीं. ते दिवशीं सर्व कारभारीलोक व थोर थोर कामदारलोक जेऊन उठलें म्हणजे सदरहू गुणीजनांच्या, म्हणजे गाणार व नाचणार वगैरे लोकांच्या, पंगती बसत होत्या. त्यानंतर, म्हणजे ते गुणीजन जेऊन उठल्यानंतर, सर्वांची पात्रें मांडून सर्वांस बोलावून भोजनास बसवित होते. तेव्हां पागीर्द, खिदमतदार, फकीर व भिकारी लोक वगैरे जे येतील ते सर्व लोक भोजन करित होते. ज्यास जितकी शक्ती असेल तितके अन्न घेऊन जात होते. सायंकाळ झाला म्हणजे पादशाहा त्या हरएक गुणीजनांस भारी किंमतीचे पोषाख देऊन योग्यता वाढवित होते. त्या दिवशीं ईनाम व बक्षिसें रोख ऐवज देऊन व पोषाख वगैरे जवाहीर हरएकास योग्यतेनुरुप देत होते. जेव्हां मामलेदार वगैरे लोकांस मुलकाचे बंदोबस्ताचे कामावर पाठवित होते ते देखिल इदे नवरसचे रोजीं मामलेदारास हुजूर बोलाऊन कामावर जाणेंकरितां पोषाख देऊन कामावर रवाना करित होते. पादशाहा याणी बालदशातच, म्हणजे लहानपणींच, गायन कलेंत, अभ्यास केला होता. यामुळें पादशाहाचा अभ्यास गायन कलेंत फार दृढतर झाला. पादशाहाचा गाण्यांत बहुत समज झाला तेव्हां थोडकेच दिवसांत पादशाहाची गायन कलेंत ईतकी योग्यता झाली कीं, त्या काळांत पादशाहापरता गाणारा नव्हता. असा अद्वितीय गाणारा झाला. गायन शिकवणारे वोस्तादांचा वोस्ताद झाला. त्या गायन कलेंत पादशाहाचा बहुत सुस्वर आवाज होता, कीं सर्व पृथ्वींतील गायन करणारांत मान्य झाला. येथपर्यंत कीं, जे त्या गायन कलेंत वोस्तादपणाचा झेंडा त्या कारकीर्दींत उभा करून सर्वांत प्रसिध्द झाले होते ते पृथ्वीहून चहूंकडून दूर देशांहून पादशाहाचे गाणें श्रवण करण्यास मिळावें या आशेनीं, जसे मक्केस जातात त्याप्रमाणें व्रत धारण करून मस्तकाचे पाय करून खुद जातीनें पादशाहापासी येऊन पोहचून प्रपंच परमार्थाचा लाभ घेत होते. पादशाहाचे बहुत कृपेनें व बक्षीसें देण्यानें योग्यता पावोन सुखी होत होते, येथपर्यंत कीं सरासरी तीन चार हजार मनुष्यें या जातीपैकीं, कीं हे तीन चार गृहस्थ गायन शिकण्याविसीं पादशाहाचे पागीर्द प्रसिध्द होते ते ईब्राहीम आदिलशाहापाशीं जमले. शागीर्द मंडळीपैकीं जो केवळ हलका गाणारा होता तो देखील या गायन कलेचे अभ्यासांत मी दुसरा फीशा गौरसच आहे असें म्हणवित होता. कारण कीं, ही गायन कला फीसा गौरस याणी उत्पन्न केली. या गायनकलेचा उत्पन्नकर्ता फिसा गौरस म्हणोन झाला. त्या फिसा गौरसाप्रमाणेंच आपणांस जाणित होता.

४७. ईबराहीम आदिलशाहाचे शागीर्द म्हणवित होते त्या गाणारांच्या तीन प्रती प्रकर्ण वर्णन :

त्या गाणारांच्या तीन प्रतीं केलेल्या होत्या. प्रत पहिली हुजुरीयान. प्रत दुसरी दरबारीयान. प्रत तिसरी शहरीयान. अशीं तीन प्रतीचीं नांवें होतीं. जे गाणार लोक, कीं ज्यांचा गायन कलेंत पूर्ण समज व ज्ञान जसें असावें तसें होऊन या गाण्यांतील बारकाई सर्व लक्षणांत आली, आणि या गायन कलेचे ( ? ) घेणारे झाले, म्हणजे ही गायन कला सर्वोपरी ज्याचे हातीं आली, आणि ते लोक रात्रंदिवस पादशाहाचे संनिधपणाचे कृपेनें ज्याणी उपयोग करून घेतला त्या लोकांचे पहिले प्रतीस हुजूरीयान असें म्हणत होते. या पहिले प्रतींतील गाणारांहून जे लोक कमी गाणार होते ते सरकारचे हुजूरचे खासे पडद्या बाहेर राहून रात्रंदिवस दरबारांत बसत होते. यास्तव त्या दुसेर प्रतीचे लोकांस दरबारीयान असे म्हणत होते. जे गाणारे लोक नवरसपुरच्या शहरांत राहून सर्व लोकांपासून इनाम व बक्षीस उछीष्ट शवना सारखे मिळऊन नित्य गायन शिकण्याचा अभ्यास करित होते त्या तिसरे प्रतीचे लोकांस शहरीयान असें म्हणत होते. ज्यासमई पादशाहा आपले कृपावंत अंतःकर्णापासून बहुत चमत्कारिक नकष काढित होते, म्हणजे जेव्हां पादशाहा आपण जातीनें गायन करित होते व हुजुरीयान म्हणजे पहिलें प्रतीचे लोकांस गाऊन दाखवित होते, तेव्हां असें वाटे कीं, पुन्हा नवा जीवच शरीरांत आला कीं काय, असें त्या लोकांस वाटत होतें. त्या लोकांस पादशाहाचें गाणें ऐकून अति संतोष व आनंद होत होता. तेव्हां ते लोक पूर्ण प्रीतीनें पादशाहाचे गाण्याचें वर्णन करित होते. त्यानंतर ते पादशाहाचे गायन आपले लक्षांत आणित होते. वर्णन करण्याकरितां, दुसऱ्यास तालीम देण्याकरितां व आपल्यास फायदा होण्याकरितां ती पादशाहाची गाण्याची टीप लक्षांत ठेऊन दरबारीयान, म्हणजे दुसरे प्रतींतील लोकांस, त्या पादशाहाचे गायनाचे वर्णन करून व तसेंच गाऊन दाखवित होते. तेव्हां ते लोक ती पादशाहाचे गायनाची तऱ्हा ऐकून घेऊन ते दरबारीयान म्हणजे दुसरे प्रतीचे गाणारे लोक त्याप्रमाणें शिकून घेत होते. ती गायनाची तऱ्हा शहरीयान म्हणजे तिसरे प्रतीचे गाणारे लोक नवरसपुरांत रहात होते त्या जमातीस शिकवीत होते. नित्य शहरीयान म्हणजे तिसरे प्रतीचे लोक दरबारीयान म्हणजे दुसरे प्रतीचे गाणाराची शागिर्दी करून शिकत होते. त्यांपासून तालीम घेऊन अभ्यास करित होते. असेच दरबारीयान, म्हणजे दुसऱ्या प्रतीचे लोक, हुजुरीयान म्हणजे पहिले प्रतीचे पादशाहाचे संनिध रहाणारे गाणारापाशीं तालिम घेऊन त्यांची शागिर्दी करून गाणें शिकत होते. अभ्यास करण्यांत पूर्ण श्रम व मेहनत करित होते. हुजूरीयान, म्हणजे पहिले प्रतीचे गाणारे लोक, रात्रंदिवस पादशाहाची शागिर्दी करून पादशाहापासून तालिम घेण्यांत निमग्न होते. या एकंदर

गाणारे लोकांस जमीन वतन ईनाम व पगार व बक्षिस वगैरे कृपावंत सरकारांतून प्राप्त होती. कित्येकांस सरकारचे खजिन्यांतून दरमहाचे दरमहा पगार पोहचत होता. कित्येक गाणारे लोकांस शहर नवरसपूर येथील पेडेवार प्राप्त होती. कित्येक गाणारे लोकांस विजापूर शहरावर प्राप्त करून दिल्ही होती. कित्येक गाणारांस नवरसपूर शहरावर प्राप्त होती. कित्येक गाणारांस नवरसपूरचे व विजापूरचे हदींतील व ताब्यांतील गांवें व मोठीं मोठीं खेडीं ईनाम करून दिल्हीं होतीं. तेव्हां हे सर्व गाणारे लोक आनंदांत काल घालऊन खाऊन पिऊन बहुत सुखानें प्रपंच करित होते.

## ४८. अकबरशाहा पादशाहा याणी करभाराचा म्हणजे खंडणीचा ऐवज मागणें करितां ईबराहीम आदिलशाहाकडे वकील पाठविणें :

जेव्हां अकबरशाहा पादशाहा याणी शाहाजादा मुराद याजला खानखाना-सहित फौज समागमें घेऊन यापूर्वीं दक्षणचे बंदोबस्ताकरितां नेमून पाठविला होता तेव्हां खानखाना बहुत विचारानें दक्षणचे बंदोबस्ताकरितां यत्न करित होता. दक्षणचे लोकांशीं सख्य व सला करण्याविषयींहि बहुत यत्न करित होता. परंतु कांहीं एक बंदोबस्त झाला नाहीं. निजामशाहाचा सर्व मुलुख हस्तगत करण्याचे आधीं मनांतच होतें. परंतु त्याप्रमाणें घडून येत नव्हतें. निजामशाहाचे अमीरलोकांस आम्हांपरते कोणी नाहीं असा येथपर्यंत अभिमान व गर्व झाला होता कीं, म्हणजे कित्येक माजले होते कीं, निजामशाहाचे मुलकाचे बाहेरचा मुलख, कीं जेथें मोंगलाचें ठाणें होतें तें ठाणें उठऊन तो सर्व मुलुक, अमीरलोकांनीं हस्तगत केला. या कारणास्तव अकबरशाहा पादशाहाचे अंतःकर्णात अधिकअधिकच वाकडेपणा आला. अशा संकटांत दुसरेंच मोठे संकट उभें राहिलें. मोठा प्रळय उत्पन्न झाला. सुा सबा व आलफ म्हणजे एक हजार व सात (१५९८–९९ इ. स.) सालीं अकबरशाहाचा पुत्र मुराद मरण पावला.[२८] हें संकट शरीरांतील शुध्दी, म्हणजे सावधपणा, हरण करणारे व प्राणघातक करणारे असें अकबरशाहाचे जिवावर प्राणाहून अधिक संकट आलें. चिंतेचा व दुःखाचा समुद्र उसळूं लागला. चिंतेच्या लाटा उठों लागल्या.

२८. "On the 17th Urdibihisht, Julus 44, (27 April 1599) near Dihbari, on the banks of the Purta, twenty kos from Daulatabad, Prince Sultan Murad's fits took a grave character, and on the 22nd [ 2 May 1599 ] he became insensible and died"– 'Akbar Nama,' E. D., p. 97; 'Muntakhabu-t- Tawarikh', E. D., p 204.

या अत्यंत संकटानें व संतोषानें खेद पावोन व त्रासून पुन्हां दक्षणचा मुलुख हस्तगत करण्याविषयीं कंबर मजबूत बांधून अकबरशाहा याणी आपलेपुढें आपला दुसरा पुत्र दानियाल[२९] यास खानखानासमागमें बहुत फौज देऊन दक्षण देशाचा मुलुक घेण्याकरितां आपलेपुढें रवाना करून अकबरशाहा आपणहि खुद जातीनें सुहुर सन समान व आलफ या सालीं म्हणजे सन एक हजार व आठ ( १५९९–१६०० इ. स. ) साली बहुत फौज घेऊन व लढाईचें सामान अत्यंत घेऊन आपले राजधानीचे शहराहून निघोन दक्षण देशाकडे चालू झाला. प्रथम अशरच्या किल्यानजिक पोहचून, कारण कीं राजा आलीखान याचा पुत्र हाजरखान हा अकबरशाहाचें हुकूमांत वागत नव्हता व आपले बापासारिखेच माजुरपणानें व दांडगेपणानें वागत होता सबब आधी त्या किल्यासंनिध पोहचून, त्या किल्यावर हल्ला करिता झाला.[३०] अकबरशाहाचा पुत्र शाहाजादा दानियाल हा खानखानासहित पुढें जाऊन पोहचून अहमदनगरचे किल्यावर हल्ला केला होता. अशा समयांत अकबरशाहा याणी शरीफ सरमदी याजला ईब्राहीम आदिलशाहाकडे विजापुरास पाठऊन मोठे ईच्छेनें व बहुत आशेनें करभागचा, म्हणजे खंडणीचा, बहुत ऐवज मागण्यानें निरोप सांगून पाठविला कीं, त्या निरोपाची अक्षरें ईबराहीम आदिलशाहास कानानें ऐकवेनात. असा कठोर निरोप सांगून पाठविला. परंतु प्रसंगास्तव ईब्राहीम आदिलशाहा याणी आपले तेजस्वी अकलेनें व दूर विचार करणारे अकलेने शास्त्रार्थानें विचार करून अकबरशाहासी सख्य करिता झाला. करभाराचा, म्हणजे खंडणीचा, ऐवज पाठविणेंबद्दल उभयतां पादशाहांत मित्रता सुटून वाकडे आले होते. ईतक्यांत एकाएकीं उभयता दैववान पूर्ण मनोरथी पादशाहांचें ईश्वरानीं सख्य केलें.

२९. "On the 2nd of the month of Ir (14 June 1599) Prince Daniyal was sent to subdue the Dakhin." 'Muntakhabu-t-Tawarikh,' E. D., p 204. Akbar gave the Government of the Deccan and Khandesh to Prince Daniyal on 21st April 1601 and left for Deccan on 22nd April 1601.– Inscription near Gateway of Asirgarh.– 'Muslim Inscriptions '–by V. S. Bendrey, p. 137.

३०. The fort of Asir was conquered on the 6th of Bahman in the Ilahi year 46 corresponding to 22nd Rajab (15 Junuary 1602) and on the 24th of the same which corresponds to the 8th of Saban (2nd February 1602) Akbar honoured it by entry.– Inscription on a piller in the Jami Masjid in Asirgarh,-No. 310, p. 137 and no. 313, p. 138; 'Muslim Inscriptions' by shri V. S. Bendrey, Also see p. 145-46 of 'Akbar Nama,' E. D., Fazl Sirhindi's Supplement.

४९. आदिलशाहाची कन्या सुलतान बेगम ही अकबरशाहाचा पुत्र शाहाजादा दानियाल यास देऊन लग्न होणें व ईश्वराचे आज्ञेकरून त्याच वर्षी दानियाल याणीं मरण पावणें :

अकबरशाहा याणी शरीफ सरमदी याजला रवाना केल्यानंतर थोडकेच दिवसांत सय्यदाचे पदवीचा व श्रेष्ठ योग्यतेचा जो मीर जमालुद्दीन हुसेन आंजू याजला, कीं तो मीर जमालुद्दीन सैय्यद लोकांपैकीं प्रसिध्ध होता व अकबरशाहापासीं संनिध राहाणारांपैकीं होता त्याजला, आदिलशाहाकडे पाठऊन मित्रतेची व सख्यतेची बिछाईत आंथरविता झाला. नाना प्रकारचीं मिष्ट भाषणें बोलऊन सख्यत्व व मित्रता करविली. राजधानी व पादशाहीचे उंच स्थानावरील सूर्य व श्रेष्ठता व सुदैवपणाचे डबींतील मोती, म्हणजे इबराहीम आदिलशाहाची कन्या सुलतान बेगम ही, पादशाही व राजधानीचे बागेतील नूतन उगवलेला वृक्ष व ऐश्वर्याचे पुष्पवाटिकेंतील नवें उगवलेलें झाड ईश्वराचे कृपेचे छायेंतील, म्हणजे अकबरशाहाचा पुत्र शाहाजादा दानियाल याजला, द्यावी म्हणोन मागणें करविलें. तेव्हां ईबराहीम आदिलशाहा याणी या करण्यांत पुढें आपला सुदैवपणाचा उपयोग पाहून मीर हुसेन आंजू याचे इच्छेच पंच्यास कबूल करण्याचे महंदीनें रंगवीलें, म्हणजे ईबराहीम आदिलशाहा याणी मीर हुसेन आंजू याचें बोलणें कबूल केलें. जेव्हां हें कल्याणप्रद काम ठरण्यांत आलें तेव्हां मीर हुसेन याजला भारी किंमतीचा पोषाख देऊन बहूत संतोष व पूर्ण मनोरथानें परत जाणेंविसीं निरोप दिल्हा. त्यानंतर लग्नाचें साहित्य व मंगलकार्याचे पदार्थ सिध्ध व तयार करावयास लागून अकलवान माणसास नाना प्रकारचे उत्तम पदार्थ व सनगे व दागिने आणावयाकरितां मोठे मोठे शहरांस व थोर थोर भरवस्तीचे गांवोंगांव पाठविले. परंतु कालचक्राचे नानाप्रकारचे संकटाचे व अडथळयाचे कारणानें हें लग्नकार्य ढिलाईवर पडलें. कारण कीं, आरबींत वाक्य आहे त्या वाक्याचा अर्थ : "हरएक कामें समयांनीं घेरलेलीं आहेत." म्हणजे हरएक कामाची वेळ येती तेव्हां तें काम घडून येतें असें आहे. याप्रमाणें हें लग्नाचे काम समय आला नाहीं सबब ढिलाईवर पडलें. पाच वर्षें गुजरल्यानंतर लग्नाची ग्रहदशा जुळून आली. उभयतां पादशाहाकडील मंडळी या लग्नाचें साहित्याचे सिध्धता करण्यांत निमग्न झाली. उभयतांकडे ही लग्न समारंभाची व संतोष व आनंदाची सिध्धता झाली. त्यानंतर करार ठरण्यांत आला कीं, शाहाजादा याणी बुरहानपूराहून अहमदनगरास येऊन अहमदनगर येथें लग्न समारंभ करून नंतर बुरहानपुरास परत गेले तरी मुख्त्यारी आहेत. याप्रमाणें करार ठरण्यांत आला. तेव्हां पतीव्रतापणाचे व संपूर्ण पवित्रतेच्ये पडद्यांत बसणारी व राजधानीचे व पादशाहाचे महालांत शोभायमान होणारी पादशाहाची कन्या सुलतान बेगम ईची अंबारी आंदणाचे जिन्नसांसहितहि, कित्येक आंदणाचे जिन्नस मोजण्यापासून हिशोब करणारे लोक

थकित झाले व गणित करणाराची अकल त्या पदार्थांचे गणित करण्यापासून थकित झाली होती, म्हणजे आंदणाचे पदार्थ किती दिल्हे होते त्याचे कोणी गणित करूं शकत नव्हता. इतके देऊन, मीर हुसेन आंजू समागमें दौलतीकडील कल्याण इच्छिणारे श्रेष्ठ अमीरलोक व बहुत फौज समागमें देऊन रवाना केली. नंतर सुा सन सलास अशर व अलफ म्हणजे १०१३ एक हजार तेरा ( १६०४-१६०५ इ. स.) सनचे सालीं अहमदनगरास पोहचले.[३१] शाहाजादा याजला नवरीचे अंबारीचें समागमें बहुत जमात आली आहे असें जेव्हां वर्तमान कळलें तेव्हां फौज घेऊन कोणीतरी युध्ध करण्यास आला आहे असें भलतेंच समजून भयाभीत होऊन अहमदनगरास येऊन पोहचणें सोडून मध्येंच मुकाम करून राहिला. शेवटीं खानखाना याणी खातरजमा व दिलभरंवसा देऊन शाहाजादा याचे अंतःकर्णांतील भय निवारण केलें तेव्हां बुरहानपुराहून नवरीस सामोरें जाण्याकरितां निघोन अहमदनगरास येता झाला. परंतु लग्न समारंभ व मंगल कार्यांची कचेरी पैटणचे मुक्कामीं, कीं पैटण हे शहर गंगाकिनाऱ्यास आहे व अहमदनगरापासून वीस कोशाचे अंतऱ्यानें आहे तेथें, करार ठरऊन नवरीचे अंबारीसमागमें मीर हुसेन आंजू व मिरजा यनीन हा खानखानाचा पुत्र समागमें देऊन पैटणास नवरीची स्वारी रवाना केली. अंबारी समागमें आदिलशाहाकडील कारभारी व अमीरलोक आले होते त्यांजला आज्ञा केली कीं, तुम्ही पैटणापर्यंत समागमें जाऊन व पैटण येथें लग्न समारंभ झाल्यानंतर अंबारी बुरहानपुरास पोहचऊन विजापुरास परत यावें. आदिलशाहाकडील अमीरलोकांनीं या हुकुमावरून अर्ज केला कीं, आमचे खावंदाचा हुकूम ईतकाच आहे कीं, अहमदनगरापर्यंत अंबारी पोहचऊन समागमें जाऊन परत येणें. असा हुकूम झाला आहे. आम्ही आपले खावंदाचा हुकुम बजाविला. आतां पुन्हां आग्हाकडून सोबत दिल्ही जाणार नाहीं. असें बोलले आणि तेथूनच फिरून परत माघारे निघाले. शाहाजादा नवरीचे अंबारीसहित आपले जमातीसुध्धां पैटणास जाऊन पोहचला. तेथें जाऊन लग्न समारंभास आरंभ करून पादशाही चालीप्रमाणें विवाह करिते झाले. लग्न समारंभ झाल्यानंतर शाहाजादा दानियाल हा बुरहानपुरास जाता झाला. कर्मधर्मसंयोगें त्याच वर्षी तारिख १६ माहे जिल्हेज ( २५ एप्रिल १६०५ ) रोजीं, दानियाल हा नित्य मद्यपान करित होता व सदरहु तारिखेस नित्य मद्यपान करण्यापेक्षां फाजल दारु प्याला त्या योगे त्या मद्यपानानें, मरण पावला.[३२] हें मोठे दुःख

३१. हि स. १०१३ त शाहाजादा डॅनियल आदिलशाहाच्या मुलीशीं लग्न करण्याकरितां बुऱ्हाणपुराहून दौलताबाद-नाशिकवरून अहमदनगरास गेला.– ब्रि. फि. ३, पृ. ३१७.

३२. "This year (1013 A. H.-1604-5 A. D.) Is also marked by the arrival from the Dakhin of the news of the death of Sultan

प्राप्त झालें. तेव्हां अकबरशाहाचे अंतःकर्णावर डागावर डाग बसला, म्हणजे आधी पहिला पुत्र शाहाजादा मुराद मरण पावला, त्या दुःखाचा विसर झाला नाहीं तोंच दुसरा पुत्र शाहाजादा दानियाल हाहि मृत्यु पावला येणेंकरून डागावर डाग बसला. या चिंतेच्या पर्वताचे वोझ्याखालीं अकबरशाहाचे सामर्थ्य केवळ अशक्त झालें, म्हणजे दुःख सोसेनासें झालें. शेवटीं उभयता पुत्रांचे मृत्यू पावणेचे दुःख सोसेनासें झालें तेव्हां अकबरशाहाचे प्राणावर संकट आलें. प्राण जाण्याजोगें दुखणें घेतलें. दानियाल हा पुत्र वारल्यानंतर दुसरेच वर्षी सुहूर सन अर्बा अशर व अलफ सालीं म्हणजे १०१४ ( १६०५–१६०६ इ. स. ) या सालीं अकबरशाहा मरण पावला.[३३] अकबरशाहा मरण पावल्याची तारिख निघण्याकरितां अर्धी बैत पारसीची केली त्या बैतेचा अर्थ : " अकबरशाहा मरण पावला, येणेंकरून फिरीस्ते म्हणजे विष्णुदूत देखील शोक करूं लागले." याच बैतेंतील फौते अकबरशाहा ईतक्या अक्षरांपैकीं एक अलीफ हें अक्षर वजा करून बाकीचीं अक्षरें अबजदचे हिशेबानीं गणलीं म्हणजे १०१४ एक हजार चौदा ( १६०५–१६०६ इ. स.) सनचे साल निघतें, म्हणजे या सनांत अकबरशाहा मृत्यू पावला.[३३] त्यानंतर शाहा सलीम उर्फ जहानगीर पादशाहा हिंदुस्थानाचे तक्तावर बसला.

Daniyal"– Anfo'ul Akhbar by Muhamad Amin, E. D., p. 248. Also in the 50th Julus of Akbar (commences from 11 March 1605 or 1 Zilaad 1013 A. H.) "after 40 days of illness, the young Prince [Daniyal] died, at the age of thirty-three .. "– 'Takmila-t-Akbar Nama' by Inayatulla, E. D., p. 114.

३३. "On the 9th Azur, 50th Julus ( 20 Nov. 1605 ) corresponding with the night of Wednesday, 12th Jumada-t Akhir ( 16 October 1605 Wednesday ) when the age of His Majesty had reached the period of sixty-five lunar years, he bade adieu to life at Agra.."– 'Takmila-l Akbar Nama' by Inayatulla E. D., p. 115.

'Ma-Asir Rahimi' of Abdul Baki gives only 23rd Jamadul awwal, A. H. 1014, (26th October 1605, Saturday),– E. D., p. 243.

On the other hand 'Anau-t Akbar' by Muhammad Amin tells us : on Wednesday, the 12th of Jumada-s sani, 1014 A. H., he died at Agra and was interrd in Sikandra"– E. D., p. 248.

Jahangir, however, suggests it to be the previous to Thursday, Jumada-s- sani 20th, A. H. 1014 ( 24 oct. 1605 ).–'Tuzuk-i-Jahangiri', p. 1.

## ५०. ईबराहीम आदिलशाहाची कन्या शाहा हाबिबुल्ला ई हूसैन याजला देऊन लग्न होणें प्रकर्ण :

सन १०१४ एक हजार चौदा ( हिजरी १६०५–१६०६ इ. स. ) सालीं इबराहीम आदिलशाहाची योग्य कन्या फातिमा सुलतान उर्फ पादशाहा साहेबा ईचें लग्न योग्य, कुलीन व श्रेष्ठ सय्यद जातीचे थोरपणाच्या मर्तब्याचा, पूर्ण थोरपणाचे पदवीचा, सुदैवान शाहा हाबिबबुल्लाह बिन शाहा यदुल्लाह हुसैनी यासी, कीं तो सय्यदाचे कुळांतील कल्याणपणाचे व सुरक्षितपणाचे स्थान गौसपणानें प्रसिध्ध श्रेष्ठ आषक षाहावान सय्यद महंमद गेसुदीराज या नांवाचा व त्यास बंदेः नवाज हुसेनी असें म्हणतात त्याचे वंशावळीपैकीं होता. त्यासी लग्नाचा निश्चय झाला. लग्न समारंभ हजारो कल्याणानें व यशस्वीपणानें अति शोभेनें होता झाला. त्या काळीं सर्व लोकांपेक्षां श्रेष्ठ व थोर योग्यतेचा मोठा विद्वान व अति पवित्र नेक चालीचा शाहा महंमद म्हणोन होता. त्याणी हा लग्न निश्चय ठरविला व श्रेष्ठ काम ठरविण्याकरितां ईबराहीम आदिलशाहाचे तर्फेचे वकील झाला होता. त्याणी खुद जातीनें लिहिलें आहे तें हें आहे : “मी ईश्वराचा स्तव केल्यानंतर व खुदब्याचा' गोषवारा म्हणजे सारांश वर्णन केल्यानंतर बोललो. त्या समईं ज्याणी या श्रेष्ठ कामाची ईच्छा केली तो ग्रहस्थ तेथें होता. तो ग्रहस्थ कोणता ? जो कुलीन थोर खानदानी बहुत संभावित अकलवान व श्रेष्ठ, कीं ज्याचें नांव शाहा हाबिबुल्लाह बिन शाहा यदुल्लाह हजरत सय्यद महंमद याचे वंशीचा, कीं जे सय्यद महंमद गेसुदीराज या नामेंकरून प्रसिध्ध आहेत त्यांचे कुळांतील, शाहा यदुल्लाह याचा पुत्र शाहा हाबिबुल्लाह याणी सत्रावे वर्षी जोडा केला, म्हणजे जी बिबी पडद्यांत गुप्त राहणारी व जी श्रेष्ठ योग्यतेची, अकलवान व त्या काळांतील सारांश होती, म्हणजे त्या दिवसांत तसी दुसरी कोणी नव्हती व त्या काळांतील बिलकीसच्या योग्यतेची, कारण कीं बिलकीस ही हजरत सुलैमान सल्लील्लाह आलहे वसल्लम याची स्त्री अति पवित्र महा पुण्यवान झाली त्या बिलकीसचे योग्यतेची होती. जिचे नांव फातीमा सुलतान असें होतें. जी पादशाहा–ए–साहेबा या नामेंकरून प्रसिध्ध व श्रेष्ठ पादशाहाची व योग्य पादशाहाची कन्या, कीं जो पादशाहा सर्वांचे गर्दनीचा मालक, म्हणजे सर्वांचे प्राण त्याचे हातीं व पादशाहा पुत्र पादशाहा ज्याचे नाम ईबराहीम आदिलशाहा असे आहे, त्याचा मुलुक ईश्वर निरंतर रक्षण करो त्याची नौका म्हणजे राजधानीची नाव व शहर विजापूर, कीं जें शहर बदीयापूर या नामेंकरून प्रसिध्ध आहे तेथें राजधानीचा वाडा आहे व लग्न समारंभाची त्या वाड्यांतच कचेरी केली त्या स्थानाचे नांव सबज महाल असें आहे तोच सबज महाल राजधानीची जागा होणार आहे व सर्व साक्षीदारानी ईज्याब व कुबुल श्रवण करण्यानें व इज्याब म्हणजे कन्यादान

करणें व कुबुल म्हणजे पाणीग्रहण करणें व ईज्याब करणार म्हणजे कन्यादान करणारा व कुबुल करणारा म्हणजे वधु स्वीकार करणारा हे उभयतांहि तेथें असोन त्यांचे विद्यमानें निश्चय होणें लग्न समारंभाचे कचेरींत त्यानंतर जी राजी झाली त्याचे महरावर, म्हणजे लग्न समई नवरी व ज्यास अनुकुल असेल तितके द्रव्य वगैरे जिन्नस देण्याचा करार ठरऊन त्यापैकीं आधीं तिसरा हिसा द्रव्य देऊन नंतर लग्न झाल्यावर बाकीचा ऐवज कराराप्रमाणें नवऱ्यानीं फेडावा त्यास महर असे म्हणतात त्या महरावर, राजी झाली. त्या महराचा सुमार लिहिला जात आहे. चार हजार घोडे व त्या घोड्या-पैकीं पाचसें घोडे सोन्याचे जिनाचे व हरीर, म्हणजे उंचे कापड असते त्या कापडाचे, हजार गटे, एक हजार उंट व एक हजार गटे रेशमी कलाबुती कापडाचे, एक लाख दीनार, म्हणजे साडेपांच रुपयाचे किंमतीचा एक सोन्याचा तुकडा असतो त्यास दीनार असें म्हणतात ते एक लाख दीनार, एक पांढरा हत्ती, पाचशेह तुर्की चाकर, पाचशेह हापसी जातीचे चाकर, पाचशेह दक्षणी चाकर, पाचशेह कुणबिणी व ज्याणी लग्न करविलें तो श्रेष्ठ व योग्य पुरुष नवरीकडील वकील, कीं ज्याचे पुढें खुतबा पढला जातो त्या समई कीं तो वकील, विद्वान, अकलवान, बहुत विरक्त व साधु आहे, कीं त्याचे नांव शाहा महंमद वलद सय्यद नुरुद्दीन बिन सय्यद महंमद, कीं जो मक्का मज्यालसी या नामेंकरून प्रसिध्ध आहे तो काजी, नवरीचे वकीलापुढें खुतबा पढत आहे ज्याचें नांव काजी खलीलुल्लाह असें आहे. मी त्याच्या कन्येचें लग्न वकिलीचे योगानीं ठरविलें त्या कन्येचें नांव फातीमा सुलतान उर्फ शाहा साहेबा या ईब्राहीम आदिलशाहाचे कन्येचे लग्न शाहा हाबिबुल्लाह बिन शाहा यदुल्लाह यासी करविली व काजी खलुल्लीलाह याणी व नवरीकडील वकील याणी कबुल केलें. त्या कन्येचें लग्न शाहा हाबिबुल्लाह बिन यदुल्लाह मशारनिल्हे याणी कबुल केलें त्या समई शाहा हाबिबुल्लाह त्या लग्नाचे कचेरींत हजर आहे. व त्या कचेरींत येखलासखान, शहानवाजखान, षुजावतखान, रूमीखान, मुल्ला युसफ व कफावतदारखान हे त्या कचेरींत हजर होते. त्याही ईज्याब व कुबुल म्हणजे कन्यादान व कन्या स्वीकाराचा मजकूर ऐकला तेव्हां ती पडद्यांत राहणारी पादशाहाची कन्या शाहा हाबिबुल्लाह मशारनिल्हे याणी महर, म्हणजे नवरी बदल ठरवाचा ऐवज देतात, यास्तव ती पादशाहाची कन्या त्याची स्त्री झाली. तेव्हां पादशाहाचे स्त्रीनींहि करार ठरलेले जिन्नस मध्यम प्रतीचे घ्यावे, कमीहि घेऊं नये व अधिकहि घेऊं नये, मध्यम मध्यम घ्यावे; चाकर, कुणबिणी, घोडे व उंट घेणें ते मध्यम प्रतीचे घेण्यास नवरी मुखत्यार आहे व याप्रमाणें नवरीस चाकर, कुणबिणी, घोडे, उंट वगैरे घेण्यास नवरा मुखत्यार आहे. सदरहू कराराच्या जिनसांची किंमत नवरीनें मागितल्यास तीं किंमत देण्यास नवरा मुखत्यार आहे व नवऱ्यास योग्य आहे कीं दुसरे लग्न करूं नये व स्त्री दाखल दुसरी कुणबिणहि ठेऊं नये. या प्रमाणें स्नेहानें शेवटपर्यंत निभावणी

यास्तव हा सर्व शास्त्रार्थ नवरा करिताहे व आज लग्नाचे आरंभीं त्या कराराचे ठरावापैकीं तिसरा हिसा घ्यावा, कारण कीं त्या करारापैकीं तिसरा हिसा देण्यास सामर्थ्य आहे त्या वधुवरांचें, म्हणजे नवरानवरीचें ईश्वर कल्याण करो. दोघांस एक प्रीतीनें ठेवावें. या वधुवरास ईश्वर आनंद बहुत व पवीत्र देवो. नंतर कुरानांतील शास्त्रार्थाप्रमाणें लग्न झालें. यास्तव या लग्नांतील करार सोडून वागणें व कांहीं फंद करणें नवऱ्यास योग्य नाही. कारण कीं, शाहा हाबिबुल्लाह त्या नवरीचे कुलासारखाच कुलीन आहे. या उभयतांचें लग्न ठरलेलें कोणत्याहि सबबेनें फिरविण्यास व खराबी करण्यास कोणी सामर्थ्यवान नाहीं म्हणजे आतां हें लग्न कोणाच्यानेंहि फिरवावयाचें नाहीं. ही स्त्री त्या नवऱ्याची झाली. हा कराराचा ऐवज त्या नवऱ्यावर नवरीने कर्ज आहे. ही लग्न पत्रिका तारिख सन १०१४ एक हजार चौदा हिजरी (१६०५–१६०६ इ. स.) सालीं लिहिली गेली व हिजरी म्हणजे हजरत महंमद मुस्ताफा सल्लील्लाह वसल्लम याचे वियोगाची तारिख आहे त्यास हिजरी असें म्हणतात. त्या पैगंबरावर ईश्वराची पूर्ण कृपा असो. ईश्वर त्यास बहुत कृपेनें पालन करो.

## ५१. निजामशाहाचे राजधानींत फंदफितूर उत्पन्न होणें, ती राजधानी कायम राखण्यावर मलिक अंबर यास नमणें व मलिक अंबर याणी मोंगलासी युध्द करणें :

अविनाश ईश्वराचे योगानीं निजामशाहाचे राजधानींत ऱ्हास होणें, म्हणजे ऐश्वर्य कमी होणें, आरंभिलें. नाना प्रकारचे फंदफितूर दिवसेंदिवस अधिकच वाढूं लागले. दौलतीकडील अमीरलोकांचे व पादशाही चाकरलोकांचे वैर व शत्रुत्व आपआपणांत दिवसेंदिवस बहुत वाढलें. या मुलखांतील राहणारांचा प्राणघात करण्याविषयीं मोगलाचा यत्न बहुत वर्षे व करन, म्हणजे चालीस वर्षांस म्हणतात असे बहूत करन म्हणजे बहुत वर्षे, होत होता त्याहून मोगल लोक अधिकच यत्न करित होते. कित्येक शाहाजादे व अमीरलोक या कामांत शिरले. कित्येक केवळ फौजेची व शिपायांची पायमाली म्हणजे खराबी झाली. कित्येक लोक मेले गेले व खराब झाले. तत्रापि मोगल येविषयींचा यत्न सोडित नव्हते. तेव्हां खानखाना म्हणजे हिंदु लोकांचे राजधानींतील मुख्य कारभारी व त्या कालांतील अद्वितीय पुरुष होता. त्या कालांत विचारांत व मसलतींत निरोपम म्हणून म्हणवित होता. तो याच कामावर नेमला जाऊन बहुत दिवस खानदेशांत समय साधण्याची संधी पाहत होता. दक्षिणी लोकांस ठकविणें व दिलभरंवसा देणें व हिंदु लोकांचें चित्त आकर्षण करणें बद्दल बहुत प्रकारचीं कामें करित होता. शेवटीं शतावधी करारानें व ठकविद्येनें अहंमदनगरचा

किल्ला व अहमदनगरचे ताब्यांतील कांहीं मुलुख हस्तगत केला.[३४] बाकी बहुत विस्तीर्ण मुलुख निजामशाहाकडील अमीरलोकांचे हातीं तसाच राहिला होता. मलिक अंबर हापसी म्हणोन एक सेवक त्या दौलतीकडील चाकरांपैकीं होता तो मलिक अंबर अकलेस व समजुतीस पूर्ण शूरत्व व धैर्यासहित ठेवित होता, म्हणजे अकलवान व धैर्यवान होता. त्यांत राजू मंजा म्हणोन याच मंडळीपैकीं होता. त्याणी दौलताबादचा किल्ला हस्तगत केला होता. त्या राजू मंजासी सख्य करून उभयतांनीं मिळोन निजामशाहाची कीर्ति सरंक्षण करणें व मुलुखाचा बंदोबस्त करण्यांत यत्न करून तो संपूर्ण मुलुख आपलें हातीं आणिला. मुर्तजा बिन शाहा अली म्हणोन त्याच खानदानींतील वंशापैकीं होता. त्याजला राज्यावर बसऊन युध्धाचा व शत्रुत्वाचा झेंडा, म्हणजे ध्वज, उभा केला. खानखानासहित युध्धास आरंभ केला. मोंगलाचे हातीं बहुत महाल गेले होते ते महाल हस्तगत केले. हें वर्तमान जेव्हां जहानगीर पादशाहास कळलें तेव्हां क्रोधायमान होऊन वाकडेपणास्तव व दक्षणी लोकांचे तरफदारीचे कारणास्तव खानखानाचे व्यत्ययावर विश्वास ठेऊन खानखानावर क्रोधायमान झाला. पादशाहासंनिध हुजूर राहणारे सेवकापैकीं कित्येक सेवकलोक कीं ज्या सेवकलोकांचे खानखानासी निर्मळ अंतःकर्ण नव्हतें त्या लोकांनींहि या संधींतच समय जाणोन खानखानाचे नेक चालीस व राजधानीचे कल्याण ईच्छिण्यास बेमानपणाचे व राजधानींचे अकल्याण ईच्छिण्याचे भावानें मजकूर समजाऊन पादशाहाचे क्रोधास बळ देते झाले. शेवटीं खानखानास आणविण्याविसीं हुकुम सादर झाला. खानखाना सन सीत आशर व आलफ म्हणजे एक हजार सोळा हिजरी (= इ. स. १६०७–१६०८) सालीं बुरहानपुराहून दिल्लीस जाता झाला[३५] आणि पादशाहाचे क्रोधास व त्रासास पात्र झाला. तेसमई खानखानाचे वाकडे-पणावर जे लोक होते त्यांची जिव्हा बडबड करण्याविसीं व वर्में काढण्याविसीं फार

३४. On the 21st Safar (22 August 1600) news arrived of the capture of Ahmednagar on the 18th. (20 August 1600?).- 'Akbar nama- Faizi Sirhindi' E. D., p. 144. p. 311 of Fer. 3. On the 26th Farwardin (5 Aprii 1600) the royal army arrived.. on 2nd Urdibihisht (11 April 1600), the various intrenchments were assigned. On 6 Shahryur 45th Julus (18th August 1600), it (Ahmednagar fort) was exploded. The siege lasted four months and four days (i. e. upto 18th August 1600 or so.)- 'Akbar Nama by Abul Faizi, E. D., p. 100-101.

३५. On the 24th of Jamadilawal 3 Julus (26 August 1608) Khan Khanan arrived and waited on me (Jehangir) Tuz–i–J, p. 148.

लांबली तेंव्हां खानखाना या प्रकर्णांत निरोपाय होऊन राहिला. अशा समयांत वर्तमान येऊन पोहचलें कीं, मलिक अंबर याणी खानखानाचे हातीं आंढारेचा (कंधार) किल्ला आला होता तोहि हस्तगत केला. असें वर्तमान कळलें तेव्हां जहानगीर पादशाहा याणी अत्यंत क्रोधायमान होऊन खुद्द जातीनें दक्षण देशावर चालून जाणेचा संकल्प दृढतर केला.

## ५२. जहानगीर पादशाहा याणी मातुश्रीचे सांगण्यावरून दक्षण देशाची फत्ते करणें व खानखानास दक्षण देशावर रवाना करणें प्रकर्ण :

जहानगीर पादशाहा खुद्द जातीनें दक्षण देशावर चालून जातात असें जहानगीर पादशाहाचे श्रेष्ठ मातुश्रीस जेव्हां वर्तमान कळलें तेव्हां जहानगीर पादशाहास मनाई करिती झाली. अत्यंत शोकानें व दुःखानें डोळ्यांत पाणी भरून जहानगीर पादशाहा-पुढें रुदन करिती झाली. बोलली कीं, तुझे दोघे बंधू राजधानीचे बागेंतील नूतन उगवलेले वृक्ष होते, म्हणजे राज्याधिकारी व लहान वयाचे होते. राजपदास योग्य व राज्यकारभार चालवावयाजोगे ते तुझे दोघे बंधू दक्षण देशावर चालून जाण्याचे कामांतच वारले. तेव्हां सावध व हुशार व्हावें. आपण राज्य व तख्ताचे व शिक्याचे धण्यास दक्षण देशांत पाऊल ठेवणें सुफल झालें नाहीं. शकूनहि नीट झाला नाहीं. यास्तव कदापि दक्षण देशावर चालून जाण्याचा संकल्प तूं करूं नको. जर करितां दक्षण देशाची माती सोन्यासारखी असली तथापि ईच्छेचे नेत्रानें तिकडे पाहूं नको. दूरवर विचार पाहिल्यास तुजला असें कोणतें जरूरीचें कारण आहे? ईश्वरानीं तुजला ईतका मुलुख लांब रुंद कीं चार खुंट हिंदुस्थान बक्षिस दिल्हें आहे याहून दुसरें, आणखी काय पाहिजे? आतां तुजला योग्य आहे कीं व हे शोभते कीं, ईश्वराचा स्तव करून संतोषांत रहावें. हिंमतीचे पाय अल्प संतोषाचे पदरांत आखडावे, म्हणजे धैर्य धरून थोडक्यांत संतोष मानून असावे. पुन्हा आशेच्या भोंवतीं फिरूं नको जर करितां तूर्त कारणच आहे तरी त्याचे सेवकास, म्हणजे खानखानास, त्या प्राणघातक कामावर नेमावा. कारण कीं, तो या दौलतीचें कल्याण ईच्छिणारा वारिसदार आहे. खानखानाकडून व त्याचे बापाकडून तुझे बापाचे कार-कीर्दीपासून आजपर्यंत सेवेच्या चाली व स्वामीसेवेंत प्राण खर्च करण्याचे कामाशिवाय दुसरें काम प्रसिध्द झालें नाहीं, म्हणजे खानखाना व खानखानाचा बाप आजपर्यंत ईमानें व ईतबारें सेवा करित आले. हे दोघे बाप लेक, म्हणजे खानखाना व खानखानाचा बाप, या उभयतानीं या राजधानींतील दौलतीचें कल्याण ईच्छिण्यांत बहुत कामें केलीं आहेत. अशीं कामें केलीं आहेत कीं त्या गोष्टींचा कधीं विसर

पडावयाचा नाहीं. असे या कामांत कीर्तिमान झाले आहेत. तुजला माहित नाहीं कीं काय ? सिंधचा मुलूक, कीं तसा मुलुक हस्तगत करणें हे लहान काम नाहीं अशा प्रकारच्या सिंधचा मुलुक, हस्तगत केला. गुजराथ व दुसरा आणखी कित्येक दक्षणचा मुलुक स्वामीसेवेचे चालीनें व सरकारची किफायत करण्याचे रीतीनें त्याच प्राण अर्पण करणारे सेवकानें, म्हणजे खानखानानें, घेऊन फत्ते केली. आणि प्रसिध्द झाला आहे. जर करितां त्याच सेवकास, म्हणजे खानखानास, त्या कामावर, म्हणजे दक्षण देशचा मुलूक घेण्यावर, रवाना करिशील तर तुझ दौलतीची प्रबलता व तुझे श्रेष्ठ दैवाचा उदय ईश्वराचे कृपेंकरून खास होईल व मनोरथाची नवरी पुढ्यांत घशील, म्हणजे तुझे मनांत आहे ती गोष्ट खास सिध्द होईल. अशी आशा आहे. जहानगीर पादशाहा याणी या दयाळु मातुश्रीचे शिकविण्यानें व बोधानें सांगितल्या-प्रमाणें करून, दक्षण देशची फत्ते करण्याचा संकल्प करून, खानखानास संनिध बोला-ऊन, पूर्ण दिलभरंवसा देऊन व त्याचे चित्त दुखवलें होतें तें नानाप्रकारचे मिष्ट भाषणानीं व तऱ्हेतऱ्हेचे मनहरक बोलण्यानीं खानखानाची खातरदारी, म्हणजे चित्त-समाधान केलें. तुमचा बहुत उपयोग केला जाईल. या प्रकारें कृपायुक्त व मेहर-बानगीनें करार करून खानखानाचे चित्त उदास झालें होतें तें पुन्हां हातीं आणोन दक्षण देशचा मुलूक घेण्याचे कामाप्रकर्णीं खानखानासी बोलणें झालें.[३६] खानखानाचें अंतःकर्ण दुखवलें होतें. मनांत जळत होता. विनाकारणी पादशाहाचे क्रोधानें व जे लोक वाकडेपणावर होते त्या लोकांनीं व्यर्थ कारण नसतां बडबडी केल्या व वर्मी भाषणें केलीं त्या बडबडींनीं व वर्मी बोलण्यानीं खानखाना बहुत त्रासला होता. यास्तव जहानगीर पादशाहाचे बोलणें ऐकून, मी या कामांत पडावयाचा नाहीं, अशीं आधीं बेपरवापणाचीं खानखानानीं भाषणें केलीं. बोलला कीं, मजविसीं हीं जीं भाषणें करित होते व विनाकारणी वर्मी बोलतात आणि मजवर गुन्हा शाबित करतात यावरून असें वाटते कीं, हे लोक आंधळे व मूर्ख आहेत. या लोकांनीं दुरून अग्नि पाहिला आहे. परंतु अद्यापि त्या अग्निच्या ज्वाळांच्या चपराका व चपाटे पहिलेच नाहींत. दक्षणचा मुलुक घेण्याची कैफियत व दक्षणचे लोक पाठीची साल काढितील ही अवस्था अद्यापि हुजूरचे राहणारास माहितच नाहीं. दक्षण देशची हकीकत जशी आहे तशी जर करितां या लोकांस प्रसिध्द होती तर मजला सरकारांतून दूर कां ठेविते ? आज

३६. On the 21st of the month (Jamadasani) (22 September 1608) KhanKhanan determined to clear out the province of Nizamulmulk....and stated in writing that "If I do not com-plete this service in the course of two years, I shall be guilty (of a fault), on the condition that in addition to the force that had been allotted to that Subah 12,000 more horse with 10,00,000 rupees should be sent with me."– Tuz.-i-J., p. 149.

चार पादशाहांचा दक्षण देशांत चौघडा वाजत आहे. ते पादशाहा बहुत प्रबलपणानें राजधानीचा कारभार चालवितात. ते पादशाहा, गर्वानें व शूरत्वानें व बहुत खजिना व स्वारशिबंदीची बहुत जमात आहे या कारणानें, दुसरे कोणासच विश्वासाचे दृष्टीनें अवलोकन करित नाहींत, म्हणजे ते पादशाहा दुसरे कोणासच मोजित नाहीत. विजयानगरचे हिंदु लोक व कर्नाटकचे जमदारलोकहि बहुत बहुत मुलुक व खजिना ठेवितात तेहि विजयानगरचे व कर्नाटकचे लोक तेथेंच जमले आहेत. सांप्रत जर करितां दक्षणचे सरदारांपैकीं एक सरदारानें शत्रूवर चालून येऊन युध्दास आरंभ केला तर त्या सरदाराने मदत करण्याकरितां बोलाविल्यास तात्काळ त्याचे मदतगारीवर व साह्य करण्यावर सर्व सरदार लोक साह्यार्थी कंबर बांधून त्या सरदाराचे शत्रूचा फडशा करित. ईब्राहीम आदिलशाहा तर खास सर्वांपेक्षां दौलतदार व जरबदार आहे. सर्व दक्षणचे देशांत आदिलशाहाचा मुलुक बहुत विस्तीर्ण व फौज बहुत व भारी खजिना आहे. जो कोणी आदिलशाहाचा आश्रय जोडील तो सर्व संकटापासून निर्भय राहील. आदिशाहा ज्याचे साह्य करितील त्याचा शत्रू पर्वतासारखा असला तत्रापि वाळिले गवताप्रमाणें मोठे फौज रुपी वायुनें उडून जाईल. माझे बोलण्यांतील तात्पर्य हें आहे कीं, मजाविषयीं सरकारांत वाकडेपणानें मजकूर समजवितात व विनाकारणी मजला वर्मी बोलतात त्या जमातीपैकीं एखाद्यास या कामाविषयीं सरकारची आज्ञा व्हावी, म्हणजे तो दक्षणचा देश घेईल. मी बहुत दिवस सरकारचे दौलतींतून व सरकारचे जोडे उचलण्यानें सुदैवपणापासून चेनशीच आहे, म्हणजे मी सरकारापासून बहुत दिवस दूर आहे. आतां माझे मनांत असें आहे कीं, कांहीं दिवस सरकारपासी हुजुर रहावें आणि सरकारचा जोडा उचलून योग्यतेस पावोन श्रेष्ठ व्हावें. असें माझें मनांत आहे म्हणोन बोलला. तेव्हां जहानगीरशाहा याणी अधिकअधिकच खानखानाचे चित्त समाधान व अत्यंत खातरजमा करून व दिलभरंवसा देऊन खानखानाचे अंतःकर्णांतील वाकडेपणाचा मळ काढून टाकिला. खानखानास बहुत संतोष झाला आणि दक्षणचा मुलुक हस्तगत करण्याचे कामावर नेमिला.

५३. मलिक अंबर याणी मदतगारीविसीं व कुमकेविसीं आदिलशाहा पादशाहास विनंती करणेविसीं कंधारचा किल्ला मागणें, खानाजादे लोकांपैकीं एकाची कन्या आपले पुत्राकरितां मागणें व आदिलशाहा याणी कबूल करणें :

ज्या दिवशीं खानखाना दिलीस गेला होता ( तेव्हां ) मलिक अंबर याणी एके संभावित गृहस्थ व विश्वासु मनुष्यासमागमें बहुत नम्रतामिश्रित गरिबीचे मजकुरानें रसभरित विनंतीपत्र लिहून देऊन ईब्राहीम आदिलशाहाला पाठऊन विनंती करविली

कीं, मी निजामशाही दौलतींतील पालन केलेला सेवक आहे. आपण कृपा करून योग्यतेस चढविलेला आहे. जन्मापासून आजपर्यंत आपले सेवेंत व आपले चाकरींत प्राण खर्च करण्यांतच मी दिवस घालविले पुढेंहि माझा हाच ईरादा आहे कीं, बाकी राहिलें तें आयुष्य याच आपले सेवेंत व चाकरी करण्यांतच घालवावें, म्हणजे परलोकीं यमधर्मापासीं हिशेब घेतील तेथील ईमानी लोकांत मी गणला जाऊन निरंतर या लोकीं व परलोकीं कीर्ति मिळवावी हेंच मनांत आहे. माझे संपुर्ण हिंमतीचे मूळ त्या गोष्टीवर आहे कीं, यत्नांची कंबर जिवावर मजबूत बांधोन स्वामीसेवा करून दाखवावी. आपले मुलकाचे संरक्षण व निजामशाहाचें नांव संरक्षण करण्यांत माझे हातून जितके होईल तितका यत्न करावा व जितकें सामर्थ्य आहे तेथपर्यंत यत्न व पराकाष्टा करून शत्रूचा हात या मुलकांतून आखुड करावा, म्हणजे शत्रूचें पारपत्य करावें. असें माझे मनांत आहे, परंतु आपण साह्य व मदत केल्याशिवाय हें काम घडून यावयाचें नाहीं. जेव्हां विचार पाहातां या दोन्ही राजधानी, म्हणजे आपली व निजामशाहाची राजधानी मिळोन, एकच आहे. उभयतांकडीलहि राजधानींत एकाचें दुःख दुसऱ्यास जरूर आहे. यास्तव या कामांत साह्य करणें आपणांस भाग आहे व योग्य आहे. हाली ऐकिण्यांत येतें कीं, खानखाना हिंदुस्थानांतून पुन्हां दक्षण देशावर चालून आला आहे.[३७] मजला त्या शत्रुचें पारपत्य करण्याची फिकीर जरूर प्राप्त झाली आहे. आपणास हा अर्ज आहे कीं, निजामशाहाचे नावाचें व मुलकाचें संरक्षण करण्यावर दृष्टी ठेऊन कुमक व मदत-गारीवर फौज पाठविण्यांत यावी. त्या फौजेनीं सर्वकाळ हजर राहून कामाचे जरूरीचे वेळेस उपयोगास पडत जावें. अहमदनगरचा किल्ला शत्रूचे हातीं गेला आहे. भरोंशाची जागा मजबूत व लढाईचे सर्व सामान सरंजाम व खजिना तेथें ठेवावा अशी जागा नाहीं. जर करितां कंधारचा किल्ला, ईब्राहीम निजामशाहा वारल्यानंतर आपलेकडे आला आहे तो किल्ला, आपण परत दिल्यास पूर्ण मेहेरबानगी होईल. तो किल्ला आपण दिल्हा म्हणजे तेथें खजिना व किरकोळ सामान ठेऊन खातरजमेनें शत्रूशीं मोकाबल्यावर उभा रहीन. तिसरी विनंती ही आहे कीं, जरुरीचें काम आहे तें हें आहे कीं, मी आपणास व निजामसरकारास वेघळे जाणित नाहीं. या दोनीहि राजधानींत कोणत्याहि सबबेनें मी कांहींच भिन्नता पहात नाहीं. जसें माझें

३७. "Khan Khanan was given leave to go to his duty in the Deccan by Jahangir on 14th Shaban. Julus 3" (13 Nov. 1608)– Tuz –i– J. p. 153.....On the 6th Zilqada, Julus 4 (21 Jan. 1610). Before Parviz arrived at Burhanpur a petition came from Khan Khanan and the Amirs that the Dakhanis had assembled together and were making disturbances– Ibid, p. 161.

अंत:करणांतील अंतर्यामी एकपणाचा विचार आहे तसेच मी ईच्छितो कीं, बाह्यात्कारी संबंधहि निरंतर मजबूत असावा, म्हणजे यायोगेंकरून अंतर्यामी व बाह्यात्कारी भाव जाणणारे उभय मनुष्यांसहि पक्के कळेल. यांतील तात्पर्य हें आहे कीं, मी इमानी चाकर व मजवर आपला बहुत विश्वास आहे. याजकरितां सरकारचें खानजाद मंडळीपैकीं, म्हणजे लेकावळ्यापैकीं, एखाद्याची कन्या माझे पुत्राकरितां नेमण्यांत यावी, म्हणजे यायोगानें मजला शत्रूंचें पारपत्य करण्यास दुपट धैर्य येईल व दुष्टांचें पारपत्य करण्यास हली बळ आहे याहून दसपट अधिक बळ चढेल. अशी विनंती करविली. ईबराहीम आदिलशाहास निजामशाही दरबारचे नांव व निजामशाहाचा मुलुक सरंक्षण करणेचें मनांत होतें. यास्तव मलिक अंबर याचे तिसरे विनंतीचें कलमहि कबूल केलें, म्हणजे तिसरे विनंतीचे कलमांत माझे पुत्राचें लग्न व्हावयाचें आहे याजकरितां लेकावळ्यापैकीं एक मुलगी नेमस्त व्हावी असें होतें ते तिसरें कलम कबूल केलें. कंधाराचा किल्ला मलिक अंबर यास परत दिल्हा तेव्हां मलिक अंबर याणी त्या किल्यावर किरकोळ सामान व खजिना व लढाऊ सामान सरंजाम भरून निर्भय झाला. ईबराहीम आदिलशाहा याणी दहा हजार निवडक स्वारहि फौजेंतून निवडून मलिक अंबर याचे कुमकवर रवाना केले. त्या स्वारांस आज्ञा केली कीं, हमेशा तेथें राहून मदत करित जावी. मलिक अंबर याणी या लष्कराचे खंडणीचे ऐवजाबद्दल व मुल्काचे बंदोबस्ताकरितां तीन लाख होन निराळे काढून मख्ता ठरऊन दिल्हे. याकुतखानाची कन्या, कीं तो याकुतखान ईबराहीम आदिलशाहा याचे दौलतींतील श्रेष्ठ चाकर लोकांपैकीं संभावित होता व त्या याकुतखानानीं ईबराहीम आदिलशाहाचें बटकीपैकीं एक बटीक ठेविली होती तिजला एक उत्तम रूपवान कन्या झाली त्या कन्येस मलिक अंबर याणी लग्नाचा आजाद बांधिला होता ती कन्या, मलिक अंबर याचा वडील पुत्र आजीनुमुल्क यास नेमस्त केली. आदिलशाहा याणी तिसरे विनंतीचें कलम कबूल केलें. या योगें मलिक अंबर यास अत्यंत संतोष झाला. श्रेष्ठतेचा व योग्यतेचा कळस आकाशास लाविला. आजीनुल्मुल्क या आपले वडील पुत्राचें लग्नसमारंभाचे साहित्याची तयारी करिता झाला.

### ५४. दौलतीकडील खासे सेवक लोकांपैकीं एक सेवक याकुतखान म्हणोन होता त्याची कन्या ईबराहीम आदिलशाहा याणी मलिक अंबर याचा वडील पुत्र आजीनुलमुल्क यास देऊन त्याचा विवाह करणें प्रकर्णी वर्णन :

जेव्हां लग्न समारंभाचे साहित्याची सिध्धता झाली तेव्हां ईबराहीम आदिलशाहा याणी जरूर येऊन आजीनुल्मुल्क यास आणावयाकरितां, कीं तें जुन्नर हें शहर

निजामशाहाचे राजधानीच स्थान झालें होतें तेथून आणावयाकरितां, हजरत मौलाना हाबिबुल्लाह याजला रवाना केला. तेव्हां हजरत मौलाना यानीं जुन्नर येथें जाऊन आजीनुलमुल्क याजला जुन्नर येथून दारुससलातन बलातपूर उर्फ विजापूर येथें आणिलें. आजीनुलमुल्क याजला राहावयाकरितां जानवशास किष्वरखानाचा थोर वाडा नेमिला. लग्नसमारंभाच्या चाली व विवाहाच्या रीती सहस्रावधी संतोषानें व आनंदानें कित्येक दिवसांत शेवटास गेल्या, म्हणजे बहुत दिवस लग्नसमारंभ होऊन कार्यसिध्धी झाली. त्यानंतर वधुवर म्हणजे नवरानवरी श्रेष्ठ आंदणाचे बहुत सामानसरंजामांसहित जुन्नरास जाते झाले. कित्येक अमीरलोक नवरीचे स्वारीसमागमें पोहचविण्याकरितां नेमले. जेव्हां नवरानवरी सुरक्षीतपणें व सुखरूप संतोष व आनंदानें जुन्नरचे नजिक जाऊन पोहचले तेव्हां मलिक अंबर सामोरा येऊन बहुत सन्मानानें व अत्यंत योग्यतेनें नवरीची स्वारी व आदिलशाहाकडील अमीरलोकांस किल्यांत घेऊन येता झाला. बहुत समारंभानें कचेरी करून थाट केला. आदिलशाहाकडील अमीरलोकांशीं व आदिलशाहाच दौलतींकडील सेवकलोकाशीं फार फारच सख्यतेचें व रूणानुबंधाचें नात जोडिता झाला. हरएकाचे बिराडी निरनिराळे घरोघर जाऊन मित्रता व सख्यता प्रसिध्ध केली. आपली नेकचाल, ईमानीपणा व मित्रता ईबराहीम आदिलशाहाविसी होते ते हरएक अमीरलोकांपाशीं जाहिर केले. त्यानंतर भारीं किंमतीचे पोषाख व रोख ऐवज व बहुत जवाहीर हरएकाचे योग्यतेनुरूप सर्वांस बक्षिस देऊन परत जाणेविसीं निरोप देता झाला. याच समयांत खानखाना दिलीहून बुरहानपुरास पोहचून आदिलशाहाकडे पत्र लिहून जासूद पाठवून आम्ही बुरहानपुरास सुरक्षित पोहचलो म्हणोन खबर कळविली. मलिक अंबराशीं मित्रता व सख्यता ठेविली. मलिक अंबर याणीहि बाह्यात्कारी उणें न दिसों देतां खानखानाचे भेटीस गेला. बाह्यात्कारीं मित्रतेच्या चाली प्रसिध्धीस नेऊन, म्हणजे बाह्यात्कारीं मित्रता मिश्रित भाषणें करून परत येता झाला.

## ५५. जहानगीर पादशाहा याणी खानखानास दक्षण देशाचे कामावर पाठविल्यानंतर पुन्हां शाहाजादा परवीज याजला राजा मानसिंग वगैरे अमीरलोकांसहित दक्षण देशाचे कामावर पाठविणें प्रकर्ण :

खानखाना आल्यानंतर सात आठ महिन्यानीं सन सबा आशर व आलफ म्हणजे एक हजार सत्रा ( १६०८–१६०९ इ. स. ) सालीं जहानगीर पादशाहा याणीं आपला मधला पुत्र सुलतान परवीज याजला वीस हजार स्वारांचे जमातीसहित मानसिंगराव यासमागमें व खान जहान लुदी वगैरे युध्ध करणारे अमीरलोकांसहित

दक्षणचे बंदोबस्ताकरितां रवाना केलें. ३८ ते सर्व लोक फौजेसुध्धां बुरहानपुरास पोहचले. तेव्हां मलिक अंबर याजला हें वर्तमान कळतांच मलिक अंबर याणी आपली खाशी फौज व आदिलशाहाकडील कुमकेस आलेली फौज सरहद्दीवर पाठविली. त्या फौजेस ताकिद केली कीं, नाकेबंदी करून व येण्याजाण्याचा मार्ग बंद करून आपले मुलकांत शत्रूचा प्रवेश होऊं देऊं नये. शत्रुलोकांचे उपद्रवापासून व लुटीपासून आपला मुलुक बहुत संरक्षण करावा. अशी ताकिद करून फौज रवाना केली तेव्हां दिलीची फौज सरहद्दीनजिक येऊन पोहचली. फंदफितूर वगैरे दंगा करूं लागली तेव्हां दक्षणचे शूरहि ठरून राहण्याचा पाय कायम करून, म्हणजे धैर्य धरून, युध्ध करिते झाले. राजा मानसिंग हा सर्व हिंदुजातीचे राजे लोकांत शूरत्वामधें श्रेष्टतेंत बहुत योग्य व प्रसिध्ध होता. त्याणी लोकांचा अडथळा करणें व मनाई करणें लक्षांत आणोन, म्हणजे मान-सिंग राजास दक्षणी लोक युध्धास अडथळा व मनाई करित होते सबब मानसिंग राजानीं ते मनांत आणोन, अति अभिमान व गर्वानें मानसिंग बोलला होता कीं, दक्षणी लोक असेच चोरटे स्वभावाचे आहेत व, जंगे गुरिजी म्हणजे धावधाऊन जाऊन हल्ला करून माघारे पळून यावे व पुन्हा आणखी धाऊन जाऊन युध्ध करण्यास जंगे गुरीजी म्हणतात त्या जंगे गुरिजींत या दक्षणी लोकांनीं किर्ती मिळऊन प्रसिध्ध झाले आहेत. तात्पर्य हें कीं हे दक्षणी लोक युध्धांतून पळाययास शिकले आहेत. परंतु या लोकांनीं शूरत्वाचे शस्त्रच पाहिलें नाहीं, म्हणजे युधांतून माघारें न परततां अचलपणें युध्ध करणें पाहिलेंच नाहीं. हे लोक अशा युध्धास ठरणार नाहींत. यास्तव कीं या लोकांस रुस्तुमा-प्रमाणें युध्ध कसें असतें तें दाखवितो, म्हणजे या लोकांस युध्ध म्हणजे काय पदार्थ आहे तें कळेल, म्हणजे हे लोक पुन्हां युध्धाचें नांव घेणार नाहींत. या प्रकारचीं मानसिंग राजाचीं बडबडीचीं भाषणें आदिलशाहाकडील व निजामशाहाकडील अमीरलोकांनीं ऐकून विचारांत पडून हा सविस्तर मजकूर शत्रूकडील फौजेचा भारीपणा व मानसिंग राजाच्या गप्पा व बडबडी हें सर्व ईब्राहीम आदिलशाहास विनंती करून पुन्हां मदतविसीं व कुमकेविसीं विनंती करिते झाले. आदिलशाहा याणी फौज चहूंकडे रवाना केली होती. कांहीं फौज कर्नाटकांत बंडवाले याणी फंदफितूर करून दंगा आरंभिला होता त्याचे पारपत्यावर रवाना केली होती. कांहीं फौज उदोनीस रवाना केली होती. कांहीं फौज निजामशाही लोकांचे मदतगारीवर पाठविली होती. याप्रकारें थोडीशी फौज व खास पागेकडील जरीपटक्याकडील लोक व कांहींशी जमात आदिलशाहाचे चाकरीवर हजर होती. त्यापैकीं आदिलशाहानीं तीन चार हजार हत्यारबंद स्वार तरवार लावणारे बहुत जलद याचे मदतगारीवर रवाना केले.

३८. "On Tuesday, the 14th, Rajab ( 3 October 1609 ) despatched my son Parwiz on the service of conquering the country of the Deccan."— Tuz-i- J., p. 156.

अहमदनगर येथील मराठे लोक अहमदनगर येथें दंगा होऊन अहमदनगरचे खराबींचे समई पळून जाऊन परागंदा झाले होते. ते मराठे लोक या समई जमा होऊन सरासरी दहा हजार सुमारी स्वारहि लष्करांत मिळाले. कांहीं बरीच जमात जमली तेव्हां दिलीवाले फौजेसी युध्ध करण्याविसी ठरून रहाणेचा पाय कायम करून बहुत उत्तमपणें मोकदमा करित होते. अहमदनगर येथील मराठी लोकांचा चोरटेपणाचा स्वभावच आहे. यास्तव या मराठे लोकांनीं दिलीवाले फौजेस घेरून मागून व पुढून होऊन ठोकाठोकी व मारामारी व लुटालुटी करण्यास आरंभ केला. दिलीवाल्याचे फौजेचे सभोंवतें व पुढें दहा बारा कोशपर्यंत पिकाची शेतें जाळून दाणा वैरण नाहींशी करून बहुत अवकाशपर्येत त्या फौजेस तसेंच उभे केलें. मानसींग राजा व हिंदुजातीचे शूर लोकांनीं धैर्य धरून शूरत्वाची शर्त बजावित होते. दक्षणी शूरहि दिलीवाल्याचे फौजेपुढें मोकाबल्यावर उभे राहून पूर्ण शूरत्व करून दक्षणचे नांव श्रेष्टत्वास चढवित होते. तेव्हां उभयतांकडीलहि बहुत मनुष्यें ठार झालीं. मानसिंग राजाचा मेहुणा, म्हणजे बायकोचा भाऊ, व तिकडील कित्येक संभावित सरदार लोक युध्धांत पडले. शेवटीं मार्ग पाहून चालून येण्याचे श्रमास्तव व नित्य युध्ध करण्यानीं व दक्षणचे शिपाई लोकांनीं लुटालुट केली या योगें हिंदुस्थानचे लोकांवर बहुत कठीण प्रसंग आला. त्यांचे लष्करांत दुष्काळ पडला. यास्तव सामर्थ्यहीन होऊन बहुत मनुष्यें, घोडे व उंटहि मेले. बहुत मनुष्यें मेलीं. त्यांचे प्रेतानें व जनावरांचें प्रेतांनें सर्व अरण्याची हवा व अरण्य फार खराब झालें. दक्षणी शिपाई लोक व मराठे ताजे तवाने राहून युध्धास तयार झाले. दक्षणी लोकांचा स्वभाव चोरासारिखा मोठे कजाक होते. यास्तव या संकटापासून सुरक्षीत राहून युध्धास तयार झाले. येणेंकरून शाहाजादा परवीज भयाभीत होऊन आपले लष्करांतील कारभारी मंडळ व अमीर-लोकांसी मसलत करून सर्वांचा विचार घेता झाला. तेव्हां सर्वांचे विचारें असें ठरलें कीं, ही जागा सोडून आपले सरहदींत जावें, म्हणजे तेथें हरएक जिनसांची स्वस्थता असेल. तेथें दाणा वगैरे मिळेल. सर्वांस सुख होईल. जेव्हां सर्वांचा या प्रकारचा ईरादा खानखानास कळला व खानखाना बुरहानपूरांत रहात होता, त्या खानखानानीं शाहाजाद्यास लिहिलें कीं, कदापि पुढें जाण्याचा संकल्प करूं नये. कारण कीं, या ऊष्ण काळाचे ऋतुमध्यें या मुलकांत सर्व ठिकाणीं महागाई होईल. कोठेंच स्वस्थता होणार नाहीं. या समई या गोष्टींत बरें आहे कीं, आपण बुरहानपुरांत निघोन यावें. कारण कीं, येथें हरएक जिनसांची स्वस्थता आहे. कांहीं दिवस गुजरल्या-नंतर व फौजेस सुख प्राप्त झाल्यानंतर त्यासमई पाहिजे तसें करितां येईल.

५६. सुलतान परवीज व राजा मानसींग याणी खानखानाची मसलत ऐकून त्याप्रमाणें वागणुक न करून पुढें चालुन येणें, मोड होणें, पुन्हां खानखानाचे विचारानें प्राणघातक संकटापासून सुटणें व अहमदनगरचा किल्ला पुन्हां निजामशाही लोकांचे हातीं येणें :

दिल्लीचे अमीरलोकांनी खानखानाची ही मसलत कबुल केली नाहीं आणि खानखानाची मसलत गरजवंत जाणोन दक्षणी लोकांवर चालून आले. बोलले कीं, हे सर्व संकटांत प्राणघातक विघ्नांनीं आम्ही जे सापडलों हें खानखानाची मुर्खपणाची मसलत ऐकण्यानेंच झालें आहे. असें बोलून अहमदनगरावर चालून जाण्याचा इरादा करून पुढें चालून गेले. दक्षणची फौजहि हिंदुस्थानी फौजेस अटकाव व अडथळा करित करित त्यांचे पाठीं लागली. मराठे लोक याणी आपले चालीनें हिंदुस्थानी फौजेचे मागें व पुढें व डावे व उजवे बाजूंस घेरा देऊन ठोकाठोकी व लुटालुट करित होते. असेच मारीत ठोकीत आदिलाबादेपर्यंत हिंदुस्थानी फौज पोहचवून पाठलाग केला. शेवटीं एके ठिकाणीं हिंदुस्थानी फौजेचा मुकाम पडला. ती जागा बहुत खडकाची जमीन व पाषाणाची भूमि व डोंगर रान होतें. यास्तव लष्कर उतरण्याजोगी विस्तीर्ण जागा नव्हती. रस्तेही रूंद नव्हते. दक्षणी लोकांनी हिंदुस्थानी लोकांस अशा अवघड ठिकाणीं धरून व मध्यभागीं घेरून पुढें चालून गेले. हल्ला करण्यांत अति त्वरा करून हिंदुस्थानी फौजेस जेरीस आणिलें. बहुत मोंगल लोक त्या काराग्रहांत, म्हणजे त्या बंदीचे जाग्यांत, कत्तल झाले, म्हणजे ठार झाले. हिंदुस्थानी फौजेंत मोठा हाहाकार झाला. शाहाजादा परवीज व मोंगल जातीचे अमीरलोक याणी त्या संकटाचे जागीं प्राणावर संकट आले, जीव वाचणें कठीण असें पाहून खानखानाकडे निघोन गेले. खानखानास शोकाचें पत्र लिहून पाठविलें कीं, आपले सल्लेप्रमाणें अमल न करण्यानीं व तुमचे सांगण्याप्रमाणें न ऐकण्यानीं आम्हांस असा दिवस प्राप्त झाला आहे कीं, संपूर्ण लष्कर मरणाचें संकटांत पडलें आहे. कांहीं एक बाकी राहिली नाहीं. जें आम्ही केलें ते चुकलों. आतां तुमचे पाठबळाशिवाय व तुमचे मसलतीवांचून या संकटांतून लष्कराची सुटका व्हावयाचें सामर्थ्य नाहीं. तुम्ही कसें घडेल तसें करून, म्हणजे कसेंहि करून आम्हांस या संकटांतून सोडवावें, म्हणजे आम्ही बुरहानपुरास येऊन पोहचतों. अशा मजकुराचें पत्र पाठविलें. त्यावरून खानखाना याणी बहुत जलदीनें मित्रतेचें मजकुरानीं रसभरीत पत्रें लिहून दक्षणी हरएक लोकांस निरनिराळीं पाठविलीं कीं, या लष्करांत शाहा सलीम पादशाहाचा पुत्र आहे व तो शाहा सलीम चार खुंट हिंदुस्थानचा पादशाहा आहे. न जाणोन त्याजला धक्का लागेल. त्याजला ज्या लोकांनीं युध्द कसें असतें तो अनुभव पाहिलाच नाहीं अशा गैरअनुभवीक अमीरलोक वगैरे मंडळींनीं व हलके उत्पत्तीचे लोकांनीं

वाट दाखऊन, म्हणजे मसलत शिकऊन, तेथें आणोन मरणाचें संकटांत घातलें आहे. या प्रकारचा उपद्रव व पीडा हिंदुस्थानचे लोकांस झाली आहे. याजकरितां दक्षणी लोकांनीं यत्न करण्याचें कारण नाहीं. यांत दक्षणी लोकांची अबरू राहील. याजकरितां ही श्नेहवाचक पत्रें येऊन पोहचतांच शाहाजाद्यास व त्याचे लष्करास वाट बंद केली आहे ती वाट मोकळी करावी आणि येणेंकरून या मित्रावर, म्हणजे मजवर, पूर्ण उपकार करावा. असें केलें असतां या तुमचे उपकार करण्याची कीर्ति बहुत दिवस राहील. अशीं पत्रें पाठविलीं. त्यावरून आदिलशाहाचे व निजामशाहाचे श्रेष्ट अमीर-लोक आपआपणांत बोललें कीं, या समई असा शत्रू या प्रकारें जेरीस येऊन हातीं येऊन लागला आहे कीं, आम्हांस याजला जीवें मारवत नाहीं. तो शत्रूहि पाच सहा दिवसांत मरण पावेल व कदापी सुटका होणार नाहीं. तेव्हां व्यर्थ हातून सोडणें व त्याजला पळून जावयाकरितां मार्ग मोकळा करणें हे अकलवान लोकापासीं आपणांस मुर्ख व नादान म्हणऊन घेणें व पुढें पश्चाताप पावणें आहे. यास्तव या गोष्टींत निखालस अकल चालत नाहीं. परंतु खानखानाचे मनोधा ण ठेवणें या अमीरलोकांस फार प्रिय होतें. खानखाना याणी वारंवार या प्रकर्णीं बहुत काकुलती येऊन व अति अगत्यानीं लिहिलें होतें. यास्तव निरोपाय होऊन आपले उपयोगाचे कलम सोडून शाहाजादा परवीज यास व त्याचे फौजेस निघोन जाण्यास मार्ग मोकळा केला. तेव्हां पिंजऱ्यांतून पक्षी सोडिला म्हणजे जसा अति त्वरेनें निघोन जातो त्याप्रमाणें शाहाजादा याणी आपले फौजेसुध्धां किंचितहि अवकाश न करितां बुरहानपुरास जाणेचा मार्ग धरिला. तेव्हां दक्षणचे फौजेनेंहि पाठलाग करून लुटालुट करणें न सोडितां जलद दरमजल हिंदुस्थानी फौजेचे मागें व पुढें वेढा दिल्हा. धरा धरा व मारा मारा असें म्हणोन गर्दी करीत होते व डावे व उजवे बाजूस होऊन लुटालुट करित करित बुरहानपूरचे सरहदीपर्यंत पोहचवीलें. शाहाजाद्याची फौज जेव्हां बुरहानपुरास पोहचली तेव्हां हरएक जिनसांची स्वस्थता अवलोकन केली. संकटापासून सुटलों असें दृष्टीस आलें आणि मनुष्यें व जनावरांस विसावा झाला. असें वाटते कीं, डोळ्यांतून जीव गेलेला पुन्हां आला व सर्वांनीं या मिश्रांतील अर्ध म्हणजे बैतेंतील भाव बोलते झाले. अर्धें बैतेचा अर्थ : "संकट आलें होतें परंतु खैर झाली." असें सर्व बोलते झाले. जीव-दान करणारा व पृथ्वी निर्माण करणारा जो ईश्वर त्या ईश्वराचा स्तव करिते झाले [३९]. हजरत मौलाना हाबीबुल्लाह हे लिहीत आहेत कीं, ईबराहीम आदिलशाहा याणी त्या समई मजला वकीलीचें काम देऊन सख्य करणेंकरितां शाहाजादा परवीज व खान-खानाकडे पाठविलें होतें. हजरत शाहा सबगदुल्लाह याणी जें कांहीं मजला सांगितलें

३९. हे पराभवाचें वर्तमान मिळाल्यानंतर जहांगीरनें खानखानावर अपेशाचा ठपका ठेवून ११ दय जुलुस ५ (२२ डिसेंबर १६१० रोजीं खान अझमची खानखानाचे जाग्यावर नेमणूक केली.— तुझ–इ–ज., पृ. १८३.

होतें कीं, जर करितां हिंदुस्थानचे मनुष्यांनी तुम्हास पाहिल्यास आपले डोळ्यांत देखील जागा देणार नाहींत असें सांगितलें होतें. ते सर्व दिसोन आलें. कारण कीं, शाहाजादा व खानखाना व राजा मानसिंग व दुसरे कारभारी मंडळीकडून बहुत थोरपणा व श्रेष्ठता पाहिली. मजला हरएक मनुष्यें बोलत होतीं कीं, हा सर्व तुमचा थोरपणा आहे. दुसरे कांहींच कारण नाहीं. आणखी लिहिलें आहे कीं, तेथें मजला एक स्वप्न पडलें कीं, एक काशाचें शरीर मनुष्याचे आकृतीचें व त्याचें नांव मसलहत आदिलखान असें होतें. तें शरीर माझे हवालीं केलें. मी त्याजला एके ठिकाणीं बसऊन मी त्या शरीरास मागे पुढें बहुत यत्नानें पहात आहे व मोंगलाचे सर्व लष्कर त्या शरिराचे रूप पहाण्याकरितां जमलें आहे. ते मोंगल लोक बोलत आहेत कीं, शाहा मसलहत आदिलखानास हात नाहींत, याचे हातून काय काम होईल. मजला हें बोलणें फार वाईट वाटलें. नंतर त्या पुतळ्यास हात करून लावावयास्तव मी मेण आणावयास गेलों तों एकाएकीं दुरून एक दुकान दृष्टीस पडलें. त्या दुकानांत एक वृध्द पुरुष बसला आहे असें पाहिलें. त्याजला मी मेण मागितलें. मी त्याजला विचारिलें कीं, हें दुकान कोणाचें आहे ? तो बोलला कीं, हे दुकान हजरत शाहा सबगदुल्लाह याचें आहे. जेव्हां त्या वृध्द पुरुषापासून मेण घेऊन त्या मेणाचे हात करून त्या शरीरास मी लाविलें. तेव्हां चिकटवितांच ते शरीर सजीव होऊन हालचाल करूं लागले. त्या मसलहत आदिलसानाचे लष्करानें मारामारी करून असे घाबरे केले कीं, बहुत मोंगल लोक ठार झाले. मी हें स्वप्न मिरजा पुष्करुल्लाह फाजलखान, मोंगलाचा सरलष्कर विद्वान व माझा मित्र होता, त्याजला सांगितलें. तो बोलला कीं, हजरत सलामत ईराचे शपथ स्वप्न पडलें आहे तसेंच होईल. त्यावरून मी बोललों कीं, हें स्वप्न आहे. स्वप्न कोठें खरें होत असतें काय ? पुन्हां तो वारंवार बोलला कीं, स्वप्न पडलें आहे तसेंच होईल. तुमचें स्वप्न कदापि असत्य होणार नाहीं. शेवटीं कित्येक दिवसानंतर मी पाहिलें तो भारी फौज सरासरी लाख स्वार अफजलखानाचे समागमें होती. तें लष्कर दुष्काळ पडला या कारणास्तव रक्त आवेची हागवण लागली यास्तव ठार होऊन तीस हजार स्वार बाकी राहिले. त्याणी कांहीं न देतां घेतां आपसांत सख्य करून रवाना झाले. परंतु दिलीचे सर्व अमीर-लोकांचा निश्चय होता कीं, हलींचे स्वारींत शाहाजाद्यास व त्याचे लष्करास हें स्वप्न हें संकट व हा मोड होणें व खराबी होणें असें जें झालें तेंहि सर्व खानखानाचे फंदफितुरीनेंच झालें. खानखानाचे बोभाटाचे व गिल्याचे मजकुराचे रूमालच्या रुमाल लिहून दिलीस पाठविले. पुन्हां जहानगीर पादशाहाचे अंतःकर्णास त्याजवर क्रोधायमान व रुष्ट केलें.[३९] जेव्हां आदिलशाहाचे व निजामशाहाचे लष्कर बुरहानपूरचे सरहद्दींतून माघारे परतले तेव्हां अहमदनगर येथील मराठे लोक माघारे परतले. ते वेळेस मार्गानें चालता चालता अहमदनगर किल्यानजिक येऊन पोहचून त्या किल्या-

वर हल्ला करिते झाले. त्या समईं त्या प्रकर्णीं असा समय आणिला कीं, किल्यांतील सर्व मनुष्यें जेर होऊन काकुलती येऊं लागलीं. तेथील किल्लेदार याणी शाहाजाद्याचें साह्य करण्याकरितां व मदतगारीस्तव कांहीं काम करून हिंमत धरून हा वेळपर्यंत अहमदनगरचे किल्याचा बहुत यत्नानें बंदोबस्त करित होते. हाली तर शाहाजाद्याचा मोड झाला. यास्तव निराशा होऊन धैर्य सोडलें आणि बुरहानपुराचा रस्ता धरिला. पुन्हां अहमदनगरचा किल्ला दक्षणी लोकांचे हातीं आला.[४०]

### ५७. निजामशाहा व मलिक अंबर या उभयतांत वाकडे येणें व आदिलशाहाचे सल्लेनें म्हणजे विचारानें उभयतांचा सल्ला होणें :

सन एक हजार व एकोणीस (१६१०–१६११ इ. स.) सालीं मुर्तजा निजामशाहा जुनर येथून दौलताबाद येथें येऊन राहिला. तीच जागा राजधानीची केली. कर्मधर्मसंयोगें त्याच दिवसांत कित्येक लोकांचा संकटामुळें निजामशाहा व मलिक अंबर या उभयतांत वाकडेपणा व वैरभाग उत्पन्न झाला. दिवसेंदिवस फंदफितुर वगैरे संकटाचा अग्न भडकत होता. ईब्राहीम आदिलशाहा शेजाऱ्यासारिखा संकटकाळीं उपयोगी पडोन संकट परिहार करणारा होता. निरंतर व हमेशा निजामशाही राजधानीचे संरक्षण करणें ईब्राहीम आदिलशाहास मंजूर होतें. ज्या वेळेस निजामशाहाचे दौलतींत संकट उभें रहात होतें तें समईं आदिलशाहा आपले विचारानें संकट निवारण करित होते. ज्यासमईं निजामशाहा दौलतींतील अमीरलोकांत वाकडेपणा व वैरभावाचा अग्नि पेटत होता तेव्हां पर्ज्यन्य पडण्याचें नक्षत्राप्रमाणें आदिलशाहा आपले विचारानें उदक करून तो वाकडेपणाचा अग्नि शांत करित होता, म्हणजे विझवित होता. असेंच पूर्वी सन एक हजार सोळा (१६०७–१६०८ इ. स.) सालीं जेव्हां मुर्तजा निजामशाहा जुन्नर येथें होता तेव्हांहि मोठाच वाकडेपणा उत्पन्न झाला होता. याप्रकारें कीं, मलिक अंबर ईच्छित होता कीं, मुर्तजा निजामशाहास एकीकडे गुप्त स्थानीं बसऊन, म्हणजे राजपदावरून काढून, जुनर येथील तख्तावर दुसरा कोणीतरी बसवावा, असे मनांत होतें. त्यासमईं ईब्राहीम आदिलशाहा याणी असा यत्न केला कीं, उभयतामधें वाकडेपणा आला होता तो दूर होऊन अंतःकर्णापासून अशी साफी झाली कीं, हरएकास संपूर्ण विश्वास व भरंवसा पुन्हां प्राप्त झाला. हाली जेव्हां आदिलशाहास वर्तमान कळलें कीं, साफी झाली होती ती शत्रुत्वानें व मित्रता होती ती वैरभावानें बदल झाली, म्हणजे साफी झाली असतां पुन्हां वाकडे आलें, असें वर्तमान कळलें तेव्हां मुर्तजा निजामशाहास व मलिक अंबर या

४०. Tuz-i-J., p. 178-182.

उभयतांसहि बोध वाचला. बहुत गोडपणानें व या प्रमाणें वागला असतां उभयतांसहि उपयोग आहे, अशा प्रकारची बहुत पसंद पत्रें लिहून पाठविलीं. त्यांतील तात्पर्य हें आहे की, संधी साधण्याकरितां जो शत्रू टपून बसणारा आहे तो जेव्हां आपले बगलेंतच आहे, म्हणजे संनिध राहूनच मार्ग प्रतीक्षा करित बसला असल्यास, एकमेकांत वाकडेपण वागऊन काय फळ आहे ? तुम्ही उभयताहि अन्नाचे एकाच ताटावर बसलां आहांत. यास्तव वाकडेपणा व कपट दूर करून भोजन केलें पाहिजे. तुम्हां उभयतांत जरकरितां वाकडे येईल व कज्या मांडणें होऊं लागतील तर दुसराच कोणी तरी येऊन उभयतांमधील अन्नाचे ताट घेऊन जाईल. तेव्हां पश्चाताप पावण्याखेरिज दुसरें कांहींच प्राप्त होणार नाहीं. तुमचा मुलुक दुसऱ्याचे हातीं जाईल. तेव्हां कालचक्राचे दप्तरांतून निजामशाही नांव निखालस धुतलें जाईल, म्हणजे निजामशाही नांव नाहींसें होईल. येविषयीच अपकीर्तीचे दुषण तुम्हा दोघां-वर पादशाहावर व वजिरांवर बहुत दिवस राहील. हें कांहीं अकलवानाचें काम नोहे. कारण कीं, त्रास उत्पन्न होण्याचे योगानें लहान थोर सर्व कामांत बखेडा करणेंचें फळ वाईटपणा व पश्चातापाखेरीज व सर्वांनीं दूषण ठेवणें व थुः थुः म्हणण्या-शिवाय दुसरें कांहींच नाहीं. या लिहिण्यांतील तात्पर्य हें आहे कीं, हरएक प्रकारें मुर्तजा निजामशाहा व मलिक अंबर या उभयतांनीं मित्रता व लिनता धारण करावी व दोस्तीनें असावें. कंटाळा व वाकडेपणा आपसांतून काढून टाकावा. सरकारी कारभाराचा भरंसा मित्रतेवर व एकदिलावर ठेवावा. असें लिहून पाठविल्यावरून आदिलशाहाचे धाकानें व दूषण ठेवण्यानें व मित्राप्रमाणें नीति व बोध शिकविण्यानें वाकडेपणाचा पडदा निजामशाहा व मलिक अंबर या उभयतांतून दूर झाला व उभयताचें सख्य झालें.

### ५८. जहानगीर पादशाहा याणी विचार करून श्रेष्ठ परवीजखान याजला दक्षण देशावर पाठवणें, कांहीं दिवसानंतर गुजराथ येथील नेमणुकी-वरील अबदुलाखान याजला बहुत लष्कर समागमें देऊन पाठवणें व मलिक अंबर याचे योगानें अबदुल्लाखान याचा मोड होणें :

शाहाजादा सुलतान परवीज याचा मोड झाल्यानंतर जहानगीर पादशाहा याणी विचार करून परवीज खान अजम यास बहुत जमातीनिसी दक्षिण देशावर नेमिला आणि रवाना केला.[३९] सन एक हजार वीस (१६११–२ इ. स.) सालीं अबदुल्लाखान गुजराथीवर नेमला होता. त्याजला आज्ञापत्रें रवाना केलीं कीं, तुम्ही भारी जमातीनिसीं व बहुत लढाऊ सामानसरंजामानिसीं निजामशाहाचे मुलकावर

जाऊन तो मुलुक हस्तगत करण्यांत पूर्ण यत्न करावा. असे हुकूम रवाना केले. त्यावरून अब्दुल्लाखान याणी सरकारी हुकूमाप्रमाणें दौलताबादचे किल्यावर येऊन त्या किल्यास घेऊन किल्यावर हल्ला केला. ते समई मलिक अंबर याणी मुर्तजा निजामशाहा याजला किल्यांत सोडून आपण फौजेसुध्धां बाहेर राहून खडकी म्हणोन एक गांव आहे व त्या गावांत जमीन बहुत खडकाचीच आहे व दौलताबादहून पांच कोशाचे अंतऱ्यावर तो गाव आहे तो गाव लष्करासहित उतरण्यास जागा केली. तेथे मलिक अंबर राहिला. अबदुल्लाखान व मलिक अंबर या उभयतांमध्यें बहुत मोठ्या मोठ्या लढाया झाल्या. शेवटीं मलिक अंबर याचा मोंगलाचे फौजेवर चढ झाला. जबरदस्त झाला. मोठी फत्ते झाली. बहुत विजय झाला, अबदुल्लाखान याची मोठी शिकस्त होऊन तो गुजराथेस जाता झाला.[४१] मलिक अंबर याची खडकी मुकामी फत्ते झाली व जय झाला होता. यास्तव तेच गांव शकुनप्रद व कल्याणप्रद जाणोन त्या खडकीस फत्तेनगर असें नांव ठेविलें. खडक हा शब्द दक्षण देशांत पाषाणाचे भूमीस म्हणतात. तो गांव सर्व खडकाचे जमिनीचाच होता यास्तव तो गांव खडकी या नामेंकरूनच प्रसिध्ध होता. त्याच गांवास सुलतान औरंगजेब आलमगीर याणीं मोठें शहर करून त्या शहराचे नांव खुजस्तबुनयाद औरंगाबाद असें नांव ठेविलें.

## ५९. कांहीं दिवस गुजरल्यानंतर जहानगीर पादशाहा यानी सुलतान खुर्रम याजला दक्षण देशावर रवाना करणें व सुलतान खुर्रम याणी निजामशाहाचा मुलुख घेऊन फत्ते करणें प्रकर्णी वर्णन :

शाहाजादा परवीज हा मानसिंग राजासहित बहुत दिवस दक्षणेंत राहून या उभयतांनीं दक्षण देश हस्तगत करण्याविषयीं बहुत यत्न करून दक्षणचा बंदोबस्त केला नाहीं. निजामशाहाचा मुलुक हस्तगत केला नाहीं. यास्तव जहानगीर पादशाहा याणी परवीजखान याजला हुजूर बोलाऊन आणोन सन १०२४ (१६१५ इ. स.) सालीं शाहाजादा लहान पुत्र सुलतान खुर्रम, कीं तो पुढें शाहाजहान या नामेंकरून प्रसिध्ध होत आहे, त्याजला पूर्ण तयारीनें बहुत सामान सरंजाम देऊन निजामशाहाचा मुलुक हस्तगत करण्याकरितां बहुत फौज देऊन रवाना केला.[४२] मलिक अंबर याणीही

४१. Tuz-i-J., p. 219–221.

४२. "On Sunday, the 18th Shawwal Julus 11 ( 20 October 1616 ) corresponding to the 8th Aban, the camp equipage of my son Baba Khurram left Ajmer for the purpose of the conquest of the province of the Deccan, and it was decided that my son aforesaid should start by way of advanced guard, followed by the glorious standards ( of Jahangir )."—Tuz-i-J., p. 337.

त्या पादशाहाजाद्यासमागमें दक्षण देशावर जाऊन युध्द केलें. शत्रू पराभव करण्याची शर्त बजाविली. परंतु शेवटीं प्रसंगास्तव मसलतीकरितां निजामशाहाचा संपूर्ण मुलुख दौलताबादेचे किल्याशिवाय मोंगलाचे सख्य करण्यांत दिल्हा. एक दौलताबादेचें शहर मात्र मलिक अंबर याचे हातीं राहिलें. तेव्हां कधींहि व्हावयाची नाहीं अशी मोठी फत्ते झाली.[४३] यायोगें शाहाजादा खुर्रम बहुत संतोष पावोन अति आनंदानें व संतोषयुक्त हुजूर निघोन गेला. तेव्हां जहानगीर पादशाहा याणी अति संतोष पावोन शाहाजादा खुर्रम याजला बहुत कृपेनें व अत्यंत मेहरबानगीनें श्रेष्ठ केला व बहुत योग्यतेस चढविला. ही दक्षणची फत्ते केली या बदल शाहाजादा खुर्रम याजला जहानगीर पादशाहा याणी शहाजहान असें पद दिल्हें. पहिलें पद होतें त्याहून पदाधिकार अधिक वाढविला. खुरासानचा पादशाहा आबास याणी एक हिरा जहानगीर पादशाहास पाठविला होता व त्या हिऱ्याची किंमत एक लाख रुपयापर्यंत झाली तो हिराहि सुलतान खुर्रम यास बक्षिस दिल्हा.

## ६० आदिलशाहा याणी बेदरावर लष्कर पाठवणें, बेदर हस्तगत करणें, मुलुक मोंगलाचें हातून सोडवणें व कर्नाटकचा किल्ला आदिलशाहाचे हातीं येणें प्रकर्ण :

सन १०२९ ( १६१९–१६२० इ. स. ) सालीं ईब्राहीम आदिलशाहा याणी अमीरलोकांस बहुत फौज समागमें देऊन अमीर बरीद याचे पारपत्य करण्याकरितां बेदरावर रवाना केलें.[४४] अमीर बरीद हा बरीदी कारकीर्दीचा शेवट आहे. तो अमीर बरीद युध्दार्थी मोकाबल्यावर उभा राहिला. शत्रूचें पारपत्य करण्याकरितां अत्यंत यत्न करून जितके सामर्थ्य आहे तितके श्रम केले. परंतु आरबींत वाक्य आहे त्याप्रमाणें जें होणें तें होतें. त्या आरबी वाक्याचा अर्थ : " ईश्वर इच्छिल त्यास मुलुख देतो

४३. " On the 29th, Tir, Julus 12 (10 July 1617), which was the auspicious day of Thursday, Sayyid Abdullah Barha, the envoy of my son of good fortune, Baba Khurram, waited on me, and presented a letter from that son containing news of a victory over the provinces of the Deccan . . . especially the fort of Ahmednagar." Tuz-i-J., p. 380.

४४. " 17th July 1618, Thursday 4th Amardad Julus 13: As Adil Khan was constantly asking for a likeness of myself through my prosperous son Shah Jahan, I sent him one with a ruby of great value and a special elephant. A gracious farman was issued that he should be presented with whatever territory of Nizamul Mulk

व ईश्वराचेंच इच्छेस येईल त्याचा मुलुक हरण करितो. " या वाक्याप्रमाणें जेव्हां बरीदी लोकांचे राज्य फडशा होण्याविसीं ईश्वराचेंच मनोगत ठरलें होतें व बरीदी लोकांचे दुर्दैव चालू झालें होतें यास्तव अमीर बरीद सर्व पुत्रांसहित आदिलशाही लोकांचे हातीं सांपडून कैद झाला. ते आदिलशाही लोकांनी अमीर बरीद याजला त्याचे पुत्रांसहित विजापुरास कैद करून आणला. त्या तारिखेपासून बेदरचा किल्ला आदिलशाहाचे मुलुकाचे ताब्यांत आला. याच सालीं मलिक अंबर याणीं बहुत सामर्थ्यवान होऊन युध्याचे सरंजामाची बहुत तयारी केली होती. त्याणी निजामशाहाचा सर्व मुलुख मोगलाचे सख्य करण्यांत दिल्हा होता तो युध्द करून आपले हातीं आणिला. [४५] तेव्हां हें वर्तमान जहानगीर पाहशाहास कळलें तेव्हां जहानगीर पादशाहा अत्यंत क्रोधायमान होऊन शहाजहान यास पुन्हां दक्षणेवर रवाना केला.[४६]

or Qutbul Mulk he might get into his possession, and whenever he should require any support and assistance, Shah Nawaz Khan should prepare an army and appoint it to assert him. In former days Nizamul Mulk was the laıgest of the rulers of the Deccan, a superior whom all acknowledged, and whom they considered as their eldest brother. **At this period Adil Khan did approved service, and was honoured with the exalted title of "son"** (फर्जंद). I appointed him the head and leader of the whole country of the Deccan, and wrote this quatrain on the portrait with my own hand........"— Tuz-i-J, II, p. 36-37.

This support of Jahongir has encouraged Adilshah to carry on incursions.

४५. Thursday the 25th Urdibihisht Julus 15 ( 20 April 1620 ) : At this time, on the representation of the Commander-in-Chief Khan-Khanan and all the loyal people, it was shown to me that Ambar, the black fated one, had again placed his foot beyond the bounds of good behaviour...... had stretched out his hand to take possession of royal territory.... Two or three battles had already taken place ... many killed....". Tuz-i-J., II, p. 155-56. Besieged Burhanpur........many parganas of Berar and Khandesh passed into their possession......"-Tuz-i-J., II, p. 189-90.

४६. Accordingly, on Friday, the 4th of Dai, ( 15th December 1620 ), I despatched Khurram in that direction, bestowing on him ......I told him after he had conquered the province of the Deccan he should take as a reward two crores of dams from the country conquered......".--Tuz-i-J., II, p. 190.

सुलतान खुसरवी म्हणोन जहानगीर पादशाहाचा वडील पुत्र तीर्थरूपाचे ईतराजी-स्तव क्रोधामुळे बहुत दिवस नजर पाहाऱ्याचे कैदेंत होता. तो या समई कैदेंतून मोकळा होऊन शहाजहानचे समागमें दक्षण देशावर आला होता. तो ईश्वर आज्ञेनें सन १०३० (१६२०-१६२१ इ. स.) हिजरी सालीं बुऱ्हाणपुरांत मरण पावला.[४७] सन १०३१ एक हजार एकतीस (१६२१–१६२२ इ. स.) सालीं आदिलशाहाची फौज बंड लोकांचे पारपत्यावर व माजुरी व गर्वीष्ट लोकांस शिक्षा करण्याकरितां उदोनीचे हदीवर रवाना झाली होतीं. त्याणी कर्नोलचा किल्ला सर केला व ती तारीख ईब्राहीम बहुत पीमन इतकीं अक्षरें अबजदचे हिशेबानीं गणिलीं असतां एक हजार एकतीस (१६२१–१६२२ इ. स.) सन निघतो. या सालीं फत्ते झाली

## ६१. आदिलशाहासी मलिक अंबर याणी वैरभाव धारण करणेस व वाकडे-पणानें वागणेस प्रारंभ करणें प्रकर्ण व भातोडी येथील युध्ध प्रकर्णी विस्तार व आदिलशाहाची व मोगलाची शिकस्त होणें प्रकर्णी वर्णन :

या पृथ्वींतील जीं संकटें उत्पन्न होतील ती जाणणारावर व या पृथ्वींतील नवीं विघ्नें उत्पन्न होतात तीं समजणारावर गुप्त राहाणार नाहीं. या पृथ्वींतील चौकाचे घाबरणाराचें वर्तमान जुळवणार व या अशाश्वत व बेमानपणाचे पृथ्वींतील कार-खान्याचे जुळवणाराची स्थिती एकसारखीच रहात नाहीं. या ठकविद्येचे व मकराचे बाजारांतील अमल करण्याची प्रतिज्ञा व शर्ती सख्यत्वानें व मित्रतेनें निभावणी करण्याचे मार्गावर शाश्वती नाहीं. मलिक अंबर हापसी याचे प्रकर्णांपैकीं एक हें प्रकर्ण खरेपणाचे साक्षीनें आहे कीं, मलिक अंबर हा निजामशाहाचे दौलतीकडील एक चाकर होता. त्याणी त्या राजधानींतील फंदफितुराचे सालीं सावकाशपणें व मोठे हिकमतीनीं बुऱ्हाणशाहाचे कारकीर्दीत या राजधानींतील मुख्त्यारीचा लगाम आपले हातीं आणिला. थोडकेच दिवसांत प्रबळ झाला. येथपर्यंत माजला कीं, संपुर्ण कामगार लोकांस मकरानें व हजारो ठकविद्येनें जेरदस्त व निरोपाय करून आपणच प्रबळ व सर्वोपरी मुख्त्यार झाला होता. ज्या समई त्याचे प्रबळतेचें सामर्थ्य कमी झालें व त्याचे दौलत व ऐश्वर्य प्रबळतेस पावलें नाहीं त्या दिवसाचे आरंभी सर्वत्र त्याजवर फिरले. तेव्हां मलिक अंबर याणी आदिलशाहाकडे फिर्याद करून आदिलशाहाकडे मदत मागित होता. मलिक अंबर हा आदिलशाहाशीं ईतकी मित्रता व सख्यपणा व नेक चाल ठेवित होता कीं,

४७. "At this time a report came from Khurram that Khusrau on the 8th of the month Bahaman (17 January 1622) had died....". Tus-i-J., p. 228.

जसा आपला धणी निजामशाहा तसेच आदिलशाहास जाणित होता. हरएक संकट किंवा विघ्न मलिक अंबर याजवर येत होतें ते वेळेस मलिक अंबर हा तें संकट परिहारार्थ आदिलशाहापाशीं फिर्याद करून मदत इच्छित होता. मोठे मोठे शत्रूंचे पारपत्य आदिलशाहाकडील श्रेष्ठ लोकांकडून करवित होता. हरएक आफतीचे व संकटाचे काळीं आपल्यास आश्रयाची जागा आदिलशाहाची देवढी आहे असें जाणित होता. आदिलशाहाहि निजामशाहाचे राज्य संरक्षणावर नजर ठेऊन, कारण कीं निजामशाहाचे दौलतीचें संरक्षण करणें आदिलशाहास प्राप्त होते, मलिक अंबर याचा सांभाळ करणेंविषयीं व त्यास बळ देणेंविषयीं आदिलशाहा मनापासून झटत होता. हरएक प्रकर्णांत व हरएक नवीन उत्पन्न झालेले संकटांत मदत करण्याविषयीं व आधार देण्यास तीळमात्र अनमान करित नव्हता. जसें कीं यापैकीं थोडेसें पूर्वीं वर्णन केलेंच आहे. त्यानंतर थोडकेच दिवसांत जेव्हां हे नीच मनुष्यास व हलके मनुष्यास योग्यतेस चढविणारे कालचक्र त्याचे, म्हणजे मलिक अंबर याचे, मदतगारीविषयीं उभें राहिलें व त्याचे दैवाचा उत्तमपणा व त्याचे नशिबाचा आधार दिवसेंदिवस वृध्दिगत व लागोपाठ झाला तेव्हां मलिक अंबर यास पूर्ण सामर्थ्य प्राप्त झालें. फारच प्रबळ झाला. तेव्हां आदिलशाहाशींच बदलण्याचा स्वभाव धारण केला. शत्रुत्व व वैरभाव धारण करून आदिलशाहाशींच युध्दास प्रारंभ केला. आरबी वाक्याचा अर्थ : “ हरएक पदार्थ आपले गुणावर जातो. ” यांतील भाव हा आहे कीं, मलिक अंबर हा नीच मनुष्य यास्तव कितीहि योग्यतेस चढविला तत्रापि आपले नीच-त्वाचे गुणावर जाऊन आदिलशाहाशीं बदलला. त्याचे नीचोत्पत्तीचा घाम त्याचे कपाळावर आला, म्हणजे त्याचा हलकेपणा प्रगट झाला. बेमानपणाचा मार्ग चाल-विण्यास प्रारंभ केला. कारण कीं, कुरान षरीफमध्यें ईश्वराचे वाक्य आहे कीं, “ आमचे सेवकांत कोणीच उत्तम सेवक नाहीं. ” यांतील भाव जितके सेवक तितके बेमान असें आहे. तें वाक्य सत्य आहे व सत्य झालें. जेव्हां मलिक अंबर याचा दांडगेपणा व माजुरीपणा अत्यंत झाला व गर्व व अभिमान अति झाला तेव्हां आदिलशाहा याणी मनांत आणिलें कीं, मलिक अंबर याचे पारपत्य केलें पाहिजे. बहुत उत्तमपणानें त्यास शिक्षा दिल्ही पाहिजे. असे मनांत आणिलें आणि मोंगलाशीं सख्य[४८] करून तुम्ही मलिक

४८. 1st of the Ilahi month of Isfandarmuz Julus 18, (9 Feb. 1624) : A report came from my son and Mahabat Khan. It contained the recommendation and the offer of service of Adil Khan with a letter which he had sent to Mahabat, in which were set forth his submissiveness and loyalty...At the request of my son I wrote a gracious farman to Adil Khan showing great favour to him and sent him a robe of honour with a special Nadiri.–Tuz-i-J., II, p. 288.

अंबर याचे पारपत्यावर जावें यांत तुमचा बहुत उपयोग आहे अशी मोंगलास आज्ञा केली. मोंगलाचेंहि अंतःकरण मलिक अंबर याजविषयीं त्रासलें होतेंच. मनांत जळत होता. यास्तव तो मोंगलहि या कामांत आदिलशाहाचे मसलतीस अनुकूल झाला. आदिलशाहा याणी बहुत लष्कर, सरासरी चाळीस स्वार, मुल्ला महंमद लारी सरलष्कर या समागमें, ज्या महंमद लारीस मुल्लाबाबा असें म्हणत होते त्या महंमद लारीस, मलिक अंबर याचे पारपत्यावर नेमिला. ४९ असेच मोगल याचा सरलष्करखान हा चाळीस हजार स्वार तरवार लावणारे व लढाऊ बहुत सामानसरंजाम घेऊन निजामशाहाचे मुल्कावर फौज घेऊन चालता झाला. आदिलशाहाकडील व मोंगलाकडील मिळोन दोन्हीं लष्करें अहमदनगरावर चालतीं झालीं. तेव्हां मलिक अंबर याणी त्या हरदु लष्करांचे पारपत्य करण्याकरितां कंबर बांधून चाळीस हजार स्वारांनिशीं पुढें चालून आला. अहमदनगरापासून पांच कोशाचे अंतऱ्यावर भातोडी म्हणोन एक जागा आहे तेथें उभयतांचे भेटीचा सामना झाला. मोठें दारूण युध्ध होतें झालें.५० उभयतांकडीलहि फौजेनीं शूरत्वानीं व धैर्यानें रणभुमींत पाय टेविला. युध्ध पराक्रमास व शूरत्वास सिध्ध होऊन एकमेकांत मोठा शस्त्रप्रळय करिते झाले. त्यासमई युध्ध करणारे बहुत शूर जेर होऊन त्या रणभुमींत पडले. आदिलशाकडील व मोंगलाकडील शिपाई लोकांनीं त्या प्राणघातक अरण्यांत शत्रुवध करण्याविषयीं कोणतेहि प्रकारें युध्धास अनमान व ढिलाई न करितां सामर्थ्याहून अधिक लढाई व यत्न करून झटले. युध्ध करण्याविषयीं कोणताच बारिकपणाचा विचार पाहून ढिलाई केली नाहीं. परंतु अद्यापि मलिक अंबर याचे दैवाचा उत्कर्ष होता. मलिक अंबर याचे

४९. 2nd Urdibihisht, Julus 19, (11 April 1624) : About this time there arrived a letter from Qazi Abdul Aziz that Adil Khan from the bottom of his heart had elected for service and loyalty, and agreed that he would send Mulla Muhammad Lari, who was his principal agent and minister and whom both in spoken and written messages he called Mulla Baba, with 5,000 horse, that he might remain continualiy on duty, and they might know that other troops would follow........Mahabat Khan was awaiting at Burhanpur the arrival of Mulla Muhammad Lari, so that when he arrived he would relieve himself of the care of the maintenance of order in that neighbourhood and come with him (Muhammad Lari) to wait on mv son....''. Tuz-i- J., II, p. 296.

५०. शके १५४६ कार्तिक मासीं (आक्टोबर १६२४) भातवडीस मोगलाचा सुभेदार लष्करखान व येदिलशाही मुल्ला महमद यैसी दोन कटकें मलिक अंबरें बुडविलीं.– जेधे शका व शिवापूर शका. शिचप्र; पृ. १६ व ५३.

दैवाचे व नशिबाचे प्राबल्य वृध्दिंगत होतें. यास्तव मोगलाचे व आदिलशाहाचे यत्नांनीं कांहींच फायदा झाला नाहीं. मलिक अंबर याचे कडीलच प्राबल्य होतें. पारसी फर्दाचा अर्थ : "दैव व दौलत शाहाणपणावर नाही. दैवाची व दौलतीची प्राप्ती ईश्वराचे साह्यावाचून नाहीं." मोंगलाकडील मरलष्करखान याची मोठीं शिकस्त होऊन आदिलशाहाचे फौजेचा मोठा मोड झाला. तेव्हां मलिक अंबर याणी उभयतांचे फौजेंतील सरदार व अमीरलोक धरून कैद केले. बाकीचे फौजेवर मोठा संकटाचा प्रसंग गुजरला. आदिलशाकडील जे सर्व अमीरलोक मलिक अंबर याचे कैदेंत पडले होते. त्यापैकीं रणदुल्लाखान, आंकुसखान, रुस्तुमराव, खैरीयतखान, फरहादखान, आंबरखान वगैरे हेहि कैदेंत पडले होते. आंकुसखान व रुस्तुमराव हे उभयतां मलिक अंबर याचे कैदेंत मरण पावले. खैरतखान व आंबरखान हे उभयतां कांहीं दिवस कैदेंत राहून कैदेंतून पळून जाऊन विजापुरास येऊन पोहचले. रणदुल्लाखान व फरहादखान या उभयतांस बुरहान निजामशाहा याणी कैदेंतून मोकळे करून आपले चाकरीवर ठेविले. या प्रकर्णाची तारिख गालब हीं अक्षरें अबजदचे हिशेबानीं गणिलीं असतां एक हजार तेहतीस ( १६२३-१६२४ इ. स. ) सालचा सन निघतो. म्हणजे या सनांत हें प्रकर्ण झालें.

## ६२. एक कथा वर्णन आहे :

हजरत मौलाना हाबीबुल्लाह सब्रगुदल्ला हा पवित्र ठेवो त्याचा भेद त्या मौलाना हाबीबबुल्लाह याणी या प्रकर्णी लिहिलें आहे कीं, त्याच समई मी एक स्वप्न पाहिलें आहे कीं, दोन मोठ्या नावा लष्करानें भरलेल्या खोल समुद्रांत फिरत आहेत. एक गृहस्थ एकाएकीं निर्माण होऊन मजला बोलताहे कीं, ईश्वराची आज्ञा अशी आहे कीं, तुमची परवानगी घेऊन दोन्ही नावा लष्करानें भरलेल्या या समुद्रांत बुडवितो. असें बोलला तेव्हां मी बोललों कीं, 'मी कोण आहे व माझी काय किंमत ! म्हणजे माझी काय योग्यता आहे, कीं या प्रकर्णी माझी परवानगी घेतां.' तेव्हां तो बोलला कीं, 'ईश्वराची आज्ञा अशीच आहे.' त्यानंतर मी बोललों कीं, 'या दोन्ही नावा बुडवावयाचें काय कारण आहे ! कां बुडवितां !' तो बोलला कीं, 'इब्राहीम आदिलशाहाचे नावेंत गाणें व नाचणें व रागरंग वगैरे विषयांचे बहुत अयोग्य मार्ग चालू आहेत व मोंगलाचें नावेंतहि बहुत फंदफितूर वगैरे वाईट लोक भरले आहेत, यास्तव बुडवितो', असें बोलला. नंतर माझे देखत त्या दोन्ही नावा या पुरुषानीं बुडविल्या. हजरत मौलाना यानंतर सांगताहेत कीं, प्रासिध्दींत त्या दोनीहि लष्करांत मोठा दुष्काळ पडला आणि खाण्यापिण्यास कांहींएक नाहींसें झालें होतें. येथपर्यंत कीं, मणसास

केली जिन्नस गल्ला वगैरे व अन्न मिळेनासें झालें. तेव्हां मनुष्यांनीं बहुत घोडे, उंट व जनावरें कापून जीवें मारून भक्षण केलीं. बहुत मनुष्यें त्या दुष्काळांत उपासान मरण पावलीं. बाकीचे लोक तसेच पायानें निघोन जात होते.

## ६३. मलिक अंबर याणी नवरसपुरावर चालून येणें आणि विजापुरावर हल्ला करणें :

पुन्हां मलिक अंबर हा दुसरे वर्षी, सन १०२४ ( १०३४ ?= १६२५ इ. स. ) होता, त्या सालीं जेव्हां मलिक अंबर याजला गर्वाचे व अभिमानाचे मद्याची फारच धुंदी चढली होती. यास्तव पुन्हां याहून फारच अधिक दंगा करण्याचा ईरादा केला, म्हणजे अति दांडगेपणा करून आदिलशाहाचे राजधानीवर चालून येण्याचा संकल्प करून पन्नास साठ हजार स्वार घेऊन व तोफा व बंदुकी बहुत समागमें घेऊन विजापुरावर चालून आला. जेव्हां त्यासमई शहर नवरसपुर हे संपूर्ण आरब व आंजमचे शहराहून अधिक भरवस्तीचें व मोठे मोठे ईमारतींचें शोभायमान झालें होतें व बहुत थोर थोर ईमारतींचें व सडका म्हणजे रस्ते व बाजाराचे शोभेनें व त्या शहरांत बहुत विद्वान लोक व गुणीजन जमा झाले त्या योगानें व त्या शहरांत बहुत खजिना व बहुत सामान सरंजाम अति उत्तम जमला होता या योगें त्या कामांत तें शहर अद्वितीय झालें होतें. परंतु अद्यापि त्या शहराभोवतें शहरपन्हाचा कोट तयार झाला नव्हता. मलिक अंबर हा संधी साधण्याकरितां टपून बसला होता. संधी साधून बहुत जमातीनिसी येऊन त्या अत्यंत शोभायमान शहरावर म्हणजे नवरसपुरावर हल्ला केला. लुटालुट करण्याचा हात लांबऊन त्या शहराची फार खराबी केली. तेव्हां ईब्राहीम आदिल-शाहा याणी त्या तारिखेपासून नवरसपूर सोडून विजापुरास येऊन राहिला. तेव्हां नवरसपूर हें शहर वोसाड पडलें. नवरसपूरचा फडशा केल्यानंतर मलिक अंबर हा विजापूर शहरावर हल्ला करिता झाला. विजापुरची बहुत खराबी करूं लागला.[५१] आदिलशाहाचा बहुत मुलुक[५२] हस्तगत केला. तसेच मोगलाचाही बहुत मुलुक

५१. विजापूरवरील स्वारीहि भातवडीवरील युध्धापूर्वीचा प्रसंग असून, सोलापूरवरील हल्ला मात्र नंतरचा आहे. या आदिलशाहा व मोगली सैन्याच्या पूर्ण पराभवाबद्दल बराच तपशील इकबल नाम्यांत आला आहे.– 'Ikbal Nama-i-. Jahangir by Mutamad Khan, E. D., pp. 411-417.

५२. शके १५४६ ( इ. स. १६२४–२५ ) मलिक अंबरें सोलापुरास वेढा धालून विजापूरकरापासून किल्ला घेतला.– जे. शका, शिचप्र, पृ. १६.

घेतला. याच धांदलींत व दंग्यांत आदिलशाहाचा मुख्य कारभारी मुबारकबाद याजला मलिक अंबर याणी ठार मारिला. पारसी बैतेचा अर्थ : "हे कालचक्र जेव्हां नीच मनुष्यास साह्य करणारे होतें तेव्हां दांडगेपणानें सर्व लोकांचे अंतःकर्णावर संकटाचें ओझें ठेवितें." जेव्हां मलिक अंबर याणी या प्रकारचा दंगा व धांदल केली तेव्हां ईब्राहीम आदिलशाहाचे अंतःकर्ण येणेंकरून फारच त्रासलें. मलिक अंबराचा सूड घ्यावा असा ईरादा करून इच्छित होता कीं, मोठे मसलतीनें या दांडगेपाणास्तव मलिक अंबर याचा सूड घ्यावा. असें ईच्छित होता तों एकाएकीं दुसरे वर्षी सन १०३५ ( १६२५-१६२६ इ. स. ) सालीं मलिक अंबर मरण पावला.[५३] सुल्तान महंमद कुतुबशाहाहि त्याच समयांत थोडकेच दिवसांत मरण पावला.[५४]

## ६४. ईब्राहीम आदिलशाहाचे उत्तम लक्षणांचें थोडेसें वर्णन प्रकर्ण :

ईब्राहीम आदिलशाहा पादशाहा बहुत सुलक्षणिक, अति लावण्य, बहुत उत्तम स्वभावानें सर्वोपरी उत्तम, मोठा न्याय व इनसाफ करणारा, मोठा धैर्यवान, हिंमतदार, रयतेचें पालन करणारा, विद्वान व गुणीजनांची कदरदानी करणारा, सेखलोक व फकीर लोक व सुन्नी धर्माचे व साधू निर्मळ बिश्वासाचे व श्रेष्ठ अवलीयाचे लोकांची योग्यता जाणणारा, मोठे विद्वान व पूर्ण ज्ञानी शेख लोक मातबर व कविता करणारे व योग्य पुरुष व कीर्तीमान शिपाईलोक व संपूर्ण गुणीजन त्या कारकीर्दीत चहूंकडून पृथ्वीपती ईब्राहीम आदिलशाहापाशीं जमून विजापूर शहरांत राहून तेंच शहर निरंतर राहण्यास स्थान केलें. मोठे मोठे औलीया जमले होते, कीं त्यांचे रवने व कबरा प्रसिध्ध आहेत. याशिवाय सात आठ गृहस्थ कदीम परंपरेचे त्याचे कारकीर्दीत राहून त्याणी आपले श्रेष्ठ चरणाचे योगानें विजापुरास कल्याणाची व कृपेचे धनाची जागा करिते झाले. संपूर्ण बोलणारे नामांकितांपैकीं मुल्ला जहुरी म्हणोन आहे, कीं त्या मुल्ला जहूरीचे कविता ग्रंथ बहुत उत्तम

५३. Intelligence now arrived of the death of Ambar the Abyssinian, in the eightieth year of his age, on the 31st Urdibihisht ( 10 May 1625 ).– 'Ikbal Nama,' E. D., p. 428.

५४. "The death of ...Sultan Muhammad Qutb Shah, son of Mirza Muhammad Amin, son of Ibrahim Qutb Shah, occurred on Wednesday the 13th of Jumada I 1035 ( 1 February 1626 )".– Inscription on the Tomb of Muhammad Qutb Shah, p. 144, no. 364, 'Muslim Inscriptions' by V. S. Bendrey.

व बहुत विस्तार थोडक्या मजकुरांत व बहुत पौढ कीं ते ग्रंथ व कविता हिंदुस्थानचे सर्व शहरांत व ईरान व दुरान येथें प्रसिध्ध आहेत. मुल्ला जहूरी याची आदिलशाहाचे तारिफ व स्तव प्रकर्णी जिव्हारुपी घोडा विस्ताराचे अरण्यांत पळविला आहे, म्हणजे जें वर्णन केलें आहे त्या ग्रंथाचे नांव ' आर्गवाने–खलील ' व ' गुलजारे–ईबराहीम ' व देशाचे नवरस या नामेंकरून प्रसिध्द आहेत. त्या मुल्ला जहूरी याणी आपले मित्र-लोकांस पत्रें लिहिलीं होतीं. त्या पत्रांत मजकूर लिहून ईब्राहीम आदिलशाहाचें बक्षिस देणेंचें व दातृत्वाचें वर्णनाचा विस्तार, कीं तो विस्तार ' गुलजोर ईबराहीम ' या ग्रंथात वर्णन करित आहे. तो मुल्ला जहुरी म्हणतो कीं, नवरसपुरची योग्यता अशी होती कीं, शोभेमध्यें त्या शहरापुढें चंद्रहि लज्जायमान होय असें तें शहर आहे. तेथें संनिध राहण्याचे सुदैवपणानें योग्यतेस पावण्यास सिध्ध होऊन आश्रयानें दिवस गुजरणेस ईब्राहीम आदिलशाहाचा बाग जाणिला आणि तेथें राहिलों. अंत:कर्णात कांहीं एक आशा उत्पन्न होत नव्हती, कीं पादशाहापासून कांहीं बक्षिस ईनाम मिळऊन थोरपणास चढावें. कारण कीं, मजला दर महिन्यास पगार मिळत होता व हरएक विन्यास व हरएक गजलेस निरनिराळें बक्षिस मिळविलें होतें. जेव्हां हे सर्व कवितेचे व गजलाचे ग्रंथ ईब्राहीम आदिलशाहाचे वर्णनाचे तयार करून, मी नबाब शहानवाज-खान याचे इंद्र भुवनासारिखे कचेरींतील लोकांपैकींच आहे यास्तव सदरहु ग्रंथ घेऊन, शाहानवाजखान याजकडे गेलो तेव्हां खजिन्याकडील चाकर लोक याणी चार ऊंट मजबूत पर्वतासारिखे थोर तयार करून त्या चारी उंटांवर सोनें भरून उभे केले आणि बोलले कीं, ईब्राहीम आदिलशाहाची आज्ञा झाली आहे कीं, नवरस हजार लारी द्रव्य द्यावे म्हणोन. साडेपांच रुपये किंमतीचा एक सोन्याचा तुकडा आहे त्या तुकड्यास लारी असे म्हणतात. असे एकेऐंशी हजार लारी इतकें द्रव्य देण्याचा हुकूम झाला आहे. असें बोलून त्याणी ते सोन्यानें भरलेले चार ऊंट माझे हवालीं केले. नंतर मी शहरांत येऊन तें द्रव्य ऊंटावरून उतरून सैयद लोकांस वाटलें. तेच कांहीं द्रव्य सैयद लोकांशिवाय दुसरे लोकांसहि वाटलें. येणेंकरून परलोकीं उतम फल-प्राप्तीचे मी साहित्य केलें. पारसी रुबाचा अर्थ : : " जांब कीं ती साकीनें तळछट म्हणजे गाळ उरलेला प्याला : : माझे चित्तानी क्षमेची चादर आंगावर घेतली. यास्तव आतां कांहीं एक चिंता नाहीं : १ : महमुदशाह याणी फिरदोसी याजवर जुलूम केला होता त्या करण्यावर : ईब्राहीम आदिलशाहा याणीं अधिक पराक्रम केला : म्हणजे महमुदशाहा याणी फिरदोसी यास शाहानाम्याचे किताबीबद्दल द्रव्य देण्याचा करार केला होता त्याप्रमाणें द्रव्य दिल्हे नाहीं. या योगें महमुदशाहाची निरंतर या जगांत अपकीर्ती राहिली ". हे वर्णन शाहाजाद्याचे किताबीचे आरंभीच फिरदोसी याणी केलें आहे. यास्तव तो दृष्टांत घेतला. कारण कीं, महमुदशाहा याणी या प्रकारचा बेमानपणा केला व ईब्राहीम आदिलशाहास याणी या प्रकारें द्रव्य देऊन

त्यावर चढ केला. तात्काळ कविता करणारे कित्येक लोक या कदरदानाचे तक्तासंनिध जमले होते. असेच कित्येक खुषनवीस म्हणजे उत्तम प्रकारचें लेखन करणारे लेखक जादुप्रमाणें चमत्कारिक व गोड मजकुरानें लिहिणारे व दुसरे हरएक विद्येचे वोस्तादलोक व हरएक गुणांचे गुणीजन त्या कारकीर्दीत जमा होऊन त्याणी हरएक गुणांचे कीर्तीचा ध्वनी पूर्वेपासून पश्चिमेपर्यंत पोहचविला होता. महंमद कासम फिरिष्ता अस्तराबादी याणी 'तारीखे फिरिस्ता' म्हणोन केलेला ग्रंथ सर्वांस प्रसिध्द आहे. मीर रफीउद्दीन षिराजी याणी 'ज्यामयेतन करडील मुलुक' म्हणोन ग्रंथ केला आहे. या लोकांनींहि हे ग्रंथ करून इब्राहीम आदिलशाहापासोन ईनाम व बक्षीस मिळविलें. या सर्वांवर आदिलशाहाचा उपकार आहे. तो ईब्राहीम आदिलशाहा पादशाहा पूर्ण मनोरथी सर्व लक्षणेंकरून सुलक्षणीक असता व सर्व पादशाहा मंडळांत ईब्राहीम आदिलशाहा बहुत योग्य आहे व ईब्राहीम आदिलशाहाचे दानधर्म व बक्षिस देण्याप्रमाणें त्याचें शूरत्व, जरब, अकल व दयाळु अंतःकर्णाप्रमाणें व रयतेचे पालन करणें व संपूर्ण उत्तम लक्षणें व उत्तम विद्येप्रमाणें तसा कोणीच नव्हता, या वेघळे दुसरे कित्येक विद्येंतहि आदिलशाहास अभ्यास होता. मर्यादेच्या विद्या, लेखन विद्या व चित्रें वगैरे नकष काढणेचे व चितारीपणाचे कसबांत वगैरे बहुत अभ्यास केला होता. गायनाचे वगैरे विद्येंतहि पूर्ण अभ्यास केला. यद्यपि त्या कारकीर्दीत उत्तम प्रकारचे लेखन करणारे खुषनवीस जमले होते परंतु ईब्राहीम आदिलशाहा लेखणीचा राजा होता, म्हणजे आदिलशाहापुढें लिहिण्यांत कोणी लेखणी धरील असा कोणीच नव्हता. सुलस व नखस व नस्तालिक वगैरे तऱ्हेचीं अक्षरें अशी मेहनत करून वळविलीं होतीं कीं, त्या कामांतील खुषनवीस जितके होते तितक्यांची अक्षरें ईब्राहीम आदिलशाहाचे अक्षरांपुढें रद्द होतीं. असेच गायन करण्याचे, वाद्यें वाजविण्याचे विद्येंत असा अभ्यास केला होता कीं, त्या विद्येत अभ्यास केलेले लोक व त्या विद्येंत पूर्ण दशेस पावलेले लोक हजारों गांवोगावांहून चहूंकडून राजधानींत जमा झाले होते ते संपूर्ण लोक ती विद्या शिकण्याकरितां आदिलशाहाचे शिष्यत्व करून आदिलशाहापासून तालिम घेऊन आम्ही आदिलशाहाचे शागीर्द आहों असें म्हणऊन थोरपणा मिरवित होते.

## ६५. आदिलशाहा याणी आपला पुरातन धर्म सोडून परधर्मानें वागणुक करणें सर्वांस प्रसिध्द होणें प्रकर्ण :

संभावित व थोरांपासून ऐकिलें आहे कीं, ईब्राहीम आदिलशाहा बहुत विद्वान होता. मुसलमानी धर्माचरणांत व मुसलमानांचे मार्गात आदिलशाहाचा पाय सुन्नीचे

लोकांचे जमातीचे विश्वासावर मजबूत होता. परंतु ईब्राहीम आदिलशाहास गायनावर फार आवडी होती. सुस्वर गायन यावर फार लुब्ध होता. यास्तव हिंदु लोकांचे संगतींत राहून हिंदु जातीचे गवयांसी मित्रता ठेविली. हिंदु लोकांचा निश्चय ठरलेला आहे कीं, सरस्वतीची पूजा व सेवा करावी. कारण कीं, सरस्वती हें हिंदूलोकांचे देवांपैकींच एक सेवा करण्याचें दैवत आहे. हें दैवत सुस्वर गायन व उत्तम प्रकारें गाण्याचा आवाज होऊन उत्तम गायनाची विद्या अधिक वाढण्याकरितांच आहे, म्हणजे सरस्वतीची पूजा केली असतां गायनाची विद्या येती. यास्तव सर्व हिंदु जातीचे गवई लोक व ईतर जातींचेहि लोक गाणें शिकावयाचें झालें म्हणजे आधीं सरस्वती-पूजन करितात, सरस्वतीस भजतात. ईब्राहीम आदिलशाहाची प्रीति गायनावर बहुत होती. गायनांत फार लुब्ध होता. यास्तव हिंदूंचे चालीप्रमाणें ईब्राहीम आदिलशाहा सरस्वतीपूजन करूं लागला. तेव्हां सर्व लोकांत अफवा उठली कीं, म्हणजे सर्वत्र बोलुं लागले कीं, ईब्राहीम आदिलशाहा याणी अकबर पादशाहा प्रमाणेंच मुसलमानी धर्माचा प्रबळ मार्ग सोडिला आहे. अद्यापि ईब्राहीम आदिलशाहा पवित्र व एक ईश्वरासच जाणतो. निर्मळ विश्वासाचा आहे. अमार्ग व अयोग्य चालींचे मार्गापासून अलिप्त आहे, म्हणजे अयोग्य चालींपासून दूर आहे. परंतु गाण्याचे विद्येवर फार प्रीति ठेवितो. यास्तव हिंदु लोकांचे चालींकडेहि आदिलशाहाचें मन होतें.

## ६६. हजरतशाहा सबगदुल्लाह पवित्र ठेवो, ईश्वर त्याचा भेद त्याणी मदिना मिनोरा येथून विजापुरास येणें प्रकर्ण :

जेव्हां ईश्वराची कृपा व अविनाश परमेश्वराची दया ईब्राहीम आदिलशाहावर पूर्ण होती यास्तव हा कंटक म्हणजे काटा ईब्राहीम आदिलशाहाचे मित्रतेचे मार्गांत राहिला असतां त्याचे पायांत मोडेल यास्तव तो कांटा राहूं दिल्हा नाहीं. आरबी वाक्याचा अर्थ : "मनुष्यें वाट चुकतात, त्यास मार्ग प्रदर्शक म्हणजे वाट दाखविणारा सर्व पैगंबराचे सरदार व परलोकीं अपराध क्षमा करविणार यावर ईश्वराची कृपा असो. त्याचें कल्याण असो सर्व ईच्छकास आज्ञा करणार व ईश्वराचे ज्ञान जाणणाराचा शेवट असे हजरत महंमद मुस्तफ व पैगंबर आहेत." त्याचे वकील शाहा सबगदुल्लाहा हुसेनी, भडोची येथील राहाणार, हे हजरत पीर मुरुपद सर्व मुसलमानाचे शेख, शाहा बजीहुद्दीन उलवी हुसेनी याचे शिष्य हे बहुत दिवस पैगंबराचे क्षेत्रांत राहून मदिना मिनोरा येथें शिष्ये मंडळीस उपदेश करण्यांत निमग्न होते. त्या सबगदुल्लास, पैगंबरानीं स्वप्नांत येऊन आज्ञा केली कीं, तुम्ही अति त्वरित दक्षण देशाकडे जावें. यावरून हजरत शाहा सबगदुल्लाहा अशी पैगंबराची आज्ञा होतांच मदिना मिनोरा या पवित्र

क्षेत्रांतून निघोन दक्षण देशाकडे चालते झाले. सन १००० (१५९१–१५९२ इ. स.) हिजरी सालीं विजापुरास येऊन पोह्चले. कित्येक दिवसानंतर शाहा हजरत सबग-दुल्लाहा याजला कळलें कीं, हा विजापुरचा पादशाहा गायनाचे प्रीतीस्तव हिंदु लोकांचे धर्मानें आपला धर्म सोडून वागतो. यास्तव हजरत शाहा सबगदुल्लाहा हे ईबराहीम आदिलशाहास आज्ञा करिते झाले कीं, परधर्मानें आचरण करणें सोडून ईश्वराकडे रुजु होण्याचा मार्ग धारण कर. हा हिंदु धर्मानें वागणेचा असत्य संकल्प विश्वास ठेऊन धरिला आहेस तो सोडून देऊन आपले चित्तसमाधान कर. ईश्वरासच जाणणारा होऊन मुसलमानपणानींच आस, म्हणोन आज्ञा केली. तेव्हां ईब्राहीम आदिलशाहा याणी विनंती केली कीं, माझे मनांतील मनोदय दुसरा नाहीं. माझे गाण्यांत अंतर येऊं नये म्हणजे झालें. नाहींपैक्षां ईश्वराची शफत मी मुसलमानाचा धर्म विश्वासानीं धारण केला आहे. त्या विश्वासांत अंतर येईल, म्हणजे माझ्या गाण्यांत अंतर आल्यास, मी हिंदु धर्मानीं वागेन, म्हणजे सरस्वती पूजन करीन. अशी विनंती केली. त्यावरून हजरत शाहा सबगदुल्लाहा याणी आज्ञा केली कीं, तूं कांहीं संशय धरूं नको. ईश्वराचे कृपेंकरून नीट होईल. साह्य करणारा ईश्वर आहे. तुझे सुस्वर गायन व उत्तम प्रकारचे गाणें कायम राहील. या चालीनें चालल्यास अधिकहि वाढेल. त्यावरून पादशाहानीं तात्काळ चित्तांतील संशय सोडून देऊन मुसलमानी धर्म धारण केला. ईश्वराचे कृपेवर भरंवसा ठेविला. खरेपणानें तो बोलला कीं, आजपासून हिंदुधर्मानें चालणार नाहीं. असा निश्चय केला तेव्हां ईश्वराचे कृपेंकरून त्या दिवसा-पासून ईब्राहीम आदिलशाहाचें गायनाचा सुस्वर आवाज होता तसाच कायम राहून दसपट अधिक सुस्वर झाला. याच प्रकारास्तव ईब्राहीम आदिलशाहाचे कबरेवर बैत लिहिली आहे. त्या बैतेचा अर्थ : : ' ईबराहीम पैगंबर हे यहुदी नव्हते व नसराती म्हणजे फिरंगी नव्हते. खऱ्या चालीचे धर्माचे व मुसलमान होते : : " जे लोक पादशाहापासी राहून असें वागावें व तसें वागावें असें म्हणणारे होते ते सांगत आहेत कीं, हजरत शाहा सबगदुल्लाहा याजला दक्षण देशास जावें म्हणोन पैगंबरानीं स्वप्नांत सांगितले. यांतील तात्पर्य हें होतें कीं, ईबराहीम आदिलशाहा याणी मुसलमान लोकांत धर्माचरणाचे मार्गांत अडखळून पाडले होते तें सोडून देऊन, म्हणजे मुसलमानी धर्म धारण करून व पुरातन मार्गानें आचरण करून सन्मार्ग धरावा. हेंच तात्पर्य होतें. यद्यपि हजरतशाहाचे इकडे येण्यांत बहुत उपयोग व अत्यंत फळें प्राप्त झालीं, बहुते-कास कजरतशाहाचे उपदेश करून पूर्ण ज्ञान झालें, बहुत लोक ज्ञानी झाले तत्रापि हजरतशाहाचे शिष्य मंडळींपैकीं एक गृहस्थ पूर्ण दशेस पावला. तो हा आहे कीं, आरबी वाक्याचा अर्थ : " सर्व विद्वानांत मुख्य व सर्व सिध्द लोकांत म्हणजे साधु मंडळींत प्रमुख मौलाना हबीबुल्लाह पवित्र केला. ईश्वरानीं भेद त्याचा तो सबग-दुल्लाहचा शिष्य आहे. "

## ६७. हजरशाहा सबगदुल्लाहा याणी मदिना मिनोरा येथें परत जाणें प्रकर्ण:

हजर मौलाना हाबीबुल्लाह याचे 'मलफुन' म्हणोन ग्रंथात लिहिले आहे कीं, हजरत शाहा सबगदुल्लाह सन १००० (१५९१-१५९२ इ. स.) हिजरी सालीं मदिना मिनोरा येथून विजापुरास आले. त्या कारकीर्दीत ईब्राहीम आदिलशाहा पादशाहा होता. ईब्राहीम आदिलशाहा याणी पूर्ण आवडीनें शाहा सबगदुल्लाहा याची भेटी घेऊन त्याचे चरणारविंदी मुलुक वाढणेचें व या मुलकाचें कल्याणाचें कारण व आपले दौलतीचे शाश्वतीचें व वृध्धीचें कारण असें जाणित होता. हजरतशाहा सबगदुल्लाहा याणी निरंतर येथें राहून परत जाणेचा ईरादा करूं नये अशी आदिल-शाहास ईच्छा होती, म्हणजे भेट निरंतर होत जाईल. दरवाज्यावरील पाहरेकन्यास गुप्त-पणें ताकिद पाठविली कीं, जर करितां हजरत शाहा सबगदुल्लाह बाहेर जाणेचा ईरादा करितील तर तुम्ही त्याजला अडथळा करून बाहेर जाऊं देऊं नये. अशी ताकिद केली. यांतील कारण हेंच होतें. हें वर्तमान हजरतशाहा सबगदुल्लाहा याचे कानावर गेलें तेव्हां हजरत याणी आश्चिर्य करून आज्ञा केली कीं, जरकरितां आम्ही निघोनच जाऊं लागल्यास दरवाजावरील पहारेकरी अटकाव करितील ! म्हणजे करणार नाहींत. आणखी हजरत मौलाना याणी आज्ञा केली कीं, हजरतशाहा सबगदुल्लाहा जेव्हां विजापुरांत आले तेव्हां प्रारंभी जुमाची म्हणजे शुक्रवारची निमाज पढण्याकरितां जुमा मसिदींत जाऊन पहिले उजवे बाजूचे वोळींत, कीं त्या हजरताचेवर कोणी नसावा अशा ठिकाणीं हजरत निमाज पढत होते. जेव्हां त्या हजरतास जातें व येतें वेळेस अशास्त्र व अयोग्य पदार्थ व मद्य विकण्याची कलालाची दुकानें दृष्टी पडत होती यास्तव हजरत याणी जुमाची निमाज पढणें सोडून देऊन आज्ञा केली कीं, या शहरांत जुमाची निजाम पढणें योग्य नाहीं. एके दिवशीं हजरतशाह सबगदुल्लाह याणी आपले घरीं कचेरींत आज्ञा केली कीं, या शहरचे धण्यानीं, म्हणजे ईब्राहीम आदिलशाहा याणी, जर करितां आपली अमार्ग वर्तणुक सोडून आमचे आज्ञेप्रमाणें वागणुक करून तीन गोष्टी आम्ही सांगून तशा केल्यास ईश्वर त्या तीन गोष्टी बद्दल तीन राज्यें, म्हणजे तीन राजधानींची दौलत बक्षिस देईल. सत्य आहे किंवा असत्य आहे ही परिक्षा पहावी. तीन कलमांपैकीं प्रथम हें कीं, ईब्राहीम आदिलशाहा याणी आपले सर्व मुलकांत मद्य विकणेचीं दुकानें बंद करून मनाई करावी. याबद्दल गुजराथचे मुल्काची राजधानी ईश्वराकडून मी देवविती. लढाई व युध्ध प्रसंग करावा, म्हणजे गुजराथचे राज्य हस्तगत होईल. यास्तव लढून तें राज्य घे असें म्हणत नाहीं. पाहिजे असल्यास मी ईब्राहीम आदिलशाहाचे बराबर जाऊन गुजराथचे तक्तावर आदिलशाहास बसवितो. हें न घडल्यास ईब्राहीम आदिलशाहा याणी मद्याचे एक दुकानाचे ठिकाणीं दहा दुकानें मद्याची अधिक करावीं. याप्रमाणेंच व्यभिचारिणी स्त्रियांस, म्हणजे छिनाल

नायका कसबिणी कलावंतिणी वगैरे स्त्रियांस लग्नें करण्याविषयीं आज्ञा करावीं. राफजी लोकांस कोणतेच जागीं कामावर ठेऊं नये. या दोन कलमांबद्दल दुसरे दोन मुलकांचे राज्य देववितो. हे सर्व खरें आहे किंवा नाहीं हें ईब्राहीम आदिलशाहा याणी करून पहावें. येविषयींची परिक्षा पहाणें कांहीं कठीण नाहीं. अशी आज्ञा केली तेव्हां त्या कचेरींत जे लोक हजर होते त्याणी विनंती केली कीं, या करण्यास फार खर्च केला पाहिजे तेव्हां हीं कामें घडून येतील. तेव्हां हजरत याणी आज्ञा केली कीं, मजला खर्चाचे कलमाविसीं काय कारण आहे ? ईब्राहीम आदिलशाहास पृथ्वी घेण्याची ईच्छा असल्यास पृथ्वीचे मुलुक घेण्याची ईच्छा ठेवील व माझी आज्ञा मानील, अशी आज्ञा केली. ईतक्यामध्यें हा मजकूर पादशाहाचे कानावर गेला. तेव्हां पादशाहानीं नबाब करमुलुक मोठा विश्वासू वजीर राफजी होता त्याजला बोलाऊन येविसीं मसलत विचारिली. तेव्हां तो बोलला कीं, हजरत शाहा सबगदुल्लाह हे जे कांहीं आज्ञा करित आहेत तें सत्य आहे. कदापि असत्य होणार नाहीं. परंतु या करण्यांत राजधानीचें तेज व मुलकाची बंदोबस्ताची शोभा राहणार नाहीं. दुसरें हें कीं, आपले चित्तासहि खिन्नता प्राप्त होईल. तेणेंकरून राजधानींत बखेडा होण्यास कारण होईल असें आहे. आतां ते बरें आहे कीं, हजरत शाहा सबगदुल्लाह याची रवानगी करावी व त्याजला परत जाण्याविसीं निरोप द्यावा म्हणजे ठीक. शेवटीं राफजी लोकांचे अयोग्य मसलतीस पादशाहा याणी कबूल करून एके दिवशीं सायं-काळीं कचेरींत बोलला कीं, जर करितां हजरत शाहा मदिनामिनोराकडे जातील तर आम्ही निरोप देतो म्हणोन बोलले. तेव्हां त्या कचेरींत अबदुल कादर म्हणोन हजरत शाहाकडील बातमीदार हजर होता तो पादशाहाचे बोलणें ऐकुन तात्काळ हजरत-शाहाकडे येऊन जाहीर केलें. तेव्हां ते हजरत ते वर्तमान ऐकतांच तेच वेळेस सायं-काळची निमाज पढल्यानंतर त्याच पोषाखानीं निरोप मागण्याकरितां पादशाहापाशीं जाऊन निरोप घेतला. तेव्हां पादशाहानीं चार हजार होन वाटखर्चास हजरत शाहास देऊन जाण्यास निरोप दिल्हा आणि विनंती (केली कीं,) आसार कुदसी आनवार म्हणजे हजरत सय्यद महंमद मुस्तफा सल्लिल्लाह आलहै वसल्लम याचे चमत्कारीक केश आहेत त्या केशाचे दर्शन घेऊन निघावें.

### ६८. हजरत रसुलील्लाहचे वकील हजरतशाहा सबगदुल्लाहा याणी हजरत पैगंबर यांचे केशाचें दर्शन घेणें प्रकर्णी :

हजरतशाहा तेथून निघोन पैगंबराचे केशाचें दर्शन घेणेंकरितां असार महालांत आले. तेव्हां महाल मुबारक येथील सेवक लोकांनीं पादशाहाचे अज्ञेप्रमाणें संदुक

उघडून रुप्याची नळी बंद केलेली व त्यांत कित्येक हजरत रिसालतपन्हा सल्लील्लाह आलहे वसल्लम याचे केश आहेत ती नळी संदुकांतून काढून हजरतशाहाचे पुढें तब-कांत ठेविली. तेव्हां हजरतशाहा याणी असार महालाकडील सेवकास आज्ञा केली कीं, नळी उघडावी म्हणजे ते केश पाहून दर्शन घेईन. तेव्हां ते सेवक बोलले कीं, हजरत पैगंबराचे केशाची नळी उघडणेची चाल नाहीं. या गोष्टींत आम्हां सेवकांचा अपराध कदापि मनांत आणों नये. असें बोलले तेव्हां हजरतशाहा याणी ती रुप्याची कल्याणप्रद नळी आपले हातांत घेऊन एक घटकापर्यंत निमाज पढले व दीप बहुत लाविले होते. सरासरी पन्नास मनुष्यें सभोंवतीं आसपास होतीं. हजरत मौलाना हाबीबुल्लाहा सांगताहेत कीं, मीहि त्या मंडळींत हजर होतों. तेव्हां हजरतशाहा याणी मजला त्यासमयीं संनिध बोलाऊन आज्ञा केली कीं, पैगंबराचे केशावर पुरती नजर ठेवा, म्हणोन बोलले. मी पाहिलें तो एकाएकी त्या पैगंबराचे केशाचे नळीस छिद्रें म्हणजे भोकें पडलीं. तेव्हां ते पवीत्र केश न फार मोठे व न फार बारिक व न फार काळे व न फार पांढरे बोटाइतके लांब होते. ते केश त्या छिद्रांवाटे म्हणजे भोकांवाटे आपो-आप बाहेर निघोन नळीचे छिद्रांतून उभे राहिले. ती केशाची नळी उदबत्तीचे झाडाप्रमाणें दिसत होती. त्या नळीचीं छिद्रेंहि दिसत होतीं. एक घटकेनंतर ते पवित्र केश थोडे थोडे आपले जाग्यावर आंत जाते झाले. नंतर मी पाहिले तों त्या नळीचीं छिद्रेंहि दिसेनासीं झालीं. हजरतशाहा याणी पैगंबराचे केशांचे दर्शन घेण्याचा या प्रमाणें मजकूर पाहिला.

## ६९. ईबराहीम आदिलशाहा याणी जगद्गुरु या नामें करून प्रसिद्ध होणें प्रकर्ण :

ईबराहीम आदिलशाहा जगद्गुरु या नामेंकरून सर्वांचे बोलण्यांत प्रसिध्द झाला. याचें कारण हें आहे कीं, गुरु हा शब्द दक्षणचे लोकांतील उत्पन्न झालेला आहे. सर्व लोक त्या सुलक्षणीक पादशाचे लक्षणावर जिवापासून व मनापासून रजामंद म्हणजे प्रसन्न व संतोष पावले आहेत. यास्तव सर्वांनीं ईबराहीम आदिलशाहा पादशाहाचे नांव जगद्गुरु असें ठेविलें आहे. कारण कीं, पादशाहाचे नांव शाहे जहान असें आहे. शाहे जहान म्हणजे जगाचा धणी. या जगांतील दक्षणचे सर्व मनुष्यांनीं पादशाहाचे शिष्यत्व केलें यास्तव हा पादशाहा सर्वांचा गुरु झाला. गुरूस पार्सींत पीर व वोस्ताद असें म्हणतात. तेव्हां शाहा जहान या नांवाचें अर्थावरून सर्व जगाचा धणी असा अर्थ सिध्द झाला. गायनाचे विद्येंत सर्व वोस्तादांचा वोस्ताद व सर्व मनुष्यें या पादशाहाची शिष्य मंडळी यास्तव सर्व जगानीं आपला गुरु पादशाहा याजकरितां

पादशाहाचे नांव जगद्गुरु ठेविलें. माजी ईब्राहीम म्हणजे पहिला ईब्राहीम आदिलशाहा झाला होता. त्याचें व या पादशाहाचें नांव एकच. परंतु प्रथमचे ईब्राहीम आदिलशाहाचे नांवापेक्षां या पादशाहाचें नावांत जगद्गुरु अशीं अक्षरें या कारणास्तव वाढलीं.

## ७०. ईब्राहीम आदिलशाहा याणी मरण पावणेंचें प्रकर्ण :

ईब्राहीम आदिलशाहा याजला एक हजार व तीस (इ. स. १६२०–२१) हिजरी साली भगेंद्र पडलें. तेव्हां वैद्य लोकांनीं त्या रोग परिहारार्थ बहुत औषधोपाय केले. परंतु कांहींच गुण आला नाहीं. ईश्वराचे येथीलच हुकूम येऊन पोहचला होता, म्हणजे आयुर्दायच सरला होता, यास्तव वैद्य लोकांचे व हाकीम लोकांचे ईलाज फलद्रुप झाले नाहींत. दिवसेंदिवस सदरहु रोग अधिकच वाढूं लागला. पारसी बैतेचा अर्थ : : "ज्या मनुष्याचा आयुर्दाय सरतो : त्याजला औषधोपायानींच घात होतो : पथ्य केल्यानेंच प्रती श्वासास दुखणें अधिक होतें : वंशलोचनच ज्वराचा अग्न प्रदिप्त करितो : गुलाबानींच त्याचे मस्तकांत दाहा होतो : सदरहु रोगानीं चंदनाची उटी घेतली असतां अग्निशिखा जळतो. त्याचे शरीरांतील प्राण जेव्हां शरीर सोडावें असें इच्छितो : तेव्हां औषधोपायानीं कांहीं एक उपयोग होत नाहीं : फरनालीब (फर्नालुब) म्हणोन मोठा फिरंगी वैद्य होता व पुर्वी बुमरात म्हणोन मोठा वैद्य झाला आहे त्या प्रमाणेंच या कामांत हा म्हणवितो व सरकारचे दौलतीकडील सेवक लोकां पैकींच होता, तो फिरंगी त्या पादशाहास औषधोपायास चार पांच दिवस झाले तो सदरहू रोग पहिलेपेक्षां अधिक वाढला. तेव्हां पादशाहा याणी फरनालीब या फिरंगी वैद्यास आज्ञा केली कीं, हें काय औषध दिल्हेस व हा काय उपाय केलास, कीं, या तुझे उपायानें हा रोग अधिक वाढला. तेव्हां फिरंगी याणी विनंती केली कीं, मी असल्या रोगास औषध उपाय केला नव्हता. अनुभव न पहातां या औषध उपायाचे कर्मात पडलों. माझेकडून अन्याय झाला. मी चुकलो. अशी विनंती केली. पादशाहा उत्तम स्वभाववान होता. ईश्वराचे कृपेवर भरंवसा ठेऊन आज्ञा करिता झाला कीं, हे फिरंग्या माझे कामाचा सेवट केलास, म्हणजे मी आतां वाचेन असें दिसत नाहीं. मी वारल्यानंतर तुला कोणी जिवंत ठेवणार नाहीं. जलद पळून जा. अद्यापि माझे शरीरांत प्राण आहे, तुला पाय आहेत तोंपर्यंत पळ आणि आपली अब्रु संरक्षण करून घे. पारपत्य व्हावयाचें होतें. तो फिरंगी याणी पादशाहाचे आज्ञेप्रमाणें पळून जावें तो गेला नाहीं. शहरांतच राहिला. पादशाहा वारल्यानंतर खवासखान याणी त्या फिरंग्याचें नाक व वरील होट कापून शिक्षा केली. तेव्हां फरनालुब याणी

आपले घरास येऊन आपले चाकराचें नाक व होट कापून आपले कापलेले नाकाचे ठिकाणीं तें नाक व आपलें कापलेले होटाचे ठिकाणीं तो होट जोडून जखम शिऊन औषधोपाय केला. तेव्हां पूर्ववत झालें. बहुत दिवस विजापूर शहरांत राहून सर्वास औषधोपाय करित होता. औषध उपाय करण्यांत अद्वितीय वैद्य होता.

**७१. इब्राहीम आदिलशाहा याणी मी वारलों म्हणजे माझे पाठीमागें सुलतान महंमद या माझे पुत्रास तख्तावर बसवावें असें अंतकाळीं बोध करणें प्रकर्ण :**

इब्राहीम आदिलशाहास चार पुत्र थोर होते. पहिला पुत्र दरविष पादशाहा म्हणोन तरुण पुत्र होता. दुसरा पुत्र सुलतान सुलेमान म्हणोन व त्याचे मातुश्रीचे नांव कमाल खातुन असें होतें. तिसरा पुत्र सुलतान महंमद म्हणोन होता. तो पादशाही सोन्याचे मुगुटामुध्धां जन्मास आला होता. एक पुत्र सर्वांहून लहान, कीं त्याचे मातुश्रीचे नांव सुंदर महाल असें होतें. चौघेहि पुत्र बहुत योग्य होते. येखलासखान हापसी, कीं जोहारीखान या नावेंकरून प्रसिध्ध होता व कदीम चाकर व पूर्ण विश्वासू व संभावित व शूर होता. बहुत दिवस त्याजकडे वजिरीचें काम होतें. सरकार चाकरीविसीं पूर्ण भरांशाचा ईमानी होता. हरएक कामांत आपले धण्याची परवानगी घेतल्याशिवाय कोणतेंच काम करित नव्हता. ज्यानुलमुल्क, कीं जो शहा नवाजखान या नामेंकरून प्रसिध्ध होता त्याजला शहा नवाजखान हा किताब मिळाला होता. त्याजला मुलकी कामांत मोटा पदाधिकार व बहुत दौलत मिळाली होती. नबाब अमीनुलमुल्क आका रजा शिराजी याजला पादशाहा नबाबखान असें म्हणत होते. माली व मुलकी व खास पागेची कामें त्याजकडे नेमलीं होतीं. वेधळी सर्व कारभारी मंडळी व कामदार व बहामनी लोक होते ते सर्व इब्राहीम आदिलशाहाचा पुत्र दरविषशाहाचे पक्षपाताचे होते. सर्व लोक दरविषशाहाचा पक्षपात करित होते. दरविषशाहास तख्तावर बसवावें असें हे लोक इच्छित होते. इब्राहीम आदिलशाहा याणी दरविषशाहास त्याचे मातुश्रीचे प्रकार्णावरून त्याजला माझे दृष्टीस पडत जाऊं नये असा बंदोबस्त करून दृष्टी पडण्यापासून दूर ठेविला होता, म्हणजे पादशाहा त्याचे मुखावलोकन करित नव्हता. जेव्हां हा प्राणघातक परिणाम रोग झाला व प्राण वाचता दिसत नाहीं, कोण्ही वाचवित नाहीं अशी निराशा झाली तेव्हां मिरजा महंमद अमीनकारी याजला, कीं तो मुल्लाबाबाचा जावई होता व पादशाहाचे कचेरींत पादशाहापाशीं संनिध राहत होता व जेव्हां मलिक अंबर व मुल्लाबाबा हे उभयतां फार संकिती करूं लागले त्यासमई पादशाहानीं महंमद अमीन याजला विचारिलें

होतें कीं, या कामाचा परिणाम तुझे बुध्धीनें कसा दिसतो. तेव्हां त्याणी अर्ज केला कीं, मला या कचेरींत रक्ताचा वास येतो, म्हणजे घाताचें चिन्ह दिसतें. मुल्लाबाबा टार झाल्यानंतर पादशाहानीं महंमद अमीन याचे दूरवर विचारास्तव व पूर्ण अकलवानपणास्तव त्याजला एकांतांत घेतला होता, म्हणजे कोणतीहि एकांताची मसलत झाली असतां त्या मसलतींत महंमद अमीन यास घेऊन त्याजला ती मसलत सांगित होता. त्या महंमद अमीन यास ईब्राहीम आदिलशाहानीं एकांती बोलाऊन आज्ञा केली कीं, येखलासखान याजला मी जे आज्ञा करितो तितकेंच काम करून तो असतो. यांतील तात्पर्य हें आहे कीं, मी वारल्यानंतर माझे आज्ञेप्रमाणें येखलासखान काम करील असें दिसत नाहीं. दियातनुलमुल्क वगैरे कारभारी मंडळ दरविषशाहाच पक्षपात धरितात. दरविषशाहास तक्तावर बसवून मालक केल्यास माझ्या राजधानींत कुतुबशाहाचे घराप्रमाणें भलतीच अनओळखी मनुष्यें जमविणें व राफजी लोक बहुत जमून त्या लोकांचा धर्म चालू होईल. यास्तव मी दरविषशाहास तक्तावर बसविणेस राजी नाहीं. वारंवार तुम्हांस बहुत वेळ सांगितलेंच आहे कीं, माझे सर्व प्राणप्रीय पुत्रांत ताज व तक्तास शोभावयाजोगा व छत्र व चामरें धरावयास योग्य सुलतान महंमद आहे. यास्तव तुम्ही स्वामीकार्यार्थ सेवेंत कंबर बांधून मी वारल्यानंतर माझे पाठीमागें सुलतान महंमद यास तक्तावर बसवावा. राजधानीचे कल्याण इच्छिण्याचे चालीनें व स्वामीकार्यार्थ प्राण अर्पण करण्याचे रीतीनें त्याचे हुकुमांत वागण्याविषयीं किंचितहि अंतर करूं नये. तुझे शरीरांत प्राण आहे तोंपर्यंत त्याचे आज्ञेपासून मस्तक उचलूं नये, म्हणजे प्राण आहे तोंपर्यंत त्याची आज्ञा मोडूं नये. कारण कीं, तुजला या कामाचा मी मुख्त्यार करित आहे. तेव्हां मिरजा महंमद अमीन याणीं ही पादशाहाची आज्ञा जीवापासून व मनापासून कबूल करून या श्रेष्ट बक्षीस देणाराचा, म्हणजे ईश्वराचा, स्तव करून पादशाहाची आज्ञा कायम केली. या प्रतिज्ञेची सांखळी आपले जीवाचे गळ्यांत घालून, म्हणजे प्राण गेला तत्रापि पादशाहाची आज्ञा जाहाली आहे त्याप्रमाणें करण्यास चुकणार नाहीं असा निश्चय करून, कामाचा उद्योग करिता झाला. विनंती केली कीं, एक योग्य सेवक माझे हाताखालीं द्यावा. पादशाहानीं आज्ञा केली कीं, जो सेवक तुझ्या पसंत असेल तो सांग म्हणजे तो सेवक तुझ्या हाताखालीं नेमून देईन. तेव्हां मिरजा अमीन याणी विनंती केली कीं, दौलतखान हा राजधानीचे सर्व कामाचा बंदोबस्त करण्याविषयीं पूर्ण अकल ठेवितो. येविषयींचे बंदोबस्त करण्याचा त्यास पूर्ण अभ्यास आहे व या कामास तो योग्य आहे. अशी विनंती केली तेव्हां पादशाहानीं आज्ञा केली कीं, तूं बोलतोस तें सत्य आहे. तो तसाच आहे. परंतु माझे बोलण्याचें पक्के स्मरण ठेव, कीं दौलतखान हा फार बेमान आहे. तुझ्याशीं ईमानानें टिकून राहून कदापि उपयोग करणार नाहीं, हें माझें बोलणें तुजला पुढें आठवेल.

## ७२. दौलतखानाविषयीं पादशाहानीं अकलेचा मार्ग सांगणें प्रकर्ण वर्णन :

पादशाहा याणी अशी आज्ञा करण्याचें कारण हें आहे कीं, दौलतखान व मुबारक हे उभयता चांदखानाचे सेवक होते. तो चांदखान ईब्राहीम आदिलशाहाचे शागीर्दांपैकीं एक शागीर्द होता. कांहीं हुजरे मंडळ व दौलतखान हा मराठी जातीचे निंबाळकर मंडळींहून हुशार चाकर होता. पादशाहा दौलतयारावर कृपादृष्टीनें अवलोकन करित होता, म्हणजे दौलतयारावर पादशाहाची कृपा होती. चांदखान याणी हरदू सेवक, म्हणजे दौलतखान व मुबारक, हे पादशाहास नजर केले. एके दिवशीं ईब्राहीम आदिलशाहा याणी परिक्षा घेणेचे मार्गांनीं दौलतयार यास आज्ञा केली कीं, चांदखान याचे तोंडावर थूंक. अशी आज्ञा करितांच दौलतयार याणी कांहीं-एक अंदेशा मनांत न आणितां व किंचितहि विचार न करितां चांदखानाचे तोंडावर थुंकला. या कर्मास पादशाहा याणी पसंद केलें नाहीं. हा बेमान आहे असा निश्चय केला. ज्यासमई पादशाहाची स्वारी शहर नवरसपूर येथून विजापुरास आली त्या दिवसाची तारिख नववी माहे मोहरम सन १०३४ एक हजार चौतीस ( १२ आक्टोबर १६२४ ) हिजरी होती. ते दिवशीं दौलतयार याजला दौलतखान असें पद देऊन विजापूरची हवालदारी दिल्ही. कित्येक दिवसानंतर एके दिवशीं पादशाहाची स्वारी शिकारीस गेली आणि रात्रीचे समई परत आली. जेव्हां बिनीची फौज दरवाजापाशीं येऊन पोहचली तेव्हां दौलतखान हवालदार याणी दरवाजा मी उघडित नाहीं असें म्हणाला. दरवाजा उघडला नाहीं. पादशाहाचें निषाण जरीपटका वगैरे मी आपले दृष्टीनें पाहिलेशिवाय दरवाजा उघडित नाहीं. पादशाहा संनिध येऊन पोहचले. तेव्हां दौलतखान यानी पादशाहास आपले दृष्टीनें पाहून दरवाजा उघडला. पादशाहास हें त्याचें कर्म पसंत आलें नाहीं. यास्तव हवालदारीचे कामावरून बरतर्फ करून कैद केला होता. ईतक्यामध्यें मिरजा अमीन यार्णी दौलतखानाविसीं विनंती केली आणि कैदेंतून सोडऊन हुजूर आणिविला. मिरजा महंमद अमीन याचे हातीं दिल्हा. दौलतखानास आज्ञा केली कीं, मिरजा महंमद अमीन यास माझे ठिकाणीं जाणून त्याची आज्ञा मोडून वागू नको. अशी आज्ञा करून पुन्हां हवालदारीचे कामावर कायम केला. कित्येक दिवसानंतर तारिख १० माहे मोहरम सन १०३७ एक हजार सदतीस साली ( ११ सप्तेंबर १६२७ ) ईब्राहीम याणी या मृत्यूलोकाचा परित्याग करून परलोकास जाता झाला, म्हणजे मरण पावला. [५५] जोहरापुर हा गांव पादशाहा याणी आपले-करितां वसविला होता त्या गावी, कबरस्थान म्हणजे स्मशानांत विश्रांती घेता झाला, म्हणजे पादशाहास तेथें दफन केलें. ईब्राहीम आदिलशाहानीं एकूण पन्नास वर्षें राज्य केलें.

दौलतयार प्रत्येक ज
हिजरी वर्षे

### ७३. तारिखवार प्रकर्ण :

ईब्राहीम आदिलशाहाचे कारकीर्दीत ज्या ईमारती तयार झाल्या त्या लिहिल्या जात आहेत. सातखणी महाल सन ९९१ नऊशे एक्याणव ( १५८३ इ. स. ) साली बांधला. दिलकुशा महालहि त्याच साली बांधिला. हैदरी बुरूज, कीं तो बुरूज सर्वांचे बोलण्यांत उपरी बुरूज या नावें करून प्रसिध्द आहे तो बुरूज, सन ९९२ नऊशे ब्याणव ( १५८४ इ. स. ) साली बांधिला. मसजद मलकै जहान, म्हणजे मलकैजहानची मसीद सन ९९६ ( १५८७–१५८८ इ. स. ) साली बांधिली. आनंद महाल सन ९९८ ( १५८९–१५९० इ. स. ) साली बांधिला. शहर नवरसपूर वसविण्याचा प्रारंभ सन १००८ (१५९९–१६०० इ. स.) साली झाला होता. पाचसहा वर्षांत शहर पूर्ण आबादान झालें. महले नवरस सन १००९ ( १६००–१६०१ इ. स. ) साली तयार झाला. भातोडीची लढाई, कीं ते युध्द मोठे दारुण झाले आहे तें, सन १०३४ ( १६२४–१६२५ इ. स. ) साली झालें. नवरसपूर या शहरास याच साली परचक्राचा उपद्रव होऊन शहरची खराबी झाली.

### ७४. लष्कराची संख्या :

स्वार १२००० बारा हजार व शिबंदी २४००० चोवीस हजार होती. हत्ती ९५५ नऊशे पंचावन होते. गवई लोक व साजिंदे व विद्याभ्यास करणारे व त्या कामांतील जे नादार म्हणजे उत्तम वोस्ताद मंडळ होते ते मिळोन १४४५ एक हजार चारशे पंचेचाळीस होते. पादशाहाचे शागीर्द मंडळ तीन चार हजार होतें. त्या सर्वांस शागीर्द मंडळ असें म्हणत होते.

५५. 'Muhammad Nama', Shivaji Nibandhawali vol. 2, Pt-3, p. 79.

बुस्तान सहावें

# महंमद आदिलशाहा

१. ईश्वर तेजस्वी ठेवो प्राण त्याचे असा जो सुलतान महंमद आदिलशाहा प्रकर्णं वर्णन :

ईबराहीम आदिलशाहा मरण पावला[1] तेव्हां मिरजा महंमद अमीन व दौलतखान या उभयतांनीं पादशाहा मरण पावल्याचें वर्तमान गुप्त ठेऊन दरवाजे बंद केले व येण्याजाण्याकरितां दिंड्या मोकळ्या ठेविल्या. येखलासखानु व दियानतुलमुल्क व आका रजा व बाहामनी मंडळी व दौलतीकडील मुत्सद्दी मंडळीस बोलाऊन एक एक चाकरास दिवाणखान्यांत आणिलें आणि महालांतून खाज्याकडून पादशाहाचा निरोप येखलासखानास सांगून पाठविला कीं, पादशाहा आज्ञा करित आहेत कीं मी वारल्यानंतर सुलतान महंमद यास तक्तावर बसवावें. कारण कीं, पादशाही तक्तास व मुगुटास शोभावयाजागा तोच आहे. असा निरोप ऐकतांच दियानतुलमुल्क याणी मस्तक उंच करून बोलला कीं, हें कठीण आहे कीं वडील पुत्र असतां धाकटे पुत्रास पुढें करतात. हें करणें संपूर्ण दक्षिणी लोकांसारखें आहे. कारण कीं, मस्तक सोडून गुडघ्यास मुंडावळ बांधितात असें दिसतें, म्हणजे हें करणें विपर्यस्त दिसतें. दौलतखान हा दांडगेपणा व माजुरपणाविसीं मुर्ख होता, म्हणजे फार उद्दाम होता. तो दौलतखान हें बोलणें ऐकून दियानतुलमुल्कावर रागास येऊन बोलला कीं, आम्हीं तुम्हांस विचारित नाहीं. तुम्ही आपले ठिकाणीं उगीच असा. तेव्हां दियानतुलमुल्क उत्तर ऐकून स्तब्ध राहिला. नंतर दौलतखान याणी येखलासखानास विचारिलें कीं, आपण कसें सांगता? येखलासखान याणी उत्तर दिल्हे कीं, या प्रकर्णी बरीसाहेबास सला विचारावी. मी पादशाहा वारल्यानंतर कारभार करणार नाहीं. दौलतीकडील जमाखर्चाचे कामकाजापासून हात आखडीन, म्हणजे मी काम पाहणार नाहीं. दरविपशाहा व सुलतान महंमद हे उभयतांहि माझे धण्याचेच पुत्र आहेत. आपले व बरीसाहेबाचे विचारास येईल त्याजला तक्तावर

१. "Ibrahim Adilshah died on Wednesday, the 11th Muharram, A. H. 1037 (12 Sept. 1627) and was buried in Zuhrapur.-Md. Nama, Shivaji Nibandhavali, Vol. 3, Pt. 3, p. 79. शाहाजी कैफियत, काव्ये सं. भाग ३१ वा.

बसवावें. हें उत्तर ऐकून दौलतखान हा तेथून निघोन बरीसाहेबाचे दरबारांत येऊन दौलतखान याणी सदरहु विनंति केली. तेव्हां बरीसाहेब याणी उतर दिल्हे कीं, ईब्राहीम आदिलशाहा याणी ज्या पुत्रास तक्तावर बसवावयाविसीं आज्ञा केली आहे त्यासच तक्तावर बसविला पाहिजे.

## २. सुलतान महंमद याणी तक्तावर बसणें प्रकर्ण वर्णन :

नंतर मिरजा महंमद अमीन् व दौलतखान् या उभयतांनीं तारिख ११ माहे मोहरम सन १०३७ (१२ सप्टेंबर १६२७) सालीं अडीच घटका दिवसानंतर पादशाहाचा पुत्र श्रेष्ठ व ऐश्वर्यवान सुलतान महंमद यास पंधरा वर्षाचे वयांत [२] तक्तावर बसऊन मुलकास व मुसलमान लोकांचे जातीस शोभिवंत केलें. येकूलासखान यास घरास जाण्याचा निरोप दिल्हा, म्हणजे घरास घालऊन दिल्हा. दियानतुलमुल्क व आका रजा व बाह्मनी लोकांस एके कैदखान्यांत कैद करून पादशाहाचे प्रेतास स्नान घालून व कफन, म्हणजे प्रेतावर वस्त्र घालून, त्या प्रेतासमागमें संपूर्ण कारभारीमंडळ व सर्व लहान थोर समागमें देऊन जोहरापूरचे रवन्यास तें प्रेत रवाना करून तो जवाहिराची संदुक भूमींत पुरला, म्हणजे पादशाहाचें प्रेत जमिनींत दफन केलें. नंतर दरविषशाहाचे डोळ्यांत सलई फिरऊन अंध केला. सुलेमान याचे आंगठी घालणेचें बोट तोडिलें. दुसरा सर्वाहून लहान पुत्र होता त्याचेंहि बोट तोडिलें. हा संपूर्ण बंदोबस्त केल्यानंतर दियानतुलमुल्क, आका रजा व बाह्मनी लोक यांजला कैदेंतून सोडिलें. दुसरे दिवशीं वजीरलोक, मानकरी व कारभारी मंडळ याणी सुदैववान व तरुण सुलतान महंमद पादशाहापुढें सेवेचें मस्तक जमिनीवर ठेऊन म्हणजे सर्वांनी सुलतान महंमद यास मुजरे केले. पादशाहास मुबारकबादी देते झाले. पादशाहा किषवरसीतान आहे असे सर्वत्र बोलते झाले. सुलतान महंमदशाहा तक्तावर बसल्याची तारिख "किषवर-सीतान" या अक्षरांत बांधली आहे. 'किषवरसीतान' हीं अक्षरें अबजदचे हिशेबानीं गणिलीं असतां १०३७ (१६२७ इ. स.) सालचा सन निघतो, म्हणजे या सालीं सुलतान महंमद तक्तावर बसला. आका रजा यास मुलकी कामाचा कारभार दिला. दियानतुलमुल्क यास सरखेलीचें पद दिल्हें. मिरजा महंमद अमीन याजला मुस्तफाखान असें पद दिल्हें. दौलतखान् यास खवासखानीचें पद प्राप्त झालें.

२. "Muhammad Adil Shah was born in Nasarapur in the month of Zilqada on Sunday night of the year A. H. 1022" (Dec. 1613). Md. Nama p. 79.

## ३. बुरहान निजामशाहा याणी फौज घेऊन आदिलशाहाचे मुल्कावर चालून येणें व निजामशाहाचा मोड होऊन त्याणी परत जाणें प्रकर्ण :

सुलतान महंमद पादशाहा गाजी तक्तावर बसला त्या सालीं निजामशाहा याणी आदिलशाहाचा मुलुक घेण्याकरितां खुद जातीनें समागमें फौज घेऊन निघोन आधी कबस धारुरचा किल्ला घेण्याकरितां सदरहु किल्यावर चालून आला. तेव्हां श.१५४९ सुलतान महंमद पादशाहा गाजी याणी या गोष्टीची खबर कळतांच आपली फौज अमीरलोकांसहित तिकडे रवाना केली. आदिलशाहाची फौज शत्रूचे संनिध जाऊन पोहचली तेव्हां दोहीकडील फौजेंचा सामना झाला व दोनीहि फौजा एकमेकांचे मोकाबल्यावर उभ्या राहिल्या. शस्त्राग्नि प्रदिप्त होता झाला, म्हणजे परस्परें शस्त्रें चालूं झालीं. एके दिवशीं मोठें दारूण युध्ध झालें. प्रात:काळपासून सायंकाळ-पर्यंत एकसारिखी लढाई झाली. शेवटीं यशाचा व जयाचा वायु पादशाहा गाजी याचे ध्वजावर वाहता झाला, म्हणजे सुलतान महंमद पादशाहास यश आलें. निजामशाही लोकांनीं रणभूमीपासून तोंड माघारे फिरविलें. आदिलशाहाकडील लोक विजयी व यशस्वी होऊन माघारे फिरून आपल्या डेऱ्यास येऊन विश्रांति घेते झाले. कित्येक दिवसानंतर निजामशाही लोकांनीं पाठीवर टाकून, म्हणजे कांहीं दिवस हा भाव न दिसों देतां आपली जमात जमविली आणि पुन्हां आदिलशाहाचे फौजेवर चालून आले. आदिलशाहाकडील लोक हुशार झाले नाहींत तोंच, म्हणजे आदिलशाहाकडील लोकांस येविसीची खबर लागली नाहीं तोंच, आदिलशाहाकडील साआदतखान व आतेमदखान या उभयतांस धरून नेले. तेव्हां निजामशाहा याणी या उभयतांस ईजा व दु:ख न देतां हुजुर आणविलें. उभयतांस पोषाख दिल्हे आणि परत जाणेंविसीं हुकूम दिल्हा. तेव्हां आदिलशाहाची फौज तेथून निघोन श्रीकृष्णातीरास उतरून विश्रांति पावती झाली.

## ४. निजामशाहाची फौज दुसरे वेळ विजापुरावर चालून येणें आणि पुन्हां शिकस्त होऊन म्हणजे मोड होऊन परत जाणें प्रकर्ण :

कांहीं दिवसानंतर हमीदखान म्हणोन निजामशाहाचा मोठा संभावित कारभारी होता. त्या हमीदखानाचे शिकविण्यावरून व भकलविण्यावरून निजामशाहा याणी पुन्हां फौज तयार करून तें लष्कर समागमें घेऊन आदिलशाहाचे मुल्कावर चालू झाला. पूर्ण धैर्य धरून आपले सरहदींतून निघोन पाय पुढें टेविला, म्हणजे आदिलशाहाचे सरहदींत चालू झाला. विजापूर शहरानजिक येऊन

पोहचून दंगा करण्यास प्रारंभ केला. विजापूर ताब्यांतील तर्फेतर्फेतील गांवोगावीं दौड करणें व लुटालुट करण्यास प्रारंभ केला तेव्हां आदिलशाहा याणी नबाब खानबाबा व येखलासखान व दुसरे कित्येक अमीरलोकांस खासखेल व यआतेमादखान सरनौबत याजला समागमें त्याचे पारपत्यावर, म्हणजे निजामशाहाचे पारपत्यावर, नेमिलें. कदरीकंदोरीचे नजिक जाऊन उभयतांकडील फौजेंचा सामना झाला. मोठें दारुण युध्ध चालू झालें. मोठा शस्त्रप्रळय होता झाला. हमीदखान हा निजामशाहाकडील सरलष्कर होता. त्याचें धैर्य ठरेनासें झालें तेव्हां भयाभीत होऊन रणभूमीपासून हमीदखान याणी तोंड माघारें फिरविलें. निजामशाहाकडील दुसरे अमीरलोकांनीं यद्यपि धैर्य धरून फार उशीर ठरून राहिले. परंतु शेवटीं यआतेमदखानाचे शूरत्वाचे प्रळयानें निजामशाहाकडील धैर्य धरून टरलेले अमीरलोकांतहि घाबरेपणा उत्पन्न झाला. तेव्हां ते निजामशाहाकडील लोक अपेश पावोन आपले मुलकास जाते झाले. आदिलशाहाकडील अमीरलोक पूर्ण मनोरथी व यशस्वी होऊन विजापुरास परत येते झाले. अशा समयांतच वर्तमान येऊन पोहचले कीं, बंकापूर येथील मुख्य कामदार याणी बेमानपणा म्हणजे धण्याशीं बदलणेंचा भाव धारण करून फंदफितूर वगैरे दंगा व बंडाई करण्यास प्रारंभ केला आहे. असें वर्तमान कळतांच आदिलशाहानीं त्याचे पारपत्यावर व त्याचा निर्मूळ फडशा करण्याचे कामावर मीर आंजूना यास रवाना केलें. रजा अली बंकापुरानजिक पोंहचला तेव्हां कदमराव याणी दांडगेपणा व माजुरपणा करून मोकाबल्यावर उभे राहून युध्धास तयार झाला. परस्परें उभयतांत वरचेवर लागोपाठ लढाया झाल्या. त्याचे दांडगेपणाचें व बेमानपणाचें कर्म एक वर्षपर्यंत लांबलें. शेवटीं मोठा शस्त्रप्रळय व बहुत लढाया झाल्यानंतर कदमराव मिरजा अलीचे हातीं सांपडून कैद झाला. बहुत दांडगेपणा व माजुरपणा केला या शिक्षेबद्दल कतल जाहला.[3] मिरजा अली रजा तेथील कामाचा बंदोबस्त केल्यानंतर विजापुरास परत येता झाला.

५. निजामशाही राजधानींत पुन्हां नवीन दंगा व धांदल व फंदफितुर वगैरे होणें व ती राजधानी कमी होण्याचीं कारणें आरबी वाक्यांत लिहिले-प्रमाणें उत्पन्न होणें :

आरबी वाक्याचा अर्थ : " ईश्वर जेव्हां एखादे पदार्थाची ईच्छा करितो तेव्हां त्या पदार्थाप्रकर्णी सरंजाम जमवितो. जाणलें पाहिजे कीं, ईश्वराचा मनोधर्म व ईश्व-

३. " The siege of Bankapur lasted for 12 months and then on the 10th Rabiul-awwal, A. H. 1038 (28 Oct. 1628) Kadamrao was killed."–Md. Nama, p. 80.

राची ईच्छा त्या गोष्टीवर चालू झाली कीं हरएक राजधानी व हरएक दौलत दिवसें-दिवस वृध्दिंगततेंत, म्हणजे अधिक वाढण्यांत, आणावी, असें ईश्वराचें मनांत आलें असतां तेथें जी मसलत व जो विचार ठरेल त्यापासून कल्याणाचें व उत्तमपणाचें फळ प्राप्त होतें. कामाचा बंदोबस्त दिवसेंदिवस उत्तमपणानें व दुरूस्तपणानें होतो. जरकरितां ईश्वराचा संकल्प राज्य कमी करण्याविषयीं व राज्य बुडविण्याविषयीं झाला म्हणजे मोठीं मोठीं कामें केलेले विचारवान पुरुष पूर्ण अकलेनें व उत्तम धीरानें बहुत विचार करून युक्ती काढतात, विचार ठरवितात आणि सला देतात. परंतु त्या विचारापासून अधिकच संकल्प निर्माण होतात. बहुतच खराबी होती. आरबी वाक्याचा अर्थ : " जेव्हां दैवयोग संनिध येऊन पोहचतो तेव्हां सर्व विचार वाट चुकल्यासारिखे होतात, म्हणजे प्रारब्ध योग उलटतो तेव्हां सर्व विचार व्यर्थ होतात." या प्रमाणें ज्या कामाचा विचार करावा तो उलट प्रतिबंधक होतो. या बोलण्यांतील विस्तार व सारांषांतील तपशील हा आहे कीं, हमीदखान हा बुरहान निजामशाहाचे राजधानींतील मुख्य वकील विश्वासु होता. त्याणी मसिक अंबर याचा पुत्र फत्तेखान याज- मलिक
विसीं कपट व वैरभाव धारण करून नाना प्रकारचे भाषणानें व आशा दाखवून निजाम-शाहाचें मन फत्तेखानावरून फिरऊन निजामशाहास असा त्रासविला कीं, बुरहान निजामशाहा याणी नानाप्रकारचे बाहान्यानीं फत्तेखानास धरून कैद करून टेविला. हें कर्म प्रसिध्ध होण्यानीं दौलतीकडील संपूर्ण कारभारीमंडळ व कामदार बुरहानशाहापासून फार भयाभीत होऊन आपला प्राण कसा वाचेल व आपली अब्रु कशी राहील या आपआपले फिकिरींत पडले. हर एक आपल्यास निर्भयस्थान कसें मिळेल व आपलें संरक्षण कसें होईल येविषयींचे विचार करित होते. त्या मंडळीपैकीं जाषवराव जाधवराव
म्हणोन त्या दौलतीकडील सर्व कारकून मंडळींत श्रेष्ठ व सर्व कामगारांत संभावित होता. तोहि भयाभीत होऊन विचारांत पडून आपले रक्षणाचे फिकिरींत पडला. जाधवराव याणी पळून जाण्याचा व मोंगलाचा आश्रय धरून राहाण्याचा निश्चय केला. तोंच एकाएकीं या मसलतीपैकीं थोडीशी बातमी बुरहानशाहास कळली. तव्हां बुरहान निजामशाहा फार आंदेशांत पडून व भयाभीत होऊन या प्रकर्णी येखलासखान व हमीदखान या उभयतांस मसलत विचारिता झाला, कीं जाधवराव पळून गेला. हा ईकडील माहितगार व संपूर्ण लहानमोठे कामांत पूर्ण माहितगारी त्याजला आहे न जाणो मोंगलाचे पाठीसी पडला तर नानाप्रकारचीं संकटे उभीं करील. फंदीफितुर चालू करील. मग कांहींएक विचार चालावयाचा नाहीं. असे बुरहान निजामशाहा बोलले. तेव्हां येखलासखान व हमीदखान या उभयतांनी विनंती केली कीं आम्हांस सला विचाराल तर ही बरी गोष्ट आहे कीं, जाधवराव यास कैद करावें व त्याचा पुत्र अचलोजी याजला तालुक्याचे कामावर नेमून तिकडे रवाना करावा. ही मसलत व ही तजवीज ठरली तेव्हां बुरहान निजामशाहा याणी फरहादखान व सफदरखान

या उभयतांस आज्ञा केली कीं, मोतीखान खटाल याचे योगानें जाधवराव यास कैद करून आणावें. अशी आज्ञा केली. तेव्हां एके दिवसीं जाधवराव हा चाकरीकरितां दरबारांत आला. तेव्हां बुरहान निजामशाहा एक क्षणभर दरबारांतून उठोन एकांतांत गेला होता. सफदरखान, फरहादखान व मोतीखान याणी जाधवराव व त्याचा पुत्र या उभयतांवर धाऊन जाऊन जाधवराव याचे व त्याचे पुत्राचे हातीं तरवारी होत्या त्या हिराऊन घेतल्या. जाधवराव याणी व त्याचे पुत्रानीं विपरित वैरभावाचा रंग पाहून कंबरेस कट्यारी होत्या त्या घेऊन त्या तिघांवर चालू झाले. शस्त्रें मारूं लागले. शेवटीं जाधवराव याजला सफदरखान याणी तरवारीचा वार केला. त्या जखमेनीं जाधवराव ठार झाला. जाधवराव याचा पुत्र याच मारामारींत तो कित्येक शिपाई लोकांचे हातून ठार झाला.[४] जाधवराव याचा बंधु जोताजीराव हा कुतलगचे हौदावर उतरला होता तो हा प्रळय पहातांच फार सुमाट पळून जाऊन मोंगलाचा आश्रय धरून राहिला. जाधवराव याचा जावई शाहाजी भोसला म्हणोन होता व तो परांडयाचे आसपास राहात होता तो हें वर्तमान ऐकतांच संगमनेराकडे पळून गेला व तिकडून लुटालुट करित पुण्यास आला. मोठा दंगा आरंभिला. फंदफितूर वगैरे संकटें उभीं केलीं. निजामशाहाचा मुलुक आसपास होता तो व तसाच आदिलशाहाचा मुलुक आसपास कित्येक होता तो बलात्कारानें व दांडगेपणानें हस्तगत केला आणि त्या मुलुकाचा मालक झाला. खवासखान याणी हें त्याचें माजुरपणाचें व दांडगेपणाचें वर्तमान ऐकण्यानीं मुरारी याजसमागमें बहुत लष्कर देऊन त्याचे पारपत्य करण्याकरितां व त्याचा समुळ फडशा करण्याकरितां विजापुराहून रवाना केला. शाहाजी याणीं जेव्हां चहूंकडून संकटाचाच अग्नि आपलेकडे पाहिला तेव्हां श्रीनिवासराव म्हणोन जुनर येथील सरनाईक व मुखत्यार व मालक होता त्यासी सख्य करून त्याचे पाठीशीं पडला. मुरारी याणीं पुणें[५] व इंदापूर वगैरे महाल शाहाजी भोसल्याची रहावयाची स्थानें, म्हणजे वाडे वगैरे, सर्व जाळून निखालस फडशा केला. पुण्यापासून सोळा कोशावर भेलसार डोंगर आहे त्या डोंगरावर किल्ला बांधून त्या किल्याचें नांव दौलतमंगल[६] असें ठेविलें. रायाराव

४. "शके १५५१ श्रावणे पुर्णिमेस (२५ जुलै १६२९) लुखजी जाधवराव निजामशाहानी मारिलें."— जेशका. पृ. १६ व शिवाशका पृ. ५४, शिचप्र.

५. शके १५५२ (१६३०–१ इ. स.) मुरार जगदेव इदलशाही मोठे फौजेनिसी निजामशाईवर चालोन आले. पुणा कसबा वस्ती जाळून गाढवाचा नांगर पांढरीवर धरिला. सात आठ वर्षे कसबा ओस पडला होता. पहार रोवली होती."— सहा कलमी शकावली, शिचप्र, पृ. ७०–७१.

६. शके १५५६ (१६३४ इ. स.) मुरार जगदेवराऊ यांणी भुलेश्वरानजिक डोंगरावर दौलतमंगळ किल्ला बांधिला."— सदर पृ. ७१.

याजला दोन हजार स्वार समागमें देऊन तेथें ठेवीलें चंदरराव व राजाराव व दळवी वगैरे सरदार रायाराव याचे समागमें दिल्हे होते ते तळकोंकण हस्तगत करण्याकरितां नेमले. दाभोळचे तर्फेकडे पाठविले. आपण विजापुरास निघोन आला. शाहाजी भोसला हा श्रीनिवासरायाचे पाठीशी पडोन जुन्नर येथें येऊन राहिला होता. तेथें राहण्यास मजबूत जागा व पक्के बंदोबस्ताचे घर दिसेना. यास्तव पेमगड म्हणोन किल्ला बहुत खराब होऊन मोडकळीस आला होता व पडपडा होऊन वोसाड पडला होता पुन्हां नवीन बांधून किल्ला पक्का मजबूत तयार करून त्या किल्याचे शामगड असें नांव ठेविलें. तेथें राहून सावकाशपणानें व युक्तीनें पांचसहा हजार स्वारांची जमात जमऊन त्यातर्फेतील शहरें व किल्ले हस्तगत करूं लागला. बालाघाटचा मुलुक, जुन्नर व संगमनेरपासून अहमदनगरापर्यंत व दौलताबादेपर्यंत सर्व मुलुक हस्तगत केला. पूर्ण प्रबळ झाला. बाजी दळवी वगैरे यांस मुरारी याणें नाव लिहून तळकोंकण हस्तगत करण्याकरितां पाठविलें होतें. यास्तव ते दाभोळचे मार्गानें येऊन महाड, कोरेगाव, निजामपूर व कित्येक पेठे मोठे वसुलाचे होते ते सर्व तिकडील तर्फेतील हस्तगत केले. सिद्दी मर्ज्यान् ईनायतुल्लाखानी हा तळकोंकणचा सुभेदार. हा निजामशाहाकडून सुभेदारीचे कामावर नेमणुकीवर होता. तो चेवळ (चौल) येथून निघोन त्याचे पारपत्यावर धाऊन आला. उभयतांचा मोकाबला झाल्यानंतर युध्ध व लढाई सुरु झाली. सिद्दी मर्ज्यान हा त्या युध्धांत ठार झाला. नंतर निजामशाही लोकांच्या जमातीची मोटी शिकस्त झाली. आदिलशाहाकडील लोकांची मोठी फत्ते होऊन त्या आदिलशाही लोकांनीं तो सर्व मुलुक चवेल्याचे (चौलाचे) बंदरापर्यंत हस्तगत केला. बुरहान निजामशाहा याणी हें शिकस्त झालेलें वर्तमान ऐकिल्यानंतर सिद्दी साबा आंबरखानी याजला येखलासखानाचे जमातीसहित आदिलशाहाकडील लोकांचे पारपत्यावर रवाना केला. सिद्दी साबा हा पुण्याचे व जुन्नरचे घाटांतून उतरून आदिलशाही लोकांवर चालू झाला. आदिलशाहाचे लोक चवेळे (चौल) येथें राहिले होते ते सिद्दी साबाचे प्रबळपणानें पळून गेले. कोलारचे संनिध उभयतांचे फौजेंची भेटी झाली. तेव्हां उभयतांत मोठे दारूण युध्ध झालें. त्या युध्धांत बाजी दळवी ठार झाला. बाकीचे लोक परत पळाले. यासमई निजामशाहाचे लोक यशस्वी झाले. सिद्दी साबा याणी चेवळे (चौल) वगैरे आदिलशाहाचे खर्चाकडे आले होते ते युध्ध करून आपले हातीं आणिलें. निजामशाहाचे गज म्हणजे हत्तीखाने येथें होते ते घेऊन कल्याण येथें जाऊन राहिला. याच दिवसांत याकुतखान व उदाजीराव याणी बुरहान निजामशाहास पत्रें पाठविलीं कीं, अशा संकटाचें समयांत, कीं मोंगलसारखा शत्रू समय अवलोकन करित बसला आहे व दौलतीकडील सर्व कारभारी भयाभीत झाले आहेत व जाधवरावासारिखे, कीं तो कदीम चाकरास, कीं तो जाधवराव दौलतीकडील मुख्य कारभारी व मोठा विचारवान

होता तशा सेवकास, खराब करण्यांत काय मसलत पाहिली व यांत कोणता उपयोग मनांत आणिला ? आपले काम मात्र बिघडून घेतलें. आतां सरकारांत असा कोण आहे कीं तो राजधानीचीं कामें चालवील, दौलतीचे कामाचा पक्का बंदोबस्त ठेवील व या प्रकारचे प्रबळ शत्रूचे पारपत्य करण्याकरितां टरून राहील ? असा कोणी नाही. हली एका ग्रहस्थाकडून मात्र हें काम होईल. कारण कीं, या प्रकारचे मोटे कामांत तो शक्तिमान होईल. आम्ही आपले दौलतीचें कल्याण ईच्छिणार आहों. आमचे विचारास व आमचे नजेरस असें येतें कीं, फत्तेखान मोठा शूर तरवार लावणारा आहे व पूर्ण विचारवान आहे. त्याचे बापानीं नाना प्रकारचे संकट व तऱ्हतऱ्हेचे धांदलीचे समई अकल चालऊन व विचार काढून व बहुत शूरत्व व पराक्रम करून राजधानीचा पक्का बंदोबस्त केला व दौलतीकडील पूर्वीपेक्षां अधिक उत्तमपणानें बंदोबस्त केला. त्याचा पुत्र हाहि तसाच आहे. त्याजला कैदेंतून मोकळा करून त्याजला पूर्ण भरोंसा देऊन, खातरजमा करून, चित्तसमाधान करून मुलकाविषयीं व दौलतीविषयीं त्याजला मसलत विचारावी. त्याचा विचार घ्यावा व शत्रूचे पारपत्य त्याजकडून करवावें. अशी विनंती केली त्याजवरून बुरहान निजामशाहा याणी कारभारी मंडळास बोलाऊन फत्तेखान याजला कैदेंतून मोकळा करणेविसीं सल्ला विचारिली. तेव्हां कारभारी मंडळीनीं विनंती केली कीं, फत्तेखान चांगला मनुष्य नाहीं. फत्तेखान फार गर्विष्ट व माझेपुढें कोणीच अकलवान नाहीं, मीच एक अकलवान आहे असें जाणोन मोठा अभिमानी व संकटें उभीं करणारा पुरुष आहे. हाली कैदेत आहे. यास्तव तर त्यांचे मन दुखून त्रास आला आहे. हें प्रसिध्धच आहे. कारण कीं, दुखविलेला सर्प सोडून देणें नीट नोहे. यांत उत्तमपणा नाहीं. न जाणो सामर्थ्य आलें म्हणजे त्यासमई सूड घेण्याचा विचार करील. फतेखान संकटे व फंदफितूर होण्याचें स्थान आहे. हा कैदेंतून मोकळा केल्यास मोटा प्रळय करील. अशी विनंती केली तेव्हां बुरहानशाहा बोलला कीं, फत्तेखानाकडून मोठ्या शफता घेतो आणि तुमचे विचाराप्रमाणें फत्तेखानाकडून करार मदार पक्के करून घेतो. नंतर दौलतीचे बंदोबस्ताचे कामावर नेमितो. अशी आज्ञा केली तेव्हां तें कारभारी मंडळ बोललें कीं, आम्हा सर्वांस आपले कल्याणाची ईच्छा आहे व आपली दौलत कायम रहावी हेंच मनांत आहे. आम्हांस आमची खुद जातीची कांहीएक फिकीर नाहीं. अशी विनंती केली तेव्हां बुरहान निजामशाहा याणी येखलासखान व फरहादखान यांजला फत्तेखानास कैदेंतून आणविणेंकरितां रवाना केलें. जेव्हां हे सर्व किल्यांत जाऊन फत्तेखानास सोडऊन पालखींत बसऊन त्या पालखीचे पडदे सोडून कैदखान्यांतून किल्याचे बाहेर आणिलें तेव्हां फत्तेखान या मंडळीस बोलला कीं, मजला झांकून पालखीवर पडदे सोडून नेण्याचें कारण काय आहे ? बुरका काढा व पालखीचे पडदे गुंडाळून बांधून टाका, असें बोलला. येखलासखान वगैरे याणी मनांत आणिलें कीं, जरकरितां आपण मनाई करूं व फत्तेखान

सांगतो याप्रमाणें न ऐकूं तर हा मोठा आपला शत्रू होईल. असें जाणोन पालखीवरील बुरखा काढला आणि उघडपणानें चालू झाले. तेव्हां रस्त्यामध्यें दोन्ही बाजूनेंहि जो ग्रहस्थ पुढें येत होता तो फत्तेखानाची स्वारी पाहून पुढें येऊन फत्तेखानाची बहुत तारिफ करित करित व तुझे कल्याण असो असें म्हणत म्हणत मुजरा व सलाम बहुत मर्यादेनें करित होता. जो ग्रहस्थ पुढें येईल तो बोलत होता कीं, फत्तेखान हा मलिक अंबर याचा पुत्र आहे. असे म्हणत होता व असेच नजरा करित व वोवाळण्या टाकित दरबारापर्यंत घेऊन आले. हुजूर आले तेव्हां बुरहान निजामशाहा याणी मोठे समारंभानें व बहुत आदरानें त्याची भेटी घेऊन फत्तेखानावर बहुत मेहरबानगी केली. बहुत योग्यता वाढविली. फत्तेखानास बहुत पोषाख दिल्हे. बुरहानशाहा याणी मनांत होतें त्याप्रमाणें फत्तेखानाकडून शफता व करार मदार ठरऊन घेऊन फत्तेखानास आज्ञा[७] केली कीं, तुम्ही आपले तीर्थरूपाचे चालीप्रमाणें मीठाचें इमान जागवावें. माझा प्राण संरक्षण व आपले धण्याचे राजधानीचें संरक्षण करावें. या करण्यांत ईश्वराचे संनिधान प्राप्त होण्याचें फल आहे. असें केलें असतां ईश्वरापाशीं योग्यता पावशील. अशी आज्ञा केली आणि घरास जावयास निरोप दिल्हा. फत्तेखानास रहाण्याकरितां सलाबतखानाचा वाडा दिल्हा. नंतर राजधानीचा कारभार फत्तेखानाकडे रुजु केला, म्हणजे दौलतीकडील सर्व कारभार फत्तेखानानीं पाहून सर्व कामें फत्तेखानाचे वशिल्यानीं चालत होतीं. नंतर थोडकेच दिवसांत दौलतीकडील सर्व कामाचा बंदोबस्त दुरुस्तपणानें झाला. सर्व लोकांस आतां आपलें चांगले होईल अशी उमेद प्राप्त झाली. कित्येक दिवसानंतर बुरहान निजामशाहास वेड लागण्याचे भावनेपैकीं एक भावना झाली. तेव्हां फत्तेखान याणी त्या रोगाचा उपाय करण्याविषयींचा विचार करून बुरहान निजामशाहास सरकारवाड्यांतील महालांतून काढून आपण सलाबतखानाचे वाड्यांत राहत होता तेथें आणिलें. आपण दुसरे जागीं जाऊन राहिला. पादशाहास नीट होणेंविषयीं बहुत उपाय करित होता. बुरहान निजामशाहास वेड लागल्याची भावना झाली होती. तो रोग दोन महिने लांबला. शेवटीं बुरहान निजामशाहा हा त्याच भावनेनें व आयुर्दाय सरला या कारणानें मरण पावला. सर्व लोक असे बोलतात कीं, बुरहान निजामशाहा याणी मरण पावण्यास कारण फत्तेखानच झाला.[८] असें बोलतात. ईश्वर जाणो !

७. "शके १५५२ पौष वद्य येकादशी ( १८ जानेवारी १६३१ ) फत्तेखानास सोडून मज्यालस दिली."— जधेशका पृ. १६. परंतु शिवाशका. पृ. ५४ " वा १३ ( २० जानेवारी १६३१ ) स मजालस दिली" असें अधिक म्हटलें आहे.

८. "शके १५५३ (१६३१-२ इ. स.) फत्तेखानानें बुऱ्हान निजामशाहा मारिला."— जेशका. पृ. १६ व शिवाशका. पृ. ५४, शिचप्र.

६. बुरहान निजामशाहा याची राजधानी बुडणेंचें कारणांपैकीं कांहीं मोठीं कारणें लिहिलीं जात आहेत :

प्रथम मोठें कारण हें कीं, मित्रमंडळींचे व दोस्तांचे चित्त दुखवलें आहे. या बोलण्याचा विस्तार व या भाषणांतील तपशील हा आहे कीं, कैलासवासी ईब्राहिम् आदिलशाहा पादशाहा आपले कल्याणप्रद कारकीर्दीत निजामशाही लोकांचे साह्य करण्याविषयीं त्यास मदत देण्याकरितां बहुत यत्न करित होता. निजामशाही राजधानीचे बंदोबस्ताकरितां पूर्ण यत्न करित होता. यद्यपि निजामशाही लोकांकडून बहुत वेळ आदिलशाहाशीं बेमुरवतपणा, म्हणजे निर्भीडपणाचा मार्ग व खोडसाळपणाच्या चाली प्रसिध्द होत होत्या. मित्राशीं बदलूं नये, कारण कीं, मित्राचा व व शेजाऱ्याचा हक सर्व हकदारांहून अधिक आहे अशी ईश्वराची सत्य आज्ञा चालू आहे त्या आज्ञेपासून गाफील राहिले. मित्राचे व शेजारी राहणाराचे, म्हणजे दोस्तांचे हकावर नजर न ठेवितां निरंतर आदिलशाहाचे मुल्कावर फौज घेऊन चालून येऊन बहुत उपद्रव करित होते. परंतु सहनशीलतेचा व विचाराचा पर्वत, म्हणजे आदिलशाहा, याणी निजामशाही लोकांचे हें कर्म मनांत न आणिता डोळेझांक करून, म्हणजे क्षमा करून, निजामशाहाकडील लोकांचे या अयोग्य वर्तणुकीपासून वैरभावाचा धुरळा आपले अंत:कर्णाचे पदरावर ठेऊं देत नव्हता, म्हणजे निजामशाही लोकांकडून बदचाली जाहिर झाल्या असत तत्रापि त्या वागणुकीवरून आदिलशाहा आपले मनांत कांहींच वाकडेपणा धरित नव्हता आणि क्षमा करित होता. निजामशाहा पादशाहाकडील मंडळीवर ज्यासमई कांहीं संकट येत होतें तेव्हां आदिलशाहा आपण जातीचे पराक्रमानें व युक्तीनें त्यांचे साह्य करित होता. मदत देत होता. मोगलाचे उपद्रवांत व दिलीवाल्याचे हल्लेत जर करितां आदिलशाहाकडून मदतीचे बदल पाठपुराव्याचा आधार न मिळता तर हे जगते कीं काय ? कारण कीं निजामशाही लोकांस मोंगल ईतका अवकाश व फुरसत कां पडूं देते ? या बोलण्यांतील सत्य भाव हा आहे कीं, हिंदुस्थान येथील वकील खानखाना वारला. अकबरशाहापाशीं व जहांगीर पादशाहापाशीं हुजूर येऊन बोलत होते कीं, ईब्राहीम आदिलशाहा त्या प्रकारचा माणुस आहे कीं, जेव्हां निजामशाही लोकांचे साह्य करितो तेव्हां पर्वतासारिखा धैर्य धरून उभा रहातो आणि या पाठबळाचे आधारानें आपला शत्रु पर्वत असला तत्रापि गवताचे काडीसारिखा होतो. सारांश, ईब्राहीम आदिलशाहास निजामशाही राजधानीची निरंतर शाश्वती असावी हें मंजूर व जरूर होतें. याच कारणास्तव आदिलशाहा याणी मलिक अंबर याचें साह्य केलें. येथपर्यंत मदत दिल्ही कीं, त्यास गणीत नाहीं. मलिक अंबर ईतक्या योग्यतेस चढला व थोरपणास पावला व सर्वोपरी मजबूत झाला हें सर्व आदिलशाहाचे आधारावर होतें. आदिलशाहाचे

मेहरबानगीनें व पालन करण्यानें मलिक अंबर हा ईतके श्रेष्टतेचे पदवीस पोहचला. परंतु मलिक अंबर हा आपले मूळ उत्पत्तींत असल जातीचे जवाहिर ठेवित नव्हता, म्हणजे मलिक अंबर हा नीच कुलीचा आहे, कुलीन नव्हता. त्याचे उत्पत्तींत अंतर होतें, म्हणजे खरे बीजाचा नव्हता. कुरान परिक्रमध्यें ईश्वर आज्ञा करितात कीं, आमचे सर्व सेवकांत कोणीच सेवक उत्तम नाहीं. यांतील तात्पर्य हें आहे कीं, चाकर असोन ईमानी असणें दुर्मिळ आहे. हरएक पदार्थ आपले मूळ बीजाचे गुणांवर जातो.'' या वाक्याप्रमाणें हरएक मनुष्य किंवा पदार्थ आपले जातीचा गुण प्रसिध्द करितो. याप्रमाणें मलिक अंबर याणी आपले येजमानास, म्हणजे आदिलशाहास, शेवटीं बहुत त्रास दिल्हा. आदिलशाहाचे चित्त फार दुखविलें. युध्दसमई मलिक अंबर याणी दांडगेपणानें विजापुर व नवरसपूर लुटण्याविसीं अशी अमर्यादा व असा बेमुरवतपणा केला कीं, आपले धण्याचे सेवेची मर्यादा संरक्षण करण्यावर कांहींएक नजर न ठेवितां गैरराहा वागणुक केली. या कारणास्तव रयतेस आधार देणारा जो आदिलशाहा पादशाहा याचें चित्त मलिक अंबरावरून व निजामशाही लोकांवरूनहि फिरलें, म्हणजे विटलें. आदिलशाहा याणी फार त्रास स्वीकार केला, म्हणजे फार त्रासला. या प्रकारें कीं तो आदिलशाहा सहनशील व विचारवान असतां : आरबी वाक्याचा अर्थ : “सहनशील पुरुषाचे क्रोधापासून संरक्षण होण्या-करितां मी ईश्वरापाशीं आधार मागतो : कारण कीं सहनशील पुरुषास आधीं क्रोध येत नाहीं व ज्या वेळेस येतो त्या वेळेस निःशेष फडशा करितो.'' याप्रमाणें इब्राहीम आदिलशाहा क्षमाशील व सहनशील असतां त्याणीं सहनशीलता एकीकडे ठेऊन सूड घेण्याचा इरादा करून निश्चय ठरविला कीं, निजामशाही लोकांचें घराणें फडशा करावें. निजामशाही लोकांपैकीं एक खुणेस देखिल बाकी राहूं देऊं याजकरितांच नवाब मुस्तफाखान हा हली सुलतान महंमद गाजी याचे कारकीर्दीत ईच्छित होता कीं, मोगलास सख्य करून निजामशाहाचा उच्छेद करावा. याच विचारांत होता तोंच इतक्यामध्यें सन १०३८, (इ. स. १६२९ ते १६३०) सालीं शहाजहान पादशाहाचा शेख मुश्नुद्दिन[१] या नांवाचा वकील बादशाही तख्तावर बसल्याचे मुबारकबादीचें पत्र घेऊन येऊन पोहचला. पादशाहाचें बक्षिस देण्यानीं श्रेष्ठता पावता झाला. मुस्तफाखान याणी संधी पाहून खवासखान याचा विचार घेता झाला. निजामशाहाचा उच्छेद करणेकरितां मोंगलाशीं सख्य करण्यास्तव व निजामशाहाचा मुलुक निमेनिम वाटून घेऊन हस्तगत करण्याकरितां विचार शिकविता झाला. नानाप्रकारें लोभ दाखऊन व आशा दाखऊन आशा

x See P. 304 मुईज...

१. “On 10th Jamadiula-wwal, 1041 A. H. (24 Nov. 1631) Shaykh Mughamiya ambassador of Shah Jahan came and it was settled that the kingdom of Nizam Shah may be divided between the two sovereigns.”— Md. Nama, p. 82.

उत्पन्न केली यद्यपि खवासखान व मुराराव व दौलतीकडील सर्व संभावित लोक या गोष्टीस राजी झाले नाहींत. सर्वांचे मनांत होतें कीं, निजामशाहाचे घराणें खराब होऊं नये. याप्रमाणें एके दिवशीं दरबारांत ज्यासमई ही मसलत ठरत होती व या कामाप्रकर्णी विचार ठरत होता तेव्हां काजी सैयद हा अमिरुल उमरा रणदुल्लाखान याचा मोटा संभावित वकील होता त्याणी बादशाहास विनंति केली कीं, अधिक मुलुक मिळविण्याचे आशेनें निजामशाहाचा उच्छेद करणें या प्रकर्णी मोंगलासी सख्य व मित्रता करणें हें माझे दूरवर विचार करणारे अकलेसंनिध योग्य दिसत नाहीं. माझे अक्लेस हें बरें दिसतें कीं, निजामशाहाचे राज्य कायम व मजबुत राहण्याकरितां यत्न करावा. याप्रकर्णी आपले सामर्थ्य आहे तितका प्रयत्न केला पाहिजे. जर करितां निजामशाहाचा उच्छेद झालेस आम्हास मोंगलाचा शेजार प्राप्त होईल आणि मोंगलाची व आपली सरहद एक होईल. जरकरितां मोंगलाशीं कदाचित वैरभाव उत्पन्न झाल्यास मोठे संकट प्राप्त होईल. त्या संकटाचें निवारण आमचे हातून कदापि व्हावयाचें नाहीं. या बोलण्यावरून मुस्तफाखान हा काजी सैयद याजवर बहुत क्रोधायमान झाला. खवासखान याणी हा या मुर्खपणाचे वागणुकीस अयोग्य असे जाणित होता. परंतु खवासखान याणी मुस्तफाखानाशीं करार ठरविले होते. यास्तव हरएक प्रकर्णी मुस्तफाखानाचे सेवेचा व ताबेदारीच्या मार्गाने चालत होता, म्हणजे मुस्तफाखानाचे सांगण्यावरून मोंगलासी मिळाला. पुरातन अमीरलोक अंबरखान, अंकुसखान, सर्जेराव घाटगे वगैरे होते त्यांजला अधिक जाहागिरी देऊन व फरहादखान व खैरतखान यांजला आपल्यासी मिळऊन घेऊन रणदुल्लाखानाचे समागमें देऊन ती फौज मोंगलाचे मदतीवर पाठवण्याचें ठरविलें. तेव्हां आदिशाहा व मोंगल या उभयतांमध्यें सख्य होण्याचे मोकदमे ठरले. निजामशाहाचा मुलुक उभयतांनीं, म्हणजे आदिलशाहा याणी व मोंगलानी निमेनिम वाटून घेण्याचें ठरविलें. उभयतांचे म्हणणें आदिलशाहा व मोंगल या उभयतांचे मनांत होतें त्याप्रमाणें परस्परें करारमदार ठरल्यानंतर सुलतान महंमद आदिलशाहा याणी शेख मुईनुद्दीनसाहेब यास मेहेरबानीनें पोषाख व नक्त ऐवज देऊन निरोप दिल्हा. परंतु ही मसलत ठरण्यानें व निजामशाहाचा उच्छेद करण्याकरितां मोंगलाशीं सख्य करण्याचा विचार ठरण्यानें दौलतीकडील सर्व कामदार व सर्व पुरातन संभावित कारभारी मंडळी निजामशाहाशीं अदावत धारण करण्यास्तव मोंगलाशीं सख्य होण्यामुळें मुस्तफाखान यासी बदलले. वाईट पाहूं लागले. मुस्तफाखानापासून चित्त दुखून फार त्रासून मुस्तफाखानाचा कंटाळा करूं लागले. शेवटीं हळुहळू खवासखान व मुस्तफाखान या उभयतांत वाकडे आलें. तेंहि पुढें लिहिलें जाईल. वकील रवाना झाल्यानंतर थोडकेंच दिवसांत वर्तमान येऊन पोहचले कीं, करार मदार ठरले असतां ते करार मोडण्याचीं कारणें मोंगलाकडून जाहीर झालीं

म्हणजे मोंगलानीं करार ठरलेला मोडण्याचीं कारणें कीं, त्या फौजेनें आपली हद रक्षण करण्याचे जाग्यावर न ठरतां तिकडे मोहरा फिरविला आहे आणि केज धारूरचे किल्यापर्यंत पोहचून वैरत्वाचें मस्तक उचललें आहे.[१०] अशी बातमी येऊन पोहचतांच आदिलशाहा याणी जासुदासमागमें पत्र देऊन तो जलद जासुद मर्ग्यान येथें पाठवून शेख मुइजुद्दीन याजला कैद केलें.

## ८. शहाजहान पादशाहाचे हुकुमावरून आसफखान याणी बहुत फौज घेऊन आदिलशाहाचे मुल्कावर चालून येणें प्रकर्ण :

या मोकदम्यापूर्वी शहाजहान पादशाहा यांणी ख्वाज्या अबुल हसन दिवाण व बक्षी याजला दक्षणदेशाचा बंदोबस्त करण्याकरितां व निजामशाहाचा मुलुख हस्तगत करण्याकरितां बुरहाणपुरावर नेमीलें होतें. ख्वाज्या अबुल हसन यांणीं बुरहाणपुराहून इरादतखान याजला परांड्याचा किल्ला हस्तगत करण्याकरितां नेमिला. नसरतखान याजला कंधरावर नेमिला. तेव्हां नसरतखान याणी कंधारास कोठाराचे घेऱ्याप्रमाणें घेरून हल्ला केला.[११] इरादतखान याणी परांड्यावर जाऊन पोहचून पाहिलें कीं हा परांड्याचा किल्ला सावकाशपणें ढिलाईनें हस्तगत होणार नाहीं. असें जाणून तेथून निघोन धारवाडचे[१२] किल्यावर येऊन त्या किल्यावर हल्ला केला. किल्याचे मोरच्यावर बहुत यत्न केला. कित्येक दिवसांत तो किल्ला सर केला. त्यानंतर नसरतखान याणीहि बहुत यत्न करून कंधारचा किल्ला हस्तगत कला.[८] अशा समयांत वाकडेपणाची खबर व शेख मुईजुद्दीन (Shaikh Mughamiya) कैदेंत पडण्याची बातमी शहाजहान पादशाहास येऊन पोहचली. तेव्हां शहाजहान

धारूर

१०. "On the 23rd Jumadas-sani, Julus 4, 1040 A. H., (17 January 1631)......Azam Khan entered the fort of Dharur."— Bad. Nama, E. D., p. 20.

११. "On the 23rd Jumadal-awwal, Julus 4, A. H. 1040, (18 Dec. 1630) Naziri Khan encamped one kos from the fortress (Kandahar) .....The siege had lasted four months and nineteen days, and the place fell on 15th Shawwal (7 May 1631),"- Bad. Nama. E. D., p. 26 and 27.

१२. Badshaha Nama says: Azam Khan raised the siege of Parenda and went to Dharwad (ED. p. 24). Apparently, the mention of 'Dharwad' is a mistake for Dharur, which was captured on 17th January, 1631–See note 10 above.

पादशाहा याणी नूर जहान बेगम इचा भाऊ असफखान म्हणोन दौलतीकडील सर्व कारभारी मंडळींतून संभावित होता त्याजला दुसरे कित्येक अमीरलोक अबदुल्लाखान, खानाजादखान, बहादुरखान, अमीदतखान, राजा रुपसिंग, राजाराम वगैरे समागमें देवून तिकडे नेमिला. तेव्हां असफखान याणी अमीरलोकांसहित बुरहाणपुरावर जाऊन पोहचून पुढें पाऊल ठेविलें. अबुल हसन व ईरादतखान यांजलाहि आपल्याशीं मिळऊन घेऊन मोठे दबदब्यानें व जरबेनें लुटालूट करित आहसनाबादेपर्यंत जाऊन पोहचून तेथूनहि बहुत फौज फार जमातीचे गर्वानीं शराप्रमाणें चालून पुढें गेला. लुटालूट व खराबी करण्याचा हात उघडून, लुटालूट करित करित विजापुरासंनिध येऊन पोहचला. कांहीं एक भय व अंदेशा मनांत न आणितां रंगाऱ्याचे हौदावर येऊन उतरला. आणि नित्य दांडगेपणानें लुटालूट, तोडातोडी व मारामारी करूं लागला. तेव्हां आदिलशाहाकडील फौजेनींहि त्याचें पारपत्याकरितां पाय कायम करून आदिलशाहाकडील लोक नित्य मोकाबल्यावर चालून येत होते. युध्ध करित होते. तेव्हां एके दिवशीं मोठे दारूण युध्ध उभयतांमध्यें झालें.[13] मोठीच लढाई झाली. त्या युध्वामध्यें व त्या लढाईत शिकंदर आली म्हणोन दिलीवाल्याकडील लष्करांतील नामांकित लोकांपकीं एक अमीर होता तो ठार झाल्यानंतर पांच सहा दिवसानें[१२] मोगलाचें लष्करानीं बहुत सामानसरंजामानिसीं कोटाभोंवतीं वेढा देऊन शहराभोंवतें फिरूं लागले, दांडगेपणा आणि माजुरीपणा करणेस प्रारंभ केला. आदिलशाहाकडून अमीरलोकांनीं मोंगलाचे अत्यंत दांडगेपणा व माजुरपणास्तव किंचितहि दम न धरितां व कांहीं एक अवकाश न करितां अति क्रोधायमान होऊन दक्षणेस शिपाईलोकांसहित एकाएकीं सर्व जमातीनें एकदिल करून हिंदुस्थानी लोकांवर दऊड केली. मोठे लष्करचे शिपायांची फळी मोडून पार होणारे शूराप्रमाणें हल्ला केला. या प्रकारें कीं, मोंगलाचे लोकांचे धैर्य धरून ठरण्याचे प्रबलतेचे बंद तुटले, म्हणजे आदिलशाहाकडील फौजेचे पराक्रमामुळें मोंगल लोकांचे धैर्य ठरेनासें झालें. मोंगलाकडील अमीरलोक धैर्य धरून युध्दांत टरून राहिले होते तेहि घाबरले. ते लोक रंगाऱ्याचे हौदानजिक फौज होती ती फौज वोलांडून, म्हणजे त्या फौजेच्या पलीकडे जाऊन, फार दूर निघोन गेले.[१४] दक्षिणी लोक पराक्रमानें हल्ला करित होते. त्याहून दुप्पट हिंमत धरून मोंगलाचे फौजेवर चालून जाणेचा संकल्प करून मोंगलावर जाऊन पडले, म्हणजे गर्दी केली. तेव्हां आदिलशाही

१३. "The Mughals again attacked on 2nd Shaaban 1041 A. H, (13 Feb. 1632) but were defeated.-Md. Nama, p. 83. पेशजंगचा मुलगा शिकंदर अली हा आदिलशाहींकडून होता असे दर्शविले आहे. परंतु ती बहुधा लेखनाची चूक असावी.–Md. Nama, p. 81.

१४. "At last on 9th Shaaban (20 Feb. 1632) they attacked in full fury....battle ensued....again defeated."-Md. Nama, p. 83.

फौजेपुढें टरण्याची दिलीवाले लोकांत हिंमत व शक्ति राहिली नाहीं. यास्तव आजीनी (?) माघाऱ्या फिरऊन तीहि जागा सोडली. पाट देऊन पळूं लागले. दक्षिणी लोकांनीं जाणिलें कीं, मोंगल लोकांचे धैर्याचा पाय अडखळला, म्हणजे धैर्य सुटलें. असें जाणिलें तेव्हां मोंगलावर हल्लेवर हल्ला करूं लागले. मोंगलाचे फौजेची जमात विसकटून टाकली. मोंगल लोक पळूं लागले. तेव्हां दक्षिणी लोकांनीं मोंगलांचा पाठलाग करणें न सोडतां पाठी लागले. लुटालूट व तोडातोडी करून मोंगलाचें पारपत्य करण्याविषयीं आपणाकडून किंन्चितहि अंतर पडूं दिल्हे नाहीं. मुरारीहि हुजुरून हिंदुस्थानी लोकांचे पाठलाग करण्यावर नेमिला तेव्हां मुरारी याणें सरहदीपर्यंत दिलीचे फौजेचा पाठलाग केला. आपले सरहदींतून बाहेर घालऊन आपण परतला आणि परांड्याचे किल्यावर येऊन राहिला. शा १५५

## ८. मुरारीपंडित याणी सुलतान महंमद आदिलशाहाचे आज्ञेवरून परांड्याचे किल्यावर मुलुकमैदान तोफ विजापुरास आणणें प्रकरणीं :

यापूर्वी बहुत दिवस आका रेजावानी (आका रेझवान) म्हणोन बुरहान निजामशाहाचे तर्फेनें परांड्याचे किल्याचे बंदोबस्ताचे कामावर नेमिला होता. निजामशाहाचे राजधानींत व मुलकांत धांदल झाली तेव्हां आदिलशाहाशीं मिळाला. आदिलशाहाचे सेवेची साखळी आपले गळ्यांत घालून, म्हणजे आदिलशाहाचे सेवेंत एकनिष्ठपणें वागोन परांड्याचा किल्ला आदिलशाहाचे हवालीं केला होता.[१५] सांप्रत मुरारराव हा दिलीवाले लोकांचे पाठी लागोन परत येऊन परांड्याचे किल्यावर राहिला. तेव्हां आदिलशाहाचा हुकूम मुरारराव यास सादर झाला कीं, परांड्याचे किल्यावर 'मुलुकमैदान' म्हणोन तोफ आहे ती तेथून विजापुरास पाठऊन द्यावी. तेव्हां मुरारराव याणी आदिलशाहाचे हुकूमाप्रमाणें 'मुलुकमैदान' ही तोफ परांड्याचे किल्यावरून विजापुरास आणोन तारिख १५ माहे सफर सन १०४२ (२२ आगष्ट १६३२) रोजीं[१६] शाहापूर दरवाजाचे व मलिक दरवाज्याचे मध्यभागीं शहरचे पश्चिमेचे बाजूस बुरुज प्रसिध्द आहे त्या बुरुजावर ठेविली.[१४] ती तोफ बहुत थोर आहे. अष्टधातूची व सीसे वोतलेली व तिचे वजन सांठ खंडी असें म्हणतात. परंतु इंग्रज बहादुर याचे अमलांत एक या कामांतील चतुर कारागीर होता त्याणें शा १५५२

१५. "On 10th Muharram 1042, A. H. (18 July 1632) Aqa Rezwan, whose title was Haibat Khan, revolted against Nizam Shah and offered Parenda to Adilshah."– Md. Nama, p. 81.

१६. Md. Nama, p, 82.

कळासाचे हिशेबानें गणित करून त्या तोफेचें वजन बांधिलें. तें वजन ३२०० रत्तल झालें. एक शेराचे दोन रत्तल होतात. ती तोफ पूर्वी अहमदनगर येथें होती. निजामशाहाचे हुकूमावरून रूमचे कारागीरापैकीं एके कारागिरानें वोतली. रामराजावर स्वारी केली तेसमई हुसेन निजामशाहाचे समागमें ती तोफ होती. ज्या मुशींत ही तोफ वोतली ती मुस अद्यापि अहमदनगरचे शहरापासून एक कोशाचे अंतरावर आहे. त्याची खुण बाकी राहिली आहे. त्या मुलखमैदान तोफेची लांबी लांब लचक उंच पुरुषाचे हातानीं नऊ हात आहे व त्या तोफेचा परीघ म्हणजे घेराहि नऊ हात आहे. त्या तोफेंत गोळा रहावयाची जागा आहे ती बहुत विस्तीर्ण आहे. त्या तोफेंत मोठे जाड अंगाचा पुरुष बसतो असें म्हणतात, कीं त्या तोफेंत जाड अंगाचा पुरुष बसून पागोटेंहि बांधता येईल इतकी विस्तीर्ण जागा आहे. सारांश, तोफ एक पहाण्याजोगें स्थान आहे. या काळांत ती तोफ मोठा चमत्कारिक पदार्थ अपूर्व जिनसापैकीं आहे. चोहींकडे दूरवर प्रसिध्द आहे. जो ग्रहस्थ नवीन विजापुरास येतो तो मुलखमैदान तोफ कशी आहे ती पहावी अशी बहुत बहुत इच्छा धरून ती तोफ बहुत आवडीनें पहातो. जीं मनुष्यें दूरदेशाचे शहरांतून येतात तीं मनुष्यें ही तोफ पाहून फार विस्मित होतात, म्हणजे आश्चिर्य मानितात.

## ९. बुरहान निजामशाहाचे पुत्रास फत्तेखान याणी तक्तावर बसविणें व मोहबतखान याणी दौलताबाद हस्तगत करण्याकरितां दौलताबादेवर जाऊन पोहचणें व सुलतान महंमद आदिलशाहा याणी दौलताबादेचे संरक्षणार्थ मदत पाठविणें :

जेव्हां असफखान याची शिकस्त झाल्याचें व दिलीवाल्याची फौज मोड होऊन परत जाण्याचें वर्तमान शहाजहान पादशाहास कळलें तेव्हां शहाजहान पादशाहास मनांत फार वाईट वाटून फार क्रोधायमान होऊन येविषयींचा सूड घेणेंचे विचारांत पडला. महाबतखान याचें नांवें आज्ञापत्र लिहून सुभे लाहूर (लाहोर) येथें रवाना केलें. मोहबतखान हुजूर येऊन पोहचला. तेव्हां महाबतखान यास खानदेशचे सुभ्याचें काम नेमून देऊन दक्षणदेशाचा बंदोबस्त करण्यावर व निजामशाहाचा मुलुक हस्तगत करण्यावर नेमिला. महाबतखान बहुत फौज व सामान सरंजाम बहुत योग्य घेऊन दक्षण देशावर चालू झाला. बुरहानपुरास येऊन पोहचला आणि तेथें राहिला. तों यापुर्वीच बुऱ्हानशाहा याणी मरणाचे शरबताचा प्याला फत्तेखानाचे हातून चाखिला होता, म्हणजे बुऱ्हान निजामशाहा फत्तेखानाचे योगानें मरण पावला होता.<sup></sup> तेव्हां हरएक प्रकारानें फत्तेखान याणी बुऱ्हानशाहाचा

पुत्र सात वर्षांचा शाहा हुसेन या नांवाचा होता त्याजला आणोन निजामशाही राजधानीचे तक्तावर बसविला आणि पादशाही छत्रचामरें त्याजवर धरिलीं. राजधानीचे हुकूम चालविणेचा लगाम आपले मुख्यत्यारीचे हातीं आणोन आपणच प्रधान व्हावें आणि आपली पक्की मजबुती करूं लागला. आपले बरोबरीचे जे कारभारी लोक व ज्यापासोन आपल्यास अंदेशा होता त्यांजला बरतर्फ करण्याचे विचारांत पडला. साबाजी आनंदराव (अनंत) म्हणोन मलिक अंबर याचा मोठा विश्वासू व संभावित होता. सिवाजीपंत मुत्सद्दी व सखाराम मोकाशी हे संपुर्ण कारभारी श्रेष्ठ व संभावित होते. हे फत्तेखानाचे भयानें पळून जाऊन शहाजहान पादशाहाचे सेवेंत जाऊन राहिले. असेच दूसरे कित्येक कारभारीमंडळ व अमीरलोक कदीम व जदिद, म्हणजे पुरातन व नवीन, होते ते भयाभित होऊन तें शहर सोडून जागोजाग जाऊन राहिले. आपला प्राण व आपली अबरू रक्षण करिते झाले. त्या राजधानींतील अधिक अधिकच मंडळी हजार स्वार व थोडीशी कारभारी मंडळी कांहीं अमीरलोक कीं ज्यास जीव मुठींत होता, म्हणजे प्राणाचें भय होतें, तें राहिले नाहींत, म्हणजे प्राण देते झाले. आणखी याच प्रसंगात मोठा दुष्काळहि पडला.[१७] हें एक धांदलीस प्रळयाचें कारणच उभें राहिलें. गल्याचा निरख एका दुनक्यास दोन शेर दाणे विकत होते. दुनका म्हणजे रुपयाचा तुकडा असतो. शेवटीं येथपर्यंत प्रळय झाला कीं, माणसाचे अंगाचे मांस माणसें खाऊं लागलीं. परंतु दौलताबादेमध्यें बहुत गल्ला होता. फत्तेखान याणी हरएक घोड्याची चंदी दोन शेर ठरविली होती. याचप्रमाणें स्वार व सिबंदी लोक गल्ला आणोन पोहचविणेंविषयीं व शहरचे मनुष्यास मदत देणेंविषयीं यत्न करित होते. या प्रकारचा प्रळय व फत्तेखानाचा उपद्रव व दुष्काळ एक वर्ष-पर्यंत सारिखा राहिला. जेव्हां महाबतखानास हें बुऱ्हानशाहाचें प्रकर्ण व बुऱ्हाणशाहाची फौज परागंदा झाल्याचें, कारभारी व कामगार मंडळी त्रास पावल्याचें व राजधानीचीं व मुलकाची खराबी झाल्याचें वर्तमान कळलें तेव्हां महाबतखान चाळीस हजार स्वार घेऊन बुरहानपुराहून दौलताबादेकडे चालू झाला.[१८] सुलतान महंमद पादशाहा याणी हें वर्तमान कळल्यानंतर मोठा संकटाचा व धांदलीची समय जाणोन व संकटाचा अग्नि प्रदिप्त होण्याची नाना प्रकारचीं विघ्नें उत्पन्न होण्याची आग पेटणेचा समय ओळखून पूर्ण सावधगिरी व हुशारी ठेविली. मदत व साह्य करण्यांत आपला बचाव

१७. "ये वर्षी दुस्काल पडिला."— जेशका, पृ. १६ व शिवाशका पृ ५४, शिचप्र. Also see Bad. Nama, E. D., p. 24–25.

१८. "The Khan Khanan (Mahabat Khan) accordingly sent forward his son Khan–Zaman, with an advanced force, and he himself followed on the 9th Jumadas–sani, Julus 6, A. H. 1042," (11 Dec. 1632)– Bad. Nama, E. D., p. 37.

आहे असें जाणोन आपले दौलतीकडील अमीरलोकांसमागमें बहुत फौज व लष्कर देऊन रणदुल्लाखान याचे समागमें ते सर्व अमीरलोक देऊन दौलताबादेकडे रवाना केले. आदिलशाहाकडील फौज येऊन पोहचते तोंपर्यंत महाबतखान याणी अति त्वरा करून दौलताबादचे कसब्यांत येऊन पोहोचला. दौलताबादचा किल्ला हस्तगत करण्याकरितां बहुत विचार करित होता. आदिलशाहाकडील फौज व तशीच निजामशाहाकडील फौज किल्याचे बाहेर राहून मोंगलांचे लष्करावर हल्ला करित होती. लढत होते. मोंगलाचा उच्छेद करण्याकरितां किल्याचे कोटाचा तळ धरून यत्न करित होते. फत्तेखानहि किल्याचे आंतून आपल्या सामर्थ्याहून अधिक हल्ला करित होता. मोर्चावर धाऊन येऊन निवारण करित होता. या धांदलीचे दिवसांत कारण कीं मोंगलाची प्रबळता व दंगा व धांदल चहूंकडून झाली. सिद्दी रयहान हा सोलापूराकडून अति शूरत्व व पराक्रमानें सर्वांस पीडा देणारा झाला होता. असेच एके समईं सिद्दी पोलाद व दौलतखान हे विजापूरचे कैदेंतून पळून जाऊन सिद्दी रयहानाकडे जाऊन मिळाले होते. त्या उभयतांस सिद्दी रयहान याणे बहुत लोभ व मेहेरबानगी करून आपलेपाशीं ठेऊन घेतलें. आपले निसबतीचे लोक सोलापूरीं ठेऊन सिद्दी रयहान आपण खुद जातीनें तीन चार हजार स्वार, निजामशाहाचे कदिम लष्करापैकीं त्याजपाशीं जमले होते ते स्वार, घऊन सोलापुराहून देवगांवावर चालून गेला. त्या गावांतील राहणारांपासून दहा हजार होन ठोकाठोकी व मारामारी करून बलात्कारानें घेऊन निजामशाहाचे मुलुकांत चालू झाला. हरएक जागीं व हरएक लोकांचे घरांतूनहि असेच चमत्कारानें द्रव्य घेऊन बीडचे सरहद्दींत येऊन पोहचला. कर्मधर्मसंयोगें इतक्यामध्यें खानजमान हा सातआठ हजार स्वारांची जमात घेऊन खाण्यापिण्याचे वगैरे जिन्नस व बहुत गल्ला, म्हणजे धान्य, मोंगलापासून घेऊन महाबतखानाचे लष्करांत आणित होता. सिद्दी रयहान याची भेट जाफराबादेनजिक बेळगांव व वराड येथें खानजमान यासी झाली. तेव्हां त्याचे मोकाबल्यावर चालून येऊन युध्ध करूं लागला. खानजमान याचे फौजेस घाबरें करून बहुत तोडातोडी केली. त्यास अंत नाहीं. पेशजी याकुतखान अहमदनगराहून निघोन मोंगलासी मिळोन मोंगलाचा चाकर झाला होता. तो यासमईं फत्तेखान याचें साह्य करित होता. खाण्यापिण्याचे जिन्नस व वर्तमान फत्तेखानास व बाहेरचे लष्करास पाठवित होता. महाबतखानास याकुतखानाचे या मिलाफी वागणुकीची बातमी समजली तेव्हां याकुतखानावर फार क्रोधायमान होऊन फार जरब घालिता झाला, येथपर्यंत कीं याकुतखान याणें महाबतखानाची संगती सोडून तीन चार हजार स्वरांनिसीं त्याजपासून निराळा होऊन, म्हणजे फटकून राहून, दक्षणी फौजेंत मिळाला. त्या लोकांसहित महाबतखानाचे पारपत्यावर सामिल होऊन युध्ध करित होता. याकुतखान या दौलतीकडील पुरातन सरदार होता. त्याचे येण्यानें दक्षिणी फौजेस अधिकच बळ प्राप्त झालें. आदिलशाहा-

कडील व निजामशाहाकडील अमीरलोकांनीं संपूर्ण रस्ते व वाटा बंद करून महाबतखान याचे लष्करास खाण्यापिण्याचे जिन्नस व रसद म्हणजे रोख ऐवज पोहचण्याविसीं मनाई करिते झाले. तेव्हां मोठा दुष्काळ पडला. अशी महागाई झाली कीं, एक होनास एक पायली दाणे विकत होते. जेव्हां मोठाच प्रसंग गुजरला तेव्हां महाबतखान फार त्रासून तेथून निघाला आणि दोन मजली निघोन गेला. तेव्हां दक्षिणी फौजेंतील लोकांनीं महाबतखानाचा पाठलाग करून युध्ध करिते झाले. शेवटीं त्या लढाईत एका युध्धांत याकुतखान यास बेत्रीस जखमा लागून याकुतखान मरण पावला. याकुतखान मरण पावला येणेंकरून महाबतखानास फार संतोष झाला. वांटेंतून माघारे परतोन पुन्हां त्याच जाग्यावर येऊन उतरला. पुन्हां आणखी युध्धास आरंभ केला. पहिलेपेक्षां अधिकच मजबूतीनें मोर्चे बांधिले. फत्तेखान याणीं जेव्हां पाहिले कीं, खाण्यापिण्याचे वगैरे जिन्नस व किरकोळ जिन्नस सरले आणि शत्रु तर पुन्हां नवीन बळ चढून युध्धास उभा राहिला आहे तेव्हां निरोपाय होऊन विचार करितां झाला आणि पादशाहा गाजी आदिलशाहास विनंति पत्र लिहिलें कीं, महाबतखान बहुत शिपायांचे जमातीनिसीं दौलताबादेच्या किल्यावर चढून येऊन दौलताबादचे कसब्यांत येऊन राहिला आहे.[१९] किल्ला सर करणेविषयीं बहुत यत्न करित आहे. किल्यांत खाण्यापिण्याचे वगैरे किरकोळ सामान कांहींएक खुणेपुरतें देखिल उरलें नाहीं. जर करितां यासमई साह्य करणें मनांत आणोन आपली यशस्वी फौज पाठविण्याविषयीं व खाण्यापिण्याचे वगैरे किरकोळ बहुत सामान पाठविण्याविषयीं मेहेरबानगी केल्यास शत्रूचा हात मी मुरगुळून टाकीन, म्हणजे मी शत्रूचें पारपत्य करीन. मोंगलाची फौज ह्या जिल्ह्यांतून हाकून देईन आणि दौलताबादचा किल्ला आपले हवालीं करीन.

१९. "Khan Khanan......marched from Zafarnagar to Daulatabad and reached there on the last day of Shaban ( 1 March 1633) ...... on the 9th Shawwal (9 April 1633) a mine .. was charged......wall breached.. ...On the 25th Zilkada (24 May 1633) second mine was to be exploded ....Fatekhan sent Vakil to Mahabat Khan......On the 19th Zilhijja (17 June 1633) Fate-Khan came out of the fortress of Daulatabad and delivered it up to the Mogul."- Bad. Nama, ED., p. 36-41.

### १०. आदिलशाहा याणी मुरारी याजसमागमें खाण्यापिण्याचे किरकोळ सामान दौलताबादेस पाठवणें व मुरारी याणी ते किरकोळ सामान किल्यांत पाठविणेंविषयीं आनमान करणें प्रकर्ण :

पादशाहा गाजी आदिलशाहा याणी फत्तेखानाची विनंति कबुल केली. त्या करण्याचे पोटीं आपले मुलुख व दौलत वाढण्याचें हित जाणोन फत्तेखानास साह्य व मदत देण्याविषयींचा विचार करिता झाला. आधीं रणदुल्लाखान याजसमागमें फौज रवाना केलीच होती. हालीहि आणखी नवीन फौज पाठविण्याविषयीं व खाण्यापिण्याचे वगैरे बहुत किरकोळ सामान पाठविण्याकरितां खवासखानास आज्ञा केली. तेव्हां सवासखान याणी थोडकेच दिवसांत खाण्यापिण्याचे किरकोळ सामान व बहुत गल्ला, म्हणजे कैली जिनस व यासिवाय किल्याकडे जे जे पाहिजे होते ते जिन्नस बहुत यत्नानें जमवून शिपाई व फौज जे तर्फेतर्फेंतील व तालुक्यांत होते ते व जी शिबंदी हुजूर होती ती मिळोन एकंदर जमवून मुरारीसमागमें देऊन दौलताबादेकडे रवाना केले. मुरारीस ताकिद केली कीं, एकंदर किरकोळ सामान पोंहचताच फत्तेखानास पावते करावें. हाली फौज रवाना केली आहे. ही व पेशजी रवाना झाली आहे ती मिळोन एकंदर फौज जमवून फत्तेखानास मदत करणेंविषयीं व किल्ला संरक्षण करण्याकरितां व शत्रूचे पारपत्य करण्याविषयीं शक्ति आहे तोंपर्यंत यत्न करावा. आपणाकडोन केसाइतकेंहि अंतर पडों देऊं नये. जितकें सामर्थ्य असेल तितका यत्न करून शत्रूस किल्याचे घेरापासून हांकून द्यावा. किल्ला शत्रूचे हातीं जाऊं देऊं नये. अशी ताकिद केली. मुरारी दौलताबादेस फौजेसुध्दां व किरकोळ सामानासहित जाऊन पोंहचला तेव्हां आदिलशाहाकडील अमीरलोक तेथें आधीं जाऊन पोंहचले होते ते अमीरलोक मुरारी आला येणेंकरून मनामध्यें खिन्न झाले. कारण कीं, मुरारीचे अमीरपणास व त्याचे कारभारास कोणी राजी नव्हते. यास्तव त्या अमीरलोकांनीं आपआपणांत विचार ठरविला कीं, मुरारी येथें आहे तोंपर्यंत युध्द करूं नये. युध्द करून फत्ते झाली तर मुरारी याणी फत्ते केली असें मुरारीचें नांव होईल. यश आल्याचें पत्र मुरारीचें नांवें लिहिलें जाईल. याजकरितां अशी मसलत ठरऊन युध्दास अनमान केला, म्हणजे या प्रथम गेलेले अमीरलोकांनीं युध्द केलें नाहीं. फत्तेखानानीं मुरारीस कितीएक निरोप पाठवले कीं खाण्यापिण्याचे जिन्नस वगैरे व किरकोळ सामान आदिलशाहाकडून आणिले आहेत ते ईकडे पाठऊन द्यावे. कारण कीं, किल्यांत कांहींएक जिन्नस व कैली सामानाचे नांव देखिल राहिलें नाहीं. कांहीं मनुष्यें मजपाशीं राहिलीं आहेत तीं उपासानें थकून एक श्वास देखिल सोडण्याची शक्ति त्या मनुष्यांस राहिली नाहीं. असे बहुत निरोप पाठविले. तत्रापि मुरारी याणी कांहींएक सामान फत्तेखानाकडे पाठविलें नाहीं. यास्तव फत्तेखान वारंवार सामानाविषयीं मुरारीस

तलब करित होता, म्हणजे मागित होता. मुरारी याणे फत्तेखानास उत्तर दिल्हें कीं, खाण्यापिण्याचे वगैरे सामान कां मागतोस ? उठ व ये आणि किल्याचें कुलुपाची किल्ली माझे हवालीं कर. मग मी जाणें व किल्ला जाणें. किल्ला माझे हवालीं केला म्हणजे तुजला मोठे दौलतीस चढवीन. नाहींपेक्षां तुझे हातपाय बांधून तुजला किल्याचे बुरुजावरून खालीं खंदकांत ढकलून देईन. असें उत्तर दिल्हें. कारण कीं, मुरारी नीच उत्पत्तीचा, अधीर मनाचा व महा गर्विष्ट होता. अकल निखालस नव्हती. कोणती एखादी गोष्ट मनांत साठवेल अशी त्याचे अंतःकर्णांत जागा नव्हती. यास्तव पादशाहानीं शिकविलेला बोध व खवासखान याणी ताकिद केलेल्यांचे सर्व विस्मरणाचे कोनाड्यांत ठेऊन, म्हणजे विसरून, फारच अभिमान झाला आणि फत्तेखानाकडे कांहींएक जिन्नस अगदीं पाठविला नाहीं.

## ११. दौलताबादचा किल्ला निजामशाही लोकांचे हातून मोगलांचे हातीं जाणें प्रकर्ण

फत्तेखान याणी पाहिलें कीं, मुरारी या प्रकारचे रीतीनें पुढें चालून आला आहे आणि माझें सांगणें कांहींच मानित नाहीं, आपले धण्याची, म्हणजे आदिलशाहाची, देखील आज्ञा जुमानित नाहीं, व खवासखान याणीं ताकिदी दिलेल्या असतां त्यांहि न मानितां मनास वाटेल तसें करित आहे. मी कितीहि काकुलती येऊन निरोपाय-पणानें निरोप पाठवितो परंतु माझे अवस्थेवर कांहींच दया ठेवून अवलोकन करित नाहीं, म्हणजे कांहींच दया येत नाहीं. शेवटीं मुरारी कांहींच सामान देईना सबब फत्तेखानाचीं केंवळ निराशा झाली. फत्तेखानास मोगलासी सख्य करणें व सल्ला करणें प्राप्तच झालें. याशिवाय तोडच नाहीं. असें झालें तेव्हां निरोपाय होऊन मलिक कुतुब महंमद गुजराथी व कृष्णाजी भास्कर हे उभयतां फत्तेखानाकडील मोठे संभावित होते या उभयतांस सख्य करण्याकरितां महाबतखानाकडे [१७] पाठवून निरोप सांगून पाठविला. दौलताबादचा किल्ला शहाजहान पादशाहाचे हवालीं करितो परंतु तुम्ही आम्हासी करार मदार करावा व मी विनंती करीन तीं कामें करून द्यावीं. येविषयीं मोठ्या आणा शफता घ्याव्या कीं, त्या करारापासून केसाइतके देखील तुम्ही बदलूं नये. असा निरोप सांगून पाठविला. जेव्हां हे उभयता वकील महाबतखानाकडे जाऊन पोहचून फत्तेखान याणी सांगितलें होते त्याप्रयाणें सविस्तर मजकुराची विनंति केली (तेव्हां) महाबतखान याणी हा निरोप येऊन पोहचताच पाहिलें कीं, अलभ्य लाभाचे ऐश्वर्य आपोआप घरीं चालत आलें व प्रातःकालीं नित्य ईश्वरास प्रार्थना करित होता त्यास फळ आलें, जाणोन मी मोठे श्रेष्ठत्वास चढलों असें जाणिलें.

अति हर्षाचे व आनंदाचे योगानें आंगरख्यांत समावेनासा झाला. तात्काळ करारनामा बहुत मजबुत शफतपुरस्कर व मोठमोठ्या शर्ती म्हणजे प्रतिज्ञापूर्वक फत्तेखानाचे मनोगताप्रमाणें लिहिला कीं, किल्ला आमचे हवालीं करून दिल्हा म्हणजे तुम्हास व निजामशाहास मोठे समारंभानें व फार हुरमतीनें, म्हणजे बहुत तेज राखून, शहाजहान पादशाहापाशीं हुजुर ठेऊन तुम्हास पादशाहाची कृपा होण्याचे व पादशाहाचे मेहरबानगीचे स्थान करून, म्हणजे तुम्हावर पादशाहाची बहुत कृपा करवितो, आणि हुसेन निजामशाहास तक्तावर बसवितो. तुम्हास पूर्ववत वजिरीचे व वकिलीचें कामावर बहाल व कायम करितो. हरएक प्रकर्णी आम्ही तुमची मदल करित जाऊं. तुमचे कल्याणाविषयीं आमचा मकदुर आहे तेथपर्यंत तुम्हाविसी यत्न करण्यांत अंतर करणार नाहीं. तुम्ही दौलताबादचा किल्ला आमचे हवालीं करून देतांच चाळीस हजार मोहरा तुम्हांस देतो. असा करार करून तो करारनामा खाण्यापिण्याचे बहुत सामान सरंजामसहित महाबतखान याणी आपला पुत्र इरादतखान याजसमागमें फतेखानाकडे पाठविला. जेव्हां कारारमदार फत्तेखानाचे मनोदयाप्रमाणें ठरले व सर्वोपरी चित्ताची स्वस्थता झाली तेव्हां करार ठरल्याप्रमाणें दौलताबादचा किल्ला महाबतखानाचे हवालीं करून दिल्हा [२०] खुद शाहा हुसेन पादशाहा व पादशाहाचे कुटुंबांतील मंडळी व पादशाहाचे आतविषयीं मंडळी व फत्तेखान असे सर्व दौलताबादचे किल्यांतून बाहेर निघोन एक हजार स्वारांनिसीं महाबतखान याचे संनिध जाऊन पोहचून उतरले. तेव्हां महाबतखान याणी आपला पुत्र इरादतखान याजला स्वारशिबंधीसहित दौलताबादेंत बंदोबस्तास पाठवून शाहा हुसेन व फत्तेखान याजला समागमें घेऊन महाबतखान याणी तेथून कुचाचा नगारा वाजविला, म्हणजे कूच केलें. बुरहानपुराकडे चालता झाला. फत्तेखानानीं शिपाईलोक जमविण्याचा उपयोग करून चार पांच हजार स्वार नवीन ठेविले. वाटेमध्यें एक नवीनच चमत्कार झाला, म्हणजे महाबतखान कूच करित होता त्यासमई खानजमान हा फत्तेखानाचे डेऱ्यास येऊन फत्तेखानाचे चाकरीस राहण्याकरितां तयार होऊन बसला. फत्तेखान तयार होऊन घोड्यावर बसतो तेव्हां खानजमान फत्तेखानासमागमें मुक्कामापर्यंत येत होता. याच प्रकारें नजर पहाऱ्याचे व बंदोबस्ताचे रीतीनें दौलताबादेपासून सात आठ कोसावर जाफराबाद मालेगांव म्हणोन आहे तेथें जाऊन पोहचले. एके दिवशीं महाबतखान याणी मार्गातच डेरे उभे केले. त्या डेऱ्याभोंवतें कनाती बांधून त्या कनाथीचे पाठीमागें रजपुत लोक बसवून फत्तेखानास डेऱ्यांत बोलाविलें. फत्तेखान जेव्हां कनातींतून डेऱ्यांत चालता झाला तेव्हां, निमा मार्ग डेऱ्याचा चालला तोंच, म्हणजे डेऱ्यांतील निमे जाग्यांत आला तोंच, एकाएकी डेऱ्याच्या तनावा ओढून

२०. शके १५५४ जेष्ठ मासी (मे, जून १६३२) महाबतखानें वेढा घालून दौलताबाद घेतली.'' — जेशका. पृ. १६ व शिवाशका. पृ. ५४, शिचप्र.

कनाथी व डेरे फत्तेखानाचे अंगावर पाडिले. डेऱ्याचे खालीं दाबून फत्तेखानास धरून कैद केलें. फत्तेखानाकडे पादशाही छत्रें व अबदागिरी वगैरे सामान सरंजाम होता तो हिराऊन घेऊन शाहा हुसेन याजला धरून पाहारेकराच्या हवालीं केले. फत्तेखानानें या प्रकारचा रंग पाहिला तेव्हां फत्तेखानानें जिवाची आशा सोडली. या वाक्याप्रमाणें कीं, पारसी वाक्याचा अर्थ: "जो गृहस्थ जिवाची आशा सोडतो तो मनुष्य जें मनांत असेल तें बोलतो." याप्रमाणें फत्तेखान महाबतखानास मोठ्या वाईट शिव्या देऊं लागला. महाबतखानाचे तोंडावर थुंकला. या प्रमाणेंच अवस्थेनें शहाजहान पादशाहाकडे महाबतखान याणी उभयतांस नेलें. दौलताबादचा या प्रकारचा मजबुत किल्ला, त्या किल्ल्याप्रमाणे दुसरा किल्ला या पृथ्वींत कमी असेल असा किल्ला, युध्य न करितां व कांहीं कज्याभांडण न करिता बहुत उत्तम प्रकारचे युक्तीनें सर केला. या चाकरीबद्दल महाबतखान हा शहाजहान पादशाहाचे कृपेचें स्थान झाला. पादशाहाचे बहुत मेहेरबानगीचें स्थान झाला. त्या दिवसापासून निजामशाही परंदरा उठली, म्हणजे निजामशाहाची राजधानी बुडाली. अहंमद निजामशाहा बहिरी या पुरुषापासून शाहा हुसेन निजामशाहापर्यंत अकरा पुरुषांनीं १३० एकशेतीस वर्षेपर्यंत पादशाही केली. राज्यहि वहिवाटलें. यानंतर यद्यपि शाहाजी भोसले याणी खवासखान व मुरारी याचे योगानें निजामशाहाचे वंशापैकीं मुर्तजा म्हणोन होता त्याजला आणोन पेमगडचे किल्यांत, कीं त्या किल्यास शाहागड असे नांव आहे त्या किल्यावर. मूर्तजास पादशाही तख्तावर बसवून दोन तीन वर्षे मुर्तजा निजामशाहाचें नांवें राजधानीचीं कामें चालविली.[२१] बहुत मनुष्ये, शिपाई व लष्कर जमविण्याविषयीं व किल्ले हस्तगत करण्याविषयीं बहुत यत्न करित होते. तोंच एकाएकी सवासखान ठार झाले आणि मुस्तफाखान मध्येंच प्रबळ झाला. शाहाजी भोसले याणी बेत केले होते ते सर्व उलटले. मुस्तफाखान याणी निजामशाहाचें निर्मूळ फडशा करण्याविषयीं शहाजहान पादशाहाशीं मिळोन शाहाजी भोसले याजकडोन मूर्तजा निजामशाहास घेऊन शहाजहान पादशाहाचे हवालीं केला. त्या तारखेपासून निजामशाहाची कांहींएक खुण देखिल या भुमीवर राहिली नाहीं. मुस्तफाखान याणी मुल्लाबाबा याजला जिवें मारिल्यानंतर निंजामशाही लोकांपैकीं कांहीं एक खुण देखिल ठेविली नाहीं. ज्यासमई महाबतखान दौलताबाद घेऊन बुरहानपुरास जात होता तेव्हां महाबतखानाचे लष्करांतील मनुष्यें धान्याचे दुष्काळानें, कीं जो दुष्काळ दौलताबादेवर हल्ला करतां वेळेस पडला होता तेव्हां बहुत मनुष्यांनीं उंट व घोडे खुद जातीनें खाऊन प्राण रक्षण केले होते. पायानें चालत होते. अशक्तपणामुळें व सामर्थ्यहीन झाले यास्तव, कारण कीं तो अशक्तपणा व सामर्थ्य-

२१. "शके १५५४ भाद्रपदमासीं ( आगस्ट १६३२ ) शाहाजी राजे याणी पेमगिरीस निजामशाहावरी छत्र धरिलें."— जेशका. पृ. १६, शिवाशका. पृ. ५४–५५, शिचप्र.

हीनपणा उपोषणापासून उत्पन्न झाला होता. यास्तव, दररोज दोन तीन कोसाहून अधिक मार्ग चालवत नव्हता. मुरारी व आदिलशाहाकडील संपूर्ण अमीरलोक आपली फौज घेऊन मोंगलाचा पाठलाग करून हत्ती व उंट व घोडे जे सांपडत होते ते घेऊन जात होते. तोडातोडी व मारामारी करणेंविषयींहि कांहींएक अंतर करित नव्हते. तेव्हां महाबतखान हा थकून व निरोपाय होऊन आदिलशाहाकडील लोकांचे पाया पडोन आर्जव करून काकुलती येत होता. रोख ऐवजहि आपली सुटका होण्याकरितां आदिलशाहाकडील हरएक लोकांस पाठवित होता. त्या हरएक लोकांस रदबदली करून आपली सुटका व आपले लष्कराची सुटका होण्याचा उपाय पहात होता. महाबतखान[२२] हजारों संकटानें आपले सरहदींत येऊन पोहचल्यानंतर मुरारी व रणदुल्लाखान व शाहाजी भोसला हे सरहदीपासून माघारे परतून नाशकास जाऊन पोहचले. शाहाजी भोसले तेथून रवाना झाले. मुरारी व रणदुल्लाखान हे अती जलदीनें विजापुरास पळत आले. खवासखान याणी मुरारी याजला या कारणास्तव, कीं मुरारी याणी फत्तेखानाशीं फार बेमानपणा करून दौलताबाद महाबतखानाचे हवाली केलें यास्तव, मुरारीस बहुत शिक्षा व पारपत्य करून बहुत धाक घातला. खवासखान बोलला कीं, पादशाहाचे सर्व काम तूं बिघडून टाकलेस, तूं बहुत खराबी केली व कित्येक युक्ती व यत्न व बहुत द्रव्य या लढाईत खर्च झाले ते तूं सर्व बरबाद केलेंस, म्हणजे फडशा केलेंस असें बोलला. तेव्हां मुरारी याणी लज्जेस्तव खवासखानाचे पायावर मस्तक ठेऊन लज्जित व खिन्न होऊन राहिला.

## ९२. शहाजहान पादशाहा व सुलतान महंमद आदिलशाहा पादशाहा गाजी या उभयतांमध्यें बिघाड येणें व आदिलशाहा याणी खंडणीचा ऐवज देणें प्रकर्ण :

याप्रकारची त्रासास व कंटाळ्यास कारणें उत्पन्न होण्यानें शहाजहान पादशाहा व आदिलशाहा या उभयतांत वाकडेपणा व बिघाड आला. वैरतेचा व शत्रुत्वाचा भाव उत्पन्न झाला. खंडणीचा ऐवज दरसाल यावयाचा तो ढिलाईवर पडला. याजकरितां शहाजहान पादशाहाकडून वाकडेपणाचा व शत्रुत्वाचें मजकुरानें मिश्रित

२२. " On the 14th Jamadal-awwal, Julus 7, A. H. 1043, (27 Oct. 1633) intelligence arrived of the death of Mahabat Khan- Khan Khanan."- Bad. Nama, ED., p. 43. " Thereafter Yaminud-daula-asaf-Khan was promoted to dignity of Khan Khanan,"- Ibid 46.

आदिलशाहास पत्रें येत होतीं.[२३] आदिलशाहा पादशाहा गाजी याजकडूनहि त्या पत्रांचीं उत्तरें शूरत्वानें व बरोबरीच्या इराद्यानें रवाना होत होतीं. जसे कीं शहाजहान पादशाहा याजकडून पत्रें आलीं त्यांपैकीं एका पत्राची नकल व आदिलशाकडून उत्तरें गेलीं त्या पत्रांपैकीं एका पत्राची नकल, अशा दोन नकला या ठिकाणी मजकुर जमावया जागी लिहल्या आहेत.

## १३. शहाजहान पादशाहाचे पत्राची नकल :

ईश्वराचा स्तव तारिफ असो. कारण कीं, ज्या ईश्वरानीं आपले पूर्ण सामर्थ्यानीं पाण्याचे एक बुंदापासून मातुश्रीचे उपकारांत इंद्रियवान देह उत्पन्न करून निराकार स्वरूपापासून आकारास आणोन आम्हांस पृथ्वीचे पादशाहा केलें तेव्हां असें करणें प्राप्त झालें कीं, या पृथ्वींत चहूंकडे व तर्फेतर्फेत विजापूरचे मुलकांत व गोवळकुंड्यांत व भागानगर येथें व लंका पडलंका येथें खुतबा व शिका शहाजहान या नांवानीं चालू करणें आम्हास प्राप्त आलें. तुम्ही सर्व त्या शहरांत खुदखुद पक्षाप्रमाणें हरएक पादशाहाचे म्हणविता. यास्तव आतां तुम्हास तें योग्य आहे व त्यांत श्रेष्ठता आहे कीं, आमचे सेवेची दोरी तुम्ही आपले जिवाचे गळ्यांत घालून तिकडील शहरांत खुतबा व शिका व नांव शहाजहान पादशाहाचे नावें चालू करावा. नाहींपेक्षां बाज पक्षाचे हातून कलराचे चुर्चीनें तुमचे आंगाचे कातड्यांतून मांस काढून ते मांस पृथ्वींतील सर्व घारींस टाकून लुट करऊं. ही गोष्ट आपले जिवाचे कानांनीं ऐकून घ्यावी. सशाचे भ्रान्तीयुक्त निजण्यासारिखें करून, म्हणजे ज्यावेळेस कांहीं एखादें जनावर सशाचें पाठीं लागतें त्यासमई ससे पळतां पळतां एकाएकींच वाटेंतच खालीं पडोन त्या भयानें निद्रेचे भिष करून आपले दोनी कान आपले दोनी डोळ्यावर झांकून घेतो आणि मोठी निद्रा लागल्या सारिखा भाव दाखवितो. कारण कीं सशाचे मनांत येतें कीं, आपल्यास झोंप लागली आहे असा भाव दाखवावा, म्हणजे आपले पाठी लागलेले जनावर आपली निद्रा भंग कशी करील? निद्रा लागली आहे असें पाहून तें जनावर परत जाईल आणि आपला प्राण वाचेल. अशी मसलत मनांत आणोन ससे निजतें आणि त्याचे पाठीं लागलेले जनावर त्या सशास तात्काळ भक्षण करितें. यास्तव ती सशाची गाफिलीची, म्हणजे भ्रान्तीची, अशी आहे. यास्तव त्या सशाचे निद्रेसारिखें करूं नये. कारण कीं, मी उकाब पक्षी शोधाकरितां पाठी लागला आहे. याजकरितां सर्व अमीरलोकांतील मुख्य अमीर इमानदार थोर खानदानीचा

२३. See Bad. Nama, ED., p. 51, under Julus 9th, A. H. 1043, 1635 A. D.)

म्हणजे कुलीन व पूर्ण विचारवान व कचेरींतील सर्व लोकांचे बरोबरीचा असा जो मुकरमतखान याजला तुम्हांकडे पाठविला आहे. ज्यांत तुम्हास आपले कल्याण दिसेल तें करावें.

## १४. सुलतान महंमद आदिलशाहा पादशाहा गाजी याणी शहाजहान पादशाहाचे पत्राचें उत्तर दिल्हें त्या उत्तराचे पत्राची नकल :

सत्य स्वरूप जो ईश्वर त्याचा उपकार आहे कीं, त्या ईश्वरानीं या पृथ्वींत कोणाचाच गर्व व अभिमान चालू दिल्हा नाहीं. गर्व व अभिमान करणारास धुळ दशेस मिळविलें आहे. पारसी बैतेचा अर्थ: "मीच एक श्रेष्ठ आहे म्हणोन अभिमान वागवणें हें एक ईश्वरासच शोभतें." कारण कीं त्या ईश्वराचा मुलुक शाश्वत आहे व त्याचे शरीर बेपरवा आहे, म्हणजे कोणाची याचना करणें गरज नाहीं. या बैतेंतील भाव हा आहे कीं: "हें करणें ईश्वरासच शोभतें कारण कीं ईश्वर शाश्वत आहे." तुम्हास गर्व करणें शोभत नाहीं, कारण कीं तुम्ही नाशिवंत आहांत. मुर्ख कारभाऱ्याचे हातून जें पत्र लिहून इकडे पाठविलें होतें तें पाहोन लिहिला मजकूर कळला. त्या पत्रांतील मजकुर सूर्याचे तेजाप्रमाणें प्रगट झाला म्हणजे सविस्तर जाहीर झालें. कारण कीं, आपण खुदखुद पक्षाची आम्हास उपमा लिहिली. त्यास खुदखुद पक्षास राज्य अधिकाराचा मुगुट व पादशाही ताज ईश्वरानींच दिल्हा आहे, यांत आश्चर्य काय आहे? सुलेमान आलेहु सनलम यानीं कित्येक दिवस बाज पक्षाची योग्यता वाढविली होती. परंतु बाजाचे काय सामर्थ्य आहे कीं पंजा मारील आणि पुरातन मुळांत उखडून नवे काम करील. अशी काय गोष्ट आहे? यांतील भाव हा आहे कीं, सुलेमान पैगंबर याचा पुरातन मुख्य खुदखुद पक्षी व त्या पक्षास राज्याधिकार ईश्वरानीं दिल्हा आहे असें असतां सुलेमान पैगंबर यानीं कांहीं दिवस बाज पक्षाची नवीन योग्यता वाढविली. परंतु त्या बाज पक्षास खुदखुद पक्षाची योग्यता कोठून येईल? यांतील भाव आम्ही पुरातन आहों. आम्हास राज्याधिकार आला हे ईश्वराचे देणें आहे. तुम्ही कितीहि झाला तत्रापि नवीन आहांत. आमचें अकल्याण करणें तुमचे हातून कसें घडेल? पत्रांत सशाची भ्रांतीरूप-निद्रेप्रमाणें करूं नये असें लिहिलें. त्यास ससे झोंप घेतें परंतु प्रसंगी कामाचे वेळेस असे जलद पळते कीं पाठी लागलेले जनावराचा प्राण घेते. उकाब पक्षी कितीहि पाठलाग करितो परंतु मूर्खपणानें सशाचे मांस भक्षण करण्याचे ईच्छेनें कैदेंत मात्र पडतो. यांतील भाव हा आहे कीं, दुसऱ्याचें अकल्याण ईच्छिण्यांत आपलाच घात होतो असें आहे. ही गोष्ट कदापि मनांत आणो नये व या गोष्टीचा किंचितहि

संशय धरूं नये. खंडणीचा ऐवज आजपर्यंत जितका दिल्हा त्याप्रमाणे देऊं. सख्यतेंत अंतर नसावें. पारसी बैतेचा अर्थ : "तुम्ही ईश्वराचे आज्ञेपासून मान फिरवूं नका, म्हणजे ईश्वराची आज्ञा भंग करूं नका." असें केलें असतां तुझे हुकुमापासून कोणीच तुझी आज्ञा मोडणार नाहीं. (पत्राच्या नकला समाप्त झाल्या.)

## १५. निजामशाहाचें राज्य बुडाल्यानंतर जीं प्रकर्णे प्रसिध्ध झालीं तीं लिहिलीं जात आहेत :

निजामशाहाची राजधानी अराजिक झाली तेव्हां, म्हणजे निजामशाहाचे राजधानीस कोणी धणी नाहींसा झाला व निजामशाहाचे राजधानीचे सूत्र उठलें तेव्हां, कारण कीं, षिराजा म्हणोन बुक बेंडर बुक बांधितो. तो त्या बुकाची एकंदर पत्रें गवसून बुकाचे दोनहि बाजूचे कडेस रेशमी दोऱ्यानें व दोरे बंधन करितो त्यास षिराजा असें म्हणतात. तो बंदोबस्ताचा षिराजा तुटला तेव्हां, म्हणजे बंदोबस्त नाहींसा झाला तेव्हां, जिल्हेदार, म्हणजे निजामशाहाचे जिल्ह्यांतील राहणारे लोक व निजामशाहाचे अमीरलोक वगैरे सर्व जे जे ज्या ज्या जागीं व ज्या ज्या किल्याच्या नेमणुकीवर राहिले होते; सिद्दी रयहान सोलापूर येथें, शाहाजीराजे भोसले पेमगड येथें, श्रीनिवासराव जुन्नर येथें, सिद्दी साबा व सफीखान तळकोंकण येथें, सिदी साबा आंबर राजपुरीचे बंदरांत व दुसरे किलेदार व जमेदार लोक वगैरे हर कोणी होते ते आपआपले जागीं या जाग्याचा मालक मीच आहे असे उन्मत्त होऊन शिबंदी जमविणेंविसीं व मुलुक हस्तगत करणेंविसीं यत्न करित होते. सिदी रयहान याणी बहुत फौज घेऊन मोहबतखानाशीं युध्ध केलें आणि त्या युध्धात खुद जातीनें शूरत्व व पराक्रम करून यशस्वी व पादशाहास पसंद झाला होता. त्याचें शूरत्व व पराक्रम सर्वांस प्रसिध्ध झालें होतें. निजामशाहाकडील शिपाईलोक व सरदारलोक चारपाच हजार स्वार त्याजपाशीं म्हणजे सिदी रयहान याजपाशीं, जमले होते. त्याजला मोठी योग्यता व बहुत थोरपणा प्राप्त झाला. खवासखान निरंतर त्याजपाशीं, म्हणजे सिदी रयहान यासीं, उत्तमपणानें मित्रता व सख्य ठेवित होता. यासमईं हाफीजा नसरतुल्लाह याजला, कीं तो नसरतुल्लाह आदिलशाहाकडील सर्व विश्वासू लोकांतून मोटा संभावित होता त्याजला आदिलशाहानीं खातरजमेनें आज्ञा करून व मुबारकबादीचा पोषाख देऊन त्याजकडे म्हणजे सिद्दी रयहानाकडे पाठविला आणि लिहलें कीं, मोहबतखान जसें युध्ध करावें तसें त्याजवर चालून जाऊन युध्ध करून फत्ते केलीत व फौज जमविणेंविसीं व मुलकाचे सरहदीचे रक्षणाविषयीं व शत्रूचे पारपत्य करण्याविषयीं तुम्ही कांही एक अंतर केले नाहींत या कारणानें सुलतान महंमद गाजी पाद-

शाहा तुम्हावर फार संतोष व बहुत खुष झाले आहेत. पादशाहा ईच्छित आहेत कीं, पादशाही चालीचे मेहेरबानगीनें व पादशाही चालीचे योग्यता वाढिवण्याने तुम्हास बहुत योग्यता वाढवून मोठे श्रेष्ठ पदवीस चढवावें असे इच्छितात. यास्तव पादशाहाकडे तुम्ही ईच्छक होऊन तुम्ही आपलेकडील कोणी संभावित विश्वासू मनुष्य पादशाही तक्ताचे संन्निध म्हणजे पादशाहाकडे रवाना करावा, असें लिहलें. त्यावरून सिद्दी रयहान याणी बहुत आदराच्या व योग्यता देण्याचे चालीस नेऊन, म्हणजे बहुत आदर तारतम्य राखून, पादशाहाची आज्ञा मान्य करून व श्रेष्ठतेचा पोषाख देऊन आनंद पावता झाला. हाफीज नसरतुल्लाहाचे बहुत आदर तारतम्य ठेविलें. सिद्दी पोलाद व दौलतखान व न्यामतखान याजला आदिलशाहाकडे मित्रता मिश्रित विनंतिपत्रासहित हाफीज नसरतुल्लाह याजला हुजूर पाठविलें. पादशाहा गाजी यांणीं व खवासखान याणी जसें चित समाधान करावें तसें करून पूर्ण कृपेनें दिलभरंवसा दिल्हा. सिद्दी रयहान याजकडे जी जाहागिर होती त्यावर परगणे करडु, कोल्हापूर व खानापूर तुकडी होती त्यातून एक लक्ष होन वसुलाचा मुलख वाढवून जाहागिर दत झाले. अत्यंत मेहेरबानगीनें बहुत मित्रतेनें सिद्दी रयहान यास आपलासा करून घेऊन सरहदीचे रक्षणावर, शत्रूचे पारपत्यावर हुशार राहाणेविषयीं बहुत उत्तम प्रकारें बोध करून, यांत तुमचा बहुत उपयोग केला जाईल असें सांगितलें. पोलादखान व न्यामदखान यांजला आदिलशाहा पादशाहा याणी आपलेपाशीं हुजुर ठेवून घेतलें.

## १६. निजामशाहाचा बहुत मुलुक शाहाजीराजे भोसले याणी हस्तगत करणें प्रकर्ण :

शाहाजीराजे भोसले पेमगडास गले तेव्हां निजामशाहाचे मुलखांत जाऊन मुलख घेण्याचा हात लांब करून, म्हणजे निजामशाहाचा मुलख घेऊन, पुणे व चाकण पासून बालाघाटापर्यंत व जुन्नर, अहमदनगर, संगमनेर व नासिक त्रिंबक सुध्धां तिकडील सर्व आसपासचा मुलुक हस्तगत केला. सहा हजार स्वार चाकरीवर ठेऊन प्रबळ झाला. हरएक तर्फेकडे दौड करून हल्ला करित होता. ईरादतखान तर दौलताबादेंतच होता. त्याणीं मालोजीराजे भोसले याचे वशिल्यानें शाहाजीराजे भोसले याजशीं सख्य करून शहाजहान पादशाहाची आपल्यावर मेहेरबानगी व्हावी अशी शाहाजीराजे भोसले यांस आवडी उत्पन्न केली. तेव्हां शाहाजीराजे भोसले बोलले कीं शहाजहान पादशाहानीं आपले खासे पुत्राप्रमाणें मजला जाणून मजला बेवीस हजारी असा किताब द्यावा. त्यावरून इरादतखान याणी पादशाहाकडून

मान्यतेचे आज्ञापत्र व पादशाहाचे अंगावरील खासा पोषाख आणऊन अकलवान वकिलासमागमें शाहाजीराजे भोसले यांजकडे पाठविला. शाहाजीराजे भोसले जे काम करण्याविषयीं विचारांत होते ते तात्काळ कबूल करून बहुत अगत्यानीं त्या कामाविसीं यत्न करित होता. वारंवार दिलभरंवसा देऊन चित्त समाधान करित होता, कीं शाहाजी राजे भोसले यांस पादशाहाचासा करून पूर्ण आधार देऊन शत्रूचें पारपत्य करावें आणि निजामशाहाचा सर्व मुलुख हस्तगत करावा असें ठरविलें. शाहाजीराजे भोसले मसलतीविषयीं, दुरवर विचार करण्यामध्यें व हुशारींत सर्व संभावित मनुष्यांहून त्या काळांतील अद्वितीय होता. शाहाजीराजे भोसले यापरता कोणी अकलवान नव्हता. मी मोठा श्रेष्ठ व पूर्ण मनोरथी असे जाणित होते. त्यानीं मुरारीचे उत्तम प्रकारचे वशिल्यानीं गुप्तपणानें बातमी न फुटूं देतां खवासखानाशीं बोलणें चालणें, सवाल जबाब चालू केले. रदबदली करित होते कीं, निजामशाहाचे राजधानींतील चौऱ्यांयसी किल्यांपैकीं एक दौलताबादचा किल्ला गेला तर गेला जुन्नर सारखी तक्ताची जागा आपले हातीं आहे. जर करितां आपण मज मित्राचा अंगिकार करून माझे साह्य केल्यास व मजला मदत दिल्यास यत्नांची कमर-बंद जिवाचे कमेरवर बांधून निजामशाही राजधानीचा झेंडा म्हणजे ध्वज पुन्हाः उभा करूं. ही शाहाजीराजे भोसले यांची मसलत खवासखान व सर्व संभावित अमीरमंडळींचे मनांत होतीच. परंतु मुस्तफाखान या मसलतीस कबुल करित नव्हता. या कामास मनाई करित होता. खवासखान तर दौलताबाद जाण्याचें कारणामुळें फार खिन्न व चिंताग्रस्त होता. इरादतखान व शाहाजीराजे भोसले यांचे मित्रतेस्तव चित्तांत बहुत बहुत भय वागवित होता. संशय निवारण झाला आणि ही मसलत फार चांगली व यांत उपयोग आहे असें मनांत जाणून शाहाजीराजे भोसले यांचे मसलतीस बहुत 'शाबास शाबास' असें बोलून शाहाजीराजे भोसले यांची बहुत तारिफ करून शाहाजीराजे भोसले यांची मसलत बहुत उत्तमपणानें खवासखान याणी कबुल केली. शाहाजीराजे भोसले यांचे साह्य करूं लागला. मदत देण्यास प्रारंभ केला. ती मसलत या गोष्टीवर ठरविली कीं, निजामशाहाचे वंशापैकीं एखादा मुलगा आणोन पादशाही तक्तावर बसवावा. असें ठरावून मुरारी याजसमागमें फौज देऊन पादशाहाकडून निरोपाचा पोषाख देवऊन मुरारीस शाहाजीराजे भोसले यांचे मदतीवर रवाना केला.[१९]

१७. शाहाजीराजे भोसले याणी निजामशाहाचे वंशापैकीं मुर्तजा म्हणोन शाहाजादा होता त्याजला तक्तावर बसविणें प्रकर्णी वर्णन :

जुन्नर येथून वीस कोसावर तळकोंकणाकडे जिवधन म्हणोन किल्ला आहे.

त्या किल्यावर निजामशाहाचे वंशापैकीं दहाअकरा वर्षे वयाचा मुर्तजा म्हणोन मुलगा नजरबंदीचे पाहाऱ्यांत होता. त्याजला शाहाजीराजे भोसले याणी कैदेंतून मोकळा करून आणोन मुरारी व आपण मिळोन पेमगडचे किल्यांत तक्तावर बसविला (आगष्ट १६३२). पादशाही छत्रें चामरें त्यावर धरिलीं. दिवसेंदिवस मुर्तजा निजाम-शाहाचे पालनार्थ तत्पर राहून लष्कर व शिपाईलोक जमविण्यांत व किल्ले हस्तगत करण्याविषयीं यत्न केला. हें नवीनच प्रकर्ण उभें केलें. सिद्दी साबा सैफखान याणी तळकोंकणाचा मुलुक हस्तगत करून तळकोंकण येथें राहिला होता. त्याजकडे पत्र लिहून मुरारी यास पाठविलें. त्या पत्रांतील हा मजकुर होता कीं, तुम्ही जलद इकडे येऊन पोहचून नवीन तक्तावर बसलेले मुर्तजा निजामशाहाची भेटी घेऊन तुम्ही शाहाजीराजे भोसले यांची मित्रता धारण करून असावें. असें लिहिलें तेव्हां सैफखान शाहाजीराजे भोसले यांचे मित्रतेस राजी न होतां पादशाहा गाजी याची सेवा व हुजूर रहाणें स्वीकारून कारारमदाराप्रमाणें तळकोंकणाचा सर्व मुलुख शाहाजीराजे भोसले यांचे हवालीं करून दोन हजार स्वारांचे जमातीनिसीं मुरारीकडे रवाना झाला. तळकोंकणचा मुलुख महाडापासून सिवारीचे सरहदीपर्यंत संपूर्ण किल्लेसुद्धां शाहाजी-कडे आले. मुरारी याणीं शाहाजीराजे भोसले याजला पादशाहा मुर्तजा निजामशाहाचे राजधानीचें काम कारभाराचा मुख्त्यार करून आंबरखान याजला पांचसहा हजार स्वारांनिसीं शाहाजीराजे भोसले यांस मदत देण्याकरितां ठेऊन आपण जातीनें विजापुरास निघोन आला. भीवरा व इंद्रमती (इंद्र यणी) या दोनी नदींचे संगमाचे किनाऱ्यास ब्राभळी (पाबळ) म्हणोन गांव आहे तेथें येऊन पोहचला. तेव्हां हिंदुस्था-नचे हिंदू लोकांचे स्नानदानाचे चालीप्रमाणे विधी करण्याकरितां, म्हणजे या संगमीं स्नानदान करण्याकरितां राहिला.[२४] तेथें सप्तधातू म्हणजे सोनें रुपें वगैरे सात प्रकारचे धातूंनीं आपली तूळा करून तें द्रव्य धर्म करिता झाला. अशा समयामध्यें सैफखान हा कोंकणांतून येत होता. शाहाजीराजे भोसले यांशीं आपली मित्रता कबुल केली नाहीं या कारणास्तव सैफखानाशीं कपट धारण केलें होतें. हाली निजामशाहाचे गज म्हणजे हत्तीखाने येथें धरिले होते. ते मागण्याकरितां तगादा करण्याचे बाहान्यानें लुटालुट करण्याकरितां फौज नेमून खेड व कर्डुसचे नजिक सहा कोसावर ब्राभल (पाबळ) म्हणोन गांव आहे तेथें शाहाजीराजे भोसले याची फौज सैफखानाकडे येऊन पोहचली. मोठें युध्द झालें. उभयतांकडीलहि लोक या युद्धांत ठार झाले. जखमी बहुत झाले. सिद्दी अंबर आतपखानी म्हणोन सैफखानाचा सरदार होता तो

२४. "शके १५५५ भाद्रपदी अमावाशेस (२३ सप्टेंबर १६३३) सूर्यग्रहण सोमवतीस जाले. ते समई मुरार जगदेवराऊ याणी चोवीस तुळा केल्या ...... नागरगांवी–तुळापुरीं" सहा कलमी शकावली, शिचप्र. पृ. ७१, याबाबत सनदाहि प्रसिद्ध आहेत.

जखमी होऊन शाहाजीराजे भोसले यांचे लोकांचे हातीं सांपडून कैद झाला. सैफखान हा दोन दिवसपर्यंत खेड्यांतच लपून राहिला. मुरारी याणी बाभळ गांव येथून सैफखानाचे कुमकेवर आपली फौज पाठवून आपलेकडे बोलाऊन आणिलें. सैफखानास आपले समागमें विजापुरास आणिला. पादशाहा गाजी याणी दोन लक्ष होनाचा मुलुक त्याजकडे देऊन दरबार नाईक जमेदार वस्ती हारपनहुली याणीं बंड करून दंगा करणें आरंभिलें होतें त्या बंडावर सैफखान नेमिला. कित्येक दिवसानंतर सैफखान हा तेथेंच बंदुकीचे गोळीची जखम लागून मरण पावला. मुरारी परत आल्यानंतर शाहाजीराजे भोसले याणीं जुन्नर येथील मालक श्रीनिवासराव यांची कन्या आपला वडील पुत्र संभाजीराजे भोसले याजला मागितली आणि मित्रेतचा भाव दाखऊन श्रीनिवासराव याजला दग्यानीं कैद केला. जुन्नरचा किल्ला, जिवधनचा किल्ला, संवदा, भोरगड, परसगड, माहुल व घोसळ श्रीनिवासराव याजकडे होते ते शाहाजीराजे भोसले याणीं हस्तगत करून मुर्तजा निजामशाहा याजला पेमगड येथून काढून जुन्नर येथें आणोन ठेविलें. श्रीनिवासराव याजकडोन व दुसरे कित्येक कामदार मंडळीकडोन व तेथील राहाणारे सावकार लोक होते त्याजकडोन बहुत मालमत्ता द्रव्य हस्तगत करून पूर्ण मजबूद झाला. निजामशाहाचें लष्कर परागंदा झालें होतें त्यापैकीं बारा हजार स्वार त्याजपाशीं जमा झालें. महाबतखान याजला जेव्हां शाहाजीराजे भोसले यांचे उद्योगानें मुर्तजा निजामशाहा नवीन उत्पन्न झाल्याचें कळलें तेव्हां अत्यंत क्रोधायमान होऊन घाबरला. शाहाजादा महंमद षुजाआ याजला शहाजहान पादशाहाचे हुकूमानीं बुरहानपूर येथून बाहेर काढून परांड्याचे किल्यावर येऊन पोहचला. तो किल्ला घेऊन त्या किल्यास सुरुंग लावून पाडूं लागला. परांड्याचे किल्यांत जें लष्कर होतें ते लोक नित्य तयार होऊन युध्ध करून मोंगलावर चालून येत होते. आदिलशाहाकडील अमीरलोक रणदुल्ला, षेशजंगखान, फरहादखान, अंकोसखान वगैरे कित्येक अमीरलोक, कीं जे किल्यावरचे मोकाबल्यावर आले होते ते, रात्रंदिवस मोंगलाचे लष्करावर हल्ला करित होते. चार महिनेपर्यंत परस्परें युध्ध होत होतें. तेव्हा कळलें कीं, नकब, म्हणजे जमिनींतून विवर म्हणजे पोकार काढून त्यांत दारू भरून किल्याची इमारत उडवितात त्यास नकब असे म्हणतात त्या प्रकारचा पोकार, खाणून त्यांत दारू भरून किल्याचे बुरुज उडविणें होत नाहीं व सुरंग लागू होत नाहीं असें कळलें तेव्हां महाबतखान बहुत दिवस युध्ध व मोठ्या लढाया झाल्या तत्रापि किल्ला हस्तगत होत नाहीं यास्तव खिन्न होऊन पादशाहाकडील आज्ञापत्र परत येणेंविसीं आलें आहे यास्तव माघारे जातो असा बहाना करून किल्यावर हल्ला करित होता तो सोडून बुरहानपुरास परत जाता झाला.[२५]

२५. See under "March of Prince Shah. Shuja against Parenda"

## १८ खवासखान याणी मुस्तफाखान यास बेळगांवचे किल्यांत कैद करणें आणि बेमानपणाची चाल खवासखान याणी स्वीकारणें प्रकर्ण :

याच थोडके दिवसांत खवासखान हा प्रबळपणांत व दौलतदारींत येथपर्यंत चढला होता कीं, मज परता दुसरा कोणीच नाहीं असें जाणित होता. मुस्तफाखान याजकडोन वाकडे आलें होतें. यास्तव हरएक युक्तीनें व तऱ्हेचे बाहान्यानें मुस्तफाखान याजला कैद करून बेळगांवचे किल्याकडे पाठऊन त्यास किल्यावर कैद केलें. कार्यभाग येथपर्यंत येऊन पोहचले. कारण कीं मुस्तफाखान याजसारखे श्रेष्ठ वजिरलोकांपैकीं आणखी खवासखान याजला फारच गर्व व अभिमान झाला. बेमानपणा करूं लागला. ती गोष्ट दुरवर विचार करणारा जो इब्राहिम आदिलशाहा पादशाहा याणी अंतकालीं सुलतान महंमद याजला तक्तावर बसविण्याप्रकर्णी मुस्तफाखान यास बोध केला होता कीं, हा दौलतखान बेमान आहे. हा तुझ्यासी इमानानी वागणार नाहीं असें सांगितले होतें. ती गोष्ट बहुत वर्षांनंतर आतां खरी झाली. प्रत्ययास आली. आरबी वाक्याचा अर्थ : "जसें बोलला तसेंच प्रत्ययास आलें, कारण कीं, हें ज्ञान ईश्वरानीं दिल्हेलें आहे." या वाक्याप्रमाणें झालेनंतर खवासखान आपली मजबुती होण्याकरितां दिवसेंदिवस यत्न करित होता. दरबारांतील बहुत संभावित व विश्वासू लोकांस हुजूरचे चाकरीवरून बरतर्फ करून खवासखान याणी आपले निसबतीचे लोक त्या त्या चाकरीवर त्या बरतर्फ केलेले लोकांचे जागीं ठेविले. पूर्ण गर्विष्ठपणाचा व अभिमानाचा ध्वज उभारून अयोग्य व वाईट चालीचे स्वभाव धारण करित होता. सुलतान महंमद आदिलशाहा पादशाहा गाजी तर प्रथमपासूनच खवासखानाचे अमार्ग वर्तणुकीवरून राजी नव्हतेच. त्यांत हाली मुस्तफाखानास धरून कैद केल्यामुळें सर्वोपरी अति त्रास पाऊन व कंटाळून गुप्तपणानें कोणास बातमी न कळूं देतां खवासखानाचा निर्मूळ फडशा करण्याकरितां रणदुल्लाखान यासी पूर्ण विश्वासानीं मसलत केली. बहुत अमीरलोक मुरारीचे बदचाली-वरून फार त्रासले होते. मनांत जळत होते. खवासखानाचे गर्विष्ठपणानें सर्व कामें आपल्यासच असावीं असें खवासखानाचे अमार्ग वर्तणुकीवरून बहुत त्रासले होते. यास्तव सर्वांनीं एक विचार करून खवासखानाशीं वाकडेपणानीं वागूं लागले. सर्वांनीं खवासखानास लिहिलें कीं, मुरारी फार बडबड करित असतो. मुरारीस कोणी राजी नाहीं. यास्तव त्याजला पादशाही कारभारांतून काढून काशीक्षेत्रास जाण्यास निरोप द्यावा. आपण सर्व कामें कारभारांत निमग्न असावें. असें केलें असतां कोणीच आपणाशीं वाकडेपणानें वागणार नाहीं. असें लिहिलें तेव्हां

in Julus 7th, A. H. 1043 ( 1633 A. D. i. e. Before June 1633 ) – Bad. Nama, E. D., p. 43-44.

खवासखान याणी त्या अमीरलोकांचे पत्राचें उत्तर लिहिलें कीं, ही काय गोष्ट आहे ? आज मुरारीस राजी झाला नाहींत, उद्या मजलाहि तुम्ही राजी होणार नाहींत, असें लिहिलें. यानंतर खवासखान विचारांत पडून आपले कामाचा विचार विचारण्याकरितां शेख मोहिद्दिन कारभारी यास शहाजहान पादशाहाकडे पाठविला कीं, येथील अमीरलोक याणीं नानाप्रकारचीं संकटें उभीं केलीं आहेत व फंदफितुर करित आहेत यास्तव आपली पादशाही फौज जलद माझे मदतीवर पाठऊन द्यावी, म्हणजे फंदफितुर करणारे लोकांचें पारपत्य करून विजापूर आपलेकडे देतों. असें शहाजहान पादशाहास लिहिलें. येणेंकरून सर्व कारभारीलोक व अमीरलोक यांचे खवासखानाशीं अधिकच वांकडे आलें. अली फरहादखान, खैरतखान, अली खुदावंतखान, महंमद याकुतखान व राघुपंडित याकुतखानी, खेलोजी भोसले व सर्जेराव घाटगे वगैरे बहुत अमीरलोक, कीं जे सरहद्दींत होते ते सर्व एकत्र मिळोन रणदुल्लाखानासी मिळाले. कलबुर्ग्यास सर्व जमा झाले. इतक्यामध्यें इमामखान हवालदार येतगीरकर याणीं या समईं खवासखानाची चाकरी सोडून त्याची आज्ञा मोडण्याचा मार्ग स्विकारिला होता. यास्तव खवासखान याणीं इमामखानाचे पारपत्य करण्याचें व्हाहान्यानीं मुरारी याजला आपले खासे फौजेसहित व मुरारीची खासी फौज होती त्या खासे पागेसुध्धां व अंकुसखान व चांदखान निजामशाही व दरविष महंमद व मुस्तफाखान निजामशाही व दुसरे कित्येक अमीरलोक सरासरी दहा हजार स्वारांसहित येतगिरीकडे सदरहु हवालदाराचे पारपत्यावर रवाना केले.

## १९. अमीरलोक याणी खवासखान याजला कारभारांतून काढून टाकणेंकरितां सर्वांनीं एकदिल होणें प्रकर्ण वर्णन :

रणदुल्लाखान अमीरलोकांचे व फौजेचे जमा करणेचे कामांतून मोकळा झाला तेव्हां खवासखानाचें पारपत्य करण्याकरितां कलबुर्ग्याहून निघोन सर्व अमीरलोकांसहित विजापूराकडे चालू झाला. मलिक रयहान हा सोलापुराहून बहुत कटा फौज घेऊन निघोन कमपुरानजिक सदरहु अमीरलोकांसहित रणदुल्लाखानाचे फौजेंत येऊन मिळाला. तेव्हां रणदुल्लाखान याणीं त्याजला राघु पंडितासहित आपले फौजेचा विचार ठरऊन आज्ञा केली कीं, भिवरानदी महापूर येऊन भरून चालली आहे यास्तव तुम्ही पुढें जाऊन नदींतून पलीकडे उतरावें व आम्ही तुमचे पाठोपाठ येऊन पोहचतो. राघु पंडित भादलवाडी येथें व मलिक रयहान टाकळी येथें पोहचून नदी उतरले. खवासखान याणी गुप्तपणें मलिक रयहान यास निरोप पाठविला कीं, रणदुल्लाखान याणीं मुरारीचे आदावतीस्तव संकट उभें केलें व पादशाही कामांत बखेडा मांडला

आहे तो आपले कर्माचें पारपत्य त्वरितच पावेल. तुम्ही पादशाहाचे दौलतीचें कल्याण इच्छक व माझे परम मित्र आहांत. यास्तव रणदुल्लाखान याचे सांगण्याप्रमाणें करूं नये. त्यावरून मलिक रयहान टाकळी येथून मंदरुपचे रोखावर चालता होऊन नदीकिनाऱ्यास सोलापूरचे सरहद्दींत येऊन राहिला. राघु पंडित याणीं देवगांवचे पाटील आपणांसी मिळऊन घेऊन भिवरा नदी उतरून पांच हजार स्वारांनिसीं देवगांवापासून एक कोसाचे अंतरावर जाऊन उतरला. मुरारी याणी खवासखान याचे हुकुमावरून अमीरलोकांचे नेमलेले जमातीसहित टेलकीर ( टिकेरी वा हुकेरी ) येथें जाऊन एक महिनापर्यंत व्यर्थ त्या किल्यावर जाऊन राहिला. देवगांवास राघो पंडित येऊन पोहचल्याचें वर्तमान कळतांच मुरारी याणीं मनांत आणिलें कीं, राघो पंडित एकटाच आहे व रणदुल्लाखानाची फौज त्याजकडे जाऊन मिळाली नाहीं तों त्याजला धरून कामांतून काढून टाकिला पाहिजे. ऐसें जाणोन टेलकीर येथून सर्व फौज घेऊन निघाले. रातोरात चालून एका रात्रींत बत्तीस कोस बहुत जलदीनें मजल काढून पांच सहा हजार स्वारांनिसीं देवगांवास घेऊन पोहचले. एकंदर लष्कर पाठीमागें राहिलेले जमऊन युध्धरचना करऊन नंतर युध्ध करावें इतकी मार्गप्रतिक्षा न करितां एकाएकीं युध्धासच आरंभ केला. पहिल्या हल्लेंतच उसमान षकरकोटी म्हणोन होता व त्याचे शिपाईगिरीवर मुरारीचा पूर्ण भरंवसा होता तो उसमान ठार झाला. मुरारीचे लष्कराचा मोठा मोड झाला. त्या युध्धांत बहुत लोक ठार झाले. राघो पंडिताची मोठी फत्ते झाली. तेव्हां मुरारी त्या युध्धांतून पळोन गेला. मुरारीची फौज नक्षत्रगणासारखी परागंदा झाली. मुरारी पंधरा स्वारांनिसीं साताऱ्यास पोहचला. मुस्तफाखान निजामशाही हा तेथें मुरारीसी जाऊन मिळाला. मुस्तफाखान निजामशाही याणीं मुरारीस आपले समागमें घेऊन आरकुंडगीस गेला. अंकुसराव याणीं तेथील पाटलांचें मस्तक उडऊन दुदवाडकीस निघोन गेला. तेथून मौजे मुदकी येथें, कीं तो मुदकी हा गांव रणदुल्लाखान याचे जागिरीपैकीं होता तेथें, जाऊन पोहचला. तो गांव लुटला. तेथून मलक्यास आला. सहा दिवस तेथें कृष्णातीरीं राहिला. कारभारी मंडळ व कल्याण इच्छिणारे लोकांनीं त्याजला बहुत प्रकारें सांगितलें कीं, खवासखान जिवंत शहरामध्यें बसला आहे त्याजकडे जा म्हणजे सर्वोपरी अभय प्राप्त आहे, म्हणजे तेथें गेलें असतां जिवास भय नाहीं, असें सांगितलें. परंतु त्याचा मृत्यु संनिध येऊन पोहचला सबब त्या मृत्युग्रस्त पुरुषानी, म्हणजे मुरारीनें, हें सांगणें कबुल केलें नाहीं. नायकवडी लोकांचें मित्रतेचे भरंवशावर धारवाड दरवाजानीं निघोन कृष्णा नदी उतरून धारवाडचा रस्ता धरिला. रणदुल्लाखान हा मुरारीचा मोड झाल्यानंतर सर्व अमीरलोकांसहित भिवरा नदी उतरून कमळापुरास येऊन पोहचला. खवासखान याणीं सर्व अमीरलोक चालून आल्याचें व मुरारी पळून

गेल्याचें वर्तमान ऐकून किल्याचे दरवाजे बंद करून शत्रुत्वाचा अग्नि प्रदिप्त केला. रणदुल्लाखान याणी तो अग्नि विझविण्याकरितां बहुत यत्न केला. नीति व बोध सांगण्याचे रीतीनें खवासखानाशीं बोलणें केलें कीं याहून अधिक गर्व करणें व अविचारानें मसलत न जाणितां वर्तणुक करणें योग्य नाहीं. या करण्यांत उत्तम फळ प्राप्त होणार नाहीं. तें बरें आहे व त्या करण्यांत कल्याण आहे कीं, दौलतीकडील दुसरे कारभारीलोकांप्रमाणें आंतील कोटाचे बाहेर घर बांधून तेथें आपले जागीं स्वस्थ बसा आणि कारभार करित जावा. दुसऱ्यास आपलेकडून त्रास देऊं नये. भयाभीत करूं नये. कारण कीं, आमचे सलेस हेंच येते. या करणेंत संकट उभें राहिलें आहे तें निवारण होईल असें सांगितलें. परंतु खवासखान याणी कदापि हें बोलणें ऐकिलें नाहीं. या बोलण्यानीं अधिकच हरामखोरी, म्हणजे बेमानपणा, दौलतीचे अकल्याण इच्छिण्याविषयीं बहुतच यत्न करूं लागला. दिवसेंदिवस विघ्नांचा अग्नि प्रदिप्त करण्यांत संकटें उभी करणेंत यत्न करित होता.

२०. पादशाहा गाजी याणीं सिद्दी रयहान रुकेसान म्हणजे पत्र पोहचविणारास खवासखानाचा निर्मूळ फडशा करण्याविषयीं सूचना करणें :

यासमई पादशाहा गाजी याणी फुरसतीची संधी समजोन सिद्दी रयहान रुकेसान म्हणजे पादशाहाचा पूर्ण विश्वासू व एकांती भरोंशाचा माणुस होता. त्याजला एकांतीं बोलाऊन भाषणानीं सुचना केली कीं, जितकी संधी सांपडेल तितकी अलभ्य लाभाची असें समजून कामें केलीं पाहिजे. अशी आज्ञा केली तेव्हां या आज्ञेवरून सिद्दी रयहान पादशाहाचे मनांतील भाव समजला आणि बहुत संतोष पावला. येथपर्यंत कीं, त्या संतोषानें अंगरख्यांत अंग माईनासें झालें. इतकी आनंदाची पुष्टी प्राप्त झाली. त्या दौलतीचें अकल्याण इच्छिणाराचा, म्हणजे खवासखानाचा फडशा करण्याविषयीं जिवाचे कमरेवर यत्नांचा कमरबंध, म्हणजे कंबर बांधणेचा पटका बांधिला. त्या प्रकर्णीं विचार करूं लागला. प्रथम याकरितां महालदार, कीं तो महालदार करीम पर्ज्या या पदवीचे नांवानें प्रसिध्द होता व हुसेनखान म्हणोन सर सीलक वकीलाचा मुलगा होता या उभयतांस या कामांत घातलें. या दोघांशीं येविषयींचे सूचनेनें मसलत केली तेव्हां करीम पर्जा व सर शेल्क वकीलाचा पुत्र ( हुसेनखान ) या उभयतांनीं खवासखानास ठार मारण्याविषयीं हिंमत धरून संधी साधण्याची मार्गप्रतिक्षा करित होते. तेव्हां बुधवारीं सन एक हजार पंचेचाळीस[२६] ( १६३५–१६३६

२६. महंमदनामाहि तारिख व महिना देत नाहीं.– Md. Nama, p. 88.

इ. स. ) रोजीं खवासखानास ठार करण्याची तयारी होऊन दरबारांत आले आणि टपून बसले. खवासखान जेव्हां पादशाहापासून बाहेर येऊन आपले घरास जावें असें इच्छित होता इतक्यामध्यें करीम पर्जा खुद जातीनें खवासखानावर चालून येऊन करीम पर्जाचें हातीं कटार होती ती खवासखान याचे कपटानें भरलेले हृदयावर मारिली. अमक्यानें कटार मारिली असें खवासखानानें वोळखावें तोंच जलदीनें करीम पर्जा एकीकडे निघोन गेला. यामुळें खवासखानास वोळख पटली नाहीं. हुसेनखान याणी जेव्हां पाहिलें कीं, खवासखान जखम सोसून निघोन चालला आहे तेव्हां हुसेनखान याणीं फार जलदी करून खवासखानावर एक जखम लागू केली. तत्रापि खवासखान याणीं दोन जखमा लागूं झाल्या असतां धैर्य धरून जलद पळत निघाला आणि बाहेर निघोन गेला. सिद्दी रहयान याणीं या प्रकारची दशा पाहिली तेव्हां विचार केला कीं, खवासखान जर करितां एक घटका वाचल्यास हजार संकटें उभीं करील. असें जाणोन धैर्य धरून पूरकोटाचे मार्गानीं बाहेर पळाला. बाहेर जाऊन खासखेल, म्हणजे खास पागेचे लोक, यांस समागमें घेऊन खवासखानाचा पाठलाग केला. तेव्हां सिद्दी रहयान खवासखानापाशीं जाऊन पोहचला. तोंच खवासखान आपले वाड्यांत जाऊन पोंहचून दरवाजे बंद केले होते. अशा समयांत पादशाहा गाजी याजकडून पुन्हां हुकूम येऊन पोहचला. तेव्हां सिद्दी रयहान याणी पादशाहाचे आज्ञेप्रमाणें खवासखान याणीं दरवाजे बंद केलेले मोडून खवासखानाचे वाड्यांत शिरला. खवासखानाचे मस्तक तोडिलें. हुसेनखान म्हणोन खवासखानाचा परम मित्र होता. तो हुसेनखान हत्तीवर बसून आपले मंडळीसहित खंदकापर्यंत येऊन पोहचला होता. तोंच त्याजला धुळ दरोस मिळविला, म्हणजे ठार केला. दाऊदखान म्हणोन हुसेनखानाचा भाऊ निरंतर खवासखानाच्या मित्रतेच्या फार गया छाटीत होता. तो दाऊदखान या दंग्यात व धादलींत सुरक्षित राहिला. रणदुल्लाखान सर्व अमीर लोकांसहित पादशाहाचे आज्ञेप्रमाणें रात्रीं मध्य भागीं येऊन शाहापुरचे हौदावर उतरले. तेव्हां खवासखानाचे व मुबारकखानाचे मस्तक कापून रणदुल्लाखान याजकडे पाठविलें. कारण कीं, त्या दिवसांत पर्जन्याची अनावृष्टी, म्हणजे पाऊस न पडून, संकट येथपर्यंत आलें होतें कीं, मनुष्यें व जनावरें आकाशाकडे पाहून पर्जन्यवृष्टीचीं मार्गप्रतिक्षा करित होतीं. त्या रात्रीस खवासखान ठार होतांच पर्जन्याची अतिवृष्टि झाली. सर्वांचे मनोरथाचे सेतास त्या पर्जन्यानीं टवटवित केलें. सर्व मनुष्यें दोनींहि संकटांपासून, म्हणजे पर्जन्य न पडल्यामुळें दुष्काळ पडला होता या संकटापासून व खवासखानाचे जुलमाचे पीडेपासून, सुटले. दुसरे दिवशीं पादशाहा गाजी पूर्ण मनोरथानें तक्तावर बसले. सर्व अमीरलोक व वजीरलोक हुजूर येऊन पादशाहास मुजरे करून श्रेष्टता पावते झाले. हरएकास योग्यतेनुरुप पादशाहानीं पोषाख दिल्हे. मलिक रयहान त्याजला पोषाख व बक्षीस पाठविलें. मदरुबा हा गांव इनाम दिल्हा.

त्या दिवशीं सिद्दी रयहान रुकेसान याजला येखलासखान असा किताब देऊन वजिरीचें काम मिळालें. यायोगें सिद्दी रयहान हा सर्व पृथ्वींत प्रसिध्द झाला. मुलकी कामाचा पदाधिकार नबाब खानबाबा याजला दिल्हा. सरनौबतीचें पद खुदावंतखानाचा पुत्र अहंमदखान याजला दिल्हें. या प्रकारें राजधानीचीं सर्व कामें उत्तमपणानें चालू होऊन बंदोबस्त झाला. खवासखान याणी आठ वर्षे पेशवाईचें काम व सर्व कामांचें मुख्यपणाचें काम करून महारुल माहामीचें पद वागविलें. रयहान सरशबुरीद इतकीं अक्षरें अबजदचे हिशेबानीं गणिलीं असतां एक हजार पंचेचाळीस ( १६३५–१६३६ इ. स. ) सन निघतो, म्हणजे या सनांत खवासखान ठार जाहला.

## २१. सिद्दी रयहान याचे कार्यारंभाचें प्रकर्ण वर्णन :

सिद्दी रयहान मूळचा हापसी होता. याजला सवदागर याणी सात वर्षांचे वयांत त्याचे मातुश्रीसहित नवरसपुरचे शहरांत विकावयास आणिला होता. इब्राहीम आदिलशाहा पादशाहा याणी तो मूल लहान वयाचा यास्तव बहुत कृपेनें व लोभानें खरिदी करून सुलतान महंमद शाहाजादा याचे चाकरीवर ठेविला. त्याचे मातुश्रीस आलीखान आसारी यांणी खरिदी केलें. सुलतान महंमद शाहाजादा याचें व सिद्दी रयहान याचें एकसारखेंच वय होतें. यास्तव सिद्दी रयहान यासी सुलतान महंमद शाहाजादा याची फारच मित्रता होती. सिद्दी रयहान हा शाहाजाद्यासी हरएक खेळांत खेळावयाचा सोबती झाला. हरएक कामांत काजांत एकांती व कचेरींतहि मनुष्यासमागमें मनुष्याची सावली बरोबरच वागती त्याप्रमाणें सुलतान महंमद शाहाजादा याचे चाकरीवर सर्व काल राहत होता. शाहाजादा त्याचे बहुत मेहेरबानगीनें पालन करित होता. यायोगें सिद्दी रयहान हा शाहाजाद्याचे पूर्ण कृपेतील भरंवशाचा माणुस झाला. असें म्हणतात कीं, एके दिवशीं शाहाजादा सिद्दी रयहान यासी खेळत होता आणि इब्राहिम आदिलशाहा पादशाहा दुरून पाहात होते. तेव्हां शाहाजादा याणी सिद्दी रयहान याचे मस्तकावरील टोपी हिराऊन घेऊन हावदांत टाकली. तेव्हां सिद्दी रयहान माझी टोपी आणून द्या म्हणोन शाहाजाद्यास तगादा करूं लागला. सिद्दी रयहान याणी इब्राहीम आदिलशाहा पादशाहापाशीं येविसीं फिर्याद केली. तेव्हां पादशाहांनीं सिद्दी रयहान याची टोपी आणऊन देविली. हें प्रकर्ण पाहिल्यानंतर इबराहिम आदिलशाहा पादशाहा यांणी आज्ञा केली कीं, सुलतान महंमद पादशाहा होईल व हा सिद्दी रयहान हापसी सुलतान महंमद पादशाहाचा मदारुल महाम म्हणजे मुख्य कारभारी पूर्ण विश्वासू होईल. तात्पर्य असें जाहालें कीं, पादशाहानीं आज्ञा

केली होती कीं, सिद्दी रयहान याजला रुकेरसान याजकरितां म्हणतात, कीं एकांती लोकांचीं कामांचीं पत्रें आणून पादशाहापाशी पोहचवित होता. यास्तव रुकेरसान असें म्हणतात.

## २२. पादशाहा गाजी याणी मुस्तफाखान याजला बेळगांवचे किल्यांतून आणविणें प्रकर्ण वर्णन :

त्यानंतर पादशाहा गाजी प्रबलतेनें गादीवर बसले. राजधानीचीं कामें खुद आपण आपले मुख्त्यारीनें चालवित होता. नबाब मुस्तफाखान हा खवासखानाचे जुलमानें बेळगांवचे किल्यांत कैद झाला होता. त्या मुस्तफाखानास आणविणेंकरितां सयद जातींतील श्रेष्ठ व मोठा संभावित शाहा हसन जाफराबादी होता त्याजला रवाना केला. तेव्हां शाहा हसन यांणीं नऊ रोजांत नबाब मुस्तफाखान याजला बेळगांवचे किल्यांतून बहुत श्रेष्ठतेनें व अति आदर तारतम्यानें विजापुरास आणिलें. पादशाहा गाजी यांणीं पादशाही मेहरबानगीनें नबाब मुस्तफाखान याचा बहुत सत्कार करून मुलकी कामाचें पद दिल्हें. यायोगें नबाब मुस्तफाखानाची योग्यता पहिले पदाधिकाराहून शंभर पट पदवी वाढली.

## २३. मुरारीचे कामाचा शेवट होणें प्रकर्णी वर्णन :

मुरारी याची मोठी शिकस्त झाली. नायकवाडीमंडळींचे विश्वासानें धारवाडीं गेला होता. जेव्हां पांच हजार स्वारांचे जमातीनिसी धारवाडास जाऊन पोंहचला ( तेव्हां ) धारवाडचे लोकांनीं मुरारीस कोटाचें आंत येऊं दिल्हें नाहीं. युद्धास तयार झाले तेव्हां मुरारीनें बहुत रदबदली व करार केल्यानंतर दलपतराव व सुरुपराव व सर्व नायकवाडी मंडळी यांणी बाहेर येऊन मुरारीची भेट घेतली. तेव्हां मुरारीनें त्यांस कैद करून व कित्येक शिपाईलोक वगैरे युध्दास तयार झाले होते या अपराधास्तव मुरारीनें त्यांचीं पारपत्यें केलीं. मुरारी चार दिवस तेथेंच राहिला होता. चवथे दिवशीं खवासखान ठार झाल्याचें वर्तमान समजलें तेव्हां हें वर्तमान जाहीर न करितां रात्रीचे समई एका घोड्यानिशीं पळून जाऊन हल्याळचे सरहदींत निघोन गेला. तेव्हां तेथील मामलेदारानीं त्याजला कैद करून हुजूर पाठविला. जेव्हां हुजूर येऊन पोहोचला तेव्हां जीभ लांबऊन बडबड केली व बहुत सिव्या दिल्या. यास्तव सरकार आज्ञेप्रमाणें मुरारीची जीभ नरड्यापासून काढून गाढवावर बसऊन

शहरांतून धिंड काढली. त्याचे शरीराचे तुकडे तुकडे केले. हें प्रकर्ण खवासखान ठार झाल्यानंतर एक महिन्यानें झालें. शके १५

## २४. शहाजहान पादशाहा यांणीं आगऱ्याहून दौलताबादेस येणें व पादशाहा गाजी व शहाजहान पादशाहा या उभयतां पादशाहांनीं निजामशाहाचा मुलुक निमेनिम वांटून घेऊन या गोष्टीवर उभयतांचे सख्य होणें प्रकर्ण :

शेख मोहिद्दीन वकील हा खवासखानाकडून वकिलीचे कामावर आगऱ्यास रवाना झाला होता, तो वकील शहाजहान पादशाहाचे सेवेंत श्रेष्ठता पावोन वकिलीचें कामाप्रकर्णीं सर्व मजकूर तपशीलवार सविस्तर पादशाहास अर्ज करून दक्षिण देशावर चालून जाणेंविषयीं बहुत लोभयुक्त अर्ज करिता झाला. शहाजहान पादशाहा तर बहुत दिवस ही गोष्ट इच्छित होता. हाच मनसुबा होता व शहाजहान पादशाहा ईश्वरापाशीं हेंच मागणें मागित होते. यास्तव बहुत संतोष व आनंद पाऊन दक्षिण देशावर चालून जाण्याचें तयारीस लागून थोडकेच दिवसांत बहुत फौज जमऊन लष्कराची ढाल दक्षिण देशाकडे चालून जाण्याकरितां उभी केली. मजल दरमजल दररोज कूच करण्यानंतर दौलताबादेस येऊन पोंहचून तेथें मुकाम केला. जेव्हां त्या समई ही स्वारीं दक्षिण देशावर त्याचे मसलतीवरच झाली होती तो खवासखान ठार झाला यास्तव शहाजहान पादशाहा आपले कामाचे फिकीरींत पडून चिंताग्रस्त झाले. यानंतर आदिलशाहाकडूनहि निजामशाहाचा मुलुक वांटून घेण्याविषयीं तगादा येऊन शहाजहान पादशाहा याणी आपले लष्कराचे सरदार मंडळ निजामशाहाचे मुलखावर हरएक तर्फेस नेमिले. सयद खानजहान याजला फौजेसहित परांड्याकडे रणदुल्लाखानावर रवाना केलें. खानदौरान याजला दुसरे अमीरलोकांसहित व बहुत फौज देऊन बेदर व चिंचोलीकडे बहलूलखानावर नेमिलें. इयातखान व खानजमान याजकडे कल्हेराकडे आंबरखान व शहाजी भोसले यांजवर नेमिलें. तेव्हां सदरहु हरएक असामी नेमिलेले आपआपले तर्फेकडे जाऊन पोहचून युध्ध करिते झाले. तेव्हां आदिलशाहाकडील अमीरलोकांनीं दिलीकडील अमीरलोकांचे पारपत्य करण्याकरितां हिंमत धरून रुस्तुमासारिखे मोकाबल्यावर उभे राहून युध्ध करित होते. शहाजहान पादशाहा याणी यद्यपि बाह्याकारी फौजा पाठवून लढाई चालू केली परंतु अंतरयामेंकरून सख्यपणाचा मार्ग ठेवित होता. आदिलशाहाकडील मुख्य कारभारी मुस्तफाखान तर पूर्वीपासून मोंगलासी सख्य करण्यांत निमग्न होता. त्या मुस्तफाखानानीं हली आपले मनोरथ पूर्ण होण्याचा समय

शिवभारत – अथ शाहजहापि सो जहांगीरनंदनः। सम आदिलशाहेन सद्यः संधिमयोजयत्। ९.८
ततो राजपुरासाहे शाहं बुद्धि जिगीवतोः।
तयोस्समभवत् सीमा भीमा नाम महानदी। ९.९



बहुत दिवस इच्छा करित होता ती इच्छा सफळ होण्याची वेळ हीच असें जाणून सख्य करिता झाला. शाहा दाऊद वलद वफाखान व शाहा अबदुल हासन मतुलजा व काजी सेख याजला सख्य करण्याकरितां शहाजहान पादशाहाकडे दौलताबादेस रवाना केलें.[२७] तेव्हां काजी सय्यद याजला माहित होतें कीं, रणदुल्लाखान हा कदापि सख्य करण्यास राजी नाहीं. रणदुल्लाखानाचा बेत सर्वोपरी युध्द करण्याचा आहे. याजकरितां कोणा एकास पाठऊन रणदुल्लाखानास निरोप सांगून पाठविला कीं, तुम्हास आपल्याच संतोषानें या प्रकारचा हाट व आग्रह करणें काय जरूर आहे? दौलतीकडील दुसरे कारभारी मंडळाचे मन दुखऊन वर्तणूक करण्यांत कांहीं फायदा नाहीं. ईश्वर प्रित्यर्थ हा विचार सोडून देऊन सर्व कामदार मंडळासी मिळून असावें. तुम्ही हुजूर येऊन मुस्तफाखानासी व पादशाहासी मिळून सख्य करावें. असा निरोप पाठविला. रणदुल्लाखान यांणी हें बोलणें ऐकून आपलें अंतःकरणांत पुरा विचार करून शेवटीं दुरवर विचार पाहून खुद जातीनें जलद हुजूर येऊन पोहचला. तेव्हां मुस्तफाखान यांणीं रणदुल्लाखान याजला आपले घरीं दहा पंधरा दिवस पाहुण्यासारखे आदर तारतम्य ठेऊन बहुत उत्तम प्रकारें विचार शिकऊन व बुध्दिवाद करून रणदुल्लाखान यास ताळ्यावर आणोन आपले मनांतील विचाराप्रमाणें राजी केला. नंतर शहाजहान पादशाहा व पादशाहा गाजी या उभयतांत असें सख्य झालें कीं, निजामशाहाचा जितका मुलुख श्रीकृष्णा नदीचें पलीकडून तर्फेस आहे तितका शहाजहान पादशाहाकडे असावा व निजामशाहाचा जितका मुलुख अलीकडील तर्फेस आहे तितका आदिलशाहा पादशाहाकडे असावा. जेव्हां उभयता पादशाहांचें सख्य या प्रकारचें करारावर ठरलें तेव्हां शहाजहान पादशाहा याणी आज्ञा केली कीं, करारनामा सोन्याच्या पत्र्यावर ल्याहावा. अशी आज्ञा केली. लष्करांत बहुत दिवस मुक्काम होण्यामुळें व कोणाकडीलहि रसद न येण्यामुळें मोठा दुष्काळ पडला होता. निखालस धान्य मिळेनासें झालें. तेव्हां सर्व फौज जेरीस येऊन शहाजहान पादशाहा निघण्याचे जलदीस्तव सख्य करण्याचे प्रकर्णी बहुत जलदी करित होते. तहमासिप परांडेकर याजला, कीं तो तहमासीप मोठा अकलवान प्रसिद्ध होता त्याजला, ताकिद केली कीं, पांच दिवसांत दौलताबादेहून विजापुरावर जाऊन परत यावें. अशी ताकिद करून रवाना केलें. तहमासीप अडीच रोजांत जेव्हां विजापूरास येऊन पोहचला तेव्हां मुस्तफाखान याणी सख्य करणें कबूल करून त्या जासुदास निरोप दिल्हा.[२८] शहाजहान पादशाहा दौलताबाद येथें रहाण्यास बहुत त्रासले

२७. April 1635– Bad. Nama, E. D., p. 53.

२८. "On the 2nd day of the arrival of your (Shah Jahan's) farman which is Monday, the 25th of Zilhij, 1044 A. H., (1 June 1635) the Khan (messenger) was sent back .... ." etc.,– Extrac

होते. यास्तव जासुद परत येईतोंपर्यंत आर्धांचे डेरे व राहुट्या व बाजारबुणगे वगैरे लष्करचें किरकोळ साज पुढें रवाना केले, शहाजहान पादशाहा जासुद परत येण्याची मार्गप्रतिक्षा करित राहिले होते. इतक्यामध्यें सदरहु जासुद पांचवे दिवशीं सातवे तासीं किंवा आठवे तासीं परत आला. त्याच वेळेस शहाजहान पादशाहा आपले राजधानीचे स्थानाकडे, म्हणजे दिलीस, चालते झाले. त्या करारनाम्याची तारीख माहे जिल्हेज सन १०४५[२९] (२६ एप्रिल ते २४ मे १६३६) होती. नंतर मुस्तफाखान यांणीं करार मदार ठरल्याप्रमाणें निजामशाहाचा मुलुख श्रीकृष्णानदीचे अलीकडे होता तो आदिलशाहाचे दौलतीकडे आणिला. शहाजहान पादशाहाचे अमीरलोक यांणीं श्रीकृष्णा नदीचे पलीकडील मुलुक शहाजहान पादशाहाचे दौलतीकडे आणिला. इकडून खान जमान हा शहाजहान पादशाहाचे तर्फेनें शाहाजी भोसले याजवर नेमिला होता. खान जमान याचा हात सुलभपणें व ढिलाईनें शाहाजी भोसले [illegible] चालू होता. याजकरितां रणदुल्लाखान आदिलशाहाकडून खानजमान याचे मदतीवर नेमिला. मलिक रयहान याजकडून सुध्दा सिद्दी मर्ज्यानहि रणदुल्लाखानाचे कुमकेवर नेमिला. तेव्हां खानजमान व रणदुल्लाखान याणी माहुलचे किल्यावर जाऊन पोहचून त्या किल्यावर हल्ला करून किल्ला घेरला. तेव्हां शाहाजी राजे भोसले याणी कितीहि त्यांचें पारपत्य करण्याकरितां यत्न केला व मोठी कटा लढाई केली तरी शेवटीं शाहाजीराजे भोसले जेरीस येऊन निरोपाय होऊन सख्य करिते झाले. रणदुल्लाखानाचे आश्रयानें सख्य करणेचे करार ठरऊन मुर्तजा निजामशाहास खानजमान याचे हवालीं करून माहुलचा किल्ला आदिलशाहाचे हवालीं करून शाहाजीराजे भोसले सुलतान महंमद आदिलशाहा पादशाहा गाजी याचे चाकरमंडळांत शिरले, म्हणजे चाकर होऊन राहिले.[३०] त्यानंतर खानजमान[३१] हा मुर्तजा निजामशाहासहित दौलताबादेकडे चालू झाला. रणदुल्लाखान व शाहाजीराजे भोसले आदिलशाहा पादशाहाचे चाकरीवर चालते झाले.

वैशाख शके १५५

from the letter of Adil Khan to Shah Jahan after receiving the treaty.- Md. Nama, p. 95. Bad.-Nama, p. 57.

२९. हिजरी सन १०४४ ऐवजी १०४५ असा आकडा चुकून पडला असावा. करार नामा १ जून १६३५ लाच म्हणजे १०४४ हिजरीच्या जिल्हेज महिन्याचे अखेरीस झाला.

३०. "शके १५५७ (२६ मार्च १६३६ च्या पूर्वी) शाहाजी राजे माहुलीस गेले. तेथे रणदुल्लाखान इदलशाही व खानजमा मोगलाचा सुभा जाऊन वेढा घालून निजामशाहा हाती घेतला. शाहाजी राजे इदलशाही चाकर झाले."– जेशका. पृ. १७ व शिवाश. पृ. ५५, शिचप्र.

३१. "On the 4th Zilhija 1046 A. H. (20 April 1637) the news came that Khan Zaman had died at Daulatabad."– Bad. Nama, p. 61.

२५. सुलतान महंमद आदिलशाहा यार्णीं युध्ध करणेंचा ईरादा ठरविणें आणि रणदुल्लाखान यास सरलष्करचें पद देऊन हिंदूंचे शहरांवर म्हणजे कर्नाटकवर फौज रवाना करणें प्रकर्ण :

जेव्हां सुलतान महंमद आदिलशाहा गाजी याचें श्रेष्ठ धैर्य विजापुरचे तख्तावर बसल्यापासून ईश्वराचे मनोगताकडेंच होतें, अमार्ग व अधर्म चालीचा बहुत कंटाळा होता, यास्तव निरंतर अयोग्य परिणामाचे हिंदुलोक होते त्यासी युध्ध करणेचा वर्ग, दगा व वाईट परिणामाचे हिंदु लोकांशीं युध्ध करणेंचा वांकडेपण, आदिलशाहाचे मनांत येत होता. आदिलशाहा ईच्छित होता कीं, राजधानीचा बंदोबस्त झाल्यानंतर व मुलुख घेण्याचा मनांत जसा बंदोबस्त व्हावा असा झाल्यानंतर यशस्वी लष्कराची ढाल व यशस्वी फौज हिंदूंचे मुलकाकडे कर्नाटकावर नेमून युध्ध करून त्या युध्दाचे फळ प्राप्त करून घ्यावें. मुसलमानांचा श्रीआ धर्म चालविणें व पैगंबर आलेकु सल्लाम याचा श्रेष्ठ धर्म चालविणेंविषयीं बहुत यत्न करून धर्म स्थापला. गाजी, म्हणजे युध्द करून पृथ्वी घेणारा, असें आपले नांव करून घ्यावें असें इच्छित होता. आपला खजिना वाढवावा व आपला मुलुक विस्तीर्ण करावा अशा पादशाहाच्या उत्तम चालीच आहेत त्याप्रमाणे यत्न करावा. याजकरितां हली शेजारचे गृहस्थाचे कामापासून फुरसत झाली आहे आणि मोंगल वगैरे लोकांपासून पूर्ण दिलभरंवसा आला आहे व चित्तास पूर्ण स्वस्थता प्राप्त झाली आहे यास्तव इच्छिलेला मनांतील इच्छेनें बहुत दिवसांचा इरादा अंतःकरणांत होता तो शेवटास न्यावा. याजकरितां सिपहसालार रणदुल्लाखान याजला सरलष्करी देऊन आपला मुखत्यार करून श्रेष्ठ अमीरलोकांसहित व यशस्वी फौज देऊन रायगिरीकडे रवाना केलें. मलीक रयहान याजलाहि हुकूम सादर केला कीं, रणदुल्लाखानासमागमें राहून या कामांत हुशार व तत्पर असावें. अशी आज्ञा केली तेव्हां मलिक रयहान यार्णीं याप्रकारचा आदिलशाहाचा हुकुम सादर होतांच सिद्दी आंबर काला याजला आपले निसबतेनें सोलापुरांत ठेऊन आपण हत्यारबंद चार हजार स्वारांसहित रणदुल्लाखानाचे समागमें चालता झाला. जेव्हां यशस्वी फौज रायगिरीचे हदींत जाऊन पोंहचली तेव्हां हिंदु लोकांचे अंतःकर्णांत धाक व भय बहुत प्राप्त झालें. राजा वीरभद्र हा तेथील मालक होता. हा भयाभीत होऊन युध्ध करण्याचा संकल्प मनांतून सोडून सख्य करिता झाला.[३२] सेवकपणा धारण करून राहिला. मलिक रयहान याचे मार्फतीनें सख्य करण्याचा निरोप पाठविला. सख्य करण्याचा करार ठरविता झाला. बहुत खंडणीचा ऐवज देणें कबुल केलें.

३२. "शके १५५८ (१६३६-७ इ. स.) बसवापटण इदलशाहानीं घेतलें."—जेशका, पृ. १७, व शिवाशका. पृ. ५, शिचप्र.; Md. Nama, p. 97.

या करण्यांत नाहीं होय म्हणोन शेवटीं तीस लाख होन ठरले. या प्रतिज्ञेनें कीं सोळा लक्ष होन पोहचवीत जावें आणि बाकीचे चौदा लक्ष होन हसेबंदीनें तीन वर्षांत द्यावें. जेव्हां या प्रकारचे करारानें सख्य जाहलें आणि ठराव झालेले द्रव्य हस्तगत झालें तेव्हां रणदुल्लाखान संतोष पाऊन मनोरथपूर्ण होऊन विजापुरास परत येता झाला. रणदुल्लाखान याणीं आणिलेलें द्रव्य सरकारी खजिन्यांत दाखल केलें. आपण शहर नवरसपूर येथें राहिला. मलिक रयहान याणी सोलापुराकडेस जाणेस निरोप घेतला. हें प्रकर्ण झाल्यानंतर पादशाहा गाजी याचें अंतःकर्णाचा इरादा सोलापूराकडे झाला. रणदुल्लाखानचे वशिल्यानें मलिक रयहान याजकडे सुचना केली कीं, सोलापूरचा किल्ला इकडील कामगाराचे हवालीं करावा. असें केलें असतां या करण्यामध्यें सरकारांतून श्रेष्ठ पद प्राप्त होईल. अशी सूचना केली तेव्हां मलिक रयहान यानीं सरकारमर्जीप्रमाणें हुकुम दाखल होतांच आज्ञा मान्य करून सेवकपणा स्वीकारून, मस्तकाचे पाय करून, सोलापुरचे किल्याचे कुलपाच्या किल्या घेऊन खुद जातीनें हुजूर येऊन पोंहचला. रणदुल्लाखान याचे वशिल्यानें सदरहु किल्याच्या किल्या पादशाहा गाजीपाशीं हजर केल्या. तेव्हां पादशाहानीं त्याजला बहुत मेहरबानगीनें व अत्यंत बक्षिस देण्यानें योग्यतेस चढऊन पांच लाख होनांचा मुलुख इनाम दिल्हा. तेव्हां मलिक रयहान संतोष पावोन निरोप घेता झाला आणि मारडीस निघोन गेला. किल्ला रिकामा करून दिल्हा. हसन रुमीखान हा त्या किल्याचे बंदोबस्ताचे कामावर पादशाहा गाजी याणीं नेमिला. रणदुल्लाखान याणी सोलापुरचे कामापासून मोकळे झाल्यानंतर निरोप घेऊन आपले जागिरीचे महालाकडे हुकेरी व रायबागेस जाता झाला. सख्य झाल्यानंतर दोन वर्षांनीं जेव्हां वीरभद्र याजकडून हसेबंदीनें ऐवज देण्याचे करार सुटले तेव्हां आदिलशाहाची यशस्वी फौज पुन्हां तिकडे नेमिली गेली. तेव्हां यावेळेस मुसलमानी शूर लोकांनी वीरभद्र राजाचे हातून येकरी (हुकेरी) हा गांव हिसकाऊन घेतला. त्या वर्षाचा सन १०४७ (१६३७-१६३८ इ. स.) होता. त्या सालीं येकरी हा गांव पादशाहा गाजी त्याचे मुलखाचे ताब्यांत आला. यानंतर कित्येक दिवसांनीं आदिलशाहानीं आपली यशस्वी फौज लढाऊ सामानसरंजाम याची कटा तयारी करून रणदुल्लाखान याजला सरलष्करी देऊन कर्नाटकावर नेमिली. सर्व अमीरलोक व सरदार मंडळास रणदुल्लाखानाचे समागमें ताबेदारींत नेमून हुकूम दिल्हा कीं, जो कोणीं रणदुल्लाखानास मदत देण्यास व रणदुल्लाखानाचे सेवेंत वागण्यास अंतर करील, ढिलाईनें वागून चाकरी करणार नाहीं, त्याचा मुलुक व दौलत जप्त करणेंविषयीं व त्याचे पारपत्य व क्षमा करण्यास रणदुल्लाखान मुखत्यार आहे. मलिक रयहानहि त्या समई रणदुल्लाखानाचे समागमें राहून सदरहु कामांत तत्पर होता. तसेंच सिद्दी अंबर याणी दोन हजार स्वारांनिशीं सिधनूरचे सरहदींत राहून रणदुल्लाखानाचे सोबतीनें व त्याचे समागमें वागण्याविषयीं हट केला होता.

यास्तव मोठा शूर जो अफजुलखान याजला पांच हजार स्वारांनिशीं सिद्दी अंबरखानास धरून कैद करण्याकरितां नेमिला. जेव्हां अफजुलखान सिधनूरचे हदींत जाऊन पोहचला तेव्हां सिद्दी आंबरखान याणीं आतां निरोपायपणें रडून काकुलती होण्याशिवाय आपली सुटका होत दिसत नाहीं असें जाणून आपणच पायांत बेडी अडकवून घेऊन मेन्यांत बसून अफजुलखानापुढें धाऊन गेला आणि बोलला कीं, मजला पादशाहाची आज्ञा शिरसा वंद्य आहे. असें बोलला आणि आज्ञापत्र सिद्दी अंबरखानाचे नावें सादर झालें होतें तें सिद्दी अंबरखान यांणीं मस्तकीं वंदन करून अफजुलखानाचे समागमें चालता झाला. जेव्हां यापुर्वी मलिक अंबर याचे वेळेस ज्यासमई खैरतखान व अंबरखान कैद होऊन दौलताबादेचे काळाकोटांत कैद झाले होते व मलिक रयहान याजकडे त्यासमई काळाकोटाचे बंदोबस्ताचे काम होतें तेव्हां मलिक रयहान याणी या उभयतांचे संरक्षण केलें होतें. या कारणास्तव या उभयतामध्यें पूर्वीपासून पूर्व मित्रता व वोळख पडली होती. यास्तव यासमई मलिक रयहान व खैरतखान हे त्याचा अन्याय क्षमा करण्याविषयीं उठोन रणदुल्लाखानाकडून त्याचा अपराध क्षमा करविला. सिद्दी अंबरखानाचे पायांतील बेडी तोडून त्याची दौलत व मालमत्ता त्याची त्यास बहाल केली. यानंतर रणदुल्लाखान यांणी आपले समागमीचे फौजेसुध्धां, कीं चाळीस हजार स्वार होते त्या फौजेसुद्धां, हिंदु लोकांचे मुलखांत, म्हणजे कर्नाटकांत, ( १६३८–३९ इ. स. ) चालू आला. मुलुख घेण्यास आरंभ केला. तात्पर्य, या कामास बहुत दिवस झाले. बहुत तजविजीनें हिंदु लोकांचा सर्व मुलुख किल्ले वगैरे हस्तगत करून आपले मुलखास येऊन दाखल झाला. पैगंबराचा प्रबळ धर्म चालू करणें व मुसलमानाचा धर्म स्थापन करणें प्रसिध्ध केलें. जेव्हां बहुत दिवस रहाणें झालें व प्रवासांतील हवा व पाणी बदललें यामुळें सर्व मनुष्यांच्या व जनावरांच्या प्रकृती बिघडल्या. सर्व लष्कर थकलें. पादशाहाची आज्ञा या कारणास्तव परत येण्याविषयीं झाली. यानंतर कित्येक दिवसानंतर खानमहंमद व मलिक रयहान याजला त्याचे जमातीसुद्धां गंजीकोट हस्तगत करण्याकरितां रवाना केलें. त्याणी जाऊन या मजबूत किल्यास हल्ला करून घेरा देऊन लढाई चालू केली.

## २६. कित्येक दिवसानंतर नबाब मुस्तफाखान याजला कर्नाटकाकडे पाठविणें प्रकर्ण :

त्यानंतर कित्येक दिवसांनीं कर्नाटकांतील सर्व राजेलोकांपेक्षां राजा रायल म्हणोन मोठा दौलतदार व बहुत फौजेचा धणी होता त्याणी बहुत दंगा आरंभिला होता असें वर्तमान आलें, सदरहु राजानीं आपलेपाशीं बहुत फौज व

बहुत द्रव्य आहे या गर्वानीं व या अभिमानानीं आपले मस्तक आकाशावर वाढविलें, म्हणजे अंत गर्व झाला. कोणतेच हिंदु किंवा मुसलमान यास खातरेंत आणित नव्हता. त्या तर्फेतील सर्व मुसलमान लोकांस उपद्रव करूं लागला असें आदिलशाहाचे ऐकण्यांत आलें. तेव्हां पादशाहास व पादशाहाचे सर्व जमातीस अंत क्रोध आला. तेव्हां पादशाहानीं त्या अमर्याद व गर्विष्ठ पुरुषाचें पारपत्य करण्याचा इरादा ठरऊन सर्व अमीरलोकांनीं हुजूर येऊन हजर व्हावें आणि फौज जमवावी अशी आज्ञा केली. लष्कर जमलें तेव्हां लढाईचा सामानसरंजाम सिध्ध झाला. तेव्हां नबाब मुस्तफाखान याजला सरलष्करी देऊन व सर्व शिपायांची सरदारी देऊन व सर्व अमीरलोक व सरदार मंडळ मुस्तफाखानाचे बंदोबस्ताकरितां, म्हणजे चाकरींत, नेमून कर्नाटकाकडे रवाना केलें.[३३] तेव्हां मुस्तफाखान यार्णी आपलेपुढें शाहाजीराजे भोसले व आसदखान यांजला फौजेसुध्धां रवाना केलें. त्यानंतर मुस्तफाखान खुद जातीनें बाकीचे फौजेसुध्धां त्या पर्वतासारिखे हत्ती व बहुत सामान सरंजाम तयार करून, समागमें घेऊन, सन १०५७ ( १६४७ इ. स. ) सालीं कर्नाटकाकडे चालता झाला. शाहाजीराजे भोसले व आसदखान हे उभयतां पुढें रवाना केले होते.[३४] ते जेव्हां राजा रायल याचे सरहद्दीनजिक येऊन पोहचले तेव्हां दामलवाड व कृष्णा नफची (?) हे उभयता तिकडील, म्हणजे कर्नाटकाकडील, मोठे शूर होते. राजा रायल याजकडील मोठे कीर्तीमान नामांकित सरदारलोकांपैकीं होते. ते शाहाजीराजे भोसले व आसदखान या उभयतांचे मोकाबल्यावर चालून येऊन युध्ध करिते झाले. उभयतांमध्यें कित्येक मोठ्या मोठ्या लढाया झाल्या. शेवटीं हिंदुकडील कर्नाटकचे फौजेनें मुसलमान लोकांवर बळ करून जबरदस्ती केली. तेव्हां शाहाजीराजे भोसले व आसदखान या उभयतांची फौज परागंदा झाली. तेव्हां शाहाजीराजे भोसले यांचा खुद बसवायाचा हत्ती व बहुत सामान सरंजाम हिंदु लोकांनीं लुटून नेलें. तेव्हां नबाब मुस्तफाखान यासमई सात आठ मजलीचे अंतऱ्यावर इकडील तर्फेस होते. शाहाजीराजे भोसले यांचे फौजेचा मोड झाला असें मुस्तफाखानास वर्तमान येऊन पोहचतांच मुस्तफाखान याणी आपले यशस्वी लष्कर व मजबूत कटा सामान बिंगरूळास पाठऊन आपण लढाईकरितां तयार होऊन

३३. "On the 1st day of the month of Jamadil-awwal ( 1056 A.H. = 5 June 1646 ) Nawab Mustafa Khan started from Muhamadpur to conquer the countries of Karnatak and Malnad ......."- Md. Nama, p. 110.

३४. "Nawab Mustafa Khan left that place ( Gadag Lakmeshwar ) on 3rd Ramzan ( 3 Oct. 1646 ) and in the vicinity of that place he met Asad Khan and Shahaji Raja, who were sent in advance to guard the boundaries of Karnatak."- Md. Nama, p. 111.

तिकडे जाण्यास कुच केलें. हिंदु लोकांचें प्राबल्य फार झालें असें पादशाहा गाजीकडे विनंतीपत्रें लिहून आणखी कुमकेस फौज पाठवावी म्हणोन विनंति लिहिली. तेव्हां पादशाहा गाजी आदिलशाहा याणी तात्काळ आज्ञापत्र लिहून खानमहंमद व मलिक रयहान हे गंजीकोटाकडे लढाई करित होते त्याजकडे जासूद रवाना केले. खानमहंमद याजला लिहिलें कीं, तुम्ही तूर्त गंजीकोटावर हल्ला करणें मवकुफ करून अति त्वरेनें बहुत जलद हुजूर येऊन हजर व्हावें असें लिहिलें. मलिक रयहान व अली खुदावंतखान व खैरतखान व दुसरे कित्येक अमीरलोक खान महंमद समागमें होते त्यांजला आज्ञापत्रें सादर केलीं कीं, तुम्ही अति सत्वर फार जलद सदरहूचे किल्याचे हलेवरून निघोन मुस्तफाखानाचे मदतीवर जावें. असें लिहिलें तेव्हां मलिक रयहान याणीं विनंतिपत्र लिहिलें कीं, इकडील लढाई फार दिवस लांबली. यामुळें घोडे वगैरे थकून कामाचे उपयोगांतून गेले आहेत. मीहि बहुत दिवस स्वामींचें चरण पाहिलें नाहींत. याजकरितां हली एक वेळ हुजूर येऊन स्वामींचें चरण दर्शन घेऊन, श्रेष्ठता पावोन, नंतर ज्या नोंकरीविसीं आज्ञा होईल तिकडे डोळ्याचे व मस्तकाचे पाय करून चालता होईन, असें विनंतिपत्र लिहिलें. अशा समयांतच नवीन वर्तमान पोंहचलें कीं, राजा रायल खुद जातीनें फौज घेऊन, टोलवाडीहून व मुंग्यांचे वरणा-पेक्षां अधिक फौज होती त्या फौजेसुद्धां, मास्तीचे घाटावर चढून आला. पादशाहास हें वर्तमान कळलें तेव्हां पादशाहा चिंतेंत पडून मलिक रयहान याणी हुजूर येण्या-विषयीं विनंतिपत्र लिहिलें होते, हें विनंतिपत्र यासमई कबुल करणें योग्य नाहीं असें जाणोन पुन्हां आज्ञापत्र लिहून त्या आज्ञापत्रावर आपली तसवीर काढून मलिक रयहान याजकडे तें आज्ञापत्र रवाना केलें. लिहिलें कीं, प्रसंग कटीण आहे. कार्यभाग बहुत अवघड येऊन पोंहचला आहे. याजकरितां यासमई तुम्ही हुजुर येणें योग्य नाहीं. याजकरितां असें करावें कीं, तुम्हास आमचे दर्शनाची बहुत आवडी उपजली आहे यास्तव हे आज्ञापत्रावर आम्ही आपली तसवीर काढविली आहे ती पाहून हुजुरूच येऊन पोंहचला आणि प्रत्यक्ष आमचेंच दर्शन घेऊन आम्हासीच भाषण केलें असें मनांत आणोन तेथून अति सत्वर बहुत जलद निघोन जावें. दोन मजलीची एक मजल करून फार जलद नबाब मुस्तफाखान यासी जाऊन मिळावें असें लिहिलें. नबाब मुस्तफाखान याजला लिहिलें कीं, मलिक रयहान हा तुम्हापासीं येऊन मिळाला नाहीं तोंपर्यंत तुम्ही लढाई सुरू करूं नये. मलिक रयहान यांणी पादशाहाची आज्ञापत्रें येऊन पोंहचतांच खैरतखान व अली खुदावंतखान वगैरे सरदारमंडळीसहित कूच करून आज्ञेप्रमाणें दोन मजलीची एक मजल करित मजली काढित, बिंगळूर व मास्तीचे मध्यभागीं नबाब मुस्तफाखानापाशीं जाऊन मिळाले. तेव्हां नबाब मुस्तफाखान यांणी पाहुण्याचा आदर ठेवितात त्या प्रमाणें अमीरलोक बहुत सामान सरंजाम तयार करून मलिक रयहान याजला थोडेसें पुढें सामोरें जाऊन,

अत्यंत मेहेरबानगीनें व मित्रतेनें मलिक रयहान याची भेटी घेऊन, बहुत कृपायुक्त भाषणें करून मलीक रयहान याजला दिलभरंवसा देऊन, त्याचें चित समाधान केलें. भारी किंमतीचे पोषाख व सामानसुद्धां घोडे, जडजवाहीर व जडावदार हत्यारें त्यासमई सर्व हरएकाचे योग्यतेनुरूप हरएकास दिल्ही. त्यानंतर लढाईची पूर्ण तयारी करून राजा रायल यासी युद्ध करण्याकरितां चालते झाले. येलूरचे नजदिक उभयतां फौजेचा मोकाबला झाला. लढाईचे दिवशीं मलिक रयहान उजवे बाजूस योजून, मजबुत करून व आपली खासी फौज अबदुल कादर धाकनोरी या समागमें देऊन आसदखानाचे कुमकेवर, किं त्या आसदखानाचे समागमें शाहाजी राजे भोसले होते व हे उभयता डावे बाजुस होते त्यांचे कुमकेवर, पाठविलें. नबाब मुस्तफाखान याचे फौजेस व खानास पागेस लढाईस हुशार राहून युध्य करावें अशी ताकिद केली. असेंच हिंदूंचे फौजेनिशीं जशी युध्य रचना असावी तशीं करून वोळीं बांधून उभे राहिले. जेव्हां युध्यरूपी जाते फिरूं लागलें, म्हणजे शस्त्रप्रळय चालू झाला तेव्हां, व युद्ध प्रळयाचा अग्नि पेटला तेव्हां, आणि अग्निच्या ज्वाळा चालू जाहाल्या म्हणजे मोठी लढाई सुरू जाहाली तेव्हां, उभयतांमधीलहि शूर त्या रणभूमींत शूरत्वाचा पराक्रम करूं लागले. उभयतांकडीलहि शूरानें मित्रता व स्नेह पाठीमागें टाकून, म्हणजे किंचितहि ममता मनांत न ठेऊं देतां, मोठे शूरत्वानें युद्ध करित होते. केव्हां हिंदुलोकांकडील राक्षसासा खे शूर पिशाच्यासारिखे स्वभाव आचरण करण्यांत येऊन, मुसलमानी फौजेवर चालून येऊन, बुधवळाचे खेळांतील मोहरयाप्रमाणें मुसलमानांकडील लोकांस परागंदा करित होते. केव्हां केव्हां मुसलमानांकडील शूर अत्यंत क्रोधायमान होऊन हल्ल्या देत शस्त्रें उपसून हिंदुलोकांचे जमातीवर दौड करून हिंदुलोकांचे फौजेची जुळणीची लड तोडीत होते. या धांदलींत, धराधरींत व मारामारा म्हणण्याचे प्रळयात कालचक्र देखिल चिंतेंत पडलें होतें. या जमीनीवर व आकाशांत हें विघ्न निवारण होऊन 'सुख पडो, सुख पडो,' असा आरडा उठला. या धराधरींत व तोडातोडींत दामलवाड हा मोठा शूर व हिंदूंकडील पराक्रम करणार व सर्व शहरांत व मुलखांत प्रसिद्ध होता. त्याणी शूरत्वानें व पराक्रम करण्यांत सर्वांहून पुढें पाऊल ठेऊन, फौजेचे मोकाबल्यावर धाऊन जाऊन, मुसलमानांचे खास पागेचे लोक व नबाब मुस्तफाखानाचे खासें लष्कर पुढून हांकून देऊन शाहाजीराजे भोसले व आसदखान या उभयतांचे फौजेवर धाऊन पडला. त्या उभयतांसहि मारामारी करून घाबरें करून पळविलें. तेव्हां त्या धांदलींत आसदखान यास जखम लागून आसदखान घोड्यावरून पडला. बाबा अली लारी व खाज्याहून चंदीवाला जखमी होऊन घोड्यावर बसले होते ते आसदखानापाशीं उभे होते. तेव्हां आसदखान घोड्यावरून पडलेला पाहून बाबा अली यांणी इच्छिलें कीं, आपण घोड्यावरून उतरून आपला घोडा आसदखान यास द्यावा. असें मनांत आणोन माझे घोड्यावर बसा

म्हणोन बोलला. परंतु असदखानानीं कबुल केलें नाहीं. जेव्हां आसदखानाचा कोतवाल घोडा येऊन पोंहचला तेव्हां आसदखान त्या आपल्या घोड्यावर बसला. दामलवाड याणी त्यासमई धांदलीचे वेळेस नदीला महापूर येतो आणि तें पाणी झाडांची मोडामोडी करित जातें त्या महापुराप्रमाणें घाबरे करित व मारामारी व ठोकाठोकी करित मस्त हत्तीप्रमाणें नबाब मुस्तफाखानावर चालून आला. मलिक रयहान यांणी या प्रकारची धांदल व दामलवाड प्रलय करित येत आहे असें पाहिलें तेव्हां दामलवाडचे पाठीमागून पाठलाग करून धांवत आला. मलिक रयहान येऊन पोहचे तोंपर्यंत दामलवाड नबाब मुस्तफाखानाचे नजिक येऊन पोहचला होता. नबाब मुस्तफाखान तर उंच टोकावर उभे राहून युध्य प्रसंग पाहत होते. यासमई फिरून नबाब याणी खालीं उतरून येण्याचा इरादा केला. तों एकाएकीं मलिक रयहान याणी दामलवाड याचे पाठीमागून पाठलाग केल्याचा हल्ला दिसण्यांत आला. मलिक रयहान याचा पद्यावरील शिपाई तंबाजी हजर होतांच. तो नबाब मस्तफाखानास बोलला कीं, माघारे फिरा. मलिक रयहान कसा हल्ला करितो तो पराक्रम पहा. जेव्हां दामलवाड याणी पूर्ण दांडगेपणानीं नबाब मुस्तफाखानावर दौड करून निर्भयपणें वर चढून येत होता तेव्हां नबाब मुस्तफाखान याणी तंबाजीचे बोलणें न ऐकतां खालीं उतरून येऊं लागले. तेव्हां पुन्हां तंबाजी मजकुर याणी खाली उतरूं नका असें बोलला. मोठ्यानें वोरडला कीं, आपलें फिरण्यानें व खाली उतरून येण्यानें सर्व कामें बिघडत आहेत. पादशाहाची अपकीर्ती होत आहे. वास्तव ईश्वर प्रीत्यर्थ या जाग्यावरून हलूं नका. असें बोलत होता तोंच दामलवाड याणी हत्तीवरून माघारे फिरून पाहिलें तो मलिक रयहान हा मोठे महापुराप्रमाणें आपले पाठीमागून पाठलाग करित आहे. असें पाहिलें तेव्हां माघारा फिरला. नबाबावर चालून येत होता तों त्या मार्गावरून उठून मलिक रयहानचे मोकाबल्यावर उभा राहिला. तेव्हां मलिक रयहानचे पहिले हल्लेंतच दामलवाड घाबरा होऊन त्याचा मोड झाला. त्यासमई मलिक रयहान याणी रूतुमप्रमाणें हल्ला करून व आसफदेयादाप्रमाणें युध्य प्रळय करून दामलवाडास तीराचे व बुकीचे माराखालीं जेरीस आणोन धरिला. तेव्हां दामलवाड याचे जमातींत एक आरडाओरडा झाला. हिंदूकडील फौजेस फारच घाबरे केलें. तेव्हां अयोग्य परिणामाचे हिंदुलोक पळून गेले. मुसलमनांकडील फौजेची मोठी फत्ते झाली. मुसलमानांचे दैव यशस्वी झालें, नबाब मुस्तफाखान याणी तलावाचे टेकडीवरून उभे राहून मलिक रयहान याणी या युध्यप्रसंगांत रूस्तुमाप्रमाणें हल्ला केला व मोठे शूराप्रमाणें गर्दी केली ते आपले दृष्टीनें अवलोकन केलें. मलीक रयहान याजकडील शिपाईलोकांनीं, फौजेनीं व सर्व अमीरलोकांनीं त्या पळून गेलेले हिंदु लोकांचा पाठलाग करून त्यांतील कित्येक हिंदुलोकांस तरवारीनें ठार केलें. तेव्हां ती रणभूमी त्या हिंदु लोकांचे प्रेतांनें भरून गेली. दामलवाड याचे खासे बसावयाचे

दोन हत्ती होते, त्यापैकीं एक हत्ती रणजित या नामेंकरून प्रसिध्ध होता तो दामलवाडामुद्धां, व त्याचे कित्येक शिपायांसुद्धां, तरवारी वगैरे बहुत शस्त्रें व किरकोळ सामान सरंजाम वगैरे मालमत्ता अत्यंत मुसलमानांकडील शूरांचे हातीं लागली. जेव्हां आमदखान ठार झाला व नबाब मुस्तफाखान फार घाबरले असें वर्तमान मलिक रयहान यास कळलें होतें यास्तव मलिक रयहान चार स्वारांनिसीं फौजेंतून एकीकडे निघोन नवाबानजिक येऊन पोहचला. तेव्हां नबाब मुस्तफाखान याणी अत्यंत आदरान व पूर्ण मेहेरबानगीनें पुढें येऊन मलिक रयहान याचे हाताचे उजवे बाजुचे चुंबन घेतलें. नवाबाचे कंबरेस तरवार बांधलेली होती ती खाशी तरवार मलिक रयहान याचे कमरेस बांधली. ज्या घोड्यावर नवाब बसले होते तो घोडा मालिक रयहान यास दिल्हा. नबाब बोलले कीं, आज पादशाहाचें नांव व कीर्ति तुम्ही रक्षण केली. असें बोलून 'शाबास शाबास' असें म्हणोन विजयाचें पत्र मलिक रयहान याचें नांवें लिहिलें.

## २७. फंदफितुर करणारे व बखेडा करणारांचे यत्नानें नबाब मुस्तफाखान व मलिक रयहान या उभयतांमध्यें वाकडें येणें प्रकर्ण :

प्रसिद्ध आहे कीं, फंदफितुर करणारे लोकांस फलागती लावणेंकरितां हरएक ठिकाणीं विरूध्य आणणें व वाकडे पाडणें ही चाल पुरातन आहे. जेथें नीट कामें असतील तीं कामें एक क्षणांत बिघडून टाकणें ही पूर्वीपासून चाल आहे. हे फंदफितुर करणारे लोक चांगले चालीचे बहुत लोकांचीं अंतकर्णे व नामांकित पुरुषांचीं मनें नेत्राचें पातें लागे न लागे इतके अवकाशांत बिघडून टाकितात. जेथें मित्रता व सख्य असेल असे बहुत पुरुषांचे मित्रतेस एक क्षणांत ती मित्रता तोडून टाकून तेथें वैरभाव व शत्रुत्व उत्पन्न करितात. या खुणेंतील विस्तार व या ईशाऱ्यांतील तपशील हा आहे कीं, फंदफितुर करणारे लोक याणी त्या रात्रीं वांकडेपणाचे मार्गानें गैरवाका समजावण्याचे भाषणास असें नटवून व बजाऊन नबाब मुस्तफाखानापाशीं जाऊन बोलले कीं, आपली प्रकृत खरेपणाचे मार्गापासून बदलली असें मलिक रयहान म्हणतो असें बोलले. दुसरे दिवशीं सबनिसाचे बोलण्यावरून असें बोलले कीं, खुद आसदखान यांणी फत्ते केली आहे. मलिक रयहान याजला सांगून पाठविलें कीं, तुम्ही जे हत्ती जबरदस्तीनें घेतले आहेत ते पादशाहाचा माल आहे ते हत्ती सरकारांत दाखल करावे. असें सांगून पाठविलें तेव्हां मलिक रयहान याजला फारच वाईट वाटलें. मलिक रयहान याणी उतर सांगून पाठविलें कीं, असदखानाचे वर्तमान व लढाइत मी कसा हल्ला केला तो मजकुर सर्व लोकांस सूर्याप्रमाणें

जाहिर आहे. आपला निरोप या प्रकारचा आला यावरून आतां मजला समजून आलें कीं, हें बोलणें सबनिसाचें सांगण्यावरून बोलतात. असो, कांहीं चिंता नाहीं. मी आणलेले हत्ती तुम्हास कदापि देणार नाहीं. पादशाहाकडे हुजूर येऊन नजर करीन असें उत्तर सांगून पाठविलें. याउपरी आतां मी तुमचे मसलतीस राजी नाहीं. आतां तुम्हासी मी मित्रतेनें वागणार नाहीं. तुम्ही खुद आपलाच हत्ती गमविला होता व पादशाहाचे नांव बरबाद करून व अपकीर्ति करून या चिंतेच्या अरण्यांत भकलत फिरत होता. मी फत्ते केली आणि पादशाहाचे सर्व सेवकांची आबरू मी राखिली. असें उत्तर सांगून पाठविलें. त्याजवरून नवाब मुस्तफाखान हें उत्तर आल्यानंतर बहुत लज्यायमान होऊन आपले ठिकाणीं स्तब्ध राहिले. आपलेकडून चुक जाहली या बदल विचारांत पडून मलिक रयहान यास बहुत काकुलनी येऊन अत्यंत चित्त समाधान करूं लागले. दिलभरंवसा देऊं लागले. परंतु गोष्ट सर्वांस प्रसिद्ध आहे कीं, तरवारीची किंवा कोणतेहि शस्त्राची जखम लागली असतां त्या जखमेस मलमाचा उपाय चालतो व औषधोपाय आहेत, परंतु जिव्हा शस्त्राचे जखमेस औषधोपाय नाहीं. उलका म्हणोन पक्षी असतो. त्याचें नांव मात्र प्रसिद्ध आहे, परंतु तो पक्षी कोणाचे दृष्टीस पडत नाहीं. तसें जिव्हेनें कोणाचें अंत:करण दुखवलें असतां त्यावर औषधच नाहीं. तात्पर्य वांकडेपणाचा पडदा व वैरभावाचा मळ उभयतांमध्यें आला, म्हणजे नबाब मुस्तफाखानाचे व मलिक रयहान यांचे वांकडे आलें. पादशाहा गाजी आदिलशाहास हें वर्तमान कळल्यानंतर पादशाहानीं नवाब मुस्तफाखानास लिहिलें कीं, युद्ध पराक्रम व फत्ते कोणीं केली हा मजकूर गुप्त नाहीं. सर्वांस प्रसिद्ध आहे. मलिक रयहान यांणी जें काम, म्हणजे पराक्रम, केला आहे तो जाहिर आहे. हत्तीकरितां मलिक रयहान याचें अंतःकरण दुखवणें योग्य नाहीं. मलिक रयहान जेव्हां हुजूर येईल त्यावेळेस हत्तीहि हुजुर आणोन हजर करील. तात्पर्य, तुम्ही हरएक प्रकारें गोष्ट घसरली आहे ती सुधारून घेण्याचा यत्न करावा. ज्याप्रकारें तुमचें सामर्थ्य असेल तसें करून मलिक रयहान याचे अंत:कर्ण दुखविलें आहे तें त्याचें चित्त समाधान करून तुम्ही आपलेकडून त्यास संतोष करावा. सख्य करून घ्यावे. असें लिहिल आणि हुजुरून भारी किंमतीचे पोषाख, तरवारी व रोख ऐवज लष्करचे अमीरलोकांस पाठविले. सर्वांहून अधिक मलिक रयहान यास पाठविलें. यांणी या फत्तेमंदीचें कामाबदल बहुत चित्त समाधान व्हावयाजोगें, दिलभरंवसा यावयाजोगें, पत्र मलिक रयहान यास लिहिलें. येणेंकरून नवाब मुस्तफाखानाचे चित्तास फार वाईट वाटलें. ही फत्तेमंदी झाल्यानंतर सर्व अमीरलोक एके ठिकाणीं जमले होते. ते निघोन आपआपले स्थानास जाते झाले. नवाब मुस्तफाखान यांणी चंदीचे राज्य हस्तगत करण्याकरितां चंदीकडे मोहोरा फिरविला, म्हणजे चंदीस जाता झाला. मलिक रयहान चित्रगलचे किल्यास निघोन

आला. चित्रगलचे किल्याची फत्ते केल्यानंतर आपले रहाण्याचे जाग्यास जाता झाला. तेथें जाऊन आपले दोनीहि कन्येंचे लग्न करिता झाला. एकीचें लग्न बांका रयहान यासी व दुसरे कन्येंचे लग्न सिद्दी अबदुल रहिमान यासी लग्ननिश्चय केला होता त्याप्रमाणें लग्न समारंभ झाला. उभयता कन्येंचीं लग्नें झाल्यानंतर नवाब मुस्तफाखानाकडे जाण्यास मलिक रयहान यांणी कूच केलें. चंदीचे नजिक नवाबापाशीं जाऊन मिळाला. त्यानंतर उभयतां मिळोन चंदीवर हल्ला करिते झाले.

## २८. नवाब मुस्तफाखान याणी शाहाजीराजे भोसले यांजला धरून कैद करणें व या योगें मलिक रयहान याजला नवाबापासून बहुत अंदेशा व भय प्राप्त होणें प्रकर्ण :

याच दिवसांत कित्येक वांकडेपणाचीं कारणें नवाब मुस्तफाखान व शाहाजीराजे भोसले या उभयतांमध्येंहि उभीं राहिलीं. शाहाजीराजे भोसले याणी नवाब मुस्तफाखान याची चाकरी सोडून शत्रुत्व धारण केलें तेव्हां नवाब मुस्तफाखान याणी शाहाजीराजे भोसले यांजला धरण्याचा इरादा केला. एके दिवशीं बाजीराव घोरपडे, येशवंतराव व आसदखान यांजला तयार करून मोठे प्रातःकाळींच शाहाजीराजे भोसले यांजला धरण्याकरितां रवाना केलें. इतक्यामध्यें शाहाजीराजे भोसले याणी त्या रात्रीं ख्यालीखुशाली करून सर्व रात्र आनंदांत घालविली होती. प्रातःकाळीं बिछान्यावर निजून झोंप लागली होती. इतक्यांत बाजीराव घोरपडे व येशवंतराव आपणांस धरावयाकरितां येऊन पोहचले आहेत असें वर्तमान कळतांच शाहाजीराजे भोसले हुषार झाले. घाबरेपणानें फार जलदी करून डेऱ्यांतून बाहेर आले. घोड्यावर बसले. एकटेच कोणीकडे तरी पळून जावें अशा बेतांत होते तोंच बाजीराव घोरपडे याणी फार जलदीनें त्यांचा पाठलाग करून शाहाजीराजे भोसले यांस धरिलें. नवाब मुस्तफाखान याजपाशीं आणिलें. जेव्हां नवाब याणी शाहाजीराजे भोसले यांस कैद केलें[३५] तेव्हां शाहाजीराजे भोसले याजबरोबर तीन हजार स्वार होते ते पळून गेले. तेव्हां या धांदलींत बहुत लुटीचा माल नवाबाचें हातीं लागला. याच थोडके दिवसांत खैरतखान मरण पावला. त्यानंतर नवाब मुस्तफाखान व मलिक रयहान या उभयतांमध्यें वांकडे आलें होतें. यास्तव मलिक रयहान याजला नवाब मुस्तफाखानाचें फार भय प्राप्त झालें होतें. मलिक रयहान जेव्हां नवाब मुस्तफाखानाचे भेटीस जात होता तेव्हां मोठे खबरदारीनें व हुशारीनें राहत होता.

३५. शके १५७० श्रावण वद्य प्रतिपदेस (२५ जुलै १६४८) शाहाजी राजे मुस्तफाखानें धरिले. नजिक चंदी.''— जेशका. पृ. १७. शिवाशका. पृ. ५५. शिचप्र.

हली नवाब मुस्तफाखान याणी शाहाजीराजे भोसले यांजला कैद केलें यामुळें मलिक रयहान यास पहिलेपेक्षां अधिक भय प्राप्त झालें. आंदेशा आली तेव्हां फारच हुशारी ठेऊं लागला. सावधपणाकरितां निवडक स्वार दोन हजार चाकरीस ठेविले. नवाब मुस्तफाखान याणी मलिक रयहान यांस सांगून पाठविलें कीं, अधिक फौज कां ठेवितां ? यांचे कारण काय आहे ? तेव्हां मलिक रयहान यांणी उत्तर सांगून पाठविलें कीं, तुम्ही या अरण्यांत घरमंडळीपासून व खानदानापासून दूर राहून येथें मुकाम केला आहे. चंदीसारिखे शहर पूर्ण मजबुत व येथील मालक पूर्ण बंदोबस्त करून बसला आहे. या राजधानीची जागा हें कर्नाटक आहे. आणि या कर्नाटकावर हल्ला केला आहे. शाहाजीराजे भोसले सारिखा फंदफितुर करणारा धरून कैद केला आहे. शत्रुमंडळ फार व तुमचा घात करण्यारितां चहूंकडे टपून बसले आहेत. न जाणो एखादा कार्यभाव उलटेल व प्रसंग कसा येईल हें कळत नाहीं. पादशाहा मजला विचारतील तेव्हां मी काय उत्तर सांगू ? पादशाहाचे नांव रक्षण करण्याकरितां व तुमचे संरक्षण करण्याकरितां ही अधिक फौज मी ठेविली आहे. असें उत्तर सांगून पाठविलें. मलिक रयहान यांणी सर्व अमीरलोकांस व लष्करचे कारभारी मंडळीशीं सख्य करून व बक्षिस देऊन कितेकांस कर्ज देऊन त्याजवर उपकार करून आपलेंसें करून घेतलें होतें. यासमई नवाब मुस्तफाखान याणी कितीहि केलें कीं, मलिक रयहान याचें पारपत्य करावया करितां बहुत यत्न केला. परंतु चालला नाहीं. एके दिवशीं मालिक रयहान तयार होऊन रात्रीं जात होता. तेव्हां नवाब मुस्तफाखान याणी सांगून पाठविलें कीं, कांहीं जरूरीचें काम आहे. याजकरितां तुम्ही आमची भेट घेऊन जावें. असें सांगून पाठविलें. तेव्हां मलिक रयहान आपली फौज सोडून कांहीं माणसांनिशीं नवाब मुस्तफाखान याजपाशीं आला. तेव्हां येशवंतराव, आसदखान हे उभयतां तयार होऊन मालिक रयहान याचे पाठीमागें येऊन पोंहचले. मलिक रयहान याची फौज मलिक रयहान याचे शोधांत व खबरदारींत होती. त्याजला हें वर्तमान कळतांच मलिक रयहानचे लष्करांतील लोकांचे मेळेचे मेळे फार जलद मलिक रयहानापाशीं येऊन पोहचले. तेव्हां नबाब मुस्तफाखान फार घाबरले. बहुत काकुळती येऊन भोजनाची तयारी करून जेवावयास घालून निरोप दिल्हा. नतर दोन दिवसांनंतर नवाब मुस्तफाखान खुद जातीनें एकटेच मलिक रयहान याचे डेऱ्यांत येऊन मलिक रयहानचे बहुत चित्त समाधान केलें. पादशाहा गाजी यांणी या चालीवरून जाणिलें होतें कीं, नबाब मुस्तफाखान याचे मनांतील भाव कर्नाटकांत राहण्याचा आहे. असें जाणिलें होतें. यानंतर नबाब मुस्तफाखान व मलिक रयहान या उभयतांचे वांकडे आलें असें पादशाहाचे ऐकण्यांत आलें, तेव्हां विचारांत पडले. पुन्हा नबाब मुस्तफाखान यास लिहिलें कीं, मलिक रयहान मोठा थोर संभावित वजीर आहे. बहुत जमातीचा व शिपाई

लोकांचा धणी आहे. सरकारचा चाकर आणि दौलतीचे कल्याण इच्छिणारा आहे. न जाणो त्याचे मनांतच वांकडे आलें म्हणजे राजधानींत बखेडा होईल याकरितां बहुत उत्तम प्रकारें त्याचें चित्त समाधान करावें. त्याजला दिलभरंवसा द्यावा. त्याजला तुम्ही आपलेकडून बहुत संतोष करून आपल्यासी मिळून घ्यावा. असें लिहिलें आणि मलिक रयहान याजलाहि पादशाहानीं लिहिलें कीं, जर करितां मुस्तफाखानावर तुमचा विश्वास नसला तरी तुम्ही आपले ठिकाणीं हुशारीनें व खबरदारीनें सावध रहावें. मी तुमचा आहे. खातरजमा असो द्यावी. असें पादशाहानीं लिहिलें.

## २९. चंदीवर हल्ला करतेसमई मुस्तफाखान यांणी मरण पावणें प्रकर्ण :

याच दिवसांत अद्यापि चंदीवर हल्ला चालला होता. चंदीवर हल्ला सरू झाले आरंभापासून एक वर्ष पूर्ण गुजरलें. इतक्यामध्यें नवाब मुस्तफाखान याजला प्राणांतिक दुखणें प्राप्त होऊन मोठा आजार झाला. दुखणें फार लांबलें. वैद्य लोकांचे औषधोपाय फलद्रुप म्हणजे लागू होत नव्हते. यास्तव अशक्तपणानें बिछान्यावर पडला. दिवसेंदिवस रोगाचा प्रबळपणा अधिकच वाढत चालला. ते मलिक रयहान याणी पादशाहा गाजी आदिलशाहास अर्जदास्त, म्हणजे विनंती, लिहिलीं कीं, नवाब मुस्तफाखान या प्राणघातक दुखण्यांतून पार पडतील व वांचतील असें दिसत नाहीं. याजकरितां खान महंमद याजला येथें येऊन पोंहचणेंविसीं आज्ञा व्हावी. असें विनंतिपत्र लिहिलें तेव्हां पादशाहा गाजी याणी हें विनंतिपत्र येऊन पोहचतांच खानमहंमद सात हजार स्वारांनिसीं नंदिहाल येथें होता त्याजला हुकुम सादर होतांच केला कीं, तुम्ही आपली यशस्वी फौज घेऊन नवाब मुस्तफाखान याचे जागीं त्या विश्वासू पुरुषाचे भरंवशावर, म्हणजे मलिक रयहान याचे भरंवशावर, ठेविली आहे. याजकरितां तुम्ही आपले यशस्वी लष्करासहित अति सत्वर तेथें जाऊन मलिक रयहान यासी मिळोन चंदीचा किल्ला हस्तगत, म्हणजे सर, करण्याविषयीं जसा यत्न केला पाहिजे तसा करून हल्ला करावा असें लिहिलें. अफजलखान यास शाहाजीराजे भोसले यांस आणण्याकरितां व खाज्यासरा व मलिक यआतबारखान हा सर्वदा जवळ राहाणारा व दौलतीकडील पूर्ण विश्वासू होता व त्याजपाशीं बहुत मालमत्ता दौलत होती त्याजला शाहाजीराजे भोसले याची व खैरतखान मयत याची मालमत्ता व जिनगी जप्त करण्याकरितां हुजरून रवाना केलें. हे लोक अद्यापि मार्गांतच होते तोंच नवाब मुस्तफाखान तारिख ३ माहे जिल्हेज रोज गुरुवारी पांचवे तासी सन एक हजार आठावन्न (७ दिसेंबर १६४८ रोजीं) सालीं मरण पावले. नवाब मुस्तफाखान याणी

मरणसमई मलिक रयहान याजला बोलाऊन जें कांहीं सरकारी पादशाही नख्तीं जिनस व सामान सरंजाम होता तो व नवाब मुस्तफाखान याचे खासगीचे नख्त व सामान व जिनस वगैरे होते ते मोजदाद करून मलिक रयहान याचे हवालीं केलें. मलिक रयहान यास सांगितलें कीं, खान महंमद येई तोंपर्यंत शाहाजीराजे भोसले याचा बंदोबस्त बहुत सावधपणानें करित जावा. चंदीवर हल्ला पूर्ण यत्नानें व बहुत झटून करित जावा. केशाचे अग्रभागाइतकी देखिल ढिलाई करूं नये असें सांगून मरण पावता झाला. नवाब मुस्तफाखान वारल्यानंतर मलिक रयहान याणी येशवंतराव याजला व आसदखान यास पूर्ण दिलभरंवसा देऊन नवाब मुस्तफाखान याचे निसबतीचीं माणसें या उभयतांचे हवालीं केली. नवाब मुस्तफाखान याकरितां अडीच हजार होन देऊन तें प्रेत बहुत समारंभानें विजापुरास रवाना केलें. मलिक यआतेबारखान याणी शाहाजीराजे भोसले यांचें सामान सरंजामाची जप्ती केल्यानंतर व खैरतखानाची दौलत माल जामदारखान्यांत दाखल केल्यानंतर नवाब मुस्तफाखानाचे सर्व कारखाने होते त्यावर पादशाही मोहोर केली. खान महंमद याणी पादशाहाचें आज्ञापत्र येऊन पोहचतांच नंदिहाल येथून आपले जमातीसुद्धां निघोन चंदीकडे जाण्याकरितां कूच केलें. मलिक रयहान यांणी नवाब मुस्तफाखान वारल्यानंतर सर्व अमीरलोकांस दिलभरंवसा देऊन, चित्त समाधान करून व लष्करासहि पूर्ण धीर व आधार व दिलभरंवसा बहुत उत्तमपणें देऊन, रोख पंचवीस हजार होन शिपाई लोकांची माहेबारीची बाकी थकली होती ते पादशाही खजिन्यांतून दिल्ही. चंदीवर पहिलेपेक्षां अधिक व बहुत कटीण हल्ला केला. जेव्हां तिकडील थोडासा मुलुक या समयाचे पूर्वी कुतुबशाही लोकांचे खर्चाकडे आला होता यास्तव मीर जुमला कुतुबशाहाकडून मुलकाचें संरक्षणार्थ नेमिले जाऊन सिवरीघाट म्हणोन येलूरचे सरहद्दींत गांव आहे त्या गांवीं, तो गांव चंदीपासून पांच कोशाचे अंतरावर होता तेथें, तो मीर जुमला राहत होता. यापूर्वी तो मिर जुमला हा नवाब मुस्तफाखानाशीं मित्रतेचा व दोस्तीचा राबता ठेवित होता. नवाब मुस्तफाखान व मीर जुमला या उभयतांमध्यें असे करार ठरले होते कीं, नवाब मुस्तफाखान याणी चंदीची फत्ते केल्यानंतर चंदींतच रहावें. मिर जुमला यांणी गंजीकोटांत रहावें. उभयतांनीं एकमेकांत हरएक कामांत विचारांत व मसलतींत एक विचारें असून परस्परें एकमेकांचे साह्य करित जावें असें ठरलें होतें. जेव्हां नवाब मुस्तफाखान ईश्वर सत्तेनें मरण पावले तेव्हां मिर जुमला यांणी मनांत आणिलें कीं, नवाब मुस्तफाखान हा बहुत फौजेचा सरदार मरण पावला आणि त्याचे लष्कराची बहुत खराबी झाली. खैरतखानहि मरण पावला. शाहाजीराजे भोसलेहि संकटाचे फाशांत बंध पावले. मलिक रयहान एकटा काय करील ? निरोपाय होऊन चिंतेंत पडून चंदीवर हल्ला करणें सोडून देऊन आपले गांवास निघोन जाईल. मग मी चंदी हस्तगत करून,

चंदीचें राज्य घेऊन. प्रबळ होईन असें मनांत आणिलें तेव्हां मलिक रयहान याजला थोडीशी यापैकीं बातमी कळली. मलिक रयहान यांणी मिर जुमलाचे मनांतील भाव जाणोन मिर जुमलास निरोप सांगून पाठविला कीं, तुम्ही येथें रहाणें हें सर्व कामें बिघडण्यास कारण आहे. किल्याचे कोटांतील रहाणारांस तुमचे पाठबळ व आश्रय आहे. आतां तें बरें आहे कीं, तुम्ही येथून फार दूर जाऊन अपाले गांवांत जाऊन राहावें. येजमानाची मुखत्यारी माझे हातांत नाहीं. जर करितां कदाचित काम बिघडल्यास व प्रसंग विपरित आल्यास आम्हाकडे शब्द नाहीं. नवाब मुस्तफाखान वारले म्हणोन काय झाले ? मी तर जिवंत आहे. माझे शरिरांत प्राण आहे तोंपर्यंत मी पादशाहाचे आज्ञेप्रमाणें जिवादारम्य श्रम करीन. एका केशा इतके देखिल अंतर पडूं देणार नाहीं. असा निरोप सांगून पाठविला. तेव्हां मिर जुमला याणी जेव्हां मलिक रयहान याचा शेवटचा निश्चय फार दृढतर पाहिला तेव्हां उगेच रहाण्याशिवाय उपाय नाहीं असें जाणोन तेथून निघोन फार दूर जाऊन वसवाती म्हणोन गांव येलुरापासून सात कोसाचे अंतरावर आहे तेथें जाऊन राहिला. याच समयांत खानमहंमद हा आपले जमातीनिसीं लष्करांत जाऊन मिळाला. तेव्हां खानमहमंद व मलिक रयहान या उभयतांचे यत्नानें पहिलेपेक्षां चंदीवर फार कठीण हल्ला चढविला. दिवसेंदिवस लढाईचे मोर्चे पुढेंपुढेंच लागू होत होते व घटके घटकेस किल्यांतील रहाणारे लोकांवर फारच कठिण प्रसंग येत होता. किल्यांतील सामान सरंजामहि सरावयास लागत होते.

## ३०. सुलतान महंमद पादशाहा गाजी याजकडील शूर लोकांनीं चंदीचा किल्ला हस्तगत करणें व पादशाहा गाजी यांचे हातीं कर्नाटकाचा सर्व मुलुख येणें प्रकर्ण :

चंदी यथील मालक राजा रूपनाईक हा मोटा दौलतदार मनुष्य होता. सातशें वर्षेपर्यंत सदरहू राजाचे बाप आजे चंदी येथील राजेपणाचे तक्तावर बसून राज्य वहिवाटित होते. त्या मुलखास येसमई कांहीं एक कोणाएकाचा उपद्रव लागला नव्हता. तो मुलुख पूर्ण भरवस्तीचा व आबादान प्रसिद्ध होता. रूपनाईक यांणी बदचालीनें वागून तरुणपणाचे व जवानजीच संतोपाच गवानीं रात्रंदिवस ऐपआरामींत निमग्न राहून दौलतीचा बंदोबस्त राखिला नाहीं. राजधानीचीं सर्व कामें व अपराधी लोकांस शिक्षा करणें हें सर्व सोडून देऊन ढिलाईवर टाकित होता. तेव्हां सर्व जमेदार लोकांस कर्नाटकचे सरहदींतील तर्फेतर्फेतील रहाणारे लोक जसें बांदऱ्याचा राजा व चंदावरचा राजा आणि चंदीवाले राजाचे हुकुमांत वागण सोडून देऊन या हल्लेचे समई चंदी येथील राजाची कोणीच मदत केली नाहीं व कोणीच सहाय्य केलें

तंजावुर

नाहीं. शेवटीं फार दिवस हल्ला लांबला यामुळें किल्यांतील खाण्यापिण्याचा गल्ला वगैरे सर्व जिन्नस सरला. या कारणास्तव कोणाकडूनच मदत व कुमक येऊन पोंहचली नाहीं. यास्तव निरोपाय होऊन चंदीचा किल्ला व मुलुख तारिख बावीसावी जिल्हेज बुधवारी साहावे तासीं सन १०५९ सालीं (१९ दिसेंबर १६४९) सुलतान महंमद आदिलशाहा पादशाहा गाजी याजकडील शूरांचे म्हणजे मलिक रयहान व खानमहंमद याचे हवालीं केला. चंदी येथील कर्नाटकांत हजारो वर्षांची हिंदु लोकांची देवाची पुज्या करण्याची चाल व वहिवाट होती. तेथें धर्म स्थापला. आदिलशाहा पादशाहा गाजी यांणी महंमदी धर्माचा दिप लाविला. चंदीवर हल्ला चालू जाहाले आरंभापासून फत्ते होई तोपर्यंत जड जवाहीर भारी किंमतीचे व जडावदार हत्यारें, कित्येक उत्तम पदार्थ, तरवारी, मालमत्ता व रोख ऐवज मिळोन चार कोटी होन पादशाहा गाजी याचे खजिन्यांत जतीस आला. जो कांहीं लुटालुट करणें समई आदिलशाहाकडील लष्करवाले लोकांचे हातीं लागलेला माल हिशेबाचे व गणिताचे बाहेर आहे म्हणोन त्याची गणती होत नाहीं. इतका माल लुटीस गेला. चंदीवर हल्ला करून मुसलमानांची फत्ते झाल्यानंतर मुसलमान लोकांचे धर्माचें प्राबल्य व मुसलमानी धर्माचे कायदे अत्यंत चालले. हळुहळू युक्तीनें कर्नाटकांत व कर्नाटक सरहद्दींत किल्ले वगैरे होते आणि त्या मुलखावर व त्या किल्यावर मुसलमान लोकांची कधीं सावली देखिल पडली नव्हती व कोणतेच समई मुसलमानाचे घोड्याचे पायाचे सुंबास कर्नाटकाचे सरहद्दीचे जमीनीचा धुरला देखिल लागला नव्हता तो कर्नाटकाचा सर्व मुलुख पादशाहा गाजी याचे हातीं आला. कर्नाटकांतील जागोजागचे शहरांत व कर्नाटकांत बहुत देवाचीं देवालयें होतीं तीं मोडून टाकून समूळ खणून काढून त्या देवालयांचे ठिकाणीं मसीदी बांधिल्या. तेंथें निमाज पढणें व खुतबा पढणें व बांग देणें ठरलें. निमाज पढण्याकरितां व बांग देण्याकरितां पैगंबरी धर्माचा शास्त्रार्थ व महंमदी धर्माचे हुकुम प्राप्त झाले.

## ३१. हजरत शाहा हपम आलवी याणी सुलतान महंमद आदिलशाहा पादशाहा गाजी याजला दहा वर्षांचें आयुष्य बक्षिस देणें :

हजरत शाहा नईमुल्लाह (सिंकदर आदिलखान) याचे गुरू याणी गंजुल आसरार या किताबींत लिहिलें आहे कीं, एके दिवशीं सयदांचे सयद अवलियांचे अवलिया हजरत शाहा हपम हुसेनी आलवी, ईश्वर त्याचा भेद गुप्त ठेवो, असे ते अवलिया ते आपले जमातीसुद्धां पादशाहापूर येथील जुमा मसीदींत राहून ज्ञानाचे भारी किंमतीचे मोठ्या नित्याचे कचेरींतील लोकांना संवगळयास शोभायमान करून

समुद्राचे व जवाहिराचे खाणीस लाजवित होते, म्हणजे शाहा हषम यांजपाशीं कचेरींत जे लोक जमत होते त्यांजला ज्ञान शिकवित होते. अशा समयांत पादशाहाचे सेवक लोकांपैकीं एका सेवकानें येऊन शाहा हषम यास विनंति केली कीं, राजाधिराज सर्व गोरगरीब फकीरांचे अन्नाचे धनी सुलतान महंमद पादशाहा याजला मोठें दुखणें, म्हणजे आजार, प्राप्त झाला आहे, कीं मोठे पूर्ण वैद्यशास्त्र जाणणारे वैद्यलोक त्या रोगाची परिक्षा करण्यापासून व उपाय करण्यापासून थकले. वैद्यांचा उपाय चालेनासा झाला आहे. याजकरितां पादशाहानीं आपणाकडे पाठविलें आहे. पादशाहानीं आपल्यास विनंती केली आहे कीं, आपण मजला ईच्छकाचे कामांत पुरते मन घालून उपाय करावा, म्हणजे मी या दुखण्याचें संकटांतून सुटेन. अशी विनंति केली आहे म्हणोन बोलला तेव्हां हजरत शाहा हषम यांणी आपले सेवकास आज्ञा केली कीं, ‘ रूमाल आण.’ त्यावरून सेवकांनीं रुमाल आणोन हजर केला. जेव्हां हजरत याणी आशिर्वादाचे मंत्र पढून त्या रुमालावर मंत्र फुंकून पादशाहाकडून विनंति करण्यास सेवक आला होता त्या सेवकापाशीं तो रुमाल दिल्हा. हजरत याणी आज्ञा केली कीं, पादशाहाचे शरीरास ज्या ठिकाणीं आजार असेल तेथें हा रुमाल नेऊन बांधा म्हणजे नीट होईल. त्यावरून पादशाहानीं हजरतचे सांगण्यावरून आजाराचे ठिकाणीं तो रुमाल बांधिला. आरोग्य होण्याची मार्गप्रतिक्षा करूं लागले. परंतु या उपायानें कांहींच आरोग्यता प्राप्त झाली नाहीं व सुखास पडलें नाहीं. तेव्हां जम पादशाहाचे योग्यतेचा जो सुलतान महंमद पादशाहा त्याणीं दुसरे दिवशीं पुन्हां बहुत काकुलती येऊन निरोप सांगून पाठविला. यद्यपि त्यासमई व त्या काळांत शाहा हषम हे बहुत योग्य आवलिया व श्रेष्ठ होते, हरएक मनुष्यास त्यांचा गुण व चमत्कार आले होते व या कारणास्तव बहुत लोक या भरवस्तीचे शहरांत येऊन रहात होते, परंतु पादशाहा शाहा हषम याजवर पूर्ण भरंवसा ठेवित होते. यास्तव फार काकुलती येऊन हजरतास विनंति सांगून पाठविली कीं, आतां आपणाशिवाय मजला आरोग्य होण्यास मी दुसरा उपाय जाणत नाहीं. आपणाशिवाय या प्राणघातक दुखण्यांतून मोकळे करणारा मी समजत नाहीं. याकरितां ईश्वर प्रित्यर्थ आपण कृपा करून यत्न करावा. जसें पूर्वी माझे बापावर कृपा व मेहेरबानगी आपण करित होता त्या प्रमाणें हली या इछकावरहि कृपा करावी तेव्हां या दुखण्यांतून मी वाचेन. नाहींपेक्षां मी वांचणार नाहीं. अशी विनंति सांगून पाठविली तेव्हां श्रेष्ठ आधाराचे हजरत शाहा याणी ही पादशाहाची विनंति ऐकल्यानंतर आज्ञा केली कीं, ‘ सत्य आहे. या पादशाहाचा बाप इब्राहिम आदिलशाहा याणी या फकीरावर, म्हणजे मजवर, मोठा उपकार केला आहे. ज्यासमई मी मक्केची यात्रा करून माघारें यावयास परतलों तेव्हां मार्गामध्यें मी फिरंग्याचे कैदेंत पडलों. त्यासमई पादशाहाचे बापाकडून बहुत सेवक येऊन मजवर बहुत मेहेरबानगी केली. इब्राहिम आदिलशाहा यांणी मजला कैदेंतून सोडविलें.

आज त्या गोष्टीचा उपकार फेडण्याची वेळ आहे. आतां यासमईं पादशाहाचा उपयोग करणें मजला प्राप्त आहे. परंतु या वेळेस तो उपकार फेडण्यास जिवास जीव दिल्याखेरीज हें कार्य व्हावयाचें नाहीं. कारण या पादशाहाचे आयुष्याचा प्याला परिपूर्ण भरला आहे. त्यास मृत्यु संनिध येऊन पोंहचला आहे. यासमईं या कारणास दुसऱ्यानीं जीव दिल्याखेरिज पादशाहा कदापि वांचणार नाहीं. माझें आयुष्य आतां दहा वर्षें बाकी राहिलें आहे तें मी आपलें आयुष्य या पादशाहास बक्षीस दिल्हें आणि मी पादशाहाचा रोग दुखणें घेतलें.' इतकीं अक्षरें मुक्ताफला-सारिखे वर्षाव करणारे हजरताचे जिव्हेपासून निघतांच, म्हणजे हजरतानीं बोलतांच, तात्काळ पादशाहाची प्रकृति बिघडली होती ती नीट होऊन आरोग्य जाहाली आणि दुसरे दिवशीं पादशाहा हजरताचा स्तव करावयाकरितां हजरत शाहा हषम याचे दर्शनास आले आणि पाहिले तों जो रोग व आजार, कीं आजारांत पादशाहा आपण प्रतिबंध पावले होते तोच रोग हजरत शाहा हषम याजला आला आहे. आपली प्रकृति बिघडून जी भावना जाहाली होती तीच भावना हजरतास झाली आहे. त्या आजारानें जाग्यावरून हलण्याचें देखील सामर्थ्य हजरतास राहिलें नाहीं. हालू शकत नव्हते असें पाहून पादशाहा गाजी यांणी बहुत काकुलती येऊन हजरतास विचारलें कीं, आपल्यास कसें वाटतें. तेव्हां हजरतानीं आज्ञा केली कीं, 'हरएक श्वास मरणाची गोडी चाखणारा आहे असें वाक्य आहे तें सत्य आहे,' असें बोलले. आणखी आज्ञा केली कीं, "ज्यानें आयुष्य सरलें तो पुरुष कांहीं एक अवकाश एक पळभर देखिल करावयाचा नाहीं, बहुत जलदी करील," असें आरबींत वाक्य आहे. असें बोलले व सत्यवान, म्हणजे साधुलोक, मरण इछितात, कारण कीं मरण पावल्यानंतर ईश्वराशीं मिळतात व पैगंबरानीं आज्ञा केली आहे कीं, "आयुष्य सरून मृत्यु पावणें हा पूल आहे, कीं या पुलावरून गेलें असतां हा पूल मित्रास मित्राकडे नेऊन पोंहचवितो," म्हणजे साधूंचें आयुष्य सरणें हें ईश्वराचे भेटीस कारण आहे. तिसरे दिवशीं हजरत शाहा हषम मरण पावले. ईश्वराकडे भेटीस गेले. ज्या समईं सुलतान महंमद पादशाहा गाजी हजरत शाहा हषम याची प्रकृति फार बिघडली होती तेव्हां समाचारास आले आणि हजरताचे वाड्यानजिक येऊन पोंहचले ते समईं हजरतानीं आपलें पागोटें सेवकाचें हातीं देऊन आज्ञा केली कीं, ज्यावर ईश्वराचे कृपेची छाया आहे असा जो सुलतान महंमद पादशाहा येत आहे याजकरितां आमचे हें पागोटें येण्याचे मार्गांत पसरा, म्हणजे या पागोट्यावरून पादशाहा चालत येतील. अशी आज्ञा केली तेव्हां त्या सेवकांनीं आज्ञेप्रमाणें तें पागोटें मार्गांत पसरलें. हें वर्तमान पादशाहास कळलें कीं, हजरतानीं आपले पागोटें मार्गांत पसरलें आहे. असें कळतांच पादशाहानीं अति मर्यादा स्विकारून हजरताचे मस्तकाचें पागोटें उचलून आपले मस्तकास गुंडाळित वाड्यांत आले.

## ३२. हजरत शाहा हपम यांणी फिरंग्यांचे कैदेंत पडणें व ईब्राहीम आदिलशाहा यांणी हजरतशाहास पैगंबराचे वकील यांस स्वप्नांत पाहणें प्रकर्ण :

हजरत शाहा हपम जेव्हां मक्का व मदिना येथील यात्रा करून परत आले व दक्षिण देशांत येण्याकरितां जहाजांत बसले तेव्हां इतक्यामध्यें समुद्रकिनाऱ्यांत बंदरांत जहाजांत माल होता या कारणास्तव कज्या व लढाई आपसांत सुरूं झाली होती. असें कीं जहाजें येण्याजाणेचे मार्ग देखिल बंद झाले होते. ज्या जहाजामध्यें हजरत शाहा हपम बसले होते त्या जहाजांतील मनुष्यें याणी बंदराबंदरांत एकमेकांत परस्परें लढाई सुरूं झाली आहे हें वर्तमान न जाणतां निर्भयपणें त्या समयांतच जहाज चाल्हें केलें. तें जहाज गोव्याचें बंदरानजिक येऊन पोंहचलें तेव्हां गोव्याचे मालकांनीं तें जहाज पकडून त्या जहाजांतील मनुष्यांस तात्काळ कैद केलें. इतक्यामध्यें विजापूर येथील इब्राहीम आदिलशाहास स्वप्न पडलें कीं, सर्व पैगंबराचे पादशाहानें महंमद मुस्तफा सल्लीलाह वसल्लम हे येऊन मुक्ताफळाचा वर्षाव करणारे आपले जिव्हानीं आज्ञा करिताहेत कीं, "अरे हे इब्राहीम आदिलशाहा, माझा पुत्र सय्यद हपम हा फिरंग्याचे कैदेंत पडला आहे. त्याजला जलद सोडीव." असें स्वप्न पडलें तेव्हां इब्राहीम आदिलशाहा याणी निद्रेंतून जागृत होऊन सर्व कारभारी मंडळीस बोलाऊन आणोन त्यांचेपाशीं स्वप्नांतील सर्व मजकुर सांगितला. हजरत शाहा हपम याजला जलद सोडविणेंविषयीं आज्ञा केली होती त्याविसीं कसे करावें असें सर्व कारभारी मंडळीस विचारिलें. तेव्हां कित्येक कारभारी मंडळीस गोव्याची हकीकत व जहाजांतील मनुष्यें गोव्याचे बंदरांतील फिरंग्यानीं कैद करण्याचेप्रकर्णीं मजकुर माहित होता त्यांनीं विनंति केली कीं, सर्व मनुष्यें कैद झालीं त्यांत हजरत शाहा हपमहि कैद झाले असतील. याजकरितां महंमद पैगंबर यांणी आपला पुत्र जो हजरत शाहा हपम याजला सोडविणेंकरितां पादशाहास स्वप्नांत येऊन आज्ञा केली आहे. त्याविषयीं विचार हा आहे कीं, गोव्याचे बंदराचे फिरंग्यास बहुत उत्तम प्रकारें पत्र हजरत शाहा हपम याजला कैदेंतून सोडविणेंविषयीं ल्याहावें. अशी कारभारी मंडळानीं विनंती केली. त्यावरून पादशाहानीं त्या वेळेस जासुदाबरोबर पत्र लिहून देऊन बहुत ताकिद करून तो जासूद गोव्याकडे रवाना केला. गोवें येथील मालकांनीं तें पत्र व जासुद आदिलशाहाकडील येऊन पोहचतांच कैदी मंडळीस हुकुम सांगून पाठविला कीं, सैय्यद हपम या नांवाचा जो पुरुष कैदेंत आला आहे तो जलद सोडून द्यावा. अशी कैदखान्यावरील कामदारास ताकिद सांगून पाठविली. तेव्हां त्या हुकुमाप्रमाणें दरवाजावरील कामदारांनीं कैदखान्याजवळ जाऊन हाक दिली कीं, सैय्यद हापम म्हणोन कैदी लोकांत कोण पुरुष आहे त्यानीं जलद बाहेर यावें, अशी हांक मारिली.

तेव्हां हजरत हाषम आपण स्वस्थ बसून दुसरे कैदी लोकांस आज्ञा करिते जाहाले कीं, सर्वांनी मीच सैयद हाषम आहे, माझेच नांव सैय्यद हाषम असें म्हणोन सर्वांनीं बाहेर निघोन जावें. अशी आज्ञा केली तेव्हां या आज्ञेवरून कित्येक कैदीलोक माझे नांव हजरत शाहा हषम आहे असें सांगून कैदेंतून बाहेर आले. त्यांजला सोडून दिल्हे. त्यानंतर गोव्याचा मालक फिरंगी यांगीं पादशाहाचे पत्राचें उत्तर लिहून पादशाहाकडील आलेल्या जासुदास निरोप दिल्हा. तें उत्तर येऊन पोहचल्यानंतर पादशाहाचें चित स्वस्थ जाहालें. कित्येक दिवसानंतर पुन्हा पादशाहास स्वप्न पडलें कीं, आणखी महंमद पैगंबर हे स्वप्नांत येऊन आज्ञा करते झाले कीं, "अरे इब्राहीम आदिलशाहा, तुजला मी आज्ञा केली होती त्याप्रमाणें तूं कांहीं केलें नाहीं व माझे पुत्रास कैदेंतून सोडविलें नाहींस." अशी आज्ञा केली तेव्हां पादशाहा फार घाबरून स्वप्नांतून जागें होऊन पुन्हा गोव्याचे मालकास पत्र लिहिलें कीं, ज्या सय्यदास सोडविणेचे आम्हांस कारण होतें ते हजरत शाहा हषम अद्यापि कैदेंतून मोकळे झाले नाहींत. याजकरितां हा हुकूम दाखल होतांच हजरत शाहा हषम यास सोडून दे आणि आम्हावर उपकार कर, असें लिहिलें तेव्हां या हुकुमाप्रमाणें फिरंगी मजकुर यांणी पुन्हां वीस तीस मनुष्यांस, कीं ज्या मनुष्यांनीं मीच हजरत हाषम म्हणोन आणि कैदेंतून बाहेर आले त्याजला सोडून देऊन पादशाहास विनंतिपत्र लिहिलें कीं, आपले आज्ञेप्रमाणें एक ग्रहस्थाबदल कित्येक ग्रहस्थ कैदी सोडून दिल्हे. परंतु आश्चर्य आहे कीं, ज्या लोकांनीं हे नांव सांगून जो बाहेर आला त्याजला सोडिले तत्रापि हजरत शाहा हषम याजला सोडविणें म्हणोन आज्ञा येती त्यास ह्याविसीं कसें करावें, असें उत्तर लिहिलें. तेव्हां तिसरे वेळीं आणखीहि इब्राहीम आदिलशाहास स्वप्न पडलें कीं, महंमद पैगंबर स्वप्नांत येऊन अत्यंत क्रोधायमान होऊन आज्ञा करिताहेत कीं, 'भ्रांता अद्यापि तुझी भ्रांती जात नाहीं आणि माझी आज्ञा पालन करित नाहींस, करितां या वेळेस माझे पुत्रास कैदेंतून न सोडविशील तर तूं आपले कर्माचें पारपत्य पावशील. फार सावध रहा." अशी आज्ञा केली तेव्हां पादशाहा अत्यंत भयाभित होऊन निद्रेंतून उठोन भयभित व चिंताग्रस्त होऊन बसला. अकलवान कारभारी मंडळीस पुन्हां विचारलें कीं, आतां कसें करावें ? येविषयीं काय उपाय करून महंमद पैगंबर याचे आज्ञेवरून दोन वेळां कित्येक कैदी लोकांस हजरत शाहा हषम याचे नांवानीं कैदेंतून सोडविलें असें असतां अद्यापि पैगंबराची आज्ञा तशीच होत आहे. ज्या सय्यद हाषम यास सोडविणें बद्दल हुकुम सादर झाले ते हजरत अद्यापि कैदेंतून बाहेर आले नाहींत आणि कैदेंतून मोकळे जाहाले नाहींत. बास काय करावें ? असें विचारलें तेव्हां कारभारी मंडळींनी बहुत दूरवर विचार करून विनंति केली कीं, आम्हांस असें वाटतें कीं, गोवे येथील कैदीखान्यांतील एकंदर कैदी मोकळे जाहाल्याशिवाय हजरत शाहा हषम हे कदापि कैदेंतून बाहेर यावयाचे नाहींत. आता तें बरें आहे कीं, गोवे येथील

कैदखान्यांतील सर्व लोकांस कैदेंतून सोडवावें. त्या कैदखान्यांत जर कर्रितां एक कैदी देखिल कैदेंत राहिल्यास ते हजरत शाहा हयम सर्वांस मोकळे करण्याकरितां त्या कैदखान्यांत राहिले आहेत. ते सर्व कैदी मोकळे झाल्याशिवाय कदापि कैदेंतून बाहेर येणार नाहींत अशी कारभारी मंडळानीं विनंति केली तेव्हां इब्राहीम आदिलशाहा पादशाहा याणी एक संभावित मनुष्यास समागमें एक पत्र बहुत करूणायुक्त, म्हणजे काकुलता येऊन, म्हणजे येवढें काम कसेंहि करून केलें पाहिजे अशा मजकुराचें लिहून देऊन गोवें येथील कपतान याजला पाठवून निरोप सांगून पाठविला कीं, हें काम केलें असतां तिकडीलहि जें काम पडेल तें इकडूनहि केलें जाईल असें जाणावें. जी गोष्ट तिकडून मनांत असेल ती लिहून पाठवावे म्हणजे ती आम्ही सिद्धीस नेऊं असें समजावें. परंतु एवढें मात्र काम केलें पाहिजे कीं, तुमचे कैदखान्यांतून जितके लोक कैद झाले आहेत ते सर्व कैदी लोक एकहि न राहूं देतां हें पत्र पावतांच कैदेंतून सोडून द्यावे व त्या कैदीपैकीं एक देखील मनुष्य कैदेंत ठेवूं नये. असें केलें असतां इकडील खातरेवर मोठा उपकार केला असें होईल असें आग्रहरूप ताकिदपत्र गोवे येथील कपतान यास जाऊन पोहचलें. तेव्हां कपतान याणीं तेच वेळेस कैदखान्याचा दरवाजा उघडून सर्व कैदीलोकांस हुकूम दिल्हा कीं, जो कैदेंत असेल त्याणी बाहेर यावें. असा हुकूम होतांच हरएक कैदी एक एक निघोन बाहेर आले. ते सर्व कैदी कैदेंतून बाहेर निघालेनंतर सर्वांचे शेवटीं हजरत शाहा हयम हे कैदेंतून बाहेर आले. 'सुब्हान अल्लाह' म्हणजे पवित्र आहे ईश्वर. म्हणजे पैगंबराची व साधुत्वाचीं काय उत्तम लक्षणें व उत्तम स्वभाव आहेत कीं असें प्रसिद्ध होतात. पारसी बैतेचा अर्थ : "सर्व जातीवर बक्षिस केलें कीं, त्यापैकीं येकहि चुकूं दिली नाहीं."

३२. सुलतान महंमद आदिलशाहा पादशाहा याणीं मुल्ला जहुर बिन मुल्ला जहुरी याजला आपले कारकीर्दीतील तारिखवार एकंदर प्रकर्णाचा ग्रंथ करणें विषयीं आज्ञा करणें प्रकर्ण :

मुल्ला जहुर बिन मुल्ला जहुरी कविता करावयाचा जो सर्वांस प्रसिद्ध तो सर्वांस लिहित आहे कीं, सन १०५१ (१६४१–१६४२ इ. स.)[३६] सालीं पादशाहा गाजी यानीं नवाब खानबाबा, कीं तो नवाब खानबाबा ज्ञान व विचाररुपी शहराचा बंदोबस्त करणारा व विचाराची इमारत सर्व त्याचेच हातची आहे या ईमारतीचा कर्ता पुरुष तोच आहे, म्हणजे नवाब खान हा मोठा अकलवान व मोठा विचारवान

३६. Md. Nama, p. 109.

आहे, याजला आज्ञा केली कीं, आमचे कारकीर्दीतील सर्व प्रकर्णे लिहिणारा व या सेवेस योग्य व आपले कुटुंबांतील व सर्व भरंवशाचा मनुष्य मुल्ला जहुर बिन मुल्ला जहुरी हा आहे त्या मुल्ला जहुरीस या कामांत नेमावा अशी आज्ञा देली. तेव्हां आदिलशाहाचे आज्ञेप्रमाणें अली नवाबखान दौलतदार याणीं, कीं जो ईश्वरी ज्ञानांत निमग्न होता, त्याजला आपले वाड्यांत बोलाऊन आणिले आणि पूर्ण आग्रहानीं दक्षिणचे पादशाहाचे कारकीर्दीतील तारिखवार प्रकर्णे, कीं रफिउद्दीन हुसेन षिराजी याणीं तें लिहिणें स्विकारून ग्रंथ केला तें नवीन ग्रंथ करण्याचें काम नवाब यांणी माझे हातीं दिल्हे आणि बोलण्याचें खजीन्याचें दार चित्त समाधान करण्याचें किल्लीनें असें उघडलें म्हणजे पूर्वी तारिखवार पादशाहाचे कारकीर्दीचा ग्रंथ रफीउद्दीन यांणी केला होता. परंतु सुलतान महंमद पादशाहाचे कारकीर्दीतील तारिखवार प्रकर्णे लिहून ग्रंथ तुम्ही करावा अशी नवाब यांणी आज्ञा केली कीं, पारसी बैतेचा अर्थ : " हे कविता करणाऱ्या श्रेष्ठ योग्यतेच्या पुरुषा, गुप्त भेद आहे तो प्रसिद्ध करण्याविषयीं बहुत वर्णन कर । १ । असें वर्णन कर कीं, त्या वर्णनांत सर्वांचे चित्त हरण व्हावें : पृथ्वीस व आकाशास प्रियकर असावें. । २ । या प्रकारच्या विचाराचा दीप लाव : कीं, त्या दिपाचे तेजेंकरून सांप्रतचे थोर थोर पादशाहा वगैरे लोक आहेत त्यांची कचेरी तेजस्वी व्हावी । ३ । दक्षिणचे पादशाहांचे वर्णनास आरंभ कर : कीं त्या वर्णनानें सर्व पृथ्वी तेजस्वी व्हावी । ४ । असें मिष्ट भाषणाचे ग्रंथाचे दस्तरवान म्हणजे मुसलमान लोक भोजन समई पांढरे वस्त्र पसरून सर्व मुसलमान त्यावर जेवितात त्यास दस्तरखान असें म्हणतात ते ग्रंथरूपी दस्तरखान असें पसर कीं : आकाशांतील व पृथ्वींतील राहणारे तृप्त व्हावे । ५ । गुप्त भेदाचे वर्णनाचा जांबा असा उतू आण कीं, या जाबांतील मद्य प्राशनानें कालचक्रहि धुंद होऊन गडबडा लोळावें असें प्रकारचें वर्णनाचा कर । ६ । ". पूर्वी पादशाहाची सर्व वर्णनें बखरींत लिहिलीं होतीं. तीं व सुदैववान व यशस्वी व कल्याणरूपीं चिन्हांचा जन्म पादशाहाचे योग्यतेचा जो सुलतान बिन सुलतान खाकान जो सुलतान महंमद पाजशाहा, ज्यावर श्रेष्ठ ईश्वराचे कृपेची छाया निरंतर असो व त्या पादशाहाचे कृपेची छाया सर्वांचे मस्तकावर निरंतर असो असा जो सुलतान महंमद पादशाहा, त्याचीं प्रकर्णे जीं कीं खुद जातींनीं पाहिलीं तीं व सत्य बोलणारे पुरुषांपासून जी ऐकिलीं ती, कल्याणप्रद आहे परीणामी ज्याचा त्या दिवसाचे सफयावर मी लिहिलीं. पादशाहापाशीं हुजूर राहणारे विद्वान लोकांपैकीं प्रथम ज्या पुरुषानें पादशाहाचे कारकीर्दीचें सर्व वर्तमान तहकिक लिहिलें तो प्रथमचा पुरुष ईबराहीमखान संबगी यास अकलेच्या विद्या येत होत्या. त्याणी वर्णन केलें आहे व त्यांणीं वर्णन केलेले एक एक खुणेंत सर्व विद्येच्या सूचना दाखविल्या आहेत. हीं प्रकर्णे ऐकिण्याकडे क्षणभर कान देण्यांत त्या सर्व विद्या समजुतींत येण्याचा फायदा आहे. बारिक गोष्टी जाणणें

व फार सूक्ष्म म्हणजे बारिक विचार लक्षांत आणणें हें त्याणी वर्णन केलेला ग्रंथ विचार करून पाहाण्याचे समुद्रावरील लहरी म्हणजे लाटा उसळली आहे व त्याणी वर्णन केलेलें नाजुकपणाचे विस्तारानीं सर्वेसन या जातीचे सुरुचे झाड टवटवित झालेलें आपले सर्वांगांच्या बारिक जिव्हा करून शोभायमान होऊन उभे राहिले आहे. त्याचे चमत्कारिक भाषणाचे कचेरींत सर्व उत्तम बोलणारास ईब्राहीमखान याणी एक मिस्त्रा म्हणजे एका बैतेचा अर्धा चरणाच्या देखिल अर्थ करण्यास तर्क चालविणें देखिल अवघड आहे. त्याची कविता समजणेच्या तर्क बांधणें हा मोठा पाश म्हणजे फासा आहे, कीं तो पाश कालचक्राचे कंगोऱ्यावर देखिल गुंडाळलेला आहे. याचा श्रेष्ठ विचार मोठा शिकार धरणाराच आहे, कीं तो विचार शिकार धरणारा पादशाहाचे बुकाचा आहे, म्हणजे त्याचे वर्णनांत मुल्कांचे व पादशाहाचे सर्व वर्णन आलें आहे. कसिदा म्हणजे पद्यरुपी कवितेंतील एक प्रकार आहे. त्या कसिद्यांत व गजल म्हणजे एक कवितेंत प्रकार असतो त्या गजलेंत कित्येक अति उत्तम अर्थ व बहुत रंगीन मजकूर असे बांधले आहेत, कीं त्याचे उत्तम प्रकारचे ओझ्यांनीं चुक्या निवडून काढणाराची व दुषणें ठेवणाराची जिव्हा फणीचे दातांप्रमाणें जागोजाग फाटली म्हणजे चिरली, म्हणजे त्याचे कवितेंत कोणी चूक निवडून काढील किंवा दुषण ठेवील असें नाहीं. त्याचे विचाराचे पावसानी गुप्त भेदाचे खजिन्याचे समुद्रांतून सहस्त्रावधी, म्हणजे हजारो, मुक्ताफळांची वृष्टी करून मोती प्रसिद्ध केले, म्हणजे हजारों गुप्त गोष्टी होत्या त्या त्याचे वर्णनानें प्रसिध्द झाल्या. त्याचे विचाराचे सुलक्षणीक जासुदानें ईश्वरी ज्ञानानें गुप्त घरांतून बातमी घेतली, म्हणजे त्याचे वर्णनांत ईश्वरी ज्ञानहि आहे. पारसी बैतेचा अर्थ : "आश्चर्यप्रद तो पुरुष बारिक गोष्टी करणारा श्रेष्ठ स्थानाचा, कीं त्याचे विचारांचे वाड्यांत बहुत योग्यतेनें व डौलानें ॥ १ ॥ येत आहेत. नमून हरएक प्रातःकाळीं व सायंकाळीं : दुर्मिळ, म्हणजे कदापि मिळावयाचे नाहीं असे, मजकुर सलामाकरितां ॥ २ ॥ अर्थाचे मैदानांत जेव्हां घोडा पळवितो : तेव्हां दावा करणारे लोक ह्याचे मस्तक फाशांत धरितो ॥ ३ ॥ जेव्हां त्याचे प्रकृतीचा समुद्र लाटा मारावयास लागतो : तेव्हां जमीनीपासून आकाशापर्यंत मोती उसळतात ॥ ४ ॥", म्हणजे या कवितेंतील भाव मिळोन असा आहे कीं, इब्राहीम आदिलखान हा या प्रकारचा विद्वान.

## २४. दुसरा सयद नुरूल्लाह :

ईश्वरी ज्ञान जाणणारा हा प्रत्यक्ष मोठा विद्वान असून सत्य बोलणारा पासून जसें वर्तमान आहे तशी माहिती ठेवितो. आपले उत्तम प्रकृतीचे गोडीनें सर्वांचे

मनोधारण ठेवितो. निरंतर चित्त हरण करावयाजोगें उत्तम प्रकारची शब्द रचना करून ग्रंथ करण्याचे विद्येंत कालचक्राचे सज्यावर लिहित आहे. त्याचा प्रबळ विचार विस्तार करण्यांत आखुड कागदास शिकंदर बादशाहा याणी मोठी मजबुत भिंत बांधिली होती त्या भिंतीस लाजवित आहे. यास्तव कीं, या जुनी म्हणजे मोठे उंच शरीराचीं मनुष्यें आहेत तीं मनुष्यें सर्व मनुष्यांस भक्षण करितात. त्या प्रकारचे जे ग्रंथातील दुर्गुण व चुका हुडकणारे पुरुषानें नखानें उकरून दोष नसतां छिद्रें पाडूं नयेत. यास्तव शिकंदर पादशाहा याणीं मजबुत भिंत बांधली होती त्याप्रमाणें ग्रंथाचे पत्रांत अशी मजबुती ठेविली कीं, त्यांत कोणतेहि दुषण ठेवणारे पुरुषाचा प्रवेश होऊं नये. यांतील तात्पर्य हें आहे कीं, तीं उंच शरीराचीं मनुष्यें इतर मनुष्यांस भक्षण करणारी अति उपद्रव करूं लागलीं तेव्हां शिकंदर पादशाहा याणी मोठी मजबूत अशी भिंत बांधली, कीं तीं मनुष्यें त्या भिंतीचे अलीकडे येऊं नयेत अशी भिंत बांधून त्या मनुष्यांचा प्रवेश त्या भिंतीचे अलीकडे न होय असा बंदोबस्त ठेविला आहे. त्या भिंतीप्रमाणें या ग्रंथकारानें आपले ग्रंथाचे अर्थांत अशी मजबुती ठेविली आहे कीं, त्या ग्रंथात कोणतेहि चुकी काढणारे पुरुषाचा प्रवेश न होय असा शुद्ध ग्रंथ केला आहे. त्याचे विचारानें उदकाचे प्रवाहानीं, म्हणजे वाहण्यानीं, इच्छा करणाराचे इच्छेची बहुत पुष्पें प्रफुल्लित करून सर्वांच्या प्रकृती प्रफुल्लित केल्या. कारण कीं, ज्यांची चित्तें अकुंचित झालीं आहेत त्याणीं हा ग्रंथ पाहिला असतां आनंदाप्रती पावावें असा ग्रंथ केला आहे. पारशी बैतेचा अर्थ : " मुक्ताफळासारिखी नक्ष करणारी लेखणी जेव्हां हातांत घेतो तेव्हां लावण्य स्त्रियेच्या मुखाप्रमाणें कागदाचा सजा, म्हणजे कागदावरील जागा, चित्त हरण करावयाजोगा होऊन शोभतो : अशा प्रकारचा विद्वान व या प्रकारचा ग्रंथ करणारा ही अकलेची व विद्येची खाणच असेल, अशा प्रकारचा विद्वान आहे. "

### ३५. तिसरा हकीम आतषी आहे :

कीं आपले अग्निसारखे जिव्हांनीं विजेचे ज्वालेस मुक्याचे जिव्हेसारखे मानितो म्हणजे विजेचे जलदी पेक्षां या ग्रंथकाराची जिव्हां जलद आहे व त्याचा श्रेष्ठविचार अति श्रेष्ठ पदवीचा विचार करणारा आहे, म्हणजे हा ग्रंथकार बहुत श्रेष्ठ आहे, व त्याची वैद्यक्रिया खास ईश्वरी सामर्थ्याची आहे. त्याणीं सर्वांस आरोग्य करण्याचे फायद्यापासून एका तारे ईतकें देखिल अंतर केलें नाहीं, कीं बुआली म्हणोन मोठा वैद्य झाला होता तो वैद्याचे वैद्य क्रियेस लाजून मातीचे पडद्याखालीं लपला तो बाहेर निघाला नाही, म्हणजे बुआली या नांवाचा वैद्य पुर्वी होऊन गेला.

त्या वैद्याहून वैद्य क्रियेंत हा वैद्य अधिक अकलवान आहे. असें सामर्थ्य आहे कीं, तपमोहरेल म्हणोन पितज्वर होतो व नवज्वराची भावनाहि त्या ज्वरापासून होती व तो ज्वर आला असता दाह फारच होतो व त्या दाहानें मनुष्य मरण पावतो, या प्रकारचा ज्वर होऊन जरी मनुष्य मरण पावला तत्रापि त्या मनुष्याचे प्रेताचे हाडाकडे किंचित अवलोकन करून त्या मनुष्याचा दाह शांत करून त्यास सजीव करणें हे काम केवळ सुलभ आहे असें समजतो. पारसी बैतेचा अर्थ : " कविता करण्याचा व वैद्यक्रिया करण्याचा या वैद्यानें अशा प्रकारें मार्ग जिंकला : कीं आकाशास आपले पाटीमागें पळावयास लाविलें ॥ १ ॥ याजकरितां कविता करणें व वैद्यक्रिया करणें शिकला : कीं तेहि पृथ्वींतील गुप्त भेद प्रगट करावे ॥ २ ॥. " यांतील तात्पर्य हें आहे कीं, हकीम आतीषी हा वैद्य क्रियेंत व कविता करण्याचे विद्येंत बहुत पूर्ण जाणता होता.

## ३६. चौथा मिरजा हकीम :

मिरजा हकीम हा मजबुत तबेतेचा हरएक विद्येमध्यें निपुण व सर्व पृथ्वीस प्रसिद्ध आहे. अर्थ चमत्कार करण्यांत व शद्व रचना करण्यांत अद्वितीय आहे, म्हणजे याचे सारिखा कविता करण्यांत निपुण कोणी नाहीं. त्याचे बोलण्याचे योग्यतेचीं लक्षणें वर्णन करण्याहून अधिक आहेत. त्याचे अमृतश्राव करणारे दोन नेत्रांचे उदकानें अमृत प्राशन करण्याकरितां तृषाक्रांत होऊन म्हणजे तान्हेंतून बोट वाळलेले पुरुषाचे टाळूचे स्थानीं अमृतश्राव होतो. सिकस्ता म्हणजे पारसी वाकडे मोडीचें अक्षर असतें, त्या अक्षरास सिकस्ता असें म्हणतात. त्या सिकस्ता अक्षर लिहिण्यांत लावण्य स्त्रियांचे जुलफास, म्हणजे कानावरील केस, आपले लेखणीपासून गळीत झालेला नक्षा आहे असें समजत आहे, म्हणजे जुलफाचे वाकडे मोडीहून अधिक शोभेनें सिकस्ता अक्षर लिहीत आहे. पृथ्वीस तेजस्वी करणारे सूर्यानीं आपलें तेज त्यानें ग्रंथ केलेले रेवाटण्यांतील अक्षरांत ठेविलें आहे, म्हणजे त्याचे अक्षर लिहिण्यांत फार तेज आहे व भ्रमण करणारे म्हणजे निरंतर फिरणारे आकाशानें नक्षत्रगणाचा जवाहीरखाना मुक्ताफळासारिखे लेखन करणारे त्याचे लेखणीचे हवालीं केला.

## ३७. पांचवा मिरजा दौलतशाहा :

मिरजा दौलतशाहा हा शब्द रचनेचे मुलकाचा पादशाहा आहे. त्याचे श्रेष्ठ व उत्तम प्रकृतींतील जिवानीं सायंकाळीं व प्रातःकाळीं, म्हणजे निरंतर, ईसा म्हणोन

पैगंबर झाले ते कोणाचाहि जीव गेला असतां त्या प्रेतास आपले मुखानें फूंकून त्या श्वासानें सजीव म्हणजे जिवंत करित होते त्या इसा पैगंबराप्रमाणें अर्थास सजीव करित आहेत. आपले शोभायमान शब्दांचे ऐकण्यानें कालचक्ररूपी कल्यास टवटवित व ताजे करित आहे, म्हणजे याचे अर्थांत फार शोभा आहे. शब्दरचनेंत फार टवटवितपणा आहे. कविता करण्यांत त्याचा अभ्यास येथपर्यंत झाला होता कीं, कागदाचे समराक आसपास याचे स्वर्गांतील अमृतकुंडाचे उदकानें धुईत नाहीं तोंपर्यंत त्याची जिवंत लेखणी नमस्कारास त्या आसनावर मस्तक ठेवित नाहीं, म्हणजे कागद अति निर्मळ असला तर त्या कागदावर लिहितात. अर्थ : तल्लक्षण नव्या नवरीस आवळून शब्दांचे पुढ्यांत घेणें तर त्याचा दांडगेपणाचे प्रकृतीचा स्वभाव आहे, म्हणजे एका शब्दांत बहुत अर्थांची साठवण करणें हा त्याचा स्वभाव आहे. पारसी बैतेचा अर्थ : " जेव्हां याची प्रकृती अर्थ करण्याचा उपयोग करून घेती तेव्हां रज:कणास सूर्यापुढें ओढून नेतो ॥ १ ॥ आकाश सर्वोपरी त्याचे फिकीरींत आहे : नक्षत्र त्याचे गुप्त व प्रसिध्द अर्थांचे विचारांत आहे ॥ २ ॥ शब्दांचे जांबापासून जेव्हां धातुस्थान टवटवित होतें : तेव्हां हरएक शुन्यानें शेकडों दीप प्रदिप्त करितो ॥ ३ ॥ ", म्हणजे या प्रकारचा बहुत अकलवान मिरजा दौलतशाहा ग्रंथकार आहे.

## ३८. सुलतान महंमद आदिलशाहाचीं उत्तम लक्षणें वर्णन प्रकर्ण :

सुलतान महंमद आदिलशाहा पादशाहा रूपानीं बहुत लावण्य, सुलक्षणीक, उत्तम स्वभाववान, क्षमाशील, श्रेष्ठ ऐश्वर्यवांन व प्रबळ दैववान होता. या पादशाहाची यशस्वी फौज जिकडे जात होती व जें राज्य हस्तगत करण्याविषयीं हिंमत धरी ह्या विषयीं यश व जय आदिलशाहाचे फौजेपुढें सामोरें पळत येत होते. युध्द लढाया करून निर्दैवी हिंदु लोकांची बहुत शहरें कर्नाटक, मुलनार व येलवाड घेऊन फत्ते करून तीं शहरें मुसलमानी राजधानीचीं केलीं. त्या हिंदूंचे संपूर्ण शहरांत देवालयें होतीं त्या ठिकाणीं मसिदी व मुसलमानी विद्येच्या शाळा बांधून तेथें काजीमंडळ, खतीबलोक, मुसलमानी धर्माचे शास्त्र जाणणारे व सर्व मुसलमानी धर्माचे हुद्देदार नेमून मुसलमानी धर्म व महंमदी शास्त्र चालू करून प्रसिध्द केलें. सुलतान महंमद आदिलशाहा पादशाहाचे राजधानीची हद्द मोगलांचे मुलखाचे सरहद्दीपासून सेतुबंध रामेश्वरापर्यंत व त्याची रुंदी कुतुबशाहाचे सरहद्दीपासून शहर बंदरासी मिळून मुस्तफाबाद दाभोळचे बंदरापर्यंत, कीं ते बंदर खारे समुद्राचे किनाऱ्यास आहे तेथपर्यंत, सरहद्द पोहचून मुलखाची मामुरी, म्हणजे आबादानी, व रयतेचा भरणा व शहरांतील राहणारीं सुखवस्तु मनुष्यें सुलतान महंमद पादशाहाचे

कारकीर्दीत येथपर्यंत जमली होतीं, कीं पिंगळे व दिवाभीत म्हणजे घुबडें हे दोन जातीचे पक्षी जेथें ज्याचे घराबर बसतात तेथें बहुत प्रळय होतो ते दोन ज तीचे पक्षास, आदिलशाहाचे सरहदींत राहावयास जागा राहिली नाहीं, म्हणजे हे दोन जातीचे पक्षी आदिलशाहाचे सरहदींत कोणतेच वस्तीचे गावांत व शहरांत येत नव्हते. आदिलशाहाचे सरहदींत कोणतेच गांव किंवा शहर, कीं तेथें नाचगाणें व रागरंग व वाद्ये व गायनाचा आनंद नाहीं असें नव्हतें, म्हणजे आदिलशाहाचें सरहदींतील सर्व गांव व शहरांत नाच गाणें रागरंग वगैरे आनंद रात्रंदिवस होता. सर्व मनुष्यें संतोषानीं व मनोरथपूर्णतेनीं अशीं आनंदयुक्त होतीं कीं, त्या मनुष्यांचे अंतःकर्णाचे आसपास या संतोषाचे विचाराखेरिज दुसरे कांहीं एक खिन्नतेचे व वाकडेपणाचे प्रकार येत नव्हते. आदिलशाहाची न्यायाची व इनसाफाची ताजगी अशी होती कीं, हरणाचें पालन मस्त वाघाचे हातून करवित होता. आदिलशाहाचे बक्षीस देणें व धर्म करणें असें होतें कीं, द्या असें म्हणावयाची मागण्याची चाल पृथ्वींतूनच काढून टाकली, म्हणजे कोणीकोणास मला द्या असें म्हणत नव्हते, येथपर्यंत सर्व लोक सुखी ठेविले होते. मुसलमान लोकांत हातमताई म्हणजे मोठा धर्म करणारा पुरुष झाला. त्यासारिखा कोणीच धर्मक नाहीं. त्या हातम याचें नांव पादशाहाचे धर्म करण्यानीं निखालस नाहींसें झालें, म्हणजे त्याहून आदिलशाहाचे धर्म करणें अधिक आहे. नवशीरखान म्हणोन मोठा इनसाफ करणारा झाला त्या नवशीरखान पादशाहाचा इनसाफ सर्व लोकांनीं विस्मरणाचे कोनाड्यांत ठेविला, म्हणजे आदिलशाहाचे इनसाफ करणें याहून नवशीरखान पादशाहाचे कोणी स्मरण देखिल करिनासे झाले. असें वाटतें कीं, ती कारकीर्द आहादेमहैदी सारखी झाली. येविषयींचा विस्तार बहुत आहे. त्यास्तव तो कथाभाग येथें वर्णन केला नाहीं. कारण कीं, त्या कारकीर्दीत कोणाचे पुढें कोणी कांहीं वस्तु मागावयास हात पुढें केलेला कोणी पाहिला नाहीं. तशीच ही कारकीर्द झाली. दरिद्र व भिकारपणा या पृथ्वींतून निखाळस असा पळोन गेला कीं, कोणाचे तोंडाकडे कोणी पहातें असें कोणाचे दृष्टीस पडत नव्हतें. कोणताच वृध्द पुरुष कोणतेच रुस्तुमासारिखे बलवानाचें भय ठेवित नव्हता, म्हणजे कोणीच अशक्तावर बलवान जबरदस्ती करित नव्हता, कारण कीं असे झालें असतां पादशाहा त्याचें पारपत्य करतील मग आपण भय धरण्याचें काय कारण आहे. असें जाणोन वृद्ध पुरुष बळवानास भीत नव्हते. कोणतीच मुंगी सर्पाची पिडा भोगित नव्हती, म्हणजे मुंग्या भक्षण करण्याविषयीं सर्पास देखिल पादशाहाची जरब होती. यास्तव मुंग्या सर्पास भीत नव्हत्या. असे म्हणाल कीं, त्याचे इनसाफ करण्याचे उत्तम रीतीनें विजापुर शहरची भरवस्ती व आबादानी येथपर्यंत झाली कीं, नवरसपूरचे व तालेवारीचे सरहदीपासून रसुलपूरचे सरहदीपर्यंत लांबी पूर्व पश्चिम इब्राहिमपुरापासून बहमनहाळीपर्यंत व रुंदी दक्षिण उतर एक सारखी आबादी होती. सर्वास

तालेवारी नवे स्वस्ततेनें बेपर्वापणा व बेगर्जीपणा येथपर्यंत झाला होता कीं, नित्य रात्रीं दररोजचे चालीप्रमाणें एक मोठें तबक होनानें व पुतळ्या व रुपयांनीं भरून पादशाहाचे निजावयाचे जागीं उशास ठेवावयाची चाल होती. तें तबक मोठें प्रात:काळींच उचलोन इच्छित होते कीं, गोरगरीबांस व फकीरांस वगैरे या तबकांतील द्रव्य देवावें. असें इच्छित होते परंतु तें पादशाहाचे उशाकडील द्रव्य कोणीच घ्यावयास कबूल करित नव्हते. ज्यास तें द्रव्य द्यावयास जावें तें म्हणत होते कीं, उतारा देणारे पुरुपास द्याना. आम्ही उतारा घेणारे पुरुष न होत. असें बोलत होते तेव्हां ते द्रव्याचें तबक निरोपाय होऊन चाकर लोक खांद्यावर घेऊन तक्यांत राहाणारे मदारी फकीर लोकांस, कीं जे फकीर आर्क किल्याचे आसपास तके बांधून रहात होते ते चौदा तके होते, त्या तक्यांतील फकीरांस तें द्रव्य, म्हणजे भरलेले तबक, वाटून देत होते. फकिरहि पादशाहाचा सत्का म्हणजे उतारा घ्यावयाकरितां पादशाहाचे वाड्याकडे येत नव्हते. शहरचीं मनुष्यें त्या फकिरांस उतारा घेणारे फकीर असें म्हणत होते. जर करितां कोणी त्यासमई इमारतीकरितां थोडीशी जमीन मागत होता त्या पुरुपास एक गज भूमि म्हणजे जमीन एक होनास बहुत संकटानें प्राप्त होत होती. आणखी त्या पादशाहाचे उत्तम चालीचे बर्कतीचे म्हणजे वृध्धीचे, सुलक्षणिकपणाचा व सर्वोपरी स्वस्थतेचा रंग सर्व मनुष्यांवर येथपर्यंत चढला, कीं कोणीच दरिद्री नव्हता. पादशाहास असा संतोष व दौलतीची स्वस्थता प्राप्त असोन खैरात, म्हणजे रोख द्रव्य धर्म करणें, व मैरात, म्हणजे शिजलेले अन्नदान करणें, व मफरूना, म्हणजे शेंकडा अमुक द्रव्य धर्म करावें असे आहे, त्याप्रमाणें दान धर्म करून, आरबी वाक्याचा अर्थ : "ज्या पुरुपानें जो पदार्थ धर्म करणें धर्मशास्त्रांत योग्य लिहिलें आहे त्याणीं धर्म करण्यास तत्पर राहून धर्म करावा," असें लिहिलें आहे. त्याप्रमाणें सुलतान महंमद पादशाहा धर्म करित होता. जे कांहीं द्रव्य वर खर्चाकरितां पाण्यांत व चिखलांत मातीसारिखे निःसंशयपणें उधळून दिल्हें त्या शिलकी द्रव्यानें मसिदी, धर्मशाळा, गुमट, रवने, हवेल्या व थोर थोर इमारती बांधिल्या. त्या खुणेकरितां प्रसिध्ध आहेत. आरसे महाल हे मुसलमान लोकांकरितां क्षेत्रच प्रसिध्ध आहे व तो आरसे महाल अद्यापि राहिला आहे हें सर्वांस प्रगट व प्रसिध्ध आहे. विचार केला पाहिजे असें वाटतें कीं, सुलतान महंमद पादशाहाचे कारकीर्दीत लाभदायक समयांत द्रव्य परजन्यवृष्टिसारिखे आकाशांतून पडत होतें. यांतील तात्पर्य हें आहे कीं, सुलतान महंमद पादशाहाचे कारकीर्दीत फारच द्रव्य वाढलें.

## ३९. एक कथाभाग वर्णन केला जात आहे :

प्रती वर्षी जेव्हां कल्याणप्रद महिना रमजानचा येत होता तेव्हां कुरान परि-

कचा ग्रंथ आरंभापासून शेवटपर्यंत मुखोद्गत पाठ आहे त्यास आफीज लोकाचा समुदाय कोकणांतून येऊन शहरपन्हाचे बाहेर धर्मशाळेंत उतरत होता. तेव्हां मसिदींतील राहणारे लोक त्याजला हे हाफीज लोक आहेत असें जाणोन आपले मसिदींत राहावयास जागा देत होते. त्यास कुरान धरिफची किताब मुखोद्गत नव्हती व ज्याचें घरीं हाफीजहि कोणी नव्हता त्यास हाफीज लोक आले आहेत असें वर्तमान येऊन कळतांच ते अमर्यादपणें जलद जाऊन कांहीं एक न विचारितां एकएकाचा हात धरून आपआपले मसिदींत आणित होते. हाफीज आले आहेत असें वर्तमान कळलें असतां त्यांजला घेऊन येण्याविषयीं जाण्यास जो किंचित अवकाश व आळस करित होता त्यास हाफीज मिळत नव्हता. तो आळस करून जाणारा पुरुष खिन्न व निराश होऊन परत येत होता. जे ग्रहस्थ कोंकणचे हाफीज लोकांस आपले मसिदींत आणित होते ते त्या हाफीजास एक महिना पूर्ण भरे तोंपर्यंत नानाप्रकारचीं मिष्ट पक्वांन्नें करून भोजन घालीत होते. तराहिवा, म्हणजे रमजानचेच रात्रीं निमाज पढतात ती, निमाज पढून माहे रमजानच्या संपूर्ण रात्रीस जागर करित होते. रमजानचा महिना अखेर व्हावयाचे शेवटचे दिवशीं इतके रोख द्रव्य व जिन्नस वगैरे हाफीज लोकांस देत होते, कीं त्या द्रव्येंकरून त्या हाफीजांची साल बगमी होत होती. तो हाफीज दरसाल या रमजानच्या देणगीचें द्रव्य संचयावरच बायकामुलांसुध्धां गुजरान करित होता. पुन्हां साबान महिन्यामध्यें दुसरे सालीं पवेबरात जाहल्यानंतर विजापुरास येण्याकरितां निघत होता. कोंकणचे हाफीज लोकांचे वागणुकीचा मार्ग हाच होता व ते हाफीज लोक विजापुरांत राहून तेथील द्रव्यावर अकरा महिने आपले वतनाचे जागीं जाऊन प्रपंच करित होते. यांतील तात्पर्य हें आहे कीं, विजापूर येथील रमजानचे एक महिन्यांत जें द्रव्य मिळत होतें त्या द्रव्यावर एक सालचा गुजारा होत होता. इतकें द्रव्य एक एक हाफीजास मिळत होतें.

## ४०. सुलतान महंमद पादशाहाचे रयत पालन कर्ण्याचे प्रकर्णीं वर्णन :

गरीबाचे पालन करणारा सुलतान महंमद पादशाहा याचे रयत पालन करण्याचें लक्षण येथपर्यंत होतें कीं, एक कथा आहे, कीं एके दिवशीं महाजन कित्येक वाणी व रयत लोकांसहित कांहीं कामाकरितां इलाहापुरचे दरवाजानीं बाहेर गेला. दरवाजांतून बाहेर जातेसमयीं दरवाजांत नाईक व मेहतर नाईकवाडी बसले होते त्यांजला महाजन यांणीं सलाम केला. तो महाजनाचा सलाम म्हेतर नाईकवाडी व नाईक यांणीं बसूनच घेतला. म्हेतर नाईकवाडी व नाईक यांणीं महाजनास निखालस ताजीम घेतली नाहीं. येणेंकरून महाजन आपले मनांत फार खिन्न होऊन दरवाज्या-

बाहेर निघोन गेला. महाजन बोलला कीं, त्या नाइकांनीं व नाईकवाडी यांणी मजला हलकेपणानें पाहिलें. माझ्यामध्यें कांहीं योग्यता नाहीं असें जाणिलें नित्य मला पाहिलें असतां नाईक, म्हेतर व नाईकवाडी उठोन उभे रहात होते त्या चालीप्रमाणें आज उठोन उभे राहिले नाहींत. आम्हींहि पादशाहाचे रयेतच आहों. पादशाहा आमचे चित्त समाधान ठेऊन आमची खातरदारी ठेवण्याविषयीं बहुत झटतात असें असतां आज नाईक व नाईकवाडी यांचे दृष्टीस मी केवळ हलकेपणास पावलों. तेव्हां यावरून हळुहळू मी सर्वांचेंहि दृष्टीस हलकेपणा पाऊन व माझी योग्यता नाहींशीं होऊन पादशाहाचेंहि दृष्टीस आम्ही हलकेपणास पावोन कांहींच योग्यत नाहीं असें नीचत्वास पाऊं. तेव्हां आतां या शहरांत राहणें नीट दिसत नाहीं. आतां दुसरेकडे निघून जावें हें नीट. कारण कीं, क्षणभंगुर देह. या मृत्युलोकांत चार दिवस राहणें. अल्प आयुष्य. ह्यास्तव आतां तें बरें कीं, आबरूनें दिवस घालवावे. नाहीं-पेक्षां गैर आबरूनीं जगण्यापेक्षां मरण फार चांगलें. सारांश, महाजन व त्याचे ताब्यां-तील लोकांनीं वतनाची जागा सोडून दुसरेकडे जाणेचा इरादा खास ठरऊन त्याच रात्रीं शहराबाहेर निघोन गेले. दुसरे दिवशीं प्रातःकाळीं दुसरे कोणीकडे तरी जावें असा बेत केला. पुन्हां घरास परत आले नाहींत. रात्रीचे बातमीदार यांणी हा मजकूर पादशाहाचे कानावर घातला. हें वर्तमान ऐकून पादशाहास फारच वाईट वाटलें. पारपत्य करणारे लोक उग्र स्वभावाचे मोठे कहर याजला या माजुरपणानें वागणारे नाईकवाडी वगैरेंचें पारपत्यावर नेमून मोठी शिक्षा करविते झाले. दरबारांतील कित्येक खासे मंडळास महाजन व रयत लोकांचे समजुतीकरितां पाठऊन त्यांचें चित्त फार समाधान केलें. सर्वांनीं आपआपले घरास परत यावें म्हणोन बहुत आग्रह केला तेव्हां ते महाजन व ते सर्व रयत लोक पादशाहाची मेहेरबानगी व कृपेकरून बहुत संतोष पावोन बहुत यशस्वीपणानें सर्व आपआपले घरास परत येण्याचा निश्चय करून शहरांत येऊन राहाण्यास राजी झाले. परंतु बोलले कीं, आम्ही येथेंच शहराबाहेर राहतों, शहरेंच आंत येण्यास आमचे चित्तास स्वस्थ वाटत नाहीं. आम्ही दरवाज्यांतून येत होंतों तेव्हां त्या नाइकांनीं आम्हांस हलकेपणांनीं व नीच-त्वानीं पाहिलें. आतां पुन्हां आम्ही त्या दरवाज्यांत पाय ठेवणार नाहीं असें बोलले. हें वर्तमान पादशाहास कळलें तेव्हां पादशाहानीं तेच वेळेस गौंड्याचे नायकास आज्ञा केली कीं, अति त्वरेनें बेलदार व कामाठी वगैरे घेऊन तुम्ही तेथें जाऊन कोटाची भिंत, ज्या ठिकाणीं हाली पादशाहापुरचा दरवाजा जेथें आहे त्या ठिकाणीं भिंत, फोडून तेथें नवीन दरवाजा बांधून शहरांतील रयत लोक महाजन वगैरे शहरा-बाहेर गेले आहेत त्यांजला या नवीन बांधलेले दरवाजानीं शहरांत आणावें. अशी आज्ञा केली तेव्हां गवंड्याचे नायकांनीं पादशाहाचे हुकुमाप्रमाणें हजारो बेलदार, कामदार, कामाठी व कारागीर वगैरे घेऊन त्या कोटाचे भिंतीपाशीं जाऊन पोंहचून

ती भिंत फोडून त्या ठिकाणीं नवीन दरवाजा बांधिला. त्या दरवाज्याचें काम प्रात:काळपासून सायंकाळपर्यंत एक दिवसांत शेवटास गेलें. नंतर महाजन वगैरे रयत लोक एक रात्रपर्यंत शहराबाहेर राहिले होते त्या रयत लोकांस बहुत योग्यतेनें व आदरानें त्या नवीन बांधलेल्या पादशाहापुरचे दरवाजानें शहरांत आणिलें. पादशाहापुरचा दरवाजा नवीन बांधण्याचें कारण हेंच आहे. या कारणास्तव बांधिला. नाहींपेक्षां शहरचे कोटास सहा दरवाजे होते. तात्पर्य, सुलतान महंमद पादशाहाचें रयत पालन करण्याचें व दयाळुपणाचें लक्षण येथपर्यंत होतें.

## ४१. आणखी एक कथाभाग येविषयीं वर्णन केला जात आहे :

एके दिवशीं तो सुलतान महंमद पादशाहा, रयतेचें पालन करणारा व धर्मनिष्ठ, आपले वाड्याचे उंच हवेलीचे माडीवर चढून चहूंकडे पाहत होते. शहरचे भरवस्तीकडे अवलोकन करित होते. पादशाहांनीं पाहिलें तों शहरचे वस्तींत चहूंकडे धूर उठला आहे. परंतु शहरचे वस्तींत ब्राम्हण आळी ही मोठी आबादानी होती त्या ब्राम्हण आळींत कांहींच धूर दिसण्यांत येत नव्हता. असें पाहून पादशाहास फार आश्चर्य वाटलें. पादशाहाजवळ राहाणारे जे लोक उभे राहिले होते त्यांजला पादशाहानीं विचारिलें कीं, या शहरांत चहूंकडे घरोघर स्वयंपाकाचा धूर उठला आहे आणि या ब्राम्हण आळींत अगदींच कोठें स्वयंपाकाचा धूर निघत नाहीं याचें कारण काय आहे? असें विचारिलें तेव्हां या संनिध उभे राहिलेले लोकांनीं विनंति केली कीं, त्या आळींत राहणारे लोक ब्राम्हण आहेत. ब्राम्हण जातीचे लोक एक वेळ स्वयंपाक करून खातात. अशी विनंती केली तेव्हां भोळे प्रकृतीचा व दयाळू अंत:कर्णाचे पादशाहाचे मनांत आलें कीं, हे ब्राम्हण लोक एक वेळच स्वयंपाक करितात आणि एक वेळच भोजन करितात याचें कारण काय? ब्राम्हण लोकांस फार दरिद्र असेल व यांचे घरीं कांहींच संचय नसेल यास्तव एक वेळच भोजन करित असतील. असें मनांत येऊन कळवळून कृपावंतपणें आज्ञा केली कीं, या सर्व ब्राम्हणांचे भोजनाचा नित्य खर्च असेल तितकी नेमणूक सरकारांतून करून द्यावी, म्हणजे येणेंकरून या ब्राम्हण मंडळींचे प्रपंचाचा स्वस्थपणें बंदोबस्त होऊन प्रपंचनिर्वाह नीट चालेल. असें झालें म्हणजे नित्य दोन वेळ जेऊं लागतील. पादशाहास इतकें देखिल लक्षांत आलें नाहीं कीं, ब्राम्हणांची जात काय भिन्न आहे, ब्राम्हण असे काय थोर आहेत, बुध्या एक वेळ भोजन करितात व धर्मवान व दयाळु पादशाहासंनिध राहाणारे लोकहि या गोष्टीस मनाई करावयाजोगे नव्हते. त्या लोकांनींहि जाहीर केले कीं, या ब्राम्हण लोकांस हा नित्यचा स्वभावच आहे, कीं रात्रीं किंवा दिवसामध्यें एक वेळ भोजन करावें. अशी विनंती केली तेव्हां हें बोलणें ऐकून पादशाहा स्तब्ध,

म्हणजे उगेच, राहिले आणि त्याच दिवशीं पादशाहानीं आज्ञा करून त्या ब्राम्हण लोकांस भोजन खर्चाबदल जाजती नेमणूक करून दिल्ही. तात्पर्य, सुलतान महंमद पादशाहा या प्रकारचा दयाळू होता.

## ४२. सुलतान महंमद पादशाहाचे कारकीर्दीत आदिलशाही राजधानीची मजबुती प्रकर्ण वर्णन :

सुलतान महंमद आदिलशाहा पादशाहाचे कारकीर्दीत आदिलशाही राजधानीची मजबुती पूर्वी पादशाहा होऊन गेले त्याहून शतपट अधिक झाली. या प्रकारें, कीं पूर्वीचे पादशाहाचे कारकीर्दीतील, जे बहुतेक संभावित व मोठे योग्य अमीरलोक बहुत द्रव्याचे व बहुत घोडे व स्वार शिबंदीचे आधाराचे गर्वानें अभिमानाचा घोडा आकाशावर दौडवित होते, म्हणजे अमीरलोक फार गर्वाने वागत होते. आज्ञा झाली असतां नाना प्रकारचे बाहाने करून विजापुरास परत येण्याविषई कित्येक आज्ञापत्रें सादर झाल्यानंतर ते अमीरलोक विजापुर शहरचे दोन अडीच कोशाचे अंतऱ्यावर येऊन उतरून द्वितीयेचे चंद्राप्रमाणें लीनतेचें मस्तक नम्र करून म्हणजे सला करून आपआपले मुलकास आज्ञा घेऊन जात असत. असे पूर्वी माजुरपणानें वागत होते ते अमीरलोक या सुलतान महंमद पादशाहाचे कारकीर्दीत किंचित पादशाहाची सूचना गेली म्हणजे तात्काळ आज्ञा पालन करून विजापुरास नमस्कार घालीत शहरांत येत होते. पादशाहाचे संनिध येऊन मुजरे करून सुदैववानपणा प्राप्त करून घेऊन पादशाहाचें चाकरींत हुजूर हजर राहात होते. दिल्ली येथील शहाजहान पादशाहानीं बहुत थोरपणा देऊन सुलतान महंमद यास मात्र पादशाहा असें पत्र पाठवित होते. दक्षिण देशांतील कोणतेच पादशाहास या पूर्वी दिलीचे पादशाहाकडून पादशाहा असा किताब मिळाला नव्हता. एक सुलतान महंमद यास मात्र दिल्ली येथील पादशाहाकडून पादशाहा असा किताब मिळाला. असेच मका मुआजमा येथील श्रेष्ठ लोक व आरब देशाचे मालक लोक व शाहा सफवी व शाहा आबास असे थोर थोर पादशाहा वारंवार अकलवान वकिलासमागमें नाना प्रकारचे उत्तम पदार्थ पादशाहास योग्य असे देऊन सुलतान महंमद पादशाहाकडे पाठऊन आपली आमची मित्रता असावी असा मजकूर आदिलशाहास जाहीर करित होते. कुतुबशाहा व दक्षिण देशचे सर्व सरदार लोक व फिरंग्यांतील सरदार मंडळ व मलेवाड, मिल्नार (साल्नाड) व कर्नाटक येथील सर्व राजे मंडळ व चहूंकडील जे जे सरदार महान गर्वीष्ठ होते ते देखिल सर्व सरदार याणी सेवकपणा धारण करून नानाप्रकारचे उत्तम पदार्थ व नजर नजराणा व खंडणीचा ऐवज प्रती वर्षी सुलतान महंमद पादशाहाकडे पाठऊन मित्रता, स्नेह, सेवकपणा व आज्ञा पालन करण्याचा धर्म स्वीकारित होते.

जेव्हां सुलतान महंमद पादशाहा गाजी यांणी आपला मामा सैयद अबदुल रहिमान याची कन्या जाहान बेग इसी आपले लग्न करून संतोष व आनंद पावता झाला (तेव्हां) रात्रीं गस्तीचे समई शाहा आबाम पादशाहाचे वकील दुसरेकडील पादशाहा-कडून कल्याणाची इछा ठेवित होते ते वकील आदिलशाहाचे लग्नाचे रात्रीं मस्तकाचे पाय करून बहुत मर्यादेनें पाहशाहा गाजी याचे सेवेंत हजर होऊन सेवकपणाच्या चाली सिध्धीस नेते झाले. हरएक शहरांत पृथ्वीचे घेण्याचे आदिलशाहाचे तरवारीचे सामर्थ्याची चर्चा, म्हणजे बोलणें, निघत होतें. तिकडील सर्व शहरें व मुलुक आदिल-शाहाचे दौलतीकडे आला. सोलापूरचा बहुत मजबुत किल्ला, कीं त्या किल्याचे बुर्जाची मजबुती शिकंदर पादशाहानीं मजबूत भिंत बांधली होती त्या भिंतीस दूषण ठेवावया-जागी होती, म्हणजे बुरुज फार मजबूत होते. किल्याचा पाया असा मजबूत आहे कीं, पृथ्वीगाईचे पाटीवर आहे त्या गाईचे वसिंडास घसण्यानीं पर्वतासारखे थोझें होऊन त्या गाईस बोरडावयास लावीत, म्हणजे सोलापूरचे किल्याचा पाया बहुत खोल खणून मजबूत बांधिला आहे. तो किल्ला सुलतान महंमद पादशाहानीं हस्तगत करण्याचा संकल्प केला. तेव्हां त्या किल्यावरील किल्लेदार सिद्दी रयहाननें सोलापूर या सदरहु किल्यांत बहुत सामान व लढाऊ फार मजबूत तयार करून व कटा फौज जमऊन बेपरवापणाची म्हणजे आपलेपुढें कोणाचीच योग्यता नाहीं असें मानण्याचा चौघडा त्या काळांतील चहूंकडे राहणारांचे कानावर ध्वनि जाण्याजोगा वाजविला, म्हणजे सिद्दी रयहान याजपाशीं किल्याचे बंदोबस्ताचे फौज वगैरे सामान आहे असें कोठेंच नाहीं, असें सर्वांस प्रसिध्ध होते. सिद्दी रयहान याणी थोडेसे फौजेचे जमातीनिसी दिलीचे भारी फौजेशी मोटी लढाई केली आणि दिलीवाल्याचा निखालस मोड करून दिलीकडील फौजेस पळविलें. असें असतां तो सिद्दी रयहान सुलतान पादशाहा यांणी तो सोलापूरचा किल्ला इकडे हवालीं करून द्यावा अशी किंचित सूचना पाठवितांच सिद्दी रयहान याणीं पादशाहाचा हुकूम येतांच किल्याची किल्ली सुलतान महंमद पादशाहाचे सेवेंत आणोन हजर केली. सिद्दी रयहान यांणी सेवकपणा धारण करून आदिलशाहाचे अमीरलोकांत योग्यता पावता झाला. सिद्दी रयहान यानें मनोरथाची बाग सुलतान महंमद पादशाहा गाजी याचे कृपेचे पर्जन्य-वृष्टीनें पूर्ण टवटवित झाली.

४३. आणखी एक कथाभाग वर्णन केला जात आहे :

चांदणे रात्रींपैकीं एके रात्रीं सुलतान महंमद पादशाहा आदालत महाल म्हणोन मोटी हवेली होती त्या हवेलीचे माडीवर होते. त्या माडीवर बहुत

आरास बिछाइती, कंदील, फानसे वगैरे लाऊन सफेद पोषाख करून व सफेद बिछाईत आंथरुन चांदणें रात्रीचा विलास भोगण्याकरितां तयारी करून बहुत संतोष व आनंदात निमग्न होते. वजीर व अमीरलोक या हरएकानींहि त्या प्रमाणेंच पांढरा पोषाख करून संतोष व आनंद करित होते. भर मध्यरात्रीं परम संतोषाच्या लहरी पादशाहाचे समुद्रासारिखे चित्तावर व सर्वांचे चित्तावर उठत होत्या, म्हणजे सर्वांचे परम संतोषाचे वेळेस पादशाहा खिडकींत उभे राहून विजापूर शहरचे वस्तीकडे पाहून शहरांतून काय आवाज होतो तो ऐकण्याकडे किंचित कान दिल्हा. तेव्हां संतोषाचे व आनंदाचे आवाजाशिवाय, मोरचंग, सार मंडळ, विणे, मृदंग, तबले वगैरे संतोषाचे आवाजाशिवाय दुसरा कांहीं एक आवाज पादशाहाचे कानावर येत नव्हता. तेव्हां किंचित विचारांत पडोन पुन्हां संतोषांत व आनंदांत निमग्न झाले. श्रेष्ठ आहे डोळा ज्याचा असा जो सत्य स्वरूपी ईश्वर, सर्वांचा अन्न-दाता, त्या ईश्वराचा स्तव करण्याकरितां. कारण कीं आपले कारकीर्दीत या प्रकारचे सुख, विश्रांती, संतोष, आनंद व सर्वोपरीं स्वस्थता सर्व मनुष्यांस प्राप्त झाली आणि सर्वांस आनंद प्राप्त झाला, कीं आनंदाचे वार्तेशिवाय चिंतेचा ध्वनि कोणतेच जाग्यापासून निघत नाहीं अशी ईश्वरानें कृपा केली या कारणास्तव, ईश्वरास नमस्कार घातला. पूर्वी विश्वासू सेवक व परम लोभांतील जो अफजलखान तख्तासंनिध उभा राहिला होता त्याजला आज्ञा करून पादशाहा बोलले कीं, अहो अफजलखान, हें सर्व शहर आम्हांस काय म्हणतें ? असें विचारिलें तेव्हां अफजलखान यांणीं विनंति केली कीं, आपले आयुष्य व दौलत स्वस्थ रहाण्याकरितां व आपली योग्यता व ऐश्वर्य वाढण्याकरितां, कारण कीं हा सर्व संतोष, आनंदाचा गलबा व संतोषाची गर्दी झाली आहे हें चिन्ह इनसाफ करणार, उत्तम चालीनें वागणार, कृपा करणार, रयतेचे पालन करणार असे जें आपण त्या आपले उत्तम स्वभावाचे योगानें सर्वांस समुद्रासारिखा पूर्ण आनंद प्राप्त झाला आहे व चिंता व दुःख निरंतर सर्व मनुष्याचे अंतःकर्णापासून निखालस दूर झालें आहे. अशी अफजलखान यांणीं विनंति केली तेव्हां पादशाहा हें ऐकून अत्यंत संतोष व आनंद पावले. परंतु त्यानंतर थोडासा विचार करून पुर्तेपणें अंदेशा मनांत आणोन पुन्हां अफजलखान याजला आज्ञा केली कीं, जर करितां आम्हास दिलीचे पादशाहाशी युध्द प्रसंग प्राप्त झाल्यास कामाचा परिणाम कसा होईल ? असें विचारिलें तेव्हां अफजलखान यांणीं विनंति केली कीं, आपण हे सर्व संतोषाचे शब्द श्रवण करित आहां त्या संतोषाचे ठिकाणीं महान संकटाचे शब्द श्रवण करावें लागतील, म्हणजे बहुत संकटें उत्पन्न होतील. सुवासणी बायका आपले हातांतील चुडे व कांकणें फोडतील ते शोकाचे शब्द श्रवण करावे लागतील. मनुष्याचे प्राण गेले म्हणजे त्या प्रेतासाठीं एकच आरडाओरडा होतो तेच शब्द ऐकावें लागतील. ताबुताचे दुःखाचें रुदन ऐकावें लागेल.

४४. सुलतान महंमद पादशाहा यांणीं अफजलखानास येविसींचे कारण विचारणें व अफजलखान यांणी उत्तराची विनंती करणें प्रकर्ण वर्णन :

यापूर्वीं एका आठवड्यांत दिलीचे पादशाहाचा वकील अत्यंत क्रोधायमान मजकुरानें भरलेलें आज्ञापत्र घेऊन येऊन पोंहचला होता. क्रोधाचें कारण तें होतें कीं, माजी म्हणजे गुजरलेले पादशाहाचे समई आर्क किल्याचे आंत आदालतीची जागा होती. सुलतान महंमद आदिलशाहा पादशाहा यांणीं आपले कारकीर्दीचे राजधानीचे आरंभीच दाद फिर्यादीची आदालतीची जागा आर्क किल्याचे बाहेर करून आदालतीचा वाडा बांधून तेथें आदालत ठरविली. ती आदालतीची हवेली फार थोर आहे. या हवेलीचे तारिकेविषयीं एका पारसी बैतेंत लिहिलें आहे, त्या पारसी बैतेचा अर्थ : " काय चमत्कारिक हवेली बांधली आहे, कीं शनि म्हणोन ग्रह आकाशांत आहे तेथपर्यंत या हवेलीनें मस्तक लागलें आहे व त्या हवेलीचे आश्रयांत सर्व पृथ्वी विश्रांती पावली आहे. : १ :". हली आसार महालांत हजरत सैयद महंमद मुस्तफा रसुल्लाह आलेहे वआलेही वसल्लम याचे केश अद्यापि आहेत. तो आसार महाल सर्व पृथ्वींतील सर्व मनुष्यांचे ईश्वरी दर्शन घेण्याचें यात्रेचें स्थान आहे. पूर्वींचे पादशाहांचे कारकीर्दींत चित्तसमाधानाकरितां व चित्तास करमणूक होण्याकरितां जर करितां कधीं हत्तीची लढाई लाऊन तो चमत्कार पाहून संतोष पावावें असें पादशाहांचे मनांत येत होतें तेव्हां हत्तींची लढाई किल्याचे आंतच लाऊन तो तमाशा पहात होते. सुल्तान महंमद पादशाहा यांणी आपले कारकीर्दीत किल्याचे बाहेर हत्तीचे लढाईकरितां मोठे विस्तीर्ण मैदान केलें होतें. मैदान शर्फ बुर्जापुढें आहे. ती जागा हत्तीचे लढाईकरितां ठरविली व तें मैदान हाली वालाट या नामेंकरून प्रसिध्ध आहे. सुलतान महंमद पादशाहानीं आपला वजीर खान महंमद यास खानखाना असा किताब दिल्हा. दिलीचे पादशाहा श्रेष्ठत्वाचे व थोरपणाचे मस्तक आकाशास लाऊन आमचेवरते दुसरे कोणी थोर नाहीं असें मनांत आणीत होते. आपलेपुढें व आपले बराबरीचा कोणी या पृथ्वींत आहे असें समजत नव्हतें. दक्षिणचे पादशाहांस आपले चाकर व खंडणीचा ऐवज देणार असें समजून दक्षिणेचे पादशाहांस खान असें म्हणत होते. कागदपत्र व लखोटें आज्ञापत्रें दक्षिणचे पादशाहास लिहिणें झाल्यास त्या पत्रांत दक्षिणचे पादशाहास पादशाहा असें पत्रांतून लिहित नव्हते. नांव लिहून खान असें म्हणत होते. शहाजहान पादशाहा दुसरे यांणी कित्येक दिवसांनंतर सन एक हजार व अठावन्न ( १६४८ इ. स. ) सालीं सुलतान महंमद आदिलशाहा याजला, कारण कीं सुलतान महंमद पादशाहाची दौलत फारच वाढली व त्याचे श्रेष्ठत्वाचा दबदबा आकाशाचे लंगोऱ्यास लागला व सुल्तान महंमद पादशाहाची सर्व लक्षणें व स्वभाव सर्व पादशाहांहून अति उत्तम

व फारच योग्य होते, यास्तव सुलतान महंमद पादशाहाचे उत्तम लक्षणावर शहाजहान पादशाहा संतोष पावोन सुलतान महंमद यास 'शाहा' असा किताब दिल्हा. परंतु सुलतान महंमद याचे पत्रांत मागील करार व कायदे सुटले व खंडणीचा ऐवज द्यावयाचा ठराव होता तो बदलून बेमानपणाचा मजकूर जाहीर झाला. यास्तव पादशाहा यांणीं क्रोधमिश्रित आज्ञा सुलतान महंमद यास सादर केली कीं, पादशाहाचे चालींपैकीं हीं तीन कामें आहेत. हीं तीन कामें तुम्ही सोडून देऊन आपले बाप आजे कसे वागत आले तो मार्ग सोडिता. इकडील सेवेचे व इकडील आज्ञेंत वागण्याचे मार्गानें चालून निरंतर लीनता व नम्रता धारण करित जावी. नाहींपेक्षां आमची फार लहरी फौज व यशस्वी लष्कर तुम्हांवर चालून येऊन मोठा कहर करित व प्रळयाचा अग्नि पेटवित येऊन पोंहचली असें जाणावें. असें शहाजहान पादशाहा याणी क्रोधयुक्त पत्र लिहिलें. सुलतान महंमद पादशाहा याणी दिलीकडील वकील येऊन पोहचल्यानंतर शहाजहान पादशाहा याणी क्रोधयुक्त पत्र लिहिलें त्या पत्रांतील अभिप्राय समजल्यानंतर निरंतर तक्तासंनिध राहणारे अमीरलोक व वजीरमंडळ यांजला बोलाऊन सदरहू पत्राचें उत्तर कसें लिहावें असें विचारिलें. तेव्हां दक्षणचे सरदार मंडळ आपले सामर्थ्यावर, हिंमतीवर, शूरत्वावर, शिपाई मंडळाची एकदिली आहे या गोष्टीवर, पादशाहाचे नेक चालीचे योगानें रयत लोक सुखी व स्वस्थ आहेत यावर ईश्वराचे यशावर व साह्य करण्यावर पूर्ण भरंवसा ठेवित होते. यास्तव पादशाहानीं विचारितांच पूर्ण धैर्यानें बोलले कीं, 'बिसमिल्ला,' म्हणजे आरंभ करावा. आम्ही सिध्द आहों असें बोलण्याचें ठिकाणीं यवन लोकांची चाल आहे त्या चालीप्रमाणे सर्वत्र 'बिसमिल्ला' असें बोलले. आणखी म्हणों लागले कीं, आम्हीहि याच गोष्टीची इच्छा करित आहों. याच दिवसाची वाट पहात होतो कीं, युध्द तत्लक्षण नोवरी आवळून पुढ्यांत घ्यावी, म्हणजे युध्द करावे हें आमचे मनांत होतें. विषाचें पाणी दिलेल्हे दक्षिणी तरवारीस हिंदुस्थानचे पोलादावर घासावी असें मनांत होतें, म्हणजे दक्षिणी फौज घेऊन युध्द पराक्रम करून दिलीवाले फौजेस जिंकावें हेंच मनांत होतें. आम्हांसहि पूर्ण आवडी आहे कीं, खुद जातीनें हिंदुस्थानी फौजेवर चालून जाऊन नर्मदेकिनाऱ्यावर युध्द करावें. युध्दाचा मोकाबला बांधावा. असें सर्वत्र बोलले तेव्हां सुलतान महंमद आदिलशाहा याणी शिपाई लोकांची हिंमत व कारभारी मंडळाची मसलत व दौलतीकडील कामदार दौलतीचे कल्याण इच्छिणारे मंडळीची युध्द करण्याची सला दुरुस्त आहे असें जाणिलें. तेव्हां शहाजहान पादशाहा यांणीं क्रोधयुक्त पत्र पाठविलें होतें त्या पत्राचे उत्तर बरोबरीचें इराणानी लिहून शहाजहान पादशाहाकडील वकील आला होता त्यास निरोप दिल्हा. इतक्यामध्यें त्याच रात्रीं पादशाहा चांदणी रात्रीकरितां हवेलीचे माडीवर होते येविसीचा विस्तार पूर्वी

लिहिलाच आहे. अफजलखान बोलला होता त्याजवरून पादशाहानीं आज्ञा केली कीं, अफजलखान तुम्ही जें बोलला होता तें खरें व दुरुस्त आहे. आमचे प्रत्ययास आलें. आतां तुमचे युक्तीस कसें येतें ? असें पादशाहानीं विचारिलें तेव्हां अफजलखान यांणीं विनंती केली कीं, यद्यपि आपण ईश्वराचे कृपेंकरून व पादशाही दौलत व ऐश्वर्याचे योगानें सामर्थ्य व हिंमत अशी ठेवित आहांत कीं, हिंदुस्थानी फौजा चालून आल्या आहेत त्यांजला नर्मदेचे पाण्यांतून अलीकडे उतरून येऊं देऊं नये असें आपणास सामर्थ्य आहे. परंतु बहुत प्रळय झाल्यानंतर व बहुत मनुष्यें ठार झाल्यानंतर, कारण कीं हजारो निवडक मनुष्यें व मोठे मोठे हिंमतदार सिपाई लोक फडशा होतील आणि बहुत खराबी होईल, तेव्हां हजारों स्त्रिया विधवा होतील व लाखो स्त्रियांचे हातांतील कांकणें व चुडे फुटतील व घरोघर मनुष्य वारले म्हणजे सुतकी लोकांचें समाचारास एकमेक जातात तो समय येऊन सर्वत्र सुतकी होऊन बसतील. जर करितां प्रसंगास्तव सेवकपणा व आज्ञा पाळणें स्वीकारून शिपाई लोकांस व रयतेस मरण पावण्याचे संकटापासून जीवदान देऊन सर्वांचा बचाव केल्यास दूरवर विचार करणारे अकलेपासून ही गोष्ट दूर होणार नाहीं, म्हणजे ही मसलत अकलवान यांस नापसंद होणार नाहीं असें नाहीं. असें केलें असतां आपले शूरत्वास उणीव येणार नाहीं. स्वार शिबंदी वगैरे सरकारी फौजेचा नाश होणार नाहीं. बहुधा अकल जाणणारे अकलवानांसंनिध हें काम बहुत उत्तम व पसंद होईल. अशी विनंती केली तेव्हां आदिलशाहा पादशाहानीं पत्रें देऊन जासूद रवाना केला होता तो जासूद तीन मजलीवरून परत आणऊन त्या जासुदापासील परतपत्र माघारें घेऊन शहाजहान पादशाहा याणी क्रोधयुक्त पत्र लिहिले होते त्या पत्राचें उत्तर बरोबरीचे इराद्यानें लिहिलें होतें तें रद करून पुन्हां सख्य व्हावयाजोगा लिहून व सेवकपणा धारण करून सेवकपणाचे इराद्यानें पत्र लिहिलें. दोन कामें वर्ज करून आदालतीचा वाडा व हत्तीचे लढण्याची जागा किल्याचे बाहेर ठरविली होती ती मवकुफ करून म्हणजे बंद करून किल्याचे आंत जागा केली व सुलतान महंमद पादशाहा यांणीं आपले अमीरास खानखान म्हणोन पद दिल्हे होतें यावरून शहाजहान पादशाहास बहुत क्रोध आला होता यास्तव खानखाना असें पद दिल्हे. येविषयीं आदिलशाहा याणी शहाजहान पादशाहास असें आर्जवयुक्त लिहिलें कीं, मीहि आपले दरबारांतील खान मंडळीपैकीं आहे व हा माझा खान आहे. तेव्हां खानखाना या कारणास्तव पद दिल्हें आहे असें लिहिलें. यांतील तात्पर्य हें आहे कीं, मी आपला खान आहे व हा माझा खान आहे. यावरून खानाचा खान असा अर्थ होतो असें जाणोन हे पद दिल्हें आहे असें लिहिलें.

### ४५. सारांश :

सुलतान महंमद पादशाहा इनसाफ करणारा व रयतेचें पालन करणारा याणी युध्ध प्रसंगाची मसलत न करितां बहुत थोरपणानें सहनशीलता धारण केली आणि शिपाई मंडळ व रयतेस सुखाचे, विश्रांतीचे, संतोषाचे व आनंदाचे पाळण्यांत सुखरुप ठेविलें. तीस वर्षेंपर्यंत त्या कैलासवासी पादशाहाचे कारकीर्दीत याच प्रकारें सुख व विश्रांती पृथ्वीस व पृथ्वींतील राहणारांस पूर्ण होती.

### ४६. दूरदृष्टीनें पाहणारांचें चित्तावर प्रसिध्ध असेल :

युसफ आदिलशाहा पादशाहाचे दौलतीचे प्रातःकाळचे प्रारंभापासून शिकंदर पादशाहाचे दैवाचे सूर्याचा सायंकाळ होई तोंपर्यंत, म्हणजे युसफ पादशाहाचे कारकीर्दीपासून शिकंदर पादशाहाचे कारकीर्दीपर्यंत, कम जास्त म्हणजे सरासरी २०० वर्षांचा सुमार झाला. त्यांत इब्राहिम आदिलशाहाचे व सुलतान महंमद पादशाहाचे कारकीर्दीचे मध्यभागीं एकंदर ऐंशी वर्षें झालीं आहेत. हीं ऐंशीं वर्षें पूर्ण सुखांत, आनंदात, अत्यंत संतोषांत व गोडींत गुजरलीं होतीं. मुलुक व रयत वगैरे संपूर्ण लोक स्वस्थता व पूर्ण विश्रांती ठेवित होते. असें वाटतें कीं, आदिलशाही राजधानीचा सूर्य युसफ पादशाहाचे पूर्व दिशेहून उदय पावोन दिवसेंदिवस अधिक वाढत होता, तो सूर्य या दोन पादशाहाचे कारकीर्दीत म्हणजे इब्राहीम आदिलशाहा व सुलतान महंमद पादशाहाचे कारकीर्दीत पूर्ण उंचत्वास चढून आकाशाचे मध्यभागास येऊन पोंहचला, म्हणजे युसफ आदिलशाहाचे कारकीर्दीपासून दौलत दिवसेंदिवस अधिक वाढतच होती. परंतु इब्राहिम आदिलशाहा व सुलतान महंमद पादशाहा या उभयतांचे कारकीर्दीत पूर्ण दौलत वाढली. यानंतर त्या सूर्यांनी खालीं उतरण्याचा विचार केला, म्हणजे सुलतान महंमद पादशाहाची कारकीर्द झाल्यानंतर आदिलशाहाचे दौलतीस उतार लागला. तो आदिलशाही राजधानीचा सूर्य सुलतान महंमद पादशाहाची कारकीर्द झाल्यानंतर उतारास लागला होता तो शिकंदर पादशाहाचे कारकीर्दीत अस्त पावला, म्हणजे मावळला. यांतील तात्पर्य हें आहे कीं, सुलतान महंमद पादशाहाची कारकीर्द झाल्यानंतर दौलत दिवसेंदिवस कमी व्हावयास लागली होती. ती दौलत शिकंदर पादशाहाचे कारकीर्दीत बुडाली. यद्यपि चार कारकीर्दीतील दौलत दिवसेंदिवस वाढत होती, परंतु वैरभावामुळें युध्धाचे व लढाईचे बहुत संकटानें व विघ्नानें कोठेंच सख्य राहिलें नाहीं व लढाई व युध्धा-

खेरीज समय रिकामा नव्हता. अली आदिलशाहाचे कारकीर्दीपर्यंत तरवारींस व भाल्यांस विसांवा नव्हता व घोड्यांस व शूरांस किंचितहि दम घेण्यापुरती फुरसत नव्हती. असेंच शेवटचे दोन कारकीर्दीत दंगा व धांदल व नाना प्रकारचे फंदाफितुराचे प्रसंग लागोपाठ प्राप्त झाले होते, या प्रकारें कीं सुखाचे म्हणोन नांवच नाहीसें झालें. जें कांहीं सुख, स्वस्थपणा, राजधानीचा उत्तमपणा, विश्रांती, आनंद व संतोष होता तो याच सदरी लिहिलेले दोन पादशाहांचे कारकीर्दीतील ऐंशी वर्षांत होता.

## ४७. सुलतान महंमद आदिलशाहा पादशाहा याणी मरण पावणेंचे प्रकर्णी वर्णन :

सुलतान महंमद पादशाहा नववे तासीं तारीख सविसावी (मोहरम) सन १०६७ (४ नवंबर १६५६ इ. स.) साली[३७] पृथ्वी रक्षण करण्याचे राजधानीचे निमग्नतेपासून म्हणजे राज्यकारभार सर्व काल गुंतून होता त्या कर्मापासून मोकळा होऊन, म्हणजे या लोकींचे राज्य परित्याग करून, शास्वतीचे वाड्यांत व ईश्वराचे संनिधानाचे महालांत निघोन गेला, म्हणजे मरण पावला. सुलतान महंमद पादशाहा याणी जिवंतपणीं खुद जातीनें गुंबुज, म्हणजे गुमट, बांधिला. त्या गुमटांत विश्रांति पावता झाला, म्हणजे सुलतान महंमद पादशाहाचें प्रेत त्याणी बांधलेले गुमटांतच दफन केलें, म्हणजे पुरलें. त्यावर ईश्वराची कृपा असो.

## ४८. सुलतान महंमद आदिलशाहा पादशाहा याणी जिवंतपणीं गुंबुज म्हणजे गुमट बांधिला त्या प्रकर्णी वर्णन :

तो गुमट अशा प्रकारचा आहे कीं, आकाशाप्रमाणें उंच, कालचक्राचे पदवीचा आहे, म्हणजे अति उंच बांधनावलीचा आहे. त्या गुमटाची इमारत व डौल फार नादर म्हणजे अति उत्तम आहे. कारण कीं, दक्षण देशाचे तुकडींत अति उत्तम आहे, कीं त्या गुमटाप्रमाणें हिंदुस्थानचे मुलकांत देखिल नाहीं. बहुधा पृथ्वींत फिरणारे प्रवास करणारे व जगांत फिरणारे लोक पृथ्वींतील चहूंकडील मुलकांतून येतात आणि ते लोक जेव्हां तो गुमट पहातात तेव्हां या गुमटाचे उंचपणांत व उत्तम प्रकारचे डौलांत व फार चमत्कारिक बांधनावलींत अति संतोष पावतात. फार आश्चर्य मानून या पृथ्वींत असा गुमट कोठेंच बांधता नाहीं असें बोलतात. या गुमटाची उंची व

थोरी व कारागिरी व डौल अशा प्रकारचा उत्तम आहे कीं, पहाणारांस या गुमटाचे पहाण्यानें फारच आश्चर्य वाटतें. हा गुमट पहाणारा पुरुष जेव्हां या गुमटाचे आंत येतो तेव्हां आश्चर्यावर आश्चर्य अधिकअधिकच वाढतें. हरएक मूल किंवा तरूण पुरुष किंवा वृध्द म्हणजे म्हातारा पुरुष या गुमटांत शब्द येऊन करितो, म्हणजे पुकारतो, तेव्हां या गुमटांत त्याच तऱ्हेचा प्रतिध्वनी, म्हणजे तसाच परत आवाज, तो पुरुष श्रवण करितो. हरएक पुरुष या गुमटांत येऊन मुखानें जो शब्द बोलेल त्याच तऱ्हेची अक्षरें या गुमटांतून परत उठतात. जर करितां कोणतेहि खोल विहिरींत किंवा तलावांत पुकारिलें असतां तसाच परत आवाज उठतो परंतु या गुमटांत मनुष्याचे पुकारण्याचीं अक्षरें असतील त्याचप्रमाणें साफ अक्षरें उच्चार होऊन दर आवाज अति चमत्कारिक उठतो. तो परत आवाज ऐकणारांस फारच आश्चर्य वाटतें. त्या गुमटाचे दरवाजावर एक धोंडा लोखडाचे साखळींत बांधून लोंबविला आहे. त्या धोंड्यास विजेचा धोंडा असें म्हणतात. तो धोंडा सर्वांस प्रसिद्ध आहे. त्या धोंड्याचा गुण हा आहे कीं, विजेचे उपद्रवापासून इमारतीचे संरक्षण व्हावें हा त्या धोंड्याचे जातींतील गुण व तो धोंडा या उंच इमारतीवर बांधण्याचें कारण हेंच आहे.

## ४९. सुलतान महंमद आदिलशाहा पादशाहाचे मरणाची तारिख :

सुलतान महंमद आदिलशाहा मरण पावले तेव्हां त्यांचे वय सत्तेचाळीस वर्षांचे होतें. त्याणी एकतीस वर्षे राज्य केलें. ते पादशाहा मरण पावले त्याची तारीख 'आलाबते महंमद महमुद पुद' याचा अर्थ हा आहे कीं, सुलतान महंमद पादशाहाचा परिणाम उत्तम प्रकारचा व स्तव केलेला झाला. 'आलाबते महंमद महमुद पुद' इतकीं अक्षरें अबजदचे हिशेबानीं गणिलीं असतां सन १०६७ (१६५६ इ. स.) निघतो. म्हणजे या सालीं सुलतान महंमद पादशाहा मरण पावला.[३७] इब्राहिमखान आसदखान यांणीं तारिख वर्णिली आहे. पारसी बैतेचा अर्थ : "ईश्वराचा स्तव असो. सुलतान महंमद पादशाहास ईश्वरानीं शाश्वतपणाचा स्वर्गवास दिल्हा व महमदशाहा शआलह्मदोलिल्लाह नइके जावे दानी दादअल्लाह" इतकीं अक्षरें अबजदचे हिशेबानीं गणिलीं असतां एक हजार अडसष्ट सन निघतो.

३७. "Md. Adilshah died on Tuesday, 26th Muharram 1067 (4th Nov. 1656)"— Tarikh-i-Ali Adilshahi. "मार्गसीर्ष शके १५७८ सुलतान महमद इदिलशाहा मृत्यु पावले." –जेशक. पृ. १८. शिवाशका. पृ. ५५. शिचप्र. (परंतु मृत्युतिथि कार्तिक वद्य १३ मंगळवार आहे.).

तारिख बांधण्याकरितां बैत फार चांगली केली. एक हजार सदुसष्ट सन निघावा तो कविता करून तारिख बांधण्याचे खुबीनें एक हजार आडसष्ट सन निघतो. एक वर्षाचा फेर पडतो. ही केवळ मोटीशी चुकी आहे असें नाहीं.

५०. एकंदर तारिखवार झाडा असे :

सुलतान महंमद पादशाहाचे कारकीर्दींत दौलतखान म्हणोन होता, कीं त्याजला पुढें खवासखान असें पद प्राप्त झालें. त्या खवासखान यांणी सन १०३६ ( १६२६–१६२७ इ. स. ) दौलतपूर म्हणोन गाव वसविला. तो गांव रसुलपूर या नामेंकरून प्रसिध्ध आहे. सन १०३७ ( १६२७–१६२८ इ. स. ) सालीं परांड्याचा किल्ला आका रीजवान याचे हातून आदिलशाहाचे हातीं आला. त्याच सालीं मुरारी पंडित याणी सुलतान महंमद पादशाहाचे आज्ञेवरून मुलुकमैदान ही तोफ परांड्याचे किल्यावरून विजापुरास आणिलीं.[१६] सन १०४२ ( १६३२–१६३३ इ. स. ) सालीं मुरारी पंडित याणी गोगीमध्यें चौखंडी बांधली. सन १०४५ ( १६३५–१६३६ इ. स. ) सालीं मिया नवाब मुस्तफाखान व खवासखान या उभयतांत विरूध्ध येऊन एकमेकांत लढाई झाली. याच युध्धांत शाहा बुरहान याचा बाप शाहा मुर्तझा हा शाहा हषम याचा वडील पुत्र हे नवाब याचे बाजूस बसले होते. त्या शाहा मुर्तजाचे कुशीवर एक तीर येऊन लागला. त्या तीरानीं शाहा मुर्तजास जखमी केलें. ती जखम त्याचे मरणास कारण झाली, म्हणजे या जखमेनेंच शाहा मुर्तजा मरण पावले. याच सालीं खवासखान यांणी नाना प्रकारचे बाहान्यानीं नवाब मुस्तफाखान यास पकडून कैद केलें. याच सालीं खवासखान ठार झाला. नवाब मुस्तफाखान कैदेंतून सुटले शहाजहान पादशाहा आगऱ्याहून दौलताबादेस आले. शहाजहान पादशाहा व सुलतान महंमद आदिलशाहा या उभयतांत सख्य[२८] झालें. सन १०४७ ( १६३७–१६३८ इ. स. ) सालीं शाहाजादा अली अदिलशाहा जन्मास आला. सन १०४८ ( १६३८–१६३९ इ. स. ) सालीं बिंगलुर व सेरा या दोन फत्ते. सन १०४५ ( १६३५–१६३६ इ. स. ) सालीं रणदुल्लाखान याचे यत्नानें शिवापटणची[३२] फत्ते झाली. हीच तारीख निघण्याकरितां मी अर्धी बैत लिहिली आहे त्या बैतेचा अर्थ : " ईश्वराचे कृपेकरून रणदुल्लाखान फत्ते करित आहे " असा अर्थ होतो. 'रणदुल्लाखान फत्तह जलुत फदयान' इतकीं अक्षरें अबजदचे हिशेबानीं गणिलीं असतां तारिख १०४९ (१६३९–१६४० इ. स.) निघती, म्हणजे या सालीं सिवापटणची फत्ते झाली. सन १०५६ ( १६४६ इ. स. ) सालीं गगनमहाल आग लागोन जळाला. याच सालीं सुलतान महंमद आदिलशाहा याणी मोठी हवेली बांधून त्या हवेलींतील महासारयांत

सोनेरी काम केलें आहे. हली त्या महालांत सय्यद महंमद मुस्तफा वसल्लिल्लाह वसल्लम या पैगंबराचे केश डब्यांत झाकलेले व त्या केशाचे पवित्र चालीचे मुसलमान लोक दर्शन घेतात. सन १०५८ (१६४८ इ. स.) सालीं मोहरम (जानेवारी–फेब्रुवारी) महिन्यांत शहानवाजखान मरण पावला. याच सालाचे रजेब (जुलै–आगष्ट) महिन्यांत शाहाजीराजे भोसले यांजला कैद केलें.[३५] सालचे जिल्काद (७ दिसेंबर १६४८) महिन्यांत मुस्तफाखान मरण पावले. याच सालीं जिल्हेज (१० दिसेंबर १६४८) महिन्यांत चंदी येथील फत्ते झाली. सन १०६१ (१६५०–१६५१ इ. स.) सालीं शहाजहान पादशाहा यांजकडून सुलतान महंमद आदिलशाहास पादशाहा असें पद देऊन आज्ञापत्र आलें. सन १०६३ (१६५२–१६५३ इ. स.) सालीं खान महंमद याचे योगानें पिलगुंड्याची फत्ते झाली. सन १०६४ (१६५३–१६५४ इ. स.) सालीं अफजल आडाचें पाणी अफजलखान याचे योगानें बेगमचे तलावांतून किल्याचे आंत आलें. याच सालीं मोठा भूमिकंप झाला. याच सालीं येलूरची फत्ते झाली.

## ५१. लष्करची संख्या :

स्वार ऐंशी हजार व शिबंदी दोन लक्ष पन्नास हजार व हत्ती पाचशें तीस होते.

## ५२. विजापूर येथील कैफियतीचे किंचित वर्णन प्रकर्ण :

पूर्वी विजापूर हा कानडा मुलुक आहे. या मुलकास कानडा मुलुक असें म्हणतात. या सरहदींतील मनुष्यें पूर्ण शूर व मोठे पराक्रमी जन्मतात. या विषईचा मजकूर विजापूरचे तर्फेतील चोहोंकडे गावोंगावीं पराक्रम प्रसिद्ध आहे. हा मुलुक बहुत विस्तीर्ण आहे. फार थोर व बहुत वसुलाचा विजापूरचे उतरेचे बाजूचा मुलुक बेदनूरपर्यंत व विजापूरचे पूर्वेचे बाजूस हैदराबादचे अरण्यापर्यंत व खारे समुद्रापर्यंत सरहद मिळाली आहे. विजापूरचे दक्षिणेचे बाजूसही फारच लांब आहे व खारे समुद्रापर्यंत सरहद मिळाली आहे. विजापूरचे पश्चिमेचे बाजूसही खारे समुद्रापर्यंत सरहद मिळाली आहे. असें म्हणतात कीं, नव खंड पृथ्वींतील संपूर्ण मुलकांत व हिंदुस्थानचे मुलकांत हा मुलुक बहुत वसुलाचा व फार थोर आहे. या प्रमाणें दुसरा मुलुक नाहीं. हिंदुस्थानचे सर्व मुलकांत हा दक्षिण देशाचा तुकडा बहुत वसुलाचा आहे हें प्रसिध्ध आहे. दक्षिण देशचे इलाक्यांत कर्नाटकचा मुलुक बहुत वसुलाचा

व बहुत द्रव्याचा श्रेष्ठ आहे. असा दुसरा मुलुक नाहीं हेंही सर्वांस प्रसिध्ध आहे. विजयानगर येथील मुलकांतील वसूल वीस कोटी होन येत होता. त्याशिवायहि दुसरे कित्येक जे दक्षिण देशांत मुलुक हस्तगत करून आम्ही राजेच आहों असे म्हणवीत होते व पूर्वी या मुलकांत होन व मोहरा पुरता बावणन् या नावाचे शिक्के चालू होते. आलमगीर पादशाहा आल्यापासून रुपयाची चाल चालू झाली. आदिलशाही राजधानीचा प्रारंभ पुरुष युसफ बेग सावी. याणी आर्क किल्ला बांधून तेथें आपले तख्तास जागा केली. त्यानंतर युसफ बेग सावी याचा नातू इब्राहिम आदिलशाहा बिन इस्माइल आदिलशाहा याणी तो किल्ला नवीन बांधून त्या किल्यास दोन कोट एकापाठीमागे एक असे फार मजबूत बांधिले. यानंतर इबराहिम आदिलशाहाचा पुत्र अली आदिलशाहा याणी शहराभोंवता कोट बांधिला. विजापूरचा तालुका अठरा सरकार व दोनशेंयेकेऐंशीं महालांचा होता. त्यास परगणे असें म्हणतात. विजापूर सुभ्याची एकंदर कमाल जमा आसफजाही दफ्तराचे लिहिण्यांत सात कोटी चौरेऐंशीं लक्ष एकसष्ट हजार सातशें सत्तर रुपये दीड आणा होती. हा जाबता कमाल बेरिजेचा अलमगीर पादशाहाचे कारकीर्दीतील आहे.

५३. सदरी अठरा सरकार व दोनशें येकेंऐशीं महाल वर्णिले आहेत. त्याशिवाय बहुत मुलुक व बहुत बंदरें विजापूरचे तालुक्यांत मिळालीं आहेत :

त्या सर्व बंदरांपैकी एकंदर बंदरांचा वसूल येत होता तो तपशीलवार झाडा : बंदर दाभोळ व् विसेवी या बंदराचा वसूल ७००० सात हजारावर कांहीं अधिक होता. बंदर खलेहाटी ७००८. बंदर चेवले (चौल) १५०००. बंदर संकर १००००. बंदर गोवें कांहीं दिवसानंतर फिरंग्याचे हातीं गेले ३७५००. इसलाम बंदर उर्फ राजापूर बंदर साष्टी १००००, बंदर खारीपाटण २४०००. बंदर हुरचिरी ५०००. बंदर सातोली ३५००. बंदर महंमदाबाद उर्फ सिधोंन ५०००. बंदर खेडा ५०००. येणेंप्रमाणें सदरहु बंदराचा वसूल येत होता.

५४. कर्नाटक येथून नजरेचा ऐवज येत होता त्याचा तपशीलवार झाडा :

जमा सदरहु जमेशिवाय आहे. ही एकंदर जमा ५२५६१६४९ पांच कोटी पंचवीस लक्ष एकसष्ट हजार सातशें एकूणपन्नास रुपयाचा तपशील : जमेदार श्रीरंग-

पटण ३५८५१३६१॥। खेरीज जमेदार तालुके मजकूर १०२६३६३५॥=. जमेदार संध्या ७२०८७१. जमेदार दुर्ग ११२५०००. जमेदार जरीमुल्ला ९३७५०. जमेदार तेरीखंडा १७२५००. जमेदार रतनगिरी ९३७५७. जमेदार सरहाटी ७५०००. जमेदार पावागड १२३७५०. जमेदार मांगपाला १५०००. जमेदारी जगपाला १९२५००. जमेदार कोटीखडा ७५०००. जमेदार मनोरी ५६४०. जमेदार कलवाडी ३७५००. खेरीज जमेदार ९३०००. जमेदार हानहाली १०२९०६०. जमेदार अनागोंदी १७३५५०. जमेदार लोकोरी २२५०००. जमेदार गंगागिरी ९९११६५. जमेदार बळारी ८६२५०. जमेदार कोरीकोटा १८७५००. जमेदार सब्बरगड ३७५००.

**५५. सुलतान महंमद आदिलशाहा इनसाफ करणार याणी राजधानीचे वागणुकीची कित्येक कलमें ठरऊन आपले कारकीर्दीत दस्तुरुल अमल म्हणोन हुकूम जाहालेला आहे तो दस्तुरुल अमल ह्या इनसाफ करणार पादशाहाचे, म्हणजे सुलतान महंमद आदिलशाहाचे, वर्णनाखालीं लिहावा असें योग्य जाणून लिहिला जात आहे :**

१. पादशाहामध्यें हें लक्षण असलेंच पाहिजे कीं, पादशाहानीं इनसाफ करणें हाच आपला अलंकार भूषण असें जाणोन सर्व हिंमत न्याय करण्यांत खर्च करावी. कारण कीं, असें सांगितलें आहे कीं, पारसी बैतेचा अर्थ : "संपूर्ण आयुष्यांत एक घटका न्याय करावा. हें पादशाहास शंभर १०० वर्षे वैराग्य धारण करून ईश्वरी सेवा करण्यापेक्षां अधिक आहे." यांतील भावार्थ हा आहे कीं, एक घटका न्याय करणें हे शंभर वर्षांचें तपश्चर्येहून अधिक आहे. पादशाहानीं खुद जातीनें मुल्काची मामुरी व रयतेची आबादानी ठेऊन न्याय करण्यांत किंचितहि अंतर पडूं देऊं नये. कारण कीं, मुल्काची आबादानी ठेवणें हें राजधानीचे बंदोबस्ताचे व खजिन्याचे आबादानीचें कारण आहे. पारसी बैतेचा अर्थ : "रयत झाडाचे मुळाप्रमाणें आहे व पादशाहा वृक्षाप्रमाणें आहे. हे मुळा, वृक्ष मुळाचे आधारानें बळकट असतो." पादशाहा यांणी शक्ति आहे तोंपर्यंत फौज जमा करणेंविषयीं यत्न करावा. शिपाई चाकरीस ठेवणें तो शिपाई लढाई करणारा शूर व यशस्वी व नामांकित पाहून चाकरीस ठेवावा. वजीर चाकरीस ठेवणें तो वजीर अकलवान व उत्तम प्रकारचा विचारवान मसलतगार व निमकहलाल, म्हणजे इमानी, व स्वामीसेवेविषयीं सर्व काळ विचार करणारा असा परिक्षा करून त्याजला वजिराची काम देऊन, जी मसलत व जो प्रसंग प्राप्त होईल त्या प्रसंगात, त्या वजिराची सला घेण्यांत, शिपायांचे वर्तमानाची खबर घेण्यांत, तुमचे कसें आहे असें त्या शिपायांस

विचारण्यांत, शिपाई लोकांस जे जे पदार्थ सामान सरंजाम वगैरे पाहिजेत असें असेल त्या विषयीं बंदोबस्त ठेवण्यांत व तयारी राखण्यांत बहुत बहुतच प्रयत्न करावा. पारसी बैतेचा अर्थ : " त्यांतच कल्याण व तेंच बरें आहे कीं, शिपाईलोकांस जिवाबराबर संभाळावें. कारण कीं, पादशाहा लष्कराचे योगानें व फौजेचे बळानें पादशाहात करितो." लष्करचे जमातीचा भरोंसा दोन प्रकारांवर कायम ठेवावा. प्रथम प्रकार हा कीं, वजीर व अमीर सदरी लिहिलेप्रमाणें परिक्षा करून जमवावे. दुसरा प्रकार हा कीं, सरलष्कर व सेनापती करावे. कारण कीं, वजीर व अमीर या उभयता नांवाचें पदअधिकारांत फार मंडळी जमत नाहीं. सरलष्कर सेनाखासखेल या नांवाचे इसमांत हरकोणीहि जमतो.

२. राजधानीचा बंदोबस्त, किल्याचा व मुलकाचा बंदोबस्त व लष्कराची तयारी झाली म्हणजे नंतर शत्रूचे पारपत्य करण्याची हिंमत धरावी.

३. प्रथम जे बेमान जमेदार लोक, कीं ज्या जमेदार लोकांनीं आज्ञापालन करण्याचे मार्गापासून मस्तक फिरऊन, म्हणजे आज्ञाभंग करून, आपणापाशीं बहुत लष्करचे बळ आहे व संनिध राहणारे लोक असोन जे धण्यासी बदलून पादशाहाची आज्ञा मान्य करित नाहींत त्या विषयीं बहुत चमत्कारिक युक्ति काढून त्या एकंदर सर्व बेमान मंडळींस एकदांच धरून मुळापासून उपटून निर्मुळ फडशा करावा. जर करितां कोणी सरकारांत रूजू होईल व पुढेंहि उत्तम स्थितीनें राहील असें वाटेल त्याजला जमेदाराप्रमाणें सेवकपणाचें काम देऊन आज्ञेंत ठेवावें.

४. धण्यासी बदलणारे बेमान लोकांचे बेमानपणाचे मळापासून आपले सरहद्दीं-तील मुलुक स्वच्छ व निर्मळ झाला असे दिसेल तेव्हां, म्हणजे आपले मुलकांत कोणी फंदफितुरी करणारे लोक नाहींसे झाले म्हणजे, आपले मुलकाचे तर्फेतर्फेस आसपास जो शत्रु किंवा बेमान असेल त्याचे पारपत्यावर चालून जावयास आरंभ करावा. माजुरी लोकांचें पारपत्य करून मुलुक घेत जावा. मुलुक हस्तगत करणें हेंच पादशाहाचें कर्म आहे.

५. जो मुलुक हस्तगत केला जाईल त्या मुलकांतील शिपाई व सरदार लोक कशा चालीचे आहेत हें बोळखावे ते सर्व लोक आपलेसें करून घेऊन ज्यास जसें ठेविलें पाहिजे त्या मनुष्यास तसें ठेवावें. त्याजला पगार किंवा जागीर देणें तें दुसरे ठिकाणीं ठेऊन पावते करून त्यापैकीं त्या मुलकांतील एकहि सरदार किंवा कारभारी वगैरे श्रेष्ठ लोकांस परागंदा होऊं देऊं नये. बेकार व बेरोजगारीहि राखूं नये. कारण कीं, मुलकांत फंदफितुरी होण्याचें कारण हें यांतच आहे.

६. रयतेस पूर्ण सुखी ठेऊन बहुत कृपेनीं व दयाळुपणानीं पालण करावें.

७. आपले सर्व मुलुकांतील एकंदर कारखान्यांत मुसलमान जातीचे मामलेदार व हिंदु जातीचे कारकून ठेवावे. ब्राम्हण लोकांस व हिंदूस हुकमी काम देऊं नये. कारण कीं, पृथ्वीची व धर्माचाराची खराबी यांतच आहे.

८ मुलुकाचे वारिसदारांपैकीं कोणासच त्या मुलुकांत ठेऊं नये. दुसरे ठिकाणीं ठेऊन उत्तम प्रकारें रोजमुरा देऊन व बहुत संरक्षण करून अशा प्रकारें त्याचा समाचार घेत जावा कीं, त्या लोकांस पूर्वी कसें होतों त्या पूर्वस्थितीचें व आपला पहिला मुलुक किती होता त्या पहिले मुलकाचें स्मरण चिंतेचे मार्गानें त्याचे अंतः-करणांत न येईल अशा प्रकारें त्याचें पालन करावें.

९. हापसी जातीचे व तुर्की जातीचे बहुत चाकर लोक ठेऊन त्याचे जमावा-विषयीं व तयारी व योग्यतेविषयी बहुत यत्न करून हरएक चाकराची अकल, योग्यता व सहनशीलता वोळखून त्या प्रमाणें त्याजला हुजूर कामें नेमावीं.

१०. सर्व कामांत लबाड बोलणारे, बदचालीनें चालणारे, धन्यासी बदलणारे, बेमान व खोटेपणा पसंत करणारे, वाकडे स्वभावाचे प्रकृतीचे लोक व गर्विष्ठ व चोर व फंदफितुर करणारे लोकांपासून दूर रहावें. या लोकांस कदापि आश्रय देऊं नये. बदचालीचे लोकांस व फंदफितुर करणारांस कदापि सरकारवाड्यांत येऊं देऊं नये. सरकारी कामकाजांत या लोकांचा किंचितहि प्रवेश होऊं देऊं नये.

११. जो कोणी पुरुष द्रव्यवानास धरून देतो व त्याजवळचें द्रव्य मी आणोन देतों असें म्हणोन पतकर घेईल त्या पुरुषास बहुत धिःकार करून दरबारांतून हांकून द्यावें म्हणजे येणेंकरून फंदफितुर वगैरे संकट नाहीसें होऊन इनसाफाचे व रयत पालन करण्याचे कीर्तीस कारण होईल.

१२. चाहाड चुगल मनुष्याचे बोलण्यावरून मजकुराची शाबिती न होईल तो पर्यंत क्रोधायमान होऊं नये. तें भाषण सत्य मानूं नये. जर करितां त्याचे बोलण्या-प्रमाणें शाबिती झाल्यास कुरान षरीफमध्यें शास्त्रार्थ सांगितला आहे त्याप्रमाणें अंमल करून त्याचे मालमता वगैरे चीजवस्तेकडे आशेचे नेत्रानें पाहूं नये, म्हणजे त्याचें द्रव्य हरण करुं नये.

१३. वादी प्रतिवादीची वाजवी चौकशी करून जर करितां वादी खोटा झाल्यास प्रतिवादीस बहुत दिलभरोंसा द्यावा आणि वादीस दरबारांत शिक्षा देऊन बहुत बेआबरू करून बाहेर हांकून द्यावा. अशा प्रकारचा बेआब्रू करून घालऊन द्यावा, कीं पुन्हां या प्रकारचे अयोग्य कर्माचा कर्ता न होय.

१४. असें केलें पाहिजे कीं, किल्यांत व कोटांत पुरातन चाकर नेकचालीचे व योग्य सेवक जमात पालन केले गेलेले किल्याचे व कोटाचे बंदोबस्ताचे कामावर

नेमून हरएक किल्यांत व कोटांत तीन तीन कामदारांपरते ठेऊं नये. एक किलेदार व दुसरा हशमाकडील कामदार व तिसरा अमीन गुप्त बातमी लिहिणार. या तिघांहून अधिक मुख्य कामदार ठेऊं नयेत. कांहीं दिवस गुजरल्यानंतर त्या कामदारांस दुसरे ठिकाणीं व दुसरेकडील कामदारांस त्यांचे ठिकाणीं नेमावें, म्हणजे कांहीं दिवसानंतर बदली करित जावी. ज्या किल्याचे व कोटाचे ताब्यांत अमलासुध्दां मुलुक बहुत असेल तेथें मामलेदार नेमून त्याचे मारफतीनें सर्व मुलकाची कमाविशीची वहिवाट ठेवावी.

१५. काजी, खतीब व शास्त्रार्थाचे हुकूम करणारे शहराप्रमाणें नेमून कुरान षरिफचा शास्त्रार्थ प्रगट कण्यांत, पवित्र धर्माचाराचे ध्वज उंच उभे करण्यांत, न्याय व इनसाफ करण्याच्या चाली जिवंत करण्यांत जुलुम व जबरदस्तीचे कायद्याची हुशारी ठेवण्यांत, शास्त्रार्थ विचारावयास येतील त्यांस शास्त्रार्थ सांगण्यांत व ज्यावर जुलुम झाला असेल व त्या जुलुम झालेले व ज्याची कोठेच दाद लागेना असे निरोपाय झालेले मनुष्याची फिर्याद ऐकून घेऊन बंदोबस्त करण्यांत यत्न करून कुरान षरिफमध्यें शास्त्रार्थ सांगितला आहे त्याप्रमाणें शास्त्रार्थाचे हुकूम चालू करावे.

१६. हरएक जागा किंवा कोणतेंहि स्थान, कीं ज्याचे ताब्यांत बहुत मुलुक होईल त्या जाग्यास, अलाहिदा सुभा मुकर करावा. लहान लहान परगणे व गांव खेडीं वगैरे त्या सुभ्याचे ताब्यांत असतील तीं खासखेल वगैरेंस जागिरींत द्यावीं. कसब्यांत थोर थोर गांव व मोठमोठ्या जागा नामांकित असतील त्या व थोर गांव किल्याकडे पाहिजे असतील ते अलाहिदा ठेऊन बाकी लहान लहान गांव जागीरदारांस व इनामदारांस द्यावे.

१७. जागिरदाराशिवाय जें द्रव्य वसूल येईल तो ऐवज सरकारी खजिन्याकडील आहे. सरकार तो ऐवज हुजूर आणवित नाहींत तों पर्यंत महालाकडे जमेस असावा.

१८. याच प्रकारचे जाग्यांत खुर्द्यांची व रुपयाची टांकसाळ करावी. ताकिद करावी कीं, रुपये व खुर्दा वजनांत, गोलदारपणाचे घेऱ्यांत व परिक्षेंत राजधानींतील, म्हणजे विजापुरांतील, खुर्द्याप्रमाणें व रुपयाप्रमाणें असावा. त्यांत एक गुंजेइतकी तफावत नसावी.

१९. वाण्याची वजन करण्याचीं वजनें व धान्य मोजण्याचीं मापें राजधानींतील, म्हणजे विजापूर येथील, वजनांप्रमाणें व मापाप्रमाणें असावीं. जर करितां त्या मुलकांतील मापें अडीसरी वगैरे त्या मुलकाचे चालीप्रमाणें असल्यास असों द्यावीं. चालती वहिवाट असेल ती चालू ठेवावी. परंतु एका अमलांत एक प्रकारची नवी

वजनें व मापें व दुसरे अमलांत दुसंर प्रकारचीं वजनें व मापें कोणतेच जागीं वहिवाट ठेऊं नये.

२०. अशी ताकिद करावी कीं, दर शुक्रवारीं काजी व शास्त्रार्थांची आज्ञा करणारे धर्मशास्त्री व सर्व मुसलमान लोक ह्याणी विला जागा म्हणजे खाडा पडूं न देतां जुमा मसिदींत हजर होऊन शुक्रवारची निमाज व खुतबा पढावा. सदरहुप्रमाणें जो मुसलमान हजर न होईल त्याजला काजीचे व धर्मशास्त्रांतील शास्त्रार्थ सांगणाराचे हुकूमाप्रमाणें त्याजला ताकिद करण्याविषयीं यत्न करावा.

२१. मुसलमानांस व मुसलमानांचे कायद्यास अशा प्रकारें मजबूत ठेवावें कीं, कोणतेच अधर्मी पुरुषास म्हणजे कोणताहि हिंदु प्रबळ असला तत्रापि त्या हिंदूस एखादा गरीब मुसलमान असल्यास तत्रापि त्या मुसलमानासी बराबरी करण्याचे सामर्थ्य नसावें. असा मुसलमानी धर्म प्रबळ ठेवावा.

२२. कदाचित एखादें मुसलमानानी हिंदूंची खराबी करण्याकरितां गैर समजून हिंदूस घालऊन देणेचा इरादा करील तर, किंवा हिंदु नको असा मुसलमान इरादा करूं लागल्यास, त्या मुसलमानास युक्तीनें ताकिद करावी. तूर्त या वेळेसच असें करूं नको. पुढें पाहून घेतां येईल. तूर्त समय टाळावा. असा त्या मुसलमानास बोध करावा. परंतु हिंदूचे संरक्षण करण्याविषयीं हिंदुचा पक्ष धरून मुसलमानास उपद्रव करूं नये. मुसलमानास दुःख देऊं नये. होळी व दिवाळी व दसरा वगैरे हिंदूचे सण येतात व ते सण हिंदु लोक उघडपणानें करितात. ते सण उघडपणें करणें विषयीं मनाई करून ते सण हिंदु लोक गुप्तपणें करूं लागल्यास त्याजला मनाई करूं नये. असेंच वाक्यांतहि सांगितलें आहे कीं, ' माहे तसबा ' म्हणजे रमजान परिफाचे महिन्यांत बाजारांत व रस्त्यावर कोणी कांहीं भक्षण करण्याचे पदार्थ फळफळावळ वगैरे विकावयास मांडल्यास त्या विकणारापासून दंड घेण्याकरितां धर्मशास्त्र जाणणारा मुसलमानाचा धर्मशास्त्री चौकशी करण्याकरितां फिरत असतो व तो धर्मशास्त्र जाणणारा त्या दुकान मांडून बसणारास ताकिद करितो कीं, प्रत्यक्ष त्या महिन्यांत रमजानचे रोजे, म्हणजे उपोषणाचे दिवस, असोन तूं भक्षण करण्याचे पदार्थ विकरी करण्याचें कारण काय ? अशी ताकीद करून त्याजपासून दंड घेतो त्यास ' माहे तसबा ' असें म्हणतात. त्या ' माहे तसबा ' स म्हणजे धर्मशास्त्र जाणणारास लोकांचे घरांत काय होत आहे या विषईचे काय कारण आहे ? यांतील भाव हा आहे कीं, हिंदु लोकांनीं आपआपले घरांत पाहिजे तें केलें तत्रापि त्याजला मनाई करूं नये. परंतु उघडपणें करूं लागल्यास मनाई करावी.

२३. जुमा मसिदींत, ईश्वराचे पैगंबराचे आसार महालांत, पादशाहाचे वगैरे राज्यांत, औलिया म्हणजे श्रेष्ठ सिध्ध पुरुषाचे वगैरे राज्यांत व दुसरे कित्येक मसि-

दींत अन्नसत्राची चाल पूर्वापार असेल व इनाम जमिनी व सदरहुकडे रोजमुरे वगैरे नेमणुकी नेमून दिल्ह्या असतील त्या नेमणुकी वगैरे चालू ठेऊन सदर खर्चांचे दुमाला करावे. ते चालविण्याप्रकर्णी बहुत यत्न ठेवावा. हरघटकेस त्यांचा समाचार घेऊन या प्रकारें ताकिद करावी कीं, अन्न व उदक वगैरेविषयीं अन्नसत्रांत बंदोबस्त ठेऊन ईश्वरास भजणारे मुसलमान जातीचे साधु व फकीर वगैरेस अन्न पोहचत जावें. त्या अन्नोदकांत कोणी हात घालून चबढब करूं नये. त्या अन्नास कुतऱ्याचे व मांजराचे मुख लागों नये. असें नीट बंदोबस्तानें ठेवावें. फकीर लोक व मुसलमानजातीचे याचना करणारे व औलियास अन्न व उदक हिसेरसिदीनें वाटून देत जावें. त्यापैकीं एक दाणा देखिल बेज्या म्हणजे व्यर्थ खर्च होऊं देऊं नये.

२४. आसार परिफचे महालांत दोन लिहिण्याच्या विद्याशाळा मुकरार करून हादीस म्हणजे पैगंबरानीं सांगितलेले वाक्याचे ग्रंथाचा फीह म्हणजे ........... चे विद्येचा व कुरान परिफाचा पाठ देणें चालू करावें. विद्या शिकणारे मुलांस आसार महालाचे विद्याशाळेंत खाण्यापिण्याची मदत ठेवावी.

२५. जुमा मसिदींत मुलास धुळअक्षर वगैरे शिकविण्याचे विद्येचे शाळेवर दोन पंतोजी व आरबी विद्या व मुसलमान धर्माचा कुरान परिफ व मजानी व मंतिक वगैरे विद्या शिकविण्याचे शाळेवर दोन ओस्ताद व पारसी विद्या शिकविण्याचे शाळेवर एक ओस्ताद नेमून देऊन विद्याभ्यास करवावा. विद्या शिकणारे मुलांपैकीं जो कोणी नादार असेल, म्हणजे ज्यास खाण्यापिण्याची सोय नसेल, त्यास अन्नोदकाची नेमणूक करून देऊन त्या प्रमाणें त्या मुलास पावते किंवा नाहीं येविषयींची खबर घेत जावी. शाळा चालवणेंविषयीं व अन्नछत्रें चालविण्याविषयीं बहुत यत्न करून हीं दोन कामें कदापि बंद होऊं देऊं नयेत.

२६. विजापूर येथील मसिदींकडे पुरातन सनदेबरहुकूम इनाम जमिनी व रोजमुरे वगैरे दुमाले करून मसिदीची बहुत बंदोबस्ती व तयारी राखणेंविषयीं ताकिद करावी.

२७. ज्या मसिदींकडे दीपास तेलाची नेमणूक नसेल त्या मसिदीकडे पावशेर तेल व चार छगाण्या म्हणजे पैयाच्या सहा छगाण्या अंतर न पडूं देतां देवीत जावें.

२८. शंभर मसिदींवर एक दरोगा म्हणजे मुख्य कामगार नेमून पाणी व आंथरण्यास बोरा व केर काढण्यास झाडणीचा बंदोबस्त ठेवावा.

२९. शहरांत ताकिद करावी कीं, पादशाहाचे आज्ञेशिवाय कोणते जागीं व कोठेंच कोणीहि मसीद बांधू नये. कारण कीं, परलोकी पुण्यप्राप्तीकरितां मसीदी बांधितात व त्या मसिदींचा बंदोबस्त व उस्तवारी न ठेवण्यानें मसीद बांधण्याचें

पुण्याहून पाप अधिक प्राप्त होतें. जर करितां पुण्यप्राप्तीवरच नजर आहे तर ज्यास पुण्य करणें असेल त्यांणीं धर्मशाळा, पूल, विहीर व हाऊद पाहिजे त्या ठिकाणीं निर्भयपणें बांधावें.

३०. ज्यास ज्या ठिकाणीं मसिदीचें काम नवीन इमारत करणें जरुरच असेल त्यांणीं त्या ठिकाणीं पादशाहास खबर देऊन मसीद बांधून त्या मसीदीचे इमारतीकडे सुलतान महंमद पादशाही सरकारांतून नेमणूक व रोजमुरा वगैरे प्राप्त करून घ्यावा. शहरपन्हाकडील बंदोबस्ताकडील कामदार याणी या कामांत खबरदार राहून, म्हणजे वरच्येवर समाचार घेत जाऊन, एकंदर मसीदीचे चाकरींत व बंदोबस्तांत अंतर करूं नये.

३१. रमजान मुबारकचे महिन्यांत एकंदर मसीदींत आंथरण्याचे बारे, पाण्याच्या घागरी, चुन्याचे सारवण व मसीदींत जमाव असेल त्या प्रमाणें रोजमुऱ्याची नेमणूक करून देऊन थोर थोर मसीदींत व थोर थोर प्रसिध्धीत इमारतींत म्हणजे मसीदींत हाफीज, म्हणजे ज्यास कुरान परिफची किताब मुखपाठ असतील ते हाफीज, व सामआ, म्हणजे ज्यासमई हाफीज कुरान षरिफाची किताब मुखानें म्हणावयास लागतो त्या समई त्याचे चुकभूलीवर नजर ठेऊन कान देऊन ऐकत बसत असतो त्यास सामआ असें म्हणतात तो सामआ, म्हणजे ऐकणारा नेमून त्याच्या नेमणुकी रोजमुरा वगैरे सरकारांतून पोहचत जाऊन निमाज तराविह, म्हणजे रमजान षरिफाचे महिन्यांत दर रात्रीस निमाज पढतात त्या निमाजीस निमाजें तराविह असे म्हणतात ती निमाज, त्याजकडून पढवित जावी.

३२. रमजान परिफचे महिन्यांत रात्रीं निमाज पढतात त्या निमाज पढण्यांत तेजस्वी शास्त्रार्थ व रसुलिल्लाह पैगंबर याचे मुंनी धर्माचे ध्वज, म्हणजे झेंडे, उभे करून काजी व मुल्की, म्हणजे कुरान परिफाचा शास्त्रार्थ सांगणारे व पर्यूखाचे पर्यूख व पादशाहा व कुरान परिफचे शास्त्रार्थाचे हुकूम करणारे मंडळींचे आज्ञेवरून वर्तणूक करून मनही म्हणजे गेनबानी, थटा मस्करी, तमाशे वगैरे पातकाची कर्मे, जीं शास्त्रांनीं वर्ज केलीं आहेत तीं व मुसकरात म्हणजे दारू, अफु, भांग वगैरे भुल पाडवयाचे अमली जिन्नस व त्याशिवाय कित्येक अपवित्र पदार्थ जे शास्त्रानें सेवन करूं नये म्हणोन वर्ज केले आहेत ते अपवित्र पदार्थ दूर करून सदरहू पापरुपी कर्मे आचरण करणारास व अपवित्र पदार्थ सेवन करणारास अशा प्रकारें दुःखांत व इजेंत ठेवावें, कीं पुन्हां कोणीच पापरूप कर्मे आचरण्याची व अपवित्र पदार्थ सेवन करण्याची आवडी धरूं नये.

३३. सर्व मनुष्यांची योग्यता जाणणें व निमाज व रोजे व कुरान परिफाचे शास्त्रार्थ जरुर असतील ते प्रसिध्ध करण्याविषयीं साफ ताकिद करून हरएक कामांत कोणी घालमेल करूं नये व पुण्यास पातकाचा संबंध लाऊं नये.

३४. थोर थोर मृत पुरुषांचे म्हणजे मयत लोकांचे उरुस गलाफ, म्हणजे पिरांचे कबरेवर वस्त्रास झालर लाऊन घालतात ते गलाफ, व नेमणूक नख्त खर्च वगैरे दस्तुराप्रमाणें पूर्वापार वहिवाट असेल ती चालू ठेऊन उरुसाचा समारंभ बहुत यत्नेंकरून करावा.

३५. तक्यांत बसणारे फकिरांसहि नेमणूक रोजमुरे वगैरे व इनाम देउन त्या फकिरांची मदत करावी. वाटसरु लोकांसहि बहुत मदत करावी, म्हणजे त्यांचे सरबराईचा बंदोबस्त ठेवावा.

३६ एकंदर मसिदींत व राज्यांत ज्या ठिकाणीं कारणच असेल व जरुरच पडेल तेथें आबे सबील, म्हणजे पाणसत्र, म्हणजे ज्या मनुष्यास तहान लागेल त्यांणीं त्या ठिकाणीं जाऊन पाणी प्यावें यास्तव पाण्याचे रांझण व घागरी भरून ठेऊन ताहान लागेल त्यास पाणी पाजतात त्यास पाणसत्र असें म्हणतात तें पाणसत्र, घालावें व जवहारतखाने म्हणजे शौच्यकूप, म्हणजे सेतखाने, त्या मसिदीपाशीं व रोज्यापाशीं ताकिद करून बांधवावे. अन्नसत्र व पाणसत्र घालून विद्याशाळा घालवाव्या.

३७. जुमा मसिदींतील अन्नसत्रांत मुसलमान लोकांस भाकरी व शिजलेलें अन्न देवावें. हिंदु लोक अनाथ, म्हणजे अन्नाची इछा करणारे ते हिंदु, मुसलमानांचे अन्न खात नाहींत त्याजकरितां त्या हिंदु लोकांस एक वेळेपुरतें पीठ देत जावें. वाटसरू हिंदु लोकांस पहिले दिवशीं दर माणसास पांच चिपटी पीठ व एक चिपटें डाळ व चार टाक तूप व तीन पैसे रोख एकंदर मसाल्यास या प्रमाणें अंतर न पडूं देतां देत जावें.

३८. आपले हद्दींतील मार्ग असेल त्या मार्गानें जे मुसाफर येणार जाणार त्यांस हरयेकविसीं उपद्रव लागों नये येविसीं त्या मार्गाचा बहुत बंदोबस्त ठेवावा. चोरटे लोकांचा शोध लाऊन त्या चोरांचे अंगीं चोरीचा मुदा खरा खोटा काय असेल त्याची शाबिती व चौकशी कायद्याप्रमाणें खुद जातीनें करावी. अशी चौकशी करावी कीं, त्या चौकशीचें कायद्यानें स्पष्ट काय मतलब असेल तो कळावा.

३९. लुटीचें मालापैकीं जो ऐवज हातीं लागेल व लुटीचा ऐवज जो खजिन्यांत जमा होईल त्या ऐवजापैकीं जकात, म्हणजे दर शैकडा अडीच रुपये धर्मादाय व खमस म्हणजे दर सेकडा पांच रुपये पैगंबराचे नांवें हिसा काढून तें द्रव्य साधु व फकीर लोक औलिया वगैरेस धर्म करावें. याखेरिज जो ऐवज किंवा कांहीं प्राप्त होईल तो जुमा मसीदींत किंवा आसार महालांत निरनिराळे ठेऊन कुरान परिफचे शास्त्रार्थाचे हुकुमाप्रमाणें त्यापैकीं खर्च करावा. या कामासहि आलाहिदा कारखान्याची नेमणूक करावी.

४०. हरएक प्रकारें फकीर व गोरगरीब लोकांस रिकामे न जाऊं देतां कुरान षरिफचे आज्ञेप्रमाणें अन्नोदक सरकारांतून पोहचवित जावें. ईश्वरास भजणारे लोकांस जहागिरी किंवा इनाम किंवा रोजमुरे किंवा खैरखैराती, म्हणजे धर्म व दान, करून नित्याचे भोजन खर्चाविषयीं मदत करित जावी. कुरान षरिफचे अर्थास बाध येईल असें कांहीं करूं नये.

४१. मुख्य कामदार संभावित, बहुत कायद्याची कलमें जाणणारा, फार विचारवान, पूर्ण विश्वासू असेल त्याची कामावरून बदली न करितां कामावर नेमावा. उत्तम प्रकारचा काम जाणणारा असेल त्याजला अधिकार देऊन दोन काजी, दोन मुल्फी म्हणजे कुरान षरिफचे शास्त्रार्थ सांगणारे, दोन शेखांचे शेख म्हणजे धर्मशास्त्री, व दोन सदरु सदर म्हणजे सर्व कामदारांनीं त्याचा विचार घेऊन जे काम करणें असेल ते करावे. त्याचे हुकूमाशिवाय कांहीं एक करूं नये असा जो मुख्य कारभारी असतो त्यास सदरु सदर असें म्हणतात. ते दोन सदरु सदर, एक अमीन, एक कोतवाल व एक सरदार कायम करावा. या लोकांची नेमणूक पगार जो मनुष्य जशा योग्यतेचा असेल त्या प्रमाणें मुकरर करून एकंदर गांव व मोकासा असेल तो महालाकडे दुमाला करावा. किल्याकडील कामदारास पाचशें स्वार द्यावे, म्हणजे किल्यांचे दरवाजाचे बंदोबस्ताविषयीं व हरएक मुल्काकडील धावणें व धुपणें असल्यास ज्या ठिकाणीं कारण पडेल तेथें तो किल्याकडील कामदार आपली खासी फौज घेऊन बंदोबस्त ठेवील व सेवेचा हुदा वाजवीपणें वागवील.

४२. पांच हजार शिबंदी लोक लढाऊ फक्त त्यापैकीं दोनशें बर्कंदाज, म्हणजे बंदुकी मारणार, एक हिसा विटा मारणारे, म्हणजे चौकोनी वीट करून एक बाजूस धरावयास जागा असते व तीन बाजूस धार असते व ती वीट फेकून मारली म्हणजे जेथें लागेल तेथील शरीराचा तुकडा उडविते व ती वीट मस्तकाचा नेम धरून मारतात तेव्हां ज्यास लागेल त्याचे मस्तक अचानक उडते त्या विटा मारणारे, असा अर्थ होतो किंवा विटा म्हणोन एक भाल्यासारखें हत्यारच असतें काठीस लांब तरवारीसारखें फाळ असतें त्यास विटा असे म्हणतात, ते विटे मारणारे असाही अर्थ होतो. त्या प्रकारचे विटा मारणारे एक हिसा असावे. याहून अधिकहि नसावे व कमीहि नसावे. याशिवाय दुसरे चाकर लोक जे जरूर कारणाचेच आहेत त्यांजला पूर्ववत दस्तुराप्रमाणें कायम ठेवावें.

४३. मुख्य हें आहे कीं, तोफा डागणारे म्हणजे गोलंदाज वगैरे तोफेकडील कामदार व बाणदार म्हणजे बाण मारणारे वगैरे चाकर लोक निरापम व अद्वितीय म्हणजे त्या सारखा तोफ डागणारा व बाण मारणारा दुसरा मिळणें कठीण असे

निवडक मिळवोन जमा करावे.

४४. मोटे लढाऊ स्वार व शिबंदी लोक वगैरेपैकीं जे चाकर कारणाचे उपयोगीच असतील त्याणी शहरांत रहावें.

४५. एकंदर दरवाज्यांत खरा मजकूर लिहिणारे, खबर सांगण्याचे कामावर सत्य भाषण करणारे, कित्येक स्वार शिबंदी शहरचे कोटावर, खालीं, आंत व बाहेर याप्रमाणें जागोजाग असे हुशारीनें ठेवावे, कीं प्रसंगाचे समईं तात्काळ ते सर्व हजर होऊन त्या लोकांनीं माणसांचे जातीपैकीं एकाहि माणसास सरकारचे परवानगीशिवाय व दरवाज्यावरील मुख्त्यार कामगाराचे सूचनेशिवाय बाहेरून आंत व आंतून बाहेर पाऊल ठेऊं देऊं नये. नवीन मनुष्यास जोपर्यंत हा मनुष्य कोण आहे व कोठून आला आहे येविसींची पुरी चौकशी न होय तोंपर्यंत त्याजला आंत येऊं देऊं नये.

४६. टांकसाळीचे कारखान्यावर मुख्य कामदार व अंमलदार नेमून सोन्याची, रुप्याची व तांब्याची टांकसाळ चालू ठेवावी, म्हणजे पुतळ्या व होन वगैरे सोन्याचे व रुपये व खुर्दा उत्पन्न करण्याची टांकसाळ चालू ठेवावी. सोन्याचे एक होन व अर्धा होन याप्रमाणें व रुप्याचें एक रुपया व अधेली व पावली या प्रमाणें व तांब्याचे सहा पैशाचे एक पैसा व तीन पैशाचा एक पैसा व दोन पैशाचा एक पैसा व एक पैसा याप्रमाणें तयार करवावे. हुकूम करावा कीं, हरएक जिन्नस बराबर व एकसारखे अशा प्रमाणें करावे, कीं ज्याणीं पहावें त्यांणी म्हणावें कीं हें काय चमत्कारिक केलें आहे. कैवारांतच बराबर काम केलें आहे कीं काय असे एकसारखें करावें. लहान मोठे व अधिक उणें होऊं देऊं नये. असें केल्यानंतर टांकसाळेंत सिका वोतावा. हरएक धातू मिश्र होऊं न देतां शुध्द राखण्याविषयीं बहुत हुशारी ठेऊन धातु मिश्र होऊं न देण्याकरितां टांकसाळेवरील कामदारांनीं गलबल दिसल्यास ज्यास जशी सिक्षा देणें योग्य दिसेल त्याप्रमाणें द्यावी.

४७. गल्याची म्हणजे कैली जिनसांची आबादानी व धारणेची स्वस्थता म्हणजे सस्ताई व शहरांतील बागांची मामुरी करणेविषयीं बहुत यत्न करावा. शहराचे आंतील व बाहेरील बागांची जितकी मामुरी अधिक होईल तितकी शोभेचें व नफ्याचें कारण आहे.

४८. पादशाही दरबारापासून बाजारचे रस्ते हरएक दरवाजापर्यंत दुतर्फा बहुत यत्न करून साफ राखवावे. गलोगलीत बाजारचे जिन्नस विकणारे असतील ते सदरहू मोठ्या रस्त्याचे दुतर्फा बसवोन रस्त्याचे दुतर्फा भर वस्ती ठेवावी. एखाद्यानें कोठें कांहीं जिन्नस गलोगलींतहि विकावयास मांडिला तत्रापि चिंता नाहीं.

४९. दरवाजापासून हरएक दरवाजापर्यंत रस्त्याचे दोन्हीहि बाजूंस बाजारची भर वस्ती राखिली म्हणजे दोनीही बाजूनें हरएक जिन्नस फार लांब न जातां जवळच

मिळूं लागेल. बाजारचे रस्त्यामध्यें बाजारी लोकांस पाल किंवा छप्पर घालून दुकान मांडू देऊं नये. रस्त्याच्या दोनी बाजू सोडून रस्त्यामध्यें कोणासच दुकान मांडू देण्याचें कारण नाहीं.

५०. वाणी, तेली, सौदागर, शिंपी, जिनगर, राहुट्या व तंबू शिवणारे, शिजलेलें अन्न विकावयास मांडून विकावयास बसतात ते स्वयंपाकी लोक व हरएक जातवाले एकसारखे ओळीनें बसवावें. सदरहू लोकांनीं एक ओळीनें दुकानें घालावीं. थोर थोर रस्त्यांचे दुतर्फा बाजारची भर वसाहत झाल्यानंतर गलोगलींत सदरहु जिन्नसांची मामुरी ठेवावी.

५१. गल्याची म्हणजे कैली जिनसांची व बाजारची अशी वहिवाट ठेवावी कीं, गल्ला विकणारे लोकांनीं चहूंकडोन तर्फेतर्फेहून आणून शहरांत जमऊन ठेवावा. विकरीची जलदी न करितां अवकाश करून सर्व काल हरएक जिनसा गल्ला तयार राखावा. गल्याचा संचय बहुत ठेवण्यांत राजधानीचे व शिपाई लोकांचें संतोषाचें कारण आहे.

५२. कोतवाल अशा प्रकारचा असावा कीं, त्यानीं रात्रंदिवस शहरचा व बाजारचा बहुत सुरक्षितपणें बंदोबस्त ठेवावा. चोर, उचले, एखाद्यावर जबरदस्ती करून लुटून नेणारे वगैरे दांडगे लोक व खिसा कापून नेणारे लोक असतील त्यांवर बहुत नजर ठेऊन बहुत हुशार राहून बंदोबस्त ठेवावा. ज्या ठिकाणीं जर करितां लहान किंवा मोठी चोरी होईल तर तेच वेळेस खबरदारी ठेऊन त्या चोरीचा ठिकाण लाऊन कुरान परिफचे आज्ञेप्रमाणें मालक हुकूम करितील त्या कलमाप्रमाणें फैसला करावा.

५३. श्रेष्ठ योग्यतावान शाहाजादे, अमीरलोक व थोर योग्यतेचे वजीरलोक याणी आपले खासगीचे शागीर्दपेशे व खरिदी घेतलेले चाकरलोक व खिदमतदार यांजला खुद जातीनें साफ ताकिद करित जावी कीं, कोणीहि रयत लोकांपैकीं कोणावर जुलुम जबरदस्ती करित जाऊं नये. अशी ताकिद करावी. यद्यपि एखादी जुलुम जबरदस्ती कळोन आल्यास त्या मोकदम्याचे इनसाफानें व न्यायानें फैसल करण्याविषयीं सदरहू वजीर व अमीरलोकांस जरी अधिकार असला तत्रापि कुरान परिफचे शास्त्रार्थाची आज्ञा करणारास खबर देऊन त्याचे हुकुमाप्रमाणें त्या अमार्ग वर्तणूक करणाराचे व वाईट चालीनें चालणाराचे पारपत्य करावें.

५४. रयत लोकांपासून विनाकारणी कांहीं दोष ठेऊन गुन्हा आंगी लाऊन गुन्हेगारीचा ऐवज घेणें व रयतेस लुटणें हें दवलत बुडविण्याचें बीज व ऐश्वर्यनाश करण्याचें कारण आहे.

५५. सर्वोपरि शक्ति आहे तोंपर्यंत संरक्षणाविषयीं यत्न करावा. याप्रमाणें वाक्यहि आहे. त्या पारसी बैतेचा अर्थ : "ज्या नीतीनें वागतो त्याच नीतीचे धारणेवर राहा. रयतेचे संरक्षणावर नजर ठेवा."

५६. हमेशा थोर थोर रस्ते, राजमार्ग, गल्या व बाजारचे जागी साफ ताकिद करून ते रस्ते साफ निर्मळ ठेऊन दृष्टीपुढें रस्त्यावर किंचितहि केर कचरा पडों देऊं नये. बाजारांत दुरस्ता कोणतेंहि दुकान, कीं ज्या दुकानांत कांहीं एक माल नाहीं असें रिकामे व खराब राहूं देऊं नये. कारण कीं, बाजारचे दुरस्ता दुकानांपैकीं एखादें दुकान रिकामें व खराब राहिल्यास सदरहू बंदोबस्ताचे कामावरील हुदेदार कामदाराचे पगार काटून घेण्यास व बाजारी लोकांपासून गुन्हेगारी घेण्यास कारण होईल.

५७. कुरान परिफचे हुकुमावरून व ईश्वराचे आज्ञेवरून एकंदर सुखवस्तु लोकांपासून व देवपूजा करणारांपासून म्हणजे हिंदु लोकांपासून खराब काम, म्हणजे नाच तमाशा व मद्यपान वगैरे वाईट कामें करणारापासून, खंड घेणें ठरलें आहे त्या प्रमाणें मुसलमानांचे सरहद्दींतील एकंदर मुल्कांतील मुख्य कामदारास व मामलेदारास त्या लोकांपासून खंड घेणेंविषयीं आज्ञापत्रें रवाना करावी, कीं आपले मुल्कांतील हिंदु लोकांपासून कुरान परिफचे हुकमाप्रमाणें जसें विजापुरात हिंदु लोकांपासून गैरराहा वागणूक झाली असतां खंड घेतात त्याप्रमाणेंच खंडाचा ऐवज खालीं तपशील लिहिला जात आहे त्या प्रमाणें घेत जावा.

५८. जो हिंदु द्रव्यवान आहे व कांहीं एक व्यापार व कसब न करितां एक वर्ष किंवा एक वर्षावर कांहीं दिवस प्रपंच निर्वाहा करूं शकतो त्या हिंदुपासून दर महिना एक तोळा व पावणे पाच गुंजा रुपें घेत जावें.

५९. जो हिंदु सरासरी द्रव्यवान आहे परंतु कांहीं व्यापार केल्याशिवाय प्रपंच निर्वाह करूं शकत नाहीं त्या पासून अर्धा तोळा व पावणेपांच गुंजेचे निमे गुंजा भार रुपें दर महिना घेत जावें.

६०. ज्या हिंदुपासीं कांहीं एक धन संचय नाहीं व कांहीं तरी कसब किंवा व्यापार करून प्रपंच निर्वाह करितो व त्याचा भोजन खर्च व त्याचे बायकामुलांचा खर्च पार पडून कांहीं बाकी सिलक राहते व त्या सिलकेपैकीं खंड द्यावयाजोगा आहे असें दिसेल त्यापासून पाव तोळा व पावणेपाच गुंजाची चौथाई हिशानें भार दरमाहा घेत जावें.

### ज्या माणसापासून खंड घेऊं नये त्या माणसांचा तपशील लिहिला जात आहे :

६१. बायका व मुलें, थोरपणाचे वयास पोहचले नाहींत, म्हणजे पंधरा वर्षांचे वयास जे पोहचले नसतील व जे विकत घेतलेले चाकर असतील व वाटसरू लोक कीं

जे कोणी कोणासी दे घे करित नाहींत, आंधळे, दुखणाईत कीं जो दुखणाईत होऊन एक वर्ष किंवा वर्षावर कांहीं दिवस किंवा सहा महिने आजारी म्हणजे दुखणाईत होऊन राहिला असेल व जो आजाराचे योगानें जाग्यावर पडून राहिला असेल व जो हिंदु खंडाचा ऐवज देणें वाजवी ठरलें असेल आणि तो ऐवज देण्यापूर्वींच मरण पावला व ज्यास अर्धांग वायु जाहाला असेल व तो हिंदु फारच म्हातारा झाला असेल, हिंदु जातीचे फकीर लोक म्हणजे बैरागी वगैरे कीं जे कांहींच व्यापार करित नाहींत व कांहीं द्रव्यही बाळगीत नाहींत व जो हिंदु खंडाचा ऐवज देण्यापूर्वी मुसलमानी जातींत शिरोन मुसलमान झाला व त्या मुसलमानानीं कुरान परिफाचे वाक्यास बाध ठेऊन चुकोन कांहीं बोलणें बोलला त्या थोडेसे अपराधास्व त्यापासून या प्रमाणें सदरहू एकंदर मंडळीपासून कदापि व कधींहि खंड घेऊं नये.

६२. जो हिंदु हमेशा द्रव्यवान असेल त्या पासून द्रव्यवानाचे कायद्याप्रमाणें खंड घ्यावा व जो हिंदु हमेशा दरिद्री असेल त्यापासून दरिद्री लोकांचे कायद्याप्रमाणें खंड घ्यावा.

६३. जो हिंदु सहा महिनें द्रव्यैंकरून सुखी असतो व सहा महिने दरिद्रांत दिवस घालवितो त्यापासून मध्यम प्रकारें खंड घ्यावा.

६४. भट मंडळ व जंगम लोक सर्वांसी उपाधेपणाचा व्यापार करतात व खंड देण्यास वाजबी हकास लायक आहेत यास्तव या लोकांपासून खंड घेतलाच पाहिजे.

६५. याचप्रकारें जे हिंदु लोक कांहींच कसब किंवा व्यापार करित नाहींत परंतु द्रव्य बाळगून सामर्थ्यवान आहेत त्यापासून द्रव्य हरण करण्याविषयीं जशी युक्ति चालेल तसें करून तो हिंदु जितका खंड देऊं शकेल तितका खंड त्यापासून घ्यावा.

६६. खंड देणारानीं खुद जातीनें येऊन खंडाचा ऐवज आपले हातानीं आणून द्यावा. आपलेकडील कोणतेहि मुखत्याराचे हातें पाटऊं नये. खंडाचा ऐवज घेणारा बसलेला असावा, देणारानीं उभें राहून द्यावा.

६७. खंडाचा ऐवज वसूल येईल तो बातेन मालाचे खजिन्यांत दाखल करून ऐवज खर्च करण्याविषयीं कुरान परिफाचे ग्रंथांत शास्त्रार्थ लिहिला आहे त्या हुकुमाप्रमाणें तो ऐवज खर्च करावा.

६८. जर करितां अमीरलोकांस व वजीर मंडळीस खरे चालीचे लोकांस जेव्हां ज्याहागीर द्यावयाचे मनांत येईल तेव्हां त्या जागीर द्यावयाचे गांवचा वसूल तीन सालचा लक्षांत आणोन ज्या सालीं अधिक वसूल आला असेल ते अधिक वसुलाचे साल कायम करून त्या सालचे वसुलाचे बेरजेप्रमाणें हिशेब करून दर सदे पंधरा

हजाराचे हिशेबाप्रमाणें जागीर द्यावी म्हणजे दररोज शंभर रुपये देण्यालायक योग्यता आहे तर पंधरा हजाराची ज्यागीर द्यावी. जागिरीचे गावांवर एखादे संकट किंवा आफत आल्यास त्या गांवचा वसूल सूट तूट घालून अधिकउणा वसूल घेणें तो वजीर लोकांनीं पाहून घ्यावा. लहान वजीरास व थोर वजीरास एकसारखीच जागीर द्यावी. आधी वजीरास जागीर देऊन नंतर चाकरीकरितां त्याजकडून घोडे आणवावे. त्या हरएक वजीराचे घोड्यावर सरकारी निशाणाचा डाग देऊं नये. त्यानंतर अमीरलोकांचे शिपायांची हजिरी घ्यावी. मोजदाद करावी. जरकरितां वजीर हुजूर हजर असल्यास त्या वजीरास बोलावणें करावें. त्यापासून हाजरी व मोजदाद करून घ्यावी. त्या हजिरीची पट त्या वजीराचे नांवाचा सिका करऊन जमादाराचे व शिलेदाराचे व पागेचे गणतीसुध्धां तो हजरीपट घ्यावा. पूर्वीचे हाजिरीचे मोजदादी-प्रमाणें त्या लोकांनीं पुन्हां हजिरी घ्यावी. त्यांत जी तफावत दिसेल त्याविषयीं पुरसीस करावी, म्हणजे तफावत घडण्याचे कारण विचारावें. पुरातन मनुष्य नामांकित बहुत कामकाज केलेला बरतर्फ करण्याचें कारण काय ही सबब साफ विचारून घ्यावी. जर करितां चालढकल करण्याजोगें कलम दिसल्यास चालढकल करावी, म्हणजे चौकशीचे फारसे प्रयोजन ठेऊं नये. जर करितां जरब द्यावयाजोगेंच कलम आहे तर जरब द्यावी.

६९. वजिराची फौज जी आपले सरहद्दींत परगांवी असेल त्या फौजेची हजिरी त्या ठिकाणींच घेऊन तो हजिरी पट आणवावा. नंतर ती फौजहि आणऊन हुजूर हजिरी घ्यावी. त्यांत कांहीं तफावत दृष्टीस आल्यास त्या विषयीचे कारण विचारून घ्यावें. वजिराचे घोड्यावर पादशाही निशाणीचे डागाचें कारण नाहीं.

७०. जर करितां डाग दिल्हेला घोडा आहे व तो घोडा पुन्हां चाकरीवर रूजु झाल्यास डागाचे निशाणीचे धन्यानीं आपले निशाणीचा डाग पुन्हां नवीन त्याच डागावर डाग द्यावा.

७१. सरकारी निशाणीचे डागाचा घोडा दुसरे सरकारांत गेल्यास त्या सर-कारानीं त्या घोड्यावर आपले निशाणीचा डाग देऊं नये. शिपाई लोकांचे धन्यानीं असें असलें पाहिजे कीं शिपाई लोक व घोडे वगैरे चाकरी ठेवितेवेळेस प्रथम नांवनिसी लिहिते वेळेस अशा प्रकारें पुरे खातरींत आणून लिहावें व घोड्यास डाग द्यावे, कीं पुन्हां बरतर्फ करण्याचे कारणच न पडावें. शिपाई लोक चाकरीवर राहून जितके कदीम व पुरातन होतील तितकें उत्तम आहे. पुरातन विश्वासू चाकर असला म्हणजे आप्तविषयीं मंडळीसारिखा होतो.

७२. पादशाही सरकारांत हरएक प्रकारचे व हरएक गुणाचे व विद्येचे चार चार पूर्ण जाणते नेमून त्यांचे योग्यतेनुरूप रोजमुरे व तैनातीची नेमणूक करून ते

वस्ताद ठेवावे. पादशाही सरकारांत जितकी विद्वान व योग्य मनुष्यें जमतील व प्रसिध्द पावतील तितकें पादशाही शोभेचें व योग्यतेचें कारण आहे.

७३. या विद्वान लोकांस सरकारांत हुजूर जमऊन ठेवावें व या पासून काय नेमाची सेवा घेणें असेल तितकीच घेत जावी. या लोकांपैकीं कित्येक संभावित फार थोर विद्वान लोकांस चाकरी माफहि करावी व यापैकीं कित्येकांस सर्व काळ चाकरी माफहि करूं नये.

७४. सर्वकाळ सबनीस मंडळ सेवक असतात यांणीं असें असलें पाहिजे कीं, हरएक थोर थोर मनुष्याची हजिरी वगैरे लिहित जावी. कोणते कारणानीं गैरहजर आहेत हें चितांत आणावें. ताकिद करावी. जर करितां कोणी हमेशा गैरहजर राहातो असें आहे तर त्याचे जागे, म्हणजे खाडे दिवस लिहावे व त्या दिवसांचा आकार होईल तो सरकारांत त्याचे पगारा पौ वजा करून घ्यावा.

७५. सरकारांत गुणवान हुजूर राहाणाराचे रोजमुऱ्याची नेमणूक वेगळीच काढून देऊन तुटक करून, म्हणजे या एकंदर बखेड्यांत न ठेवितां, आलाहिदा करून द्यावी. परंतु गांवचे जमाबंदीचा पगार हरएक हकिमाचे मार्फतीनें समजून घेऊन हिशेब आणवित जावा.

७६. पादशाहा यांणी असें असलें पाहिजे कीं, कोण त्याचे अमलांत, म्हणजे कामकारभारांत, अफरातफरी म्हणजे अधिक उणे घालमेल होऊ देऊं नये. पादशाहास हें कर्म प्रिय नसावें. पादशाहा याणी आपल्या समयाचे तीन प्रकारचे विभाग म्हणजे हिशेब करावे. प्रात:काळपासून तीन तासपरयंत विद्वान लोक, गुणवान व कविता करणारे मंडळासी सोबत ठेऊन मुलकाच्या व मालाच्या नाना प्रकारच्या खबरी, अनेक प्रकरणें व सवाल जबाब कसे घ्यावे येविषयीं समजून घेऊन माहितगार व्हावें. चवथे तासापासून साहावे तास परयंत उघड दरबारांत बसून थोर थोर संभावित व कारभारी मंडळ व शिपाई लोक वगैरेंचा मुजरा घ्यावा. त्यावेळेस कोणास मुजऱ्यास येण्यास मनाई किंवा गैर राबता नसावा.

७७. सातवे तासापासून नववे तासापरयंत एकांतांतील जीं कामें करणें असतील तीं करावीं.

७८. नववे तासापासून एक प्रहर रात्रपर्येतहि एकांताचे जागीं बसून राजधानीची कामें करावी, हयाम म्हणजे आवसीचे पांच घटका रात्रीचे नंतर निमाज पढल्यानंतर पाहिजे तें काम करावयास मुखत्यार आहे. नित्य या कायद्याप्रमाणें दिवसाच्या वेळा घालून एक दिवस किंवा एखादी घटका देखील कायदा व शिरस्ता सोडून वागणूक करूं नये. ईदीचे दिवसांत व शबारांत म्हणजे साबान महिन्यांतील

तेरावे तारखेचे रात्रीं दुकानें, जागोजागचे बाजार व सरकारी दरबारचे ठिकाणीं आरास करावी.

७९. नमरोजचे ईदींत नऊ दिवस पर्यंत बहुत झटून श्रम करून फारच शोभा व आरास करावी. सालगिरद्, म्हणजे प्रतीवर्षी जन्माचे तारखेदिवसीं समारंभ करितात त्यास सालगिरी असें म्हणतात त्या तारखेचे दिवशींहि बहुत आरास करावी. इदीचे व सालगिऱ्याचे दिवशीं संपूर्ण अमीरलोक, कारभारीमंडळ, कामदार, वकील लोक, पदरचे लहान थोर व बाजारी लोक वगैरे व त्याशिवायहि जे कोणी मुजरा करावयास तयार होऊन येतील त्यांस मोकळीक ठेऊन मुजरा करूं देत जावा. हर कोणी चाकर लोक किंवा वजिफा, म्हणजे पादशाहाचे पुत्र असतात त्यास दरमाहा पगार पावतो त्यास वजिफा असें म्हणतात त्या पादशाहाचे पुत्रानी, आपआपले योग्यतेनुरूप पादशाहास नजरा करावयास मर्जीस आल्यास नखतीची नजर करावी किंवा जिनसांची म्हणजे कांही जडजवाहिराची नजर करावी.

८०. नऊ रोजचे इदीचे नऊ दिवसांत पादशाहाचे महालच्या स्वाऱ्या, म्हणजे पादशाहाचे राणीच्या स्वाऱ्या, यावयाजोगी जी बाग लायख असेल तेथें इंद्रभुवनासारिखी शोभा व आरास करावी. तेथें दुकानें व पडदे बांधून लावण्य स्त्रियांस बसावयास फार आरासीची जागा करावी. हुजूरचे बाजारांत तर आरास मुदाम करवावीच. शहरचे बाहेरील बागांत व शहरांतील बागेमध्येंहि बहुत शोभा व आरास करवावी. इदीचे नऊ दिवस समाप्त झाले म्हणजे सदरहू एकंदर बागेमध्यें पादशाहा याणीहि एक दिवस समारंभानें स्वारी निघोन बहुत आनंदानें सया करावी, म्हणजे एकंदर बागेची शोभा पहावी. आपले मुलखांत ज्या ज्या ठिकाणीं गुणीजन मनुष्यें असतील त्यानीं नऊ रोजचे इदीचे दिवस समीप आले म्हणजे त्या समईं पादशाहास मुजरा करावयाकरितां हजर होऊन नऊ दिवस समाप्त होय तो परयंत रात्रंदिवस दरबारांत हजर राहून हरएक मनुष्यानीं आपआपले गुण व कुशलता प्रसिध करण्यांत निमग्न व्हावें.

८१. पादशाहा याणीहि हरएक अमीरलोकांस व दौलतीकडील कामदारांस नऊ रोजचे इदीचे दिवसांत चाकर लोक, हुजरे, हुजूरचे शागीर्दपेशे, माहालचे हवालदार लोक व कित्येक कारखाने व पोपाख योग्यतेनुरूप त्यास सदरहू अमीर व वजीर लोकाचे स्त्रियांसहि या प्रकारचे पोपाख द्यावे.

८२. आपले बापाचे वारलेले महिन्यांत प्रती वर्षीं तो महिना पुरा होईतोंपर्यंत व हजरत सुलतान आवली याचे अकरा दिवस मोहरम परिफचे ताबुताचे दहा दिवस आसार महालांत मेजवानकीसारखी अन्न अति उत्तम पक्वान्ने फार चांगली व हलवा व जिकेरत हलील म्हणोन निमाजीचे प्रकार आहेत त्या प्रकारच्या निमाजी पढविणें

व खैर खैरात म्हणजे दानधर्म करऊन मुसलमान जातीचे फकीर लोक व विद्याभ्यास करणारीं मुलें व विद्वान लोक व गुणवान व काजी मंडळ व मत्रायक म्हणजे धर्मशास्त्री व कारभारी मंडळ व कामदार यांजला एकेक दिवस आमंत्रण करून भोजन करवावें आणि सदरहू लोकांचा येणेंकरून बहुत संतोष करावा.

८३. गुरुवारीं व अकरावे व बारावे दिवशीं नित्याहून अधिक भोजनाचा समारंभ करून पादशाहा यांणीं खुद जातीनें भोजनाकरितां तेथें येऊन तेथील अन्ना-पैकीं अन्न घेऊन त्या पंक्तींत भोजन करावें.

८४. आसार महालांत कोणतीच पातकाचीं कर्में, जी कुरान षरिफचे शास्त्रा-र्थानें वर्ज केलीं आहेत तीं अशास्त्र कर्में, करूं नये. नऊ रोजचे आरसींत खुद मुख-त्यार आहेत व हरएक चांदणे रात्रीस नित्य राबतां खुला करून म्हणजे सर्वांस येण्या-जाण्यास मोकळीक देऊन हुजूर राहाणारे थोर थोर लोक, सरदार मंडळ, काजी मंडळ, विद्वान लोक, हरएक कारखान्याकडील कामदार व शागीर्दपेशे वगैरे जे चाकर लोक असतील त्या सर्व मंडळींनीं चांदणे रात्रीस हजर होऊन आपआपले अधिकारानुरूप येऊन पादशाहास मुजरा करावा. पादशाहा यांणी या सर्वांचा मुजरा घ्यावयाकरितां तीन तास रात्रपर्यंत बसावें. हरएक महिन्याचा प्रारंभ होतो त्या पहिले तारखेस प्रातः-काळपासून सहा तासपर्यंत दाद महालांत, म्हणजे अदालतीची एक निराळीच इमारत करून महाल बांधून त्या महालाचे नांव दाद महाल असें ठेविलें आहे तेथें, सर्वांच्या दाद फिर्यादी समजून घ्यावयाच्या त्या दाद महालांत बसून हुजूरचे अमीर-लोक व वजीरमंडळाचे मुजरे घ्यावे.

८५. दरबारची जागा पूर्ण विस्तीर्ण करून त्या जाग्यांत बहुत संतोषानें पूर्वेस तोंड करून बसून दरबारचे बाजूस दरबारचे भिंतीबराबर मसिदी पूर्ण साफ व उत्तम प्रकारच्या बहुत डौलदार दरबारास शोभावयायोग्या बांधवाव्या व मसिदींचे तिनीहि बाजूंस सर्व जमातीनें बसावयाजोगे थोर थोर सोफे वगैरे इमारती बांधवाव्या. त्या इमारतीस जमातखाना असें म्हणतात. ते बहुत मेहेनतीनें बांधोन दुमजला अति उत्तम माड्या बांधून मसिदीचे ढेलजेवरहि दुमजला माडी बांधून फारच शोभिवंत करावे.

८६. मसिदीचे मैदानापुढें फार थोर हौद बांधून पाण्यानें सर्वकाळ डबडबीत, म्हणचे पूर्ण भरलेला, हमेशा राखावा. मसिदींतील जे कांहीं कायदे निमाज पडण्याचे आहेत ते जाणणारे निमाज पडणारे एकेक व मसिदींतील अन्नछत्रांतील अन्न अति निर्मळ ठेवावे. पाणसुत्र म्हणजे जो तान्हेजून येईल त्यास पाणी पाजावयाकरितां रांझण वगैरे भरून ठेवितात तें पाणसत्र मुसलमान लोकांरितां व हिंदु लोकांकरितां निरनिराळे तयार राखावे. जमातखान्यांत, म्हणजे सर्वांनीं बसावयाजोगी जी जागा केली असेल त्या जमातखान्यांत, हरएक विद्येचे पाठ देणारे विद्वान लोक नेमावे.

८७. दरबारचे भिंतीशी सरासरी जमातखाने बारीबारीनें लोक असतात त्यास बसावयाकरितां व दरबारचें पाहाऱ्याचे शिपायास बसावयाकरितां अति शोभिवंत व फार उत्तम बांधून दरबारचे मैदानाचे बाजूंनीं मोठमोठीं दुकानें लांब रूंद फारच स्वच्छ व अति उत्तम दुमजला मासलेदार व सर्वमान्य व धोंडे व चुना घालून मजबुत बांधावे.

८८. ज्या ज्या ठिकाणीं कारागीर लोक व नाना प्रकारचे हुजूर जाणणारे म्हणजे गुणवान व रुवदागर लोक जे द्रव्य बाळगून सुखी असतील त्यांजला त्या दुकानांत जागा द्यावी. तबक म्हणजे शिजलेले अन्न विकणारे व हलवाई व बागवान वगैरे फळफळावळ विकणारे लोक चांगले व हुशार असतील त्यांजला त्या बाजारांत जागा द्यावी. बाजाराची आबादी व मालमत्ता वगैरेची बहुत वृध्दी करण्याविषई अशा प्रकारें यत्न करावा कीं, एक दुकान देखिल दुमजल्याखेरिज नसावे. हरएक जिनस व हरएक मालमत्ता वगैरे ज्या ज्या ठिकाणीं असेल ते विकणारांनीं त्या बाजारांत आणावे. दुसरेकडे विकूं नये.

८९. दरबाराचे समोरचे मैदानाची जागा दुतर्फाचे दुकानाचे मध्यभागांतील चहूंकडून गजानें व कैवारानें मोजून त्या मैदानाचे मध्यभागीं एक मोठा हौद त्या जाग्यामध्यें बांधून सर्वकाळ पाण्यानें परिपूर्ण भरलेला राखावा. असें केलें असतां चहूं-कडीलहि राहणारांपैकीं जो पाहिजे तो पाणी नेईल व त्या हौदाचे सभोवतें व दुकाना-समोर दाट छाया पडावयाजोगीं झाडे लावावीं. तीं झाडें फार रूंद फैलाऊन दुकानांचे शोभेस उपद्रव करावयाजागीं नसतील. तीं झाडें पाहून लावावी व हमेशा कोतवाल व बाजारचे लोक यांणीं दारापुढील जमिनीचा शोध ठेऊन त्या जाग्याची वरचेवर झाडलोट करून त्या मैदानांत गवताचे काडीचे एक कसपट देखील पडूं देऊं नये. त्या मदानांत व दुकानापुढें कोणतेच जागीं किंचित धुरळा देखिल पडूं नये व दुकानापुढें जमीन उंच खोल न राहतां सारवणी करून पाणी शिंपून बाजारची शोभा अशी ठेवावी कीं, त्या काळचे लोकांनीं त्या जागेचे शोभेचा दृष्टांत घेत जावा. सोप्यावर व दहा महालाचे दरबारचे जमातखान्यावर बहुत शोभा व आरास करून त्या माडीस थोर थोर खिडक्या करून पादशाहाची बसावयाची जागा अशा प्रकारची करावी कीं तेथें बसून सर्व बाजार व दरबारापुढील मैदान पादशाहाचे दृष्टीस पडावें. दरबारचे दरवाजावर तास ठेवावा. ज्या प्रकारचा रंग वगैरे नकशीचें काम योग्य दिसेल तसें दरबारांत व हरएक दुकानांत व दुसरे मजल्यावर व दरबारचे सोप्यांत रंगाचे काम करून शोभिवंत करावे. कुरानची किताब उत्तम प्रकारचे विस्तारानें म्हणजे अक्षराची दाटी फार न करितां व अक्षर फारच शोभिवंत सोनेरी शाईनें त्यावर इमारतीचीं शास्त्रें पेनेंसुध्दां लिहावीं.

घंटा

९० गुजरीचा चौक ह्या दरबारचे बाजूसच करावा.

९१ बोहऱ्याचे जातीपैकीं जितके दुकानदार बोहरी असतील त्यास शाहापुरखेरीज करून या बाजाराशिवाय कोणतेच दुसरे ठिकाणीं दुकान घालूं देऊं नये. बोहरी याचे दुकानापाठीमागें सौदागर लोक यास जागा देऊन दुकानें घालवावी.

९२. या बाजारांतील दुकानदार एकंदर मनुष्यें असतील व या बाजारानजिक व दूरहि कांहीं दुकानदार असतील त्या एकंदर बाजारी मनुष्यांवर जुलुम व जबरदस्ती न करितां बाजारी लोकांस आबाद ठेवावें. हापसी जातीचे, तुरकी, हिंदु जातीचे चाकर लोक व खोजे जमा करून हरएक चार जातीचे चाकरलोकांवर चार हवालदार एकसारखे हुशार, कामकाज केलेले, अकलवान व सदरहू चार प्रतीचे चाकरलोकांचा जाबता लिहिणार नेमून हरएक प्रतीस एकएक पंतोजी मुलास विद्या शिकविणारा व पारसी विद्या पढविणारा व पारसी लिहावयास शिकविणारा पंतोजी व तिरंदाज, बंदुक मारणार, भाले मारणार, कांही पहिलवानी करणार व खुस्तीचे डाव पेच जाणणार त्या हवालदाराचे हवालीं करावे. सदरहू गुण व विद्या शिकविण्यास जो सरंजाम सामान लागेल तो सदरहू लोकांनीं सरकारांतून घेऊन मुसलमानी धर्माचे कुरान परिकचे शास्त्रार्थाचे हुकूम व आरकान पढणें व हरएक विद्येंत तयार व्हावे व अभ्यास करावा. कित्येकांस कारखान्याचे कामीं नेमून हरएक विद्येंत अभ्यास करवावा. सदरहु चाकरलोक म्हणजे विद्याभ्यास करण्याकरितां नेमणूक करून देऊन मुलें जमा करून त्याजकडून विद्याभ्यास करवावयासाठीं चाकरलोक मुलें जसी जसी हरएक विद्येंत तयार होतील व विद्या शिकतील तितके फार चांगले व अति उत्तम होईल.

९३. विद्याभ्यास करणारीं मुलें लहान वयाचीं आहेत तोंपर्यंत त्या मुलांस अन्न वस्त्र वगैरे जें लागेल तें सरकारांतून द्यावें व त्यांचे विद्याभ्यासाप्रमाणें कांहीं नेमणूक करून द्यावी.

९४. सदरहू मुलें थोर होतील तेव्हां त्या मुलांचीं लग्नें करून देऊन त्या मुलांस रोजमुरा वगैरे नेमून बसावयास घोडे द्यावे. हुजूरचे चाकरीवर व दुसरेकडे कोठें चाकरीवर, कारखाने, किले, कोट महालामहालास योग्यता पाहून ज्या चाकराचे लायक जी चाकरी असेल ती त्या चाकरीवर नेमावे.

९५. सदरहू चाकर लोकांनीं आपआपले कामावर हुशार राहून खबरदार असावें. चोरी करण्याची व बेमानपणाची चाल स्वीकारूं नये व जो चाकर सरकारी कामांत तफावत व हरामखोरी म्हणजे बेमानपणा व धन्यासी बदलेंची चाल वगैरे वाईट चालीनें वागेल त्याजला चाकरीवरून बरतर्फ करून कुरान परिकचे ग्रंथांत शिक्षा लिहिली असेल त्याप्रमाणें त्याचें पारपत्य करावें. त्या मनुष्यास फार दूरहि

जाणेविशयीं हुकूम देऊं नये. कारण कित्येक मनुष्यें दूर जाऊन फंदफितूर वगैरे नाना प्रकारचे बखेडे करितील.

९६. हुजूर जे जे चाकरलोक चाकरीवर आहेत त्याणी आपआपले जे चाकरीवर हुशार राहून सरकार स्वारीचे समई आपआपले हवालदारासमागमें उभे राहून..... बांधून सामानसरंजामाची तयारीनिर्सीं तयार राहून पादशाहाचे स्वारीचे पाठीमागें चालावें. ज्या सेवक लोकांस ज्या हत्याराचा अभ्यास आहे त्यांणीं आपआपले हत्याराचे गुण दाखवावे म्हणजे बंदुकबारदारांनीं सरकार स्वारीसमई बंदुकीचे बार काढावे. सरकारची पागा डावे व उजवे बाजूस चालून त्या पागेवर घोड्याकडील लीद, कडबा व गवत वगैरे जी वैरण घोड्यानें खाऊन गळाटा उरलेला असेल तो विकून त्याचा जमाखर्च लिहिणारे दोन दोन कामगार नेमावे. दर घोड्यास एक एक मोतदार व दोन घोड्यास दोन मोतदार नेमून कारखान्याकडील संपूर्ण सामान सरंजाम तयारी ठेऊन एकंदर पागेचे घोड्यास सरकारी निशाणीचे डाग असावे. हरएक घोड्याचा रतीब ठरऊन जो घोडा दांडगेपणा करील व माजोरी जाह्मला आहे असें दृष्टीस येईल त्या घोड्याविसीं पागेकडील मुख्य कामदारानें त्या घोड्यावर नेमिलेले मोतदारास ताकीद करून तो घोडा पागेंतून बाहेर काढावा व बहुत हुशार राहावे. कारण कीं, पागेंत व पिलखान्यांत व उष्टरखान्यांत हमेशा फार चोरी होती. यास्तव कामावर बहुत हुशारी ठेऊन चोरी होऊं देऊं नये. तट्टु व घोडें म्हातारें झालें असेल तें व जें घोडें निर्बळ व जे कामांतून गेलें असेल ते कधींहि पागेंत ठेऊं नये. चाबुकस्वार व घोड्याची औषधें जाणणारे वैद्य यांणीं पागेची बहुत पाहाणी ठेवावी. घोड्याची लीद वगैरे वैरण जाऊन गळाटा उरलेला विकणेचे कामावरील मुख्य कामदाराचे मागें मोगल व पठाण जातीचा कामगार असावा. हें नीट आहे व बारगीर स्वार ठेवावयाचे ते तिरंदाज व बंदुकीची निशाणें लावणारा व भाल्याचा मारा जाणणार असे पाहून ठेवावे. शागीर्द मंडळींवर एक विद्येंत तयार केलेले बारगिरीचे सर्व कामांत दाखल करावे. मनुष्यांनीं हुजूर बारीबारीनें चाकरीवर हजर असावें. संपूर्ण बारगीर स्वारांवर एक हवालदार नेमावा. तिरंदाज, बरकंदाज व भालेकरी यांजवर तीन हवालदार नेमावे. खोडील खोडकर घोडा असेल तो कदापि सरकारांत ठेऊं नये.

: एकूण दस्तुर आमल समाप्त जाहाले :

बुस्तान सातवें

# अल्ली आदिलशाहा -- दुसरा

## १. दुसरे अली आदिलशाहा बिन सुलतान महंमद आदिलशाहा याचें प्रकर्ण :

जाणावें कीं, इनसाफ करणारा पादशाहा व आदिलशाही सर्व पादशाहांत श्रेष्ठ जो सुलतान महंमद आदिलशाहा याजला ईश्वराचे कृपेंकरून सर्व मनोरथ पूर्ण होते. कोणतेंहि प्राप्त होण्याची इच्छा राहिली अशी नव्हती. सुलतान महंमद पादशाहा बहुत चांगले चालीनें, नीतीनें व सुलक्षणिकपणें वागत होता. या कालांतील इनसाफ करणारे जे पादशाहा आहेत त्यांजला आपले दानधर्म, शूरत्व, इनसाफ, दूरवर विचार करणें, सर्व कामाची माहितगारी, रयतेचें पालन व गरिबाचा प्रतिपाळ, सत्य पाहणें व सत्य ओळखणें, ईश्वराचे भय ठेवणें, पापकर्मापासून दूर राहाणें, पूर्ण विश्वास, स्वधर्माचरणाचें यश व मुसलमानी धर्म प्रबळ राखणें वगैरे संपूर्ण लक्षणें, अति उत्तम फार पसंत, सुलतान महंमद पादशाहाचे शरीरांत होतीं. सुलतान महंमद पादशाहा याणी उतम लक्षणेंकरून सर्व पाहशाहांवर चढ केला होता. परंतु सुलतान महंमद याचें अंतकरणांत एक मनोरथ मात्र पूर्ण जाहालेला नव्हता. ही आवड होती कीं, तक्तास व मुगुटास शोभावयाजोगा व राजधानीचा सर्व भार चालवायाजोगा पुत्र होऊन आपले मागें, म्हणजे आपण वारल्यानंतर तो आपला पुत्र तक्ताचा धनी व्हावा. असा पुत्र व्हावा अशी बहुत आवडी होतीं. यास्तव रात्रंदिवस बहुत काकुळती येऊन ईश्वरास प्रार्थना करित होता. ईश्वराचे अत्यंत कृपेचे योगानें तेंहि मनोरथ पूर्ण जाहाले, म्हणजे पुत्र जाहाला असतां नेत्रांस तेज व चित्तास आनंद प्राप्त होतो त्या प्रकारचा पुत्रहि ईश्वरानें दिल्हा.

## २. अली आदिलशाहाचे जन्मकाळाचें वर्णन प्रकर्ण :

ज्या समई नक्षत्र व ग्रहगणांची दृष्टि कल्याण, सुदैवपणा, ऐश्वर्याची वढती व दिवसेंदिवस योग्यता अधिकअधिकच होती त्या उत्तम मुहूर्ताचे वेळेस तारिख

१६ रबिलाखर सन एक हजार आठेचाळीस (१६ आगष्ट १६३८) रोजीं पुत्र जन्मास आला. तेणेंकरून दौलतीस बहुतच तेज आलें. पृथ्वीस व पृथ्वींतील राहणारांस बहुत बहुतच सुख व आनंद प्राप्त जाहला. सुलतान महंमद पादशाहा ईश्वराचे कृपेनें आपल्यास पुत्र जाहला येणेंकरून अत्यंत आनंद पावोन ईश्वराचा बहुत स्तव करिता जाहला. ईश्वरानें हा पुत्रलाभ दिल्हा यास्तव आपला समुद्रासारिखा विस्तीर्ण उदारपणाचा हात उघडून खजिन्याचीं कुलपें मोकळीं केलीं. अत्यंत द्रव्य देऊन सर्व लहानथोर, तरुण व वृध्ध लोकांस पूर्ण सुखी केलें. जितके दरिद्री होते तितके लोकांस या द्रव्य देण्यानें तालीवार केलें. पुन्हां त्या लोकांनीं कोणापाशीं द्रव्याकरितां इच्छा करावी असें टेविलें नाहीं. इतका पैका वाटला.

### ३. सुलतान महंमद पादशाहाचे पुत्राचें पालन करण्याविषईं हाजी बडेसाहेबा म्हणजे सुलतान महंमद कुतुबशाहाची कन्या इणें पतकर घेतला तें प्रकर्ण :

महान पतिव्रता व शुध्ध आचारवान हाजी बडेसाहेबा कैलासवासी सुलतान महंमद कुतुबशाहा पादशाहा यांची कन्या ही सुलतान महंमद आदिलशाहा याचे महालांत राहणारी. इणें सुलतान महंमद आदिलशाहा यास विनंती करून त्या पुत्राचें पालन करण्याचें काम आपलेकडे घेऊन, आपण आनंदमहालांत रहात होती. त्या आनंदमहालांत तो पुत्र आणिला. त्या मुलाचें पालन करण्याविषईं किंचितहि आळस न करितां जीवादारम्य व मनापासून पालन करण्याविषईं यत्न करित होती. त्या मुलास जिवाहून व पृथ्वीचे राज्य प्राप्त झाल्याचे आनंदाहून अधिक हा पुत्र आहे असें जाणून त्याचें पालन करित होती. हा पुत्र आपले जिवाचा विसावा आहे असें जाणत होती. खानगी आका म्हणोन कविता करणारा कवि हुजूर चाकरीस होता. त्याणें ह्या पुत्राचे जन्मकाळाची तारिख निधावी व हा पुत्र कशाप्रकारचा आहे हेंहि वर्णन त्या कवितेंतच व्हावें अशाप्रकारची कविता करून ती कविता हुजूर आणून निवेदन केली. त्या कवितेचा अर्थ : "इनसाफास आधार बहु, पादशाहा व सर्व पादशाहांचा पादशाहा : तो पादशाहा कीं, ज्याची सेवा करण्याकरितां कालचक्रहि वांकले आहे : १ : इनसाफरूपी बागेंतील नवें उमललेलें पुष्प व पादशाहांचे पादशाहा तल्लक्षण वृक्षास तें फूल आलेलें : ईश्वरानें आपले कृपेनें हा पुत्र बक्षिस दिल्हा : २ : व नवे अस्मानावर राहणारे पैगंबर याणें बहुत आनंद व संतोषानें : शाहाजाद्याचे उपजल्याची तारिख 'कौलाबेष' व 'कत रसीद' या अक्षरांत वर्णिली आहे. 'कौलाबेष' व 'कत रसीद' इतकीं अक्षरें अबजदचे हिशेबानें गणिलीं

असतां १०४८ एक हजार अठेचाळीसचा (इ. स. १६३८) सन निघतो. या सनांत हा पुत्र जन्मास आला : ३ :" या प्रकारची कविता करून हुजूर आणोन हजर केली. तेव्हां खानगी आका याचें मनोरथ पूर्ण व्हावयाजोगें द्रव्य बक्षिस दिल्हे.

## ४. शाहाजाद्यास विद्याभ्यास करावयाकरितां मुहूर्त करणें व बिसमिल्ला-खानीचा समारंभ प्रकर्ण :

या पुत्राचें वय जेव्हां चार वर्षें चार महिने व चार दिवसाचें जाहलें तेव्हां पैगंबराचे धर्माप्रमाणें पादशाहा याणी, सुलतान महंमद आदिलशाहा याणें, बहुत समारंभाची मोठी कचेरी करून तारीख २० विसावी माहे साबान रोज शुक्रवार सन एक हजार बावन (४ नवंबर १६४२) रोजीं सहस्रावधी आनंदानें मुलास विद्या-शाळेस घालण्याचे मार्गानें बिसमिला पढविण्याची चाल प्रसिद्ध केली. त्या मुलास बहुत मर्यादेच्या चाली शिकविणारे पूर्ण अकलवान व चांगले चालीचे सुलक्षणिक पंतोजी नेमून रात्रंदिवस अभ्यास करऊन थोडकेच दिवसांत तो पुत्र पढण्यांत, लिहि-ण्यांत, पादशाही मर्यादा करण्यांत, पैलवानी विद्येंत, घोडे फेरण्यांत, तरवार मारण्यांत, भाले मारण्यांत व तीर मारण्यांत वगैरे संपूर्ण विद्येंत, पादशाहास जसे अभ्यास असावेत तशा प्रकारचा तो पुत्र तयार केला.

## ५. शाहाजाद्याचीं सुंता करण्यास समारंभानीं कचेरी करणें प्रकर्ण :

शाहाजाद्याचें वय सात वर्षाचें झालें तेव्हां इबराहिम हालिल्लुल्लाह याणीं सुंता करण्याचा मार्ग ठरविला आहे त्याप्रमाणें शाहाजाद्याची सुंता करणें ठराऊन, बहुत समारंभाची कचेरी करून, शुक्रवारचे रात्रीं तारिख ६ सहावी माहे रजब सन एक हजार चौपन (२० आगष्ट १६४४) रोजीं सदरहू सुंतेबद्दल शहरांतून स्वारी फिरण्याचा फारच समारंभ केला.

## ६. अली आदिलशाहा याणी तक्तावर बसणें प्रकर्ण :

जेव्हां कैलासवासी सुलतान महंमद आदिलशाहा बादशाहा मरण पावोन परलोकास गेला तेव्हां हाजी बडेसाहेबा इणें व कारभारी खान महंमद वजीर

ममलकतमदार व संपूर्ण कारभारी व कामदार याणी तारिख २६ माहे मोहरम रोज मंगळवार नऊ घटका दिवसास ( ४ नवंबर १६५६ ) पूर्ण जोतिष जाणणारे जोशी याणीं मुहूर्ताची वेळ सांगितली होती तेच वेळेस सन एक हजार आडसष्ट १०६८ ( १६५७ ? इ. ) सालीं उत्तम दैववान अली आदिलशाहा याजला एकोणिसावे वर्षाचे वयांत पादशाही राजधानीचे तक्तावर बसविलें. तेव्हां एक तात्काळ कविता करणारे कवीनें अली आदिलशाहाचे तक्तावर बसल्याचें वर्णन करून तक्तावर बसल्याची तारिखहि त्या कवितेंतच बांधली आहे. त्या कवितेचा अर्थ : "दक्षणचा पादशाहा तक्तावर बसला. त्या सालची तारिख कळावयाकरितां : विष्णुदूतांनीं प्रातःकाळीं दीर्घस्वरांनीं येऊन सांगितलें : १ : या बोलण्यांत शेवटचें अक्षर नाहीं : सुलतान महंमद पादशाहाचे ठिकाणीं आली आदिलशाहा बसला आहे : २ :" 'ज्याजषीनें महमदस्त आली' या अक्षरांपैकीं शेवटचें 'ये' हे अक्षर टाकून बाकीचीं अक्षरें अबजदचे हिशेबानें गणिलीं असतां एकशें ( ? हजार ) सदुसष्टचा ( १६५६ इ. स. ) सन निघतो. या सालीं आली आदिलशाहा तक्तावर बसला व अबदुल नबी दबीर याणीहि आली आदिलशाहा तक्तावर बसल्याची हीच तारिख वर्णन करून पारसी बैत केली आहे, त्या पारसी बैतेचा अर्थ : "सुलतान महंमद पादशाहाचे नंतर आली आदिलशाहा याणी राज्यभार चालविला. तें 'जोबते शाहीजद : बाआदे महंमद आली' इतकीं अक्षरें अबजदचे हिशेबानें गणलीं असतां एक हजार अडुसष्ट ( १६५७ ? इ. स. ) सालचा सन निघतो. कविता चांगली केली यामुळें एक सालची तफावत येती, ही चूक धरावयाजोगी नाहीं. 'मुक्ल महंमद कुली' याणें सदरहू तक्तावर बसलेली तारिख बांधून ही कविता केली आहे. कवितेचा अर्थ : "ईश्वराचा उपकार आहे. कारण कीं, ईश्वरानें या तक्तावर बसविलें : त्या पादशाहाचे तेजानें सूर्य पृथ्वीस तेजस्वी करिता जाहला : १ : संपूर्ण पादशाहा मंडळींत अली आदिलशाहा यास थोरपणा शोभतो : कारण की, सुलतान महंमद पादशाहाचे मुल्कास अली आदिलशाहासारखा धनी जाहाला : २ : अली आदिलशाहा तक्तावर बसण्याची तारिख बांधावी असा मी पूर्ण अकलेलें विचार केला : तेव्हां पैगंबर याणीं मला सांगितलें कीं सुलतान महंमद पादशाहा वारल्यानंतर आली आदिलशाहा मालक झाला : ३ :" अमीरुल मोमिनीन व आदशान महंमद बुद आली : इतकीं अक्षरें अबजदचे हिशेबानें गणिलीं असतां एक हजार अडसष्ट सन निघतो. एक हजार सदुसष्ट सालीं आली आदिलशाहा तक्तावर बसला. परंतु कवितेमुळें एक सालची तफावत येती. ही मोठी चूक आहे असें नाहीं. सारांश, नाना प्रकारच्या कविता तारिख बांधलेल्या करून आणणारे हर एक कवीस बहुत बक्षिस व इनाम दिल्हें. आली आदिलशाहा तक्तावर बसले तेव्हां आधीं राजधानीचे व मुलकाचे बंदोबस्ताचीं कामें ममलकत मदार खान महंमद याचे

विचारें चालत होतीं. खान महंमद यास 'खानखाना' असा किताब मिळाला होता. तो खान महंमद जेव्हां मरण पावला तेव्हां राजधानीचे बंदोबस्ताचीं कामें व महाली व मुलकी कामांचे बंदोबस्ताचा कारभार ममलकत मदार इब्राहिमखान याजकडे जाहाला. पादशाहाची मातोश्री बडेसाहेबा ही मकेस निघाली. तेव्हां त्यांचे समागमें इब्राहिमखान याणीहि मकेस जाण्याचा इरादा केला. तेव्हा मदारुलमहामी, म्हणजे मुख्य कारभारीपणाचा अधिकार व मुख्य वजिरीचा अधिकार, इब्राहिम याचा पुत्र अबदुल महंमद याजकडे जाहाला. अबदुल महंमद याणी आली आदिलशाहा पादशाहाचे कारकीर्दीचे अखेरीपर्यंत आदिलशाहाचे राजधानीचें कामाचा बंदोबस्त बहुत उत्तमपणें आपले विचारानें चालविला व काम बहुत पसंतपणानें व बहुत तेजानें करित होता.

### ७. अली आदिलशाहा तक्तावर बसले त्या पहिले सालींच मोंगलाचे प्रबळपणानें बेदर व कल्याणचा कल्याणीचा किल्ला आदिलशाहाचे हातांतून जाणेचें प्रकर्ण :

पूर्वीचे कथाभागावरून जाहिर होतें कीं, तैमूर पादशाहाचे अवलादीस दक्षिणचा मुलुक हस्तगत करण्याचा पूर्ण इरादा होता. अकबर पादशाहाचा तर येविसीं पुरा इरादा होता. त्यानंतर अकबरशाहा पादशाहाचे वंशानींहि दक्षिण देश घेण्याकरितां बहुत हल्ला व वारंवार गर्दी केली. तेव्हां युक्तियुक्तीनें कांहीं दक्षिणचा मुलुक त्याणी हस्तगत केला. प्रथम खानदेश, नंतर वराडचा मुलुक, हस्तगत केला. शेवटीं दक्षिणदेशचे मुलुक निजामशाहाचे हस्तगत होते त्या मुलकावरहि चाल करून युध्ध करित होते. तेव्हां शहाजहान पादशाहा याणी सुलतान महंमद पादशाहासी निजामशाहाचा निमोनिम मुलुक वाटून घेण्याविषई मसलत केली. उभयतां पादशाहांमध्यें अहदनामा, म्हणजे करारमदाराचे पत्रहि, लिहिले [१] गेले. त्याच करारमदारावर निजामशाहाचा निमे मुलुक मोगलाच्या हाती गेला. निमे मुलुक आदिलशाहाचे हातीं राहिला. सुलतान महंमद पादशाहा वारल्यानंतर ते करारमदार सुलतान महंमद पादशाहा व शहाजहान पादशाहा या उभयतांत ठरले होते त्याबद्दल करारनामा लिहिलेला प्रत्यक्ष असतां व शहाजहान पादशाहाहि अद्याप जिवंत असतां त्याचा पुत्र अवरंगजेब याणी त्या करारमदाराप्रमाणें न चालून आदिलशाहाचे मुलकावर फौज घेऊन चालून येऊन बेदरचे किल्यावर हल्ला चालू

१. MAN, p. 91-95; 'मालोजीराजे व शाहाजीमहाराज,' पृ. २०७–२१०.

केला.[२] अली आदिलशाहा याणी तक्तावर बसलेले पहिलें साल असून व अद्यापि अली आदिलशाहाचे मनोगताप्रमणें राजधानीचा बंदोबस्त झाला नव्हता असें असतां अफजलखान व मलिक रयहान या उभयतासमागमें कित्येक अमीरलोक व फौज देऊन बेदरचे कुमकेवर रवाना केले. आदिलशाहाकडील मलिक मर्ज्यान म्हणोन तेथील किल्यांचे बंदोबस्ताचे कामावर किल्लेदार होता. त्याणें मोगलासी युध्ध करून सहा महिनेपर्यंत एकसारखी लढाई केली. शेवटीं तारिख २५ पंचवीसावी माहे जमादिलाखर रोज मंगळवार सन एक हजार सदुसष्ट (३१ मार्च १६५७) बेदर मोगलाचे, म्हणजे अलमगीर पादशाहाचे, हातीं गेला यद्यपि आदिलशाहाचे व मोगलाचे, म्हणजे अलमगीर पादशाहाचे, फौजेंत परस्परें मोटमोठाल्या लढाया जाहाल्या व उभयतांकडीलहि बहुत मनुष्यें ठार जाहालीं व लुटलीं गेलीं. केव्हां केव्हां आदिलशाहाकडील फौजेचा चढ होत होता व केव्हां केव्हां दिल्लीकडील अलमगीर बादशाहाचे फौजेचा चढ होत होता. यानंतर अलमगीर बादशाहा याणें तारिख २८ माहे रजब (३ मे १६५७) रोजीं कल्याण(णी)चे किल्यावर हल्ला सुरू केला. तीन महिन्यानंतर तारिख २७ माहे सवाल (२९ जुलै १६५७) रोजीं अलमगीर पादशाहा याणें तोहि किल्ला इस्तगत केला.[३] त्याच थोडे दिवसांत शिवाजी भोसले याणी जुनरचे शहरावर चालून येऊन जुनर शहर लुटून फडशा केला व दंगा उभा केला.[४] हें प्रकर्ण समाप्त.

२. चैत्र वद्य ११ रविवारी घटी ८ शके १५७९ (२९ मार्च १६५७) अवरंगजेबानें आदलशाहापासून बेदर घ्यावयाचा तह केला आणि बेदरास आले. आषाढ शुद्ध ३ गुरुवार शके १५७९ (४ जून १६५७) (औरंगजेबानें) बेदर घेतलें.– जेधेश, शिचप्र, पृ. १८. 12th Rabi-us-sani, Julus 30 (18th January 1657) Aurangzeb left for the capture of Bedar, reached Chandor about 1st February 1657, 23rd Jumadasani, Julus 31 (29th March 1657), ascended the fort and about 23rd April the fort fell to the Mogal.–Amal-i-Salih E D., VII, p. 124–126.

३. On the 23rd of Rajab, Julus 31 (28 April 1657) Aurangzeb marched against Kalyani, on 29th (4 May 1657) reached that place, and on the 1st Zilqada 1068 A. H. (31 July 1657) the keys of the fortress were given up to the Prince"–Amal-i-Salih, E. D., VII, p 127–128.

४. जेष्ट मासीं, शके १५७९ (मे १६५७) नौसिरखान यासी युध्ध अहमदनगरीं राजश्री सिवाजीराजे याणीं केलें.– जेधेश, शिचप्र, पृ. १८.

## ८. खानखाना खान महंमद याणी ठार होण्याचे कारणाचें वर्णन प्रकर्ण :

याच कांहीं दिवसांत दिल्लीकडील पादशाहा आदिलशाहाचे मुल्कावर चालून येऊन हल्ला करित होते व लुटालुट करित होते. तेव्हां आपले मुलकाचे संरक्षण करण्याकरितां व शत्रूचें निवारण करण्याकरितां आदिलशाहा याणी खानखाना खान महंमद याजला कित्येक अमीरलोक व फौज बहुत मजबूत सामान सरंजामानसी समागमें देऊन शत्रूवर नेमिलें होतें. तेव्हां खानखाना खान महंमद फौज व अमीर-लोकसुध्धां सरहदीवर जाऊन पोचून आपला मुलुक व आपले सरहदीचे संरक्षणार्थ बहुत बंदोबस्त ठेवित होता. संधी व फुरसतीचे समयाची मार्गप्रतिक्षा करित होता. अशा समयांत एके दिवशीं बातमी पोचविणारे बातमीदारांनीं खानखाना खान महंमद यास बातमी कळविली कीं, दिल्लीकडील फौज दोन तीन मजलीवर चालून येऊन पहाडांत अवघड बारीनें उतरून येण्याचा इरादा ठेवित आहे. अशी बातमी सांगितली. हें ऐकतांच खानखाना खान महंमद याणी तेच वेळेस लस्करची तयारी करून आपलें जाग्याहून पुढें चाल केली. एक रात्रींत मजला काढून दिल्लीकडील फौजेवर जाऊन पोचला.[५] शत्रूची फौज येऊं नये असा येण्याचा मार्ग बंद केला. जेव्हां दुसरेकडील पर्वतांतून व झाडींतून व दर्यांत लस्कर उतरलें होतें त्या दिल्लीचे लस्करास बाहेर जाण्याचा मार्ग बंद केला. खाण्यापिण्याचा सरंजाम वगैरे सामान होतें तेंहि मरलें. बाहेरून रसद येऊन पोचण्याची आशा खुंटली. जेव्हां याप्रकारची दशा व असा प्रसंग दिल्लीकडील फौजेवर गुजरला तेव्हां अलमगीर बादशाहा चिंतेंत पडोन खानखाना खान महंमद याजला अलमगीर पादशाहा याणी पत्र लिहिलें. त्या पत्रांतील मजकूर या प्रकारचा होता कीं, जरकरितां या समई आमचें श्रेष्ठ खानदानीचे कीर्तीवर नजर ठेऊन सख्य करण्याचा मार्ग स्वीकारल्यास, आमची अबरू संरक्षण करण्यावर नजर ठेऊन कार्य केल्यास व आम्हांस बाहेर निघोन जाण्यास मार्ग मोकळा केल्यास करारमदार ठरविले जात आहेत कीं, आदिलशाहाचे राजधानींतील मुख्य कारभारीपणाचे व मुख्य वजिरीचे कामावर तुम्ही आहांत तोंपर्यंत तुमचे वंशापैकीं कोणी सदरहू कामावर आहेत तोंपर्यंत दोस्ती व पूर्ण मित्रतेच्या करारावर नजर ठेऊन आम्हीं वागूं. यानंतर कोणीहि वाईट दृष्टीनें व दूर्बुध्धीचे नजरेनें हिंदुस्थानचे पादशाहांपैकीं कोणीहि विजापुराकडे पहाणारा नाहीं. असें बोलण्यांतहि आहे कीं, ज्यासमई खानखाना खान महंमद याणी आसरची निमाज करून दुसरी निमाज पढावयास आसनावर बसला होता तेव्हां बातमी सांगणारानीं ही बातमी खानखाना

५. On the 8th of Rajab, Julus 31 (13 April 1657) Jan Muhammad and Afzal and Rustam etc. made their appearance near the Royal army.– Amal–i– Salih, ED., VII, p. 127.

खान महंमद यास सांगितली. सदरहु अलमगीर पादशाहाचें पत्र खानखाना खान महंमद यास आणून दिल्हें तेव्हां तें पत्र खानखाना खान महंमद याणी वाचून पाहिल्यानंतर खानखाना खान महंमद याचे मुखांतून अक्षरें निघालीं कीं, ही चिठी मरणाचीच येऊन पोचली आहे, म्हणजे या पत्रानें माझे मरणाचा निरोप सुचविला आहे, असें बोलला. नंतर बहुत विचार करून त्या पत्राचे पाठीमागें जाब लिहिला कीं, उदईक मोठे प्रातःकाळीं आपले फौजेची तयारी करून लष्करसुध्धां आम्हांकडील फौज उतरली आहे, त्या फौजेवर येलगार करून त्या आमचे फौजेंतून आपण सुरक्षितपणें आपले फौजेसुध्धां निघोन जावें. असा जाब लिहून पत्र घेऊन जासुद आला होता त्या जासुदास निरोप दिल्हा. अलमगीर पादशाहा याणी त्या पत्रावरील जाब वाचून पाहून त्यांत लिहिलेले सुचनेप्रमाणें त्याच रात्रीस फौजेसुध्धां तयार होऊन खानखाना खान महंमद याचे फौजेवर चाल केली. तेव्हां खानखाना खान महंमद याचे फौजेनें कांहीं एक गर्दी व मारामारी न करितां जागचे जागीं उभेच राहून अलमगीर बादशाहास फौजेसुध्धां निघोन जाण्यास मार्ग दिल्हा. तेव्हां अलमगीर बादशाहा आपले एकंदर फौजेसुध्धां सुरक्षितपणें बाहेर निघोन गेला. कैदेंतून सुटला. पिंजऱ्यातून पक्षी सुटला म्हणजे फार जलद भरारी मारून उडून जातो याप्रकारें निघोन गेला. खानखाना खान महंमद याजकडील सरदार व अमीरलोक होते त्यांणीं जाणलें कीं, अलमगीर बादशाहा याणी रात्रीं खानखाना खान महंमद याचे लष्करावर छापा घालून मैदानांत पळत निघोन गेला. असें जाणोन त्या अमीर व सरदार लोकांनीं अति त्वरेनें पळत येऊन खानखाना खान महंमद याजपाशीं पोचले आणि बोलिले कीं, अद्यापि हातांतून काम गेलें नाहीं, म्हणजे अलमगीर बादशाहा फार दूर गेला नाहीं, तोंच त्याचा पाठलाग करून अलमगीर बादशाहास पुन्हां आम्ही पकडून आणितो. अशी संधी पुन्हां येणार नाहीं. असें बोलिले तेव्हां खानखाना खान महंमद याणीं सदरहू अमीर व सरदार मंडळास उत्तरें दिल्ही कीं, आतां हातांतून सुटून गेला तो जाऊं द्या. त्याजला सोडा. अलमगीर बादशाहावर एवढें उपकाराचें ओझें असूं द्या. हा तुमचा उपकार बहुत वर्षे दिल्लीवाले पादशाहावर राहील. तुमची कीर्ति या करण्यांत बहुत दिवस कायम राहील. असें बोलला तेव्हां या वेळेस यद्यपि संपूर्ण अमीरलोक व सरदार मंडळ हें बोलणें ऐकून स्तब्ध राहिले परंतु अफजलखान शूरत्वांत व पराक्रमांत सर्वाहून अधिक होता. तो पुढें चालून येऊन खान महंमद यास बोलिला कीं, असा दिवस पुन्हां येणार नाहीं व अशी संधी पुन्हां हातीं येणार नाहीं. तैमूर पादशाहाचे वंशांत ज्या पुरुषाचा मजला बहुत अंदेशा आहे तो हाच शाहाजादा आहे. याजला जेव्हां पकडून आणूं तेव्हां पुन्हां कोणीच दिल्लीकडील मनुष्य दक्षिण देशाकडे चालून येणार नाहीं व पुन्हां आमचे नांवहि घेणार नाहीं. अशी जरब पडेल यास्तव या शाहाजाद्यास पकडून

आणावा. असें बोलला तेव्हां खान महंमद याणीं उत्तर दिल्हें कीं, सत्य आहे. तुम्ही बोलता असेंच आहे. कारण कीं, तुम्हीं उत्तम विचारावरच नजर ठेवितां, यांत कांहीं अन्यथा नाहीं. परंतु हा शाहाजादा दिल्लीचा पादशाहा व हिंदुस्थानचे मुलकाचा धनी आहे. त्याजला पकडून त्याची खराबी करावी तर मोठा धांदलीचा व अनर्थाचा समुद्रच उसळेल. दक्षिण देशांत बहुत प्रलय होईल. असें मला वाटतें कीं, या शाहाजाद्याची खराबी केली असतां आकाश देखील तुटून पडेल. यास्तव जें झालें तें बरें झालें. गेला तो जाऊं द्या. असें बोलला तेव्हां अफजलखान धैर्य धरून पुढें चालून येऊन बोलला कीं, अहो खान महंमद, तुम्ही असें समजूं नका कीं, ही गोष्ट अशीच राहील. नांवाचा अफजलखान आहे. यद्यपि आकाशहि तुटून पडलें तत्रापि मी आपले हाताचा धीर देऊन तें आकाश उचलून धरीन व उभे करीन. असें बोलून दिल्ली येथील पादशाहा पळून गेला त्याचा पाठलाग करून त्याजला पकडून आणण्याविषईं बहुत आग्रह करित होता. खान महंमद त्याचा आग्रह मोडून टाकण्याविषईं बहुत यत्न करित होता व नाना प्रकारचे बाहाणे सांगून ही गोष्ट मोडित होता यानंतर अफजलखान याणी या करण्यांतील तात्पर्य लक्षांत आणून निर्भयपणें दोन तीन शब्द फारच वाईट व कठीण बोलून उठोन उभा राहिला आणि तेच वेळेस नौबत वाजऊन कूच केलें. विजापुरास येता झाला. वाटेनें बहुत जलदीनें चालत होता. ज्या दिवशीं विजापुरास येऊन पोहचावयाचे ते दिवशीं अत्यंत क्रोधायमान होऊन, पट्टा म्हणोन हत्यार असतें ते, पट्टे दोनी हातांत चढऊन दरबारांत चालून आला. तेव्हां वाड्यांतील लोकांनीं पादशाहास खबर दिल्ही कीं, अफजलखान दोनी हातांत पट्टे चढऊन अत्यंत क्रोधायमान होऊन निर्भयपणें हुजूर येत आहे. अशी खबर दिल्ही तेव्हां पादशाहानीं आज्ञा केली कीं, जसा येत असेल तसा येऊं द्या, म्हणोन सांग. असें बोलले त्यावरून अफजलखान तख्तासंनिध येऊन पोहचला. तेव्हां ते हातांतील दोनी पट्टे काढून जमिनीवर आपटले आणि बोलला कीं, 'खुदावंत आपले चाकरानीं, म्हणजे महंमदखान याणी, आपला कारखाना खराब केला. पादशाहानीं सविस्तर मजकूर समजून घेतल्यानंतर पादशाहास फारच वाईट वाटलें. जिवापासून खान महंमद याजवर इतराजी होऊन फार फारच क्रोधायमान झाले. खान महंमद याजला फौजेसुध्धां परत येण्याविषयीं आज्ञापत्रें रवाना केली. खान महंमद याणी पादशाहाकडील पत्र आलें ते दिवशींच दूरवर विचार करून आपले कामाचा परिणाम वोळखिला होता. मरणावर उदार झाला होता. या करण्यांत मरण खास येतें असें जाणिलें होतें. आज्ञापत्रें सादर होतांच परत निघोन कांहीं मजली करून सावकाश व ढिलाईनें चालत चालत आयुष्याचे दिवस गेले तितकेच गेले असें जाणोन हळूहळू येत होता. एके दिवशीं कूच केलें म्हणजे तेथें दोन तीन मुकाम करित होता. सारांश, कित्येक दिवसानंतर विजापुरास येऊन पोहचला. जे दिवशीं विजापूर शहरांत येऊन दाखल

व्हावयाचें ते दिवशीं मक्का दरवाज्यांत दोन मोंगल हातांत मोठी मोठी जलद धारेची हत्यारें घेऊन दोन बाजूस दोघे उभे राहिले होते. खान महंमद याची पालखी दरवाजांत नेमकी येतांच ते दोघे मोंगल दोहीकडून धाऊन येऊन हत्याराचे वार करून खान महंमद यास तोडून टाकिलें.[६] खान महंमद वारल्याची तारिख 'आह खान महंमद शहीद' याचा अर्थ, अरे अरे, खान महंमद ठार झाला. असा अर्थ होतो. 'आह खान महंमद शहीद' इतकी अक्षरें अबजदचे हिशेबानीं गणिलीं असतां एक हजार अडसष्ट (१६५७–८ इ. स.) सालचा सन निघतो. या सालांत खान महंमद मारला गेला. 'दगादादंद' याचा अर्थ दगा केला असा होतो व 'दगादादंद' इतकीं अक्षरें अबजदचे हिशेबानीं गणिलीं असतां एक हजार अडसष्ट (१६५७–५८) सन निघतो. या सनांत खान महंमद ठार झाला.

९. एक कथाभाग वर्णिला जात आहे :

जेव्हां खान महंमद याचे प्रेत घायाळ झालेलें भूमींत पुरलें तेच रात्रीं खान महंमदाकडील निसबतीचे मनुष्यांपैकीं एका मनुष्यास स्वप्न पडलें कीं, खान महंमद त्याचे स्वप्नांत येऊन बोलताहे कीं, माझें लहान बोट माझे प्रेतासमागमें जमिनींत पुरलें नाहीं. ज्या दरवाजांत मजवर तरवारीचे वार झाले त्या दरवाजांतच माझें बोट तुटलेलें पडलें आहे. तें माझें बोट मजपाशीं जमिनींत पुरावें. माझे शरीरापैकीं माझें बोट दफन न करितां वाया जाऊं देऊं नये, दफन करावें असें स्वप्न पडलें. नंतर तो मनुष्य स्वप्नापासून जागा झाला आणि तें बोट हुडकावयास मनुष्यें धावलीं तेव्हां तें बोट दरवाजाचे तळास एके बाजूस पडलें होतें तें सापडलें. तेव्हां तें बोट तेथून उचलून खान महंमदाचे कबरेसंनिध आणोन पुरलें. बोलण्यांत असें आहे कीं, प्रतीवर्षी विजापुरचे पादशाहा दिल्लीचे पादशाहास खंडणीचा ऐवज देत होते तो त्याच सालीं खान महंमद याजला विजापूरचे पादशाहानीं जीवें मारिलें तेव्हां अलमगीर पादशाहानीं आज्ञापत्र पाठविलें कीं, खंडणीचा ऐवज साल मजकुरीं या सरकारांत पाठऊं नये. तो ऐवज तेथेंच खान महंमद याची कबर बांधण्याचे इमारतीकडे खर्च करावा. असें आज्ञापत्र पाठविलें यास्तव खान महमद याचे कबरेची इमारत फार थोर झाली.

६. शके १५७९ कार्तिक शुध पौर्णिमेस (१० नवंबर १६५७) खान महंमद बडे साहेबिणीनें मारिला.– जेधेश, शिचप्र, पृ. १८.

## १०. शिवाजी वलद शाहाजी भोसले याणीं आपले धण्यासी बदलून बंडावा व माजुरपणा करण्यास प्रारंभ करणें प्रकर्ण :

सर्वांस जाहीर व्हावें कीं, कोंकणचा मुलख बहुत विस्तीर्ण व फार वमुलाचा आहे. त्यापैकीं बंदर चेवल व बंदर मुकेले व बंदर साष्टी वगैरे कांहीं कोंकणचे मुल्का-पैकीं डोंगरांतील व जमिनी व डोंगर व दऱ्या व खडकाच्या जागा बहुत आहेत. त्या व कित्येक अरण्यें व जंगलें आहेत. त्या अरण्यांत नारळांचें व मिरच्यांचे बहुत उत्पन्न होतें. कारण कीं, नारळाचीं वगैरे झाडें जागोजाग दाट गर्द वसलीं आहेत. पूर्वी त्यापैकीं विजापूरचे सरहद्दीनजिक जितकें होतें तितकें आदिलशाहाकडे होतें. त्यापैकीं कोंकणचा मुलुक निजामाशाहाकडे फार होता. जेव्हां निजामशाहाचे राज्य हस्तगत झालें तेव्हां निजामशाहाचा मुलुक शहाजहान पादशाहा दिलीवाले व आदिलशाहा या उभयतां पादशाहांनीं निमेनिम वाटून घेतला.[७] तेव्हां निजामशाहाकडे कोंकणचा मुलुक जितका होता तितका आदिलशाहाचे वाटणींत आला. सुलतान महंमद पादशाहा याणीं तो बहुत मुलुक बंदोबस्त ठेवणेंकरितां मुल्ला अहंमद याजकडे दिल्हा. परंतु त्यापैकीं दोन महाल, एक पुणें व दुसरें सुपें, शाहाजी राजे भोसले यांस जहागिरींत दिल्हे. शाहाजी राजे भोसले तेथें जेमदाराचे चालीप्रमाणें वतन सांभाळून सुलतान महंमद आदिलशाहा पादशाहाची[८] चाकरी करून आज्ञेंत वागत होते. सुलतान महंमद पादशाहा याणी जेव्हां युद्ध करण्याचा इरादा ठरविला तेव्हां थोर थोर सरदारांस फौज देऊन कर्नाटकाचा मुलुक हस्तगत करण्याकरितां नेमिलें. तेव्हां शाहाजीचीहि नेमणूक तिकडे झाली. त्या शाहाजीचा पुत्र शिवा हा आपले बापाचे तर्फेनें त्या दोन महालांची, म्हणजे पुणें व सुपें[९] या दोन महालांची, वहिवाट करित होता. ज्या दुखण्यांत सुलतान महंमद पादशाहा मरण पावले तें दुखणें जेव्हां सुलतान महंमद त्यास प्राप्त झालें आणि तें दुखणें लांबणीस पडलें तेव्हां विजापूरचे मुलकांत कांहीं धांदल झाली. ते समईं मुल्ला अहंमद म्हणोन कोंकणचे मुलकाचे बंदोबस्ताचे कामावर नेमिला होता तो तेथें राहून मुलकाचा बंदोबस्त ठेवित होता. त्याजला सुलतान महंमद पादशाहानीं हुजूर विजापुरास बोलाऊन

७. The treaty was signed by Adilshah on 31st May 1635.– M. Nama, p. 95.

८. वजीर किंवा सेनापती म्हणून नव्हे तर 'फर्जंद' म्हणून शाहाजी आदिलशाही सेनापतींस साह्य करित होते.– करार, जेधेक, शिचप्र, पृ. ४०.

९. शके १५७७ पौष शुध चतुर्दसीस (३१ दिसेंबर १६५५) शिवाजीनें जावळी घेतली. शके १५७८ आश्विन वद्य पक्षीं (आक्टोबर १६५६) सुपें घेतलें.– जेधेश, शिचप्र, पृ. १८.

आणिला. त्यामुळें तो कोंकणचा मुल्क मोकळा पडला. त्या मुलकाचा बंदोबस्त नाहींसा झाला. शिवा भोसला हा फार दांडगा व अमर्यादपूर्ण हिले व मकरबाज होता. त्याणी ही फुरसतीची संधी जाणोन व अशी वेळ पुन्हां येणार नाहीं असें चित्तांत आणोन त्या मुलकांत बहुत प्रळय व दंगा उभा केला. फारच गर्वास आरंभ केला. जलद फितूर व बंडावा करण्याचे स्वभावाचे चालीची बहुत जमात जमविली. ती मंडळी त्याचे कुटुंबांतील, त्याची आप्तविषईच होतीं. ती मंडळी जमऊन प्रथम नानाप्रकारच्या लबाड्या करून हरएक हुनरानें जुनरचा[१०] किल्ला शिवा याणें हस्तगत केला. बाकी-चेहि किल्ले, ज्यावर कांहीं सामान सरंजाम नव्हता रिकामे होते ते किल्लेहि, घेतले. त्या समयांतच सुल्तान महंमद पादशाहाचे आयुष्य सरलें आणि पादशाहा मरण पावले. हें अत्यंत शोकाचें वर्तमान शिवास कळलें. हें वर्तमान पूर्ण दुःखाचें असोन त्या धण्यासी बदलणारास व बंडखोरास, म्हणजे शिवास, हें वर्तमान बहुत खुष खबरीचें झालें. तेव्हां तर फारच आनंद पावोन दांडगेपणाचे व अमर्यादेचे पाऊल अधिकच पुढें टाकिलें, म्हणजे सुलतान महंमद मरण पावला असें ऐकतांच फारच दांडगाईस प्रारंभ करून संपूर्ण किल्ले व कोंकणचा एकंदर मुलुक शिवानी हस्तगत केला.[११] फारच दांडगेपणा करून अमर्यादेनें वागूं लागला. आली आदिलशाहाचे आज्ञेंत वागणें सोडिलें. हलीं व पूर्वी मिळोन चाळीस किल्ले सामानसरंजामानें भरलेले व त्या सर्व किल्यापैकीं राहेरचा किल्ला[१२] (रायगड) फारच मालानी व सामान सरंजामानीं भरलेला आहे तोहि किल्ला शिवा भोसला याणी हस्तगत केला.

## ११. आली आदिलशाहा पादशाहा याणी शिवाचे पारपत्य करण्याकरितां अफजलखान यास रवाना करणें व शिवानीं अफजलखान याजला दगा करून जीवें मारणें प्रकर्ण वर्णन :

शिवा भोसला याजला फारच गर्व व अभिमान झाला. दिवसेंदिवस अधिकअधिकच दांडगेपणा करूं लागला. तेव्हां आली आदिलशाहा पादशाहा

१०. शके १५७९ वैशाख मासीं (मे १६५७) शिवाजीनें जुन्नर लुटलें.– जेधेश, शिचप्र, पृ. १८.

११. शके १५७९ आश्विन वद्य १२ (२७ जुलै १६५७) कल्याण भिवंडी राजि-यानीं घेतलीं.– जेधेश, शिचप्र, पृ. १८.

१२. शके १५७८ चैत्र वद्य ७ (एप्रिल १६५६) शिवाजीराजे रायरीस आले. वैशाखमासीं (एप्रिल–मे १६५६) राजश्री शिवाजी राजे याणी रायरी घेतली.– जेधेश, शिचप्र, पृ. १८.

याणी जाणिलें कीं, या महिन्यांत आतां चाळढकलीवर नेणें व गाफिलगिरी करणें हें पादशाही कायद्यास फार विरुध्ध आहे. आतां शिवाचें पारपत्य करण्यास सुस्ती केली असतां राज्य बुडण्याचें कारण आहे. शिवाचे बंडाव्याचा अग्नि विझविणें प्राप्त आहे. त्याजला फारच गर्व व अभिमान झाला आहे तो दूर केला पाहिजे. असें जाणोन महान पराक्रमवान अफजलखान, दक्षणचे सर्व मुलकांत तसा कोणी शूर व हिंमतदार मनुष्य नव्हता असा सर्व शूरांत श्रेष्ठ होता व शिवा त्या अफजलखानाचा धाक व भय फारच वागवित होता, त्या अफजलखानास निवडक पूर्ण हिंमतदार दहा हजार स्वार समागमें देऊन त्या धण्यासी बदलणारे बेमानाचे, म्हणजे शिवाचे, पारपत्यावर रवाना केलें. अफजलखान तेथें जाऊन पोहचला. युध्ध पराक्रम करून शत्रूचे फौजेचा मोड करून शिवा याणीं जबरदस्तीनें मुलुक घेतला होता तो मुलुक त्याचे हातून सोडवून घेण्यास प्रारंभ केला. शिवानीं पाहिलें कीं, आतां अफजलखानापुढें आपलें सामर्थ्य चालत नाहीं व याचे पुढें युध्धास उभें रहाण्याचा दम चालत नाहीं. असें जाणिलें तेव्हां शिपाईगिरी व शूरत्व करण्याचा मार्ग सोडून देऊन पळून जाऊं लागला. लबाडीनें काकुलती येणें लटकाच गरीबपणा दाखऊन सख्य करण्याचें बोलणें घातलें. फार काकुलती येऊन व अति नम्रतेचा मजकूर लिहून तें विनंतीपत्र त्या निःष्कपट अंतःकर्णाचा, भोळसर मनाचा व लबाडीचे डावपेंच न जाणणारा असा जो अफजलखान त्या अफजलखानाकडे पाठविलें. आतां आपलें आमचें सख्य असावें व मजकडून जे अपराध घडले ते क्षमा करावे. मी पादशाहाची चाकरी करीन व आज्ञेंत वागेन व पुन्हां असा दांडगेपणा करणार नाहीं असें त्या विनंतीपत्रांत लिहिलें. अफजलखान हा साफ दिलाचा शूर होता. यामुळें त्या लबाडाचे व ठकबाजाचे डावपेंच लक्षांत आले नाहींत. शिवाजीचे गोड बोलण्यावरच फसून सख्य करिता झाला, सख्य झालें तेव्हां शिवा अफजल-खानाचे डेऱ्यास येऊन अति नम्रतेनें अफजलखानाची भेट घेतली. शिवाजी यांणीं आपले मनांतील कपटपणा व वाकडेपणा होता तो मनांतले मनांत कायम ठेऊन लटकाच गरिबीचा भाव दाखऊन अफजलखानास बहुत गोड बोलण्यांनीं विनंती केली कीं, आपणास मेजवानी करावयाची आहे याजकरितां आपण मेहरबानगी करून प्रतापगड पेटा जावली या किल्यावर भोजनास यावें. असें आमंत्रण केलें. शिवाजी त्यासमई प्रतापगडावरच राहिला होता. तेथें भोजनास बोलाविलें. अफझलखान हा जातीचा मुसमान साफ दिलाचा भोळसर होता. यामुळें शिवाजीस केवळ आपला असें समजून व शिवाजीचे मनांत कांहीं एक कपट नाहीं असें जाणोन गाफिलपणानें आपली एकंदर फौज किल्याचे माचीस टेऊन बारा असामी चाकर लोक बराबर घेऊन किल्यावर गेला. त्या ठकबाजी व कपटी पुरुषानें, म्हणजे शिवानीं, गुप्तपणें शत्रूस जीवें मारण्याची तयारी व बंदोबस्त करूनच ठेविलाच होता.

अफजलखान किल्यावर चढून येतांच याचे समागमें कोणीं एक स्वारशिबंदी वगैरे हत्यारबंद माणूस नाहीं, हा एकटाच गाफिलपणानें आला आहे, असें समजतांच तात्काळ अफजलखानावर गर्दी करून तरवारीचा वार करून जीवें मारिला. अफजलखान किल्यावर चढून येतांच किल्याचे दरवाजे बंद करावे अशी दरवाजेवरील पहारेकऱ्यांस आधीं सूचना होतीच. त्या सूचनेप्रमाणें दरवाजे बंद झाले होते. अफजलखानास शिवाजीनें या प्रकारची मेजवानी केली. अफजलखान याचें एकंदर लष्कर किल्याचे तळास राहिलें होतें. त्या फौजेनीं आपला धणी ठार झाला[13] असें पाहिलें तेव्हां एकामार्गें एक ती फौज मुसाट पळून गेली. हें प्रकर्ण सन १०७० (१६५९ इ. स.) सालीं झालें.

## १२. आली आदिलशाहा याणीं शिवाचे पारपत्यावर पुन्हां सिद्दी जवहार (जोहार) याजला सलाबतखान असें पद देऊन रवाना करणें प्रकर्ण :

हें वर्तमान कळतांच आली आदिलशाहा अत्यंत क्रोधायमान झाला. तो इमानी चाकर दौलतीचें कल्याण इच्छिणारा अफजलखान दग्यानीं मारला गेला येणें-करून बहुत शोक केला. त्या धण्यासी बदलणारे बेमान बंडखोरावर, म्हणजे शिवाजी-वर, फार फारच क्रोधायमान झाला. येविषईं शिवाचा सूड घेण्याचा इरादा करून इच्छित होता कीं, आपले सेवकांपैकीं जो पूर्ण हिंमतदार, शूर, अकलवान व पुन्हां शिवाजीचे लबाडीचे डावांनीं न फसणारा असा असेल तो या कामावर नेमावा. अशी पादशाहा मनांत योजना करित होते तोंच अशा समयांत महंमदपूर करनाल येथें सिद्दी जवहार हा रहात होता. त्याणीं बहुत दिवस बेमानपणानें व धण्यासी बदलून वागणूक केली होती त्या सिद्दी जवहाराचे विनंतीपत्र येऊन पोहचलें. त्या विनंती-पत्रांत हा मजकूर होता कीं, मी आपलें मीठ खाऊन वाढलों. पुरातन चाकर आहे. यद्यपि वाईट चालीचे लोक व फंद फितुर करणारे मनुष्यांचे शिकविण्यावरून मी आजपर्यंत गैरराहा वागलों. आपली सेवा जशी करावी व जसे आज्ञेंत वागावें तसा वागलों नाहीं. स्वामीचे सेवेविषयीं व दौलतीचे कल्याण इच्छिण्यांत मजकडोन फार अंतर पडलें. परंतु हल्लीं मी सर्व वाईट चालीनें वागण्याची चाल सोडून देऊन आपले आज्ञेंत वागण्याची चाल धारण करून इच्छित आहे कीं, मजकडून यापूर्वी जे अन्याय घडले ते सर्व वाईट चालीचे मार्ग सोडून देऊन व

१३. शके १५८१ मार्गशीर्ष शुध ७ सप्तमी गुरुवारीं आठवे तासीं (१० नवंबर १६५९) अफझलखान प्रतापगडचे माचीवर भेटीस आला. तेथें जीवें मारिला.– जेधेशा, शिचप्र, पृ. २०.

माझे कपाळीं बेमानपणाचा डाग लागला आहे तो पुसून टाकून आपले सर्व इमानी चाकरलोकांत येऊन दाखल व्हावे. अशी माझी पूर्ण आवड आहे. माझे मनांत अशी पूर्ण इच्छा आहे कीं, माझें विनंतीपत्र कबूल करून माझे अन्याय क्षमा करून मजला हुजूर येण्याविसी आज्ञापत्र सादर झाल्यास मस्तकाचे पाय करून, म्हणजे डोईचे वाटेनें, हुजूर येऊन हजर होईन. आपले सर्व सेवकांप्रमाणें चाकरी करून माझे आयुष्य बाकी राहिले आहे हें सरकारचे सेवेंत प्राण अर्पण करण्यास खर्च करीन. आपले दौलतीचें कल्याण इच्छिण्यांत जिवादारम्य यत्न करीन. आणखी ही इच्छा आहे कीं, मजला एकादे मोठे लढाईचे मोहिमेचे कामावर नेमावें, म्हणजे मी त्या कामांत स्वामीसेवेविषयीं प्राण कसा खर्च करावा ती सेवा करून दाखवीन. सरकारचे सर्व सेवक आहेत त्यांत मी नवीन आबरु वेतन मिळवीन. अशा मजकुराचे विनंतीपत्र लिहून पाठविलें. तें पत्र पादशाहानीं वाचून पाहिलें. पत्रांतील अभिप्राय जाणिला तेव्हां त्या विनंतीपत्राचें उत्तर लिहिलें कीं, आम्हांवर ईश्वराची पूर्ण कृपा आहे. दुसरे कोणी आम्हांस मदत करावी तेव्हां आमचे कार्य होईल असा अर्थ नाहीं. आमचें चित्त फार क्षमाशील आहे. केवळ लोकांचे अन्यायावरच दृष्टी आहे असें नाहीं. असेंच पारसी वाक्यांतहि आहे, त्या वाक्याचा अर्थ : "यद्यपि अपराध केले आहेत आणि ते क्षमा करावेत म्हणोन हुजूर येऊन हजर झालास तर ते सर्व अन्याय क्षमा केले, असें जाणावें : १ :" आरबी वाक्याचा अर्थ : "अपराध घडला असता पुरा पश्चाताप व्हावा, म्हणजे अपराध जसा केलाच नाहीं अशारीतीनें ईश्वर क्षमा करितो." जर करितां तूं ताळ्यावर आला आहेस तरी इकडूनहि तुजविसीं कल्याण्यांत अंतर नाहीं. याजकरितां मनांत कांहीं अंदेशा व भय न धरितां तूं हुजूर येऊन पोहचणें. या सरकारांतून तूं आपले कल्याण करून घे. पारसी बैतेचा अर्थ : "ये, ये, जसा आहेस तसा ये. : जर करितां हिंदु किंवा गब्र, म्हणोन एक पारसी जात निराळी आहे व त्या जातीचे लोकांत अग्निची पूजा आहे व त्यांचे घरीं बहुत वर्षांचा जुना अग्नि असतो त्यास गब्र असे म्हणतात तशा जातीचा, किंवा ब्राम्हण आहेस तत्रापि ये. : १ : ही आमचे राजधानीची जागा लोकांनीं निराशा होऊन जाण्याची जागा नोहे : शंभर वेळ जरी अपराध केला आहेस तत्रापि ये. : २ :" यांतील तात्पर्य हें आह कीं, हा हुकूम दाखल होतांच जसा असशील तसा हुजूर येऊन हजर हो असें लिहिलें. सिद्दी जवहार याणीं हें पादशाहाचे कृपायुक्त आज्ञापत्र वाचून पाहिलें तेव्हां अति संतोषानें कर्नोल येथून निघोन विजापुराकडे चालता झाला. पादशाहापासी हुजूर हजर होऊन पादशाहाचे बहुत इनाम व बक्षीस देण्यानें बहुत योग्यता पावता झाला. पादशाहानीं त्याचे सर्व मागील अपराध क्षमा केले. त्यानंतर पादशाहानीं आज्ञा केली कीं, शिवा बदचालीनी वागणारा याणीं धण्यासी बदलण्याचा व अमार्यादेनें

वागण्याचा ध्वज उभा करून गैरराहा वागणुक मांडिली आहे. यास्तव आमची इच्छा आहे कीं, कोणी तरी त्याचें पुरें पारपत्य करील व त्यास पुरती शिक्षा देईल असा कोणी तरी शिवावर रवाना करावा, म्हणजे त्याणीं जाऊन शिवाचें पारपत्य करून त्याजला ताळ्यावर आणावा. अशी इच्छा आहे व आमचे सर्व चाकर लोकांचे मनांत हें आहे कीं, ही चाकरी मजकडून घडावी असे सर्व इच्छितात. परंतु आमची इच्छा ही आहे कीं, ही चाकरी तुझे हातून घ्यावी. शिवाचे पारपत्य करण्याचें काम तूं करून दाखवावें. तूं हें काम करून दाखविशील तेव्हां तुझे कपाळीं अपकीर्तीचा व बेमानपणाचा डाग लागला आहे, याणीं या लोकीं व परलोकीं तूं बेमान आहेस असा डाग लागला आहे, तो तेव्हां दूर होईल. असी आज्ञा केली. नंतर सिद्दी जवहार याजकडे पोषाख देऊन सलाबतखान असें पद दिल्हें. शिवाचे पारपत्यावर रवाना केला. सिद्दी जवहार सलाबतखान याणीं पादशाहाचे आज्ञेप्रमाणें शत्रूचें पारपत्य करण्याचे व किल्ले घेण्याची व लष्कराची तयारी करून कित्येक दिवसांनी तेथें जाऊन पोहोचला,[१४] आपले घोडे मोठे पायाचे धडाक्यानें व शस्त्र प्रळयानें शिवाजीस घाबरा केला. तेव्हां शिवाजीचे शिपाई लोक व फौज सलाबतखान याचे फौजेपुढें ठरेनासीं होऊन घाबरून एकमेकांतून पळून गेली. शिवाजीकडील शूर मंडळ एकएकीकडे परागंदा होऊन विसकटलें. ते लोक पर्वताचे दऱ्यांत व जंगलांत घुसले. बदचालीनें वागणारा शिवा याणी ही दशा पाहिली तेव्हां सलाबतखान याजपुढें आतां आपलें उभें रहाण्याचें सामर्थ्य नाहीं व याचे सन्मुख आतां युध्दास उभें रहाण्याची आपली शक्ति नाहीं असें जाणिलें. तेव्हां पन्हाळा किल्याचे नाइकवाडी लोकांचे सख्य करून घेऊन व त्या नाइकवाडी लोकांस तुम्हांस बहुत मी बक्षीस देईन अशी आशा दाखऊन ते लोक आपलेसें करून घेऊन पन्हाळयाचे किल्यावर चढोन सदरहू किल्याचा आश्रय धरून राहिला. जेव्हां किल्याचा आधार मजबूत सांपडला तेव्हां निर्भयपणें स्वस्थ होऊन किल्यावरून तोफेचे व बंदुकीचे गोळे मारणें सुरू करून लढाईस प्रारंभ केला. पन्हाळा किल्ला हा सर्व किल्यांत मजबूत व नामांकित आहे. असा दुसरा किल्ला मजबूतींत नाहीं. कोणाचाहि हल्ला या किल्यावर सर झाला नाहीं. या किल्यावर कोणा एकाचाहि मोर्चा लागू झाला नाहीं.

१४. शके १५८२ चैत्र शुध १ (२ मार्च १६६०) राजश्री सिवाजीराजे फिरोन पनाळियास आले. मग सिद्दी जोहार घेऊन पनाळियास वेढा घातला.– जेधेश, शिचप्र, पृ. २१.

### १३. सलाबतखान याणी पन्हाळचे किल्यावर हल्ला करणें व पुन्हां शिवा याणी हरएक ठकविद्येनें सलाबतखान याजला आपलेकडे आणणें प्रकर्ण :

सलाबतखान याणी पाहिलें कीं, तो गैरराहा वागणारा व फंद फितूर करणारा एके ठिकाणीं कायम राहून शूर लोकांचे लष्करापुढें लढाईस उभा राहात नाहीं. एके ठिकाणीं उभा राहाता तर त्याचें पारपत्य करितां येतें. वानरासारिखा व पाखराप्रमाणें या झाडावरून त्या झाडावर उडोन जातो. इकडून तिकडे पळतो. एक किल्ला सोडून दुसरे किल्यावर चढोन त्या किल्याचा आश्रय करून राहातो. सलाबतखान याणी असें अवघड ठिकाणीं घेऊन त्याचा पळोन जाण्याचा मार्ग बंद करावा अशा विचारांत होता. तोंच एकाएकीं त्याणी पन्हाळे किल्याचे नायकवाडी लोकांसी सख्य करून पन्हाळे किल्यावर पळून जाऊन पक्का आधार धरून राहिला आहे असें जाणिलें. तेव्हां सलाबतखान याणी ही गोष्ट अलभ्य लाभाची आहे असें जाणोन फार जलदी करून पनाळे किल्यानजिक येऊन पोहचून त्या किल्यावर हल्ला केला. लोव्हाराचे गर्क्याप्रमाणें तो किल्ला घेरून येण्याजाण्याचा मार्ग बंद केला. त्या किल्यावर मोर्च्या लागू करण्याचे कामांत बहुत यत्न केला. शिवा याणीं जेव्हां मोठा कठीण प्रसंग प्राप्त झाला असें जाणिलें तेव्हां नानाप्रकारचे ठक विद्येचे डाव चालविणें हा शिवाचा पूर्वापार स्वभावच होता त्या चालीनें सलाबतखान याजवरहि ठकविद्येचा डाव चालविला. परस्परें सख्य होण्याचा भाव दाखऊन एक पत्र फार काकुळती येऊन अति लुब्रेपणानीं बहुत नम्रतेचें लिहून सलाबतखान याजकडे पाठविलें. त्या पत्रांतील मजकुराचा सारांश हा आहे कीं, मी आपला मित्र आहे. मजवर आपण बहुत कृपा मेहरबानगी करावी. माझी पूर्ण आवडी हीच आहे. येविसीचा विस्तार किती लिहावा ? माझे मनांत होतें कीं, आपण आमचे दैवयोगानें या मुलकांत आलांत हा फारच लाभ झाला. याजकरितां मी आपल्यास सामोरे येण्यास धावत येऊन आपले दर्शन घेऊन आपले कृपा तत्क्षण बागेंतून मनोरथ पूर्णतेचें पुष्प तोडावें, म्हणजे मनोरथ पूर्ण करून घ्यावें, असें मनांत होतें. परंतु माझे पायांत दहशतीची व आपले भयाची बेडी अशी मजबूत पडली आहे कीं, म्हणजे मी आपलें भय इतकें वागवितों कीं, जाग्यावरून किंचित हालण्याचें सामर्थ्य नाहीं. यास्तव आपले भेटीचा लाभ झाला नाहीं. हली ही पूर्ण इछा आहे कीं, जर करितां कृपा करून माझे अपराध क्षमा कराल तर, कारण कीं मजला आपणा-शिवाय दुसरा कांहीं एक आधार आश्रय नाहीं याजकरितां निर्मळ मनानें पूर्ण संतोषानें मजला आपणापर्यंत येण्याविषयीं परवानगी दिल्ह्यास, मी दोन तीन माणसें बराबर घेऊन आपले सेवेंत हजर होऊन मनांतील सर्व मजकूर आपणांस जाहीर

करीन. त्या कामाचा आपणास उपाय विचारून घेऊन माझे अंतःकर्ण फार भयाभीत झालें आहे त्या अंतःकर्णास स्वस्थ करीन. असें झालें असतां आपण पूर्ण मेहेरबानगी व गरीबाचे पालन केलेंसें होईल. असें पत्र लिहिलें. सलाबतखान हा मूळचाच नीच उत्पत्तीचा व हलके मनाचा होता. यामुळें इमानावर व पादशाहासी कशाप्रकारें करारमदार करून शिवाजीवर चालून आला या गोष्टीवर नजर ठेविली नाहीं. या सख्य करण्याचे निरोपानें व शिवाजीकडून पत्र आलें या योगानें चित्तांत फार संतोष पावोन आपले धण्यानीं कसा बोध केला व कशा प्रकारची ताकिद केली आहे हें पादशाहाचे सर्व बोलणें निखालास विसरून गेला. आरबींत वाक्य आहे कीं, "हरएक जिंनस आपले जातीचे जिनसांत मिळोन त्याप्रमाणेंच विचार करितो." या वाक्याप्रमाणें मनापासून सलाबतखान शिवाजीसी मिळाला. शिवाजीचे पत्राचें उत्तर लिहिलें कीं, आम्ही या मुलकांत येऊन पोहचणें यद्यपि बाह्यात्कारीं पादशाहाचे आज्ञेप्रमाणें आपला निर्मूळ फडशा करून आपले पुरें पारपत्य करावयास आलों आहो, परंतु अंतर्यामिंकरून माझे मनांतील भाव आपलें पारपत्य करण्याचा नाहीं. जर करितां आपण सख्य होण्याचे व परस्परें मित्रता असणेंचे करार मदार पक्के ठराऊन सख्य केल्यास उतम आहे. करारमदार ठरविण्यांत येत आहे कीं, हरएक मोकदम्यांत व हरएक वागणुकींत, समक्ष किंवा पाठीमागें, अंतर न करितां अति यत्न करून कामाची सला देण्यांत व आपले मनांत आहे तसें सिध्धीस नेण्यांत माझें सामर्थ्य आहे तेथपर्यंत यत्न करून आपणास धका लागूं देणार नाहीं. आपणावर कदापि संकट येऊं देणार नाहीं. माझें चितांत आपले भेटीची नखशिखा-पर्यंत आवडी आहे. आपलें आमचे समक्ष भाषण व्हावें अशी आमची फार इच्छा आहे असें जाणोन आपण आमचे डेऱ्यास यावें. असें उत्तर लिहिलें. शिवा यांणीं हें उत्तर वांचून पाहिलें. या उत्तरांतील अभिप्राय जाणिला तेव्हां अत्यंत संतोष पावोन जाणिले कीं, आपलें डावाचा मंत्र सलाबतखानावर लागू झाला. शत्रूची शिकार फाशांत सांपडली आहे, असें जाणिलें. नंतर दुसरे दिवशीं मध्यरात्र झाल्यानंतर दोन तीन असामी खासे मंडळीपैकीं घेऊन किल्यावरून खालीं उतरून सलाबतखान याची भेटी घेतली. सलाबतखान यांणींहि शिवाजीचे बहुत आदर तारतम्य ठेऊन, बहुत संतोषानीं व निर्मळ मनानीं, कचेरीचा समारंभ केला. उभयतांचे सख्य होऊन परस्परें आनंदात बसले. परस्परें एकमेकांचा पक्ष धरून अति मित्रतेनें वागण्या-विषयींचे करार मदार, प्रतिज्ञा व ताकिदी फार मजबूत ठरल्या. शिवा त्याच मध्यरात्रीं तेथून निघोन परत पनाळयाचे किल्यावर चढोन गेला. बातमीदार लोकांस यापैकीं कांहीं बातमी समजली होती. तेव्हां त्या बातमीदारांनीं जसा मजकूर झाला तशी एकंदर मजकुराची बातमी आदिलशाहा पादशाहास लिहिली. हें वर्तमान कळतांच आदिलशाहा बहुत चिंताग्रस्त होऊन अत्यंत क्रोधायमान झाला. त्या उभयतां

बेमानांवर व धण्यासी बदलणारांवर तर फार फारच क्रोधायमान होऊन आपणच खुद्द जातीनीं त्या उभयतांचा, म्हणजे शिवा व सिद्दी जवहार यांचा, सूड घेण्याचा इरादा करून आज्ञा केली कीं, आम्ही खुद्द जातीनेच त्यांचे पारपत्य करण्याकरितां निघाल्याशिवाय त्या उभयतांनीं बंडाव्याचा अग्नि पेटविला आहे तो विझत नाहीं, म्हणजे आम्ही जातीनें गेल्याशिवाय हें बंड मोडत नाहीं.

## १४. आली आदिलशाहा खुद्द जातीनें पन्हाळा किल्ला घेण्याकरितां विजापुराहून मिरजेपर्यंत येणें व पन्हाळा किल्ला घेऊन फत्ते होणें आणि आली आदिलशाहा याणी मिरजेहून विजापुरास परत येणें प्रकर्ण वर्णन :

आली आदिलशाहा याणी ईश्वराचे कृपेवर व आपले उत्तम दैवावर भरंवसा ठेऊन तात्काळ खुद्द जातीनें अमीरलोक व फौज, त्यासमई जवळ होती तितकी, समागमें घेऊन विजापुराहून निघाले. पन्हाळ्याकडे चालू झाले. कांहीं मजली केल्यानंतर आली आदिलशाहाची स्वारी मिरजेस येऊन दाखल झाली. हें वर्तमान कळतांच उभयतां बेमान यांचे, म्हणजे शिवाजी व सिद्दी जवहार यांचे, धैर्यांत व त्यांचे कारभारी मंडळांत घाबरेपणा प्राप्त झाला. उभयतांनीं एक विचार होऊन पक्केपणाची मसलत ठरविली होती, ती मसलत एकाएकीं थकली. त्या उभयतांस भय प्राप्त झालें. आली आदिलशाहाची यशस्वी फौज मिरजेहून पुढें चालती होऊन पन्हाळ्याचे निमे मार्गांत पोहचली असेल तोंच खराब माणूस शिवा हा तोंपर्यंत पन्हाळ्याचे किल्याचे आधाराचे भरोंशावर व त्या दुसरे बेमानाचे, म्हणजे सिद्दी जवहार याचे, पाठबळावर पूर्ण भरोंशानीं पन्हाळ्यावर राहिला होता व त्या शिवाचे आंगीं लबाडी व नाना प्रकारच्या ठकविद्येशिवाय कांहीं एक शूरत्व व पराक्रम नव्हता यामुळें, आली आदिलशाहाची स्वारी खुद्द जातीनें चालून आली हें वर्तमान ऐकतांच अत्यंत भयाभीत झाला. आदिलशाहापुढें युध्धास उभें रहाण्याचा दम नाहींसा झाला. तेव्हां तो पन्हाळ्याचा किल्ला सोडून कांहीं मदतगार लोक समागमें घेऊन पाहाडांतून पळोन गेला.[१५] तेव्हां कांहीं एक अडथळा किंवा संकट न पडतां पन्हाळ्याचा किल्ला आली आदिलशाहाचे हस्तगत झाला. मिया नसरती याणी पन्हाळे किल्याची फत्ते झाल्याची तारिख हिंदुस्थानी अर्धे दोहऱ्यांत, वर्णन केली आहे. तो अर्धा दोहरा : 'आलीने पलमे पनाळा किलिया सलाबत सो' :

१५. शके १५८२ आषाढ वद्य १ (११ जुलै १६६०) पन्हाळियावरून राजश्री स्वामी उतरोन खेळणियास गेले.– जेधेश, शिचप्र, पृ. २१.

याचा अर्थ : आली आदिलशाहा याणीं पन्हाळा किल्ला एका पळांत जरबेनें घेतला : : असा अर्थ होतो, सदरहू दोहऱ्याची अक्षरें अब्रजदचे हिशेबानीं गणिलीं असतां १०७० ( १६५९–६० इ. स. ) चा सन निघतो. म्हणजे या सालीं आली आदिलशाहा याणीं पन्हाळा किल्ला घेतला.[१६] ही फत्ते झाल्यानंतर आली आदिलशाहा अति संतोष पावोन ईश्वराचा स्तव करिता झाला. आली आदिलशाहा याणीं मनांत आणिलें कीं, आपली यशस्वी फौज त्या मनुष्यास चाऊन जीवें मारील तर सर्वांवर, म्हणजे शिवाजीचे पाठलागावर नेमून ज्या डोंगरांत किंवा पाहाडाचे दरींत शिवाजी छपून राहिला असेल त्याजला पकडून शिवाजीचा निर्मूळ फडशा करावा, त्याचे निखालस बंड मोडून टाकावें, असें मनांत आणिलें. परंतु दृष्टांत सर्वांचे बोलण्यांस प्रसिध्द आहे कीं, डोंगर कोरणें व उंदीर काढणें यांत मोठा पराक्रम नाहीं असें मनांत आणोन पुन्हां एखादे वेळेस कधीं तरी पाहून घेतां येईल असें ठरऊन, तूर्त हें काम पाठीवर टाकून मूर्तजाबाद येथून, म्हणजे मिरजहून, आली आदिलशाहाची स्वारी परत निघाली. अति आनंदानें व बहुत यशस्वीपणानें विजापुरास येऊन दाखल झाली. विजापूर येथील रहाणारांस बहुत आनंद देता झाला.

## १५. सिद्दी जवहार सलाबतखान याणी आपले धण्यासी बदलून बेमानपणा प्रसिद्ध कर्णें प्रकर्ण :

पादशाहा लोकांनीं पृथ्वी देणें व मुलुक घेणें ही चाल पुरातन आहे. बेमान, माजुरी व गर्विष्ठ पुरुषाचे पारपत्य करावें यांतच पादशाहाची सर्व हिंमत खर्च होत आहे. मलनार येथील जमेदार लोक फार बदचालीनें वागतात असें वरचेवर वर्तमान आली आदिलशाहाचे ऐकण्यांत येत होतें. मलनार येथील जमेदारलोक प्रतीवर्षी खंडणीचा ऐवज सरकारांत दाखल करित होते तो बंद झाला. यास्तव त्या सरहद्दींत चालून जाण्याचा आली आदिलशाहा याणी इरादा ठरविला. त्या लोकांचें पारपत्य केलें पाहिजे असें ठरविलें. याजकरितां फौजेचे सामानसरंजामाची तयारी करून आपली यशस्वी फौज जमविता झाला. अशा समयांत सिद्दी जवहार सलाबतखान याची बेमानपणाचीं व करार मदार सोडून वागण्याचीं चिन्हें प्रगट होऊं लागलीं. पादशाहा याणी सिद्दी जवहार याजवर बहुत मेहरबानगी करून पादशाही चालीप्रमाणें योग्यता वाढविली असतां त्याचें प्रारब्ध फिरलें. फारच गर्व व अभिमान करूं लागला. आदिलशाहाचे चाकरींत वागण्याचा मार्ग सोडून देऊन

१६. शके १५८२ भाद्रपद वद्य त्रयोदशी ( २२ सप्टेंबर १६६० ) पनाळा सलाबत-खानासी दिला. सला केला– जेधेशा, शिचप्र, पृ. २१.

बेमानपणाचें व धण्यासी बदलण्याचें मार्गानें चालूं लागला. असेंच ज्यासमयीं इबराहिमखान, मौलवी मुल्ला अहंमद व नवाब अबदुल रहीम बहलुलखान हे कर्नाटकचे मोहिमेवरून परतून आली आदिलशाहा पादशाहाचे दर्शन घेण्याकरितां व त्याचे चरणारविंदीं मस्तक ठेऊन श्रेष्ठता पावण्याकरितां लागोपाठ कूच करून येत होते त्यासमईं नीच उत्पत्तीचा व हलके योग्यतेचा सिद्दी जवहार, फार बेमान होता त्या सिद्दी जव्हार, याणी मनांत आणिलें कीं, पांच हजार स्वारांनिसीं या मंडळीवर दौड करावी. यद्यपि सिद्दी जवहार याचे व त्याचें फौजेचें पारपत्य करून निखालास फडशा कण्याचें सामर्थ्य होतें, परंतु येविषयीं पादशाहाचे मनांत कसें आहे हें समजलें नव्हतें. यामुळें सिद्दी जवहार हा कांहींच योग्यतेचा माणूस नव्हे व यामध्यें कांहींच सामर्थ्य नाहीं असें त्याजला प्रेतवत जाणून पदरचे लोक तेथून जलदीनें निघोन मोठे हल्लेनें हुजूर येऊन दाखल होऊन पादशाहाचे अत्यंत कृपेचे फळ पावते झाले. सिद्दी जवहार पांच हजार स्वारांनिसीं चालून आला होता. हें वर्तमान ऐकून घेतांच एकाएकीं अत्यंत क्रोधायमान होऊन सिद्दी जवहार याचें घराणें निखालस बुडऊन टाकावें असे क्रोधायमान झाले. परंतु पूर्ण दया व बहुत विचार हे आदिल-शाहास ईश्वराचें देणें होतें, म्हणजे फार दयाळु होते, यामुळें जलदी न करितां त्याचे कल्याणाचीच इच्छा पादशाहास झाली. आज्ञा केली कीं, सलाबतखान याजला नानाप्रकारचे बोध व नीति सांगून त्याजला ताळ्यावर आणावा. वेसवडा तोडून उंट पळून जातो त्या प्रमाणें सलाबतखान याणें उत्तम मार्ग सोडून दुर्दैवीपणाचा मार्ग स्वीकारिला आहे त्याजला बहुत उपयोगाच्या नीतीच्या गोष्टी सांगून चांगले मार्गावर आणावा, म्हणजे ताळ्यावर आणावा.

## १६. आली आदिलशाहा याणी इबराहिमखान, मुल्ला अहंमद व शाहा अबदुल हसन यांजला सलाबतखानास ताळ्यावर आणावयाकरितां त्याजकडे रवाना करणें प्रकर्ण :

एक आज्ञापत्र कृपा व सख्य मिश्रित, बोध व नीति उत्तम प्रकारच्या व नाना प्रकारचे गोड शब्दयुक्त, इकडील आज्ञेंत व चाकरींत वागले असतां बहुत उपयोग केला जाईल व दांडगेपणानें व बेमानपणानें वागले असतां फार पारपत्य केलें जाईल अशा मजकुराचें लिहून इबराहिमखान, मुल्ला अहंमद व शाहा अबदुल हसन याजसमागमें देऊन रवाना केलें. तेव्हां आदिलशाहाकडील हे तिघेहि कारभारी सलाबतखान याजपासीं जाऊन पोंहचून पादशाहाचे आज्ञेप्रमाणें त्याजला नाना प्रकारच्या नीतीच्या व बोधाच्या गोष्टी सांगितल्या. नीट चालीनें

वागलें असतां पादशाहा तुमचे बहुत कल्याण करितील व पादशाहाची आज्ञा मोडून गैरराहा वागल्यास पादशाहा तुमचे फार पारपत्य करितील असे दोन्ही भाव सुचविले. परंतु सलाबतखानाचे कानांत भ्रांतीचे बोळे बसले होते, म्हणजे फार धुंद झाला होता, यामुळें त्या पादशाहाचे नीति व बोधाचे अक्षरांपैकीं एक गोष्ट देखिल त्याचे चित्तांत प्रवेशली नाहीं. कदापि अमार्ग वर्तणुक सोडून मार्गावर येत नव्हता. सदरहू कारभारी याणी जाणिलें कीं, तो पाखरासारिखे स्वभावाचा आपले हातीं लागत नाहीं. कसेंहि केलें तत्रापि सलाबतखान यास ताळयावर आणणें घडत नाहीं. असें जाणिलें तेव्हां त्याजला बोलले कीं, पादशाहाचे चित्तांत तुजविषयीं बहुत दया आहे. सांगितल्यानीं सरावयाची नाहीं. तुजकडून कितीहि अपराध घडले तत्रापि किंचितहि त्याजवर नजर न ठेवितां पादशाहाचे अंतःकर्णांत तुजविषयीं कृपेशिवाय दुसरा भावच नाहीं. पादशाहाची तुजवर जितकी मेहेरबानगी आहे तितकी कोणतेच कारभारी मंडळावर नाहीं. तुझें चित्त समाधान करण्याकरितां विजापुराहून निघोन श्रीकृष्णातीरास चुमलके म्हणोन गांव आहे तेथें पादशाहा खुद्द जातीनें येत आहेत. चुमलक्यास पादशाहाची स्वारी येण्यांत तुझें चित्तसमाधान करण्यापरतें दुसरें कांहीं एक कारणच नाहीं. परंतु ठराव असा आहे कीं, पादशाहाची स्वारी मौजे चुमलके येथें येऊन पोहचे तोंपर्यंत तूं येथून कोणीकडे निघोन जाऊं नये. पाखरासारिखें व हरणाप्रमाणें तूं येथून पळून जाऊं नये. असें हरएक प्रकारें करार मदार ठरविले. या कराराप्रमाणें वागो किंवा न वागो परंतु बळेंच त्यास राजी करून सदरहू कारभारी परत येते झाले. सर्व मजकुराची पादशाहापासी विनंती करून बोलले कीं, वाळूमध्यें बारिक रजःकण चमकतात त्या रजःकणाचें पालन करण्याचा सूर्यास कांहीं कंटाळा नाहीं व आपले अंगावर पाण्याचे कितीहि थेंब पडले तत्रापि समुद्रांस कांहीं त्याचा त्रास नाहीं. आधीं सरकार स्वारी जाण्याचा बेत खास ठरलाच आहे. हलीं आमचे विचारास असें येतें कीं, सरकार स्वारी तिकडे जावी म्हणजे तो पाखरासारखा पळणारा सलाबतखान हरएक हिकमतीनें हातीं आणा. नंतर पुढें काय मनांत असेल तें करावें. अशी विनंती केली तेव्हां पादशाहानीं त्या अकलवान कारभाऱ्यांची सला व मसलत कबूल केली. विजापुराहून निघोन पादशाहाची स्वारी चुमलक्याकडे चालती झाली.

## १७. सलाबतखान याजकडून शर्जाखान व सिद्दी मसऊद या उभयतांनीं, अभय भागणेंकरितां पादशाहाकडे येणें प्रकर्ण :

अशा समबामधें सलाबतखानाचा जावई सिद्दी मसऊद व शर्जाखान हे उभयतां पादशाहापाशीं हजर होऊन उभयतांनीं पादशाहास मुजरे केले. विनंती केली कीं,

सिद्दी जवहार सलाबतखान हा सरकारचे सेवकांपैकींच एक आहे. या सरकारांनीं अत्यंत कृपेनें पालन केलेले मनुष्यांपैकींच हा एक आहे. सरकारची चाकरी करण्यापरतें सलाबतखानाचे मनांत दुसरें कांहींच नाहीं. सरकारचे दौलतीचें कल्याण इच्छिण्यापरती दुसरी कांहींच इच्छा त्याचे अंतःकर्णांत नाहीं. खावंदापासी येऊन सरकारचे चरणारविंद मस्तकीं धरण्याची त्याची फारच आवडी आहे. सलाबतखान याची विनंती अशी आहे कीं, पादशाहाचे आज्ञेत व करार ठरले होते त्यांत अंतर कदापि येऊं नये हें सत्य आहे. परंतु कित्येक मूर्ख मनुष्यें व गैरराहा वागणूक करणारे लोकांनीं सलाबतखानाचे मनांत भलताच संशय आणोन व भय घालोन त्याजला चांगले वागणुकीनें वागूं दिल्हे नाहीं. यास्तव विनंती ही आहे कीं, एक नवीन अभयपत्र त्या भयाभीत झालेले पुरूपाचे, म्हणजे सलाबतखानाचे, जीवास व अबरूस धक्का लागणार नाहीं असें सरकारांनीं कृपाळू होऊन दिल्यास त्या अभयपत्रावर पूर्ण भरोंसा ठेऊन मस्तकाचे व नेत्रांचे पाय करून, म्हणजे डोईचे वाटे, खावंदाकडे निघोन सरकारचे पायापासी हजर होईल. अशी त्या उभयतांनीं विनंती केली. पादशाहास त्यासमई सलाबतखानाचे चित्तसमाधान करणें व हरएक युक्तीनें सलाबतखानास हातीं आणण्यांपरतें दुसरें कांही कारण नव्हतें. यास्तव ती विनंतीहि कबूल करून पुन्हां अभयपत्र सलाबतखानाचे जीवास व अबरूस धक्का लागणार नाहीं, कांहीं एक भय मनांत न वागवितां निर्भयपणें हुजूर येऊन हजर होणें, असें लिहून देऊन सिद्दी मसऊद याजला रवाना केलें. सिद्दी मसऊद याणीं ते अभयपत्र सलाबतखान याजला पावतें करून त्याचें चित्त फार भयाभीत झालें होतें तें ताळ्यावर आणोन पूर्ण दिलभरोंसा देऊन त्याची खातरजमा केली.

## १८. सिद्दी जव्हार सलाबतखान याणी मुकाम मौजे मुचलके येथें पादशाहापाशीं हुजूर येऊन हजर होणें प्रकर्ण वर्णन :

दुसरे दिवशीं सलाबतखान आपले स्वारशिबंदी लष्करांसहित निघोन पादशाहापाशीं हुजूर येऊन हजर होऊन पादशाहाचें दर्शन घेतलें. पादशाहाचे पाय मस्तकीं धरितां झाला. तेव्हां त्याचे बहुत चित्त समाधान करून फारच मेहरबानगी करिते झाले. पादशाहानीं आपले आंगावरील पोषाख व जेहगा व शिरपेंच व मुलकी कामाचे पद दिल्हें. सलाबतखानाचे चित्तास पूर्ण भरोंसा देऊन, पुरी खातरजमा झाल्यानंतर, पादशाहानीं आज्ञा केली कीं, मुसलमानी श्रेष्ठ प्रबळ धर्माचे ध्वज उभे करावे. पैगंबरानीं शास्त्र ठरविलें आहे त्या शास्त्रार्थाचे हुकूम चालू करावे असें आमचे मनांत आलें आहे. हिंदू लोक फार दुष्ट व वाईट यास्तव त्यांसीं युद्ध करणें, हिंदु धर्माचे झेंडे

पाडणें व हिंदूस हांकून देणें. कारण कीं, हिंदू लोकांचे ताब्यांत बहुत विस्तीर्ण मुलुक व बहुत खजिना व श्रेष्ठतेचा बहुत सामानसरंजाम जमला आहे. याजकरितां त्यासी युध्ध करून तें सर्व हरण करण्याचा आमचा संकल्प खास ठरला आहे. यास्तव सर्व खासे सरदारांत जो मुख्य सरदार नवाब अबदुल रहिम बहलुलखान, कित्येक अमीरलोक व आपली यशस्वी फौज देऊन, कर्नाटकावर नेमिला आहे. यास्तव तुम्हीहि बहलुलखान याजसमागमें जाऊन कर्नाटकावर लढाया करण्यांत परलोकीं सुदैवाची प्राप्ती, या लोकीं दौलत व कीर्तीची प्राप्ती व पादशाहाचे सेवेंत थोरपणा मिळविणें हें या पृथ्वींतील सर्व श्रेष्ठ कामाहून अधिक आहे. हेंहि फळ प्राप्त होईल. आम्हीहि मुसलमानी फौजेचे मदतगारीवर येऊन पोहचून युध्धाचे श्रेष्ठ फळ प्राप्त करून घेऊं. अशी आज्ञा केली. सिद्दी जवहार सलाबतखान हा जन्मापासून कपटी, फार दुष्ट होता. यास्तव हरएक प्रकारें जीव वाचला व अबरूहि राहिली हाच मोठा अलभ्य लाभ झाला असें समजत होता. पादशाहाची आज्ञा झाली तेव्हां ती आज्ञा मनापासून कबूल न करितां उगेच तोंडानें होय असें बोलून जलद माघारे निघोन जाण्यास निरोप मागितला आणि निघाला. त्यानंतर पादशाहा तेथेंच श्रीकृष्णातीरीं सेरशिकारीकरितां कित्येक दिवस राहून संतोप पावोन समुद्रांतून उतरून गेले. अशा समयांत कित्येक सेवकलोकांनीं विनंती केली कीं, तोरगलचा किल्ला पादशाही किल्यांपैकीं एक नामांकित किल्ला आहे व बहुत मजबूत सर्वांस प्रसिध्ध आहे. येथून दोन मजली वाटेवर आहे. जर करितां सरकारची स्वारी त्या किल्याकडून जाईल तर मसलतीनें फार चांगले आहे. किल्याची मजबुतीहि पाहिलीसी होईल. संतोषहि प्राप्त होईल. तेथील किल्लेदार बहुत फंदफैलीनें व वाकडेपणाचे चालीनें वागतो म्हणोन ऐकणेंत येतें. त्याजला पकडून त्याचें पारपत्य केलें जाईल.

## १९. आली आदिलशाहा पादशाहा याणी तोरगलच्या किल्याकडे चालते होणें व त्या किल्यावरील कामदार याणी बेमानपणा करणें व धण्यासी बदलणें प्रकर्ण :

पादशाहानीं विनंती कबूल करून आज्ञा केली कीं, पादशाही चिनीचा फरासखाना वगैरे सामानसरंजाम तोरगलचे किल्याकडे चालता व्हावा. असा हुकूम केला. तोरगलचे किल्यावर पादशाही चाकरांपैकीं एक चाकर सिद्दी याकूत म्हणोन हवालदार होता. पादशाहानींच त्याचें पालन केलें होतें. अबरूस व योग्यतेस चढविला होता. त्या सिद्दी याकूत यास हें वर्तमान कळलें. सिद्दी याकूत यानी पादशाहास कित्येक नापसंत पडावयाजोगीं वाईट कर्में केलीं होतीं. यामुळें भयाभीत झाला, कीं

न जाणो कदाचित पादशाहाची स्वारी येथें आली तर माझी वाईट वागणुकीचीं कर्मे गुप्त आहेत तीं पादशाहास जाहीर होतील. पादशाहास सर्व मजकूर कळेल, मग मज-वर पादशाहा बहुतच क्रोधायमान होतील, असें मनांत आणिलें. त्या मूर्खाजवळ, म्हणजे सिद्दी याकुतापाशीं राहाणारे लोकांपैकीं कोणी एकानीं ही खबर खोटी बनाऊन सांगोन त्याचे कान भरले कीं, तोरगलचा किल्ला या दिवसांत घेण्याची आशा बहलु-लखानाचे मनांत उपजली आहे. हली पादशाहाची स्वारी याच इरायानीं इकडे आली आहे. किल्ला तुजकडून सोडऊन घेऊन बहलुलखानास द्यावा हाच बेत आहे. असें मनांत आणोन दिल्हें तेव्हां तो याकूत नीच मनुष्य याणी हें खोटें बोलणें आहे किंवा खरें आहे याची चौकशी न करितां कच्ची मसलत केली. बेमानपणा व धण्यासी बदल-ण्याची चाल गुप्तपणानें वागवित होता ती उघड केली. मनांत आणिलें कीं, पादशा-हाची फौज इकडे येऊं देऊं नये. असा बेत टराऊन पादशाहाचे स्वारीचे बिनीचे डेरे दांडे तंबू वगैरे पेषखाना, म्हणजे बिनीचा सरंजाम, किल्यानजिक येऊन पोहचला होता तो सरंजाम बंदुकींत गोळ्या भरून फैयर झाडून गोळ्या घातल्या आणि तो सरंजाम माधारा फिरविला. ही खबर येऊन पोहचतांच पादशाहाचे क्रोधाचा समुद्र उसळला. पादशाहानीं क्रोधानीं आज्ञा केली कीं, आम्हांकडील शूर मंडळीनीं एका-एकीं किल्यावर हल्ला करावा व सदरहू किल्ला पाडून जमिनीबराबर साफ करून टाकावा. किल्यांतील सर्व बेमान लोकांस तरवारीनें तोडून त्यांचे शरीरांचे मांस कावळे व घारींस टाकावें. अशी आज्ञा केली तेव्हां हुजूरचे कारभारी मंडळ विनंती करावयाजोगें होतें तें धैर्य धरून पादशाहास विनंती करिते झाले कीं, आपले कृपे-करून आपले पाठबळाचे आधारानें आपले सेवकांस इतकें सामर्थ्य आहे कीं, आपले आज्ञेप्रमाणें एका हल्लेंतच किल्ला नेत्रास पाते लागे न लागे तों एक पलखांत पाडून टाकितील व जमिनीबराबर करून त्या किल्याची तेथें कांहीं एक खूण देखील राहूं नये व मैदान आपले लष्कराचे घोड्याचे पायानें तुडऊन जमिनीसारखी जमीन करून टाकितील इतकें सामर्थ्य आहे. परंतु ही गोष्ट झाली असतां एकंदर किल्याचें तेज जाईल व कोणतेच किल्यास भरंवसा राहाणार नाहीं. या करण्यांत पादशाहाचे क्रोधानें ज्याकडोन अपराध घडला नाहीं आणि जे सरकारचे सेवक असतील ते या जरबेनें भयाभीत होऊन मरण पावतील. याजकरितां आमचे विचारास तें बरें दिसतें कीं, किल्यावर हल्ला कायम ठेऊन किल्यावर मोर्चे लागू करण्याचा यत्न चालवावा. कित्येक दिवस अति त्वरेनें युध्ध करावयाचे ते जलदी न करितां सावकाशपणें किल्याची फत्ते करावी, म्हणजे सर्व किल्यांस भरंवसा राहील व पादशाहाचे कीर्तीचे मजबुतीसहित अंतर येणार नाहीं. अशी विनंती केली तेव्हां पादशाहानीं आपले कारभारी मंडळाची मसलत कबूल करून आज्ञा केली कीं, किल्यावरून हल्ला कायम ठेवावा व मोर्चे लागू करावे. असा हुकूम केला. पादशाहाचे आज्ञेप्रमाणें किल्यावर

हल्ला कायम झाला तेव्हां तो हापसी जातीचा बेमान धण्यासी बदलणारा सिद्दी याकूत यार्णी अमर्यादा करून आदिलशाहाचे फौजेसी युध्द करण्याकरितां सिध्द झाला. उठून उभा राहिला आणि किल्यावरून तोफा डागणें व बंदुकींत गोळ्या भरून बार झाडण्यास आरंभ केला. यद्यपि कित्येक माजूरी व बेमान लोकांची जमात किल्यांतून बाहेर येऊन दांडगेपणानें पादशाहाकडील मोर्चे लाऊन मंडळी उभीं राहिलेलीं पाहून त्यावर धावधाऊन येत होते ते आपले कर्माचे पारपत्य पावोन आदिलशाहाकडील शूरांचे तरवारींचे व तीरांचे मऱ्यानीं मरण पावत होते.

## २०. सिद्दी जवहार बेमान हा धण्यासी बदलणारा ऊर्फ सलाबतखान यार्णी किल्यावरील हवालदार बेमान जो धण्यासी बदलणारा सिद्दी याकूत याजला मदत करणें व लढाऊ सामान दारुगोळा वगैरे गुप्तपणें तोरगलचे किल्यांत सलाबतखान यार्णी पाठवणें प्रकर्ण वर्णन :

अशा समयांत बातमीदार लोकांनीं पादशाहास विनंती केली कीं, सिद्दी जवहार बेमान यार्णी सर्व आपले उपकार व योग्यता वाढवलेले उपयोग विसरून जाऊन पुरातन गैरराहा वागणुकीचे व बेमानपणाचे चालीवरच हाट धरून आहे. हरपनहाळ्ळीचे जिल्ह्यांत मुकाम करून तोरगलचे किल्यांतील राहाणारांशीं पूर्ण सख्य ठेवित आहे. या किल्यांतील लोकांस मदत देण्याविषयीं बहुत यत्न करून जरूरीचा सामान सरंजाम दारुगोळा व दुसरेहि कित्येक जिन्नस जे पाहिजेतच पाहिजेत असे जरूरीचे असतील ते गुप्तपणें किल्यांत पोहचवित आहे. अशी विनंती पादशाहास केली तेव्हां ही खबर कळतांच पहिलेपेक्षां पादशाहास फारच क्रोध आला. एक वेळ क्रोध आलेला क्षमा केला होता, तत्रापि हलीची खबर ऐकतांच पुन्हां दुपट क्रोध आला. असे अमर्यादेनें गैरराहा वागल्यास तुझा निर्मूळ फडशा होईल व तुझें फार पारपत्य केलें जाईल असे दोनीहि भाव सुचऊन अत्यंत क्रोधयुक्त हुकूम सलाबतखानास सांगून पाठविला. त्या दांडग्यानें व गर्विष्ठ पुरुषानें, म्हणजे सलाबतखानानें, पादशाहाचे असे क्रोधयुक्त कहरी हुकुमासहि मुलांचे खेळासारिखें समजून किंचित धण्याचें भय वागविलें नाहीं. आदिलशाहा आपला धणी त्यासी सख्य करावें असें केसाइतकें देखिल मनांत आलें नाहीं. पादशाहाकडून असा हुकूम येऊन पोहचला असतां आपले प्रथमचे वाईट चालीवर व बेमानपणानें वागण्याचे चालीवरच कायम राहिला आहे. हें वर्तमान कळतांच पादशाहा अत्यंत क्रोधायमान होऊन मनांत विचार करूं लागले. अकलवान ममलकत अबदुल महंमद याजला या कामाविषयींची मसलत कशी करावी अशी सला विचारिली. तेव्हां तो इमानी अबदुल

महंमद याणी अशी विनंती केली कीं, आपण दयाळुपणानें व गरीबाचे पालन करण्याचे रीतीनें इच्छिता कीं, कृपेचे दाणे टाकून व ममतेचे पाश घालून तो पक्षी, म्हणजे सलाबतखान, हातीं आणावा किंवा नाना प्रकारच्या नीति व बोध सांगोन त्या पिशाच्यास, म्हणजे सलाबतखानास, ताळ्यावर आणावा, असें आपले मनांत आहे. ही गोष्ट कशी घडेल ? कारण कीं, सलाबतखान इतक्या योग्यतेचे मनुष्य नोहे. त्याचे अंगात इतकी योग्यता नाहीं. जितके जितके त्याजला युक्तीनें व नीति व बोध सांगोन यत्न कराल तितके तितके तो अधिकच बंड करील. जितके त्याजला ताळ्यावर आणण्याकरितां श्रम कराल तितका अधिकच कामाचा नाश होईल. तात्पर्य कांहीं एक नफा व्हावयाचा नाहीं. त्याचा निर्मूळ फडशा करावा आणि त्याचे निखालस बंड मोडावें. या निर्दैवी पुरुषास, म्हणजे सलाबतखान यास, या परता दुसरा उपाय नाहीं. असें वाक्य आहे कीं, पारसी बैतेचा अर्थ : " जें झाड जातीचेंच कडू उत्पत्तीचे आहे : तें झाड जरी स्वर्गाचे बागेंत नेऊन लाविलें : १ : त्या झाडास पाणी पाजावयाचे समईं स्वर्गातील अमृताचाच वोघ सोडिला : व त्याचे मुळांस मध व खडीसाखर नित्य घातली : २ : तत्रापि तें झाड आपला जातीचा कडूपणाचा स्वभाव प्रगट करील. : त्या झाडास कडू फळ यावयाचें तसें येईल : ३ : " यांतील तात्पर्य हें आहे कीं, नीच मनुष्यास कितीहि योग्यतेस चढविला तत्रापि तो आपले नीचत्त्वाचे स्वभाव कदापि सोडणार नाहीं. त्याचा निर्मूळ फडशाच केला पाहिजे.

### २१. आली आदिलशाहा याणीं सिद्दी जवहार सलाबतखान याचा निर्मूळ फडशा करण्याचा इरादा करणें व कर्नोलाकडे जाण्याचा कूच करणें प्रकर्ण :

पादशाहानीं अकलवान वजीराचें भाषण ऐकून व मसलत मनांत भरून आज्ञा केली कीं, तुम्ही बोलता हें सत्य आहे. यापरती दुसरे अकलेची मसलतच नाहीं. असें बोलून तेच वेळेस हुकूम केला कीं, तोरगलचे किल्यावरील हल्ला बंद करून लष्करची ढाल उभी करावी. अशी आज्ञा करून तो मनुष्यास दंश करणारा, म्हणजे चावणारा सर्प म्हणजे सलाबतखान याचे मस्तक फोडण्याकरितां पादशाहा चालते झाले. पादशाहाची स्वारी इकडे येती अशी खबर त्या खराब मनुष्यास, म्हणजे सलाबतखानास, लागली तेव्हां अत्यंत भयाभीत होऊन हरपनहाळ्ळीहून कूच करून निघोन मुदगलचा किल्ला पादशाहाची स्वारी येण्याचे मार्गांतच होता त्या किल्लेदारास सलाबतखान याणें मूर्खपणानें पिशाच्यासारिखे स्वभावानें पत्र लिहून पाठविलें कीं, खबरदार घाबरूं नको व धैर्य सोडूं नको. तोरगलचे किल्यावरील

किल्लेदारानीं, म्हणजे सिद्दी याकूत याणी, हिंमत धरून आपले जाग्यावर कायम राहिला त्याप्रमाणें तूंहि तसेंच कर. पादशाहाची फौज किल्याचे आसपास देखिल येऊं देऊं नको. मी तुझे पाठीवर हरएक प्रकारें मदत देण्याविषयीं सिध्ध आहे, आतां येऊन पोहचतो. जर करितां माझा हुकूम मोडून तूं भलतेंच काम करिशील तर मी तुझा फार फडशा व पारपत्य करीन. मी तुजला फार पीडा करीन. असे मुदगलचे किल्लेदारास पत्र लिहून पाठविलें. मुदगलचे किल्यावरील किल्लेदार जन्मापासून मुळचाच नेक माणूस व इमानी, ज्या धण्याचे मीठ खाल्ले त्याची वोळख कदापि न विसरणारा असा अति उत्तम चालीचा माणूस होता. तो किल्लेदारहि पादशाहाकडील चाकर लोकांपैकींच होता. यामुळें सलाबतखानाचे पत्रांतील शिकवण किंचितहि मनांत आणिली नाहीं. त्या मूर्खाचें भाषण उंटाचे पादासारखें समजून, म्हणजे उंट उभा राहून पादतो तें पादणें धड जमिनीवरहि नोहे व धड आकाशांतहि नोहे तसें सलाबतखानाचें भाषण व्यर्थ असें जाणोन, तो किल्लेदार आपलें इमान सांभाळून कायम राहिला. पादशाहाची फौज किल्यासंनिध येऊन पोहचली. तेव्हां मस्तकाचे पाय करून मुदगलचे किल्याचे कुलपाच्या किल्या घेऊन पादशाहास सामोरा आला. पादशाहाचें दर्शन घेऊन चरणांवर मस्तक ठेऊन किल्याच्या किल्या पादशाहाचे तख्तासंनिध उभे राहाणारे सेवकांचे हातीं दिल्ह्या. तेव्हां पादशाहानीं त्या किल्लेदारावर अत्यंत मेहरबान होऊन त्याजला पोषाख वगैरे बहुत बक्षीस दिल्हें. पादशाहानीं त्या किल्यास आपले कल्याणप्रद चरणानें स्वर्गासारिखें शोभविलें, म्हणजे पादशाहा त्या किल्यावर चढून गेले. दोन तीन दिवस त्या किल्यावर मुकाम करून नंतर अधिक वोझीं व सामान सरंजाम जास्त होता तो त्या किल्यावर ठेऊन शत्रूचें पारपत्य करण्याकरितां कामापुरता सामान सरंजाम घेतला. आपले लष्करची यशस्वी ढाल उभी करून तेथून कूच केलें. एक दोन मजली झाल्या तेव्हां भंजारचे किल्यानजिक जाऊन पोहचले. तेव्हां वर्तमान कळलें कीं, त्या बेमानानें व धण्यासी बदलणाऱ्यानें, म्हणजे सलाबतखान याणें, युध्धाकरितां खालीं उतरून येऊन युध्ध करण्याचा इरादा केला आहे. अशी बातमी समजली.

## २२. भंजोरचे किल्यानजिक आली आदिलशाहा व सलाबतखान या उभयतांत युध्ध होणें व सिद्दी जवहार सलाबतखान याचा मोड होणें प्रकर्ण :

अली आदिलशाहा (याजकडे) ईश्वराचे साह्य व यश होतें. या आधारावर हिंमत बांधून त्या बेमानाचा, म्हणजे सलाबतखानाचा, निर्मूळ फडशा करण्या-

करितां त्याजवर चालू झाले. आपले फौजेंत युध्धरचनेच्या वोळी अति उत्तमपणानें बांधिल्या. युध्याचे पुढील तोंडावर ममलकतमदार अबदुल महंमद व नवाब बहुलुलखान हे उभयतां उभे राहिले. फौजेचे उजवे बाजूस मुल्ला अहंमद व शर्जाखान हे कायम होऊन उभे राहिले. फौजेचे डावे बाजूस महंमद खवासखान व येखलासखान या उभयतांस कायम केलें. फौजेचे मध्यभागीं पादशाहाची स्वारी उभी राहिली. पादशाहाचे कांहीं पाठीमागें आजिजखान वगैरे कित्येक सरदार मंडळींकडे बंदोबस्ताचें काम कायम झालें. शत्रूनें, म्हणजे सलाबतखान याणेंहि, पादशाहाचे फौजेपुढें आपली फौज तयार करून उभी केली. बेमानपणा व धण्यासी बदलण्याचे चालीस प्रारंभ केला. निमकहरामी, म्हणजे ज्याचे मीठ खावें त्यावरच फिरून पडण्याची चाल, बहुतच स्वीकारून आपले धण्यासन्मुख उभे राहून युध्ध करण्यास पाय पुढें ठेविला. उभयतांकडीलहि फौजेंत शस्त्राग्नि प्रदिप्त झाला. युध्ध तत्क्षण जातें फिरू लागलें, म्हणजे परस्परें शस्त्रें मारणेस आरंभ केला. त्या शस्त्रांचे धडाक्यानें छातीचे मोहरेच्या मोहरेच उडाले. उभयतांकडीलहि शूरांचे अंतःकर्णांत कपट वाढलें. तेणेंकरून बहुतच प्रळय होण्याचा समय प्राप्त झाला. बहुत मनुष्यें त्या युध्धांत ठार होऊं लागलीं तेव्हां उभयतांकडीलहि शूर रणभूमींत चालून येऊन शूरत्व व युध्ध पराक्रम करण्यास प्रारंभ केला. शस्त्रें फार भुकेलीं व तानेलीं होतीं. त्यांस शत्रु लोकांचे मांसानें तृप्त करिते झाले, म्हणजे फारच शस्त्रप्रळयास प्रारंभ केला. तेव्हां ती सर्व रणभूमी तांबडे रंगाचे फुलांचे बागेप्रमाणें लाल झाली. ती जमीन साफ सारखी होती. त्या जमिनींत मेलेले मनुष्यांचे प्रेतांचे जागोजाग ढीग पडले. अशा ' धर धर ' ' मार मार ' म्हणण्याचे समयांत अबदुल महंमद बहुलुलखान याचे जमातीपैकीं सरदार मंडळींचे जमातीनें विजेसारखे अति त्वरेनें घोडे हांकून शत्रूचे, म्हणजे सलाबतखानाचे, फौजेवर दौड करून आपले फौजेवर चालून आले होते ते मागे हटविले. असेंच मुल्ला अहंमद व षर्जाखान हे सलाबतखानाचे डावे बाजूस उभे होते व दुसरे कित्येक सरदारहि नेमिलेले होते त्यावर गर्दी करून एकच धामधुम करून दिल्ही. या गर्दीनें एकाएकीं सलाबतखानाचे फौजेत धांदल झाली. पादशाही एकंदर फौज चालून आली तेव्हां सलाबतखानाचे फौजेनीं पळून जाणेंपरता आतां दुसरा उत्तम विचार नाहीं असें जाणिलें. सलाबतखानाचे फौजेंतील कित्येक लोक तरवारीच्या जखमा लागोन ठार झाले होते. ते त्या रणभूमींत पडले होते. कित्येक घायाळ व अर्धमेले झाले होते. ते एकापाठीमागें एक लागोपाठ पळून गेले. त्या शूरांचे गर्दींत व हत्ती व घोडे यांचे धक्यानें सिद्दी जवहार सलाबतखान घोड्यावरून उसाळी खाऊन जमिनीवर पडला. एका शिपायाचे घोड्यावर पुन्हां बसला आणि आपले जवळचे रहाणारे कांहीं लोकांसहित पळोन गेला. त्या मरणाचे संकटांतून प्राण वाचविता झाला. ईश्वराचे साह्य व मदतगारी सुदैववान आदिलशाहा पादशाहाकडे

होती. यामुळें आदिलशाहाची फत्ते झाली. आदिलशाहाचे अकल्याण इच्छिणारा सलाबतखान याचा मोड झाला.[१७] आदिलशाहा पादशाहास अति आनंद होऊन ईश्वराचा स्तव करिता झाला. अति नम्रतेनें ईश्वरास नमस्कार करण्याकरितां भूमीवर कपाळ ठेविलें. सिद्दी जवहार मोड होऊन पळून गेला तो रायचूरचे किल्यापर्यंत, मध्यें दम न घेतां व मुक्काम न करितां, पळत गेला. रायचूरचे किल्यांत जाऊन राहोन सिद्दी जवहार लढाईंत फारच धक्के खाऊन ठोकाठोकीनें दमगीर होऊन थकला होता. यास्तव त्या किल्यावर विसांवा घेता झाला. परंतु लढाईंत मोड झाला. यामुळें मनांत फार चरफडोन संताप ज्वर होऊन प्राणापलीकडील दुखणें प्राप्त झालें. अशी दशा प्राप्त झाली असोन आदिलशाहाकडील शिपाई मंडळीचे पाठलागाचे धक्यानें व जरबेनें तेथेंहि निर्भयपणें राहों शकला नाहीं. दोन तीन दिवसानंतर तेथोनहि पळोन जाऊन महमद नूर करनोल येथें पळोन गेला. तेथें रहाण्यास पक्का मजबूत बंदोबस्त करून मनांतील दुखण्यास शरीरांतील आजारांस औषधोपाय करिता झाला.

## २३. आली आदिलशाहा पादशाहा याणी रायचूरचे किल्यावर जाऊन पोहचणें व तो किल्ला घेऊन फत्ते करणें व आका खुसरव याजला त्या किलेदारीचे कामावर नेमणें प्रकर्ण :

पादशाहाची स्वारी यशस्वी होऊन अति संतोषानें रायचूरचे किल्यावर येऊन पोहचली. तेव्हां सिद्दी जवहार याचे निसबतीचे लोकांपैकीं होता याजकरितां तो हवालदार पादशाहाचे फौजेसी युध्ध करण्याकरितां तयार होऊन त्याणें युध्धास प्रारंभ केला. तेव्हां हवालदाराचे हाताखालीं सरदार मंडळी व हशमाकडील लोकांची जमात बहुत इमानी होती. त्याणी हा किल्यावरील हवालदार फार माजला आहे, या हवालदारानें फारच बेमानपणा मांडिला आहे असें जाणोन अत्यंत क्रोधायमान होऊन एकाएकीं त्या हवालदाराचे आज्ञेंत वागणें सोडून व त्याची चाकरी करणें सोडून दिल्ही. फुरसतीची संधी पाहून त्या हवालदारास पकडून कैद केलें. ती मंडळी सदरहू किल्याचे कुलपाच्या किल्या घेऊन पादशाहाकडे धांवत येऊन पादशाहाचे कृपेस पात्र झाले. बक्षीस व इनाम मिळविते झाले. नंतर पादशाहाची स्वारी त्या किल्यावरहि चढून गेली. आका खुसरव म्हणोन लहान वयाचा पूर्ण विश्वासू सरकारचा

१७. शके १५८३ ( १६६१–२ इ. स. ) सिद्दी जोहार सलाबतखानी अलि इदिलशाहा खासा जाऊन लढाई करून मोडिला. तो पळोन केळोसीस ( कनकवलीस–कर्नूलास ? ) गेला आणि दोन महिन्यानीं मेला.– जेधेश, शिचप्र, पृ. २२.

चाकर होता त्याजला त्या किल्यावरील किल्लेदाराचे कामावर नेमिलें. तेथून या फंद फितूर वगैरे गैरराहा वर्तणूक करणारे शत्रूचे निर्मूळ पारपत्य करण्याचा इरादा करून लष्करची ढाल उभी करून पादशाहाची स्वारी पुढें चालती झाली. तुंगभद्रेचे किनाऱ्यास लष्करचे डेरे ठोकून, मुकाम करून, पादशाहा तेथें उतरले. कित्येक महापराक्रमी सरदार मंडळ मुसाखान पठाण व जेहजारराव (झुंझारराव?) वगैरे जे थोर थोर सरदार होते त्यास पादशाहानीं आज्ञा केली कीं तुम्ही तुंगभद्रेतून उतरून जाऊन तुंगभद्रेचे पलीकडे जावें. जर करितां कोणी निर्दैवी व वाईट स्वभावाचे जमातीपैकीं, म्हणजे शत्रूकडील कोणी, मोकाबल्यावर चालून येऊन युध्धास उभा राहील तर, ससे स्वयंपाक घरांत शिरून येती शिकार चालून आल्यासारिखे समजून, त्याजला तात्काळ तरवारीनें तोडून टाकावें; किंवा शत्रूकडील कोणी मनुष्य उत्तम दैवाचा, नेकचालीचा मनुष्य व पादशाहाची चाकरी कबूल करून पादशाहाचे आज्ञेंत वागेन म्हणोन खात्री करून शरण आल्यास व आजपर्यंत मी बहुत दांडगेपणानें व अमर्यादेनें वागलों ते माझे सर्व अपराध क्षमा करावे असे म्हणोन पायावर मस्तक ठेविल त्याजला करार मदार ठरऊन, अभय देऊन, त्याचे जीवास व त्याचे मालमत्तेस धक्का लाऊं नये. त्याजला कोणतीच चिंता प्राप्त होऊ देऊं नये. कांहींच उपद्रव लागूं देऊं नये. अशी आज्ञा केली तेव्हां सरदार मजकूर याणी पादशाहाचे आज्ञेचा तुरा सेवकपणाचे मस्तकावर खोऊन, म्हणजे पादशाहाची आज्ञा मान्य करून, तुंगभद्रेंतून उतरून जाऊन उतरले.

### २४. मुसाखान व जवहारराव या उभयतांवर सिद्दी मसऊद याणी रात्रीं छापा घालणें व सिद्दी मसऊद याचा मोड होणें व सिद्दी जवहार सलाबतखान याणीं हें प्रकर्ण झालें कीं लागलेच मरण पावणें प्रकर्ण वर्णन :

सिद्दी मसऊद हा सलाबतखानाचा जावई. याजला सलाबतखानानेंच तयार केला होता. त्याणी आदिलशाहाकडीलहि थोडीशी जमात नदी उतरून अलीकडे आली आहे यावर थोडासा हल्ला करून या जमातीस नदीपलीकडे हाकून द्यावें अशा गर्वानें रात्रीस छापा घालण्याचा इरादा करून तीन हजार हत्यारबंद लढाउ स्वारांनिसीं रात्रीं आदिलशाहाकडील जमातीवर तो सिद्दी मसऊद चालून आला. मुसाखान व जवहारराव याजला येविषयीं किंचित बातमी समजलीच होती. यामुळें आपले जाग्यावर हुशार होऊन छापा केव्हां येईल अशी मार्गप्रतिक्षा करित होते. तों इतक्यामध्यें सिद्दी मसऊद निर्भयपणें या मंडळीवर चालून आला. तेव्हां आदिलशाहाकडील शूर मंडळीनें तरवारीचे माऱ्याचा मोठा प्रळय उसळला व तीरांचे

माऱ्याचे भाते रिचविले. तीर तरवारींचा मारा करून एक पलखांत सिद्दी मसऊदचे जमातीस घाबरें केलें. सिद्दी मसऊदची बहुत जमात कत्तल झाली. बहुतेक धूळदशेस मिळाली. आदिलशाहाकडील शूरांचे हातून कांहीं वाचले ते थोडेसे लोक लोक समागमें घेऊन सिद्दी मसऊद त्या युध्धांतून पळोन जाऊन आपला प्राण वाचविता झाला. सलाबतखानाचा प्रथमच मोड झाला होता. प्राणघातक जखम लागली होती, म्हणजे अपमान फार झाला होता. तेणेंकरून दुखणें घेऊन बिछान्यावर निजून होता. असें असतां हली आपले जावयाचाहि मोड झाला अशी खबर ऐकिली. तेव्हां सलाबतखानाचें दुखणें एकपट होतें तें दसपट अधिक वाढलें. रोग अधिकच वाढत चालला. सलाबतखानाचें आयुष्यहि भरलें होतें. यास्तव थोडकेच दिवसांत मरण पावला.[१८] सलाबतखानाचा पुत्र अबदुल अजीज, सिद्दी मसऊद हा जावई हे उभयतां सलाबतखान वारल्यानंतर सावध झाले. शुध्धीवर आले. वडीलांचे, म्हणजे सलाबतखानाचे, पारपत्य झालेलें पाहून उभयतांस खास कळलें कीं, बेमानपणाचे चालीस व धण्यासी बदलून वागण्याचे कर्मास निर्दैवीपणापरता दुसरा कांहींच परिणाम नाहीं. असें जाणोन गर्व व अभिमान होता तो सर्व सोडून ममलकत मदार अबदुल महंमद बहलुखान याजकडे विनंतीपत्र लिहून पाठविलें कीं, आमचे वडील, म्हणजे सलाबतखान, वाईट चालीचे लोकांचे, पिशाच्यासारखे स्वभावाचे मूर्खांचे शिकविण्यानीं गैरराहा वागून मरण पावले. अपकीर्ति करून घेतली. यास्तव ईश्वरानीं त्याचे अयोग्य वर्तणुकीचा सूड घेतला. त्यांचें कर्मासारखें फळहि दिलें. आतां आम्हांस गरीबांस व दीनांस आपणाशिवाय दुसरा कांहीं एक आधार नाहीं. आपण सर्वांचे आधार आहांत. तेव्हां आम्ही आपला आश्रय सोडून कोठें जावें ! असें वाक्यहि आहे, पारसी वाक्याचा अर्थ : "तीर्थाची जागा तुम्हींच, तुम्हांस सोडून आम्ही कोठें जावें ? आम्ही आपले मन तुम्हांपाशींच ठेवित आहों : १ :" आमचा खास निश्चय आहे कीं, आपले देवढीची, जागा ईश्वराचे देवढीप्रमाणें बक्षिस करणार व अपराध क्षमा करणार व मी चुकलो, माझा गुन्हा माफ करा अशी विनंती कोणी केल्यास त्याची विनंती कबूल करावयाजोगीं ही जागा आहे. कोणीहि मी अपराधी आहे, माझा अपराध क्षमा करा म्हणेल त्याचा अपराध आदिलशाही दरबारांत क्षमा होतो, हें सर्वांस कळावें असे आपले दरबारांत दौंडी पिटून सर्वांस जाहीर करणारे लोक रात्रंदिवस सर्व काळ या प्रकारें गोरगरीबांस व भयाभीत झालेले मनुष्यांस पुकारून सांगतात. जर करितां ईश्वराप्रमाणें आपण आमचे अपराध क्षमा करून आम्हांस संतोष केल्यास व आमचे जिवास व अबरुस धका लागणार नाहीं असें अभयपत्र कृपा करून पाठविल्यास आम्ही मस्तकाचे पाय करून आपलेपाशीं येऊन आपले चरणावर मस्तक ठेऊं.

१८. शके १५८५ माघ शुद्ध षष्टी शनवारीं ( २३ जानेवारी १६६४ ) शाहाजीराजे परलोकास गेले.– जेधेश, शिचप्र, पृ. २२.

२५. अली आदिलशाहा पादशाहा याणी अबदुल महंमद बहलुलखान याचे रदबदलीवरून अबदुल अजीज व सिद्दी मसऊद या उभयतांचे अन्याय क्षमा करणे व अबदुल अजीज व सिद्दी मसऊद हे उभयतां सलाबतखानाचे पुत्र व जावई होते याजवर पादशाहानीं कृपा करणें :

ममलकत मदार नवाब बहलुलखान याणी ज्यासमई अली आदिलशाहा तख्तावर बसून पूर्ण संतोषांत येऊन आपले जिव्हेनीं ईश्वराचा स्तव करित होते ती संधी संतोषाची जाणोन पादशाहास विनंती केली कीं, सलाबतखान हा अति मूर्ख व दौलतीचें अकल्याण इच्छिणारा वाईट मनुष्याचे शिकविण्यावरून व मूर्खांची मसलत ऐकण्यानीं गैरराहा वागला व धण्यासी बदलला. त्या वाईट कर्माचें फळहि तात्काळ पावला. त्याचे बायकांमुलांकडे कांहीं एक अपराध नाहीं. निर्मळ चालीचीं आहेत. तीं सलाबतखानाचीं बायकामुलें पादशाहानीं आम्हांवर कृपा करावी अशी इच्छा करितात. थोर थोर पादशाहाची हीच चाल आहे कीं, ज्याणीं बहुत जुलुम केला त्याचेंच पारपत्य करावें. असें वाक्यहि आहे, पारसी बैतेचा अर्थ : “ ज्याणीं जुलुम केला, त्याजकडे अपराध : त्या अपराधाबद्दल त्याचे बायकामुलांस शिक्षा देण्याचें काय कारण ? : १ : ” पादशाहा लोक ज्याणी अपराध केला त्यांचे पारपत्य करून त्यांचे बायकामुलांवर कृपा करितात. जर करितां त्या निराश्रित पुरुषांस व भयाभीत झालेले मंडळींस पादशाहाचे क्रोधापासून सुटका होऊन पादशाहाचे कृपेचे उदकानीं हीं मंडळी तृप्त झाल्यास यांत खावंदाचा बहुत थोरपणा आहे. फारच कीर्ति होईल. या उभयतांची विनंती कबूल करण्याशिवाय कांहींच उपाय नाहीं असें पादशाहानीं जाणिलें तेव्हां पादशाहानीं विनंती कबूल करून सलाबतखानाचे बायकामुलांवरील राग सोडिला. त्याणीं हुजूर यावें अशी आज्ञा दिल्ही. त्यांचे जीवांस व अबरूस भय लागणार नाहीं असें कृपा करून अभयपत्रहि दिल्हें. तेव्हां दुसरे दिवशीं सलाबतखानाचा पुत्र अबदुल अजीज व सलाबतखानाचा जांवई सिद्दी मसऊद हे उभयतां पादशाहापासीं हुजूर हजर होऊन ममलकत मदार नवाब बहलुलखान याचे वशिल्यानें पादशाहाची भेटी घेतली. उभयतांनीं चरणावर मस्तक ठेविलें तेव्हां गरीबांचे पालन करणारा व दीन मनुष्यांची योग्यता वाढविणारा जो अली आदिलशाहा पादशाहा त्याणीं उभयतांवर, म्हणजे सलाबतखानाचे पुत्रावर व जांवयावर, कृपा करून या दोघांस पोषाख देऊन त्यांचे बापाचे पदाधिकारावर कायम केलें. त्यानंतर उभयतांस अति संतोषानें व आनंदानें त्यांचे जाग्यास परत जाणेंविसी निरोप दिल्हा.

## २६. प्रकर्ण :

सिद्दी जवहार सलाबतखान हा असा आहे कीं, तो मूळचा मलीक अबदुल वाहब बिन मलिक रयहान आदिलशाही याचा विकत घेतलेला चाकर होता. मलिक अबदुल हा मरण पावला तेव्हां सिद्दी जवहार याणी त्याचा पुत्र मलिक रयहान म्हणोन होता त्याजला कैद करून आपण महंमद नूर करनोल येथें जाग्यावर कायम झाला. सदरहू करनोलचा धणी आपणच व साहेबजादाहि आपणच झाला. मोठें अमिराचे पदवीस पावला. सिद्दी मसऊद हाहि मलिक अबदुल वाहब याचाच चाकर होता. त्याजला आपला जांवई करून त्याचें पालन करित होता. ज्यासमई सिद्दी जवहार याजला सलाबतखानाचें पद प्राप्त झालें आणि त्याणीं पादशाहाचे आज्ञेप्रमाणें पन्हाळे किल्यावर हल्ला केला होता व किल्ला घेरला होता आणि शिवाजीसी युध्द करित होता ते समई सिद्दी मसऊद याणीं त्या युध्धांत चांगला पराक्रम करून खान असें पद मिळविलें होतें.

## २७. आली आदिलशाहा पादशाहा याणीं मलनोर, सौंदा व बेदनूर पर्यंत फौज घेऊन जाऊन पोहचून हिंदूंचे पारपत्य करणें प्रकर्ण :

मलनोर येथील जमेदार मंडळी व राजा भद्रप नाईक हा तिकडील सर्व राय लोकांहून मोठा दौलतदार होता. त्याजपासीं बहुत स्वारशिबंदी व फार मुलुक व पुष्कळ खजिना होता. येणेंकरून राजा भद्रप नाईक याजला फारच गर्व झाला होता. तो राजा बेदनूर म्हणोन फार थोर मुलुक व बहुत वसुलाचा आहे तेथें राहून फार प्रबळ झाला होता. सबब त्याचे पारपत्य करण्याचा इरादा अली आदिलशाहानीं यापूर्वीच खास ठरविला होता. तोंच एकाएकीं सलाबतखानाची लढाई उभी राहिली. हें वर्णन सदरीं लिहून गेलेंच आहे. सिद्दी जवहार सलाबतखान याचे लढाईचें कामापासून फुरसत झाली तेव्हां मोठी फत्ते होऊन बहुत संतोषानें रायचूर येथून पादशाहा विजापुरास परत आले. विजापूर येथें कित्येक दिवस आनंदांत व सुखांत घालऊन राजधानीचा कारभार चालविला. पुन्हा आणखी भद्रप नाईक याणी फारच गर्व व अभिमान व दांडगेपणा आरंभिला आहे अशी वरचेवर खबर येऊं लागली. कारण कीं, भद्रप नाईक याणें खंडणीचा ऐवज करार ठरल्याप्रमाणें देणें सोडून लुटालूट करण्यास प्रारंभ केला. अली आदिलशाहाचे इलाक्यांतील कित्येक किल्ले व गांव जवळ जवळ होते ते भद्रप नाईक याणी घेतले. तेव्हां आपला धर्म स्थापन करणें, कुरान परिपचे शास्त्रार्थाचे हुकूम करणें, मुसलमानांस

आधार देणें व हिंदूंचे पारपत्य करणें हेंच पादशाहास योग्य आहे व पादशाहानीं असें केलें पाहिजे. आधीं तुम्ही असें वागता यास शास्त्रार्थाचा काय आधार आहे तो सांगावा. असा शास्त्रार्थाचा वाद घालण्याकरितां कारण कीं, आधीं हिंदूस शास्त्रार्थ विचारून घेऊन तुम्ही देवाचें पूजन वगैरे करितां यास आधार काय प्रमाण आहे ते सांगा असें विचारून बडवावे. शास्त्रानेंहि न ऐकेत तर त्यासी युध्ध करून हिंदूंचे पारपत्य करावें अशी ईश्वरानीं कुरान परिफचे ग्रंथांत आज्ञा केली आहे. यास्तव या आज्ञेप्रमाणें शास्त्राचा वाद घालणेंकरितां मौलवी मुल्ला खुरम याजला त्या प्रांतास, म्हणजे राजा भद्रप नायकास, जागें करण्याकरितां मलनार येथें रवाना केलें. तेव्हां मुल्ला खुरम याणी बहुत प्रकारें हिंदु धर्मानें चालू नये असे नीति व बोध चांगले सांगितले. मुसलमानी धर्माचे मार्ग दाखविले. परंतु तो भद्रप नाईक, भ्रांत दारू पिऊन धुंद झाल्यासारिखा मस्त, या नीति व बोधानें ताळ्यावर आला नाहीं. त्या मुल्ला खुरम याचें उत्तम प्रकारचें सांगणें कबूल केलें नाहीं. आपले पुरातन वाकडे चालीवरच कायम राहिला, तेव्हां मुल्ला खुरम तेथून निराशा होऊन परत निघोन आदिलशाहापाशीं हुजूर येऊन सविस्तर झाले मजकुराची विनंती केली. आली आदिलशाहानीं त्या प्रांतासी, म्हणजे भद्रप नाईक याजला, शास्त्रार्थानें नडविलें. नाना प्रकारचे नीनि व बोध सांगितले. तत्रापि तो आपले हिंदु धर्मावरच कायम राहिला. यास्तव त्या हिंदूसी युध्ध करण्याकरितां पादशाहानीं कंबर बांधून शत्रूचे पारपत्य करण्याची व हिंदूंचा मुलुक घेण्याची तयारी करून आधीं सय्यद आलियास (इलिआस) षर्जाखान हा मोठा शूर होता त्याजसमागमें कित्येक सरदार मंडळी देऊन षर्जाखानास त्या मूर्खाचें पारपत्य करण्याकरितां पुढें रवाना केलें. पादशाहाहि खुद जातीनें कित्येक दिवसानंतर ईश्वराचे साह्याचे आधारावर भरांसा ठेऊन आपले यशस्वी फौजेची ढाल उभी करून तारिख १ साबान सन एक हजार त्र्याहातर (२ मार्च १६६३) रोजीं विजापूर येथून पादशाही डौलानें बहुत फौज घेऊन निघाले. फौजेसुध्धां चालते झाले. कांहीं मजली केल्यानंतर बंकापूरचे किल्यावर जाऊन तो किल्ला घेतला. त्या किल्यावर राहून नवाब अबदुल रहिम बहलुलखान कर्नाटकांतील माजोरी व गर्विष्ठ लोकांचे पारपत्यवर नेमिला होता त्या बहलुलखान परत येणें-विषयीं आज्ञापत्र पाठविलें. नवाब बहलुलखान याणी हा हुकूम येऊन दाखल होतांच कर्नाटकाचे लढाईचें कामावर आपले तर्फेचे कामदार नेमून तें काम त्यांचें जिमेस सोंपून शाहाजी भोसले वगैरेसुध्धां अति त्वरित पादशाहाकडे येण्यास चालता झाला. कांहीं मजली केल्यानंतर तुंगभद्रेचे किनाऱ्यास पादशाहाची भेटी घेऊन पादशाहाचे चरणावर मस्तक ठेविलें. नंतर पादशाहा नवाब बहलुलखान वगैरेसहित बेदनुराकडे चालते झाले. ममलकतमदार अबदुल महंमद, मुल्ला अहंमद, सय्यद खानजमान व मुजफरखान वगैरेस दुसरे वाटेनें कोणास समजूं न देतां बेदनुराकडे रवाना केलें.

## २८. षर्जाखान याणी पुढें जाऊन हिंदूंचे किल्ले व कित्येक जागा घेऊन सौंध्यापर्यंत जाऊन पोहचणें प्रकर्ण :

रणभूमींतील पंचानन, म्हणजे वाघ, षर्जाखान हा पादशाहाचे आधीं पुढें आला होता. हिंदूकडील जिब्र्या किल्यावर बहुत सामान सरंजाम व दारूगोळ्या वगैरे फारच साहित्य होतें. लढाईस तयार झाले होतें. प्रथम जिब्र्याचे किल्यानजिक पोहोचून मोकाबल्यावर उभा राहिला. तेव्हां हिंदूकडील फौज एकाएकीं पादशाहाचे फौजेवर येऊन पडली. युध्ध पराक्रम करूं लागलें. बहुत झटून मारामारी करित मुसलमानी फौजेंत येऊन पोहचले. युध्धांत तरवार जशी चालवावी तशाप्रकारें तरवारी चालविल्या. तेव्हां षर्जाखान हा केवळ रणभूमींतील व्याघ्रच होता. त्या षर्जाखानानीं रुस्तुमासारखे कित्येक शूरांसहित रणभूमींत पाय पुढें टेऊन व ईश्वराचे कृपेचे मदतीचे बळ पाटीशीं घेऊन युध्धाचे फळ प्राप्त करून घेता झाला. कारण कीं, युध्धांत दोहीकडूनहि उत्तम प्रकारचेंच फळ प्राप्त आहे. रणभूमींत युध्ध पराक्रमानें मरण पावलें असतां परलोकीं स्वर्गप्राप्ती होऊन बहुत सत्कार होतो व युध्ध पराक्रम करून जिवंत राहून यश आल्यास या लोकीं कीर्ति व संपत्ती प्राप्त होती. तेव्हां दोहीकडूनहि युध्ध करणें चांगलें आहे. उभयपक्षींहि उसणें नाहीं असें जाणोन षर्जाखान वगैरे आदिलशाहाकडील शूर मंडळीनीं अति युध्ध पराक्रम करून शस्त्रप्रळय केला. शत्रूकडील फौजेस आपलेकडील फौजेचे घोड्यांचे पायाखालीं तुडवातुडव करून फारच ठोकाठोकी केली. पारसी अर्धे बैतेचा अर्थ : "असा युध्ध पराक्रम केला कीं, पादशाहा 'वाहवा' म्हणाले व आकाशानें शाबासकी दिल्ही." आरबी बैतेचा अर्थ : "ईश्वर साह्य करितो तेव्हां यश त्वरित येतें." ही ऐत मुसलमानी फौजेकडे होती, म्हणजे ईश्वराचे साह्य आदिलशाहाकडील फौजेकडे होतें: यामुळें आदिलशाहाकडील फौजेस यश आलें. त्या खराब लोकांचे जमातीवर, म्हणजे हिंदूकडील फौजेवर, हल्ला करून बहुत हिंदू लोक तरवारींनें ठार मारून मातींत पाडिले. त्या शस्त्रप्रळयांतून कांहीं जे हिंदू वाचले त्यांणीं युध्धापासून मोहरा माघारा फिरऊन रणभूमी सोडून सुसाट पळून गेले. तो किल्ला आदिलशाहाकडील फौजेचे हस्तगत झाला.

## २९. सौंध्याची फत्ते होणें प्रकर्ण :

षर्जाखान याणीं तेथून पुढें चाल करून एक एक किल्ला व हिंदूंच्या कित्येक जागा बलात्कारानें व मारामारीनें व तोडातोडीचे हातांतून सोडऊन घेऊन आदिल-

शाहाचे राजधानींत दाखल करित होता. असेच सौंध्याचा मुलुक बहुत सुखाचा व फार वसुलाचा आहे. तेथपर्यंत जाऊन पोहचला. तो सौंध्याचा मुलुक हस्तगत करण्याकरितां बहुत यत्न केला. तेव्हां तोहि मुलुक ईश्वराचे कृपेंकरून घेऊन फत्ते केली. पादशाही फौज सौंध्यानजिक येऊन पोहचली. तेव्हां अली आदिलशाहा कित्येक दिवस अति संतोषानें तेथें विश्रांति घेते झाले, म्हणजे राहिले. तेथील पाणी व हवा पसंत येऊन बहुत संतोष पावले. शिपायांस व फौजेसहि विसांवा दिल्हा. त्यानंतर ममलकत मदार अबदुल महंमद, मुल्ला अहंमद, षर्जाखान व सय्यद खान-जमान वगैरेंस आज्ञा केली कीं, अस्मानी मदत व ईश्वराचें साह्य आपलेकडे हरएक कामांत आहे. असें सत्य जाणोन असेंच रुस्तुमाप्रमाणें हल्ला करून हिंदूंची जागा बेदनूरहि हस्तगत करावी. कारण कीं, बेदनूर येथील राजा भद्रप नाईक तेथें बहुत दौलत व स्वारशिबंदी जमऊन राज्य करित आहे. तो मुलुक अस्मानी मदतीनें व ईश्वराचे कृपेनें हस्तगत करून फत्ते करावा अशी आज्ञा केली.

## ३०. आदिलशाहाकडील फौजेनें बेदनूरची फत्ते करणें प्रकर्ण :

महान महान शूर व लढाऊ सरदार व हत्तीसारखे बलवान हे पादशाहाचे आज्ञेवरून बेदनूर हस्तगत करण्याकरितां अति त्वरेनें निघोन गेले. तेव्हां राजा भद्रप नाईक याणी विचार पाहिला कीं, आदिलशाहाकडील फौजेपुढें व यशस्वी शूर मंडळापुढें युध्दास उभे रहाण्याचें आपलें सामर्थ्य नाहीं. असें जाणोन बेदनूर येथून निघोन कोयलदुर्गचे किल्याचा मार्ग धरिला. कारण कीं, कोयलदुर्गचा किल्ला बहुत मजबूत व फार थोर व पक्का बंदोबस्ताचा जाणोन त्या किल्यांत शिरून कोयलदुर्गचा आधार धरून राहिला. आदिलशाहाकडील फौज महान यशस्वी. बेदनूर येथें जाऊन पोहचून आपले पराक्रमानें बेदनूरची फत्ते करिते झाले. तेव्हां पादशाहा खुद्द जातीन बेदनूर येथें जाऊन राहून त्या शहरांतील रहाणारे लोकांस पादशाहानीं बहुत योग्यता दिल्ही. बेदनूर येथील पाणी हवा पादशाहास पसंत आली. यास्तव तेथेंहि पादशाहा कित्येक दिवस राहून संतोष पावते झाले. त्यानंतर पादशाहानीं आपले सरदार मंडळीस आज्ञा केली कीं, असेंच पुढें चाल करून लष्करचा मोहोरा कोयलदुर्गाकडे फिरऊन कोयलदुर्गावर हल्ला करावा. कारण कीं, कित्येक गर्विष्ठ व फार माजूरी, म्हणजे भद्रप नाईक, त्या किल्याचा आधार धरून हें निर्भय स्थान आहे असें जाणोन त्या किल्यांत जाऊन स्वस्थ बसला आहे. यास्तव त्या किल्यावर रुस्तुमाप्रमाणें हल्ला करून फत्ते करावी. त्या महा गर्विष्ठ माजूरी मनुष्यास, म्हणजे भद्रप नायकास, पकडून आणावा. अशी आज्ञा होतांच आदिलशाहकडील

ते वाघासारिखे व सिंव्हासारिखे पराक्रम करणारे शूर, नवे नवरीचे खोलींत नवा जांवई जसा पूर्ण आवडीनें निजावयास घुसतो, किंवा भुकेलेले वाघ डोंगरांतील सांबर वगैरे जनावरावर अति क्रोधानें फार जलद दौड करितो, त्याप्रमाणें ते शूर, कोयलदुर्गाचे किल्यावर दौड करित गेले. किल्ला हस्तगत करणेविषयीं हल्ला करिते झाले. ही खबर ऐकतांच भद्रप नाईक याचे सरदार मंडळींत अति भयानें व जरबेनें फारच गलबल झाली. भद्रप नाईक यांजकडील एकंदर सरदारांचे धैर्य सुटलें. त्याजकडील सर्व मंडळींचा एकाएकीं एकदाच गर्व व अभिमान नाहींसा झाला. निरोपायपणा व काकुलती येण्याशिवाय दुसरा कांहीं एक उपाय नाहींसा झाला. असें जाणोन सर्व गर्व व अभिमान सोडून अति नम्र होऊन व काकुलती येऊन नवाब अबदुल रहीम बहलुलखान याचे वशिल्यानें एक अति नम्रतेचे मजकुराचे बिनंतीपत्र फार काकुळती येऊन लिहिलें. मजकडून बहुत अपराध झाले. मी फार अमर्यादेनें वागलों. ते माझे सर्व अपराध क्षमा करावे. मी पादशाहाची चाकरी करून राहीन. पादशाहाचे आज्ञेंत वागेन. प्रतीवर्षी खंडणीचा ऐवज बहुत पादशाही सरकारांत दाखल करित जाईन. यांत हिल्ला हरकत कधींहि करणार नाहीं. माझें जिवास व मालास धक्का लागो नये. माझा मुलुक मजकडे आहे तो कायम व बहाल ठेवावा. अशा मजकुराचे विनंतीपत्र लिहून आदिलशाहा पादशाहाकडे पाठविलें. नवाब बहलुलखान याणी तें विनंतीपत्र पादशाहास समजाऊन भद्रप नाईक याचे अपराध क्षमा करावे अशी विनंती केली. भद्रप नाईक याणी काकुलती येऊन विनंतीपत्रांत विनंतीचीं कलमें लिहिलीं आहेत त्याप्रमाणें सरकारांनीं कबूल करून त्याचे सर्व अपराध क्षमा करावे अशी अति यत्न करून विनंती केली. तेव्हां पादशाहानीं भद्रप नाईक याजला शिक्षा देण्याचें व त्याचा सूड घेण्याचें ठरविलें होतें ती शिक्षा देणें व सूड घेणें माफ केलें. भद्रप नायकावर अति क्रोध धरिला होता तो सोडून देऊन मेहरबानगी केली. पैगंबर याणीं ठरविलेलें व कुरान परीफचे शास्त्रार्थाचे चालीनें प्रतीवर्षी खंडणीचा ऐवज घेण्याचा करार कबूल करून भद्रप नाईक याचे जीवास व मालास व त्याचे अबरुस व मुलकास उपद्रव लागणार नाहीं असें अभय दिल्हें. भद्रप नाईक यास आज्ञापत्र लिहिलें. त्या आज्ञापत्रांतील मजकूर : यद्यपि तुज मुर्खाकडून असे अपराध व अशी अमर्यादा घडली कीं, तुझा निर्मूळ फडशा करावा व तुझे फारच पारपत्य करावें असे अपराध तुजकडोन घडले. परंतु तुझे दैव चांगलें. यामुळें तूं भ्रांती सोडून लौकरच हुशार झालास. वाकडे चालीनें वागण्याचा मार्ग सोडून चांगले चालीचे मार्गावर पुन्हां आलास. आमचे आज्ञेंत वागोन चाकरी करून राहीन असें कबूल केलेंस. नवाब हे थोर पदवीचे व दौलतगार व आमचे एकांतांतील पूर्ण विश्वासू व भरोंशाचे मनुष्य व कचेरींतील मुख्य सरदार बहलुलखान आहेत. आम्ही बहलुलखान याची विनंती कधींहि रद्द केली नाहीं. सांगणें मोडलें

नाहीं. ते बहलुलखान तुजविसीं रदबदली करण्याकरितां उभे राहून तुजवर आम्हीं क्रोध धरिला आहे तो सोडावा, तुझा सूड घेऊं नये व तुझे सर्व अपराध क्षमा करावे येविषयीं बहलुलखान याणी अति यत्न करून फार रदबदली केली. बहलुलखानाचे मनोधोरण ठेवणें व त्यांचे सांगणें कबूल करणें आम्हांस फार प्रिय आहे. यास्तव निरोपाय होऊन तुझे मागील केलेले सर्व अपराध आम्ही माफ केले. तुजवरील सर्व क्रोध आम्ही सोडिला. पुन्हां तुझा मुलुक तुजकडे बहाल केला. कायम ठेविला. तुझे बाप आजे मागे होऊन गेले त्या वधिलांचे जाग्यावर तुजला कायम ठेविलें. हा करार ठरविला जात आहे कीं, तूं पुन्हां कधींहि गैरराहा व वाईट चालीनें चालूं नये. सर्वकाळ आमचे चाकरीखेरिज व आमचे आज्ञेशिवाय दुसरें कांहीं एक काम करूं नये. कराराप्रमाणें नजरेचा ऐवज जलद पाठवून द्यावा. प्रती वर्षी खंडणीचा ऐवज पाठऊन देण्याचा करार ठरला आहे त्याप्रमाणें कांही एक हरकत न करितां व कोणतीहि सबब न सांगतां बिनबोभाट ऐवज सरकारांत दाखल करित जावा. अशा मजकुराचें आज्ञापत्र राजा भद्रप नाईक याजला पोहोचलें तेव्हां अति संतोषानें पादशहाचें सेवेंत सिध्द होऊन बहुत रोख ऐवज व भारी किंमतीचे जवाहिर व अति उत्तम प्रकारचे जिन्नस पादशाहाकडे पाठविले. यानंतर आदिलशाहा पादशाहा अति संतोष पावोन बहुत आनंदानें यशस्वी होऊन तेथून परत निघोन सुरक्षितपणें तारिख १ जमादिलावल रोजीं (२१ नवंबर १६६२) पादशाहा विजापुरास दाखल झाले.

## ३१. दक्षणचे राज्य बुडणेंचें कारण व दक्षण देशचें राज्य मोंगलाचे, म्हणजे दिल्लीचे पादशाहाचे, हातीं जाणेंचें कारण वर्णन प्रकर्ण :

दिल्ली येथील तैमूर पादशाहाचे वंशास दक्षण देश हस्तगत करण्याची फार फारच आशा होती. येविषयीं त्याणी यत्नहि बहुत केला. अकबर पादशाहा याणी व अकबर पादशाहाचे वंशानीं तर सर्व हिंमत याच कामांत खर्च केली होती. तेव्हां बहुत यत्न करून कांहीं दिवसानीं युक्तीयुक्तीनें दक्षणचा कांहीं मुलुक काबिज केला, म्हणजे घेतला. खानदेश व वराडचा मुलुक हस्तगत केला. शहाजहान पादशाहाचे कारकीर्दीत निजामशाहाचा मुलुक घेण्याकरितां परस्परें लढाई चालली होती तों इतक्यांत सुलतान महंमद पादशाहा व शहाजहान पादशाहा या उभयतांनीं निजामशाहाचा मुलुक निमेनिम वाटून घेऊन पुन्हां आपसांत युध्द करूं नये आणि उभयतां पादशाहांनीं एकमेकांत मित्रता मजबूत धारण करून एकमेकांचे इलाक्यांतील मुल्कास उपद्रव करूं नये या प्रमाणें करारनामाहि मजबूत ठरावाचा सोन्याचे पत्रावर लिहून उभयतां पादशाहांनीं त्या करारनाम्यावर आपआपले शिक्के

करून करारपत्र लिहिलें. याच करारमदारावर बहुत दिवस गुजरले, तत्रापि आदिलशाहा व दिली येथील पादशाहा या उभयतांत युध्ध झालें नाहीं. दुसरे अली आदिलशाहाचे कारकीर्दींत पुन्हां युध्ध प्रसंग उभा राहिला. उभयतांमध्यें वैरभाव व आदावत प्रसिध्ध झाली. उभयतां पादशाहांत हा सर्व वैरभाव व वाकडेपणा येण्यास शिवाजी भोसलेच कारण झाले होते. शिवाजीचे योगानेंच सर्व वाकडे आलें. शिवाजीचा बाप शाहाजी भोसला हा यद्यपि फंद फितूर वगैरे संकटें उभीं करणार बंडखोरच होता परंतु शाहाजी भोसल्यांत फार नम्रता होती. धण्याशीं कसें वागावें येविषयींचें इमान सांभाळून होता. धण्याचें मीठ खालेलें स्मरत होता. धण्यास वोळखित होता. यामुळें सुरक्षितपणें शाहाजीनें आपले आयुष्याचे दिवस घालविले.[१८] शाहाजीचा वडील पुत्र संभाजीहि महान गर्विष्ठ होता. परंतु धण्यास वोळखीत होता. त्याचा भाऊ शिवा याणीं फंदफितूर वगैरे बंड करून अपकीर्ति मिळविली. असा केवळ संभाजीनें बंड व फंदफितूर करून वाईटपणा मिळविला नाहीं. आदिलशाही राजधानींत शिवा याणींच आग लाविली. उभयतांत लढाया लाविल्या त्याहि शिवानींच लाविल्या. शिवाजीची रहाण्याची जागा पर्वतांतील दाट झाडींत व काट्याचे झाडांत होती. तेथें शिवा रहात होता. डोंगरांतील बहुत जागा व किल्ले होते याच भरोंशावर शिवा गर्विष्ठपणा व अत्यंत दांडगेपणा करित होता. दोनीकडेहि, म्हणजे दिल्लीकडे व आदिलशाहाकडेहि, उपद्रव करित होता. फार इजा देत होता. चोरासारिखे स्वभावाचा होता. कारण कीं, तसा बंडखोर या पृथ्वींतहि कोणी नाहीं. आपले पिशाच्यासारिखे स्वभावाची आपली फौज घेऊन केव्हां केव्हां दिल्लीपर्यंत दौड करून दिल्लीचे सरहद्दींतील मुलकाची पायधुळी व बहुत खराबी करित होता. केव्हां केव्हां आदिलशाहाचे मुलकावर चालून जाऊन गांव खेडीं व पेठे बहुत वसुलाचे लुटून चंदी व कंचीपर्यंत दौड करून छापे घालित होता. शिवाचे दंग्यानें व लुटालुटीचे उपद्रवानें दिल्ली येथीळ अलमगीर पादशाहा व आदिलशाहा पादशाहा हे उभयतांहि थकले. उभयतांनींहि शिवास ताळ्यावर आणण्याकरितां बहुत यत्न केले, परंतु कांहीं एक उपयोग झाला नाहीं. शेवटीं त्या दुष्टाचे व निर्दैवी पुरुषाचे व धुबडाच्या पायाच्या स्वभावाचे पुरुषाच्या, म्हणजे सिवाच्या, दांडगेपणानें हळुहळु दक्षणचा सर्व मुलुक मोंगलाचे, म्हणजे दिल्लीचे पादशाहाचे, हातीं गेला.

१८. शके १५८५ शुध शष्टी शनवारी (२३ जानेवारी १६६४) शाहाजी राजे परलोकास गेले.– जेधेश, पृ. २२.

३२. शिवा याणीं बंडावा करणेस प्रारंभ करणें व याच कारणानें दिल्ली येथील पादशाहानीं आदिलशाहाचे मुल्कावर फौज घेऊन चालून येणें प्रकर्ण :

ज्यासमई अली आदिलशाहा कित्येक दिवस बंकापूरचे किल्यांत राहून हिंदूसी लढाया करून कर्नाटकचा व मलनारचा बंदोबस्त करित होते व अली आदिलशाहाची सर्व फौज कर्नाटकाकडेच लढाईचे नेमणुकींवर होती त्यासमई शिवा वगैरे गैरराहा वागणूक करणारा याणी फुसरतीची संधी जाणोन डोंगरांतून बाहेर निघाला. चहूंकडे निहाळून पाहिलें. भक्षण करावयाजोगा प्रथम घास चांगला शायस्ताखान म्हणोन होता तोच योजिला. तो एक नामांकित सर्व शिपायांचा धणी सरदार होता. तो औरंगजेब पादशाहाचे आज्ञेवरून दक्षण देशचे जिल्ह्यावर नेमिलेला होता. आपले फौजेसुध्धां गाफिलपणानें शिवाचे डावपेंच न जाणतां शिवाचे सरहदीनजिक येऊन उतरला होता. तेव्हां शिवा याणी आपली राक्षसासारिखे स्वभावाची फौज घेऊन दूरचे वाटेवर येऊन त्याजवर दौड करून रात्रीं त्याचे लष्करावर छापा घातला. त्याची सर्व फौज लुटून सर्व सामान सरंजाम, जिनस व शायस्ताखान याचे नख्ती जिंनस वगैरे सर्व लुटून घेतले. शायस्ताखान जखमी होऊन बहुत खराबीनें पडला गेला.[१९] हें भयंकर वर्तमान दिली येथील पादशाहास समजलें तेव्हां पादशाहा अत्यंत क्रोधायमान होऊन त्रासून शिवाचा सूड घेणेंकरिता व पारपत्य करण्याकरितां जसवंतसिंग या नांवाचे सरदारासमागमें बहुत फौज देऊन रवाना केला. जसवंतसिंग आपले फौजेसुध्धां निघोन शिवाचे सरहदींत येऊन शिवाचे एका किल्यानजिक (सिंहगड) येऊन भिडला.[२०] त्या किल्यावर हल्ला करून तो किल्ला लौव्हाराचे गर्व्याप्रमाणें घेरला. पिशाच्यासारखे लक्षणानें भरलेला शिवा याणीं चोरटे लोकांस जसवंतसिंग याजवर नेमून आपण खुद जातीनें आपली राक्षसासारखी फौज घेऊन सुरतचे बंदर, फार भर वस्तीचें व तसें दुसरे बंदर या पृथ्वींत नाहीं असें

१९. शके १५८५ चैत्र शुध ८ रविवार (५ एप्रिल १६६३) शास्ताखानावरी पुणियांत शिवाजीराजा खासा जाऊन छापा घातला. शास्ताखानाचा हात तुटला. मग पळाला. त्याचा लेक अबदुल फत्तेह ठार जाला. लाल महालांत शिरले.– जेधेश, पृ. २२. काफीखान, इ. डॉ. VII, पृ. २६९–२७०. Shasta Khan left Aurangabad by the end of January 1660, reached Shevgaon on 3rd March and via Supa arrived in Poona. Shivapur Camp. The assault on him took place in Ramajan (April 1603) KK. Mac. Mss.

२०. शके १५९५ मार्गशीर्ष मासी (नवंबर–दिसेंबर १६६३) जसवंतसिंग कोंढाणियाखाले वेढियास आले.– जेधेश, पृ. २२.

फार चांगलें बंदर आहे, त्या बंदरावर जाऊन हल्ला करून छापा घातला. साधेपणाचा भाव दाखऊन बहुत हुशारीनें त्या बंदरांत शिरून त्या बंदरांतील सर्व मालमत्ता सोनें रूपें वगैरे लुटून, स्वच्छ केर काढून निर्मळ करितात त्या प्रमाणें तें बंदर लुटून, साफ केलें.[२१] पुन्हां तशीच दौड करित अति त्वरेनें आपले रहाण्याचे जाग्यास शिवा येऊन पोहचला.[२२] या वरचेवर जाणें येणें व दौड करणें व पुन्हां परत येणेंची खबर कोणा एकास समजली नाहीं. परंतु शिवा येऊन लुटून परत गेलेनंतर तेथील सर्व मनुष्यें या छापा घालण्यानें बहुत चिंतेंत पडोन सर्वांनीं आश्चिर्य मानिलें. शिवा याणी सुरतेचे बंदर लुटून परत आल्यानंतर पुन्हां जसवंतसिंग यासी युध्ध करण्याचे मोकाबल्यावर उभे राहून असेच धांदलीनें व डावपेचानें जसवंत-सिंगासहि थकविलें.[२३] हें अति चिंतेचें नवीन वर्तमान औरंगजेब पादशाहास कळलें तेव्हां औरंगजेब पादशाहास असा क्रोध आला कीं, त्या संतापानें औरंगजेब पाद-शाहानीं आपला ऐषआराम देखिल सोडून दिला. शिवाचा सूड घेण्याचे फिकिरींत पडोन विचार करित होता. तेव्हां शेवटीं हा विचार ठरविला कीं, हें अवघड काम शेवटास जाणें, म्हणजे शिवाचे पारपत्य होणें, आदिलशाहाचे मदतीशिवाय कदापि घडणार नाहीं. यास्तव आदिलशाहापासून मदत इच्छिणें प्राप्त आलें.

## २३. दिल्ली येथील पादशाहानीं शिवाचे पारपत्य करणेंकरितां आदिलशाहा-पासून मदत इच्छिणें प्रकर्ण :

नंतर अकलवान वकील आदिलशाहाकडे पाठऊन निरोप सांगून पाठविला कीं, हा हिंदु फार वाईट चालीचा मनुष्य जीवें मारण्यालायक शिवा याणीं फार

२१. शके १५८५, मार्गशीर्ष वद्य २ (६ दिसेंबर १६६३) सुरतेस गेले.– शिदश, शिचप्र, पृ. ५१. पौषमासीं वद्य ४ (६ जानेवारी १६६४) जाऊन सुरत लुटिलें.– जेधेश, पृ. २२, शिवाश, शिचप्र पृ. ५९.

२२. शके १५८५, माघ वद्य ४ भृगुवारी (५ फेब्रुवारी १६६४) राजे फिरोन रायगडास आले.– जेधेश, पृ. २२. शिवाश पृ. ५१.

२३. शके १५६६, चैत्र वद्य १३ (१४ एप्रिल १६६४) सिंहगडीं सुलतान टोचा मारिला.– शिवाश पृ. ५१. जेष्ठ शुध ६ (२० मे १६६४) सिंहगडाखालीं भांडी उतरली.– शिवाश पृ. ५१ जेष्ठ शुध १४ सोमवारी (? शनवार, २८ मे १६६४) जसवंतसिंगे कोंढाणियाचा वेढा काढिला.– जेधेश, पृ. २३. जेष्ठ वद्य १ (सोमवार ३० मे १६६४.) राजे सिंहगड पहावयास गेले.- शिदश. पृ. ५१. On 13 May 1665 Jasawant Singh returned to Delhi and had audience- MiA, p. 32.

दंगा आरंभ करून हरएक फंदफितूर वगैरे बंड करित आहे. मुसलमानांस बहुत पीडा करित आहे. ईश्वराची रयत सर्व मनुष्यें आहेत त्यांजलाहि बहुत दुःख देऊन उपद्रव करण्यांत किंचितहि अनमान करित नाहीं. आतां याउपर शिवाचें पारपत्य करण्याविषयीं जितकी चालढकल करणें व ढिलाई करणें हें तितकी राजधानी बुडण्याचें कारण आहे. वास्तव सर्व मुसलमानांस व पादशाहांस शिवाचें पारपत्य करणें प्राप्त आहे. येविषयीं सर्वांनीं केशाइतकीदेखिल ढिलाई न करितां त्याचें पारपत्य करण्याकरितां यत्न करावा. शिवाचे फंदफितूराचे व बंडाचें मूळ खाणून निर्मूळ करण्याकरितां बहुत मेहनत करावी. गोरगरीब रयत लोकांस शिवाचे पीडेंतून सोडऊन सर्वांस सुखांत व आनंदांत ठेवावें. याजकरितां आमचे मनांत असें आहे कीं, जसें इकडून त्या खराबी शिवाचे पारपत्यावर प्राण घेणारे शूर व यशस्वी शिपाई मंडळी नेमून रवाना होत आहे तसे आपणाकडूनहि नेमून रवाना व्हावे, म्हणजे दोनीकडूनहि तो मनुष्यास चावणारा सर्प, म्हणजे सिवास, मध्यें पकडून पादशाहाचे क्रोधरूप धोंड्यानें त्या सर्पाचें मस्तक फोडून टाकावें, म्हणजे शिवास जीवें मारावा. त्याचे गैरराहा वागणुकीचा सूड घ्यावा. हा फंदफितूराचा काटा, म्हणजे शिवा, मार्गांतून उपटून काढिला म्हणजे आपण व आम्ही या उभयतां पादशाहांत साफी व मित्रतेवाचून दुसरे कांहीं एक कपट किंवा वैर रहाणार नाहीं. असा निरोप सांगून पाठविला. अली आदिलशाहानीं हा निरोप ऐकिल्यानंतर दिली येथील पादशाहाचे सांगणें कबूल करून दिलीकडून वकील आले होते त्यांचा बहुत सत्कार करून परत रवाना केलें. दिली येथील पादशाहानीं जेव्हां आदिलशाहाकडील निरोप आम्ही मदत करितो व तुमचे सांगणें कबूल केलें असा ऐकिला तेव्हां अति संतोषानें आनंदयुक्त होऊन या कामावर नेमण्याकरितां सर्व सरदारांपैकीं नामांकित बहुत संभावित या कामाजोगा शूर अमीर राजा जयसिंग हा आहे असें जाणिलें. कारण कीं, राजा जयसिंग हा दौलतदार, अकलवान व शूर व तसा दुसरा कोणीच नाहीं व सर्वांत श्रेष्ठ व जवळचे सर्व सरदारांपैकीं निवडक सरदार होता. त्याचे समागमें बहुत फौज, शिपाईलोक, मोंगल, पठाण, रजपूत व मुसलमान वगैरे व तसेच लढाऊ सामान सरंजाम अत्यंत होता तितका त्याचे ताब्यांत देऊन राजा जयसिंग याजला रवाना केलें.[२४]

२४. शके १५८७, वैशाख मासीं (एप्रिल १६६५) जयेसिंग व दलेलखान येऊन पुरंधरास वेढा घातला. आषाढ शुध १० (१२ जून १६६५) राजश्री येऊन जयसिंगास भेटोन सला केला.– जेधेश., पृ. २३; MiA, p. 33.

## ३४. आली आदिलशाहानीं शिवाचें पारपत्य करण्याकरितां दिली येथील पादशाहास मदत देणेंस खवासखान याजला पाठविणें प्रकर्ण :

अली आदिलशाहा याणी दिली येथील पादशाहास कुमक करणें व मदत देणेंचे कबूल करून दिली येथून वकील आले होते त्यांजला निरोप दिल्हा. तेव्हां शत्रूचें पारपत्य करण्याकरितां लष्कराची व लढाऊ सामान सरंजामाची तयारी करून सरकारांतील नामांकित अमीरलोक व सरदारमंडळ होतें तें जमा करून आज्ञा केली कीं, आमचे मनांत आहे कीं, जीवें मारण्यालायक जो शिवा त्याचें पारपत्य करण्याकरितां दिली येथील पादशाहाचे मदतीस तुम्हांपैकीं कोणी सरदारास पाठवावें. असें आमचे मनांत आहे. असा कोण आहे, कीं या कामांत धैर्य धरील, हें काम उत्तमपणानें शेवटास लावील, आम्हांस पसंद येईल व त्याचे पराक्रमाची कीर्ति दिलीपर्यंत जाईल ? असा कोण आहे, अशी आज्ञा केली. तेव्हां महान पराक्रमी खवासखान त्या सर्व अमीरलोकांचे मंडळींतून उठोन उभा राहिला. प्रतिज्ञापूर्वक पानाचा विडा उचलला आणि बोलला कीं, आजची सेवा केवळ माझा हिसा आहे. मजला मनापासून ती आवड आहे कीं, हें काम मी बहुत इमानें इतबारें शेवटास लावावें. स्वामीसेवेंत प्राण खर्च करावा असें माझें मनांत आहे. असें बोलून तेंच वेळेस लढाईस निघण्यास तयार होऊन विनंती केली कीं, पादशाहाचे आज्ञेप्रमाणें वागणें हें काम शेवटास नेणेंस मजला दिल्ली येथील फौज येऊन पोहचण्याची मार्गप्रतीक्षा करणें हे योग्य नाहीं. ते काय माणूस, जे दुसऱ्याचे मदतीनें व दुसऱ्याचे आधारानें काम करिते. त्यांत कांहींच पराक्रम नाहीं. शूर मंडळांत व पराक्रमी पुरुषांत दुसऱ्याचे मदतीवर काम करणाराची तारिफ कोणी करित नाहीं. जर करितां मी लहानपणापासून या वेळपर्यंत पादशाहाचे मीठ खाऊन वाढलों असेन तर त्या मिठाचे सामर्थ्यांनीं मी पराक्रम करून दाखवीन. तें बल माझ्यामध्यें इतकें आहे कीं, सूर्य जरी शत्रू होऊन आकाशावर असला तत्रापि त्याजला तरवारीनें तोडीन व त्याचे फौजेचें धर्य सोडवीन. इतकें बोलून लढाईस निघण्यास आदिलशाहास आज्ञा मागितली. तेव्हां पादशाहानीं त्याजवर बहुत कृपा करून व त्याचा बहुत संतोष करून अली आदिलशाहा पादशाहानीं आपली खासी तरवार खवासखान यास दिली. खवासखान याजला ईश्वराचे आधारावर सोपोन लढाईस जाण्यास निरोप दिल्हा. खवासखान पादशाहाची आज्ञा घेऊन निघाला. तेव्हां दररोज कूच करून मजली काटून शिवाचे सरहदींत जाऊन पोंहचला. खवासखान आल्याची खबर शिवास समजली तेव्हां शिवा वाघाच्या वाटा बंद करण्याचे विचारांत पडला. त्या उतरण्याच्या वाटा बहुत अरुंद व झाडींतील कठीण होत्या. त्या अवघड वाटेखेरीज त्या पर्वतांत दुसरी वाटच नव्हती. अशा समयांत खवासखान याणी फार जलदी करूस घाटावर

चढून आला. आपले फौजेसुध्धां सुरक्षितपणें घाटांतून चढोन गेला. शिवा याजला खवासखान घाट चढून आल्याचे वर्तमान कळलें तेव्हां शिवा याणी अति संतोषानें हात आपटले व अति क्रोधानें आपले हाताचीं बोटें चावलीं. पुन्हा शुध्धीवर आला आणि बोलला कीं, अद्यापि दिलीची फौज येण्यास अवकाश आहे. ईश्वराचा स्तव असो. कारण कीं, प्रथम आम्हांस एकाशींच लढाईचा प्रसंग आला आहे. ही आदिलशाहाकडील थोडीसी फौज आहे. ही मी एका हल्लेंत पिटून देईन. या फौजेचे पारपत्य करण्यापासून मोकळा झालों म्हणजे दिलीकडून ती भारी फौज येईल त्या फौजेसहि मारून फडशा करीन. एक पलखांत त्या फौजेचा मोड करीन. असें बोलून असा विचार करिता झाला कीं, आपली पिशाच्यासारखी एकंदर फौज व लढाऊ सामान सरंजाम, दिलीची फौज आली म्हणजे त्या फौजेशीं युध्ध करण्याकरितां, तयार करून ठेविला होता तो सामान सरंजाम व फौज घेऊन खवासखानाचे फौजेवर रात्रीं येऊन छापा घालून बहुत हल्ला केला. तेव्हां खवासखान याजला हें रात्रीं येऊन छापा घालतील हें माहित नव्हतें. शिवा कोठें रहातो ती पर्वताची जागा देखील माहित नव्हती, तो शत्रु म्हणजे शिवा, कोठें आहे या शोधांत खवासखान होता. शिवा काय मसलत करित आहे या फिकिरींत खवासखान होता. तोंच एकाएकी शिवा याणी आपली एकंदर फौज घेऊन हल्ला करून खवासखानाचे फौजेवर येऊन पोहचला. खवासखानाचे फौजेस वेढा दिल्हा. खवासखानाची फौज लौव्हाराचे गवर्याप्रमाणें घेरली. ज्यासमई खवासखान आपले फौजेसुध्धां पर्वतांतील अवघड जाग्यांत येऊन उतरला होता व ती अशी अवघड जागा होती कीं, तेथें कोणास शिरावयास देखील जागा नव्हती व डावे व उजवे बाजूस जाणेंयेणेंस किंचित हलण्यास देखील जागा नव्हती, मग लढाईस फौजेची बोल बांधणें व लढाई करणेंची गोष्ट कोठून घडेल? यास्तव खवासखानाचे शिपाई फार घाबरले. मरणावर उदार झाले आणि बोलले कीं, आम्ही राक्षस किंवा आसफंदयार जरी असलो तत्रापि येथें काय उपाय करावा? ही जागा अशी अवघड आहे कीं, किंचित हलावयास देखिल जागा राहिली नाहीं. या जाग्यांत आम्ही शूरत्व व पराक्रम काय करावा? शत्रूसी म्हणजे शिवासी कसें युध्ध करावें?

## ३५. खवासखान याणी आपले शिपाई मंडळास दिलभरंवसा व हिंमत देणें व शिवाचा मोड करून आदिलशाहाची फत्ते होणें प्रकर्ण :

खवासखान याणीं जेव्हां आपले शिपाईमंडळ हवालदील व भयाभीत झालें आहे असें जाणिलें तेव्हां लष्करांतील मुख्य सरदारांस आपलेजवळ बोलाविलें.

त्यांजला खवासखान याणी सांगितलें कीं, घाबरूं नका. हिंमत सोडूं नका. आपली जमात थोडी आहे व शत्रूची जमात फार आहे याजवर नजर ठेऊं नका. आपली थोडी फौज बहुत बकऱ्यांत एक लांडगा भारी असतो व फार उंदीर असले तत्रापि तितके उंदिरास एक मांजर पुरे त्याप्रमाणें शत्रूचे भारी फौजेस आपली थोडी फौज पुरे असें समजावें. शत्रूनीं आज कितीहि संकटानें आपलेवर चालून येऊन या भयंकर अरण्यांत व पर्वताचे गारींत आम्हांसभोंवते वेढिलें आहे. किंचितहि हलण्यास देखिल जागा ठेविली नाहीं तत्रापि ईश्वराचे कृपेवर व पादशाहाचे दौलतीवर भरोंसा ठेऊन येथेंच डेरे ठोकून कायम होऊन उभे राहूं. शूरत्व व पराक्रम करूं. शत्रूचें मस्तक उडऊं. मी शायस्ताखान नोहे, कीं शिवाचे ठकविद्येनीं ठकूं. शिवास आजपर्यंत कोणी माझेसारखा हरिण भेटला नाहीं. यामुळें शिवा याणी हरएकास ठकविलें आहे. आतां त्या सर्वांबदलचा सूड मी घेऊन शिवाचा गर्व निखालस नाहींसा करीन. तुम्ही आपआपले हिंमतीवर कायम राहून लढाईस तयार होऊन असावें. कसें होतें तें पहावें. शिवाचे हातून कशा तऱ्हेनें नख्त जिंकून आणितो तो चमत्कार अवलोकन करा. या प्रकारें खवासखान आपले शिपाई मंडळासी बोलत होता इतक्यामधें एकाएकीं शत्रूचे फौजेंतून बंदुकीचे व तोफेचे आवाज उठले. तोफेचे गोळे खवासखानाचे लष्करांत येऊन पडूं लागले. तेव्हां खवासखान बोलला कीं, उठा, हिंमत धरा. आजचा दिवस पराक्रमाचा आहे. असें बोलून लढाईची तयारी करून शिपाई व स्वार व पायदळ वगैरे जमातीस लढाईचे कायदेप्रमाणें कायम करून उभे केले. हरएकास पूर्ण भरंवसा व सामर्थ्य देऊन सर्वांचें मदती-करितां खवासखान खुद जातीनें पाठबलावर बहुत मजबुतीनें कायम होऊन उभा राहिला. लढाईस प्रारंभ केला. खवासखानाकडील सरदार मंडळ शूर, वाघ जाळींतून उठतो त्याप्रमाणें, अवघड जाग्यांतून उठविले आणि चिलखत बख्तर तोडणाऱ्या फार जलद धारेच्या तरवारी उपसून रणभूमींत युध्ध पराक्रम करूं लागले. तेव्हां ते पिशाच्यासारखे स्वभावाचे मऱ्हाटे लोक शंभरास व दोनशे असामीस आम्ही एक एक भारी आहों असें समजत होते ते छाती फोडून पार करावयाजोगे भाले हातांत घेऊन खवासखानाकडील घोड्यावर धाऊन येऊन मारामारी व तोडातोडी करूं लागले. खवासखानाचे फौजेचे मोकाबल्यावर उभे राहून बराबरीनें युध्ध करून रक्ताचे पूर वाहावयास लाविले. युध्धाचा अग्नि असा पेटला कीं, ती रणभूमी अग्निची भटीच झाली. त्या युध्ध समयांत त्या रणभूमीवरून पक्षांनींदेखिल उडणें सोडिलें. ती रणभूमी शूरांचे रक्तानीं लाल फुलांचे शेताप्रमाणें आरक्त झाली. शिवा-कडील फौजेचे हल्लेनीं खवासखानाकडील मोठे मोठे शूर महापराक्रमी ठार झाले. त्या एकंदर सरदारांपैकीं सिद्दी सरवर म्हणोन हपसी जातीचा नामांकित सरदार होता. शाहा हजरत व शेख मिरा व कित्येक आणखी थोर थोर शूर बहुत इमानी व

पादशाहाचे परिक्षेस उतरलेले ज्यांची सर्व पृथ्वींत कीर्ति झालेले व हे लोक युध्धांत मरण पावले असतां स्वार्गासच जातील असे शूर होते. त्यांजवर शत्रूनीं गर्दी करणें जवळ आलें होतें. हिंदुकडील फौज मुसलमानीं फौजेवर प्रबळ होणें फार संनिध आलें होतें, तोंच एकाएकीं महान पराक्रमी खवासखान तरवार उपसून ज्या जाग्यावर उभा राहिला होता तेथून पुढें चालून गेला. शत्रूची, म्हणजे शिवाची, फौज बोळी बांधून उभी राहिली होती त्या फौजेवर हल्ला केला. मुसलमानाकडील शिपाई मंडळीनीं पाहिलें कीं, आपला सरदार खवासखान पुढें सरळून तरवारीस व भाल्यास आपलें हृदय अर्पण केलें आहे. असें पाहिलें तेव्हां मुसलमानी एकंदर फौज एकाएकां एकदांच जिवाची आशा सोडून सर्व एकदील होऊन शत्रूचे फौजेवर दौड करून हल्ला करिती झाली. ' धर धर '' मार मार ' अशा भयंकर आरळ्या आकाशांत ऐकूं जावयाजोग्या मारूं लागले. जसा युध्य पराक्रम करावा तसा केला. शूरत्व करण्यांत किंचितहि अनमान केला नाहीं. शत्रूचे रक्तानीं रणभूमी तांबडे रंगाचे फुलांचे जमिनीप्रमाणें आरक्त केली. मेलेले माणसांचे प्रेतांचे ढीग घातले. हिंदुकडील फौज जेरीस येऊन थकली. हिंदूचा मोड होऊन शिवाकडील फौजेनीं रणभूमी सोडिली. हिंदूस अपेश आलें. शिवा याणीं आपले फौजेची या प्रकारची दशा पाहिली तेव्हां अति संतापून मस्तकांत बदनामीची माती घालून घेऊन त्या रणभूमींतून शिवा पळून गेला व खवासखानाची फत्ते झाली.[२५]

## ३६. खवासखान याणी शिवाचा मोड केल्यानंतर दिलीकडून राजा जयसिंग याणीं येऊन पोहोंचणें प्रकर्ण :

दिली येथील पादशाहाचे आज्ञेप्रमाणें शिवाचे पारपत्यावर राजा जयसिंग याची नेमणून झाली, तेव्हां राजा जयसिंग बहुत फौज व फार लढाऊ सामान सरंजाम घेऊन दक्षण देशावर चालून आला.[२६] अद्यापि राजा जयसिंग वाट चालत होता तोंच खवासखान याणीं आदिलशाहाचे आज्ञेवरून दिली येथील पादशाहाचे फौजेस मदत देण्याकरितां शिवाचे पारपत्यावर चालून आला आणि दिली येथील फौज

२५. शके १५८६ कार्तिक मासी (आक्टोबर–नवंबर १६६४) येदिलशाहाचा व राजश्री स्वामींचा बिघाड होऊन खवासखान कुडाळास आले. राजश्री स्वामी सेनेसह-वर्तमान जाऊन घोरपडे मारिले. खवासखानासी युद्ध केलें. तो पळोन घाटावरी गेला. –जेधेश, पृ. २३.

२६. Jaisingh arrived at Aurangabad in Saban 1075 (6 Feb. to 6 Mar. 1665) Kafi Khan, Mac. Mss, p. 182.

येण्याची वाट न पहातां बंडखोरावर व फंद फितूर करणारावर, म्हणजे शिवावर, दौड करून शिवाची कंबर मोडिली. शिवाचे पंख उखडून टाकिले, म्हणजे शिवास फार जेर केला. राजा जयसिंग जेव्हां शिवाच्या इलाक्यांत येऊन दाखल झाला तेव्हां पुणेधराचा ( पुरंधर ) किल्ला डोंगरांतील सर्व किल्यांहून थोर व फारच मजबूत होता. पूर्वी तो किल्ला एके गर्विष्ठ मवाशाचे हातीं होता. तो किल्ला शिवानीं शेंकडो श्रमानें, संकटानें व हजारो हुनरानें हस्तगत करून तो किल्ला शिवा याणीं आपलेस राहावयास आधार आश्रयाची जागा करून किला घेतला होता. त्या किल्यावर राजा जयसिंग चालून येऊन तो किल्ला हस्तगत करण्याविषयीं राजा जयसिंग याणीं हिंमत धरिली. राजा जयसिंग याजला पके समजलें कीं, आतां शिवास कोणीकडूनच मदत किंवा कुमक येत नाहीं. असें जाणिलें तेव्हां निर्भयपणें राजा जयसिंग त्या किल्यासी भिडला. [२४] त्या किल्यावर मोठा प्रबळ हल्ला करून किल्ला घेरला. मोठे मोठे चर खणिले होते ते मोडून टाकण्यानें व बंदुकींचे व तोफांचे सरबतीनें किल्यांतील मनुष्यांस निखालस जेर करून थकविलें. यद्यपि शिवा किल्याबाहेर राहिला होता, परंतु खवासखान याणी शिवास टोकाटोकी करून असा थकविला होता कीं, किल्याचे मदतीवर व कुमकेवर पाऊल न ठेवी असा जेर केला यामुळें शिवा निरोपाय होऊन राहिला. शिवानी मनांत विचार केला कीं, आपले धण्यासी, म्हणजे आदिलशाहासी, फार अमर्यादेनें व बेमानपणानें वागलों व पादशाहाची आज्ञा मोडून बहुत गैरराहा वागणूक केली, आतां रदबदली करण्याचा व माझी विनंती पादशाहानीं कबूल करण्याचा निखालस मार्ग राहिला नाहीं. तेव्हां आदिलशाहाचे दरबारांतील सर्व निराशा झाली. महाप्रळय शत्रूसी म्हणजे दिल्ली येथील पादशाहाशींहि शत्रुत्वानेंच वागलों व तो शत्रु म्हणजे दिल्लीकडील फौज घरावर येऊन पोहचली आहे. आतां आमची रहाणेची जागा घरदारसुध्धां दिलीवाल्याचे हातीं जाती यात संशय नाहीं. ते दिल्लीकडील लोक इतकेंच घेऊन उगेच रहातील असें दिसत नाहीं. बहुतकरून माझा प्राणहि घेतील. मी काय असा थोडा अन्याय केला आहे कीं, ते मजला जिवंत ठेवतील! तेव्हां हें संकट माझे घरादारांवर व माझे प्राणावर येऊन पोहचलें. आतां कांहीं तरी विचार काढिला पाहिजे. कांहीं मसलत योजिली पाहिजे. कारण घरदार गेलें तर जाऊं द्या, परंतु आपला प्राण तरी सुरक्षित राहिला, आपला जीव सुरक्षित राहिला, तर पुन्हां असे किले व अशा जागा हातीं आणितां येतील. असा दृष्टांतहि प्रसिध्ध आहे कीं, ‘ शिर सलामत तर पगडी पचास ’ असें आहे. असें जाणोन कपटाचा व ठकविद्येचा पाश पसरला. राजा जयसिंग यांजसी सख्य करण्यास प्रारंभ केला. नाना प्रकारचे ठकविद्येचे डाव राजा जयसिंग याजवर चालविले. शिवा याणी निरोप सांगून पाठविला कीं, दिली येथील पादशाहा मंडळीनीं दक्षण देश हस्तगत करणें करिता आजपर्यंत श्रम

सायास केले. वारंवार लष्कर दक्षण देशावर नेमून लक्षावधी व कोट्यावधी मनुष्यें खराब झालीं. तत्रापि दक्षण देश हस्तगत झाला नाहीं. दिलीवाल्याचे पूर्ण मनोरथ झाले नाहींत. जो सरदार फौज घेऊन दिली येथून दक्षण देशावर चालून आला तो काम न होतां खिन्न होऊन व अपेश येऊनच माघारा गेला. जर करितां महाराज आपण या सेवकास, म्हणजे मजला, आपला मित्र आहे असें समजून मजला आपले कृपेचे छायेंत घेऊन आपले कृपेचा हात माझे मस्तकीं ठेवाल तर मी बहुत सुलभपणानें पूर्ण यत्न करून दक्षणचा सर्व मुलुक औरंगजेब पादशाहाचे हातीं आणोन देतों. कित्येक किल्ले जे दक्षण देशांत बहुत मजबूत व फार थोर आहेत व माझे हातीं आहेत ते सर्व किल्ले आपले हवालीं करितो. असा निरोप सांगून पाठऊन एकंदर किल्यांच्या कुलपांच्या किल्या राजा जयसिंग याजकडे पाठविल्या. राजा जयसिंग याचे हातीं येवढा भला स्वर्गासारिखा आला व त्याजला एवढी आशा दाखविली. राजा जयसिंग मनांत जाणित होता कीं, हा चोरटा मनुष्य, म्हणजे शिवा, घरांतील चोर आहे. या मुलकाचा माहितगार आहे. याजकडोन इतकें काम होईल असें जाणित होता. परंतु निरोपाय होऊन त्या सोद्यानें या सोद्याचें म्हणजे राजा जयसिंग याणे शिवाचे, भापणावर भरंवसा टेऊन, या वाक्याप्रमाणें– अरबींतील वाक्याचा अर्थ : "हरएक जिंनस आपले जातीचे जिनसासी मिळतो" या वाक्याप्रमाणें राजा जयसिंग शिवासी मिळाला. उभयतां एक झाले. दोघेहि गैरराहा वागणूक करणारे बंडखोर परस्परें मित्रतेचा करार करून एकमेकांनीं निश्चय ठरविला कीं, उभयतानींहि एकत्र होऊन आदिलशाहाचे मुलकावर दांडगेपणानें चालून जाऊन आदिलशाहाचा सर्व मुलुक लुटावा. जें हातीं लागेल तें उभयतांनीं वाटून घ्यावें असा करार ठरविला.[२४] असा बेमान खानाजाद म्हणजे शिवा याची उत्पत्तीच मुळची बदजातीची व बेमानपणाची होती. यामुळें शिवानीं मोठे बंड उभें करण्याचें कांहीं एक भय न वागवितां गैरराहा वागणूक करण्यास सिध्द झाला. आपले धण्याचें घर बुडविण्यापरतें दुसरें कोणतेंच पातक नाहीं असें असतां त्या बेमानानें व धण्याचे अन्नास न स्मरणारानें, म्हणजे शिवानें, आपले धण्याचे नीतीस व बोध शिकविलेलेहि मानले नाहींत, आदिलशाहाचे उपकारांवर व इमानावरहि दृष्टी ठेविली नाहीं.

### ३७. सिवा व राजा जयसिंग हे उभयतां एक होऊन मित्रता धारण करून आपला मुलुक एकंदर लुटणेंकरितां येत आहेत अशी खबर आली ती आदिलशाहा पादशाहास समजणें प्रकर्ण :

जेव्हां बातमी येऊन होईल तितकी खबर बातमीदारांनीं वरचेवर शिवा व राजा जयसिंग हे उभयतां एक होऊन आदिलशाहाचे मुलकावर चालून येऊन मुलुक

लुटणार[२७] अशी बातमी लिहून आली. आदिलशाहास कळविली तेव्हां पादशाहा बहुत विचारांत पडले. बगलेंतील शत्रू, म्हणजे शिवा, हा बाहेरील शत्रूशीं, म्हणजे राजा जयसिंग यासीं, मिळाला असें जाणोन फारच चिंतेंत पडले. बोललें कीं, घरच्याच चोरानीं, म्हणजे शिवानीं, फार दंगा मांडला आहे. कारण कीं, अनओळखी चोर, म्हणजे राजा जयसिंग, शिवाचे दंग्याचे दहावे हिशाचा दहावा हिसा देखिल दंगा करित नाहीं. अली आदिलशाहा याजला दूरवर विचारानें व अकलेनें तें कारण होते कीं, शिवाचे धण्याशीं, म्हणजे राजा जयसिंग याशीं, या दिवसांत फारच मित्रता झाली आहे. ती दोस्ती बिघडूं नयें व आपले सामर्थ्य आहे तोंपर्यंत जलदी न करणें व त्याचें सख्य करून घेण्याविषयीं बहुत यत्न करणें हीच थोरांची चाल आहे. यास्तव प्रथम मुल्ला खुरम याजला नाना प्रकारचे बोध नीतियुक्त पत्र लिहून देऊन राजा जयसिंग यायकडे रवाना केलें. त्या मुल्ला खुरम याचें पाठोपाठ मुल्ला अहंमद याजलाहि रवाना केलें. कारण कीं, या उभयतांहि अकलवानांनें व मसलतगारांनें जाऊन त्या मूर्खास पुन्हां ताळ्यावर आणावा. त्याची गैरराहा वागणुक सोडवावी. यास्तव रवाना केलें. तेव्हां त्या उभयतांनीं ती सांगणारानें जाऊन या बदमस्तीनें धुंद झालेले पुरुषास, म्हणजे शिवास, नाना प्रकारचे बोध व नीति सांगून उतम मार्ग सुचविला. परंतु तो अयोग्य मनुष्य बदमस्तीनें धुंद झालेला, म्हणजे शिवा, महागर्विष्ट, कारण कीं, शिवापाशीं ऐंशी हजार व खेरीज बहुत शिबंदीलोकांची जमात होती, या गर्वानें शिवास फारच अभिमान झाला होता. मजपरता दुसरा कोणी थोर नाहीं असें मानित होता. यामुळें केशाइतका देखील ताळ्यावर आला नाहीं. ते उभयतां नीति व बोध शिकविण्याकरितां गेले होते त्यांचे नीति व बोध किंचितहि ऐकून घेतले नाहींत. सांगणें कांहींच कबूल केलें नाहीं. आपला माजोरीपणा, गर्व व अभिमान होता तो कायम ठेऊन लुटून खराब करण्याकरितां अली आदिलशाहाचे मुलुकावर चालून येण्याचा निश्चय पक्का ठरविला. जेव्हां ते उभयता दौलतीचें कल्याण इच्छिणारे मुल्ला खुरम व मुल्ला अहंमद हे शिवास नीति व बोध सांगण्याकरितां गेले होते त्यांची निराशा झाली व शिवानीं कांहींच ऐकिलें नाहीं तेव्हां खिन्न होऊन आदिलशाहा पादशाहाकडे त्या उभयतानीं विनंतिपत्र लिहिलें हा बेमान बदमस्त अमर्याद वैरी नीति व बोध सांगून ताळ्यावर आणावयाजोगा मनुष्य नाहीं. यास

२७. शके १५८७– इदलशाहाचा व मोगलाचा सला जाला. तुटोन जयेसिंग व राजश्री सिवाजी राजे व दलेलखान विजापुरावरी मार्गसीर्प मासीं (दिसेंबर १६६५) चालून गेले. तेथें ईदिलशाही फौज सर्जाखान वगैरे येऊन लढाई दिल्ही. मग अंतःस्तें द्रव्य देऊन विजापूरकरांनीं मग मोगलासी सला केला. राजश्री सिवाजी राजे यांणीं जयसिंगापासून निरोप घेऊन राजगडास आले.– जेधेश. पृ. २३.

मित्रता व दोस्तीचे मार्गानें आपलासा करून घेण्याचा यत्न चालवयाचा नाहीं. आतां त्यास उपाय या गोष्टीशिवाय दुसरा नाहीं कीं, त्याचे पारपत्यावर महान पराक्रमी शूर नेमून याचें मस्तक उडवावें. याशिवाय दुसरी तोड नाहीं. आपले फौजेचे घोड्याचे पायानें शिवाचें शरीर तुडवून टाकून त्या शरीराचे तुकडे तुकडे करून ते मांस सर्पास व मुंग्यास खावयास टाकावें. अशा मजकुराचे विनंतीपत्र लिहिलें. तें पत्र अली आदिलशाहा पादशाहानीं वाचून पाहून नंतर बहुत विचार करून अत्यंत क्रोधायमान झाला. अली आदिलशाहाचे क्रोधाचा समुद्र उसळला. ममलकतमदार अबदुल महंमद याजला एकांतीं बोलावून त्या उभयतांनीं विनंतीपत्र पाठविलें होतें तें दाखविलें. सविस्तर मजकूर सांगून त्या कामाविषयीं अबदुल महंमद यास पादशाहानीं सला विचारली. तेव्हां त्या अकलवान वजिरानीं आपले अकलेचे योगानें त्या उभयतांचे विनंतिपत्राप्रमाणेंच विचार ठरविला. बोलिला कीं, नर्मीनरमीनें व मवालकीनें नाना प्रकारचे नीति व बोध सांगण्यानें कार्य घडून येत नाहीं, तेव्हां त्या बदमस्ताचा व महान गर्विष्ट व माजूरी पुरुषाचा उपाय आपले क्रोधाचा अग्नि शत्रूस जाळून फडशा करणारा अशा आपले क्रोधाशिवाय दुसरा कांहीं उपाय नाहीं. फरऊन म्हणोन महा गर्विष्ट पादशाहा जाहाला होता. मीच ईश्वर असें मानित होता. तेव्हां ईश्वरानीं त्याचें मोठें पारपत्य केलें. त्या गर्विष्ट पादशाहाप्रमाणें शिवा याणेंहि गर्वास आरंभ केला आहे. कारण कीं, आपले इतके उपकार व प्रीतीनें पालन करणें हें शिवानें कांहींएक नजरेंत आणिलें नाहीं. त्याणी आपले धण्याचे ताकिदी व शिकविणें लक्षांत आणिलें नाहीं. खास बदजातीनें कंबर बांधिली आहे. या बदमस्ताचे पारपत्य हें आहे कीं, आपली यशस्वी फौज ईश्वरावर भरंवसा ठेऊन शिवाचें पारपत्यावर रवाना करावी, म्हणजे ईश्वरकृपेंकरून आपले यशस्वी शिपाई लोक यांजकडून एका हल्लेत शिवाचें पारपत्य होईल. त्याचा गर्व परिहार होईल. आपलेकडील शूर मंडळानें चपराकी मारण्यानें त्या गाढवासारिखे मस्त पुरुषाची मस्ती तात्काळ उतरेल.

## ३८. आली आदिलशाहा पादशाहा याणी राजा जयसिंग यासी युद्ध करण्याचे ठरविणें व किल्ला मजबूत करणें प्रकर्ण :

नंतर आदिलशाहानीं राजा जयसिंग याजसी युध्ध करण्याचें ठरऊन लढाईचें सामान सरंजामाची तयारी करण्यास आरंभ केला. तर्फेतर्फेस शहराचे आसपास गावोंगावीं जाहागिरीवर जे जे अमीरलोक व सरदारमंडळ निःसीम दौलतीचे कल्याण इच्छिणारे होते त्यांजला हुजूर येणेंविषयीं आज्ञापत्रें पाठविलीं.

बातमीदार जमेदार लोक मलनार व कर्नाटक येथें होते. ते पादशाहाचे हुकमांत व चाकरींत तत्पर होते. त्यांजलाहि हुजूर येणेंविषयीं आज्ञापत्रें पाठविलीं. तेव्हां त्या आज्ञापत्रांप्रमाणें एकंदर लोक आपले फौजेसुध्धां हुजूर येऊन हजर झाले. अली आदिलशाहा याणी बहुत हुशारी ठेविली. कारण कीं, दौलतींत सावधपणा ठेवणें हेंच अकलवानाचें काम आहे. न जाणो शत्रू बहुत फौजेनिसीं स्वारशिबंदी घेऊन लढाईस तयार झाला आहे. तो शत्रु, म्हणजे राजा जयसिंग, किल्यानजिक येऊन पोहचला आहे. जर करितां त्याणी लढाईस प्रारंभ केला तर शहराचे आसपासच्या बागा व कोटाबाहेरील शाहापूर वगैरे पूरें आहेत तीं शत्रुस उतरावयास विश्रांतीस जागा होईल. हाऊद व तलाव पाण्याचे नळ शहराभोंवते अति उतम आहेत. ते नळ व हौद पाहिले असतां काश्मिर म्हणोन शहर आहे त्या शहराचे स्मरण होतें असे अति उतम आहेत ते नळ व तलाव शत्रूस उतरण्यास व विश्रांतीला घ्यावयास स्थान होईल. याजकरितां मिरजा युसफ याजला आज्ञा केली कीं, एकंदर हाऊद व तलाव फोडून त्यांत किंचितहि पाणी न राहे असे कोरडे करून रिकामे करून टाकावे. बागा व पूरें आहेत ती मोडून निखालस ओसाड करून टाकून त्या घुबडासारिखे पायगुणाचे पुरुषास, म्हणजे राजा जयसिंग यास, व पिंगळ्यासारिखे स्वभावाचे मनुष्यास, म्हणजे शिवा या उभयतां घुबडांस व पिंगळ्यांस, बसावयास बागेमधें झाडाची एक देखील वोली डाळी किंवा भिंतीचे आश्रयास बसावयास एक देखिल भिंत ठेऊं नये. अशा बागा व पूरें मोडून फडशा करावे. विहिरी व आडाचे पाण्यांत नाना प्रकारचे विष कालऊन टाकावें. ती काश्मिर या शहरांप्रमाणें व स्वर्गासारिखी जागा आहे ती त्या नरकांतील उभयतांस, म्हणजे राजा जयसिंग व शिवा या उभयतांस, तेथें जागा मिळो नये अशी खराबी करावी. असेच खवासखान याणी पादशाहाचे आज्ञेप्रमाणें किल्याची व बुरजाचे इमारतीची पूर्ण मजबुती करून इमारती पडझड झालेल्या नीट करण्याचें व लढाईची हत्यारें जमविण्याचें व तोफा मारणारे गोलंदाज जेथें जेथें जसे जसे पाहिजेत तसे जमविण्यांत व दारूगोळे व सर्व लढाऊ सामान सरंजाम जसा पाहिजे तसा जमविण्याचे कामावर शाहा हजरत म्हणोन होता व त्याणीं आपले बाप व आजापासून आदिलशाहाचें दौलतीचे कल्याण इच्छून नेकनामींत दिवस घालविले होते त्या शाहा हजरत याजला नेमिलें. तेव्हां थोडकेच अवकाशांत खवासखानाचे यत्नानें किल्ला पूर्ण मजबूत असा झाला, कीं, आकाशाचे उंचीचे साम्यतेस तो किल्ला बरोबरी करित होता. असा किल्ला मजबूत व उंच झाला.

३९. आली आदिलशाहा याणी राजा जयसिंग याजवर फौज रवाना करणें व पर्जाखान याणी सर्फराजखान याजवर हल्ला करणें व सर्फराजखानास जीवें मारणें प्रकर्ण :

त्यानंतर नामांकित वजीर व अमीरलोक कामकारभार केलेले ममलकत मदार अबदुल महंमद, अबुल करीम बहलुलखान, महंमद येखलासखान पर्जाखान, रुस्तुम जमान, सिद्दी मसूद, सिद्दी अबदुल अजीज, शाहाजी राजाचे पुत्र येकोजीराजे व दुसरे कित्येक यशस्वी अमीरलोक व महान शूर व पराक्रमी जमेदार लोक या सर्वांसमागमें बहुत फौज देऊन शत्रूचे पारपत्यावर रवाना केले. बागेंतील शत्रू म्हणजे शिवा जयसिंग रायासी जाऊन मिळाला होता. या भरोंशावर राजा जयसिंग याजला दुष्ट गर्व व अभिमान झाला होता. त्या गर्वानीं निर्भयपणें कांहीं एक विचार मनांत न आणितां आदिलशाहाचे सरहदींतील मुलकांत पाऊल ठेऊन लुटालूट मांडिली होती. कित्येक महाल वगैरे मोठे मोठे गांव जयसिंगाचे हातीं लागले होते. त्यापैकीं एक मंगळवेढें म्हणोन हातीं लागलें होतें. त्या मंगळवेढ्यांत सर्फराजखान सरदार याजला हत्यारबंद पांच हजार स्वारांनिसीं नेमून ताकिद केली कीं, तो किल्ला मजबूत करून तेथें कायम होऊन असावें असें सांगून तेथें ठेविला. त्या किल्यावर बहुत सामानसरंजाम व मालमत्ताहि बहुत बंदोबस्तानें ठेविली आहे असें वर्तमान पर्जाखान याजला वाटेंतच समजलें. तेव्हां त्या शूर लढाऊ पर्जाखान याणी सर्फराजखान ही आपली पहिली शिकार आहे असें समजून आपली जमात घेऊन फौजेंतून निघोन सर्फराजखानावर चालून गेला. पर्जाखान बहुत संनिध जाऊन पोहचला. तेव्हां पर्जाखान याणी खुद जातीनें जाऊन पोहचण्यापूर्वीच सर्फराजखानास निरोप सांगून पाठविला कीं, पादशाही जागेस तूं आपले मावशीचे घर समजून काय स्वस्थ बसला आहेस ? लढाईस तयार हो. कारण कीं, आतां पर्जाखान तुझे मस्तकावर येऊन पोहचला, असें सांगून पाठविलें. सर्फराजखान हें वर्तमान ऐकतांच आपले फौजेसुद्धां तयार होऊन पर्जाखानाचे मोकाबल्यावर चालून आला. लढाई सुरूं केली. दक्षिणी फौजेंत, म्हणजे आदिलशाहाकडील लष्करांत व दिल्ली कडील फौजेंत, मोठी कटा लढाई झाली. असें युध्द पहाण्याकरितां मृत्यू लोक व स्वर्ग लोकांतील मनुष्यांनें देखील नेत्र उघडले व 'शाबास शाबास' असें उभय लोकांत शब्द उठले. पारसी बैतेचा अर्थ : "आकाश 'शाबास' म्हणाले, आकाशावर रहाणारे फिरिस्ते 'वाइवा' असे बोलले" शेवटीं कामाचा परिणाम पर्जाखानाचे पराक्रमानें व पर्जाखानाकडील हत्तीसारिखे जनावरास मानणारे शूर मंडळीचे शूरत्वानें सर्फराजखानाचे फौजेचें धैर्य सुटलें आणि फौज विसकटली. पर्जाखानाकडील शूरांचे तरवारींच्या जखमा लागल्या होत्या ते जखमी लोक रक्तांत व मातींत लोळत पडले होते. जे जखमा न लागतां वाचले होते

त्याणी रणभूमि सोडून लढाईपासून तोंड माघारें फिरवून सुसाट पळून गेले. सर्फराजखान आपले पुत्र व जांवयासहित त्या लढाईंत ठार झाला. तेव्हां पर्जाखान याणी तो किल्ला घेऊन पादशाही जमींत आणोन त्या किल्याचा बंदोबस्त ठेविला. याज समयांत अबदुल महंमद व महंमद एकलासखान या उभयतांचें पत्र आलें कीं, शत्रूनीं, म्हणजे जयसिंग याणी, करार ठरविला आहे कीं या तीन रोजांतच मोटी कठीण लढाई करावी. असें ठरविलें आहे याजकरितां आपणास योग्य आहे कीं, आपण अति सत्वर रणभूमींत यशस्वी फौजेंत, म्हणजे आदिलशाहाचे फौजेंत, येऊन मिळावें. हें पत्र येऊन पोहचतांच पर्जाखान मंगळवेढ्यांतून निघाला. अति सत्वर रातोरात मजली काढून आदिलशाहाकडील फौजेंत येऊन मिसळला. ज्यासमई आदिलशाहाकडील अमीरलोक शत्रूचे मोकाबल्यावर येऊन उभे राहून फौजेच्या वोळी बांधून लढाईस तयार झाले होते तेच वेळेस पर्जाखान त्या फौजेंत दाखल झाला.

## ४०. आदिलशाहाकडील शूर मंडळीनें जयसिंग राजासी लढाई करणें व जयसिंग याणी एक वेळ मागें हटणें प्रकर्ण :

राजा जयसिंग हा नीच मनुष्य. याजला फारच गर्व व अभिमान झाला होता. यामुळें जयसिंग याणी आपले फौजेच्या वोळी बांधून फौजेचा मजबूत किल्ला बांधिला. फौजेचे डावे, उजवे, मागे, पुढें व मध्यभागीं पक्का बंदोबस्त करून लढाईस तयार झाला. प्रथम त्या गर्विष्ट व अभिमानी पुरुषाकडील, म्हणजे जयसिंग याजकडील, शिपाईलोक याणी पुढें चाल करून रणभूमींत हल्ला व दौड केली. त्या लोकांनीं आम्ही महाबलवान शूर आहों, आम्हांस कोणाचे मदतीची गरज नाहीं असें समजून ती रणभूमि तरवारी, ढाला, चिलखत व बख्तरांनीं भरून टाकिली. दक्षणचे म्हणजे आदिलशाहाकडील शिपाई लोक असा लढाईचा दिवस कधीं येईल म्हणोन फार दिवस आस्थापूर्वक, म्हणजे आवडीनें, वाट पहात होते. जसा आषक, म्हणजे विषयलुब्ध विषयानें फार घाबरलेला, माआषूक, म्हणजे ज्या स्त्रीवर लुब्ध झाला आहे त्या स्त्रीचे मुख पाहिले म्हणजे फार अधीर होतो त्याप्रमाणे किंवा भुकेलेला वाघ सांबर वगैरे पाहिलें म्हणजे दरींतून उडोन तें जनावर धरितो त्याप्रमाणें, आदिलशाहाकडील शिपाई याणी आपले विजेसारिखे जलद दौड करणारे घोडे त्या शत्रूचे जमातीवर हाणिले. तरवारी, भाले व तीरकमानी वगैरे शस्त्रें घेऊन शत्रुचे फौजेंत जाऊन भिडले. नेत्रांस पातें न लागे न लागे तों एक पळखांत त्या रणभूमींत असा युध्द प्रळयाचा अग्नि पेटविला कीं, उडणारे पक्षांनीं व अरण्यांतील

जनावरांनीं तें अरण्य सोडलें. विश्रांती व सुखासाठीं ती रणभूमि सोडून एकीकडे निघोन गेले, म्हणजे त्या युध्य प्रळयांत निखालस विश्रांति नाहीशीं झाली. चहूंकडून पळारे पळा असा एकच आरडा झाला. राजा जयसिंग याजकडील शूर मंडळीनीं कितीहि शूरत्व करून तरवारी घेऊन शत्रूवर, म्हणजे आदिलशाहाकडील फौजेवर, हल्ला करण्यांत तीळमात्र अंतर केलें नाहीं व शूरत्व व पराक्रम जसा करावा तसा केला, परंतु आदिलशाहाकडील दक्षिणी शूर मंडळी याणी शत्रूकडील शूर मंडळ यास युद्ध करण्याची हिंमत रहावी व शत्रूनें धीर धरून लढाईस उभें रहावें अशा प्रकारचा युद्धांत ढिलाईनें शस्त्रप्रळय केला नाहीं म्हणजे शत्रूस आपले फौजेपुढें उभें रहाण्याचें किंचितहि धैर्य न ठरे अशी युद्धाची गर्दी केली. तेव्हां राजा जयसिंग याजकडील फौज हिंमत सोडून मागें हटली. आदिलशाहाकडील फौजेचें युद्धप्रळयाच्या अग्निच्या ज्वालांपुढें दम धरवेना तेव्हां एकीकडे निघोन गेले. आदिलशाहाकडील सरदार अबदुल महंमद हा आपले सरदार मंडळास बोलला कीं, आज इतके यश आलें हाच प्रथमचा उत्तम शकून झाला. यास्तव आज इतकीच लढाई पुरी करावी. आपले लष्करासह मुकामाचे जाग्यास जाऊं चला. मोंगलाचे म्हणजे दिल्लीकडील फौजेंतील शत्रूचे दांत आज आपले तरवारीनें बरेच दुखविले आहेत, म्हणजे शत्रूस फार जेर केलें आहे. असें असतां जर करितां पुन्हां आम्हांकडे तोंड करून मोकाबल्यावर उभे रहातील तर ईश्वरकृपेंकरून त्यांचे दांत मुळांपासून पाडून टाकूं. असें बोलून आपले डेऱ्यास परत येते झाले. बहुत आनंदानें विश्रांती घेते झाले.

## ४१. आली आदिलशाहाकडील शूर मंडळीनें राजा जयसिंग यासी दुसरी लढाई करणें व महंमद एखलासखान याचे पराक्रमानें राजा जयसिंग याचा मोड होणें प्रकर्ण वर्णन :

जेव्हां ईश्वरी ईच्छेनें दुर्दैववान व अयोग्य चालीनें वर्तणुक करणारा राजा जयसिंग याचा दौलत बुडून नाश व्हावयाचा होता व जयसिंगास फारच गर्व व अभिमान झाला होता, तो उतरून त्याची निखालस खराबी व बेअब्रु व्हावयाचा होता यास्तव एक वेळ मोड झाला असतां पुन्हां जयसिंगास मूर्खपणाची भ्रांति चढली. वाईट व भलभलतेच विचार करणें आरंभिलें. तेव्हां अक्कलवान मनुष्यानें जयसिंगास अशी अमार्ग वर्गणूक करूं नको व भलतेच विचारांत पडूं नकोस असें कितीहि समजून सांगितलें व नीती व उत्तम विचार सुचविणारानें नानाप्रकारच्या नीती व बोध सूचवून या कामांत पडूं नको म्हणून सांगितलें, परंतु कोणाचे सांगणें न ऐकतां आपलें मनास येईल तसेंच करण्यास आरंभ केला. लढाईस तयार होऊन मोकाबल्यावर

येऊन उभा राहिला. हें वर्तमान ऐकतांच आदिलशाहाकडीलहि सरदार मंडळ शत्रूचें पारपत्य करण्याविषयीं तयार होऊन लढाईस येऊन उभे राहिले. राजा जयसिंग याची फौज पूर्ण सामानसरंजामानिसीं तयार झाली. तोंच इतक्यांत आदिलशाहाकडीलहि अमीरलोक युद्धास तयार होऊन जयसिंगाचे फौजेपुढें आले. फौजेच्या वोळी बांधोन त्याचे मोकाबल्यावर उभे राहिले. अली आदिलशाहाकडील अमीरलोकांनीं आपले फौजेचे डावे व उजवे बाजूस, मागे व पुढें व फौजेचे मध्यभागी पक्का बंदोबस्त केला. जेव्हां दोहींकडीलहि शूर दोन्हीकडून रणभूमींत चालून येऊन शस्त्रें मारण्यास प्रारंभ केला आणि 'धर धर' 'मार मार' अशा आरोळ्या व 'तोड तोड' व 'घे घे' असा मोठाच आरडा झाला तेव्हां कित्येक महान पराक्रमी शूर हत्तीसारखे व व्याघ्राप्रमाणें महायोध्दे उभयतांकडीलहि होते त्याणी त्या रणभूमींत फारच युद्ध पराक्रम करून मरण पावले. लढाईत ऐन हल्लेचे व युद्धप्रळयाचे समयीं महान शूर महंमद एखलासखान, हत्यारबंद निःसीम लढाऊ आपले खासे पांच हजार स्वारांनिसीं, जमेदार मंडळी व खासखेल सुद्धां फौजेंनून फुटोन निघोन विजेसारखे अग्निचे वर्षावाप्रमाणें शत्रूचे, म्हणजे जयसिंगाचे, फौजेवर जाऊन पडला. तरवारीनें शत्रूचे जमातींत असा युद्धप्रळयाचा अग्नि पेटविला कीं, शत्रुचे जमातींतून सुख व विश्रांति निखालस निघोन गेली. तोडातोडीशिवाय व जीवें मारण्याशिवाय दुसरें कांहीं एक होत नव्हतें. यद्यपि जयसिंगाकडील अर्जुनासारखे युध्द पराक्रम करणारे रजपूत लोक पिनन म्हणोन महाशूर पादशाहा झाला त्याप्रमाणें शूरत्व करणोर पठाण लोक याणी रणभूमींत अति युद्ध पराक्रम केला. तरवारीनें व भाल्यानें मोठाच शस्त्रप्रळय केला. तीरकमानी घेऊन तीरांची वृष्टी अशी केली कीं, त्या हल्लेनें मरणाचा प्रळय केला. संकटाचा समुद्र उसळविला. आदिलकडील सरदार व शूर मंडळ व्याघ्रासारखा पराक्रम करणारानीं जयसिंगाचे फौजेसन्मुख असा धीर धरून आपले फौजेची कायमी केली व तरवारी वगैरे शस्त्रें व तोफांचा मारा असा चालविला कीं, दिल्लीकडील फौज घाबरली. आदिलशाहाकडील हरएक शूर तरवारी व भाले मारण्याचे कामांत वोस्ताद होते व पूर्ण धैर्यवान होते त्याणी जयसिंगाडील फौजेंतील मेळेच्या मेळे, म्हणजे जमातीच, ठार व कत्तल केल्या. बहुत रजपुत व पठाण जीवें मारून कत्तल केले. जयसिंगाकडील बाकीची फौज उरली होती ती भयाभीत होऊन पळापळ झाली. मोठा मोड झाला. वाईट परिणामाचा राजा जयसिंग अपेश येऊन खिन्न होऊन रणभूमि सोडून माघारा परत निघोन पळून गेला. त्या दिवशीं यशाचें पत्र एकलासखानाचे नांवें लिहिलें गेलें, म्हणजे आजची फत्ते एखलासखान याणी केली असें पत्र आली आदिलशाहास लिहून पाठविलें.

## ४२. सय्यद अली यारखान उर्फ षर्जाखान याणीं दिल्लीकडील सलाबत खानावर हल्ला करणें प्रकर्ण :

याच समयांत खबर पोचविणारे जासूद लोकानीं आदिलशाकडील सरदार मंडळीस वर्तमान कळविलें कीं, दिल्लीकडील सलाबतखान म्हणोन सर्व शूरांतील प्रसिद्ध व नामांकित शूर असा आहे कीं, त्याचे शूरत्वाची किर्ति दिल्लीकडील सर्व लहान थोर मनुष्यांस जाहीर आहे तो सलाबतखान पांच हजार निवडक महान पराक्रमी स्वारांनिसीं चालून येत आहे. सामान सरंजाम बहुत व घास लकडी व दारूगोळी वगैरे जें जें सामान युध्यास जरूरीचें आहे तें बहुत सामान राजा जयसिंगाचे लष्करांत आणिताहे. तो सलाबतखान येथून पांच मजलीवर आहे. असें वर्तमान ऐकतांच आदिलशाहाकडील अकलवान मंडळीनीं आपआपणांत विचार केला कीं, जर करतां ह्या शूर रणभूमींत अशा प्रकारचें सामान सरंजामानिसीं लढाई व राजा जयसिंग यासी येऊन मिळाल्यास जयसिंगास पहिलेपेक्षां दसपट अधिक बळ चढून नाना प्रकारचीं संकटें उभीं करील. मग तीं संकटे निवारण करण्यास आपला यत्न चालणार नाहीं. आतां तें बरें आहे कीं, सलाबतखान जयसिंगाचे लष्करांत येऊन मिळाला नाहीं तोंच सलाबतखानास ठोकूनच परत घालविला पाहिजे. असा करार ठरऊन महान पराक्रमीं शूर षर्जाखान, कीं ज्याचे तरवारीचे धाकानें वाघाच्या काळजाचे पाणी होत होतें व षर्जाखानास पाहिलें असतां शूर मंडळींचे तर काळीजच उडत होतें तो पर्जाखान, हें काम पत्करून एकटाच निघोन एकलासखान येत आहे ही आपली दुसरी शिकार आहे असें समजून सलाबतखानावर चालता झाला. पांच दिवसांचे मजलींची वाट दोन दिवसांत काटून सलाबतखानावर जाऊन पोहचला. सलाबतखानाचे मोकाबल्यावर उभा राहून लढाई केली. दिल्लीकडील नामांकित शूरानीं, म्हणजे सलाबतखानानीं, बहुत सामान सरंजाम आणिला होता तो एकीकडे नीट बंदोबस्तानें ठेवून बहुत शूरत्वानें रुस्तुमासारखें धैर्य धरून पर्जाखानाचे मोकाबल्यावर बराबरीनें उभा राहिला. आपले जमातींतील एकंदर लोक तिरंदाज असे होते कीं त्यांचा तीर अचूक जाऊन शूरांस लागून शूरांचे अंगांवरील चिलखत व बख्तर फोडून त्यांतून पार होऊन स्वाराचे अंगास टोचून तो तीर त्या स्वाराचे घोड्याचे अंगातून घुसून पार होत होता. असे मंडळीचे आपले जमातीस सलाबतखान याणी पर्वतासारखी मजबुती करून युद्धास आरंभ करिता झाला. तेव्हां अली आदिलशाहाचे दक्षणी शूर मंडळींत व दिल्ली येथील शूरांत मोठाच शस्त्रप्रळय झाला. परस्परें तरवारी चालू झाल्या. युद्ध संग्रामाचा प्रळयसमुद्र उसळला. तरवारीचा चकाचक असा आवाज या जमिनीवर व आकाशांत व्याप्त झाला. यमदूतानें मरणाचा जांब भरून सर्वांस पाजण्यास रणभूमींत उभा राहिला. वरील आकाश

सहस्त्रावधी ईच्छेनें व तो युद्धप्रसंग पाहून थकित होऊन राहिलें. जेव्हां उभयतां-कडीलहि बहुत जमात ठार झाली तेव्हां सलाबतखान घोड्यावरून उतरून जमिनीवर पडला. जमिनीवरच पडून कमान करून तीर मारूं लागला. त्याचे मित्र हरएक दुसरे सलाबतखानच होते, म्हणजे सलाबतखानासारिखे पराक्रमी होते. त्याणी आपआपले घोड्यावरून उतरून सलाबतखानाप्रमाणें तीर मारण्यांत निमग्न झाले. तेव्हां वाघासारिखा पराक्रम करणारा पर्जाखान याणीं सलाबतखानाची या प्रकारची दशा पाहिली. सलाबतखानाचे मंडळीनींहि घोडे टाकून तीर मारण्यांत निमग्न झाले आहेत असें पाहिलें तेव्हां शत्रूचे तीरापुढें पर्जाखान याणी हृदयाची ढाल करून हातांत तीरकमान घेऊन तीर मारित मारित पुढें चाल करित होता. जो तीर शत्रुकडून येत होता तो तीर पर्जाखान तोडून टाकून पर्जाखान आपण तीर मारित होता. तीर मारित मारित पुढें चालून येत होता. असें करित करित सलाबतखानाचे संनिध पोहचला. सलाबतखान याणी जेव्हां पाहिलें कीं, तीर व कमानीचे माऱ्याची वेळ राहिली नाहीं असें जाणिलें तेव्हां हातांतून कमान टाकून देऊन तरवारीस हात घातला. तेव्हां दोहीकडीलहि कित्येक तरवारीचे मारे झाले. तरवारीचे माऱ्यांचाहि उपयोग नाहींसा झाला तेव्हां परस्परें कट्यारीचा व पेशकबाजाचा मारा चालू झाला. परस्परें कट्यारी घेऊन भिडले. शेवटीं कटारीची व पेशकबाजीचेहि माऱ्याची वेळ नाहींशी झाली तेव्हां मुटींचे व चपराकीचे माऱ्यासी गांठ पडून परस्परें हातघाईस आले. तेव्हां उभयतांकडीलहि शूरांचा पराक्रम या लोकीं व परलोकीं प्रसिद्ध झाला. उभयतांकडीलहि शूरांनीं जसा पराक्रम करावा तसा केला. तेव्हां शेवटीं पर्जाखान याणीं सलाबतखानावर चढ करून पर्जाखान प्रबळ झाला. सलाबतखानास निरोपायपणाचे प्रवासास पाठविता जाहाला, म्हणजे सलाबतखानास ठार मारिला. सलाबतखान याणी बहुत सामान सरंजाम व द्रव्य आणिलें होतें. ती रसद व गल्ला व खाण्यापिण्याचे सामान बहुत होतें तें पर्जाखान याणी एकंदर सामान हिरावून घेतलें. पर्जाखानाचे युद्धपराक्रमानें दिल्लीचे लष्करांत मोठी जरब बसली. दिल्लीवाले लोकांवर पर्जाखानाचा बहुत नकशा झाला.

### ४३. सुलतान अबदुल्ला कुतूबशाहा याणी आदिलशाहाचे मदतीस नेकनामखान या सरदारासमागमें बहुत फौज देऊन नेकनामखान यास रवाना करणें प्रकर्ण :

अशा समयांत सुल्तान अबदुल्ला कुतुबशाहा याजकडून मित्रतेचे मजकुरानें भरलेलें पत्र ममलकतमदार मदारुलमहाम् अबदुल महंमद याचे वशिल्यानें अली

आदिलशाहा पादशाहास येऊन पोहचले. त्यांतील हा मजकुर होता कीं, आमचे ऐकण्यांत आलें आहे कीं, गैरराहा वर्तणूक करणारा राजा जयसिंग, सोदेगिरी प्रकृतीचा, याणी बहुत फौज घेऊन आपले सरहदींत येऊन दांडगेपणानें व अमर्यादेनें फारच माजूरपणा करून बहुत बदफैली आरंभिली आहे. या दोन्हीहि राजधान्या, म्हणजे आमची राजधानी व आपली राजधानी पूर्वीपासून परस्परें मित्रतेनेंच वागत आल्या. आम्हींहि आपणांत व आम्हांत वैर उत्पन्न झालें नाहीं. आपले व आमचे मित्रतेचा ऋणानुबंध इतका मजबूत झाला आहे कीं, बाह्यात्कारी व अंतःर्यामी भिन्नता किंचितहि न रहातां निखालस एकपणा वागत आला आहे. यास्तव परस्परें एकमेकांचे करण्याची चाल वडीलांपासून चालत आली आहे. यास्तव आमचे मनांत असें आहे कीं, आमची यशस्वी फौज स्वार व शिबंदी लोक, कीं ज्याणी सेवेंत प्राणखर्ची करण्यांत व शीर अर्पण करण्यांत सर्वांवर चढ केला आहे अशी फौज, इकडील सरदारांपैकीं एका अकलवान सरदारासमागमें आपलेकडे रवाना करावी, म्हणजे आपले अमीरलोकांचे ताबेदारींत आमची फौज राहून शत्रूचें पारिपत्य करण्याविषयीं बहुत यत्न करून त्या खराब व बेमान मनुष्यास म्हणजे, राजा जयसिंग याजला, दक्षणचे सरहदींतून बाहेर हांकून द्यावा असें इकडील मानस आहे. यविषयीं आपली कशी मर्जी आहे हें कळणें जरूर आलें आहे. यास्तवहि कित्येक विनंतीचीं कलमें लिहून सेवेशीं विनंतीपत्र लिहिलें आहे. आम्ही आपले आज्ञोत्तराचें पत्राची मार्गप्रतिक्षा करित आहों, म्हणजे आपलेकडून जबाब कधीं येईल अशी वाट पहात आहो. असें जाणोन आपली मर्जी कशी आहे ते जलद लिहून कळविण्यांत यावें. असें विनंतीपत्र लिहिलें. अली आदिलशाहानीं तें विनंतीपत्र वाचून पाहून मजकूर समजल्यानंतर त्या विनंतीपत्राचें असें उत्तर लिहिलें कीं, सत्य आहे कीं या दोनहि राजधान्या, म्हणजे तुमची राजधानी व आमची राजधानी, यद्यपी बाह्यात्कार करून कांहींशीं भिन्न आहे परंतु अंतर्यामेंकरून एकच आहे. पूर्वीपासून परस्परें मित्रतेनें व एक विचारानें वागणेंची चाल चालत आली आहे. हलीं या अयोग्य पुरुषानें व खराब मनुष्यानें, म्हणचे राजा जयसिंग याणे, दांडगेपणानें वागणें आरंभून अंथरूण पाहून अधिक पाय लांबविले आहेत, म्हणजे आपले योग्यतेहून अधिक अमर्यादा मांडली आहे. बंड करण्याचा इरादा केला आहे. सत्य आहे कीं, मुंगळ्यास पंख फुटले आहेत. कारण कीं, मुंग्यांचें व मुंगळ्यांचें आयुष्य सरलें म्हणजे पंख फुटतात व पंख फुटले म्हणजे ते मुंगळे मरण पावतात. तसें या जयसिंगास गर्वाचे पंख फुटले आहेत. आतां या जयसिंगाचा मरण समय जवळ खास आहे. हा जयसिंग गैरराहा वागणुक करून बदफैली करित आहे. ही त्याची खराबीचीं व नाश होण्याचीं चिन्हें जाहीर होत आहेत. आमची एकंदर फौज यशस्वी आहे. आमचें सर्व सेवक मंडळ लढाऊ निमकहलाल म्हणजे इमानी आहेत. ते जयसिंगाचे पारपत्यावर नेमिले आहेत.

ईश्वरकृपेंकरून सत्वरच शत्रूचें पारपत्य करितील. जयसिंगास त्याचे फौजेसुद्धां सत्वरच खिन्नतेनें आपले सरहद्दींतून हांकून देतील. आतां जास्त मदतीचें कारण नाहीं. परंतु आपले मनांत तें आहे कीं, पूर्वीच्या मित्रतेच्या चाली जिवंत करून पुरातन मित्रतेस नवीन मित्रतेचा रंग द्यावा आणि मित्रता सर्वांस जाहीर करावी. असें आपले मनांत आहे यास्तव बिस्मिलाह, म्हणजे बहुत चांगलें आहे, बहुत कल्याण आहे. असें वाक्य आहे : पारसी अर्धें बैतेचा अर्थ : "कल्याणाचें कामांत कोणासहि विचारण्याचें कारण नाहीं" असें आहे. या प्रमाणें उत्तर लिहून पाठविलें. सुलतान अबदुल्ला कुतुबशाहा याणी उत्तर आलेले पत्रांतील अभिप्राय समजतांच फौजेची तयारी करून निवडक फौज बारा हजार स्वार व चाळीस हजार शिबंदीलोक सर्व सामानसरंजामानिशीं नामांकीत सरदार नेकनामखान याचे समागमें देऊन रवाना केंले. नेकनामखान हा सरदार पूर्ण अकलवान, महाशूर, धैर्यवान व जवळचे सर्व सरदारांतील व मुख्य कारभारी मंडळांतील मुख्य सरदार होता. त्याजसमागमें ती फौज देऊन विजापुरास रवाना केंलें. नेकनामखान याणी मजली काटून विजापुरानजिक येऊन पोहोचला तेव्हां आली आदिलशाहा याणीं दरबारांतील पूर्ण विश्वासू ममलकतमदार अबदुल महंमद याजला आज्ञा केली कीं, तुम्ही निवडक सरदार मंडळी घेऊन बहुत समारंभानें व अति थाटानें नेकनामखान याजला सामोरें जावें. नेकनामखानाला अति आदरसत्कार करून घेऊन यावें. अशी आज्ञा केली तेव्हां अबदूल महंमद याणी आली आदिलशाहा पादशाहाचे आज्ञेप्रमाणें थोर थोर नामांकित सरदार समागमें घेऊन बहुत समारंभानें संपूर्ण फौज घोडे, सामानसरंजामासहित व स्वार पूर्ण थाटानें तयार केले होते ते घेऊन नेकनामखान याजला सामोरा गेला. जेव्हां आदिलशाहाकडील व कुतुबशाहाकडील फौजेची भेटी झाली तेव्हां मैदानांत थोर थोर तंबू व मंडप उभे केले होते. बहुत आरास करून बिछायती वगैरे फारच चमत्कारिक आंथरून अति थाट केला होता. उभयतांकडीलहि सरदारानें तेथें भेटी घेऊन एक क्षणभर अत्यंत मित्रतेचे भाषणांत निमग्न झाले. यानंतर ममलकतमदार अबदुल महंमद याणी नेकनामखानास व त्याचे सरदार मंडळीस भारी किंमतीचे पोषाख व जवाहीर देऊन सत्कार करून तेथून घोड्यावर बसून नेकनामखानास शहरांत आणिलें. ते विजापुरनजिक येऊन पोहचले तेव्हां आली आदिलशाहा पादशाहानीं फार थोर आली बुरुज त्या उभयताचे स्वारीचा समारंभ पहाण्याकरितां योजून त्या बुरुजावर बहुत आरास व थाट करून पादशाहाची स्वारी त्या बुरुजावर बसली. किसर म्हणोन मोठा पादशाहा झाला व त्या पादशाहानीं फारच थोर महाल बांधिला तसा महाल कोणीच बांधिला नाहीं त्या किसर पादशाहाचे महालाप्रमाणें परवीज म्हणोन फार योग्य पादशाहा झाला. त्या परविज पादशाहानीं आपले वाड्यांत फार चमत्कारिक आरास केली होती

त्याप्रमाणें कोणींच आरास केली नाहीं, त्या परविज पादशाहाचे आरासीप्रमाणें आली आदिलशाहा पादशाहानीं खुद जातीनें बुरुजावर बसून आली बुर्जास शोभायमान केलें. यांतील तात्पर्य हे आहे कीं, आली आदिलशाहा आली बुर्जावर बसले तेव्हां तो बुरुज फारच शोभायमान झाला. आदिलशाहाकडील फौज व कुतुबशाहाकडील फौज अशा दोनहि फौजा पादशाहाचे दृष्टीसमोर येऊन आली आदिलशायास उभयतां फौजेनीं मुजरे केले. आली आदिलशाहानीं त्या समुद्रासारिखे दोनहि फौजेचा जमाव पाहून व सर्वांचे मुजरे घेऊन पादशाहास फारच आनंद झाला. अबदुल महंमद यास हुकूम सांगून पाठविले कीं, नेकनामखान यास सरकारी वाड्यांत आणोन मुजरा करावा. अशी आज्ञा झाली तेव्हां ममलकतमदार अबदुल महंमद याणी नेकनामखानास व त्याचे बरोबरीचे सरदार मंडळीस आली आदिलशाहापाशीं हुजूर आणोन सर्वांकडोन मुजरे करविले. तेव्हां पादशाहानीं नेकनामखान यास व त्याचे समागमेचे सरदार मंडळीस पादशाही सत्कारानें भारी किंमतीचे पोषाख देऊन मुकामास परत जाण्यास निरोप दिल्हा. तुम्ही ममलकतमदार अबदुल महंमद याजसमागमें शत्रूचें पारपत्यावर जाऊन पारपत्य करावें अशी नेकनामखान यास व त्याचे सरदार मंडळास आज्ञा केली.

## ४४. आली आदिलशाहानीं आपली फौज व कुतुबशाहाकडून आलेली अशा दोनीहि फौजा मिरजाराजाचे, म्हणजे जयसिंगाचे, पारपत्यावर नेमणें प्रकर्ण :

ममलकतमदार अबदुल महंमद याणीं पुन्हां आणखी शत्रूचे पारपत्यावर चालून जाण्याची तयारी करून नेकनामखानासहित जाऊन शत्रुचा निर्मूळ फडशा करण्याकरितां लष्करची ढाल उभी केली. तेव्हां नेकनामखान याणी आपले समागमें आलेली सरदार मंडळी व आपली फौज घेऊन एक निराळीच वाट धरून शत्रूवर चालता झाला. अबदुल महंमद हा खवासखान, षर्जाखान, अबदुलखान व येकोजीराजे वगैरे संपूर्ण अमीरलोक आपली यशस्वी फौज घेऊन दुसरे वाटेनें शत्रुवर चालता झाला. असें वाटतें कीं, कुतुबशाहाची व आदिलशाहाची मिळोन या दोन फौजा जसे केवळ दोन समुद्रच आहेत. शत्रुसमुदायाचे झाज लाटाचे माऱ्यानें बुडऊन टाकण्याकरितांच जसें हे समुद्र उसळले आहेत. अशा या दोन फौजा होत्या. राजा जयसिंग याजपाशीं फौजेचा भरणा फार व पूर्ण वैरभाव जयसिंगास होता. बोलण्यांतहि असें आहे कीं, ऐशीं हजार स्वार व एक लक्ष शिबंदी जयसिंग राजाचे समागमें होती. या गर्वानें पुन्हां विजापूर घेण्याचा इरादा करून अमर्यादेनें आणखी आदिलशाचे सरहदींत चालून आला. परंतु आदिलशाहाचे शूरांचे तरवारींचे जरबेनें

जयसिंगास विजापूर शहरास चालून येण्याचें सामर्थ्य झालें नाहीं. यामुळें खिन्न होऊन मनोरथ पूर्ण न होतां परत गेला. आपले सरहद्दींत जाऊन चिंतेंत पडला. आपले वतनाचे जाग्यासहि अपेशानें जातां येईना व आदिलशाहाकडील शूरांपुढेंहि मोकाबल्यावर उभे रहाण्याची हिंमत राहिली नाहीं. त्याचे धण्याकडून, म्हणजे औरंगजेब पादशाहाकडूनहि, तूं लढाई करून फते न केल्यास तुझें फार पारपत्य केलें जाईल अशीं बहुत जरबेचीं आज्ञापत्रें येत होतीं. कारण कीं, इतकी फौज व लढाऊ सामानसरंजाम घेऊन फार हिंमतीनें गेला आणि तेथें जाऊन काय केलें ? आमचे पादशाही कीर्तीस व आमचे नांवास मात्र बरबाद केलेंस, म्हणने दुपण लाविलेस. आम्हांस बेआबरूचे खळग्यांत पाडलेस. आरबींत वाक्य आहे, त्या वाक्याचा अर्थ : "दुसरे मनुष्यानें आपले चाकरास मारलें असतां त्याचे धण्याचे अबरुस कमी आहे." या वाक्याप्रमाणें तूं आम्हांस चिंतेंत पाडलेस. आतां कोणते यशस्वीपणाचे तोंडानें हुजूर येऊन आमचे कृपेस पात्र होशील ? अशीं आज्ञापत्रें येत होतीं तेव्हां हें चालून येणें व हा चिंतेचा प्रसंग प्राप्त होणें हें जयसिंगाचे प्राणावरच संकट आलें होतें. तेव्हां विसांवाहि घेतां येईना व पळूनहि जातां येईना. असा चिंतेचा प्रसंग जयसिंगावर गुजरला. तेव्हां ममलकतमदार अबदुल महंमद हा आपले पृथ्वीप्रळय करणारे फौजेसुध्दां मोगलाचे, म्हणजे दिल्लीवाल्याचे, सरहद्दीनजिक पोहचला. आदिलशाही फौजेचे तीन प्रकारचे विभाग केले. एक विभाग षर्जाखान व खवासखान या उभयतांकडे नेमिला. दुसरा विभाग बहलुलखान व दुसरे कित्येक अमीरलोकांकडे नेमिला आणि ताकीद केली कीं, जिकडून शत्रूची फौज चालून येत आहे असें दिसेल तिकडे दौड करून त्यावर हल्ला करावा. अशी ताकीद करून दोन विभाग वांटिले. बाकीची फौज ममलकतमदार अबदुल महंमद याणी आपल्या ताब्यांत ठेविली. कारण कीं, जे बाजूस मदतीचें कारण पडेल तिकडे हल्ला करून मदत करावी. असेंच नेकनामखान याणेंहि आपले अमीरलोक यानकडे फोडीले. तेव्हां हरएकानीं शत्रुचे पारपत्याविषयीं व शत्रूवर गर्दी करणेंकरितां बहुत हिंमतीनें मजबूत कमरा बांधिल्या. राजा जयसिंग याजला मिरजा राजा असा पादशाहानीं किताब दिला होता. त्या मिर्जा राजानें, म्हणजे जयसिंगानें, पूर्वींचे लढाईचे मोकाबल्याचे समई विजापूर शहरानजिक येऊन पोहचून चहूंकडून आदिलशाहाकडील शूर मंडळीचे तरवारीचा मार खाऊन शहरापर्यंत येऊन पोहचताच परत पळोन गेला होता. अद्यापि आदिलशाहाकडील शूर मंडळाचे तरवारीचे माऱ्याची चमक जयसिंगाचे डोळ्यापुढें दिसत होती. तें भय अद्यापि जयसिंगाचे मनांतून गलें नव्हतें. जयसिंगाचे शिपाई लोंकानें आदिलशाहाकडील शूरांचे हातून तरवारीच्या जखमा पक्या घेतल्या नव्हत्या. दुसरें संकट हें कीं, जयसिंगाचे लष्करांत खाण्यापिण्याचा सामानसरंजाम घास लकडी होता तो एकंदर सरून त्यांचें प्राणावर संकट येऊन एकंदर मंडळींची हिंमत सुटली होती. हलीं तर कुतुबशाहाची फौज

आदिलशाहाचे मदतीस येऊन कंबर बांधोन लढाईस तयार होऊन मोकाबल्यावर उभी राहिली आहे. असें वर्तमान ऐकतांच राजा जयसिंग याची फौज एकंदर आधीं भयाभीत झालीच होती त्याहून शतपट भयाभीत होऊन घाबरली. जयसिंगाकडील एकंदर लोकांची हिंमत सुटली. लढाई करण्याचें धैर्य नाहींसें झालें. आतां तर आदिलशाहाकडील फौज फारच संनिध येऊन पोहचली. तत्रापि मिरजा राजा याणी, म्हणजे जयसिंगानें, स्तब्धपणा धारण करून स्वस्थ बसला होता. जयसिंगाकडील कोणी एकहि शिपाई युध्द करण्यास तयार होऊन रणभूमींत येऊन उभा रहात नव्हता.

## ४५. षर्जाखान व खवासखान याणी मिर्झा राजा म्हणजे जयसिंगाकडील पठाण व रजपूत मंडळीशीं युद्ध करणें प्रकर्ण :

महान पराक्रमी षर्जाखान व खवासखान हे उभयतां आपआपणांत बोलले कीं, शत्रू थकून स्तब्ध बसून लढाईचे मैदानाकडे तोंड घेत नाहींत. याजकरितां त्याणीं लढाईस उभे रहांवे अशी कांहीं युक्ती काढिली पाहिजे. त्याजला बळेंच मैदानांत ओढून आणिलें पाहिजे. कसें तरी करून शिकार साधण्याशीं आम्हांस कारण आहे. सशास कोणी धरावयास पाठी लागलें म्हणजे ससें पड घेऊन आपलें कान आपले डोळ्यांवर झांकून झोपेंचे मिष घेतें आणि आपले मनांत आणितें कीं, झोपेचें मिष घेतल्यावर आपले पाठीमागें लागलेले जनावराचें काय करावयाचें आहे, असें मानून झोपेचें मिष घेऊन पडतें, तेव्हां त्याचे पाठीं लागलेले जनावर त्या सशास तात्काळ धरून जीवें मारितें. त्या सशाप्रमाणें या जयसिंगानें पड घेतली आहे. याजकरितां जबरदस्तीनें बळेंच जयसिंगास मैदानांत ओढून आणिला पाहिजे. बलात्कारानें युध्धास उभा केला पाहिजे. शिकार साधावी असा निश्चय करून याच करारावर दोघेहि निर्दय पुरुष, म्हणजे षर्जाखान व खवासखान हे उभयतां, युध्धास तयार होऊन घोड्यावर बसले आणि जयसिंगाची शिकार साधण्याकरितां निघोन दोन तीन मजली काढून वाट चालून गेले. तों मोठी एक फार अवघड वाट आली. डोंगरांतील खाचखळगे, उतार, चढ, दऱ्या व दाट काट्यांची झाडें अशी कठीण बारी लागली कीं, त्या वाटेंतून चालता देखिल येत नव्हतें. तेव्हां षर्जाखान याणी एकीकडून वाट धरिली व खवासखान याणी दुसरा रस्ता धरिला आणि त्या रस्त्यानीं चालू झाला. इतक्यामध्यें एकाएकीं षर्जाखान यास वाटेमध्यें बातमी पोहचविणारे जासूद लोकांनीं बातमी कळविली कीं, राजा जयसिंग याचे फौजेंत खाण्यापिण्याचा सामानसरंजाम सरला. घासलकडी वगैरे कांहीं उरलें नाहीं. एकंदर सामान सरलें यामुळें जयसिंगाचे लष्कर

अति त्रासून बारा हजार निवडक स्वार, कीं जे एकंदर लष्करांतील जीव म्हणवितात त्यापैकीं निमे पठाण, तरवार मारण्यांत व तिरंदाजींत, साम म्हणोन रुस्तुमाचा बाप महा बलवान झाला त्या उभयतां सारिखा बलवान कोणी जाहाला नाहीं त्या साम व नरिमानी या उभयतासारिखे बलवान म्हणवीत होते. निमे स्वार रजपूत मराठे तरवार धरणारे व भालेकरी आहेत ते बहुत सामान सरंजाम दारूगोळा, तोफा व बाण बहुत घेऊन युध्दाकरितां जयसिंगानी रवाना केले आहेत व त्यांची चालूनहि येण्याची वाट ईकडून जवळ आहे. अशी बातमी सांगितली. तेव्हां हे संतोषाचें वर्तमान ऐकतांच पर्जाखान आपले मनांत बहुत संतोष पावोन संतोषानें अंग फुगलें. या संतोषानें पर्जाखानाचे शरीरांतील एकंदर नाडी संतोषानें फुगल्या आणि पर्जाखानाचे अंगांतील चिलखत व बख्तर तुटूं लागलें. इतका संतोष झाला. पर्जाखान याणी आपले समागमेचे शूर मंडळीस सांगितलें कीं, हे वाघासारखे शिकार करणारे हो, आम्ही जी शिकार धरावयाकरितां निघालों आहों व कित्येक मजली काटून एथपर्यंत चालून आलों आहों ती शिकार आमचे मार्गावर पुढें चालून आली आहे. आज तो दिवस आहे, कीं शिकार धरण्याकरितां बहुत यत्न करूनहि मोठी शिकार फासांत घालूं. कारण कीं, अशी मोठी शिकार धरण्याची कीर्ति दिल्लीपर्यंत जाईल व दिल्लीवाल्यांचे फौजेंत बहुत जरब पडावी. असें पर्जाखान बोलला तेव्हां पर्जाखानाचे बोलण्यावरून सिंहासारखे पराक्रम करणारे शूरांस फारच वैरभाव उत्पन्न झाला व त्यांचे अंगीं शुरत्व होतें तें दुप्पट चढलें. घोड्यावर बसून घोडे फार जलद हांकले. अति आवडीनें एकंदर अरण्यांत शिरले. काट्यांचे दाट झाडींतून पार पडून मैदानाचे वाटेस लागले तेव्हां एकाएकीं पुढें फौज चालून येत आहे असें पाहिलें. ते एकंदर लोक पठाणचे जातींतील होते. ते लोक मोठी गर्दी करित करित येत होते. लढाऊ बहुत सामान सरंजामानिसीं संपूर्ण तयारीनें युद्धास सिद्ध झाले होते. पर्जाखान याणी आपलेकडील शूर मंडळीस बहुत बंदोबस्तानें जमवून व ताकीद करून पर्जाखान मैदानांत चालून गेला. शत्रूचे मोकाबल्यावर उभा राहिला तेव्हां पर्जाखान याणीं बाण व गोळया मारण्यास प्रारंभ केला. तेव्हां तिकडूनहि बाण व गोळे सुरू झाले. युद्धप्रळयाचा अग्नि पेटला. जेव्हां पर्जाखान किंचित पुढें चालून गेला तेव्हां पर्जन्यासारखी तीरांची व बंदुकींचे गोळ्याची वृष्टी झाली. पर्जाखान तेहि वोलांडून फळी फोडून फारच संनिध जाऊन पोहचला तेव्हां उभयतांकडीलहि नामांकित शूर मंडळीनें तरवारी व फारश हांतांत घेऊन उभयतांहि बरोबरीनें लढून तरवारीचे मान्यास प्रारंभ केला. उभयतांकडीलहि शूरांनीं एक पळभरांत त्या रणभूमींत महाप्रळयाचा समय, म्हणजे सर्व पृथ्वी बुडोन कल्पांत होतो तो समय, प्रत्यक्ष उभा केला. त्या लढाईत कत्तल झालेले मनुष्यांचे रक्तानें ती रणभूमि तांबडे पिकाचे सेताप्रमाणें लाल झाली. त्या रणभूमींत

घोड्यांचे सुंब व पायाचे माणसांची पावलें मेंहंदीचे रंगानें रंगावल्यासारखीं झाली. मेलेले माणसांचे प्रेतांचे पर्वतासारखे ढीगच्या ढीग पडले. आदिलशाहाकडील शूर मंडळ रणभूमींत तरवारींचे व तीरांचे सवाल जबाब धैर्यानें देऊन म्हणजे शत्रुनें तीर मारिले असतां त्यांजला आदिलशाहाकडील शूर तरवारीचे वार करित होते व शत्रुकडील लोकांनीं तरवारी मारिल्या त्याजला तीरानें मारित होते. शत्रुकडील तरवारीचा एक वार केल्यास आदिलशाहाकडील शूर त्यांजला तरवारीनें दोन तीन वार करित होते. आदिलशाहाकडील शूर तरवारीचा जो वार करित होते त्या तरवारीचे वारानें घोड्यावरील स्वार व त्याचे घोड्यास तोडून जमिनीवर पाडित होते. जेव्हां शत्रूकडील कांहीं लोक आदिलशाहाकडील शूरांचे तरवारीचे वार घेऊन मातींत व रक्तांत लोळत पडले आणि पुन्हां आदिलशाहाकडील शूरांचे तरवारीपुढें उभे रहाण्याचे सामर्थ्य नाहींसें झालें तेव्हां जयसिंगाकडील फौजेनीं रणभूमीपासून मोहरा माघारा फिरविला. पळोन माघारे गेले. तेव्हां पर्जाखान याणी एकट्यानीं दिल्लीवाल्याचें काम सेवटास लाविलें होतें. तों इतक्यांत खवासखान याजला वर्तमान कळोन खवासखान अति सत्वर निघोन पर्जाखानाचे मदतीवर येऊन पोहचला. त्या रणभूमींत मित्राचा सरकतदार झाला, म्हणजे पर्जाखान व खवासखान हे उभयतां मिळोन शत्रूवर हल्ला करिते झाले. तेव्हां या लढाईतून निखालस मोकळे होऊन पुढे चालते झाले. तेव्हां दुसरी फौज पाठीमागून येत होती ती दिसूं लागली. त्या फौजेंतील सर्व लोक मराठे व रजपूत होते. ते मराठे व रजपूत महापराक्रमी शूर व लढाईत दुसऱ्याची मदत न इच्छिणारे होते. त्या मराठी व हिंदु लोकांपैकीं हरएक शूर आपल्यास अर्जुनाप्रमाणें लक्ष्मणासारिखे जाणित होते. त्या जमातींतील सरदार लोक बहुत पांच हजारी व सहा हजारी पद वागवित होते. त्या दोन जातींचे सरदार, फार नामांकित एक जाधवराव म्हणोन व दुसरा केशरीसिंग म्हणोन, दोन शुर महापराक्रमी होते. मिरजा राजा म्हणजे जयसिंगाचे फौजेंतील फार नामांकित सर्व सरदारांहून अधिक शूर होते. जेव्हां पर्जाखान व खवासखान हे सिंहासारखे व रुस्तुमाप्रमाणें शत्रुचे सन्मुख उभे राहिले तेव्हां त्याणीहि तोफा डागणेस व बाण मारणेस आरंभ केला. दारूगोळा वगैरे आतषबाजीचे जितके बहुत सामान समागमें होतें तितकें एकदाच खर्च करून सरबती केली. एका पालखांत महाप्रळयाचा समय उभा केला. तोफांचे व बाण व बंदुकीचे सरबतीचे धुराचीं जमिनीपासून आकाशापर्यंत अशी गर्दी केली कीं, ती रणभूमि निबिड अंधारे रात्रीप्रमाणें होऊन अंत्यंत काळोख पडले. असा अंधार झाला कीं, भावास आपला भाऊ ओळखीनासा झाला. मित्रास मित्र ओळखित नव्हता. अशी धुराची गर्दी झाली तेव्हां रणभूमींतील व्याघ्रासारिखे पराक्रम करणारे व शूरत्वरूपी समुद्रांतील सुसरी म्हणजे पर्जाखान व खवासखान हे उभयतां आपले सरदार मंडळीसहित ऐन हल्याचे

वेळेस आपले घोडे त्या रणभूमींत असे हांकले कीं नेत्रांस पाते लागे न लागे तों एक पलखांत शत्रुकडील तोफखान्यावर जाऊन पोहचून एकंदर तोफा हिरावून घेतल्या. तोफखाना पाटीमागें टाकून हातांत तरवारी विजेसारख्या व अति जलद धारेच्या हातांत घेऊन शत्रूचे बरोबरीस मोकाबल्यावर जाऊन उभे राहिले. उभयतांकडीलहि त्या रणभूमींत चाल करून गेले तेव्हां शूरत्व व बहुत युद्ध पराक्रम करिते झाले. एकमेकांशीं बरोबरीनें उभे राहून असें युध्द केलें कीं, त्या युध्दापुढें पेजन म्हणोन महाशूर पादशाहा झाला त्याचे व अर्जुन म्हणोन हिंदु लोकांत होऊन गेला याणी फारच दारूण युध्द केलें, त्याप्रमाणें युद्ध कोणीच केलें नाहीं, त्या अर्जुन व पेजन पादशाहाचे युध्दास बरबाद केलें, म्हणजे त्याचें लढाईसहि या लढाईपुढें कांहींच नव्हे असें केलें. उभयतांकडील कोणतेच मनुष्याची तरवार व कट्यार रक्तानीं भरली नाहीं असे कोणतेंच शस्त्र कोरडें राहिलें नाहीं. घोडे आणि घोड्यावरील स्वार असे दोन्हीहि रक्तानें लाल झाले व रक्ताचे रंगानें रंगले. भाले मारणोर मराठे मंडळ व रजपूत लोक शत्रु–वध करण्याविषयीं शूरत्वाचा झेंडा उभा करित होते. आम्हां सारखा पराक्रमी पुरुष कोणी नाहीं असें जाणित होते. त्याणीं युद्ध पराक्रम करण्यांत केसाइतकें देखिल अंतर केलें नाहीं. लढाई विषयीं अति यत्न करून व फारच झटून शूरत्व व पराक्रम केला. परंतु ईश्वरी कृपा व पादशाहाची मदत आपले कामाविषयीं होती. यास्तव आदिलशाहाकडील शूर मंडळीनीं व पादशाहाचे मीठ खावून वाढलेले इमानी लोकांनीं त्या भयंकर रणभूमींत व त्या भयानक प्रसंगांत असा युध्द पराक्रम केला कीं, शत्रूस जेर करून त्यावर आदिलशाहाकडील शूर प्रबळ व जबरदस्त झाले. कित्येक नामांकित सरदार मंडळ रजपूत व मराठे लोकांस तरवारींच्या जखमा करून घोड्याचे जीनावरून मातींत पाडून लोळविलें. याचप्रकारें महान शूर नामांकित जाधवराव व केशरीसिंग हे उभयतांहि आदिलशाहाकडील शूरांचे तरवारींच्या जखमा खाऊन मरण पाऊन परलोकास गेले. या उभयता दौलतीचें कल्याण इच्छिणारे इमानी सेवकांची, म्हणजे पर्जाखान व खवासखान यांची, जी इच्छा होती ती परिपूर्ण झाली. मोटी फत्ते होऊन अति संतोष पावोन आपले मुकामाचे जाग्यास परत येते झाले. असें जाहीर झाल्यानंतर मिरजा राजा, म्हणजे जयसिंग, व जयसिंगाची एकंदर फौज अति खिन्न होऊन फारच चिंतेंत पडली. जयसिंगास व त्याचे फौजेस किती चिंता प्राप्त झाली तो विस्तार लिहितां सरावयाचा नाहीं. जेव्हां या लढाईतील बातमी वरील जासूद लोक ज्या घटकेस जें वर्तमान होईल तें तात्काळ वरचेवर आली आदिलशाहास कळवित होते त्यांत हें फत्ते झाल्याचें संतोषाचें वर्तमान आदिलशाहास समजलें तेव्हां, आरबी वाक्याचा अर्थ : "ईश्वर इच्छीतो तेव्हां पाहिजे त्याचा मुलुक देतो व पाहिजे त्याचा मुल्क हिरावून घेतो व ईश्वर इच्छितो त्यास योग्यता देतो व पाहिजे त्याची अबरू घेतो." असा जो ईश्वर त्याचा स्तव

करण्याविषयीं आली आदिलशाहा याणी भूमीवर मस्तक ठेवून ईश्वरास नमस्कार करून व ईश्वराचा स्तव करून अत्यंत संतोष पावता झाला.

## ४६. बहलुलखान व दुसरे कित्येक अमीरलोक याणीं राजा जयसिंग याचे फौजेसी युद्ध करणें प्रकर्ण :

या समयांत मिरजा राजा म्हणजे जयसिंग हा आदिलशाहाचे सरहदींतून मनोरथ पूर्ण न होता खिन्नपणानें परत जाऊन आपले सरहदींत उतरून संधी साधण्याकरितां मार्गप्रतिक्षा करित बसला होता. परंतु त्याजला संधी साधेना. त्याचे मनोरथ पूर्ण होत नव्हते. यास्तव अति खिन्नतेनें व उदासपणानें दिवस घालवित होता. जेव्हां एके दिवशीं आदिलशाहा पादशाहा याजकडील शूर मंडळीनीं आपआपणांत मसलत टरवून ममलकतमदार याजला मसलत ठरविलेला विचार सांगितला कीं, शत्रु, म्हणजे जयसिंग, हा अजगराप्रमाणें आपले सरहदींतून जाऊन पडून आमचे जमातीस उगेच घाबरविलें आहे. लढाईसहि उभा रहात नाहीं व आपले मुलखासहि निघोन जात नाहीं. आतां आम्ही किती दिवस वाट पहावी ? ईश्वर मनोगत आमचे मनांत असें वाटतें कीं, पारसी बैतेचा अर्थ : " जर करितां तो तुजकडे येत नाहीं तर एक वेळ तूं त्याजकडे जा. कांही एक अंदेशा मनांत आणूं नको. ईश्वराचे कृपेंकरून यश येईल तें पहा." असें बोलले तेव्हां ममलकतमदार याणी सर्वांची मसलत व अकल उतम आहे असें जाणोन युध्दाची तयारी करिता झाला. आपले सरदार मंडळीस व फौजेस बहुत इमान व बक्षिस दिल्हे. युध्दास जो सामान सरंजाम पाहिजे तो शिपायांस दिल्हा. लढाईचे नेमलेले दिवशीं आदिलशाहाकडील शिपाई, सरदार मंडळ, फौज व कुतुबशाहाकडील फौज या उभयतांकडील लष्करांनीं युध्दास तयार होऊन लष्करची ढाल उभी करून ममलकतमदार शत्रूवर चालते झाले. पर्जाखान व खवासखान या उभयतांनी एकमेकांत बंधुत्वाचा इरादा ठरविला होता. दोघे सख्या भावासारखे वागत होते. हे उभयतां आपले फौजेसुध्दां व दुसरे कित्येक सरदार मंडळी घेऊन दुसरीच एक वाट धरून चालते झाले. बहलुलखान बाकीचे फौजेसुध्दां एके वाटेनें चालता झाला. नेकनामखानहि आपले जमातीसुध्दां शत्रुचे पारपत्यावर चालता झाला. प्रथम बहलुलखान हा फौजेचे मध्यभागीं होता. तो त्या फौजेंतून पुढें सरकून शत्रूवर चालून गेला. पूर्ण धैर्य धरून युध्दास प्रारंभ केला. युध्द प्रळयाचा अग्नि पेटविला तेव्हां त्या शत्रूनीं, म्हणजे जयसिगानीं, बहलुलखानाचे निवारण करण्याकरितां मोकाबल्यावर उभे राहून पूर्ण हिंमत धरून लढाईस तयार झाला. आदिलशाहाकडील दक्षणी

लोक व दिल्लीकडील हिंदुस्थानी लोक आपआपले धण्याचें नांव व कीर्ति रक्षण करण्याकरितां बहूत झटून यत्न करिते झाले. उभयतांकडीलहि शूरांनें असा युध्द पराक्रम केला कीं, कालचक्र या उभयतांकडील शूरांवरून शाबासकीचे मुक्तफळाचीं तबकें भरून ओवाळून टाकिते झाले, म्हणजे ही लढाई पाहून कालचक्र 'शाबास शाबास' असें म्हणों लागलें. शेवटीं बहलुलखान बहादूर हा आपले थोडकेच जमातीसुद्धां शत्रुचे बहुत जमात व मुंग्याचे रवींपेक्षां व टोळधाडीहून अधिक होती त्या जमातीवर चालून जाऊन रुस्तुमाप्रमाणें हल्ला करून शत्रुकडील जमातीस अर्धें मेलें केलें. जेव्हां जेव्हां शत्रुकडील भारी जमातीची फौज बहलुलखानाची थोडी जमात आहे असें समजून बळ करित होते तेव्हां तेव्हां बहलुलखान वाघासारखी व सिंहाप्रमाणें दौड करून हल्ला करून शत्रूचे फौजेस फार दूर हटवित होता. असा वरचेवर आदिलशाहाकडील फौजेचा मार खाऊन व जखमीं घेऊन शत्रुकडील फौज थकून बेजार होऊन लढाई समागमें मोकाबल्यावर सन्मुख उभे राहणें सोडून स्वस्थ बसल. कदापि युध्दास उभे राहिनातसे झाले. तेव्हां बहलूलखान फत्तेमंद, म्हणजे यशस्वी, होऊन परत आला. पर्जाखान व खवासखान हे उभयतां ज्या तर्फेस गेले होते त्याणी आपले खासे फौजेवर नजर ठेवून मोकाबल्यावर चालून येऊन लढाई केव्हां सुरू होईल अशी इच्छा करित होते. शत्रू मैदानांत केव्हां चालून येईल अशी मार्गप्रतिक्षा करित होते. शत्रू तर जाग्यावरून हलतच नव्हता. तेव्हां वाट पाहून थकले. शेवटीं पर्जाखान व बहलूलखान हे आपआपणांत बोलले कीं, शत्रु जाग्यावरून हलतच नाहीं व मैदानांत चालून येतच नाहीं. यास्तव एकवेळ आपणच त्यावर चालून जाऊं. बलात्कारानें शत्रूस मैदानांत ओढून आणूं तर आज लढाई केल्याशिवाय आमचे परत जाणें व्हावयाचें नाहीं· नाहींपेक्षां लढाई न करतां रिकामे माघारे जावें लागेल. आम्ही तर आज लढाई केल्याशिवाय कदापि रिकामे माघारे जाणार नाहीं, असें बोलले. नंतर घोडेस्वार समागमें घेऊन दौड करित शत्रूवर चालून जाऊन शत्रुचे फारच निकट जाऊन पोहचले. तत्रापि या करण्यावरहि शत्रू, म्हणजे जयसिंग, जाग्यावरून उठलाच नाहीं. किंचितहि हलला नाहीं. तेव्हां निरोपाय होऊन उभयता बोलले कीं, शत्रूनीं जाग्यावर पड घेतली आहे. हा जयसिंग युध्दास कदापि उभा रहात नाहीं. जमिनीवर पड घेऊन पडलेल्या मनुष्यावर तरवार चालविणें हे कर्म लढाई करणारे महान पराक्रमी शूरांसंनीध विटाळशी स्त्रीशीं संग केल्यासारखें निषिध्ध आहे. तेव्हां हे पड घेतलेले पुरुषावर तरवार चालविणेंचें नीच कर्म आम्हां शूरांस शोभत नाहीं. असें जाणो लढाई न करितां व तरवार न उपसतां आपले मुकामाचे जाग्यास परत माघारे गेले. परत जाते समईं साफ मैदानांत एक सारखी जमीन लागली तेव्हां त्या जाग्यांत दोघेहि सरदार म्हणजे पर्जाखान व खवासखान बराबर चालत होते. एकमेकांकडे पहात होते. जेव्हां उतार चढाची जागा व्यांच खळगे व दाट झाडाची

बारी लागत होती तेंव्हां उभयतांची संगती सुटत होती व एकमेकांचे दृष्टीस पडत नव्हते. इतक्यामध्यें एक फारच अवघड वाट लागली. तेव्हां खवासखान यांणीं आपली फौज एकीकडून चालविली. षर्जाखान याणी दुसरी वाट धरून जात होते. इतक्यामध्यें एकाएकी थोडीसी जमात, कीं त्यासी लढाई करण्याजोगी फार नव्हती अशी थोडीसी जमात शत्रुचे फौजेंतून फुटून कोणीकडे जात होती. षर्जाखनाचा धाकटा पुत्र सैय्यद हबीब म्हणोन होता. तो त्या दिवशी फार आवडीनें लढाई पाहाण्याकरितां षर्जाखानाचे समागमें गेला होता. त्या सय्यद हबीब याची दृष्टी त्या जमातीवर गेली. तो षर्जाखानाचा पुत्र वाघाचा बच्याच होता, म्हणजे षर्जाखान महापराक्रमी शूर आणि याचा हा पुत्र तेंव्हां, हाही पराक्रमीच होता. त्यास शेरबच्या असें म्हणत होते. तो यद्यपि लहान वयाचा होता तत्रापि त्याजला लढाईत तरवार लावण्याची मनापासून फार आवडी होती. यास्तव या पुत्रानीं इच्छिलें कीं, त्या जमातीवर चालून जावें. असें मनांत आणोन एकटाच त्या जमातीवर दौड करून आपले मनांतील हाऊस पुरवून घ्यावी व आपली तरवार शुरांचें रक्तः प्राशन करण्याविषयीं फार तानेली आहे त्या तरवारीस, शुरांचे रक्त पाजून तृप्त करावी असें इच्छून कोणा एकास न कळवितां एकट्यानींच घोडा हांकला. त्या पिशाचे सारिखे जमातीवर जाऊन पडला. तेंव्हां त्या जमातींतील डावे उजवे बाजूचे कित्येक लोक पायदळ व स्वार वगैरे तरवारीनें तोडून कत्तल केले होते तोंच त्या फार जमातीनें या षर्जाखानाचे मुलाभोंवतें वेढा देऊन, चंद्राभोंवतें खळें पडलें त्याप्रमाणें चंद्रास म्हणजे सय्यद हबीब याजला, मध्यभागीं वेढिलें. षर्जाखानाचे पुत्रानीं अशी अवस्था पाहिली तेंव्हां वाघासारिखी एक आरोळी दिल्ही अशी मोठ्यानीं आरोळी दिल्ही कीं, त्याचा आवाज त्याचे बापाचे, म्हणजे षर्जाखानाचे, कानावर गेला. षर्जाखान याणी जेंव्हां आपले पुत्राचा आवाज ऐकिला आणि घाबरून जाणिलें कीं, माझा पुत्र शत्रुचे जमातीचे हातीं लागोन खास धरला गेला. असें जाणोन आपले पुत्राचे आवाजाचे सुमारावर तिकडे फार जलद घोडा हांकला. नेत्रांस पातें लागे न लागे तों एक पलखांत शत्रुचे जमातीवर दौड करून गर्दी करून आपले पुत्राचे भोंवतें वेढा पडला होता तो वेढा मोडला. वाघास पाहिलें म्हणजे एकंदर बकरी जशी पळून जातात त्याप्रमाणें या जमातीस षर्जाखान याणी पळविलें. आपले पुत्रास त्या संकटाचे वेळ्यांतून सोडऊन आपले समागमें घेतला. आपले फौजेकडे चालता झाला. चित्तांत फारच संतोष झाला. तो दिवस बहुत कल्याणाचा झाला होता. कारण कीं, आपला पुत्र व आपणहि सुरक्षितपणानें पार पडलों. असें षर्जाखान याणीं मनांत आणिलें व षर्जाखान हा काळच बहुत निर्दय आहे क्षणांत काय करील हें कळावयाचे नाहीं हें न जाणतां भ्रांतपणानें संतोष पावला. कालचक्रानें या घटकेस क्षमा केली. पुन्हां दुसरे घटकेस काय करील हें समजला नाहीं.

## ४७. ईश्वरी ईच्छेनें षर्जाखान याणी मरण पावणें प्रकर्ण :

कालचक्रानें गुप्तपणांत पडद्याचे पाटीमागें नाना प्रकारचे खेळ ठेविले आहेत, तीं अशीं कामें आहेत कीं, तें जाणण्याविषयीं सर्वोची अकल थकीत आहे. थोर थोर अकलवान पुरुषाचा तर्क कालचक्राचा खेळ व गुप्तपणाचा भेद वोळखणेंविषयीं दंग आहे, म्हणजे कांहीं एक समजुतींत यावयाचें नाहीं. एक पलखांत संतोषास चिंतेचा जोड देणेंचे कर्म कालचक्रापाशीं सुलभ आहे. नेत्रास पातें लागे न लागे इतक्या अवकाशांत महान संतोषास अकुंचित करून चिंतेची गांठ देणें काल-चक्रास अति सुलभ आहे. या विस्तारांतील व या वर्णनांतील तात्पर्य मिळोन षर्जा-खान महापराक्रमी नामांकित शूर असोन एक पलखांत मरण पावला ही सूचना आहे. त्या विषयींचा मजकूर असा आहे कीं, षर्जाखान याणी जेव्हां आपला पुत्र शत्रूचे जमातींत सांपडला होता त्या जमातींतून सोडऊन घेऊन आपले लष्कराकडे चालता झाला तेव्हां षर्जाखान याजला फारच आनंद झाला. कारण कीं, षर्जाखानाचे मनांत आले कीं, आपला पुत्र व आपण असे सुरक्षितपणानें दोघेहि त्या संकटांतून पार पडलों. असें मनांत आणोन थोडीशी जमीन या आनंदानेंच चालला. तोंच एकाएकीं कारण न दिसतां षर्जाखान घोड्यावरून धेरी येऊन जमिनीवर पडला. असें व्हावयास कारण काय झालें म्हणोन पाहिलें तो षर्जाखान याचा प्राण गेला होता. सर्व मंडळी हें एकाएकीं काय झालें असें आश्चर्य पाहून चिंतेंत पडली, हरएकाचे मुखांतून हा शब्द निघाला, पारसी बैतेचा अर्थ : "जखमहि लागलेली दिसली नाहीं व याजला कोणी मारिलें तो जीवें मारणारा पुरुषहि दिसला नाहीं. मृत्यू कसा आला व कोठून निर्माण झाला : १ : " असे सर्वत्र बोलले तेव्हां अकलवान पुरुषांनी त्याजला उत्तर दिल्हे कीं, पारसी बैतेचा अर्थ : "ईश्वराचे कारभाराचे कारखान्यांत हें काम व अशा प्रकारचें कर्म कांहीं एक आश्चिर्य नाहीं व किंचितहि अवघड नाहीं : २ : " ही आश्चर्यप्रद कामें ईश्वराचीं सर्वांवरच आहेत. कारण कीं, ईश्वराची आज्ञा कदापि मोडावयाची नाहीं व माघारी फिरावयाची नाहीं. त्या ईश्वरी आज्ञेनें मनुष्याचा प्राण जाणेस शस्त्राची जखम लागणेनें किंवा कोणी शस्त्रानें तोडून प्राण घेणार पाहिजे हें कांहींएक प्रयोजन नाहीं. ईश्वराचे आज्ञेचें आज्ञापत्र जेव्हां येऊन पोहोचतें तेव्हां मोठी चिंता व दुःख प्राप्त झाले असेल तत्रापि एक पलखांत चिंता व दुःख परिहार होऊन बहुत आनंद प्राप्त होतो. असेच कोणी बहुत आनंदांत व मोठे सुखांत असला तर एक क्षणांत त्याचा आनंद व सुख नाहीसें करून त्याजला अति चिंतेंत व पीडेंत ईश्वर घालितो. तेव्हां कोणते प्रकारेंहि ईश्वराचे मनोगत कळण्याचा गुप्त भेद कोणासच समजला नाहीं. परंतु जे पूर्ण ज्ञानी आहेत व त्या ज्ञानवान पुरुषाचे, म्हणजे महान साधूंचे सेवेंत प्राण खर्च केला आहे, कारण कीं, जे

ईश्वराची सेवा करून पूर्णज्ञानपदवीस पावोन सिद्ध दशेस पावले आहेत त्यांचे सेवेंत प्राण खर्च करून त्याची कृपा संपादन करून घेणें हा फारच थोर अधिकार व उंच पदवी आहे. यास्तव असा ज्या ज्ञानवान पुरुषानें सिद्ध पुरुषाचे सेवेंत प्राण खर्च केला आहे त्याजला मात्र ईश्वराचें मनोगत व ईश्वराचा गुप्तभेद उघड समजला आहे. खराबीनें व बेजारपणानें मृत्यू येणें हें शत्रूस संतोषाचे व योग्यतेचें कारण आहे. तो प्रसंग प्राप्त झाला. असो, तात्पर्य षर्जाखान मरण पावला. या योगानें शुर मंडळींचे व पराक्रमी पुरुषांचे घरोघर चिंता प्राप्त झाली. थोर थोर किर्तीमान नामांकित फार योग्य पुरुषांचे घराण्यांत मोठा शोक प्राप्त झाला. एकंदर शूर मंडळी व बलवान पुरुष होते ते आम्ही निराश्रित झालों, आम्हांस कोणीच आधार नाहीं असें म्हणोन अत्यंत रुदन करूं लागले. शूरत्व व पराक्रमास वैधव्य प्राप्त झालें. शूर मंडळीनें तरवारी व परश वगैरे हत्यारें एकीकडे कोपऱ्यास टाकून मोठ्यानें बोरडून रडूं लागले. चिलखत व बख्तरें जमिनीवर आपटून आपण जमिनीवर आदळून घेऊन एकंदर मंडळी फारच दीर्घस्वरानें रडूं लागलीं. सर्व मनुष्यें अशीं बोलूं लागलीं कीं, हें कालचक्र मातुश्री आहे. या मातुश्रीचे उदरीं षर्जाखानासारिखा कधीं पुत्र जन्मला असेल कीं काय ! असें बोलूं लागले. खवासखानास षर्जाखान मरण पावल्याचें हें भयंकर वर्तमान कळतांच मोठ्यानें बोरडत व रडत धाऊन आला. षर्जाखानास मेलेला पाहून फारच बोरडूं लागला. पुन्हां खवासखान याणी आपला शोक आवरून त्याजला ईश्वरी आज्ञेची तरवार लागून कत्तल झालेले पुरुषाचे, म्हणजे षर्जाखानाचे, प्रेतास स्नान घालून दफन करण्याचे तयारीस लागला. षर्जाखानाचे दोघेहि पुत्रांस नाना प्रकारचे बोध सांगून शांतवन करून तऱ्हेतऱ्हेनीं दिलभरंवसा दिल्हा. हें अत्यंत शोकाचें वर्तमान गरिबांचें पालन करणार आदिलशाहा पादशाहास समजलें. तेव्हां तो इमानी चाकर अत्यंत प्रीतींतील मनुष्य व स्वामी सेवेंत प्राण खर्च करणारा, म्हणजे षर्जाखान, मरण पावला येणेंकरून पादशाहानीं अति शोक केला. ऐषआराम सर्व विसरून गेला. षर्जाखानाचे दोघे पुत्र सय्यद मखदुम व सय्यद हबीब म्हणोन होते. त्या उभयतां पुत्रांस पादशाहानीं अत्यंत कृपेनें आपले जवळ आणवोन त्या पुत्रांचें पालन त्यांचे बापाहून अधिक केलें. त्याचा बाप आलीयासखान याजला षर्जाखान असा किताब दिल्हा होता तोच षर्जाखानाचा किताब त्या उभयतां पुत्रांस देऊन त्यांचे बापाचे पदाधिकारावर व त्याचे दौलतीवर ते पुत्र कायम केले.

४८. आदिलशाहाकडील अमीरलोकांनीं जयसिंगाशीं युद्ध करणें, बहलूल-खान व खवासखान याणी जयसिंगावर गर्दी करणें, राजा जयसिंग याचा मोड होणें व हा जयसिंगाचा मोड झाल्यानंतर राजा जयसिंग पुन्हां युद्धास उभा राहिला नाहीं आणि आपले मुलकास परत निघोन गेला :

मिरजा राजा, म्हणजे जयसिंग, याचा आदिलशाहाकडील शूरांनें वरचेवर मोड केला व वारंवार शिकस्त जाहाली. यामुळें जयसिंग खास थकून पळून जाणेंचे विचारांत होता. परंतु औरंगजेब पादशाहाकडून वारंवार लागोपाठ जरबेचीं पत्रें कीं तूं युद्ध न करितां व ज्या कामास गेला आहेस तें काम न करितां अपेश घेऊन माघारा आलास तर तुझें बहुत पारपत्य केलें जाईल, अशीं बहुत जरबेचीं आज्ञापत्रें येत होतीं. या धाकानें फारच विचारांत पडला. आदिलशाहाकडील शूरांवर चालून जाणेचा दम राहिला नाहीं यामुळें निरोपाय होऊन आपले सरहदींत जाऊन बहुत चिंतेंत व घाबरेपणांत दिवस घालविले. अशा समयांत प्रारब्धयोगेंकरून षर्जाखान मरण पावलेचें वर्तमान कळलें. तेणेंकरून त्या संतोषानें जयसिंगास नवा जीव आला, म्हणजे आणखी हिंमत चढली. संतोषानें फारच दाटला. पहिली बदमस्ती होती ती मस्ती अधिकच चढली. असें मनांत येऊन अभिमान चढला कीं, जो शूर जयसिंगाचे सामर्थ्य चालूं देत नव्हता व जो जयसिंगाचे मनोरथ पूर्ण होऊं देत नव्हता तो हाच षर्जाखान होता. तो षर्जाखान मरण पावला. तेव्हां जयसिंगानें मनांत आणिलें कीं, आतां बरिक आपले मनोरथ पूर्ण होतील. फार कठीण प्रसंग आला होता तो आतां केवळ फारच सुलभ जाहाला. आतां दक्षिणचा मुलूक सहज हस्तगत करतां येईल. असे मनांत आणिलें. परंतु या मूर्खास, म्हणजे जयसिंगास, असें समजलें नाहीं कीं, वाघासारिखा पराक्रम करणारा एक शूर मरण पावला म्हणोन काय जाहालें? कित्येक शूर सिंहासारिखें पराक्रम करणारे षर्जाखान सारिखेच प्रत्यक्ष या रणभूमींत आहेत असें लक्षांत आलें नाहीं. असो, तात्पर्य जयसिंगाचे मनांत पुन्हां दुर्बुद्धी आली आणि अविचार करण्यास प्रारंभ केला. जयसिंगानीं आपलेकडील लष्करांतील शूर व सरदार मंडळी जमऊन त्यांजला ठकविण्यास प्रारंभ केला. नाना प्रकारचे ठकविद्येचे डाव चालऊं लागला. आदिल-शाहाकडील फौजेवर चालून जाऊन मोटा हल्ला करून लढाई करावी असें आपलेकडील शूरांस आशा दाखवून व आज तुम्ही युद्ध पराक्रम चांगला झटून केल्यास तुम्हास मी बहुत बक्षीस व इनाम देववीन, असा लोभ दाखवून बोलला कीं, आमचे पादशाहानीं आम्हांस दिल्ली येथील सर्व अमीरलोकांत निवडक शूर ठरवून या लढाईचे कामावर पाठविलें आहे. जर करितां हें काम न होता आम्ही परत जाऊं

तर आम्ही कोणते तोंडानें परत जाऊं ? काय यश आलें म्हणोन दिल्ली येथील पादशाहास तोंड दाखवावें ? दिल्ली येथील दरबारांत आमचे बराबरीची मंडळी आहे त्यांत आम्ही अपेश घेऊन कोण्याप्रकारें संसार करावा ? यद्यपि कित्येक वेळ येथें लढाईत आमचा मोड जाहाला तत्रापि एक वेळ आतां हिंमत धरून पकी कंबर बांधुन एक चांगली लढाई देऊं, म्हणजे आमचे मनोरथ पूर्ण होतील. या रणभूमींत जो वाघ, म्हणजे पर्जाखान होता व पृथ्वींतील वाघ, म्हणजे शूर, त्याजला भीत होते तो वाघ मृत्यूचे सापळ्यांत पडला, म्हणजे पर्जाखान मेला. आतां तुम्ही शूरांनी धैर्य दिल्हें पाहिजे, हिंमत धरली पाहिजे. असें झालें असतां ईश्वरकृपेंकरून खास आम्हांस यश येईल. आमचे मनोरथ पूर्ण होतील. नाहींपेक्षां आम्हांस व तुम्हांस आपले बायकामुलांत जाऊन पोंह्चणें व आपले आप्तविषयीं व मित्राच्या भेटी घेणें फारच कठीण पडेल. असें बोलला तेव्हां जयसिंगाकडील अमीरलोक व सरदार मंडळी बहुत अकलवान होते ते जयसिंगास बोलले कीं, आदिलशाहाकडील दक्षणी शूर मंडळीनीं आम्हांस ज्या समई मारामारी व ठोकाठोकी करून निखालस थकऊन जाग्यावर बसऊन टाकिलें व खाण्यापिण्याचा एकंदर सामानसरंजाम सरला अशी दशा जाहाली कीं, घोड्यावरील स्वारांसहि सामर्थ्य राहिलें नाहीं व घोड्यांत शक्ती राहिली नाहीं. तेव्हां आदिलशाहाकडील जबरदस्त शूरांपुढें आम्हांस युध्यास उभे राहण्यास कोठून सामर्थ्य राहील ! आपली आम्हांवर मेहरबानगी आहे इतकेंच आम्हांस पुरे. आपण मेहरबानगी करून आमचा प्राण वांचऊन एवढा आम्हांवर उपकार करून आमचे नांव सोडून आपले जागीं स्वस्थ बसावें. जर करितां निर्दयपणानें दांडगेपणा करून आमचे पाठीं लागाल तर आमचा प्राणहि वांचणार नाहीं व आमचे जवळची मालमत्ता कांहींच रहाणार नाहीं. आदिलशाहाकडील शूर आपला प्राण वाचूं देणार नाहींत. सर्व लुटून घेतील. न जाणों ही आपण कच्ची मसलत करितां यापैकीं आदिलशाहाकडील शूर मंडळीस कांहीं बातमी लागेल, मग एका पलखांत पृथ्वीप्रळय करणारी आदिलशाहाकडील फौज घेऊन येऊन आमचे भोवतें उभे राहून आम्हांस मध्यभागीं वेढितील. दाणा पाणी मिळण्याचा दरवाजा बंद करि-तील. मग आम्हांसहि तानेनीं व भूकेनीं जीव द्यावा लागेल. असा आमचा दैवयोग उभा राहील, किंवा आदिलशाहाकडील लोक आम्हांवर चोर व मांग रामोसी वगैरे मारेकरी घालून मस्तकावर पागोटें राहूं देणार नाहींत. घोड्यावरील स्वारांचे आंगावर किंचित देखिल वस्त्र राहूं देणार नाहींत. घोड्यांचे सामानापैकीं व घोड्यांचे अंगावर एक दुमची देखिल राहूं देणार नाहींत. त्यासमई आम्हांस या दक्षणचे भयंकर अरण्यांत फिरावें लागेल. मस्तकांत माती घालून घेत बसावें लागेल. हिंदुस्थानचे मुख देखील स्वप्नांत आमचे दृष्टीस पडणार नाहीं. आतां त्या गोष्टींत बरें आहे कीं, हा आपण दुष्ट संकल्प धरिला आहे व कची मसलत करित आहां ती सोडून देऊन

संकट विझलें आहे तें पुन्हां उभें न करितां आपले मुलखास जाऊं चला. हरएक प्रकारें या प्राणघातक संकटांतून सुरक्षितपणें पार पडून आपण आपले वतनाचे जागेस जाऊन पोहचूं चला. आपले बायकामुलांची भेटी होणें आमचे दैवांत असल्यास शफत वाहून सांगतों कीं, मातुश्रीसी गमन करूं तर पुन्हां दक्षिण देशाकडे तोंड करूं. जाणत असतां व दिसत असतां संकटाचे विहिरींत आम्ही पडणार नाहीं. असे बोलले तेव्हां जयसिंग बदमस्त याजला गर्वाचे भ्रांतीनें असा मूर्ख करून टाकिला होता कीं, त्याजला अकलवान लोकांनीं कितीहि नीति व बोध सांगितलें असतां त्याणीं किंचितहि ऐकून घेऊं नये व कबूल करूं नये असा मूर्ख करून टाकिला होता. यामुळे सयसिंग याणें सुद्ध करण्याचा इरादा केला होता. त्याच गोष्टीवर हट्ट धरून राहिला आणि लढाईची तयारी करून शिपाईलोकांस बहुत बहुत बक्षिस व पोषाख व इनाम देऊन आपले फौजेंतील सरदार मंडळीस बहुत दिलभरंवसा देऊन कसेंहि करून बलात्कारानें बळेंच युध्दास तयार केलें. ही खबर आदिलशाहाकडील अमीरलोकांस समजली तेव्हां ममलकतमदार अबदुल महंमद याणी अति सत्वर लढाईचें सामान सरंजामाची तयारी करून आपली फौज लढाईस तयार केली. आदिलशाहाकडील एकदर फौजेचे दोन विभाग करून निमे फौज बहलुलखान याचे ताब्यांत व निमे फौज खवासखान याजकडे नेमून लष्कराची ढाल उभी केली. नेकनामखान याणीहि आपली एकंदर जमात नेमून लष्कराची ढाल उभी केली. नेकनामखान याणीहि आपली एकंदर जमात घेऊन शत्रुचे पारपत्यावर चालू झाला. मजली काढून शत्रूचे मोकाबल्यावर जाऊन पोंहचले तेव्हां बहलूलखान याणी पुढें दौड करून शत्रुचें फारच संनिध जाऊन पोंहचला. तेव्हां जयसिंग याणी फारच हिंमत धरून आपला तोफखाना आपले पुढें चालऊन बहलूलखानाचे फौजेवर येऊन पडला. तोफखान्याकडील कामदारांस हुकुम देऊन एकदांच तोफेची सरबत्ती केली. उजवे व डावे बाजूंची स्वार व शिबंदी बहलूलखानाचे फौजेवर घातली. एका घटकेंत पृथ्वीप्रळयाचा समय उभा केला तेव्हां ती रणभूमि यमलोकाचे मैदानाप्रमाणें जाहाली. मोगल, पठाण, मराठे व रजपूत वगैरे लोक जयसिंग राजाचे शिकविण्यावरून व जयसिंगानें फार लोभ दाखविला होता त्यावरून फारच चढून बहुत हिंमत धरिली होती. त्या भयंकर रणभूमींत युद्ध पराक्रम करण्याविषयीं बहुत झटले. फारच शूरत्व केलें. शत्रूचें पारपत्य करण्याविषयीं व लढाई करणेंत केसाइतकेंदेखिल अंतर केलें नाहीं. परंतु आदिलशाहाकडील बहलूलखानाचे निसबतीचें शूर मंडळीनीं हिंमत धरून व लढाईस कायम उभे राहून तरवार अशी चालविली कीं, बहुत मोंगल व रजपूत लोकांस तरवारीनें जीवें मारिलें. ज्या ज्या समई दिल्लीकडील लष्करची जमात आदिलशाही फौजेवर चालून येऊन हल्ला करित होती त्या त्या समई आदिलशाहाकडील शूर मंडळीनीं शस्त्रप्रळय करून तरवारी

लाऊन दिल्लीवाले लोकांचीं तोंडे माघारी फिरविलीं. अशा समयांत सर्व सरदारांचा सरदार व सर्व शूरांतील शूर खवासखान आपले जमातीसुध्दां फौजेंतून एकटे फुटून शत्रूशी लढाई कोणत्या प्रकारें करावी अशा विचारांत होते. तोंच एकाएकीं खवासखानास बातमी समजली कीं, दिल्लीकडील मोंगल लोकांनीं बहुत फौजेसुध्दां चालून येऊन व भारी तोफखाना घेऊन, बहलूलखानावर गर्दी करून लढाईस कायम उभे राहून युध्दास प्रारंभ केला आहे. असें वर्तमान ऐकिलें तेव्हां खवासखान याणी मनांत विचार केला कीं, हा चांगला विचार आहे कीं, जशी बहलूलखान याणी दिल्ली-कडील फौजेचे तोंडावर उभे राहून पुढून गर्दी केली आहे तशीच मीहि दिल्लीकडील फौजेचे पाठीमागें जाऊन पोंहचून या भयंकर अजगरास म्हणजे जयसिंगास मध्यभागीं वेढून या अजगराचें मस्तक फोडून टाकूं, म्हणजे जयसिंगास जीवें मारूं, असें बोलला. आपली फौजे व जमात घेऊन विजेप्रमाणें फार जलद दिल्लीकडील फौजेचे पाठीमागें जाऊन पोंहचला. पाठीमागून हल्ला करून शस्त्रप्रळय करित व लाथेनें उडवाउडवी व धकाबुकी करित दिल्लीकडील मोंगलांचे फौजेस घाबरें केलें. नेत्रास पातें लागे न लागे इतके अवकाशांत एक पलखांत तरवारी मारण्यानें व तीरांची वृष्टी करण्यानें दिल्लीकडील फौजेंत प्रळय उसळला. दिल्लीकडील फौजेंतील हजारो स्वार व शिबंदी लोक ठार करून व घायाळ करून मातींत व रक्तांत लोळविले. तेव्हां जयसिंग हा बदमस्त घाबरून फारच भयाभीत जाहाला. जयसिंगानें मनांत सत्य जाणिलें कीं, आतां प्राण वाचत नाहीं हें खास. पळून जाण्यासहि सुटका राहिली नाहीं, असें जाणिलें. नंतर दक्षणचे या दोघे सरदारानें, म्हणजे बहलूलखान व खवासखान यांणी दोहींकडून म्हणजे मागून व पुढून दिल्लीकडील फौज मध्यभागीं पकडली. तेव्हां त्या फौजेची अशी दुर्दशा व खराबी झाली कीं, तशी दशा शत्रूची देखिल होऊं नये. शेवटीं मोंगलाकडील म्हणजे दिल्लीकडील शिपाई लोकांची येथपर्यंत अवस्था झाली कीं किंचित पळावयास मार्ग सांपडला कीं, पळून जात होते. जिकडून मार्ग दिसेल तिकडून पळून जाण्यास घुमत होते. त्यानंतर खवासखान याणी मिरजा राजा म्हणजे राजा जयसिंग हा कोणते जागीं आहे असा पुरा शोध करून खवासखान नीट जयसिंगावर चालून गेला. जसा नदीस महापूर येतो त्याप्रमाणें हांका देत व ओरडत जयसिंगावर चालून आला. त्यासमई जो स्वार किंवा पायचा मनुष्य अथवा जनावर पुढें येत होते तें आदिलशाहाकडील निर्दयी व महाकपटी शूरांचे तरवारीचे माऱ्यानें मिथून राशीचे चांदण्याप्रमाणें तुटक होत होते, म्हणजे आदिलशाहाकडील शूर जे पुढें येत त्याजला तरवारीने जीवें मारून टाकित होते. लढाई करण्याचा इरादा करून आदिलशाहाकडील फौजेपुढें येत होता तो कृतिकाचे चांदण्याप्रमाणें तुटक होऊन त्याचे शरिराचे तुकडे होत होते. मिरजा राजा, म्हणजे जयसिंगास, खबर समजली कीं, तो मस्त हत्ती, म्हणजे खवासखान, माझा प्राण घ्यावयाकरितां नीट

चालून येत आहे. असें समजलें तेव्हां जयसिंग घाबरून मस्तकाची व पागोट्याची देखिल शुध्धी विसरून जेथें उभा राहिला होता तेथून घोडा हांकला आणि कित्येक खासे लोक समागमें घेऊन एकीकडे निघोन चालला. आपले फौजेची आशा सोडून आपले फौजेंतून जयसिंग पळोन गेला. जयसिंगाचे फौजेनीं पाहिलें कीं, आपला सरदार जयसिंग हा फौज टाकून पळून जात आहे. असें पाहिलें तेव्हां हरएक शिपाई-लोकहि या आरबी वाक्याप्रमाणें, आरबी वाक्याचा अर्थ: "सर्व मनुष्यें आपला धणी ज्या मार्गानें चालेल त्या मार्गानेंच वागतात", या वाक्याप्रमाणें सर्व लोक जयसिंग पळाला तेव्हां त्याप्रमाणें तेहि लोक पळून गेले. जयसिंगाकडील एकंदर लोक असे पळून गेले कीं, त्या रणभूमींत ठार जाहालेले मनुष्यांचे प्रेताशिवाय व कत्तल जाहालेले मनुष्यांचे पडलेले तरवारी व तीरांशिवाय कांहींएक दिसत नव्हतें. असे पळोन गेले तेव्हां आदिल-शाहाकडील अमीरलोक ईश्वरी कृपेंकरून ईश्वराचे साह्यानें पूर्ण यशस्वी होऊन परत येते झाले. आदिलशाहा पादशाहा एवढी मोठी फत्ते झाली येणेंकरून फारच संतोष पावोन ईश्वरास नमस्कार घालून ईश्वराचा स्तव करून मोठी आनंदाची कचेरी भरून खजिन्याची कुलपें काढून रोख ऐवज व सोनें ईश्वरास भजणारे महान साधूंस पर्ज्यन्य वृष्टीसारिखे देता जाहाला. दरिद्री लोकांस दरिद्राचे पीडेंतून सोडविलें. ज्या शिपाई लोकांनीं लढाईत स्वामिसेवा बहुत पराक्रमानें करून दाखविली व स्वामीसेवे-विषयीं प्राण खर्च करून अशा बलवान महा कपटी शत्रूस, म्हणजे जयसिंगास कीं त्या जयसिंगानें दिल्ली येथील पादशाहापासून दक्षण देश हस्तगत करण्याचें काम आपले जिमेस पत्करून घेऊन समुद्राचे लाटेसारिखी अगणित फौज घेऊन दक्षण देशावर चालून आला होता त्यानें, जयसिंगाची दुर्दशा करून व बहुत खराबी व फजिती करून त्याजला अति वाईटपणानें हांकून देऊन आपले सरहद्दींतून बाहेर घालविला. रुस्तुमाप्रमाणें या पराक्रमानें दक्षणी फौजेचे तरवारीचा धाक व आदिलशाही पराक्रमाची जरब दिल्ली येथील एकंदर हिंदुस्थानी लोकांवर बसली. त्या आपलेकडील पराक्रमी शूरांस आदिलशाहानीं भारी किंमतीचे पोषाख व रोख ऐवज व दागदागिने व जवाहीर वगैरे अत्यंत व इनाम व इजाफा बेहाद, म्हणजे अगणित, देऊन सत्कार केला. राजा जयसिंग याचे लढाईस व त्याचा हल्ला आदिलशाहाकडील शूरांवर न चालता व्यर्थ श्रम होणेस फार दिवस लागले. एक वर्षावर अधिकच कांहीं दिवस लागले. सन १०७५ (१६६४–६५ इ. स.) सालीं राजा जयसिंग हिंदुस्थानांतून दक्षण देशांत आला. सन एकहजार सत्याहत्तर (१६६६–७ इ. स.) सालीं राजा जयसिंग याची फार खराबी होऊन अपेशपणानें अति खिन्नतेनें व निराशपणानें फार नुकसान होऊन आपले सरहद्दींत जयसिंग परत गेला.[२८]

२८. "On Saturday the 20th January 1666, he (Raja Jaisingh) crossed the river Bhima. Dianat Rai, the trusted servent of Adil

४९. यापूर्वी राजा जयसिंग याणी शिवाजी भोसले याजला अलमगीर पादशाहाकडे दिल्लीस रवाना केले होतें तेथें पादशाहाचे कृपेंकरून शिवाजीचा पुत्र संभाजी हाहि शिवाजी समागमें दिल्लीस गेला होता. या उभयतांस म्हणजे शिवाजीस संभाजीस पांच हजारी असें पद पादशाहाकडून प्राप्त होऊन शिवाजी आपले पुत्रासहित दिल्ली येथून माघारा पळून आला व शिवाजी आणखी पुन्हां आपले पहिले मुलकावर कायम जाहाला :

सर्व फंद फितुराची खाणी व सर्व अमार्ग वर्तणुकीचे व बदचालीचे व दांडगेपणाचे उत्पत्तीचें स्थान शिवाजी भोंसला याणी जव्हां आदिलशासी बेमानपणा व निमकहरामी करून राजा जयसिंग याच्यासी सख्य करून कित्येक मोठे मोठे मजबूत किल्ले जयसिंगाचे हवाली करून जयसिंगास नाना प्रकारच्या बदफैलीच्या युक्ती सुचऊन व अनेक तऱ्हेचे लोभ दाखऊन आदिलशाहाचा मुलुक हस्तगत करण्या-विषयीं जयसिंगास सिद्ध केला आणि युद्धप्रळयाचा अग्नि दोनी राजधानींत, म्हणजे दिल्लीकडील व आदिलशाहाकडील राजधानींत, पेटविला, म्हणजे उभयतांची लढाई लाविली येविषयींचें वर्णन विस्तार पूर्वी वर्णिला आहे. कित्येक लढाईत शिवाजी हा जयसिंगासमागमेंहि मिळोन आदिलशाहावर चालून येऊन आदिलशाहाकडील शूरांनीं जयसिंगाचे वारंवार पारपत्य केलें त्याचप्रमाणें शिवाजीनींहि आदिलशाहाकडील शूरांचे हातून मार खाऊन एकीकडे जाऊन बसला होता. यापूर्वी मिरजा राजा म्हणजे जय-सिंग याणी शिवाजीशीं करार मदार ठरविले होते कीं, तुझी सेवा व तुझे धण्याचे चाकरीविषयीं प्राण खर्च करणेचा मजकूर अलमगीर पादशाहाकडे विनंतिपत्रांत लिहून तुजला अलमगीर पादशाहाकडून तुजला बहुत दौलत व सहा हजारीचा किताब देववीन. त्याप्रमाणें वचन दिल्हेलें सिध्धीस नेण्याकतां शिवाजीची तारिफ लिहून पादशाहाकडे विनंतीपत्र लिहिलें कीं, शिवाजी हा चाकर फार कामाचे उपयोगी आहे.

Khan, brought a message to the Raja begging pardon and professing submission, with some jewelled ware. As the rainy season arrived, and the Raja got a letter from the Emperor ordering him to pass the monsoon at Aurangabad, he gave up the campaign and returned,"–MiA, p. 39.

"Raja Jaising was coming from Aurangabad to the Court, when on arrival there he daid on 28th of Muharram (10th July 1667)"– MiA, p. 47. (This date is apparently incorrect. Jaisingh died on 28th August 1667.)

शिवाजी हा दक्षण देशाची किली आहे. हा शिवाजी जेव्हां आपणाकडील सेवकांत हजर होईल तेव्हां जाणावें कीं, दक्षणचा एकंदर मुलुक आज हस्तगत जाहाला. हा मनुष्य पादशाहानीं कृपा करण्यालायक जाणोन याजवर बहुत मेहरबानगी करावी. असें विनंतिपत्र लिहून अलमगीर पादशाकडे पाठविलें. त्यानंतर शिवास त्याचा पुत्र संभाजी सुध्धां अलमगीर पादशाहाकडे रवाना केला [२९] शिवा आपले पुत्रासहित जेव्हां दिल्लीस जाऊन पोंहचला व अलमगीर पादशाहाची भेटी घेतली [३०] तेव्हां अलमगीर पादशाहा याणी त्याजवर बहुत मेहरबानगी करून शिवास व त्याचे पुत्रास, या उभयतांसहि, पांच हजारी असा किताब दिल्हा. शिवास बहुत दिलभरंवसा दिल्हा. परंतु पहिले भेटीसमईं शिवा एकंदर जवळ उभे रहाणारे अमीरलोकांचे बराबरीनें पादशाहापुढें उभा राहिला तेव्हां शिवास खालीं बसणेविसीं पादशाहानीं हुकूम दिल्हा नाहीं. शिवास फारच गर्व व अभिमान व दांडगेपणा होता. यामुळें पादशाहास बहुत त्रास आला. पादशाहानीं आपल्यास बसण्याविषयीं आज्ञा दिल्ही नाहीं यामुळें शिवास फार वाईट वाटलें, कांहीं एक आजार नसतां शिवा याणें माझी प्रकृत बिघडली आहे असें निमित्त करून पुन्हां दरबारांत हजर झाला नाहीं. अलमगीर पादशाहा फारच अकलवान होता. शिवाचे दुष्ट संकल्प व कपटी प्रकृत वोळखून शिवा व त्याचा पुत्र संभाजी या उभयतांसहि पादशाहानीं नजरबंदीचे कैदेंत ठेविलें. [२९] तेव्हां अलमगीर पादशाहानीं मजला माझे पुत्रासहित नजरबंदीचे पहाऱ्यांत ठेविलें होतें असा बोभाटा लिहून या मजकुराचें पत्र राजा जयसिंग याजकडे पाठविलें. तेव्हां राजा जयसिंग याणीं पुन्हां आणखी शिवाची तारिफ लिहून, शिवाचा अन्याय माफ करावा म्हणोन, शिवावर बहुत मेहरबानगी असावी व शिवाचा व त्याचे पुत्रास नजरबंदीचे कैदेंतून सोडवावें असें विनंतिपत्र लिहिलें. त्यावरून अलमगीर पादशाहानीं शिवास नजरबंदीचे पाहऱ्यांतून सोडिले. शिवा नजरबंदीचे पाहाऱ्यांतून सुटला तेव्हां पळून जाण्यास संधी पाहातच होता. फुसरतीची वेळ पाहून आपले पुत्रासहित शिवा दिल्ली

---

२९. शके १५८७ फालगुण शुध नवमी सोमवारी (५ मार्च १६६६) राजश्री सिवाजी राजे व राजश्री संभाजी राजे ऐसे औरंगजेबाचे भेटीस गेले.–जेधेश, पृ. २३.

३०. शके १५८८ जेष्ठ शुद्ध द्वितीया (१२ मे १६६६) राजश्री सिवाजी राजे आगरियास जाऊन औरंगजेबाची भेटी घेतली. बिघाड होऊन राजश्रीस चौकिया दिल्या. जेधेश, पृ. २४.

"On th 18th of the month of Zeelcada (13th May 1666) of the same year (1076 A. H.) when they rejoiced on account of weighing the King for fifty years of his moble age, the Seevah........ arrived at Huzur......and acquired the honour of......King's visit......" Kafi Khan, Mac. Mss. p. 213; MiA, p. 36.

येथून पळाला.[३१] त्यासमई राजा जयसिंग याचा आदिलशाहाकडील शूर मंडळीचे हातून मोड होऊन जयसिंग माघारा फिरला होता. तेव्हां अलमगीर पादशाहानीं दक्षणचे जिल्ह्याचे जिल्हेदारीचे व फौजदारीचे काम बाहादुरखान, नामांकित अमीर-लोकांपैकीं एक महान शूर होता, त्याजला देऊन दक्षण देशावर बाहादूरखान यास नेमून मिरजा राजा, म्हणजे जयसिंगास, हुजूर आणविलें. जेव्हां जयसिंग परत येत होता तों शिवा दिल्ली येथून पळत येऊन शिवानी जयसिंगाची वाटेंतच भेट घेतली. बाहादूरखान याणी दौलताबादेस येऊन जिल्हेदारीचे कामात निमग्न जाहाला. शिवा आपले मुल्कास येऊन[३१] शिवानीं पुन्हां फंदफितुर वगैरे बदफैली करून बंड उभे केलें. नाना प्रकारचे मकरवहिले करून जे किल्ले मोंगलाचे हातीं गेले होते ते सोडवून घेऊन आपले हातीं आणिले. तेव्हां कित्येक किल्ले पूर्वीपासून मोंगलाचे होते तेहि किल्ले शिवानीं आपले हातीं आणोन पुन्हां नवीन बळ धरून प्रबळ जाहाला. प्रथम कापसाचा मोंगलांचे मित्रतेनें दोरा वोलिला होता तो दोरा उलगडून त्या दोऱ्याचा पुन्हां कापूस केला, म्हणजे शिवानी मोंगलासी सख्य केलें होतें असें असतां तें सख्य बिघडून पुन्हां शिवा मोंगलासी बदलला.

## ५०. आली आदिलशाहा पादशाहाचे उत्तम लक्षण. थोंडेसें वर्णन प्रकर्ण :

आली आदिलशाहा पादशाहा बहुत इनसाफ करणारा, रयतेचें पालन करणारा, शिपाई मंडळाचा सांभाळ करणारा, विद्वान व गुणी जनांची योग्यता जाणणारा व उत्तम दैववान होता. ईश्वराची कृपा व साह्य निरंतर आदिलशाहाकडे होतें. या योगानें शत्रूचें व दौलतीचें अकल्याण इच्छिणारेयांचे पारपत्य करून निरंतर यशस्वी होता. महा बलवान शत्रु राजा जयसिंग हा हिंदुस्थान दिल्ली येथील बहुत फौज घेऊन दक्षण देश हस्तगत करण्याचे मोठे इराद्यानें आदिलशाहावर चालून आला. शेवटीं आदिलशाहाचे दैवाचे उत्कर्षाचे बळानें लढाईतून बहुत नुकसान पावोन अत्यंत खराबीनें फार घाबरून अति खिन्नतेनें व बहुत वाईटपणानें मनोरथ

३१. शके १५८८ श्रावण वद्य द्वादसी (१७ आगष्ट १६६६) अगरियांतून पेटारि-यांत बैसोन पळाले. यावरी राजश्री संभाजी राजे सहवर्तमान मार्गेसीर्ष शुध पंचमीस (२० नवंबर १६६६) राजगडास आले.–जेधेश, पृ. २३–२४.

'This artful cheat (Shivaji) feigning sickness fled with his son on Sunday, the 19th August 1666/27 Safar 1077 A. H.'–MiA, p. 37. – The difference is due to the local people giving date of their detection, i. e. next day after evening.

पूर्ण न होतां परत गेला. शूरत्व, पराक्रम व धर्म करणें वगैरे उत्तम लक्षणें मनुष्यांत जितकीं असावीत म्हणोन वर्णिलें आहे तितकीं संपूर्ण उत्तम लक्षणें उत्तम दैववान आली आदिलशाहा पादशाहाचे अंगीं होतीं. आली आदिलशाहाची प्रकृत फार रंगीन, मिजाज बहुत व जोखीव होती, म्हणजे खाणेंपिणें वगैरे जीं कामें करणें तीं नेम बांधून त्या नेमाप्रमाणेंच चालत होती. जेव्हां संतोषांत येऊन आली आदिलशाहाचे मनांत कांहीं कविता वगैरे करणेंचे येत होतें तेव्हां फार रंगीन कविता व त्या कवितेंत फार गोड मजकूर बांधोन कविता करित होता. प्रति शब्दांत चमत्कारिक अर्थ करणारास आदिलशाहाचे रंगदार कचेरींत फारच योग्यता होती. आली आदिलशाहाचे कारकीर्दींत पारसी भाषेनें भाषण करणारे फार नादार लोक बहुत जमले होते. परंतु आली आदिलशाहा पादशाहाची दक्षणी भाषेवर पूर्ण आवडी होती. यास्तव आरबी वाक्याचा अर्थ : "राजा ज्या मार्गानें चालतो त्याच मार्गानें सर्व मनुष्यें चालतात." या वाक्याप्रमाणें आली आदिलशाहा पादशाहाची आवडी हिंदुस्थानी भाषणावर फार होती यामुळें हिंदुस्थानी भाषणानें भाषण करित होते. हिंदुस्थानी भाषण करणारे कवी बहुत विजापुरांत जमले. घरोघर कविता करणें व चमत्कारिक भाषणें करणेंचा कारखाना सर्वांनें चालू केला. त्या मंडळापैकीं एक मिया नसरती म्हणोन कवि आहे. या मिया नसरती याणी आपले यशस्वी प्रकृतीचे व दैवबलाचे व बुद्धिमानपणाचे योगानें जिव्हा तल्लक्षण तरवार उपसून शब्दपांडित्य करण्याचा मुलुक घेऊन फत्ते करून कविता करणारे तल्लक्षण मुलकाचा धणी झाला, म्हणजे मिया नसरती याणी कविता करून शब्द पांडित्य करणेंत योग्यता पावोन सर्व कवींत श्रेष्ट जाला. त्याची कविता व त्याचे कवितेंतील अर्थ व शब्दरचना सर्वांस पसंत येऊन त्या समयांतील कविता करणारे जितके कवी होते तितके सर्व कवीनें मिया नसरतीच्या कविता मान्य केल्या आहेत. मिया नसरती याणी दोन ग्रंथ केले आहेत. एक 'गुलपने ईष्क' म्हणोन ग्रंथ केला आहे. त्या ग्रंथांत मनोहर कुंवर व मदनमालतीचा विषयभाव वर्णिला आहे. दुसरा ग्रंथ 'आलीनामा' म्हणोन केला आहे. त्या ग्रंथात आली आदिलशाहा पादशाहाचे कारकीर्दींत जें जें प्रकर्ण झाले तें तारिखवार वर्णिलें आहे. यद्यपि त्यासमईं भाषा बोलण्याचा पाट व चाल हल्लीचे समयांतील थटेबाज लोकांपुढें अयोग्य व वर्म धर - चयाजोगी म्हणजे दुषण ठेवावयासारिखी ती भाषा हलकी दिसत होती, परंतु त्या पूर्वीचे कविता करणारानें अशा उतम प्रकारानें शब्दरचना केली आहे व त्या कवितेंत असा चमत्कारिक अर्थ भरला आहे कीं, पूर्ण अकलवान व कवितेची खुबी जाणणार याणी बाह्यातकाराचे वरील अर्थावर नजर ठेवितां कवितेचे आंतील अर्थाचें मनन करून त्याची कविता मान्य केली आहे. त्याणी त्या कवीची बहुतच तारिफ केली आहे. मिया नसरतीची हिंदुस्थानी कवितेची योग्यता खाकानी म्हणोन मोठा कवि

फार अकलवान झाला त्या खाकानीचे बराबर धरिली आहे. आरबी वाक्याचा अर्थ : "ज्याणी खरा इनसाफ केला त्यावर ईश्वराची कृपा असो." हें वाक्य या ठिकाणीं लिहावयाचें कारण हें आहे कीं, निर्मत्सरपणानें सर्व कवींनी मिया नसरतीची कविता मान्य केली हे कवितेंतील योग्यता जाणोन खरा इनसाफ केला. यास्तव त्यावर ईश्वराची कृपा असो. कित्येक इनसाफ न जाणणारे, कपटी, मूर्ख व दुसऱ्याच्या चुका धरण्यास टपणारे लोक या समयांत आहेत. जे सर्वदा मूर्खपणाचे अकुंचित जाग्याचे कैदखान्यांत कैद जाहाले आहेत, म्हणजे जे केवळ मूर्ख आहेत त्याणी मिया नसरती याचे कवितेस दूषण ठेवणेंकरितां वर्में व चुक्या काढण्याविषयीं सिध्द होऊन मिया नसरतीची कविता मान्य केली नाहीं. मियां नसरती याणी या पुऱ्या द्वेषी पुरुषाचा बेइनसाफपणा व दुसऱ्याचे गुणांचा लोप करणें प्रकर्ण वर्णिलें आहे. या मंडळीनें ज्या ज्या ठिकाणीं कवितेस दूषणें ठेविलीं त्या त्या प्रकर्णी मिया नसरती याणी उत्तरहि जेथें द्यावयाचें तेथें दिल्हें आहे.

५१. मिया नसरती यांणी उर्दु भाषेंत कविता केल्या आहेत त्या :

कविता : खरीदारको खूब सौदों सो काम :
न दुकानका देखना सक्फोवाम् : १ :

अर्थ : जो मनुष्य जो पदार्थ विकत घ्यावयास आला त्याजला आपला सौदा विकत घेण्यासी कारण. वाण्याचे दुकान कसें आहे व दुकानाचा कडीपाट कसा आहे व वाण्याचें दुकानाची माडी कशी आहे हें पहाण्याचें कारण नाहीं. ॥ १ ॥

कविता : मजामिन् सोज्या बज्या बाब्र बोल :
दिखाया सकतफैज काहक् कि खोल : २ :

अर्थ : जागोजाग जें वर्णन करणें त्या वर्णनांत उत्तम प्रकारचा अर्थ चमत्कार कवितेंत भरून वर्णन कर. ईश्वराचे कृपेची सवालें शक्ति तुजला दाखविली. ॥ २ ॥

कविता : यक यक फन् मे कैब हरके करके छंद :
खबीसां केजि बांकोके ताहुबंद : ३ :

अर्थ : एक एक विद्येंत कित्येक तऱ्हेचे छंद वर्णन करून, कपटी पुरुषाच्या जिव्हा बांधून टाकितो ॥ ३ ॥

कविता : कताहु सुखन् सुख् तेसरबें गुमान :
केषो षाहनामा दकनका है जान् : ४ :

अर्थ : बहुत विस्तार न करितां अल्प विस्तारानें निःसंशयपणें वर्णन करितो. कारण कीं, हा शाहानामा दक्षणचा जीव आहे ॥ ४ ॥

कविता : हकीकत मे ज्यो होवें कुतः नजर :
जबानपर रखे अय बुसट सब हुनर : ५ :

अर्थ : सत्य विचार पहातां जो पुरुष मुळचाच कपटी व दुसऱ्याचे चुकीवर नजर ठेवून बसणारा असेल, तो सर्व उत्तम गुणांचा परित्याग करून मुखानें दुर्गुणच वर्णन करितो ॥ ५ ॥

कविता : केहरयक जबान हजरते गैबदान् :
सिकाया सब् यादसे सों निहान् : ६ :

अर्थ : कारण कीं, ईश्वरानें खुद आपले जीव्हेनीं हरएक गुप्त भेद होते ते आदम पैगंबरास सर्व शिकविले ॥ ६ ॥

कविता : हयेतिस्थे जो नस्ल आदम के अस्ल :
कलामान उस्के हुये फस्ल फस्ल : ७ :

अर्थ : सर्व मनुष्याची आदम पैगंबरापासून उत्पत्ती आहे. यास्तव जो आदम पैगंबरापासून उत्पन्न जालेला मनुष्य आहे याजवर आदम पैगंबराचे बोलण्याचीं निराळीं प्रकर्णें झालीं आहेत. ॥ ७ ॥ म्हणजे सर्वांस आदम पैगंबर याणी शिकविलें आहे.

कविता : इनो मे ते ज्योपि अरके वोस्ताद् :
रह्या इस जबान् में वही पिअरयाद् : ८ :

अर्थ : त्या मनुष्यांत जे पुरुष कविता करण्यांत वस्ताद होते त्याच्या कविता जिव्हे-वर पाठ राहिल्या ॥ ८ ॥

कविता : सुख न बिन जाकतके नोद खखोल :
के खुषवाससों कद्रपातो है फुल : ९ :

अर्थ : मुखांतून जे शब्द काढावयाचे ते ज्या शब्दांत कांहींच अर्थ चमत्कार नाहीं असे जे विशोभित शब्द असतील ते मुखांत काढूं नको. कारण कीं, ज्या पुष्पांत कांहीं

सुगंध नाहीं त्या पुष्पास कोणीच विचारीत नाहीं. सुवासानें पुष्पास योग्यता येती ॥९॥ तसें ज्या शब्दास उत्तमपणा आहे त्या शब्दास योग्यता आहे

कविता : न कहतांहुं मैं बेवकूफोंकि बात :
न परकमहो--नाले तों हासद नेहात : १० :

अर्थ : मी मूर्खांची गोष्ट सांगत नाहीं. मत्सर वागविणारे पुरुषानें माझी कविता हातीं धारिलीं नाहीं तर मलाहि त्या पुरुषाची गरज नाहीं ॥ १० ॥

कविता : वली ज्यो सुखनदानेहे साहेब तमीज :
केरीज इसहुनर कों रखेनित अजीज : ११ :

अर्थ : परंतु जो शब्दाची योग्यता जाणणार अकलवान आहे, तो या कवितेची योग्यता जाणोन या गुणावर नित्य बहुत प्रीती ठेवितो ॥ ११ ॥

५२. मिया नसरती याणीं दोन ग्रंथाशिवाय आणखी अति उत्तम कशिद्याचे कवितेचा व गजलाचे ग्रंथ व त्याशिवायहि कित्येक कविता व नव्या नव्या अर्थाच्या व रंगीन मजकुरानें भरलेल्या आहेत त्या प्रसिद्ध आहेत व या कविता ईश्वराचे स्तव करण्यांत योजिल्या आहेत :

कविता : न जोमें आरिफ नजरबाजको :
दिसें हरतरफ तेरे कुद्रत कामुं : १२ :

अर्थ : ब्रह्मज्ञान जाणणारे पुरुषाचे दृष्टींत, चहूंकडे तुझे सामर्थ्याचें रुप दिसतें ॥१२॥

कविता : सकत तुंझ हैदर या कोमाटीमें दाब :
पवन परबनाना गगनकहुबाब : १३ :

अर्थ : ईश्वरा तुजला समुद्र मातींत दाबण्याची शक्ती आहे. वायुवर आकाशाचा बुडबुडा धरण्याची तुझी शक्ती आहे ॥ १३ ॥

कविता : सवोंका समझथक्कर ह्या है यहां :
केयक बुडबुडेंमें बसाया जहान् : १४ :

अर्थ : येथें सर्वांचें ज्ञान थकित होऊन राहिलें आहे. कारण कीं, एके बुडबुड्यांत सर्व जम बसविलें आहे ॥ १४ ॥

५३. मीया नसरती याणी पैगंबराचे तारिफेविषयीं वर्णन केलें आहे. त्या कविता :

कविता : दिखत मुख पोहजरतको अठ आवोताब :
लग्या डुबने चष्मये आफताब ! : १५ :

अर्थ : हजरत पैगंबराचे मुखाची शोभा व तेज अवलोकन करितांच सूर्याचें तेज कमी होऊं लागलें ।। १५ ।।

कविता : मसि हा के घरका चिराग उस पछान :
फेर उस्का उसीपर रख्या बादवान् : १६ :

अर्थ : हजरत पैगंबर मसीहा याचे घरचा तो दीप आहे असे नाव, पुन्हां त्याचा त्याजपासीच ठेविला ।। १६ ।।

५४. एके दिवसीं पादशाहा खासे महालांत बसले होते व तेथें हौदांतील कारंजांतून पाणी उडत होतें तें पाणी मोत्याचे झाडाप्रमाणें उभे राहून त्या पाण्यांतून खाली बुंद पडत होते. ते मोती पडत आहेत असें दिसत होते. तें पाहून त्या समई पादशाहाचे मुखांतून अर्धी बैत निघाली :

कविता : उडता है यौं फवारा पानीभिंवघ्यांनीं चल है,

अर्थ : हें कारज्यांतून पाणी उडत आहे हें कांय चमत्कारिक दिसतें व पाणीहि किती निर्मळ आहे.

५५. आली आदिलशाहानीं इतकें म्हटल्यानंतर मुल्ला नसरती याणी तेच वेळेस पादशाहाचे प्रश्नाचे उत्तरावर अर्धी बैत त्याच छंदाची व त्याच यमकाची मनांत नवी करून म्हणोन उत्तर दिल्हे. ती ही अर्धी बैत :

कविता : तुझ षाहपर उडाने मोंत्योंका मोरचल है : १७ :

अर्थ : तूं पादशाहा आहेस याजकरितां तुजवर वारण्यास्तव हे मोत्याचे मोर्चेल उभे आहेत ।। १७ ।।

५६. मिया नसरती याणी आली आदिलशाहाचे घोड्याचे जलदी विषयींचें तारिफीचें वर्णन करून कविता केली आहे. ती कविता :

कविता : नरहेर खष कान वषसंगमें बहाल् :
अगर मनमें च्याबुकका गुजरे खियाल् : १८ :

अर्थ : आली आदिलशाहाचा घोडा जलद आहे कीं, त्या घोड्यास चाबुक मारावा असा जर करतां मनांत आल्यास तो स्वाराचे मनांतील भाव वोळखून तो घोडा भूमीवर पाऊल उठलें नाहीं तों जलदी निघोन जात आहे ॥ १८ ॥

कविता : वसल् हो कहे सों न हुये लग् अलिफ् :
करेतयजमीन् ताम् ज्यानेमें झाल् : १९ :

अर्थ : घोड्यास हा म्हणण्यास पारसी कायद्यानें हे व आलिफ हीं दोन अक्षरें एके ठिकाणीं लागून आली म्हणजे हा असा उच्चार होतो व हे या अक्षरास लागून जे अलिफ असें अक्षर आलें आहे त्यास अलीफे वसली असें म्हणतात त्या दोन अक्षरांपैकीं हे चा उच्चार जाला व त्यास जुलेले वसलीचे अलीफाचा उच्चार जाला नाहीं तोंच म्हणजे त्या घोड्यावर बसलेले स्वारांनीं घोड्यास हां असे पुरते म्हटलें नाहीं तोंच, एक उडी मारण्यांत संपूर्ण पृथ्वीचे आक्रमण करितो, म्हणजे सर्व पृथ्वीस ओलांडितो ॥ १९ ॥ यांतील तात्पर्य हें आहे कीं, हा घोडा फार जलद आहे.

५७. मिया नसरती याणी आली आदिलशाहाचे तरवारीचे व घोड्याचे तारिफेविषयीं वर्णन करून कविता केली आहे. ती कविता :

कविता : पवन् कि ज्या लग पोंहच है वालग पोंहच रह्या है तुरंग तेरा :
सुरजकि ज्या लग झलक है वाल गमल कर ह्या फिरंग तेरा : २० :

अर्थ : वायुची गती जेथपर्यंत आहे तेथपर्यंत तुझा घोडा जाऊन पोंहचला आहे. सूर्याचें तेज जेथपर्यंत आहे तेथपर्यंत तुझे तरवारीचे तेज पोहचलें आहे ॥ २० ॥

५८. येथून उर्दू भाषेंतील कविता सरल्या :

त्या कारकिर्दीतील हिंदुस्थानी कविता करणाऱ्यांपैकीं एक मियां हषमी म्हणून कवि आहे. त्या मिया हषमी याणी हजरत पीर दस्तगीर शाहा हषम

याचे प्रसादेंकरून मिष्ट भाषण करणारी जिव्हा उघडून सर्व कवींवर चढ करून युसफ निलीखा या उभयता आपक मापुकीचे वर्णनाचा ग्रंथ या कारकिर्दीतील चालीचे हिंदुस्थानी भाषेनी कविता करून केला आहे. अति उतम अर्थ चमत्काराचे गजलाचा ग्रंथ केला आहे. तो ग्रंथ सर्व विद्वान लोकांस पसंत आला आहे. त्या ग्रंथांतील कवितेंत बहुत चमत्कारिक चाल व अति उत्तम प्रकारची तन्हा वर्णिली आहे. अशा प्रकारें ग्रंथ केला आहे कीं, त्या ग्रंथावर कोणीच चढलेला नाहीं. प्रत्यक्ष मिया हषमी हा कवि जन्मांध होता, म्हणजे मातुश्रीचे उदरांतून जन्मास आला तेव्हांपासूनच आंधळा होता. परंतु अकलेचे नेत्रांनीं डोळस होता, म्हणजे आंधळा असोन अकल-वान होता. सिद्दी मसऊदखान हा मिया हषमी यासी फार मित्रता ठेवित होता. एके दिवशीं महालांत आपले स्त्रियांसहित बसला होता. त्यासमई सिद्दी मसऊदखान याणी मिया हषमी याजला महालांत बोलाविलें. तेव्हां सिद्दी मसऊदखान याचे स्त्रियांनें मिया हषमी हा जन्मांध आहे, याजला कांहींच दिसत नाहीं, आंधळा खोलींत आला म्हणून काय चिंता आहे असें जाणोन त्या स्त्रिया जेथें बसल्या होत्या तेथेंच बसल्या. मियां हषमी हा जेव्हां महालांत आला आणि मिया हषमी याणे महालांत पाय ठेविला तोंच कवितेस प्रारंभ केला. त्या कवितेचे गजलेंत सिद्दी मस-ऊदखान याच्या स्त्रिया त्या महालांत बसल्या होत्या व त्या स्त्रीयांनें ज्या रंगाचे वस्त्र व अलंकार भूषणें वगैरे अंगावर जें धारण केलें होतें त्याप्रमाणें त्या स्त्रीयांचे वस्त्र अलंकार, भुषणें वगैरे आंगावर जें धारण केलें होतें त्याप्रमाणें त्या स्त्रियांचे वस्त्र अलंकार व रुप व चाल, रंग पोषाख व तन्हेतन्हेचे दागिने जवाहीर वगैरे शरीरावर होते ते जसे होते तसे तिळमात्र न चुकूं देत सर्व यथास्थित वर्णन केलें. असें वर्णन केलें कीं, जसें प्रत्यक्ष पाहून वर्णन करित आहे. असें वर्णन केलें. सिद्दी मसऊदखान याचे स्त्रियांनीं पाहिलें कीं, हा आंधळा असोन आम्हां सर्व स्त्रीयांचा रंग, रुप, चाल, पोषाख, जवाहीर वगैरे जसें आहे तसें वर्णन करित आहे यावरून असें वाटतें कीं हा खास आंधळा नसेल. असें जाणोन त्या स्त्रीया एकाएकीं उठोन पळून गेल्या. अति लज्जायमान होऊन पड-द्यांत लपल्या. या लिहिण्यांतील तात्पर्य हें आहे कीं, मिया हाषमी हा आंधळा असोन इतका बुद्धिमान आहे. या कारकीर्दीतील कविता करणारे कवींपैकीं एक कवि मिरजा मरसियाखान म्हणोन आहे. या मिरजा मरसीयाखान याणी आपली जिव्हा ईश्वराचा स्तव करण्यांत, पैगंबराची तारिफ करण्यांत, पवित्र इमाम याचे वर्णन करण्यांत व करबला येथें कत्तल जाहालेले हसन हुसेन यांचे वर्णनांच्या मरशा करण्यांत खर्च करून वर्णन केलें. कदापि आपली जिव्हा या पृथ्वींतील राहाणारे पादशाहा किंवा फकीर वगैरे मनुष्यांचे तारिफ करण्यांत झिरविली नाहीं. मिरजा मरसियाखान याचे मर्शे त्या कारकिर्दीत सर्वांस मान्य व पृथ्वींतील

सर्व शहरांत प्रसिद्ध होते. आली आदिलशाहा याणी मिरजा मरसीयाखान याला हुजूर बोलाविलें. त्याजला बहुत इनाम व बक्षीस दिल्हें. कांहीं पादशाहाचें वर्णन कर म्हणोन बहुत आग्रह केला. तेव्हां मिरजा मरसियाखान बोलला कीं, मी आपली जिव्हा ईश्वराचे व पैगंबराचे स्तव करण्याचें वर्णनांत अर्पण केली आहे. आतां माझी जिव्हा माझे हुकुमांत राहिली नाहीं. असें ऐकून पुन्हां पादशाहानीं येविषयीं फारच आग्रह केला. मिरजा मरसीयाखान यांणी निरोपाय होऊन एक दोन मर्शे पादशाहानीं करावेत ते पादशाहावरचे आपण करून मर्शाचे शेवटीं आपले नांव घालावयाचें ठिकाणीं आली आदिलशाहा बादशाहाचें नांव घातलें. त्या मरशांत आली आदिलशाहा जसा होता तसे त्याचें वर्णन करून द्वंद्वार्थी, म्हणजे दोन अर्थ व्हावयाजोगे, मर्शे केले. मिरजा मरसीयाखान याचा स्वभाव असा होता कीं, कोणी माणूस मेलें म्हणजे तेच वेळेस दुःखाचे समई याचें वर्णनाचा मरशा करून कविता करित होता. शोकाचें वर्णन त्या दुःखित मनुष्याप्रमाणेंच करून त्याचे समागमेंहि शोक करित होता. एके रात्रीं मर्शेखानीचे कचेरीत सर्व लोक जमले होते. त्या कचेरींत अशा प्रकारचेच पढत होता. तेव्हां त्या कचेरींतील लोक त्या मर्शा पढणें ऐकून अत्यंत शोक करित होते. इतक्यामध्यें हमिस्त्रा म्हणजे अर्धी बैंत त्याचे मुखांतून निघाली. " दिलाह्यांका आमरार कर रखो सीनेत बलाम्याने : " याचा अर्थ " दाळींबासारिखें हृदयाचे तबकांत करून ठेवा म्हणजे शोक आवरा " असें म्हणतांच सर्वांचा शोक आवरला गेला. दुसरा मिस्त्रा कदापि सुचेनासा झाला. तेव्हां मिर्जा याजला येणेंकरून फारच वाईट वाटलें. असें वाईट वाटत होतें तोंच मिर्जा याजला किंचित पेंग येऊन डुलकी आली. त्या झोंपेंत पहात आहे कीं, हजरत रसुलिल्लाह आलहे वसल्लम हे येऊन आज्ञा करिताहेत कीं, असा मसरा म्हण म्हणून आज्ञा केली. तो मिस्त्रा : नबी आवेंगे महपरको यांतोहे फाकर लिज्या नाहे. " याचा अर्थ : " अंतकाळी प्रळयसमयीं पैगंबर येतील तेव्हां हा उत्तम पदार्थ घेऊन नजर करावयास जाणें आहे. " असा मिस्त्रा हजरत पैगंबर याणीं स्वप्नांत सूचविला. तेव्हां मिर्जा किंचित हुशार होऊन तो मिस्त्रा पढोन मरशा शेवटास नेला. आणखी एक या भागाची खूण आहे. मिर्जा म्हणोन एक तो कवि आहे कीं त्याचा मृत्यु मोहरमचे ताबुताचे दहा तारिखेसच झाला. एक गोष्ट आहे कीं, मोहरमचे दहा तारखांतील खत्तलचे रात्रीं मिर्जा याणी सारे रात्र मर्शेखानींत घालवून प्रातःकाळीं शौचास व हातपाय धुण्याकरतां बाहेर गेला. तेव्हां एक शत्रु जुलूम करणारा व्यर्थ मिर्जाचे घातावर उठोन मिर्जास मारण्याकरितां संधी पाहात होता. त्या शत्रुनीं ही संधी मिर्जास जीवें मारण्यास बरी आहे असें जाणोन तेंच वेळेस प्राणघात करणारे पेषकबज घेऊन मिर्जाचे पोटांत मारून तात्काळ जिवें मारिलें. प्रातःकाळीं दक्षिण देशांतील रहाणारे लोकांचे चालीप्रमाणें ताबूत व पंजे

घरोघराहून बाहेर निघून पाण्यावर नेत आहेत. यासमयीं आली आदिलशाहा याणीं शहरांत सर्वांस हुकूम सांगोन पाठविला कीं, सर्व ताबूत व शहरांतील सर्व पंजे याच दरवाज्यानीं, कीं ज्या दरवाज्याचें नांव फत्तेदरवाजा असें आहे त्या फत्तेदरवाजानींच आणावेत. अशी आज्ञा केली तेव्हां पादशाहाचे आज्ञेप्रमाणें शहरांतील मंडळीचे समुदायचे समुदाय पंजे व ताबूत घेऊन त्या फत्तेदरवाज्यानींच गेले. सर्व ताबूत निघोन गेल्यानंतर एका ताबुताचे पाठीमागून मिर्जाचे प्रेत त्या ताबुताचे पाठीमागून चालविले. मिर्जाचे शागीर्द मंडळ मिर्जाचे प्रेतापुढें मर्शे म्हणीत म्हणीत जात होते. मिर्जाचे प्रेतासमागमें जी गर्दी होती त्या समुदायास अंत नाहीं. इतकी मंडळी होती. मिर्जाचे प्रेत हजरत शाहा मुर्तजा कादरी याचे रवनेमिनोऱ्याखालीं दफन केलें. याशिवाय बहुत हिंदुस्थानी कविता करणारे दुसरे कित्येक होते. असे होते कीं, त्या कारकीर्दीत त्यांच्या तेजस्वी कविता प्रसिद्ध होत व त्या कवींचे कसिदे, म्हणजे कविता, फार तेजस्वी व त्याखेरिज अति उत्तम व श्रेष्ठ कविता प्रसिद्ध जाहाल्या व मान्य झाल्या. शाहा अबूल मआनी व मुल्ला अबदुल रिजाहिया व आवीस व अबदूल कादर नवरसी व अबदूल लतीफ व अबदूल नबी हे महान महान कवी आहेत. याशिवायहि कित्येक कविता करणारे कवी इराण देशचे व अलम देश येथीलहि होते.

## ५९. आली आदिलशाहा याणी मरण पावल्याचें कारण प्रकर्ण वर्णन :

आली आदिलशाहा याची प्रकृत विषय भोगणें व स्त्रियांचे विलास सुखांत सर्वदा वेळ चालविणेंत पूर्ण निमग्न होती. शृंगार विषय फारच आवडत होते. विषय भोगणेंविषई बहुत यत्न करून भोगित होता. एके दिवशीं स्त्रीसंग फार वेळ होणें-करितां उष्ण औषध व स्तंभन, म्हणजे वीर्य बंद होण्याचें औषध खावून, रात्रीं बहुतच विषयविलास केला. विषय भोगून औषधाचा फारच दाह झाला. तेव्हां वरचेवर थंड पाणी प्याला होता. मोठे प्रातःकाळीं तारिख ४ माहे रबिलावल (२० जून १६७२ ?) रोजीं मुजफरखान बेदनूर येथील लढाई करून परत आला होता. त्याजला सामोरें जाण्याकरितां खदीच्यापुरापर्यंत पादशाहाची स्वारी जाऊन वाटेंत फार हवा लागोन पादशाहाचे अंग बहुत सुस्त होऊन पादशाहाची स्वारी फार जलद परत निघाली. जेव्हां स्वारी वाड्यांत दाखल जाहाली तेव्हां त्या दिवसाचें सहावें तासीं आली आदिलशाहास अर्धांग वायू होऊन पादशाहाचे अर्धें अंग गेले. त्या दिवशीं सगळा दिवस व एक रात्र पादशाहा निखालस बेशुद्ध होऊन राहिले. एक दिवस व एक रात्र बेशुद्धीरणांत गेल्यानंतर

दुसरे दिवसीं पादशाहा किंचित शुद्धिवर आले. अर्धें अंग चलनवलणांतून निखालस गेलें होतें. अबदुल महंमद व खवासखान यांजला हें वर्तमान कळतांच हे उभयतांच आपआपले घरांतून पळत येऊन पादशाहास पाहिलें. अति चिंताग्रस्त व खिन्न होऊन घरास परत गेले. मुजफरखान, मिरजा युसफ, आली मुहीबतखान, धर्माजी पंडीत, दबीर हिंदु पादशाहापासी सर्वकाळ फार सन्नीध रहाणारा होता व पादशाहाचे पूर्ण एकांतातील मित्र झाला होता, तो धर्माजी पंडीत असें हे पादशाहाचे सेवेंत तत्पर राहिले. दरवाज्याची थोरली दारें बंद करून येण्याजाण्याकरितां दरवाज्याच्या दिंड्या मोकळ्या ठेविल्या. पादशाहास औषधोपाय करण्यांत (येऊं) लागले. हकीम शमसुद्दीनखान व दुसरेहि कित्येक वैद्य औषधोपाय करण्यांत निमग्न होऊन पादशाहास नीट करण्याबदल बहुतच यत्न करते झाले. पादशाहा तीनचार दिवसा-नंतर पहिले सारिखे शुद्धीवर आले. यद्यपि आरोग्य झालें नव्हतें. रागहि दिवसेंदिवस अधिक वाढत होता. तत्रापि राज्यकारभार कामें काजें समजून घेऊन जेथील तेथें हुकूम बराबर देऊन राजधानीचें काम चालवित होते. अबदूल महंमद व खवासखान हे उभयतां येत जात होते. दूसरे हुजरे लोक व खिदमतदार वगैरे चाकरीवरील माणसें पादशाहा ज्यांस बोलावितील त्यांजला पादशाहापाशीं येण्यास राबता होत होता. पूर्ववत दियानतराव व मिया अबदूल महंमद हे पादशाहापाशीं येत जात होते. राजधानीचा कारभार वहिवाटीप्रमाणें नित्य चाल्ला होता. अबदूल महंमद हा फार प्रबळ होता. यामुळें कोणासहि कां व कशाला असें म्हणण्याचें सामर्थ्य नव्हतें. पादशाहा जीवंत होते तोंपर्यंत पादशाहाचे एकंदर कारभारी मंडळींत किंचितहि फुटाफुट झाली नव्हती. दियानतराव हा अंतर्यामेंकरून व बाह्यात्कारेंकरून अबदूल महंमद याजशीं पूर्ण मित्रतेनें व एक विचारानें होता. मिरजा युसफखान हा खवासखानाचा पक्षपात करित होता. धर्माजी पंडित हा अबदूल महंमद व दियानराव यांसी वांकडेपणा वगैरे भाव ठेवित होता. धर्माजी पंडीत यांणी आपली सुटका होणेंविषयीं मुजफरखानापाशीं बहुत यत्न करून रदबदली करित होता. आली आदिलशाहा पादशाहा याणी जाणिलें होतें कीं, खवास-खान व मुजफरखान या उभयतांचे मनांत राजधानीचा कारभार नीट सुरक्षितपणें करण्याचा नाहीं. अबदुल महंमद याणी बारा वर्षेंपर्यंत राजधानीचा कारभार करून पाद-शाही राजधानींतील एकंदर लहानमोठे कामांतील माहितगार जाहाला होता. सिवाजी भोसले व अबदूल करीम बहलूलखान व दुसरे कित्येक कारभारी मंडळ हे अबदुल महंमद याचे ताबेदारींत व हुकुमांत होते. या सर्व मंडळीनें या कामावर नजर ठेऊन ईच्छित होते कीं, श्रेष्ठ योग्यतेवान शाहाजादा याजला अबदुल महंमद याचे हवालीं करून राजधानीचें सर्व कामाची मुख्त्यारी अबदुल महंमद याजकडे ठेवावी. पादशाहा जिवंत आहेत तोंच शाहाजाद्यास तक्तावर बसवावें असें इच्छित होते. परंतु

अबदुल महंमद यांणी मनांत आणिलें होतें कीं, आदिलशाहाचे राजधानींत कोणी कारभारी आरंभी पादशाहास नवीन तक्तावर बसावेतो आणि या राजधानीचीं कामें चालावेतो तो कारभारी जलद थोडकेच दिवसांत मरण पावतो. अबदुल महंमद याजला तूं या कामांत पडूं नकोस व नवीन पादशाहास तूं तक्तावर बसवूं नको म्हणोन अबदुल महंमद याची मातुश्री मनाई करित होती. येविषयीं अबदुल महंमद याचे मातुश्रीनें अबदुल महंमद याजला शफता घातल्या होत्या कीं, जर करितां तूं या कामांत पडशील तर मी तुजला आपले दुधाचा हक बक्षीस करणार नाहीं. म्हणजे मुसलमान लोकांत चाल आहे कीं मातुश्रीनें मुलास लहानपणा-पासून आपले दूध पाजून वाढविलें तो उपकार मुलाकडून कदापि फिटावयाचा नाहीं याजकरितां मुलांनीं थोर जाहाल्यावर तो दुधाचा उपकार मातुश्रीस नमस्कार घालून माफ करून घ्यावा लागतो व मातुश्री मी आपले दूध तुजला बक्षीस दिल्हें असें म्हणती तेव्हां तें मूल तिचे उपकारांतून सुटलें असें आहे. या शास्त्रार्थाचे रीतीनें अबदुल महंमद याची मातुश्री त्याजला बोलिली कीं, तूं या कामांत पडशील तर तुजला मी आपले दुधाचा हक बक्षीस करणार नाहीं. असें बोलली. या दोन गोष्टीचे नडीमुळें म्हणजे एक पादशाहास तक्तावर बसवील तो कारभारी मरण पावतो ही एक नड व हें काम केलें असतां मातुश्री आपल्यास दूध बक्षिस करित नाहींत ही दुसरी नड, या दोनी नडीमुळें अबदुल महंमद मन घालित नव्हता. एक दिवशीं अली आदिलशाहा यांणीं अबदूल महंमद याजला आज्ञा केली कीं, मी या दुखण्यां-तून आरोग्य होईन अशी उमेद राहिली नाहीं. दिल्लीकडील मोंगल लोक संनिध्यच आहेत. सीवा भोसल्यासारिखा शत्रु संधी साधण्याकरितां टपून बसलाच आहे. मी मरण पावल्यानंतर कसा प्रकार होईल व काय संकट उभें राहील हें ईश्वरास माहीत. आतां त्या गोष्टींत बरें आहे कीं, माझे देखत तुम्ही शाहाजाद्यास तक्तावर बसवून राजधानीचें सर्व कामाची मुखत्यारी तुम्हीं आपले हातीं ठेवून राजधानीचें संरक्षण करा. असें केलें असतां माझे पाठीमागें युद्ध करण्याचें व तुम्हांसी शत्रुत्वानें वागण्याचें कोणासहि सामर्थ्य रहाणार नाहीं. अशी आज्ञा केली. परंतु अबदुल महंमद याणी होय होय म्हणून चालढकलीवर घालवून पादशाहाची आज्ञा कबूल केली नाहीं. दियानतराव व दौलतीचे कल्याण इच्छिणारे दुसरे कित्येक कारभारी मंडळीनें अबदुल महंमद याजला बहुत प्रकारें बोध केला कीं, पादशाहा इच्छित आहेत कीं, शाहाजादा तुमचे हवालीं करून आपण जिवंत आहे तों आपले देखत तुम्हांस राजधानीचे कारभारावर कायम करावें, असें पादशाहाचे मनांत आहे. याजकरितां तुम्ही कांहीं एक भय मनांत वागवूं नये. तुम्ही या कामांतून मन काढूं नये. नाहीं पेक्षा हें न केलें असतां प्रसंग विपरित उभा राहील. तुम्हांस कोणी कामावर राहूं देणार नाहींत. असें बोलले. परंतु अबदुल महंमद यांणी काहींच ऐकून घेतलें नाहीं. या बोलण्यानें

कारभारी मंडळास राजी झाला नाही. येणेंकरून पादशाहास फार चिंता प्राप्त जाहाली व मनांत बहुत वाईट वाटलें. परंतु पादशाहा दुखण्यानें फार जेर होऊन थकले होते. यामुळें येविषयींचा बंदोबस्त करूं शकले नाहींत. अब्दुल महंमद याचे दैवच फिरलें होतें. दौलत जाण्याची वेळ आली होती. यास्तव अशी पादशाहाची आज्ञा जाहाली असतां ती कबूल न करून गैररहा वागणूक करित होता. भलत्याच मसलती करित होता. या पादशाहानींच खुद जातीनेंच निश्चय ठरविला कीं, खवासखान याणी शाहाजाद्यास तक्तावर बसवून खवासखान याणी मुखत्यारीनें राजधानीचा कारभार चालवावा. खवासखान याणी शहादुर्गचा किला व कलबुर्ग्याचा किला व सकरदादचा किल्ला आपलेकडे ठेवून मोंगलांवर हल्ला करावा. अब्दुल करीम व बहलूलखान याजकडे मिरजेचा किल्ला होताच. आणखी पन्हाळ्याचा किल्ला या उभयतांचे हवाली करून त्या उभयतांस शिवाजीचें पारपत्यावर नेमावें. मुजफरखान याजला बेदनूरकडे रवाना करून तेथें नेमावें. या सर्वांनीं खवासखानाचे आज्ञेंत वागून खवासखान जी आज्ञा करितील त्याप्रमाणें सर्वांनीं वर्तणूक करावी. अशी आज्ञा केली तेव्हां खवासखान याणीं ही गोष्ट ईश्वराचे कृपादान असें समजोन पादशाहाची आज्ञा कबूल केली. सदरहू मंडळीनें परस्परें एकमेकांत खवासखान याचे सांगण्याप्रमाणें बहूत पक्के निश्चय ठरविले, कीं पादशाहा वारल्यानंतर दुसरे दिवशीं हा ठरविलेला करार सिद्धीस न्यावा असे ठरविलें. पादशाहाचें दुखणें वाढत वाढत फारच वाढलें. पादशाहाचे शरीरांतील चलनवलन म्हणजे हालणें चालणें, वगैरेची शक्ती निखालस राहिली. औषध उपाय वगैरे कोणताच उपाय चालेनासा होऊन सर्व उपाय थकले. दियानराव याणी जाणिलें कीं, अब्दुल महंमद या कामांत निखालस मन घालत नाहीं. तेव्हां निरोपाय व निराश होऊन आपल्यास कोणीतरी आधार आश्रय पाहिजे याजकरितां दियानतराव याणीं खवासखान यासीं सख्य करून घेतलें. धर्माजी पंडित मुजफरखानासी मिळाला. त्याचे कामाचे मजबुतीविषयीं बहूत यत्न करित होता. परंतु अब्दुल महंमद व दियानतराव हे त्याचे सर्व यत्न मोडून टाकून मुजफरखानास बळ धरुं देत नव्हते. पादशाहाचे मनांत मजकूर भरून देऊन बेदनूर येथील ठरावाचा ऐवज वसूल करण्याचे निमित्त करून या बाहान्यानें मुजफरखानाचा हुजूरचा कारभार दूर करून मुजफरखानास बेदनुरास रवाना केलें. अशा समयांत पादशाहाचें दुखणें किंचित उलटलें. तेव्हां धर्माजी पंडीत याणीं पादशाहास स्मरण देऊन मुजफरखानास यादवाडाहून हुजूर बोलावून आणविलें. तेव्हां मुजफरखान याणी आपली फौज यादवाडांत ठेवून परत निघोन त्याच रात्रीं पादशाहापाशीं हुजूर दाखल होऊन पादशाहापाशीं सेवेंत राहिला. मुजफरखान याणी खवासखान बहुत मंडळीसुद्धां आंत येत होता त्याजला मनाई करून सांगितलें कीं, तुम्ही आपले समागमें मंडळी आणली आहे ती

बाहेर ठेवून तुम्हीं एकटें आंत यावें. अशी ताकीद केल्यामुळें खवासखान याजला फार वाईट वाटलें. खवासखान खिन्न झाला. मुजफरखान याणी मलिक मुजवर याजला अब्दुल महंमद यांजकडे पाठविलें. खवासखान हा चांगला माणुस नाहीं. खवासखान याणी वैरभाव धारण केला आहे असा गिल्ला सांगून पाठवून सदरहू मजकूर अबदुल महंमद याजला कळविला. तेव्हां अबदुल महंमद याणी मुजफरखानास निरोप सांगून पाठविला कीं, खवासखान हा मुख्य वजीर आहे व त्याचे हातीं सर्व हुकुमी काम आहे व खवासखानाचे बापानीं पादशाहाचे चाकरींत प्राण खर्च केला आहे. हली खवासखान जें इच्छिल तें करील. तुम्हीं व आम्हीं वजीर आहों. परंतु खवासखानाचे आज्ञेत व त्याचे ताबेदारींत राहून असूं. खवासखान जी आज्ञा करील त्याप्रमाणें वर्तणून केली पाहिजे. शेवटीं मुजफरखान याजला व त्याचे फौजेस यादवाड येथून काढिलें. मिरजा युसफखान हा पादशाहाची प्रकृत बिघडली त्या दिवसाचे आरंभापासून पादशाहाचे अंतकालपर्यंत क्षणमात्र देखिल पादशाहाचे चाकरींतून एकीकडे झाला नाहीं. चाकरींत अंतर केलें नाहीं. हरएक मार्गानें खवासखानासी मित्रता धारण करून खवासखानाचे कल्याणविषयीं यत्न करित होता. पादशाहाचे मरणाचे आधीं पंधरा दिवसांपूर्वीं पादशाहा बेशुध्द झाले तेसमई त्या सेवेंत मिरजा युसफखान हरएक कामें सावकाशपणें व बहुत शहाणपणानें खवासखानास विचारून खवासखान सांगतील त्याप्रमाणें करित होता. खवासखानाचे परवानगीखेरीज व त्याचे विचाराशिवाय कांहीं एक करित नव्हता. पादशाहाचा अंतकालचा समय येऊन पोहचला तेव्हां खवासखान याणीं मिरजा युसुफखान याचे सलेनें व त्याचे विचारानें पादशाही महालाचा बंदोबस्त व दरबारचा व कोटांचे आंतील बंदोबस्त केला. पाचवे तासीं रविवारीं तारिख १३ रोजीं माहे साबान सन १०८३ ( २४ नवंबर १६७२ ) रोजीं आली आदिलशाहा याणीं तक्तावर बसण्याचा परित्याग करून ताबुताचें तक्त स्विकारिले, म्हणजे पादशाहा मरण पावले. काजी नुरुल्लाह, शाहा ईब्राहीम, आली मुहीबखान, मिरजा मतुल्लाह, मलीक मसऊद, मलीक आलड दबीर व मीर अलिरजा वगैरे विद्वान पादशाहाचे प्रेतास स्नान घालण्यांत व कफन करण्यांत, म्हणजे प्रेतास वस्त्र पांघरूण घालण्यास, लागोन प्रेताची तयारी करून पादशाहा पेठेमध्यें आली आदिलशाहानीं खुद जातीनें गुंबुज म्हणजे गुमट बांधिला होता व त्या गुंबजाचें काम अर्धेच इमारत होणें राहिलें होतें त्या गुंबजांत तें आली आदिलशहाचे प्रेत दफन केलें, म्हणजे पुरलें. आली आदिलशाहाचे वय पस्तीस वर्षांचे होतें. आली आदिलशाहानीं सोळा वर्षे व सात महिने राज्य केलें. विद्वान लोकानीं आली आदिलशाहाचे मरणाचा मजकूर वर्णन करून त्या कवितेचे शेवटीं आली आदिलशाहाचे मरणाची तारिख बांधिली आहे. त्या पारसी बैतेचा अर्थ : " आली आदिलशाहा धर्मसंस्थापक व बहुत इन्साफ करणारा पादशाहा होता. त्यानीं या पृथ्वींतील पादशाही तक्ताचा परित्याग

करून स्वर्गाचे तक्तावर आरूढ झाला, म्हणजे बसला : १ : आली आदिलशाहाचे वियोगाचे अग्नीनें मुसलमान लोकांचे चित्त व जीव जळला. स्त्रियांचे व पुरुषांचे मुखांतील जिव्हा अग्नीचे ज्वालेप्रमाणें झाली : २ : आली आदिलशाहा यांणी स्वर्गांतील भूमि आपले वतनाची जागा केली, म्हणजे मरण पावला : बादष हैदिन आलीकर्द वतन दरजी जान : ३ : इतकी अक्षरें अबजदचे हिशेबानीं गणलीं असतां एक हजार त्र्यैयशीं ( १६७२ इ. स. ) सन निघतो. या समयांत आली आदिलशाहा मरण पावले.

## ६०. एकंदर तारिखवार झाडा :

आली आदिलशाहा याणी तक्तावर बसल्यावर पहिलेच सालीं हसनी महाल बांधिला. सन एक हजार अडसष्ट ( १६५७–५८ इ. स. ) सालीं मसीद बांधिली. एक हजार एकूणहात्तर ( १६५८–५९ इ. स. ) सालीं आली महाल बांधिला. याच सालीं मुल्ला अहंमद याचे यत्नानें चंदावरची फत्ते झाली. सन १०७१ ( १६६०–६१ इ. स. ) सालीं पनाळ्याचा किल्ला शिवा भोसला याचे हातून सोडऊन घेतला. याच सालीं, परांड्याचा किल्ला मोगलांचे हातीं गेला. याच सालीं बडे साहेबा ही पादशाहाची मातुश्री, यात्रेकरितां मक्केस गेली. सन एक हजार बहात्तर ( १६६१–६२ इ. स. ) सालीं रायचूरचा किल्ला व उदोनी व महंमदनूर, म्हणजे कैदनाले ( करनूल ? ) वगैरे सिद्दी जव्हार सलाबतखान याचा मोड होऊन सलाबतखान मरण पावल्यानंतर आपले मुलकाचे ताब्यांत पादशाही खासगीकडे आलें. याच सालीं आर्ष महाल बांधिला. सन एक हजार त्रेहातर ( १६६२–६३ इ. स. ) सालीं षाहापेट बांधिली. याच सालीं शाहाजादी पादशाहा बिबी जन्मास आली. याच सालीं पादशाहा मलनार येथील राजाचे पारपत्यावर निघाले. सन एक हजार चौरेऐंशी ( १६७३ इ. स. ) सालीं पादशाहा मल्नारची लढाई करून विजापुरास परत येते जाले. सन एक हजार पंचेहात्तर ( १६६४–६५ इ. स. ) सालीं हुसेन शाहाजादा जन्मास आला. याच सालीं अबदुल रहीम बहलूलखान मरण पावला. सन एक हजार एकूणहात्तर सालीं तारिख पंचविसावी रबिलाखर ( ९ जानेवारी १६५९ ) रोजीं शाहाजादा सिकंदर जन्मास आला. एक हजार ऐशीं ( १६६९–७० इ. स. ) सालीं एखलासखान मरण पावला. एक हजार एकेऐशीं ( १६७०–७१ इ. स. ) सालीं इबराहीमखान मरण पावला.

बुस्तान आठवें

# शिकंदर आदिलशाहा

१. सुलतान शिकंदर बिन आली आदिलशाहाचें वर्णन प्रकर्णी व आदिलशाही कारकीर्दीचा या शिकंदर पादशाहावरच शेवट होऊन आदिलशाही राजधानीचा शेवट होणें प्रकर्ण :

खवासखान याणीं अबदुल याचे करार ठरविल्याप्रमाणें शाहाजादा शिकंदर याजला पांचवे वर्ष लागले होते. (तेव्हां) शिकंदरास आली आदिलशाहा मरण पावले ते दिवशीं सातवे तासीं तारिख १३ माहे साबान सन १०८३ (२४ नवंबर १६७२) रोजीं विजापूर येथील पादशाही तख्तावर बसऊन पादशाही छत्रचामरें त्यावर धरिलीं. पारसी बैतेचा अर्थ : "अति उत्तम व ऐश्वर्यप्रद शिकंदर पादशाहा आहे. कारण कीं ईश्वराचे कृपेंकरून पादशाही तक्त व राज्याचा धणी झाला : १ : कल्याणप्रद हुमा पक्षी याणी उत्तम दैवाचे दिवशीं पृथ्वीवर शिकंदर पादशाहावर छाया धरिली : २ : हुमा म्हणोन पक्षी आहे व शास्त्रांत वर्णन केलें आहे कीं, हुमा पक्षी आकाशांत उडतो व त्या हुमा पक्षाची छाया ज्या मनुष्यावर पडती तो पादशाहा होतो. असें त्या हुमा पक्षाचें महात्म आहे. यास्तव या ठिकाणीं हुमा पक्षाचा दृष्टांत घेतला आहे. : २ : पादशाही तख्तावर जेव्हां शिकंदर पादशाहा बसला तेव्हां त्याचे कृपाळुपणाचा ध्वनी आकाश भेदून वर गेला : ३ : म्हणजे फार दयावंत होता. : ३ : कवीनी शिकंदर पादशाहा तक्तावर बसल्याचे दिवसीची तारिख वार्णिली आहे कीं, पृथ्वी घेणारा पादशाहा शिकंदर जाला : ४ : 'जहानगीर सुलतान शिकंदर मुद' इतकीं अक्षरें अबजदचे हिशेबानीं गणिलीं असतां सन १०८३ एक हजार त्र्यैंशी (१६७२ इ. स.) निघतो. या सनांत शिकंदर पादशाहा तक्तावर बसला. खवासखान याणी राजधानीचे कामाची मुख्त्यारी आपले हातीं ठेऊन राजधानीचा कारभार चालविण्यावर मालक जाहाला. दुसरे दिवशीं अबदूल महंमद याणी करारमदार ठरला होता त्याप्रमाणें खवासखान याजला निरोप सांगून पाठविला कीं, करार ठरला आहे त्याप्रमाणें सिध्धीस नेऊन वर्तणूक करावी. या पृथ्वीचे व पृथ्वींतील राहाणारे मनुष्याच्या कारभाराचा भरोंसा संपूर्ण ठकविद्येचा आहे. आरबी वाक्याचा अर्थ : "करार मदार ठरलेले व वायदे व निश्चय ठरलेले मोडून त्या करारांत अंतर आणणारा आहे." असे सांगून पाठविलें. परंतु खवासखान याणीं ते सर्व करार मदार ठरलेले व प्रतिज्ञा व शफता

दिल्ह्या होत्या तो करार सोडून बदलून उत्तर दिल्हे कीं, पादशाहा हा लहान मूल आहे. पादशाही किल्ले देणें हें माझे हातून कसें घडेल ? एक दोन वर्षें सबुरी करावी. असें उत्तर सांगोन पाठविलें तें ऐकून अबदुल महंमद खिन्न जाहाला. दुसरे दिवशीं खवासखान अबदुल महंमदाचे घरीं येऊन अबदुल महंमदाचे बहुत चित्त समाधान करिता जाहाला. बहुत दिलभरंवसा दिल्हा. परंतु अबदुल महंमदाचे मनाची खिन्नता, उगेंच वर बाह्यात्कारी भावानें खवासखानाचें चित्त समाधान केलें त्या चित्त समाधान करण्यानें कांहीं दूर जाहाली नाहीं, मनास समाधान वाटलें नाहीं. यामुळें अबदूल महंमद खिन्न होऊन कित्येक दिवस आपले घरीं स्वस्थ बसला. यद्यपि आपले कामाविषईचे विचार करून यत्न केला, परंतु त्या यत्नांनीं कांहीं फळ जाहालें नाहीं. येणेंकरून अबदुल महंमद यांचे चित्तावर मोठें संकट प्राप्त झालें. आदिलशाह चे राजधानींत नवे नवे कारभारी व ज्याणीं कधीं कामकाज केलें नाहीं असे जमले होते. त्यांचे हातून जीं जीं कामें होत होतीं तीं कामें नित्य कारभार केलेले अबदुल महंमद याचे दृष्टीस नीट दिसत नव्हतीं. अबदुल महंमदाचे मनास पसंत येत नव्हतीं. या योगानें अबदुल महंमद याजला फारच वाईट वाटत होतें. आपले धण्याचे राजधानींत बखेडा होत आहे हें गोष्ट नव्हे. आपले खावंदाचे राज्य सुरक्षित असावें अशी चिंता करित होता. रात्रंदिवस या जिवावरील संकटाचे फिकिरींत होता. शेवटीं घरीं उगेंच पडून राहावेना तेव्हां घरांतून बाहेर निघाला. पारसी बैतेचा अर्थ : “आपण आपले दृष्टीनें जें प्रत्यक्ष पाहिलें नाहीं तोंपर्यंत तें काम पसंत होत नाहीं. सत्य आहे सत्य आहे कीं, ईश्वराची ईच्छा ही आदिलशाही राजधानी बुडविण्याकडे जालीं होतीं व हें राज्य बुडवण्याचें परमेश्वराचें मनांत आलें होतें. आरबी वाक्याचा अर्थ : “ईश्वर जेव्हां कोणतेहि पदार्थाचा ईरादा, म्हणजे संकल्प, मनांत आणितो तेव्हां त्या विषईचें सामान जमवितो.” या वाक्यांतील तात्पर्य हें आहे कीं, ही आदिलशाही राजधानी बुडवावयाचें ईश्वराचें मनांत आलें तेव्हां ईश्वरानीं सर्व कारणें राज्य बुडावयाजोगींच निर्माण केलीं. या राजधानींत बखेडा होण्यास प्रथम कारण हें जाहालें. अबदुल महंमद याजसारिखा वजीर अकलवान राजधानीचा केवळ खांबच होय असा होता. त्याचे उत्तम विचाराचे व त्याचे कार्य करण्याचे फायद्यानें राजधानीची निरंतर शाश्वती आहे असा पादशाहास व दुसरेहि लोकांस पूर्ण भरोंसा व खास निश्चय होता. अशा योग्यतेच्या अबदुल महंमद वजिरानें या कामांतून मन काढून निराळा झाला. कामाची मुख्त्यारी ज्याणीं कधींहि काम कारभार केला नाहीं असे नूतन अभ्यास करणारे पोरांचे हातीं आली. पारसी बैतेचा अर्थ : “ईश्वराचे मनांत राज्य बुडवावें असें येतें तेव्हां ज्याणीं कधी काम कारभाराचा अनुभव पाहिला नाहीं असें मूर्खांचे हातीं राजधानीचे कामाची मुख्त्यारी देतो.” असो. तात्पर्य, पादशाहा केवळ लहान पाच वर्षांचा व राजधानीचे कामाची मुख्त्यारी मूर्खांचे हातीं आली. यामुळें पादशाहाचे राजधानीं-

तील सर्व कारभारी मंडळींत फुटाफूट व बखेडा जाहाला आणि राजधानींतील एकंदर कामाचे बंदोबस्ताचा अमल उठला. तर्फेतर्फेतील शत्रू संधी साधण्याकरितां टपून बसणार व आदिलशाहाचें राज्य हस्तगत करण्याची फारच आशा धरून बसले होतें त्यांजला मनोरथ पूर्ण होण्याचा समय प्राप्त जाहाला. येणेंकरून चहूंकडून संकट व विघ्नें उभीं राहिलीं. सर्व शत्रूंतील प्रथम शत्रू शिवा भोसला. याजला आली आदिलशाहा पादशाहा वारल्यानंतर फारच बळ आलें होतें. तेणेंकरून अति उन्मत्त होऊन पादशाहाच्या कित्येक जागा व किल्ले व मोंगलाचाहि कित्येक मुलुक हस्तगत करून आपले ताब्यांत आणोन फारच माजला होता व अति प्रबळ झाला होता.[1] असें असतां हली जेव्हां सिवाजीनें जाणिलें कीं, आदिलशाहाचे राजधानींतील कारभारी व कामदार असे पूर्ण हुशार कीं ज्याचे पूर्ण मजबूत अकलेनें व पक्के समजले मसलतीनें राजधानींत कांहींएक बखेडा न होतां राज्य कायम होतें व त्या कारकारी मंडळीनें आपले तेजस्वी अक्कलेनें व तरवारीचे जोरानें महान महान प्रबळ शत्रूंचा मोड करून आपले सरहद्दींतून बाहेर हाकून देत होते तसा हुशार अकलवान कारभारी किंवा कामदार हली आदिलशाहाचे राजधानींत एकहि राहिला नाहीं. असें जाणून सिवाजी ज्या जाग्यावर टपून बसला होता तेथून बाहेर पडून गैरराहा बदफैली वागणुक करणेस व बंडावा करणेस व संकटें उभीं करण्यास सिवाजीनें प्रारंभ केला. आधीं पनाळ्याचा किल्ला हरएक हिल्ले व बाहान्यानें व पनाळ्यावरील हशमाकडील लोकांशीं सख्य करून हस्तगत करून[2] तारिख २६ सवीसावी माहे जिलकाद (६ मार्च १६७३) रोजीं व सिकंदर पादशाहा तक्तावर बसले तेच सालीं सिवा यांणी आपली अयोग्य चालीची फौज आदिलशाहाचा मुलुक घेण्याकरितां हरएक तर्फेस चहूंकडे रवाना केली. कित्येक दिवसानंतर खुद जातीनें सिवाहि आदिलशाहाचा मुलुक घेण्याकरितां निघाला.

१. शके १५८९ वैशाख मासी (एप्रिल–मे १६६७) बहलोलखान व राजश्री येकोजी राजे रांगणियास वेढा घातला. राजश्रीनें वेढा मारून काढिला. मग भाद्रपदमासी (आगष्ट–सप्टेंबर १६६७) येदिलशाहाचा व राजश्री शिवाजीराजे यांचा सला जाला, –जेधेश, पृ. २४. शके १५९४ मार्गसीर्ष मासी (नवंबर–दिसेंबर १६७२) आली आदिलशाहा परलोकास गेला. त्याचा पुत्र सिकंदर तक्तीं बैसविला. खवासखान कारभारी जाला. राजश्रीचा व इदलशाहाचा सला तुटला. बाबाजी नाईक पुंडे विजापुरीं वकील होते त्यास बोलाऊन आणिलें. – जेधेश, पृ. २६.

२. शके १५९४ फालगुण वद्य १३ (६ मार्च १६७३) पनालागड आणाजीपंतीं भेद करून कोंडाजी फर्जंदबरोबर लोक देऊन घेतला. साठी लोक रवाना केले. त्यांनीं पनाला घेतला. शके १५९५ चैत्र शुध प्रतिपदा (९ मार्च १६७३) राजश्री राईरीहून पनाल्यास गेले.– जेधेश, पृ. २६.

## २. खवासखान याणी बहलूलखान याजला सिवाचे पारपत्यावर पाठवणें व उमराणी येथील लढाई होणें प्रकर्ण :

सिवा याणीं संकट उभे केलेला व विघ्नांचा अग्नि पेटविलेला विझविण्याकरितां खवासखान याणी विचार करून अबदुल करीम बहलुलखान याजला सिवाचे पारपत्यावर नेमिला. ताकीद केली कीं, पनाळ्याच्या किल्यानजिक जाऊन आपली यशस्वी फौज तेथें उतरून सिवाकडील मनुष्यांस येणेंजाण्याचा रस्ता बंद करावा. असें सांगून रवाना केला. अबदुल करीम बहलुलखान हा जेव्हां उमराणी नजीक जाऊन पोहोचला तेव्हां सिवाजीची फौज दहा पंधरा हजार हत्यारबंद व भाले मारणारे स्वार लढाऊ सामानसरंजामाचे बहुत तयारीनिसीं अबदुल करीम बहलुलखानावर चालून येऊन चहूंकडून पुढें सरलेला आणि कैवाराचे गरक्यांतील टिपक्याप्रमाणें अबदुल करीम बहलुलखान याजला व बहलुलखानाचे फौजेस घेरिले आणि तीर व बंदुकी व बाण व तोफांची सरबती करून लढाई सुरूं केली. या प्रमाणें सिवाजीनें वेढिलें असतां अबदुल करीम बहलुलखान याणी उभे राहिलेलेच ठिकाणीं हिंमत धरून उभा राहिला आणि त्या रणभूमींत तेथेंच धैर्य धरून अशा प्रकारें युध्द पराक्रम केला व शूरत्व बजाविलें व तरवारी चालविल्या कीं बहलुलखानाचे लष्कराचे भोंवते भोंवते जसे सतत तीर येऊन पडत तशी सिवाजीकडील फौजेचीं मस्तकें व प्रेतांचें अंथरूण झालें होतें. भाले तुटून ती सर्व रणभूमि कळकाचे सेताप्रमाणें जाहाली होती. सिवाकडील बहुत मनुष्यें कत्तल, म्हणजे ठार, झालीं. इकडील, म्हणजे बहलुलखानाकडीलहि, कित्येक शूर पडले. शाहा महंमद काकड व मुल्ला उस्मान वलद मुल्ला मनसूर हे मुख्य कारभारी मंडळीपैकी होते. हेहि ठार जाहाले. आपली जमात थोडी असोन व शत्रुकडील जमात बहुत असोन दोन प्रहरपासून रात्र होईतोंपर्येत बहलुलखान याणीं त्या रणभूमींत कायम उभें राहून एकसारिखी तरवार चालवित होता. रात्र जाहाली तेव्हां सिवाची फौज पळोन गेली.[३] अबदुल करीम बहलुलखान याणीं जेव्हां पाहिलें कीं, शत्रुनें मोकाबल्यावर तोंड माघारें फिरविलें व आपलेकडील सिपाई बहुत कत्तल जाहाले व बहुत जखमीहि होऊन निखालस थकले होते यास्तव तेथून बहलुलखान तिकोट्यास आला. जेव्हां शहराहून बहलुलखानास फौजेची नवीन मदत येऊन पोहचली व बहलुलखानाची खासी फौज होती त्या फौजेंसहि नवा दम येऊन बळ आलें तेव्हां बहलुनखान याणीं तिकोट्यास येऊन कूच करून शत्रूवर, म्हणजे शिवाजीचे फौजेवर, चालून गेला आणि मोटी लढाई जाहाली.

३. तेच (चैत्र) मासी (मार्च १६७३) बहलोलखान यासी व प्रतापराव व आनंदराव यांसी लढाई जाहाली. एक हत्ती पाडाव केला.–जेधेश, पृ. २६.

बहलुलखानाची फत्ते जाहाली.[४] हें सिवाजीनें वर्तमान ऐकून फारच संतापला. मनांत त्रासला. पश्चाताप होऊन बोटें कडकडा चावलीं. आपलेकडील सरदार मंडळीस बहुत त्रासून अति क्रोधानें भाषण करूं लागला. बहुत रागास येऊन बोलला कीं, तुम्हांस असें करावयाचें होतें तरी बहलुलखानाचे अंगावर चहूंकडोन कशाकरितां चालून गेल्यत ? त्यानंतर बहलुलखानाकडील फौजेपैकीं कित्येक लोक ठार झाले व कित्येक जखमी होऊन बहलुलखान थोडेसे जमातीनिसी तिकोट्यास निघोन गेला, असें असतां तुम्ही इतके बहुत जमातीनिसी असून बहलुलखानाचे जमातीचा पुन्हां पाठलाग करून त्यासी युध्द केलें नाहीं व बहलुलखानास वेढून पकडून कां कैद केलें नाहीं ? असें बोलून शिवाजीनें अति त्रासानें व फारच क्रोधायमान होऊन शिवाजी-कडील फौजेपैकीं कित्येक लोक जखमी व अर्धमेले होऊन परत आले होते त्यांजला सिवाजीनें ओसाड घरांत कोंडून त्या जिवंत मंडळीस आग लावून दिल्ही. फत्ते न करितां अपेश घेऊन माघारे आलांत असें बोलला. मिया नसरती याणीं शिकंदर पादशाहाची हिंदुस्थानी म्हणजे उर्दू भाषेंत कविता केली आहे कीं, त्यांत उमराणी येथील लढाईचा मजकूर जाहीर केला आहे. त्या लढाईतील अबदुल करीम बहलुल-खान याचा युध्ध पराक्रम व मिया नसरती याणीं आपली बोलण्याची प्रौढता अशी वर्णन केली आहे कीं, निर्मछरपणानें बोलण्यांतील कविता जाणणारे व कवितेंतील अर्थाची योग्यता ओळखणारे पुरुष तें वर्णन ऐकिलें असतां ‘ शाबास ’ म्हणण्याचें व ‘ वाहावा ’ म्हणोन नावाजण्यांचें मोती त्या वर्णनावर ओततील, असें वर्णन केलें आहे.

## ३. खवासखान याणीं हकीम पमसा याचे वशिल्यानें सख्य करणें प्रकर्ण :

तैमूर पादशाहाचा वंश अकबरशाहा पादशाहापासून अलमगीर पादशाहा पर्यंत दक्षण देश हस्तगत करण्याकरितां निरंतर आस्थापूर्वक यत्न करित होते. वरचेवर फौज घेऊन चालून येऊन वारंवार बहुत हल्ला करित होते. या प्रकरणांत बहुत दुःख पाऊन प्राणावरील संकट भोगित होते. येथपर्यंत इजा सोशित होते कीं, कित्येक शाहाजादे व कित्येक सरदार लोक याणी या कामाबदल यत्न केला परंतु त्याचे मनोगताप्रमाणें कार्यसिध्धी होत नव्हती. याचें कारण हें आहें कीं, विजापूर येथें मोठे मोठे दैववान पादशाहा इनसाफ करणारे होते, कीं अकलवान

४. शके १५९५ माघ वद्य १४ सिवरात्रीस (२४ फेब्रुवारी १६७४) बहलोलखानांत व प्रतापराव सरनोबस याचा झगडा तिकोटियास जाला. प्रतापराव पडिले.-जेधेश, पृ. २६.

वजिरांचे बळाचे योगानें व महान पराक्रमी अमीरांचे शूरत्वानें ते पादशाहा या पृथ्वीचे संरक्षण करित होते. पृथ्वीचे अधिपत्य भोगित होते. ज्या ज्या समईं मोठा प्रबळ शत्रु या पादशाहांवर चालून येत होता त्या शत्रूस आदिलशाहाकडील शूर आपले अकलेचे बळानें व शूरत्व व पराक्रमानें माघारा फिरवोन शूरत्व पराक्रमाचे बळानें त्यांजला जेरीस आणोन बहुत खराबीनें व नुकसान भोगऊन परत घालऊन देत. हाली तो केवळ लहान वयाचा मूर्ख पादशाहा असा अज्ञान, कीं मित्र कोण व शत्रु कोण इतकेंदेखिल वोळखित नव्हता व नफा कशास म्हणतात व नुकसान म्हणोन काय पदार्थ आहे इतकें जाणत नव्हता तो मूर्ख पादशाहा तक्तावर बसला व ज्याणी बहुत कामकारभार केलेले व कामाचे अनुभव पाहिलेले व ज्यांचे योगानें राजधानीचा बंदोबस्त राही व राजधानी कायम राहावी असा कोणीच अकलवान वजिरापैकीं एकहि दरबारांत हलीं राहिला नाहीं. यामुळें संधी साधण्याकरितां टपून बसणारे शत्रुलोकांस बाजाराचा दिवस प्राप्त जाहाला, म्हणजे बाजार भरला, म्हणजे उचल्यास फावते तसे शत्रुलोकांस हा दिवस प्राप्त जाहाला. त्या शत्रुलोकांचे मनोरथ पुरले नव्हते ते पूर्ण होण्याची वेळ येऊन पुन्हां शत्रुनें बळ बांधिलें. आपला मनोरथ सिध्धीस नेण्याविषयीं यत्न करूं लागले. तात्पर्य, ईश्वराचे मनोगत याप्रकारचे होतें व ही दौलत समाप्त करण्याविषईं, म्हणजे बुडविण्याविषयीं व या राजधानीचा आळा तोडण्याविषईं ईश्वराचा संकल्प जाहाला होता. यास्तव कुरानांतील ऐतेप्रमाणें आरबी वाक्याचा अर्थ : "ईश्वरानीं जी आज्ञा केली आहे ती आज्ञा निःसंशय सिध्धीस गेली आहे." या वाक्यांतील तात्पर्य हें आहे कीं, ईश्वराचे मनांत ही विजापुरची राजधानी बुडवावयाची आलें तेव्हां तशीच सिध्धता जाहाली. आदिलशाहाकडील कारभारी मंडळ राज्य संरक्षण करण्याकरितां जो जो विचार काढित होते त्या विचारांत संकट व विघ्नांशिवाय दुसरें कांहींएक प्राप्त होत नव्हतें. बाहादूरखान म्हणोन बहुत संभावित व फारच अकलवान होता. तो बाहादुरखान अलमगीर पादशाहाचे दरबारांतील श्रेष्ट मनुष्य होता. अलमगीर पादशाहानीं ज्या सिपाई मिरजा राजा, म्हणजे जयसिंग, याजला दक्षण देशांतून हुजूर बोलाविलें त्या समईं बाहादूरखान याजला खान जमान असा किताब देऊन दक्षण देश हस्तगत करण्याचे कामावर नेमून दक्षण देशावर त्याजला रवाना केलें होतें. हली आदिलशाहा पादशाहाचे राजधानींत येथपर्यंत बखेडा जाहाला तेव्हां अलमगीर पादशाहाकडून पुन्हां नवीन आज्ञापत्रें विजापूर घेण्याबदल खान जमान याजला वरचेवर येऊं लागलीं. तेव्हां खान हा अलमगीर पादशाहाचे आज्ञेप्रमाणें दौलताबाद येथून निघोन पेडगांव येथें बहादूरगड म्हणोन प्रसिद्ध आहे तेथें येऊन उतरला व युद्ध करण्याविषयीं बहुत झटून यत्न करूं लागला. असाच मलिक बर्खुरदार बहुत हुशार होता. तोहि अलमगीर पादशाहाचे आज्ञेवरून मुकिमीचे कामावर

नघरसपुरांत राहून विजापूरचे माणसांस ठेवण्याकरितां रात्रंदिवस बहुत यत्न करित होता. खवासखान यार्णी मोगलाचे काम हकीम षमसुद्दीन म्हणोन पुरातन मनुष्य व अकलवान पोख्ता होता त्याजकडे नेमिले कीं, आपले अकलेचे उत्तम विचाराचे योगानें मोंगल व आदिलशाहा या उभयतांत सख्य करावें. असें केलें असतां या योगानें आदिलशाहाचा मुलुक व राजधानी शत्रूचे भयापासून सुरक्षित राहील. असें सांगितलें तेव्हां हकीम षमसुद्दीन यार्णी आपले उत्तम प्रकारचे अकलेनीं बहुत विचार करून खाज्या महंमद अमीन किषमीरी हा नवाब बाहादुरखान याचे पूर्ण विश्वासांतील सरदार होता त्याजला आपलासा करून घेऊन त्यासी सख्य करून त्याचे वशिल्यानें नवाब बाहादूरखान याजसीं मित्रतेचा पाठ घातला. युक्तीयुक्तीनें नवाब बाहादुरखान व खवासखान या उभयतांतहि पकी मित्रता केली. उभयतांनें पूर्ण सख्य केलें. तेव्हां नवाब बाहादुरखान व खवासखान यांचे विचारानें या गोष्टीवर मित्रतेचा विचार ठरला कीं, राजधानीचें मुगुटाचे मोती शहरबानु बेगम उर्फ शाहा बीबी, आली आदिलशाहाची कन्या, इचे लग्नाचे एखाद्या शाहाजाद्यापैकीं नवरा योजून करावें आणि फार दांडगा अमर्याद जो सिवा त्या सिवाचें पारपत्यावर व सिवाचा निर्मूळ फडशा करण्याचे कामांवर खवासखान याणी खुद जातीनें चालून जावें. अलमगीर पादशाहानीं प्रतिवर्षी नजरेचा ऐवज घ्यावयाचा तो माफ करून शिकंदरास शाहा असा किताब दिल्हा. हा अभिप्राय समजून घेण्याकरितां उभयतांकडूनहि कित्येक वेळ खाज्या अमीन आला गेला. तेव्हां उभयतांकडूनहि शफता व करार मदार ठरण्यांत येऊन कबुलायत जाहली. तेव्हां नवाब बाहादूरखान यार्णी अमलगीर पादशाहाचे सेवेंत विनंतिपत्रें पाठविलीं कीं, हा संकल्प सिध्धीस नेण्याकरितां फारच यत्न केला व सदरी लिहिले आहेत ते संकल्प अलमगीर पादशाहा यार्णी सर्व कबूल केले. माजोरी सिवाचे निर्मूळ फडशा करून पारपत्य करण्याकरितां प्रतिवर्षीचा नजरेचा ऐवज माफ केला आणि अलमगीर पादशाहानीं कृपाळू खवासखान याजला नवानसखान असा किताब, म्हणजे पद, देऊन आपले अंगावरील खासे पोषाखाची सनगें दिल्हीं. या योगें दिवस अति उत्तम म्हणजे राजधानीचा अधिकच बंदोबस्त होत होता. कल्याण होण्याची उमेद फारच मजबूत होत होती. अशा समयांत एकाएकीं या कुरानांतील आयतेप्रमाणें आरबी वाक्याचा अर्थ : “जेव्हां दैवदशा फिरून दुर्दैवाची वेळ येती तेव्हां सर्व विचार निर्फळ होतात.” याप्रमाणें कार्यभाव विपरित जाहाला. फंदफितुर करणारे हरएक कामांत बिघाड आणणारे लोकांनीं अयोग्य मनसोबा, म्हणजे वाईट विचार, ठरऊन अति यत्नानें हकीम षमसा याजला आपसांतून बिघडला.

## ४. फंदफितूर करणारे व बखेडा करणारे लोकांनीं बेत ठरावून हकीम षमसा याजला बिघडवणें प्रकर्ण :

जेव्हां हकीम षमसा याचे बहुत यत्नानें व वशिल्यानें खवासखानाची सर्व कामें सिध्धीस गेलीं तेव्हां वैरत्वाचा व वाकडेपणाचा अग्नि फंदाफितूर करणारे व दुसऱ्याचे चांगले न पहाविवणारे लोकांचे हृदय़ पेटला, म्हणजे शत्रु लोकांचे मनांत वाकडेपणा आला. फंदफितुरी लोकांनीं आपआपल्यांत विचार ठरविला कीं, हीं सर्व कामें हकीम षमसाचे वशिल्यानें सिध्धीस जातात यास्तव येविषईचे कामांत बखेडा केला पाहिजे. असा विचार करून हकीम षमसाचा भाऊ मिरजा बाकर म्हणून होता. त्या मिरजा बाकरास नाना प्रकारच्या दुर्बुध्धी शिकऊन फितविला. हकीम षमसा याणी मिरजा बाकर याजला खवासखान याजपासीं आपले तर्फेने ठेवून मिरजा बाकराचे वशिल्यानें कागदपत्र पाठवित होता. जवाबसवाल करित होता. या दिवसांत तो मिरजा बाकर कित्येक कामांकरितां विजापुरास आला होता. तेव्हां त्याजला फंदफितूर करणारे लोकांनीं फितविला. त्याजला ठकऊन मिरजा बाकराचे मुखानें हकीम षमसाचे कित्येक गिल्हे खवासखानाचे मनांत भरून दिल्हे. खवासखान नीच उत्पत्तीचा मनुष्य, यामुळें फंदफितूर करणार बखेडेखोर लोकांचे ठकविद्येनें ठकून, मजकूर खरा किंवा खोटा हें कांहींच न पहातां, खरे मजकुरास असत्य असें जाणोन त्या फंदफितूरी लोकांची मसलत राजधानीचे कल्याणाची असें समजून हकीम षमसाविसीं सवासखानाचें मन विटलें. मिरजा बाकर याजला कामांत घेऊन कामाचे सवालजबाब त्याचे वशिल्यानें, हकीम षमसास कामांत न घेतां व हकीम षमसाचे वशिल्यानें कोणतेंहि काम न करितां, चालविणेस प्रारंभ केल्यानंतर खवासखान पठाण लोकांचे वैरत्वानें व तनखा म्हणजे पगाराचा ऐवज थकलेला मागण्याचे पठाणाचे तगाद्यानें फारच चिंतेंत पडला होता. खवासखान याणीं मनांत आणिलें कीं, नवाब बहादूरखान याचे वशिल्यानें माजूरपणा व गर्वानें हकीम षमसा याणी उठविले आहेत. त्या पठाण लोकांचा निःशेष फडशा करावा असें मनांत आणिलें. तों फंदफितूरीं व बखेडेखोर लोकांनीं दुसरेंच संकट उभें करून व नवीन ठकविद्या खवासखान याचे मनांत आणोन दिल्ही, कीं हकीम षमसा व मिरजा बाकर या उभयतांचे खंजरखानासी आप्तविषयींपणाचे नातें आहे. याजला जर करितां हें वर्तमान कळलें म्हणजे खास पठाण लोकांस बातमी कळेल. मग कार्यभाव विपरित होईल आणि भलताच प्रसंग येईल. त्या मूर्ख बेवकूफ अविचारी, म्हणजे खवासखानानी, येविषईहि खरे आहे किंवा कसें ही चौकशी न पाहातां त्याचे ठकविद्येनें ठकला. मिर बाकर याजलाहि हकीम षमसाप्रमाणें कामावरून बर्तर्फ केला. शामराव याजला कामांत घेतला. भेटीचा करार ठरविण्याकरितां व पठाण लोकांचा निर्मूळ

फडशा करून पारपत्य करण्याकरितां नवाब बाहादूरखानाकडे पाठविला खवासखान याची मर्जी घटकेंत तऱ्हेतऱ्हेची होत आहे. प्रकृतीस किंचितहि धीर नाहीं. वरचेवर रंग बदलतो. खवासखानांत पहिली तऱ्हा राहिली नाहीं हें बाहादुरखान याजला समजलें होतें. हकीम पमसाचे योग्यतेंत व शामराव याचे योग्यतेंत बहुत अंतर व जमीन-अस्मान तफावत आहे असें जाणोन नवाब बाहादुरखान हे शामराव याचें बोलण्याकडे चित्त देत नव्हते. शामराव याणी कोणताहि मजकूर सांगो लागला असतां शामराव याचें बोलणें ऐकून घेण्याकडे कान केलाच नाहीं.

## ५. सिवाजी याणी नवाब बाहादुरखान याजला दगा करणें प्रकर्ण :

कर्मधर्मसंयोगें त्याच दिवसांत सिवाजी याणी आपली फौज तयार करून पाच महाल हस्तगत करण्याकरितां रवाना केली. कित्येक दिवसानंतर सिवाजीहि खुद जातीनें जिकडे फौज रवाना केली होती तिकडेच जाऊन भोंड्याचे ( फोंड्याचे ) मामल्यावर जाऊन हल्ला केला. सिवाजीनें मनांत आणिलें कीं, न जाणो बाहादुर-खान संधी साधून फुरसतीची वेळ पाहून तिकडून आपलेकडील मुलकांत चालून येईल. मग फार वाईट प्रकारची संकटें येतील. असें जाणोन आपले नाना प्रकारचे बाहाने करून व हल्ले करणें व ठकविद्या चालू करण्याचे विचारांत येऊन बाहादुराखानासी सख्य करण्यास प्रारंभ केला. मित्रतेची बोलणीं आपसांत चालविलीं कीं, जर करितां आपण अलमगीर पादशाहाकडून मजकडून अपराध घडले ते क्षमा करणेंविसी व दक्षण देशची देशमुखी आम्हांस देणेंविसी व पूर्वी आमचे पुत्रास पद दिल्हें आहे तें कायम ठेवणेंविसी आज्ञापत्र आणवाल तर पादशाही किल्ले जे हली मी हस्तगत केले आहेत ते व मिरजा राजा, म्हणजे राजा जयसिंग, याचे सख्य करण्याचे समई सख्य करण्यांत मी दिल्हे होते त्यासुद्धां हवालीं करून मी आपले पुत्रास चाकरीवर पाठवीन. पादशाहाचे चाकरींत मी निरंतर राहीन. प्राणावर संकट आलें तत्रापि पादशाहाचे सेवेंत अंतर करणार नाहीं. असें सांगून पाठविलें. बाहादूरखान याणीं विचार पाहिला कीं, आपण जी इच्छा धरून आलों तो मनोरथ कांहींएक यत्न न करितां हात जोडून पुढें आला आहे. असें जाणोन सिवाजीचें बोलणें कबूल करून सिवाचे विनंतिपत्राप्रमाणें अलमगीर पादशाहाकडून बंदोबस्त करून आज्ञापत्र आणविलें. हली सिवासारिखा मकरबाज व फंदफितूर करणारा पाशांत आणोन आपलासा करून घेतला. या सेवेबद्दल अलम-गीर पादशाहा बाहादूरखान याजवर अधिकअधिकच रजामंद म्हणजे बाहादुरखान जें सांगतील तें ऐकावें असें खुष होऊन बाहादुरखान याणी जें पद सिवाजीस देणेंविषयीं

रदबदलीनें लिहिलें होतें त्याहून अधिक पद देण्याचें मनांत आणोन नफरजंग कामिलताप्र असें पद दिल्हें. बाहादुरखान सैईदखान हें पद पूर्वी पादशाहाचे विश्वासू चाकर होते या उभयतांस आज्ञापत्रें व पोषाखसहित सिवाजीकडे पाठविले. सिवाजी याणी हली अलमगीर पादशाहाचे व आपलें सख्य जाहालें असें कळलेंच होतें येणेंकरून आपले मुलुकाचे आंदेषापासून निर्भयपणें स्वस्थ होऊन स्वस्थ चित्तानें तो किल्ला घेण्याविषयीं यत्न करिता जाहाला. तेव्हां तारिख १५ माहे सफर सन एक हजार बेऐंशी ( १३ जून १६७१–शेऐंशीं पाहिजे= १ मे १६७५ ) रोजीं फोंड्याचा किल्ला व त्या तर्फेतील महाल सिवाजीनीं हस्तगत करून, म्हणजे घेऊन, स्वस्थ जाहाला.[५] जिनस पंधरा लक्ष होन बाहादूरखानाचे लष्कराकडून खरीदी करविले व दुसरें हें कीं, जे जे कार्यभाव सिवाजीचे मनांस होते तें सर्व सिध्धीस गेले. तेव्हां सिवाजी पुन्हां बेमानपणावर व आपले बदजातीवर येऊन सैय्यदखानास बोलला कीं, बाहादुरखान कोण आहे व काय पदार्थ आहे? बाहादुरखानास कोण पुसतो? बाहादुरखानांत अशी काय योग्यता आहे कीं, आम्हांसारिखे श्रीमंतानीं बाहादुरखानासीं सख्य करावें? बाहादूरखानाचे वशिल्यानें आपलीं सर्व कामें करून घ्यावींत? असा बाहादुरखान काय योग्यतेचा आहे? बाहादुरखानाचे मनांत याप्रमाणें आलें असल्यास बाहादुरखानाची कच्चित (कच्ची) मसलत आहे. बाहादुरखानास कांहींएक समजत नाहीं. असें बोलून सैय्यदखानास सिवा बोलला कीं, तूं जाऊन बाहादुरखानास बोल कीं, तूं मजपासून ही उमेद धरूं नको व ही कच्ची मसलत मनांत आणूं नको, असें जाऊन त्याजला सांग. असें बोलला तेव्हां सैयदखान या सिवाचे बेमानपणा व ठकबाजीने बहुत चिंतेंत पडोन निरुपाय होऊन परत आला. बाहादुरखानास सविस्तर मजकूर सांगितला तेव्हां नवाब बाहादुरखान सिवाचे या ठकबाजीनें व दगलबाजीनें बहुत क्रोधायमान होऊन मनांत जळूं लागला. येविषयीं काय विचार करावा असे मनांत आणून विचार ठरविला कीं, जर करितां अलमगीर पादशाहास या मजकुराची बातमी समजल्यास या अपराधास्तव व या मूर्खपणास्तव पादशाहा आपणास धरितील. आतां ती मसलत बरी आहे कीं, कसेंहि करून हरएक प्रकारें खवासखानाची भेट घेऊन सिवाचें पारपत्य करण्याचा करार ठरऊन कार्य करावें आणि आपली जागा कायम ठेवावी.

५. शके १५९६ फालगुण वद्य ५ मीस (६ मार्च १६७५) राजश्री स्वार जाले ते चैत्र वद्य ५ (४ एप्रिल १६७५) फोंडियास वेढा घातला. शके १५९७ वैशाख शुध २ (१७ एप्रिल १६७५) राजश्री स्वामीनी फोंडाचा कोट सुरंग लाऊन उडविला. जेष्ठ मासी (मे–जून १६७५) कडवाडी सिवेश्वर व आंकोलें कबज केलें. कबज करून रायगडास गेले.—जेधेश, पृ. २७. बुसातीन सलातीन फोंडा घेण्याचें वर्ष '१०८२ हिजरी' देते. तें चूक आहे हें वर्ष 'बेऐंशीं' ऐवजीं 'सेऐंशीं' पाहिजे.

## ६. खवासखान याची बाहादुरखानाशी भेटी होणें व मनांतील कार्यभाव सिध्धीस नेणें प्रकर्ण वर्णन :

तेच वेळेस शामराव हा पहिले दिवशीं बाहादुरखान त्याशी नीट बोलत नाहींत म्हणोन खिन्न झाला होता. त्या शामरावास बोलाविले आणि खवासखानाचें सख्य होण्याविषयीं त्याजपाशी मजकूर बोलले. तेव्हां शामराव यांणी हीच संधी चांगली आहे असें मनांत आणोन पठाण लोकांचा माजुरीपणा व खवासखानाचे मनांतील इरादा जो होता तो सविस्तर मजकूर नवाब बाहादूरखानाचे मनांत आणोन देऊन करार ठरविला कीं, वकील, खिजरखान, हा रदबदलीचे प्रारंभी कित्येक दिवस नवाबाचे लष्करांत राहिला होता त्याजला लष्करांतून काढून देऊं नये व पठाण लोकांचे वकिलांकडे व त्यांचे विनंतिपत्रांकडे याणी निखालस पाहूं नये असें करावें व खवासखानाची कन्या नवाब बाहादुरखानाचे पुत्रास द्यावयाची ठराविली. हीं कामें ठरल्यानंतर शामराव परत आला. सविस्तर मजकूर खवासखान याजला कळविला. खवासखान प्रथम बाहादूरखान याजपाशीं शामरावाचा प्रवेश होण्याचे कारणानें व आपली कामें सिध्धीस न जाण्याचे योगानें विचारांत पडोन घाबरला होता. अशा समयांत हें वर्तमान ऐकतांच बहुत संतोष पावोन अति संतोषानें बाहादुरखानाची भेटी घेण्याचे सामानसरंजामाची तयारी करूं लागला. एक पत्र लिहून नवाब याजकडे पाठविलें. त्या पत्रांत भिवरानदीचे किनाऱ्यास भेटी होण्याचा करार ठरला होता. त्याप्रमाणें त्या ठिकाणीं आपण यावें असें लिहून कळविलें. तेव्हां नवाब बाहादूरखान हे अति सत्वर पेडगांव येथून निघोन चालते झाले. नवाबानीं आपण येऊन दाखल होण्याचे पूर्वी आम्ही आलों अशी खबर देण्याकरितां खाज्या महंमद अमीन याजला पुढें रवाना केला. खाज्या महंमद अमीन येऊन पोहचण्याचे पूर्वीच खवासखान मंगळवारी तारिख १० माहे रजेब सन १०८६ (२१ सप्टेंबर १६७५) रोजीं नवाबाचे भेटीकरितां विजापूर किल्यांतून निघाला होता. तेव्हां खाज्या अमीन खवासखानास वाटेंतच भेटला. खाज्या महंमद अमीन याणी नवाबाचें पत्र खवासखानास दिल्हें. खवासखान याणीं तें पत्र वाचून पाहून पुढें गेला. कितिएक दिवसांनीं भिवरेचे किनाऱ्यास जाऊन पोहोचला. तारिख ९ माहे साबान ( १९ आक्टोबर १६७५ ) रोजीं खवासखान याणी नवाब बाहादुरखान याची भेटी घेतली. उभयतांचे सवालजबाब उत्तम प्रकारें जाहाल्यानंतर आपले मनांतील कामाची सिध्धी करून परत येऊन तारीख ८ माहे साबान रोजीं ( १८ आक्टोबर १६७५ ) शहर विजापूर येथें येऊन दाखल झाला.

७. नवाब अब्दुल करीम याणी खवासखानास पकडणें आणि त्याजला बंकापूर येथें कैद करणें प्रकर्ण :

नवाब अब्दुल करीम बह्लुलखान हा सरलष्कर फौजेचा धणी होता व बहुत दौलत होती व संभवितहि फार ठेवित होता. यास्तव बह्लुलखान याणी खवासखानाचे चाकरींत वागणें सोडून देऊन हमेषा वैरभाव व वाकडेपणा धारण करून राहात होता. मुलुक ज्याहागिरीबदल कज्या व शत्रुपणा स्वीकारून खवासखानास कामावरून काढून देण्याचा विचार करून नाना प्रकारच्या युक्ती मनांत आणित होता. हली तर खवासखान याजला बाहादुरखानाचे मित्रतेचा आधार व पाठबळ प्राप्त जाहाले होतें. यांमुळें खवासखानहि अब्दुल करीम बह्लुलखानाचा निर्मूळ फडशा करण्याविषयीं तयार होऊन येविषयीं युक्ती कशी करावी व काय विचार करावा अशी मनांत योजना करित होता. हळूहळू वैरपणा व वाकडेपणाचा अग्नि फारच पेटला, म्हणजे उभयतांत फारच वाकडे आले. अब्दुल करीम बह्लुलखान हा यद्यपि अंतर्यामी खवासखानाविषयीं वाकडेपणा वागऊन खवासखानाचा निर्मूळ फडशा करावा असें मनांत ठेवित होता परंतु बाह्यात्कारी मित्रपणाचा व दोस्तीचा वरवर उगाच भाव दाखवून मित्रत्वाचे संबंधानें एके दिवशीं बहलुलखान याणीं खवासखान याजला भोजनास आमंत्रण केलें. हें कालचक्र क्षणांत काय करील हें कालचक्राचे खेळ व डाव खवासखान याणी लक्षांत न आणितां कुरान शरीफचे ऐतेप्रमाणें, ऐतेचा अर्थ : "कोणाचाहि विश्वास धरूं नये. यास हुशार म्हणतात." या वाक्याप्रमाणें खवासखान याणी वागणुक न करून, म्हणजे कोणाचाच विश्वास धरूं नये असें ईश्वरानें सांगितलें असतां त्याप्रमाणें न करून, बहलुलखानानें भोजनास आमंत्रण केलें हें चांगलेपणानेंच केलें असेल असा विश्वास धरून व बह्लुलखान आपला मित्र असें मानून तारिख ३ तिसरी माहे रमजान रोज गुरुवार सन मजकूर ( ११ नवंबर १६७५ ) रोजीं कांहीं एक मनांत संशय न धरितां निर्भयपणें अब्दुल करीम याचे वाड्यांत आला. अब्दुल करीम बह्लुलखान याणी आपले फौजेस इषारा, म्हणजे सूचना, करून ठेवलीच होती व दरबारांतहि कांहीं कांहीं निवडक मनुष्यांस व कामकाज केलेले हुशार माणसांस गुप्तपणें सुचविलें होतें. तेव्हां खवासखान येतांच तात्काळ खवासखानास पकडून कैद केला आणि बंकापूरचे किल्यांत पाठविला.[६] अब्दुल करीम बह्लुलखान याची दौलत व जरब फारच होती. यामुळें खवासखानाकडील माणसांचे हातून कांहीं एक

६. शके १५९७–छ ३ रमजान ( ११ नवंबर १६७५ ) बहलोलखान खवासखानानें (?) धरिला. आपण कारभारी जाला.– जेधेश, पृ. २७. येथें बह्लोलखानें खवासखान धरिला असें असावें ?

जाहालें नाहीं. दुसरे दिवशीं रमजानची चौथी तारिख (१२ नवंबर १६७५) होती. यास्तव ते दिवशीं अबदुल करीम किल्याचे आंत येऊन दाखल होऊन राजधानीचीं कामें आपले हुकुमानीं चालविणेचे कामावर कायम जाहाला. शिकंदर पादशाहाचे राजधानीचे कामाची मुख्त्यारी आपले हातीं आणिली. पठाण लोक व आपले निसबतीचीं माणसें कामांत घेऊन त्या लोकांस पूर्ण सामर्थ्य व दिल-भरंवसा देणें चालविलें. खवासखानाचे निसबतीचे लोक दक्षिणी व दुसरेहि कित्येक होते त्यांजला हळुहळू हरएक कामावरून बरतर्फ करून शहरांतून बाहेर हाकून देणें चालविलें. खिजरखान याजला पूर्ण विश्वासांतील भरंवशाचा आपले निसबतीचा मुख्य कामदार करून बहुत सामानसरंजामाची तयारी करून मुलकाचे बंदोबस्ता-करितां खिजरखान यास फौजेसुद्धां रवाना केलें. ही गोष्ट बहुत दंग्यास व बखेडयास कारण जाहाली. पादशाहाचे चाकरलोक व दक्षणी लोक संपूर्ण बेदिल म्हणजे उदास होऊन आपआपले जाग्यावर सर्व रिकामे बसून मसलती करित होते. शिकंदर पाद-शाहाचे कारकीर्दीतील राजधानींत खवासखानाचे पेशवाईस मुख्त्यारीनें कारभार करण्यास तीन वर्षेंच जाहालीं होतीं. त्या तीन वर्षांतहि खवासखानाचे स्वस्थ आनं-दात बसण्यानें व त्याजला कालचक्राचे खेळाचा अनुभवच माहित नव्हता यामुळें राजधानीचीं कामें सुरळीतपणें जशीं चालावीं तसी चालत नव्हती. बखेडा बहुत जाहाला होता. हबीब सुलतान म्हणोन खवासखानाची स्त्री माहाली व मुलकी कामें चालवित होती. दौलतीचा बंदोबस्त नीट ठेवित होती. पूर्ण विचारानें काम चालवित होती. हबीब सुलतान ही स्त्री कितीहि अकलवान बहुत समजदार होती परंतु कसेंहि असलें तरी शेवटीं स्त्रीच होती. या आरबी वाक्याप्रमाणें — आरबी वाक्याचा अर्थ : "सर्व या बेअकल मूर्ख अधर्मी आहेत अशी ईश्वरानीं आज्ञा केली आहे." पादशाही दरबारांतील सर्व मनुष्यें व पुरातन चाकरलोक बायकांचे कारभारामुळें उदास जाहाले होते. त्रासले होते. बहुत लोक भिकारी जाहाले होते. बहुत लोक निखालस उपाशी मरत होते. खवासखान याणे माणसांचे अवस्थेकडे व सर्व माणसांची या प्रकारची दशा जाहाली या दशेकडे किंचितहि मन न घालतां व कांहींएक फिकीर मनांत न आणितां स्वस्थ आपलेच ख्यालीखुशालींत पूर्ण निमग्न होता.

## ८. मुलकाचा बंदोबस्त करण्याकरितां खिजरखान याणीं निघणें व वाटेमध्यें खिजरखानासी शेख मीनहान याची भेटी होणें प्रकर्ण :

खिजरखान जेव्हां बहुत सामानसरंजामानिशीं फौजेची तयारी करून फौजेसुद्धां एकंदर मुलकाचा व किल्ल्यांचा बंदोबस्त करणेंकरितां शहरांतून बाहेर निघाला आणि

प्रथम शाहादुर्गचे किल्यावर जाऊन पोहचला आणि तो किल्ला बहुत मजबुतीची जागा व फारच पक्का पाहून त्या किल्यावरील पुरातन मनुष्यें काढून देऊन तो किल्ला आपलेकडील विश्वासू मनुष्यांचे हवाली करून आपलीं बायकामुलें व मालमत्ता व जिंनस वगैरे सामान त्या किल्यावर ठेऊन स्वस्थपणानें व पूर्ण खातरजमेनें पुढें चालता झाला. बेळगांवास निघाला. सांगोले व घेरडीचे मध्यभागीं शेख मीनहान जुनेदी दक्षणी हा याच पठाण लोकांचे बखेड्यानें बहुत त्रासलेले मनुष्यांपैकींच एक चिंताग्रस्त पुरुष अंतःकर्ण दुखवलेला होता. तो शेख मीनहान खिजरखानास भेटला. खवासखानास कत्तल करावें, म्हणजे जिवें ठार मारावें, असें खिजरखानाचे मनांत होतें. यास्तव शेख मीनहान याणी सर्व पर्याय आपलेकडील संपूर्ण मित्रांस व विश्वासांतील दोस्तांस सविस्तर सांगितला कीं, पठाणानें जी कांहीं वागणूक केली ती सर्व जाहीरच आहे. हलीं आमचा आश्रय निखालस तुटला. आम्हीं चिंताग्रस्त व अपूर्ण मनोरथी जाहालों. पठाण लोकांनीं फारच दंगा आरंभिला आहे व फारच माजून बदमस्ती करित आहेत. कदाचित उद्यां आम्हांस या पठाण लोकांचे दंग्यानीं वर मस्तक देखिल करण्याचें सामर्थ्य राहाणार नाहीं. आज आमचे आयुष्य भरलें असें आम्ही समजतों. प्राणास व कुळास मुकलों असें आम्हांस वाटतें. या खजिरपंनीस, म्हणजे खिजर हें नांव आहे व पनीस हें पठाणाचे जातीचें आडनांव आहे, या खिजरपनीस काढून टाकून, म्हणजे जिवें मारून, खिजर काढून टाकिला म्हणजे अबदुल करीम याचें पाहून घेणेंस फार अवघड नाहीं. त्याचे कारखान्यांत हाच खिजर काय तो भारी आहे. खिजर याचा जेव्हां फडशा करूं, म्हणजे खिजरास जिवें मारूं, तेव्हां दुसरा कोणींच आमची बराबरी करील असा हरीफ नाहीं. आमच्याही मतीनें असें वाटतें कीं, तुम्ही मित्रच आहांत तेव्हां तुम्हां सर्व मित्रांची काय सला आहे व तुम्हा सर्वांचे मनास कसें येतें ? असें बोलला तेव्हां ते शेख मीनहान याचे सर्व मित्र लोक हें बोलणे ऐकतांच बोलले कीं, पारसी बैतेचा अर्थ : "जें तुमचे सलेस आलें तीच आमची सर्वांची सला आहे." जी मसलत आपले मनास येईल तीच आम्हांस कबूल होईल व तें आमचे मर्जीस येईल. ज्या ठिकाणीं आपलें पाऊल पडेल तेथेंच आपले पायावर आमचे मस्तक वोवाळून पडेल, म्हणजे आपण जेथें पाय ठेवाल तेथें आम्ही प्राण खर्च करूं असें जाणावें, असें बोलले. नंतर याच करारमदारावर शेख मीनहान व याचे सर्व लोक संधी साधण्याची मार्गप्रतिक्षा करित होते व समय इच्छित होते.

९. शेख मीनहान याणी खिजरखान याजला जिवें मारणें व या प्रकर्णाचे पाठोपाठच अबदुल करीम याणी खवासखान याजला जिवें मारणें प्रकर्ण :

खिजरखान याणी विचार पाहिला कीं, शेख मीनहान हा दक्षिणी नामांकित मनुष्य आपले सर्व कुटुंबासहित आपलेकडे येऊन रुजु जाहाला व भेटला. यास्तव शेख मीनहान याचे चित्त समाधान करणें व त्याजला दिलभरंवसा देणें जरूर आहे असें जाणिलें. शेख मीनहान यासी भोजनाविषई बोलणें करून त्याजला मेजवानी करण्याचे सामानसरंजामाची तयारी करून फत्तेजंगखान याजला शेख मीनहान याजकडे आमंत्रणास पाठविलें. शेख मीनहान हा संधी साधण्याकरितां टपून बसला होता. शेख मीनहान याणी तें आमंत्रण येतांच आपलेकडील दोनशें निवडक जवान मोठमोठीं कामें केलेले हत्यारबंद समागमें घेऊन खिजरखानाचे डेऱ्यास निघाला. खिजरखानाचे डेऱ्यानजिक जाऊन पोह्चला तेव्हां खिजरखान हा शेख मीनहान याजला सामोरे येण्याकरितां डेऱ्यांतून कांहींसा पुढें आला. हातास हात लावून भेट घेण्याचे चालीकरितां खिजरखान याणी हात पुढें केला. तेव्हां शेख मीनहान वाघासारिखा बळाचा व हत्तीसारिखा बलवान होता. खिजरखान याणी भेटीकरितां हात पुढें करितांच शेख मीनहान याणी खिजरखानाचे दोनीहि हात आपले एका हातांतच मजबूत पकडून दुसरे हातानीं फार जलद धारेची तात्काळ प्राण घेणारी कटार खिजरखानाचे पोटांत अशी जोरानें मारिली, कीं त्या माऱ्यानें खिजरखानाचे पोटांतील एकंदर आंतडी व पोटला पोटांतून बाहेर पडला. शेख मीनहान याजकडील एकंदर लोकांनींहि तरवारी उपसोन पठाण लोकांसी जाऊन भिडले. तेव्हां सरासरी खिजरखानासमागमें या रणभूमींत खिजरखानाकडील शंभर मनुष्यें ठार होऊन मातींत व रक्तांत पडलीं. खिजरखानाकडील बाकीचीं मनुष्यें डावे उजवे बाजूंनीं पळून गेलीं. खिजरखानाची फौज सहा हजार पठाण होती. ते सहा हजार लोक अत्यंत भयाभीत होऊन पळून गेले. अबदुल महंमद हा अबदुल करीम याचा फार जवळचा आप्त होता. तोहि या भयंकर गर्दीतून निघोन एक सांडणीस्वार बोलावून खिजरखानास शेख मीनहान याणी कत्तल केलें, म्हणजे जिवें मारिलें, असें वर्तमान कळविण्याकरितां अबदुल करीमखान याजकडे जलद पळत रवाना केला. अबदुल करिमखान याजला हें जेव्हां प्राणघातक भयंकर वर्तमान समजलें तेव्हां अबदुल करीम डोळ्यांत पाणी भरून दरबारांतून उठोन घरांतील महालांत आला आणि अति चिंताग्रस्त होऊन दुःखांत मुतकी होऊन बसला. या दुःखाचें वोझें अबदुल करीम याचे चित्तावर काफ म्हणोन फारच मोठा पर्वत आहे त्या पर्वताहून अधिक बसलें. आपले बचावाची सावधगिरी ठेवण्यास लागून आपले केवळ नातलग मनुष्यांशिवाय दुसरे कोणासच आपले आसपास देखिल येऊं देत नव्हता.

दरबारींहि येविषयीं फारफारच हुशारीनें बंदोबस्त ठेविला आणि अबदुल याणी मनांत आणिलें कीं, हे दक्षणी लोक खिजरखानास जिवें मारिले इतक्यावरच उगेच राहणार नाहींत. या गोष्टीनेंच पुरें करितील असें नाहीं खास. आणखी यापुढेंहि कांहीं मसलत करण्यांत पाऊल ठेवितील. जर करितां खवासखानास कैदेंतून मोकळे करण्याकरितां कंबर बांधून तिकडे जाऊन खवासखानास कैदेंतुन मोकळा करावा असें केलें असतां हे संकट आलें आहे तें निवारण होईल येविषयीं कसा विचार करावा? असें बोलला तेव्हां अबदुल करीम याजपासीं संनिध राहणारे फंदफितुरी व दुष्ट मसलतगार होते ते सर्व मिळोन बोलले कीं, खवासखान जिवंत राहाण्यांत बहुत संकटें आहेत. याजकरितां खवासखानास ठार मारावें. परंतु दुसरा कांहींच उत्तम विचार नाहीं असें बोलले. तेव्हां अबदुल करीम याणी ही मसलत आपले अकलेचे मसलतीप्रमाणेंच जाणोन तेच वेळेस जासूद रवाना केला. बंकापूर येथील हवालदारास ताकीद लेहून पाठविली कीं, ही ताकीद दाखल होतांच किंचितहि अवकाश न करितां खवासखान याजला जिवें मारून टाका. अशी ताकीद लिहून पाठविली. तेव्हां हवालदार मजकूर याणीं अबदुल करीम याचे हुकुमाप्रमाणें खवास-खान यास कैदखान्यांतच जिवें मारिला. त्या हवालदारानीं खवासखानाचें प्रेत अबदुल करीम याजकडे विजापुरास रवाना केलें. तारिख २० माहे जिलकाद बुधवारी सन १०८६ (२६ जानेवारी १६७६) रोजीं खवासखानाचें प्रेत विजापुरास पोहचलें. तें प्रेत खवासखानाचे बापाचे कबरेलगत जमिनींत पुरलें. असें बोलत होते कीं, खवासखान कत्तल जाहाला त्यास आज आठवा दिवस आहे. शेख मीनहान याचे हातून तारिख ६ माहे मजकुर (१२ जानेवारी १६७६) रोजीं खिजरखान कत्तल झाला होता व तारिख २७ माहे मजकूर (२३ जानेवारी १६७६) रोजीं जमालखान मयत खिजरखान याचा भाचा दरबारांत आला व तारिख पहिली माहे जिल्हेज (६ फेब्रुवारी १६७६) रोजीं पोपाख घेऊन शेख मीनहान याजला पकडून आणावयाकरितां रवाना झाला. तारिख आठवी माहे जिल्हेज (१३ फेब्रुवारी १६७६) रोजीं नबाब अबदुल करीमखानहि खुद जातीनें शेख मीनहान याचा सूड घेण्याकरितां इरादा करून विजापुरांहून निघाला.

## १०. अबदुल करीम याजमधें व दुसरे कित्येक पादशाही मंडळांत वाकडे येणें, वैर उभें राहाणें व राजधानीचे एकंदर कामाचा बखेडा होणें प्रकर्ण :

यानंतर नवाब अबदुल करीमखान वजिरीचे पद अधिकारावर व एकंदर हुकमी कामावर कायम जाहाला. आपआपली आसविषयीं मंडळी कामावर कायम

करण्याचा विचार करूं लागला. संपूर्ण हिंमत पटाण लोकांचें पालन करण्यांत नेमिली. आपले आप्तविषयी व जातीचे मंडळींस जवळ आणोन बहुत वसुलाचे परगणे व महाल चांगले चांगले त्या आपले लोकांचे जहागिरींत देऊन याच लोकांस पदाधिकार व कामाचे हुद्दे देऊं लागला. दक्षणी लोक व दुसरे सरदार मंडळींस हाकून देणें, बरतर्फ करणें व त्या लोकांचे पदाधिकार व त्याच्या ज्याहागिरींचा उच्छेद करणेंस प्रारंभ केला. दुसरे कितिएक सरदारमंडळ बहुत खराबींत व निरोपायपणांत येऊन बहुत संकटें भोगित होते. सैयद मखदुम पर्जाखानहि बहुत त्रासून खिन्न होऊन अंतःकर्णांत कपट वागवित होता. दिवसेंदिवस एकमेकांत वाकडेपणा जाहीर होत होता. तेव्हां तारिख १६ माहे मोहरम ( २१ मार्च १६७६ ) रोजीं रणभूमीनजिक जमाव जमून पर्जाखान याजकडील व अबदुल करीमखान याजकडील लोकांत मोटीच लढाई जाहाली. उभयतांकडीलहि बहुत मनुष्यें पठाण व दक्षणी लोक टार झाले. सैयद आशरफ व कासमकोड हे उभयतां याच लढाईत टार झाले. तेव्हां पर्जाखान याणी नवाब बाहादुरखानासी सख्य करण्याचा पाठ घातला आणि पकी मित्रता करून या संकटाचे निवारणाविषयीं बाहादुरखानास सला विचारिली. खर्ची होती तीहि एकाएकींच सरली. पर्जाखान याणी विचार पाहिला कीं, आतां फौज हातांतून जाती, असें जाणोन बाहादुरखानाकडे गेला. संदलापुरानजीक बाहादुरखानाची भेटी घेतली. नवाब बाहादुरखान याणी पर्जाखानाची बहुत आदरसत्कारानीं भेटी घेतली. बहुत उत्तम प्रकारानें व अति मित्रतेनें पर्जाखानाचें चित्तसमाधान करून फार दिलभरोंसा दिल्हा. ज्या भारी किंमतीचे मसनदीवर, म्हणजे बसावयाचे गादीवर, बाहादुरखान बसला होता ती भारी किंमतीची मसनद पंधरा हजार रोख रुपयासहित पर्जाखानास दिल्ही. अबदुल करीमखानाची ही अमर्यादेची चाल व माजूरपणा पसंत न येऊन तजविज ठरविली आणि कारमदार केला कीं, अबदुल करीमखान यांणी विजापूर येथील हुकुमी काम मुखत्यारीनें करित आहे ते सोडून या पादशाही हुकमी कामाची मुख्त्यारी दक्षणी लोकांकडे देऊन अबदुल करीमखान याणी दुसरे कित्येक अमीरलोकांसारिखे होऊन असावें. असा करार केला परंतु अबदुल करीमखान ही गोष्ट पसंद करित नव्हता. राजधानीचें मुख्त्यारीनें काम चालविलें होतें. ती मुख्त्यारी सोडित नव्हता. याजकारितां सख्य होण्याचा योग घडत नव्हता. शेवटीं नवाब बाहादुरखानांत व नवाब अबदुल करीमखानांत बहुत दाट सोबत होऊं लागली, म्हणजे उभयतांच्या वरचेवर भेटी होऊं लागल्या. तेव्हां तारीख २८ अठाविसावी माहे रबिलावल ( १ जून १६७६ ) रोजीं कुतुबुद्दीनखान म्हणोन दिल्ली येथील संभावित सरदारांपैकीं होता. त्या समागमें भारी फौज होती. इसलामखान रुमी म्हणोन अरबस्तान येथील कारभारी मंडळापैकीं होता. या उभयतांनीं फौज

आदिलशाहाचे मुल्कांत रवाना केली. ती फौज शहरानजिक येऊन पोहोंचून रसद बंद करित होते. अबदुल करीमखान याजला हा मोंगलाचा दंगा पूर्वेना. सबब मोंगलाचे पारिपत्य करण्याकरितां अबदुल करीम खुद जातीनें शहर विजापूर येथून निघाला आणि इलीयाबादेनजिक उभयतांचा सामना होऊन मोठी लढाई जाहाली. उभयतांकडीलहि बहुत मनुष्यें ठार जाहालीं व जखमी जाहालीं. इसलामखान हा त्या दिवशीं हत्तीवर बसला होता. कर्मधर्मसंयोगें इतक्यांत ऐन गर्दीचे व लढाईचे समई तो हत्ती पळत निघोन माहातास न मानितां त्या हत्तीनीं इसलामखान यास त्याचे पुत्रासहित अबदुल करीमखान याचे फौजेंत आणून पोंहचविलें. तेव्हां अबदुल करीम याजकडील फौजेंतील लोकांनीं त्यावर गर्दी करून हत्ती मध्यभागीं वेढिला आणि अंबारीच्या दोऱ्या कापून ती अंबारी जमिनीवर पाडली. इसलासखान याजला त्याचे पुत्रासहित ठार जिवें मारिलें. या दिवशीं अबदुल करीमखान याची फत्ते जाहाली.[७] हा इसलामखान रुम येथील बादशाहाकडून बसऱ्याचे मामलतीवर बहुत दिवस राहिला होता. शेवटीं एकाएकीं नवीन उत्पन्न झालेले विघ्नानें व कालचक्र उलटलें व दैव फिरलें यामुळें त्या दुर्दैववान इसलामखान याजला अरबस्तानांतून ओढून हिंदुस्थानांत आणोन टाकिला. तेव्हां अलमगीर पादशाहा यांणी इसलामखानास बहुत थोरपणानें व फार योग्यतेनें आधार देऊन सहा हजारी असें पद दिलें होतें व या लढाईंत बाहादूरखान याचे पाठबळानें व मदतगारीनें लढाईवर नेमला जाऊन मोंगलाचे फौजेसमागमें दक्षिण देशांत आला होता. सारांश, आदिलशाही दौलतीचा कारखाना बुडण्याचा समय फार संनिध येऊन पोंहचला त्यामुळें लढापा सुरू झाल्या व पादशाही दौलतींकडील एकंदर कारभारी मंडळांत परस्परें बहुत वांकडें येऊन व सरहद्दीवरील महाप्रबळ शत्रू, म्हणजे दिल्लीवाले, शेजारींच येऊन उतरून फुरसतीची संधी साधण्याकरितां टपून बसला व सिवा फार गैरराहा वागणुक करणारा व बदचालीचा माणूस हा नित्य नवीं संकटें उभीं करण्यांत व बदफैलीनें वागणुक करण्यांत दररोज सिवाचें पाऊल अधिकच पुढें होतें. यासमईं चहूंकडून संकटें व दंगा उभा राहिला होता व राजधानीवर चहूंकडून नानाप्रकाराचीं विघ्नें उभीं राहिलीं होतीं. यामुळें सिवानें हीच ऐन फुरसतीची वेळ व कार्यसिध्धीचा समय जाणोन स्वस्थ अंतःकर्णानें पादशाहाचा मुलुक घेण्याचा व आदिलशाहाचे मुलुक लुटण्याचा विचार करून येविषयीं किंचितहि अंतर करित नव्हता. हरएक महाल व परगणे भांडण न करितां घेत होता आणि माहाल व परगणे घेऊन त्या माहाल व परगण्यांचा आपण

७. शके १५९८ जेष्ठ वद्य ३० ( १ जून १६७६ ) बहादूरखानासी व बहलोलखानासी हलगीस लढाई जाहाली. इसलामखान रुमी मोगलाचा पडला. बहलोलखानाची फत्ते जाहाली.– जेधेश, पृ. २८.

मालक होत होता. हुसेनखान म्हणोन मुलूकाचे संरक्षणाविषयीं व सरहदींचे बंदोबस्ताकरितां नेमिला होता. तो हुसेनखान मुलकाचे व परगण्याचे व माहालाचे संरक्षणाविषयीं बहूत यत्न करित होता. त्या हुसेनखानास सिवा याणें दगलबाजीनें पकडून हुसेनखानास कैद केला. यद्यपि बाहादूरखान हा दक्षिणी लोकांचे संरक्षण करावें असें इच्छून अबदुल करीम याचा फडशा करावा असें इच्छित होता, परंतु दिलेरखान हा दिल्ली येथील नामांकित अमीरलोकांपैकीं होता तो दिलेरखान अबदुल करीम याचा पक्षपात करित होता. आणि अबदुल करीम जें सांगेल तें कबूल करणें हें आपल्याच बळास कारण आहे असें जाणून गुप्तपणें व प्रगटपणें अबदुल करीमखानाचे कामाची मजबुती करण्याकरितां यत्न करित होता. अबदुल करीमखानाचे इच्छेस जसें येईल व त्याचें मनोगत जसें असेल त्याप्रमाणें दिलेरखान सर्व कामें शेवटास लावित होता. रात्रंदिवस अबदुल करीमखानाचे कामाचे सिद्धतेचे यत्नांत राहून अलमगीर पादशाहास विनंतिपत्र लिहिलें कीं, अबदूल करीमखान हा खुद जातीनें अपराध क्षमा करण्याविषयीं इच्छित आहे आणि सिवाजीचे पारपत्य करण्याचा पत्कर घेऊन, इच्छित आहे कीं शिवाजीचा बिजापासून व मुळापासून फडशा करावा. असें अबदुल करीमखानाचे मनांत आहे असें विनंतिपत्र लिहिलें. तेंव्हां हें विनंतीपत्र पादशाहास बहुत पसंत आलें. दिलेरखानाचे रदबदलीमुळ अबदुल करीमखानाकडे हुकमी काम ठेवावें असें किंचितसे पादशाहाचे मनास आलें व थोडेंसे रजामंद झाले. परंतु दक्षिणी लोक व बाहादूरखान हे या गोष्टीस राजी होत नव्हते. अबदुल करीमखानास बर्तर्फ करावें व त्याचा निर्मूळ फडशा करावा याशिवाय कांहींच इच्छित नव्हते. याच दिवसांत अबदुल करीम याचे मुखत्यारीचे योगानें नानाप्रकारचीं संकटें उभीं राहून आदिलशाहाचा बहुत मुलुक सिवाचे हातीं व मोंगलाचे हातीं गेला. आहासनाबादचा किल्ला तारिख १६ वी जमादिलावल सन १०८० ( १०८८ पाहिजे ) एक हजार ऐंशीं ( अठ्याऐंशी पाहिजे ) ( ७ जुलै १६७७ ) रोजीं मोंगलाचे हातीं गेला व तारीख १२ जमादिलावर सन मजकूर ( २ आगष्ट १६७७ ) रोजीं शाहादुर्गचा किल्लाहि मोंगलाचेच हातीं गेला [८] व याच सालचे रजेब महिन्यांत (आगष्ट–सप्टेंबर १६७७) नवाब बाहादूरखानास हुजूरचे

---

८. शके १५९९ आषाढ मासी ( जुलै १६७७ ) बहादुरखानें अदलशाहाचे लालदरगे कोट घेतला. श्रावण मासी ( आगष्ट १६७७ ) रणमस्तखानाच्या विद्यमानें नळदुर्ग घेतले.– जेधेश, पृ. २८–२९. A letter came from Khan Jahan Bahadur to say that on Monday the 14th May 1677 ( 21st Rabilawal 1088 A. H. ) Naldurg had been captured by the imperialists.-MiA,p.99. येथें जमादिलावल कां रबिलावल बरोबर असा प्रश्न उद्भवतो.

बोलावणें आलें, सबब दिल्लीस गेला.[९] बाहादूरखान दिल्लीस निघून गेल्यानंतर पादशाहाचे आज्ञेवरून दिलेरखान हा दक्षिण देशचे जिल्ह्यावर व आदिलशाहाचा मुल्क घेण्याचे कामावर कायम जाहाला.

११. राजधानीचा बखेडा जाहाला याजवर मसऊदखान याणीं चिंता करणें, राजधानीचा बंदोबस्त ठेवण्याचा विचार ठरविणें, तानाशाहा याज पासीं येविषयीं विनंती करणें व तानाशाहा याणीं अबदुल याजला बोलाविणें प्रकर्ण :

सिद्दी जवहर (जोहार) सलाबतखानाचा जावई सिद्दी मसऊदखान हा सलाबतखानाचे पाठीमागे त्याचे जाग्यावर कायम होऊन उदोनीचे तालुक्यांत व त्याचे ताब्यांतील मुलकांत हुकमी कामावर कायम होऊन आपला पूर्ण मनोरथपणा सर्वांस जाहीर करित होता. आपले धण्याचे, म्हणजे आदिलशाहाचे, राजधानींत बखेडा जाहाल्यानंतर, या प्रकारची खराबी जाहाल्यानंतर व पठाण लोक फार प्रबळ व जबरदस्त जाहाल्यानंतर शिकंदर पादशाहाचा मुखत्यारपणा नाहींसा जाहाल्यानंतर फारच मनांत जळत होता. या राजधानी विषई फार कळकळत होता. शेवटीं धण्याचे मीठ खाल्लें इमान सांभाळण्याकरितां व सेवकपणा सिध्धीस नेण्याकरितां दौलतीचें कल्याण इच्छिणें त्याजला प्राप्त जाहालें, कां याच पूर्ण दंग्याचे अवस्थेत आपण एकीकडे बसणें व राजधानीचा बदोबस्त करणें सोडून फटकून एकीकडे राहाणें हें या समयीं फार अयोग्य जाणिलें. या दंग्याचे वेळेस ढिलाई व सुस्ती करणें आपले बेमानपणाचें व अपकीर्तीचें कारण आहे असें जाणिलें. सर्व कामें सोडून देऊन राजधानीचे बंदोबस्ताचा विचार करूं लागला. सेवकपणाच्या चाली सिध्धीस नेण्याकरितां हिमतीनें कमरेवर यत्नांचा पटका फार मजबूत बांधिला, म्हणजे पूर्ण धैर्य धरून यत्न करूं लागला. तेव्हां आपले मित्र व आपले संकटाचे समयांतील सोबती, म्हणजे दोस्त व जे जे गृहस्थ पठाणाचे उपद्रवानें त्रासले होते ते, सयद मखदुम पर्जाखान वगैरे सारिखे होते त्या सर्व मंडळींमुद्धां कुतुबशाहा अबुल हसन तानाशाहा याचे दरबारांत जाऊन विनंती केली. ही संकटें उभीं राहिलीं येविषयीं कशी मसलत करावी ! असा सल्ला विचारला. आदिलशाही राजधानींत

९. शके १५९९ भाद्रपद मासी (सप्टेंबर १६७७) बहादूरखान तगीर होऊन दिलेलखान सुबा आला.– जेधेश, पृ. २८. After 15th August 1677 Khan Jahan Bahadur was summoned to the Court and that Diler Khan was ordered to keep watch till the arrival of another Subedar.-MiA,p.99

फार बखेडा जाहाला येविषई कसा बंदोबस्त करावा असा विचार तानाशाहास विचारिता जाहाला. तेव्हां पूर्वीपासून कुतुबशाहानीं आदिलशाहाचें व आदिलशाहानीं कुतुबशाहाचें परस्पर एकमेकांचे साह्य करणेंची चाल गुजरणें श्रेष्ठ पुरुषांचे कारकीर्दी-पासुन होतें. सत्य विचार पहातां दोन्ही राजधान्या कांहीं एक भीन्नत्व नसतां एक-पणानेंच होत्या. कुतुबशाहा याणी कांहीं यत्न करण्याविषयीं व झटण्यास किंचितहि अंतर न करितां या कामाविसीं विचार करूं लागला. कुतुबशाहा याणीं सत्य जाणिलें कीं, या राजधानीचा लगाम, म्हणजे मुखत्यारी, पठाण लोकांचे हातून काढून इमानी चाकर, धन्याचे मीठ खावून वाढलेला पुरातन आणि बहुत दिवस दौलतीचे कल्याण इच्छित आलेला मसऊदखान आहे या मसऊदखानाचे, हातीं देणें घडत नाहीं. तात्पर्य या राजधानीचा बंदोबस्तहि होणार नाहीं. असें जाणून आपले थोर थोर संभावित कारभारी मंडळासमागमें एक आज्ञापत्र दिलभरंवशाचे मजकूरानें भरलेलें अबदुल करीम याजला बोलावणेंविसीं लिहून कारभारीयांस त्या पत्रासहित अबदुल करीम याजकडे रवाना केले. अबदुल करीम याजला कुतुबशाहानी आपलेपासीं हुजुर आणविलें. अबदुल करीमखान पूर्ण मजबूत व प्रबळ असा राजधानीचा बंदोबस्त न राहातां निखालस बखेडा जाहाला यामुळें आपले ठिकाणीं बहूत चिंताग्रस्त होता. कुतुबशाहाकडील बोलावणें येतांच जमशीदखान याजला आपले तर्फेनें मुखत्यारीचें कामावर विजापूर येथें ठेवून अबदुल करीम हैदराबादेस निघाला. जेव्हां कुतुबशाहापासीं जाऊन पोंचला तेव्हां कुतुबशाहा याणीं त्याजला अत्यंत मेहरबानगीनें व बहूत थोरपणा देऊन चित्तसमाधान करून, नानाप्रकारचे अति उत्तम नीति व बोध सांगोन कल्याणाचा मार्ग दाखविला. आज्ञा केली कीं, दौलतीचें कल्याण इच्छिणारे सेवकांस व धण्याचे मीठ खाऊन वाढलेले चाकर लोकांस हें योग्य आहे कीं, या पृथ्वींतील कीर्ति व परलोकीचा उत्तमपणा स्वामी सेवेविषयीं प्राणखर्च करण्यांतच आहे असें जाणोन सेवकलोकांनीं सर्व हिंमत यांतच खर्च करावी, कीं आपले धण्याची दौलत अति बंदोबस्तानें, बहुत सुरक्षितपणानें, शोभिवंत व कायम राहील तें करावें. भाऊपणासारिखे वैर व वाकडेपणा व घराऊ शत्रुत्व आपसांत असेल ते एकीकडे सोडून देऊन यजमानाची राजधानी संरक्षण करण्याविषयीं असा पूर्ण यत्न करावा कीं, बाहेरील शत्रूचे जबर-दस्तीचा हात त्या राजधानीवर न चढतां ते शत्रू आपले ठिकाणीं अति खिन्न व खराब होऊन राहावेत. असा बंदोबस्त ठेवावा. नाहींपेक्षां जरकरितां सेवकांनीं आपलेच कल्याणावर दृष्टी ठेऊन आपला वैरभाव व मनांतील वांकडेपणा न सोडि-तील तर व भाऊपणासारिखें वैर व एकमेकांत कपट ठेवणें व अदावत करणें कायम ठेऊन एकमेकांत भांडू लागतील व परस्परें लढतील तर मग प्रसिद्धच आहे कीं, जे शत्रु फुरसतीची संधी साधण्याकरितां टपून बसलेच आहेत ते शत्रुलोक

एकदांच चहूंकडून उठोन गर्दी करून मुलुख व राज्य घेतील. मग चिंतेपरतें व पश्चातापापरतें दुसरे कांहींच कोणाचे हातीं लागणार नाहीं. आदिलशाहाचे चाकरलोकांस सर्व लहानथोर मनुष्यें दूषण ठेवितील व निरंतर अपकीर्ति राहील. या विस्तारांतील तात्पर्य हें आहे कीं, तुम्हां सर्व आदिलशाही कारभारी मंडळांत भांडणें लागलीं व एकमेकांत वांकडे आलें यामुळें आदिलशाहाचे राजधानींत बखेडा जाहाला. बहुत करून हे आदिलशाहाचें राज्य बहुत दिवसाचें व फार योग्य असतां या राजधानीचा निखालस फडशा जाहाला. अशा प्रकारचा नाश जाहाला आहे कीं, ही आदिलशाहाची राजधानी तत्लक्षण इमारतीचा पाया एका धक्यानें पडेल अशी खराब जाहाली. आतां तें बरें आहे कीं, तुम्हीं आपले फौजेस फांटा देऊन, म्हणजे बर्तर्फ करून, तुम्ही कारभारांत न शिरतां बेकार होऊन कांहीं दिवस एकीकडे बसावें. आणि तुम्ही मुखत्यारीनें काम करावें. विजापूर येथील मुलकी काम मदारूल महामीचे मुख्य कारभारीपणाचें काम सिद्दी मसऊदखानाचे हवालीं करावें. तुम्ही त्याचें मदतगारीविषई यत्न करून उभयतांनीं मिळून आपले धन्याची राजधानी कायम राही असें करून बंदोबस्त ठेवावा. असें केलें असतां ही गोष्ट हरएक प्रकारें सर्वांचेच कल्याणास कारण होईल. तुम्ही सर्व आपले धण्याचे दौलतीचें कल्याण इच्छिणारेच आहांत. तुम्हां सर्वांचे उपयोगास व सुखास व जितकीं मनुष्यें आहेत त्या सर्व मनुष्यांचे कल्याणास कारण होईल.

## १२. कुतुबशाहाचे बोध व नीति शिकविणें अबदुल करीमखान याणीं कबूल करणें, विजापूर येथील राजधानीचा कारभार मुखत्यारीनें करित होता तो सोडून देणें व मसऊदखानाचा किल्ला परत देणें प्रकरण :

नवाब अबदुल करीमखान याणीं कुतुबशाहाचे उत्तम प्रकारचे आज्ञेवरून जबरदस्तीचे व उपद्रवाचे काम सोडून कुतुबशाहा याणीं सांगितलें त्याप्रमाणें कबूल केलें. विजापूर येथील हुकमी काम मुखत्यारीनें करित होता तें सोडून देण्यास राजी जाहाला. परंतु शिपाई लोकांचा चाकरी बदलचा ऐवज देणें अबदुल करीमखानाचे जिम्मेस होता त्याबद्दल तगादा होता. तो ऐवज हिशेब पहातां सहा लक्ष होन बाकी देणें ठरलेलें कलम मनांत आणून अबदूल करीमखान याणी कुतुबशाहास विनंती केली कीं, हा सिपाई लोकांचा ऐवज दिल्याखेरीज विजापूरचा किल्ला हवालीं करून देणें कसें घडेल ? असें बोलला तेव्हां कुतूबशाहा याणीं जाणिलें कीं, हा इतका ऐवज मसऊदखानाचे हातून दिला जावयाचा नाहीं. कारण कीं, इतका

ऐवज फेडणेंचे मसऊदखानांत सामर्थ्य नव्हतें. यास्तव आपण या कामांत आरंभी पाय ठेविला तसें शेवटास नेलें पाहिजे हेंच आपल्यास योग्य आहे. नाहींपेक्षां सर्व लहानथोर मनुष्यांत थट्टा होईल. सर्व लोक हासूं लागतील. त्या दिवसांत कुतुबशाहास दुसरें एक कारण फार जरुरीचें होतें व तें कारण म्हणजे मोंगलांशीं सख्य करण्याचें होतें. कुतुबशाहा याणी जाणिलें कीं, अबदुल करीमखान याचे दिलेरखानांसी फारच सख्य आहे. दिलेरखानासी आपले सख्य होणेचें प्रकर्ण अबदुल करीमखान याचे वशिल्यानें होईल तर हें काम फार सुलभपणानें व अति उत्तमपणानें घडेल. यास्तव कुतुबशाहा यांणी आपले कामावर दृष्टी ठेवून एकंदर शिपाई लोकांचे देण्याचा कुतूबशाहा यांणी हवाला घेतला व जामीन झाला. आम्ही आपले खजिन्यांतून सहा लक्ष होन देऊन मसऊदखानास मदत करून म्हणजे मसऊदखान तो ऐवज अबदुल करीमखान याजला पावता करून विजापूर येथील ममलकत मदारीचें म्हणजे मुख्य कारभारीपणाचें मुखत्यारीचे काम मसऊदखान हस्तगत करील. यास्तव हवाला घेतला आणि अबदुल करीमखान याजपासून करार ठरवून घेतला कीं, मसऊदखानाचें व अबदुल करीमखानाचें सख्य जाहाल्यानंतर आपले व दिलेरखानाचेंहि सख्य करून घ्यावें. असा अबदुल करीम याजपासून करार करून घेतला.

## १३. कुतुबशाहाचे वसिल्यानें मसऊदखान व अबदुल करीमखान या उभयतांचे सख्य होणें प्रकर्णे :

मसऊदखान व अबदूल करीमखान या उभयतांचें सख्य या पांच कलमांवर ठरलें कीं, अबदुल करीमखान याणी आपली फौज बरतर्फ करावी, फौजेचे सहा लक्ष होन देणें राहिले आहेत ते सिद्दी मसऊदखान याजपासून घेऊन विजापूरचा किल्ला मसऊदखानाचे हवालीं करावा, विजापुरचा किल्ला हस्तगत जाहाल्यानंतर आकान्ना, म्हणोन मादान्ना याचा सख्खा बंधु, हा कुतुबशाहाचे राजधानींतील मुख्य वकिल होता व बहूत अकलवान व फार समजूतदार सर्व पृथ्वीस प्रसिद्ध होता त्या आकाना, या नांवाचे वकीलास सुलतान शिकंदर पादशाहाचे चाकरींत कायम ठेवून मसुदखान यांणीं खुद जानीनें विजापूरचे किल्याबाहेरील एकंदर मुलकाचा बंदोबस्त करून सिवाजी फार बदफैलीनें वागणूक करून नाना प्रकारचे फंदफितूर करित आहे त्याचे व दुसरे कित्येक अमर्याद लोक आहेत त्यांचे पारिपत्य करण्याचा पत्कर घेऊन अलमगीर पादशाहाकडील सरदारांसी व फौजेसी बहुत सख्य ठेऊन शिकंदर पादशाहाची राजधानी कायम राहण्याविषयीं यत्न करित जावा. याप्रमाणें हा करारनामा मजबुतीनें प्रतिज्ञापूर्वक लिहून उभयतांनींहि त्या करारनाम्यावर

आपआपले शिक्के केले. तें सख्य जाहाल्यानंतर लागोपाठच अब्दुल करीम याचे वसिल्यानें कुतुबशाहा व दिलेरखान या उभयतांचेंहि सख्य उभयतांचे मनोदयाप्रमाणें बहुत मजबुतीनें प्रतिज्ञापूर्वक जाहालें. त्यानंतर कुतुबशाहाचे अंतःकर्णी हीं दोनी कामें सिद्धीस गेलीं या योगानें स्वस्थ झालें आणि दिलेरखानास परत जाणेंविषयीं निरोप दिल्हा. त्यानंतर कुतुबशाहा याणीं सहा लक्ष होनाची चिटी लिहून त्या चिटीवर आपली मोहर करून ती चिटी अब्दुल करीमखान याजला दिल्ही. अब्दुल करीमखान याणी ती चिटी मसुदखानास दिल्ही आणि बोलीला कीं, हे सहा लक्ष होन कुतुबशाहापासून घेऊन विजापुरचा किल्ला घ्याल त्यावेळेस हा ऐवज मजला पावता करावा. यानंतर मसुदखान व अब्दुल करीमखान या उभयतानीं कुतुबशाहापासून निरोप घेऊन विजापुराकडे चालते झाले. कुतुबशाहाचे फौजेंतील महंमद इब्राहीम मीर बक्षी याणी कुतुबशाहाचे हुकूमावरून आपला पुत्र मिरजा संजर याजला तीनचार हजार स्वारांनिशीं मसुदखानाचे समागमें विजापुरास पोहचवून परत येण्याकरितां रवाना केला.

## १४. मसुदखानाचें दिलेरखानासीं सख्य होणें प्रकर्ण :

मसुदखान व अब्दुल करीमखान हे उभयतां मिळोन कलबुर्ग्यास येऊन पोहचले तेव्हां पुन्हां मसुदखान व अब्दूल करीमखान या उभयतांची दिलेरखानासी भेटी जाहाली. येथें या उभयतांचें सख्य दिलेरखानासी जाहालें. या प्रकारें कीं, मसुदखान याणी सुलतान शिकंदर पादशाहाचे पेशकार व मदारुलमहाम, म्हणजे मुख्य कारभारी, होऊन मुल्काचा बंदोबस्त करण्यांत व माजुरी लोकांचे दंग्याचे पारपत्य करण्याविषई यत्न करून अलमगीर पादशाहाचे चाकरींत व आज्ञेंत तत्पर असावें. सिवासी कदापि किंचितहि दोस्तीचा राबता न ठेवितां आदिलशाहाचा मुलुक सिवाचे हातीं गेला आहे तो सोडवून घेणेंकरितां दिलेरखानाचे फौजेस मदत देत जावें. सुलतान शिकंदर पादशाहाची बहीण पादशाहा बिबी इचें लग्न पादशाहाजादा महंमद आजमशाहा यासीं खवासखान याणीं ठरविलें होतें त्याप्रमाणें सिध्धीस नेऊन पादशाहा बिबीची रवानगी दिल्हीस करावी. दिलेरखानाचे कर्जाचा हवाला घेतला होता तो हप्तेबंदीनें फेडावा. अलमगीर पादशाहाचे व दिलेरखानाचे आज्ञेंतून केशा-इतकेंदेखिल अंतर करून बदलूं नये आणि आकान्ना हा कुतुबशाहाचा मुख्य वकील शिकंदर पादशाहापासीं मुखत्यारीचें कामावर ठेविला आहे त्याचे मसलतीप्रमाणें तो सांगेल तशी वर्तणूक करित जावी. याप्रमाणें सख्य जाहाल्याचा करारनामा ठरल्या-नंतर दिलेरखान आपले मुलुकास जाता जाहाला.

## १५. वाटेंतच अबदुल करीम याणी मरण पावणें :

मसऊदखान व अबदुल करीमखान हे उभयतां कलबुर्ग्याहून निघाले तेव्हां बहूत आनंदयुक्त चालते जाहाले. मनांत हें आणिलें कीं, आपण बहुत मनोरथपूर्ण होऊन परत आलों व राजधानीचे कामाची मुखत्यारी आपले हातीं आली. दिवसें-दिवस आतां आपलें चांगलें होईल असें मनांत आणिलें. परंतु हें लक्षांत आलें नाहीं कीं, रात्र तल्लक्षण स्त्री गरोदर आहे या रात्रीस उदईक कोणते प्रकारचें मूल होईल हें लक्षांत आलें नाहीं, म्हणजे आजची रात्र गेल्यावर उदईक काय घडेल हे ध्यानांत आलें नाहीं. हें निर्दयी कालचक्र कोणचे संकटाचा खेळ प्रसिध्द करील व हली मनोरथ पूर्ण झाले आहेत ते उदईक कशा तऱ्हेनें निराशपणानें व चिंतेनें बदल होतील हें समजलें नाहीं; म्हणजे कलबुर्ग्याहून निघोन हिरापुरास मजल करून येऊन राहिले. तेव्हां एकाएकीं प्रारब्ध योगानें अबदुल करीमखान याची प्रकृति बिघडली. एकाएकीं फारच थकला. अबदुल करीमखान याचे आयुष्यच सरलें होतें. यामुळें कोणा एकाचेच औषध उपाय लागू जाहाले नाहींत. कोणाचेच धावाधावीचा उपयोग जाहाला नाहीं. शेवटीं तारिख ८ माहे जिलकाद सन १०८८ (२३ दिसेंबर १६७७) रोजीं अदुबल करीमखान मरण पावला.[१०] तेव्हां मसऊदखानास फारच चिंता प्राप्त जाहाली. चिंतेचे विचारांचा मोठा पर्वतच मसऊदखानाचे चितावर पडला, म्हणजे फारच चिंता प्राप्त जाहाली. अबदुल करीमखानाची मित्रता प्राप्त जाहाली होती व तो मित्रतेचा आनंद एक क्षणांत या दुःखानें बदल जाहाला. कारण कीं, उभयतांनीं राजधानीचे कामाचा मनसुबा म्हणजे बेत हजारो ठरविले होते ते अशा प्रकारें एकाएकीं सर्व बेत बिघडून जाऊन हा प्रसंग प्राप्त जाहाला. असो. हरएक प्रकारें मसऊदखान याणी अबदुल करीमखान मरण पावल्याचा शोक आवरून तें दुःख एकीकडे ठेवून अबदुल करीमखानाचे प्रेतास स्नान घालून कफन करून ते प्रेत पुरण्यांत व अबदुल करीमखानाचे पुत्राचे चित्तसमाधान करणें व शांतवन करण्यांत निमग्न जाहाला. दोन तीन दिवस दुःखांत घालवून तारिख ११ माहे जिलकाद (२६ दिसेंबर १६७७) रोजीं करारप्रमाणें अबदुल करीम याचे बायका-मुलांचें सख्य करण्याकरितां हिरापुराहून कूच करून विजापुरास चालता जाहाला. वाटेमध्यें जमषीदखानाची पत्रें मसऊदखानास येऊन पोहचली कीं, आम्हीं अबदुल करीमखान याचे हुकुमावरून विजापुरचे हुकमी कामावर मुखत्यारीनें राहिलो आहो व मी जें केलें तें अबदुल करीमखानाचे हुकुमानें केलें आहे. हली अबदूल करीमखान

१०. शके १५९९ पौश मासी (दिसेंबर १६७७ – जानेवारी १६७८) बहलोलखान (अबदुल करीमखान) परलोकास गेले. विजापूर मसुदखानाच्या हवाली जाले. तोच कारभारी जाला. – जेधेश, पृ. २९.

मरण पावला. तुम्ही विजापुरचा किल्ला घ्यावयाकरितां येत आहांत यास्तव आधीं दोन कामांचे ठराव जाहाले पाहिजेत. एक तें काम कीं, तुम्ही शफता घ्याव्यात कीं, कोणत्याच कामाविसीं मजला विचारपूस करूं नये. कारण कीं, जें जाहालें तें अबदुल करीमखानाचे हुकुमानेंच केलें व दुसरें तें काम आहे कीं, सहा लक्ष होन कराराप्रमाणें आतांच माझे हवालीं करावे, म्हणजे किल्ला हवालीं करून दिल्यानंतर कांहीं एक बोलणें व ऐकणेंचें कारण उभयतांमध्यें रहाणार नाहीं. हीं दोन कामें जाहाल्याशिवाय तुम्ही इकडे यावयास पाऊल पुढें ठेवाल तर लढाईसी गांठ पडेल. अशीं पत्रें येऊन पोहचलीं. मसऊदखान याणी संपूर्ण वर्तमान अबदुल करीम मरण पावलेचें व विजापुरचा किल्ला हवालीं करून देणेंविषयीं जमषीदखान याणीं हरकत करणें व फौजेस निरोप घ्यावयाचा त्या लोकांचा रोजमुरा चढला आहे तो रोख ऐवज आतांच मजपाशीं द्यावा असें जमशीदखान याणीं मागणेंविसी वगैरे तपशीलवार लिहून सहा लक्ष होन पाठविण्यांत यावेत म्हणोन कुतुबशाहास पत्र लिहिलें. कुतुबशाहानीं कराराप्रमाणें सहा लक्ष होन पाठविण्यास अनमान केला. तो ऐवज पाठविला नाहीं व क्रोधास आला. तेव्हां मसऊदखान हा बहुत चिंताग्रस्त जाहाला आणि या कामांतील अभिप्राय समजण्याकरितां कित्येक दिवस भिवरा नदीचे किनाऱ्यास राहिला. तांवे म्हणोन गांव आहे त्या मौजे ताब्यांत मुकाम करून व्यंकटाद्री याजला जमषीदखानाकडे पाठविला. बहूत रदबदली करवून जमषीद-खानाची समजूत करविता जाहाला. व्यंकटाद्री याणी जमषीदखानाची नानाप्रकारें समजूत केली. ज्या लोकास बडतर्फ करावयाचें त्यांचे ऐवजाचा हवाला घेऊन कांहीं रोख ऐवज त्याजला पावता केला. कांही ऐवजाचे रोखे सौदागरांवर देविले व बाकी राहिला तो ऐवज विजापुरास दाखल जाहाल्यानंतर देऊं अशी मुदत केली. तेव्हां हरएक प्रकारें जमषीदखानाची ऐवजाविसीं खातरजमा जाहाली व विजापूरास आल्या-नंतर कांहींएक कामकाज प्रकर्णी विचारपूस करणार नाहीं अशा शफता दिल्या.

## १६. विजापुरचे किल्यांत मसऊदखान याणी दाखल होणें प्रकर्ण :

तारिख ५ माहे मोहरम सन १०८९ (१७ फेब्रुवारी १६७८) रोजीं व्यंकटाद्री याणी मुरारी म्हणोन मसऊदखानाचे दौलतखान्यांतील म्हणजे राजधानींतील बहूत श्रेष्ठ नामांकित होता त्याजला विजापुरांत आणिला. जमषीदखान तेच दिवशीं विजापुरांतून निघोन अबदुल करीमखानाचे वाड्यांत येऊन उतरला. तारिख ९ रोजीं गुरुवारीं (२१ फेब्रुवारी १६७८) मसऊदखान खुद जातीनेंहि विजापुराचे किल्यांत दाखल जाहाला. दोन तीन दिवसानंतर कुतुबशाहाचे लष्कर जमषीदखानाचे वांकडेपणामुळें आलमल्यास

ठेविले होते त्या लष्करास विजापूर येथून निरोप देऊन हैदराबादेस रवाना केलें. मसऊदखान याणी यानंतर वरचेवर विनंतीपत्रें कराराचा ऐवज पाठविणें विषई पादशाहाकडे पाठविलीं. कुतुबशाहा मानीतच नव्हते आणि सदरहू ऐवज पाठविणें विषई ढिलाई करित होते. नानाप्रकारचे बाहानें व सबबी सांगोन ऐवज न देण्याबदल व ऐवज पाठविण्याविषई फारच अनमान केला. येणेंकरून कुतुबशाहा व मसऊदखान या उभयतांत फारच वांकड आलें. उभयतांची फारच विटाविट जाहाली.

## १७. मसऊदखानाचे कारकीर्दीत राजधानींत बखेडा होण्यास प्रथम हें कारण जाहालें कीं, कुतुबशाहा याणीं कराराप्रमाणें ऐवज पाठविला नाहीं. यामुळें पठाणांचा दंगा होण्यास कारण जाहालें हें प्रकर्ण वर्णन :

प्रथम हें कारण जाहलें कीं, सिद्दी मसऊदखान याचे कारकिर्दीत राजधानीत बखेडा जाहाला. सिद्दी मसऊदखान याचे येण्यानें राजधानीचें कामांत कांहींशी दुरुस्ती जाहाली होती. आतां आपले चांगलें होईल अशी सर्वांस उमेद वाटली होती. पुन्हां निराशेनें वांकडेपणाचा चेहरा दिसों लागला. निरोप घ्यावयाचे ते पठाण लोक रोजमुऱ्याचा ऐवज मागावयाकरितां मसऊदखानास तगादा करित होते व अबदुल करीम याचे निसबतीचे लोकांसहि सदरहू ऐवजाबदल उपद्रव करित होते. तो विस्तार लिहिण्यानें सरावयाचा नाहीं. इतका उपद्रव करित होते. जमषीदखानास व अबदुल करीमखानाचे पुत्रास नानाप्रकारचे बेहुरमतीचीं भाषणें करून ऐवज वसूल करित होते. नवाब अबदुल करीमखान यांचा जामदारखाना व तोफखाना व दुसरे कित्येक कारखान्यांतून जें जें हातीं सांपडेल तें तें पठाण लोक घेत होते. येथपर्यंत कीं, अबदुल करीमखान याचे वाड्यांतील स्वयंपाकाचीं भांडी देखिल उरूं दिल्हीं नाहींत. येथपर्यंत पठाणानें गर्दी केली. जमषीदखानाचे पुत्रास व जमषीदखानाचे मातुश्रीस व बहिणीस व नहारीस व तोफखान्याकडील हवालदाराचे भाचे वगैरे अबदुलखानाचे निसबतीचे जे जे लोक होते ते धरून कैद करून त्या लोकांचे अंगास दोर बांधून नित्य पाण्यांत बुडवून गटकळ्या देत होते व तापलेले धोंड्यावर बसवून ऐवज वसूल करित होते. इतक्याच गोष्टीवरहि पुरें न करितां शहरांतील सुखवस्तु मनुष्यें चहूंकडील सौदागर येतील ते व शहरांतील एकदर मनुष्यांस ज्या मनुष्यांपासीं द्रव्य आहे असा संशय येत होता त्यांजला पकडून त्या मनुष्यांस मारामारी व ठोकाठोकी करून जबरदस्तीनें त्यांजपासून द्रव्य घेत होते. हरएक मनुष्याचे घरांत निसंशयपणें शिरून त्या घरांतील मनुष्यांस नानाप्रकारच्या इजा देत होते. या पठाण लोकांस जें जें घर रिकामें दिसत

होतें व त्या घरांतील मनुष्यें या इजा देणारे पठाण लोकांचे उपद्रवानें घरें टाकून जात होते, त्या रिकामी घरांची लांकडे काढून काळे मातीचे दराने विकित होते. एके दिवशीं हकीम षमसुद्दीनखान हा मलीक बरखुरदार हा नवा मोगल याचे घराहून येत होता. तेव्हां पठाण लोक त्यावर धांवून जाऊन गचीं दरवाज्यानजिक हकीम षमसुद्दीनाचे भावास व जावयास ठार मारून हकीम षमसुद्दीन याजला पालखींतून खालीं पाडून हकीम याचे पुत्रासहित व दुसरे जांवई होते त्यासहित व हकीम षमसुद्दीनाचे समागमें त्यांचीं आप्तविषयीं मंडळी होतीं त्यांसहित हकीम षमसुद्दीन याजला ओढींत ओढीत अबदुल करीमखानाचे वाड्यांत नेऊन त्या सर्वांस कैद करून ठेविलें. मसऊदखान याणी शहापूर दरवाजाचे बुर्जावर चढून इच्छित होता कीं, पठाण लोकांचे पारपत्यावर फौज रवाना करावी; तों पठाण लोकांनी निरोप पाठविला कीं, जर करितां आम्हांवर फौज रवाना होईल तर आधीं हकीम षमसुद्दीन याजला व त्याचे ताबेदारींतील लोकांस ठार जिवें मारूं. त्यानंतर आम्हीं मेले जाऊं. मलीक बरखुरदार याणीं हकीम षमसुद्दीन याजला सोडवून घेण्याविषयीं बहूत यत्न केला. परंतु कांहीं एक उपयोग जाहला नाहीं. पठाण लोक हकीम षमसुद्दीन याजला नित्य थंड पाण्यांत बसवून गटंगळ्या देऊन, रोजमुऱ्याचा ऐवज मागित होते.

## १८. नबाब अबदुल करीमखानाचे पुत्रास पठाण लोकांनीं फार इजा देणें व त्या पठाण लोकांचे पारपत्याकरितां मसऊदखान याणीं फौज रवाना करणें प्रकर्ण :

एके दिवशीं पठाण लोकांनीं फारच अयोग्यपणा करून अबदुल करीमखानाचे स्त्रीवर फार जबरदस्ती करून अबदुल करीमखानाचा पुत्र अबदुल रौफ म्हणून होता त्याजला मजबूत पकडला आणि काट्याचें अंथरूण करून त्यावर विस्तू पसरून त्या अग्नीवर धरून बसवित होते आणि फारच फार इजा देण्यास प्रारंभ केला. मसऊदखान शाहापूर दरवाजावर चढून मल्हारी पंडित व हसनखान रोहिला व अबदुल करीमखान दाऊदजी याजला नवाब अबदुल करीमखान याचे वाड्यास पठाणाकडे सवाल जबाब देण्याकरितां व रदबदली करण्याकरितां पाठविले. मल्हारी पंडित तेथें जाऊन पठाण लोकांचा हिशेब करूं लागला. मल्हारी पंडित व पठाण लोकांत रदबदली फारच लांबली. शेवटी पठाण लोकांनीं फारच अयोग्यपणा करून मल्हारी पंडित याजला फारच मार देऊन मल्हारी पंडित याजला मारीत मारीत कैदेंत नेऊन ठेविलें. हसनखान व अबदुल करीमखान दाऊदजी या गर्दीतून सुटून बाहेर पडून आले. या उभयतांनीं मसऊदखानास निरोप सांगून पाठविला कीं, पठाण लोक याणीं फारच अमर्यादा व दांडगाई करून मल्हारी पंडित

याजला कैदेंत बसवून टेविलें आहे. यास्तव येविषयी नीट एखादा विचार काढिला पाहिजे. असा निरोप ऐकतांच मसऊदखान याणीं व्यंकटाद्री व षर्जाखान याजसमागमें एकंदर फौज देऊन या पठाण लोकांचे पारिपत्य करणेंकरितां रवाना केलें. तेव्हां उभयतांनीं फौजेसुद्धा जाऊन अबदुल करीमखानाचा वाडा वेढून त्या वाड्यावर हल्ला केला. तारीख २ दुसरी माहे रबिलावलचे साहावे तासापासून तारिख ३ तिसरी माहे मजकूरचे नववे तासापर्यंत (१४ व १५ एप्रिल १६७८) सारिखा हल्ला चालला होता. उभयपक्षींहि मोटी लढाई होत होती. कांहीं थोडेसे पठाण लोकांपैकीं पंधरा सोळा असामी पठाण ठार झाले. बेवीस असामी इकडील कत्तल जाहाले व बहुत जखमी जाहाले. तेव्हां पठाण लोक थकून जेरीस येऊन सख्य करण्याचे मार्गावर येऊन हसनखान रोहिला व अबदुल करीमखान दाऊदजी या उभयतांस या बोलण्यांत घेतलें. हे उभयतां पुरुष सख्य होण्यास आश्रय आहेत. या उभयतांचे वशिल्यानें सख्य होईल असा विचार करून करार ठरविते जाहाले कीं, हा हिशेब पहातां निरोप घ्यावयाचे पठाण लोकांचे रोजमुऱ्याबदल बाकी देणें ऐवज एक लक्ष साठ हजार होन राहिले आहेत, त्यापैकीं दिलेरखान याणी तीस हजार होन दिले आहेत. बाकी राहिले ते मसऊदखान याणी आपले जवळचे देऊन नवाब अबदुल करीमखान याचे पुत्रास वगैरे लोकांस सोडवून घेतल पाहिजे. असा करार ठरविला परंतु व्यंकटाद्री याणीं कबूल केलें नाहीं. तेव्हां मध्यम प्रकारें बाकी फेडण्याचा ठराव करून दर शेंकडा चाळीस होन देणें ठरविले. व्यंकटाद्री याणीं तेहि कबूल न करितां बोलला कीं, दर शेंकडा पांच होन देऊं व तेहि तुमचे भिडेस्तव देऊं, यावर अधिक देणें आमचे हातून व्हावयाचें नाहीं. याप्रमाणें कबूल करित असल्यास फार चांगलें, नाहींपेक्षा पठाणांस मार देऊन मारीत मारीत बाहेर हाकून देऊं. सारांश, याप्रकारें रदबदलीची बोलणीं बहुत जाहालीं. हरएक प्रकारें त्या दिवशीं पठाण लोकांची समजूत करून करीमखानाचा पुत्र अबदुल रौफ याजला व मल्हारी पंडित व हकीम षमसुद्दीन व त्याचे ताब्यांतील लोकांस मिळोन या सर्वांस पठाणांचे हातून सोडून घेतलें. हसनखान याणीं नवाब अबदुल करीमखानाचे पुत्रास व मल्हारी पंडितास, या उभयतांस व्यंकटाद्रीस भेटवून, खिजरखानाचे वाड्यांत आणोन ठेविलें. या धांदलीत मसऊदखानाकडे किल्ल्याचे आंतील बंदोबस्ताचे हुकमी कामाखेरीज कांहींच मुखत्यारी नव्हती. यास्तव शहरचे दरवाजे बंद करून निरोपायपणानें वेळ घालवित होता.

**१९. चिंतो चिमणाजी म्हणोन ब्राम्हण मोठा फंदफितूर वगैरे खेळ करणारा बंडखोर याणी शहरांतील एकंदर राहाणारे मनुष्यांवर जबरदस्त होणें व सदरहू लोकांवर बहुत जुलुम व वेदाद करणेंस प्रारंभ करणें प्रकर्ण :**

ईश्वरी सामर्थ्य फार चमत्कारिक काम करित आहे. कारण कीं, शहर विजापूर येथील किल्ल्यांतील राहणारीं मनुष्यें पठाण लोकांचे वगैरे उपद्रवापासून कांहींशीं किल्ल्याचे आश्रयांत व सुखांत राहिलीं होती. निर्दई कालचक्राचे मनास हेंहि आलें नाहीं. त्या किल्ल्यांतील मनुष्यानीं सुखांत राहून कांहीं दिवस वांचावें असेंहि कालचक्रास वाटलें नाहीं. कालचक्रानें नानाप्रकारची संकटें उभीं करणेंचा विचार करून त्या लोकांवरहि संकट आणिलें म्हणोन मसऊदखान याजपाशीं द्रव्य नव्हेत, खासगी लष्कराचे व शागीर्दपेशे व पादशाही महालांतील माणसांचे राजमुजऱ्याचा ऐवज देऊन बाहेर यावें असा ऐवज हातीं नव्हता यामुळें मसऊदखान निरुपाय होऊन घाबरून चिंताग्रस्त जाहाला. चिंतो चिमणाजी, जात ब्राम्हण मादरचोद म्हणजे मात्रागमनी व ईश्वराचे भय न ठेवणारा कुलघातक व घर बुडवणारा, याणी व्यंकटाद्रीसी सख्य करून मसऊदखानाची भेट घेऊन शहरांतील एकंदर मनुष्यांस पीडा करणेंचें काम पतकरलें. हरएक मनुष्यापासून द्रव्य घेणें ही जुलूम करणाराची चाल प्रसिद्ध आहे. या चालीचा पत्कर घेऊन एकंदर मनुष्यांस पीडा करूं लागला. प्रथम हसनखान पीलगदार, म्हणजे बाळगलेले वाघावरील कामदार, व मिरजा मतुल्ला व मिर अबदुल कासम वल्द खानमहंमद करीम व धर्माजी पंडित व भवानी सिंपी याचे पुत्र या सर्वांस धरून त्यास मारामारी करून त्याचे सामर्थ्याहून अधिक द्रव्य त्यावर बसविलें. सहा पेठेंतील तेली व वाणी हे सर्व तांबोलीपणाचा उदिम करित होते त्यांजवर बहुत द्रव्याचा कर बसविला. असेच संपूर्ण मुसलमान लोक व हिंदु व सौदागर व सर्व लोक यांजला बहुत बहुत संकटांत घालून टोकाटोकी करून द्रव्य हरण करूं लागला. येथपर्यंत जुलूम करण्यास आरंभ केला कीं, बायका किंवा पुरुष जे कोणी रस्त्यांत किंवा बाजारांत भेटतील व त्यांचे अंगावर बारिक वस्त्र किंवा त्याजपासीं थोडेसें सामान आहे असें दिसलें म्हणजे हरएक बाहान्यानीं त्या मनुष्यास जबरदस्तीनें पकडीत होते. त्यापासून कांहीं घेतल्याशिवाय त्या मनुष्याची या लोकांचे हातून सुटका होण्याचे सामर्थ्य नव्हतें. बहुतेक मनुष्यें अशीं होतीं कीं, या जबरदस्त ब्राम्हणाचे उपद्रवानें व द्रव्य मागील ते देण्याचें सामर्थ्य नाहीं यामुळें अति चिंताग्रस्त होऊन आपले जिनगानीवर उदक सोडिलें, म्हणजे घरदार टाकून निघोन गेले. हसनखान चितेवान व तेली तांबोळी होते त्याजपासून व हकीम षमसुद्दीनखान याजपासूनहि याच रीतीनें पंच्याहातर हजार होन घेतले. हा बेदादपणा व जुलूम येथपर्यंत येऊन पोहचला होता कीं, एक ब्राम्हण बाजारांतून

एक होनाचे आंबे खरिदी करून घरास आणित होता. त्या ब्राम्हणास चिंतो चिमणाजी याजकडील लोकांनीं वाटेंतच धरून घेऊन गेले. त्या ब्राम्हणास बोलले कीं, तूं घरचा एकटा व दरिद्री असें असतां इतके आंबे खरिदी करण्याचे काय कारण? इतके का खरीदी केलेस? हे कोणास द्यावयाचे आहत? कोठील आहेत? असें बोलून या ब्राम्हणावर बहुत जुलूम केल्यानंतर त्याजपासून या गुन्हेगारीबदल पन्नास होन घेऊन त्याजला सोडून दिल्हे. दुसरा एक गृहस्थहि दोन होनांचे जोंधळे खरिदी करून आपले घरास नेत होता. त्याजला चिंतो चिमणाजी याजकडील लोकांनीं धरिलें आणि त्याजला बोलले कीं, तुझे घरी दोन किंवा तीन शेराहून अधिक खर्च नसेल. असें असतां इतके कित्येक पल्ले जोंधळे कां खरीदी केलेस? असें बोलून याजपासून सहा होन गुन्हेगारी-बदल घेतले. चिंतो चिमणाजी याचे निसबतीचे लोकांनीं येथपर्यंत जुलूम व बेदाद केलें असें असतां दुसरेकडील फौजेंतीलहि लोक व कित्येक दुसरे हरामी लोक चहुंकडोन जुलूम करण्याविषयीं मुख्त्यार जाहाले. ते लोक आपआपले रोजमुऱ्याचे ऐवजाबदल ज्या मनुष्यापासी द्रव्य आहे असा संशय येत होता त्याजला धरून सोटग्यानें व काठीनें मार देऊन त्याजला रुपये द्यावे असें वाटलें किंवा न वाटलें परंतु जबरदस्तीनें त्याजपासून द्रव्य घेतच होते फार चमत्कारिक समय आला होता. कारण कीं, शहराचे बाहेर पठाणांची गर्दी त्या प्रकारची व किल्ल्याचे आंत चिंतो चिमणाजी याचा जुलूम व त्याचे निसबतीचे लोकांचा जुलूम व बेदाद येथपर्यंत झाली असे वाटते कीं शहरचे किल्ल्यां-तील व शहराबाहेर शहरांत राहणारे एकंदर लोकांवर अति संकटाचा ईश्वरी कहराचा व पादशाही जुलूमाचा पाऊस पडत होता. बहुत मनुष्यें ज्यांत शक्ती होती ते ते आपलीं बायकामुलें घेऊन बायकामुलांसुद्धां घरांतील जिंनस व मालमत्तासुद्धां परगावीं निघोन गेले. कांहीं लोक बायकामुलें व घरदार सोडून या जुलूमास्तव निघोन जात होते. त्या गर्दींत व दंग्यात विजापुरची निमे वस्ती उठली आणि निमे विजापूर ओसाड जाहालें. सन ११७० अकराशे सत्तर १७५७ इ. स. साली एक गृहस्थ कलाबुतीचे विणकरीचे काम करणाराचे जातीपैकीं कर्नाटकचे मुलुकापैकीं फिरत फिरत आला होता. त्या गृहस्थास तुझी जात कोण आहे व तूं कोणत्या कुळीचा आहेस? असें विचारिलें. तेव्हां तो बोलला कीं, माझे वतनाची जागा वडिलोपार्जित विजापूर आहे. माझा आजा त्या गर्दीचे समईं, कीं जुलुम व बेदाद या विजापूर शहरांत बहुत होऊन सर्व मनुष्यांवर गर्दी जाहाली होती ते समईं, माझा आजा विजापुरांतून निघोन गेला आणि कर्नाटकांत राहिला. मी माझे आज्यापासून ऐकिलें. माझा आजा सांगत होता कीं, त्या दिवसांत जुलुम व बेदाद येथपर्यंत जाहाली होती कीं, मी वरचेवर गुन्हेगारीबदल व खंडणीबदल ऐवज देऊन थकलो. माझे जिवावर संकट आलें. शेवटीं एके दिवशीं त्या जुलूमानें वसूल करणारे लोकांनीं सात वेळ मजपासून जबरदस्तीनें द्रव्य घेतलें. त्याच दिवशीं मी विजापूर येथून निघोन मी आपले घरदार सोडून मुशाफर होऊन निघालो. असा माझा

आजा सांगत होता. आणखीहि मी आपले आज्यापासून ऐकिले आहे कीं, विजापूरचे शहरांत कलाबुती विणकरीचे कारखाने सातशें होतें. त्या सातशे कारखान्यापैकीं मी एका कारखान्यावरील मुख्य कामगार होतो.

## २०. मसऊदखान व षर्जाखान या उभयतांत वाकडे येण्यास व वैरभाव उत्पन्न होण्यास कारण होणें प्रकर्ण :

हीं संकटें पुरतीसी विझलीं नव्हतीं तोंच या वाकडे चालीचे कालचक्रानें या शहारांतील गोरगरीब रहाणारे लोकांवर दुसरेच संकट ओढविलें. म्हणजे मिया मसऊदखान व सैद मखदुम षर्जाखान या उभयतांत वांकडें आलें. तेव्हां फंदफितूर करणारे हरएक कामाचा बखेडा करणारे लोक वाकडेपणाचा व शत्रुत्वाचा अग्नि उभयतांमध्यें पटेविला होता, म्हणजे या दुष्ट लोकांनीं उभयतांत फारच वाकडे आणिलें. तेव्हां षर्जाखान यांणीं मसऊदखानासी वाकडेपणाची चाल ठेऊन मसऊदखानाचे वैरत्वावर उठला. फौज जमवून भिवरेचे पलीकडील मुलुक घेतला. बहुत फौज सुद्धां विजापुरास येऊन पादशाहाचे चाकरीवरील व बेकार मनुष्यांस आपल्यासी जमऊन घेऊन व त्या मनुष्यांस बहुत आस्था दाखऊन आणि सिवाजीसी मित्रतेचा घाट घालून ओले व वाळलेले जाळूं लागला, म्हणजे योग्य कामें व अयोग्य कामें दोनींही करूं लागला. त्या विचाराचे पाठीस लागला कीं, व्यंकटाद्री व मुरारी या उभयतांस धरून कैद करावें किंवा ठार मारावें. मिठीशाहा म्हणोन बहुत विश्वासू षर्जाखानाचे दौलतींत होता. उभयतांचें चांगले होण्याबदल बहुत यत्न करून उभयतांचें सख्य केलें. मसऊदखान याणीहि वाकडेपणा सोडून देऊन षर्जाखानास ज्या मुलकाची इच्छा होती त्या मुलकाचा मोकासा पादशाहाचे आज्ञेवरून षर्जाखानास दिल्हा. परंतु फंदफितूर व बखेडा करणारे लोक षर्जाखानापासी होते. त्याणी मिठीशाहावर आदावतीनें नवें संकट उभें करून षर्जाखानाचें व मसऊदखानाचें सख्य जाहालें होतें तें बिघडून टाकिलें. असेंच तीन वेळ मिठीशाहाचे यत्नानें मसऊदखानाचें व षर्जाखानाचें सख्य जाहालें. पुन्हां बखेडखोर लोकांचे फंदफितुरीनें उभयतांची दोस्ती नाहिसीं होऊन उभयतांत बिघाड येऊन मित्रतेचे ठिकाणीं वैरत्व उत्पन्न जाहालें. अशी चहूंकडून संकटें उभीं राहिलीं तेव्हा बिचारा मसऊदखान चहूंकडील संकटांत त्रासला. मसऊदखान बहुत यत्न करून एक संकट विझविण्यापासून मोकळा पुरतासा जाहाला नाहीं तोंच दुसरें संकट उभें राहात होतें. आजीज अंबरखान याणीं दोन तीन हजार स्वार जमऊन सिधनुरांत बहुत दांडगेपणाचा झेंडा उभा करून सिधनूरचे आसपासचा मुलुक घेतला. बहुधा मसऊदखानाचे मुलकापर्यंतहि चालून येऊन त्या जिल्ह्यांत दंगा आरंभिला. सिवाजी

बदफैलीनें वागणुक करणारा वाईट कर्माचा याणीं त्या महान संकटाचे समयांत काय काय संकटें उभीं केलीं व कसीं कसीं बदफैलीचीं कर्में केलीं हा विचार करावा म्हणजे लक्षांत येईल. विजापूर शहराचे आसपास थिलगी व जमखिंडी व यादवाडपर्यंत तिकडील सर्व महालांवर ठाणीं बसऊन महालोमहालचा वसूल घेत होता. उदोनीचे मुल्कांत फौज पाठऊन तिकडील सर्व मुलुक लुटणें चालविलें. आदिलशाहाचे सरहद्दींतील मुल्कांत चहूंकडे दंगा व गर्दी उभी केली. जेव्हां आनंद व धर्माजी हे उभयता शहरांत होते तेव्हां दुसरे कित्येक लोक या उभयतांसीं गुप्तपणें मिळोन या लोकांनीं मसऊदखान व व्यंकटाद्रीस ठार जीवें मारण्याचा बेत केला. व्यंकटाद्री यांणी या प्रकर्णी बातमी घेऊन, जलद हुशार होऊन, हा मजकूर मसऊदखानास कळविला. तेव्हां मसऊदखान यांणी फारच जलदीनें येविषयींचा बंदोबस्त करून या सदरहू बखेडेखोर लोकांस पकडून त्यांजला कैदेंत घातलें आणि हें संकट निवारण केलें. सिद्दी नुसरत मुल्क सुंदर यांणी मसऊदखानाचे पुत्र व बायकामुलें घरमंडळी वगैरेंस खजिना व सामान सरंजामासुद्धां उदोनी येथून विजापुरास आणिलें. जेव्हां येते वेळेस रायचूर येथें येऊन पोंहचले तेव्हां रायचूर येथील किलेदार आका खुसरव हा या मसऊदखानाचे घरमंडळीवर चालून येऊन आका खुसरव यांणी नुसरतमुल्क याजला ठार जीवें मारून मसऊदखानाचे घरमंडळीस खाजन्यासुध्दां रायचूरचे किल्यांत नेऊन ठेविलें. मसऊदखानाचे चित्तावर अनेक चिंतेची ओझीं बसलीं होतीं. या दुःखाचे ओझें सर्व दुःखाहून फारच भारी होऊन दुःखाचा आलावा, म्हणजे ताबूताचे दिवसांत खळगा खणून त्यात अग्नि पेटवून करितात त्यास आलावा म्हणतात तसा या दुःखाचा आलावा, जाहाला, म्हणजे फार दुःख झालें.

## २१. आका खुसरव याचे कैदेंतून आपली बायकामुलें सोडऊन घेण्याकरितां मसऊदखान यांणी पादशाहा बिबी इजपासी फिर्याद करणें व पादशाहा बिबी इणें ताऊसमा इजला रायचुरास पाठविणें प्रकर्ण :

आका खुसरव याणी मसऊदखानाची बायकामुलें सामान सरंजामासुद्धां वाटेंतूनच फिरवून रायचुरचे किल्यांत नेऊन कैदेत ठेविलीं. अशी खबर कळल्यानंतर मसऊदखान बेशुद्ध होऊन असा मनांत घाबरला कीं, मसऊखानांत कांही एक शक्ती राहिली नाहीं. मसऊदखान याणी आपलीं बायकामुलें सोडऊन घेण्याकरितां बहुत प्रकारें विचार केले. नाना प्रकारच्या युक्ती करून पाहिल्या. परंतु एकहि विचार कामाचे उपयोगी नाहीं असे जाणिलें. कोणतीच युक्ती चालावयाजोगी दिसत नाहीं असें पाहिलें तेव्हां अति सत्वर शिकंदर पादशाहाची बहीण सुल्तान शहरबानु उर्फ शाहा बिबी इचे वाड्यांतच एकांत स्थानी तिजपासीं जाऊन पोहचला. पादशाहा बिबी ही स्त्री असोन फारच अकल-

वान व हुशार व बहुत धीराची होती. पादशाहाचे सर्व सेवकलोक व कारभारीमंडळ व वाड्यांतील सर्व माणसं पादशाहा बिबीपासीं रूजु होऊन व तिचे धणीपणाच्या मर्यादा संभाळण्यावर नजर ठेवून तिचे चाकरींत व आज्ञेत तत्पर राहून किंचितहि अमर्यादा करित नव्हते. या पादशाहा बिबीचे महालाचे दारापासीं जाऊन मसऊदखान यांणी फिर्याद केली आणि फारच काकुळती येऊन बहुत गरिबीनें आपले मजकुराची विनंती केली कीं, हा सेवक म्हणजे मी ज्या दिवसापासून घरदार सोडून आपले सेवेंत येऊन दाखल जाहालों त्या दिवसापासून एक दिवस देखील सुखानें व गोडीनें अन्न खाल्ले नाहीं. सुखानें उदक देखील प्राशन केलें नाहीं. एक घटका किंवा एक पळदेखिल स्वस्तपणानें बसलों नाहीं व निद्राहि घेतली नाहीं. रात्रंदिवस घाबरेपणानें व संकटानें घालावेली आहे. येथपर्यंत संकटें भोगिलीं कीं पोटापुरतें अन्न व वस्त्रदेखील नाहींसें जाहालें. सिपाई लोक वगैरेंचे रोजमुऱ्याचे ऐवज फेडून मोकळा होईन तर माझे हातीं द्रव्यहि नाहीं. माझा कोणी असा मित्र व मददगारहि नाहीं कीं या चहूंकडून उठलेले संकटांत त्याजकडून मदत येऊन सुख पावेन. असे कोणीच मजला साह्य नाहीं व रात्रंदिवसचे दंग्यानें व संकटानें दोन दिवसांची देखील फुरसत नाहीं. सिवा दांडगा अमर्याद पुरुष यांणी मुलकाची पायमली व खराबी करण्यांत व आदिलशाहाची राजधानी बुडविण्यांत इतके तत्पर राहून व बहुत झटून दंगा व गर्दी कली आहे कीं, आदिलशाहाचें संपूर्ण मुलकांत जळजळाट व प्राणघातक संकट उभें केलें आहे. सरकारांतील इमानी कामदारांनींहि भाऊपणासारखे वैर व वांकडेपणा धारण करून येथपर्यंत बखेडा केला आहे कीं, नित्य नवे संकट उत्पन्न करित आहेत. यामुळें रात्रंदिवस सायंकाळपासून प्रातःकाळपर्यंत व प्रातःकाळपासून सायंकाळपर्यंत चिंताग्रस्तपणांत व संकटांत मी असा बुडालों आहे कीं, एक दिवसाचे सुखाचे बहुधा एक पळदेखील विश्रांतीचे मजला स्मरण नाहीं. असें असतां आणखी मी असा काय अपराध केला आहे व माझेकडून असा कोणता गुन्हा घडला आहे कीं, माझी बायकामुलें देखिल कैद जाली आहेत व माझी बायकामुलें कैदेंत पडली. यामुळें माझी निखालस अब्रू गेली. हें सदा फिरणारें कालचक्र माझे वैरत्वावर व आदावतीवर उलटोन मजवर नाना प्रकारचीं संकटें व तऱ्हेतऱ्हेचीं विघ्नें उभीं केलीं. हें संकट व हें विघ्न व हें दुःख हरघटकेस माझे जिवाचे नाडीस छळते. अशा बेअब्रूपणानें व निस्तेजपणानें जगणेंपेक्षां मरावें हें मजला चांगलें वाटतें. मरण्यांत फार गोडी आहे. आपण खावंदानीं मज सेवकाचे संकटाचे अवस्थेवर कृपादृष्टीनें अवलोकन करून व मज सेवकाचें प्राण वांचविण्याची आपण धण्यानीं जिंमा घेऊन माझी बायकामुलांची सुटका होण्याचा आपण कांहीं अकलेनी विचार काढिल्यास व कोणी विश्वासू थोर मनुष्य हुजूरानीं आपलेकडील रवाना करून त्या जबरदस्ताचे, म्हणजे रायचूर येथील किल्लेदाराचे, हातून माझी बायकामुलें व सामान सरंजाम व मालमता सोडऊन घेतल्यास

माझा प्राण वाचेल व कांहीं दिवस संसार होईल. या आपले कृपेंत व या उपकारांत मी जिवंत आहे तोपर्यंत आपले चाकरींत राहीन आणि स्वस्थपणानें व खातरजमेनें आपली सेवा करण्यांत प्राण खर्च करीन. नाहींपेक्षां मी प्राण देण्याचा आपले मनांत खास निश्चय केला आहे. अशी विनंति केली. तेव्हां पादशाहा बिबी इणें त्या आपले इमानी सेवकाची व आपले मिठानें पालन केलेले सेवकाची, म्हणजे मसऊदखानाची, फार संकट अवस्था पाहून मसऊदखानाचें दुःख व चिंता आपले मनांत आणोन त्याविषयीं विचार करिती झाली आणि ताऊसमा म्हणोन महालांतील दाई फार अकलवान व बहुत समजुतदार व सर्व संनिध राहाणारे अकलवान कारभारी मंडळापेक्षां श्रेष्ठ योग्यतेची होती व त्या ताऊसमा इजला सरखेलीचें पद दिल्लें होतें त्या ताऊसमासमागमें एक आज्ञापत्र फार दिलभरंवशाचे मजकुराचें आका खुसरव याचें नावें लिहून रायचूर येथें रवाना केलें. सिद्दी आलम म्हणोन अफजलखानाचा जावई व सिद्दी याकूत पडद्यावरील कामदार व सय्यद दहुरुस याजला ताऊसमाचे समागमें रवाना केलें. ताऊसमा इजला साफ ताकीद केली कीं, जर करितां आका खुसरव यांणीं मसऊदखानाची बायकामुलें सोडून देण्यास हरकत केल्यास हरएकप्रकारें तुम्हांस कळेल तशी त्याची समजूत करून काम करावें व तेंहि न होईल तर रायचूरचे इलाख्यांत जितका मुलूक आहे तितका कडेचूर व इसलपूर व इनवआलपूर हे चार महाल खेरीज करून बाकीचा सर्व मुलुक त्याचे हवालीं करून मसऊदखानाचीं बायकामुलें व मालमता वगैरे किरकोळ वारिक जिनस सुद्धां याचे हातून सोडऊन घेऊन यावें व पादशाहा बिबी इणें आणखीहि या प्रकर्णी पर्जाखान व सर्फराजखान कर्नाली अशा कारभारी मंडळास आज्ञा केली व अबुल हसन कुतुबशाहा याचे जवेंतहि पत्र लिहून पाठविलें. ताउसमा रायचूर येथें जाऊन पोहचली. तेव्हां त्याचे लागोपाठच मिठीशाहा पर्जाखान याजकडून व आनंदराव व सर्फराजखान व धर्माजी पंडित व श्रीनिवासराव हे कुतुबशाहा याजकडून येऊन पोहचले. तेव्हां बहुत रदबदली केल्यानंतर आका खुसरव याणी मसऊदखानाची बायकामुलें व सामानसरंजाम व मालमत्ता किंचितहि न ठेवितां ताउसमा समागमें देऊन रवाना केलें. ताउसमा मसऊदखानाचें बायकामुलेंसुद्धां व त्याचें सामान सरंजामासहित सुरक्षितपणें विजापुरास येऊन पोहचली. मुरारबागेंत येऊन उतरली. दुसरे दिवशीं मसऊदखान स्वार सिबंदी घेऊन बहुत थाटानें मुरारबागेपर्यंत जाऊन आपले घरमंडळीस व आपले निसबतीचे लोकांस सामानसरंजामसुद्धां किल्यांत आणिलें.

## २२. मसऊदखान याणी शिवाजीसी सख्य करणें व याच कारणानीं पुन्हां मसऊदखान व मोगल या उभयतांत वैर उत्पन्न होणें प्रकर्ण :

सिवाजीची गर्दी व दांडगेपणा फारच जाहाला. अशा प्रकारें कीं, सिवाजी यांणी आदिलशाहाचे एकंदर मुलकांत धांदल व दंगा उभा केला. येथपर्यंत कीं, सर्व गोरगरिबांस व एकंदर रयत लोकांस सिवाजीचे पिशाच्यासारिखे वर्तणुकीनें व अयोग्य चालीनें झोप घेणें व अन्न खाणें व पाणी पिणें देखिल मना जाहालें. असें वाटतें कीं, सिवाजीचे भयानें व जरबेनें ही भूमिदेखिल कांपत होती. सिवाजीनें गर्दी चालविली ती किंचितहि कमी होतच नव्हती, बहुधा दिवसेंदिवस अधिकच होत होती व सय्यद मखदुम याचे वैरत्वानें व नमून असण्यानें व दुसरे कित्येक अमर्याद पुरुष चहूंकडोन उठले व गर्दी करित होते त्या दंग्यानें मसऊदखान इतके सामान सरंजामानिसीं असोन घाबरून वेड्यासारखा होऊन धीर धरणें किंवा स्वस्थ बसणें मसऊदखानास कोणतेच प्रकारानें प्राप्त होत नव्हतें. जो विचार मसऊदखान काढित होता त्यांत कल्याण दिसोन येत नव्हतें. बहुधा चांगला विचार काढावयास गेलें म्हणजे त्या विचारापासून उलटें म्हणजे वाईट फळ प्राप्त होत होतें. यास्तव मसऊदखान निरुपाय होऊन फारच घाबरला आणि मोगलासी जे करारमदार केले होते ते सर्व विसरून जाऊन तो विचार करिता जाहाला कीं सिवाजीसी मित्रतेचा राबता ठेवावा.[१२] दिलेरखान याजला येविषयीं वर्तमान कळोन दिलेरखान यांणी मसऊदखानास कितीहि लिहिलें व दिलभरंवसा दिल्हा कीं सिवाजीसी सख्य करणें व मित्रतेचा पाठ घालणें हें तुम्हांस निखालस योग्य नाही. या कर्मांचें फळ तुम्हास वाईटच प्राप्त होईल. कशा करितां धैर्य सोडून देऊन हा अयोग्यपणा व वाकडेपणा मिळविलात ? धैर्य धरा. हिंमत सोडूं नका. पादशाहाची संपूर्ण फौज तुमचे मदतीस प्राण खर्च करण्यास हजर आहे. यास्तव असें केलेंच पाहिजे कीं, या समयीं आदिलशाहाचे यशस्वी फौजेचे आधारानें तर्फेतर्फेतील आसपासचे एकंदर शत्रुमंडळ व दांडगे व जबरदस्त आहेत त्यावर चालून जाऊन त्याचे पारपत्य करितां येईल व जबरदस्त सिवाजीचे हातीं जो मुलुक गेला आहे तो सोडऊन घेतला पाहिजे व मालिक बरखुरदार कादिमरी यांणीहि नाना प्रकारचे नीति व बोध सांगोन कल्याण इच्छिण्याचा हक्क बजाविला, म्हणजे कल्याणाचा मार्ग सुचवावयाचा तसा सुचविला. सिवाचें सख्य करण्यांत जे जे वाईटपणा व घात होते ते मसऊदखानाचे मनांत आणोन देऊन त्या कामाची म्हणजे सिवाजीसी सख्य करण्याची मनाई करिता जाहाला. परंतु चहूंकडून फारच संकटें उभीं राहिलीं होतीं. यास्तव मसऊदखान फारच इतका घाबरला होता कीं, त्याजला कांही नीति व बोध शिकऊन सिवाजीसी सख्य करण्यापासून माघारा फिरवावें म्हणोन बहुत यत्न केला. तत्रापि मसऊदखान याणी कांही एक ऐकिलें नाहीं. सिवाजिशीं सख्य करून सिवाजीकडे पत्रें व निरोप पाठविण्यास आरंभ केला. सिवाजीस

पत्र लिहिल कीं, तुम्हांस व आम्हांस अति संनिधपणाचा संबंध आहे, म्हणजे तुमची व आमची सरहद फारच नजिक आहे व तुम्ही व आम्ही या राजधानींतील एक ताटांतील जेवणारे आहों, म्हणजे दोघेहि याच दौलतीचे अन्नानें वाढलेले आहोंत. ही दौलत सुरक्षित असावी येविषयीं चिंता तुम्हांस व आम्हांस एकसारखीच आहे. आदिलशाहाची दौलत बुडविण्याविषयीं शत्रु कंबर बांधून रात्रंदिवस या विचारांतच आहेत. या कामाचा विचार तुम्ही व आम्ही केला पाहिजे. हें उभयतांसहि जरूर आहे. तुम्ही व आम्ही एकमेकांत अनोळखीपणाचा मळ आहे तो दूर करून परस्परें तुम्ही व आम्ही एक होऊन परकी शत्रु आपले मुलकावर चालून आले आहेत त्यांजला आपले मुलकांतून बाहेर घालऊन देऊं. पारसी अर्धे बैतेचा अर्थ : " दोघांची चित्तें एक जाहालीं म्हणजे पर्वतास देखील फोडतील ". सिवा दांडगेपणाचे स्वभावाचा याणी हा निरोप आपले मनोगतानुरूप समजून तो मसऊदखानाचा निरोप कबूल केला आणि शफता देऊन मसऊदखानास ठकविता जाहाला. मसऊदखानास बहुत आशा दाखऊन उमेदवार म्हणजे आस्थायुक्त केला. या कारणास्तव मसऊदखान व दिलेरखान या उभयतांत फारच वांकडे आलें. फंदफितूर व बहुत खराबी होण्यास प्रारंभ जाहाला. मोगल लोकांनीं ही मसऊदखानाची वॉगणूक बदलली, मसऊदखान करारमदार सोडून वागत आहे असें समजून विजापूर घेण्याचा विचार करिते झाले. विजापूर घेण्याचा संकल्प बहुत दिवस मोगलाचें अंतःकरणांत होता. परंतु उभयतांत, मोगलांत व आदिलशाही दौलतींत, सख्य असण्याचे करारमदार ठरले होते यास्तव मोगल लोक म्हणजे दिल्लीवाले पादशाहा कांहीं उपद्रव न करितां स्वस्थ बसले होते ते पुन्हां पूर्वस्थितिवर येऊन वैरत्वावर उठले. विजापूर व विजापूरचे ताब्यांतील एकंदर मुलुक घेण्याचा इरादा करून येविषयीं उद्योग करिते जाहाले.

### २३. मोंगलांनीं विजापूर येथील फौज ठकविल्यानें परागंदा करणें व विजापूर येथील कारभारी मंडळीस गोडीचा भाव दाखऊन आपलेकडे आणणें प्रकर्ण :

प्रथम विजापूर येथील फौज व सिपाई लोकांचे जमातीस परागंदा करण्याचा विचार करिते जाहाले. अवदुल करीमखनाचे बंधू व पुत्र व सरदार लोक व दुसरे कित्येक अमीर लोक जमातवाले हे राजधानीचें कल्याण असावें अशी इच्छा धरून राहिले. बेकारपणानें, म्हणजे कांहीं एक रोजगारधंदा नसोन, हीच मार्गप्रतिक्षा करून बहुत हालानें दिवस घालवित होते. दारिद्राचे संकटानें व खाण्यापिण्यास कांहीं नाहीं तेव्हां क्षुधेचे उपद्रवानें अगदींच सामर्थ्य नाहीसें जाहालें. चांगले होण्याचें व

कल्याणचें रूप कांहींच दृष्टीस येत नव्हतें. यास्तव हरएक मनुष्यांनीं हरकोणीकडे निघोन जाण्याचे खास निश्चय केले. तेव्हां मलिक बरखुरदार याणी सविस्तर मजकूर या प्रकारची दशा जाहाली आहे असें विनंतिपत्र लिहून अलमगीर पादशाहाकडे पाठविलें. या विनंतिपत्रांत लिहीलें कीं, अबदुल करीम याणी कामाचे उपयोगी यावयाजोगी फौज जमविली आहे आणि या फौजेचे बळानें सिवाजीसी लढाई करित होता व बहुत वेळ सिवाचा मोड करून त्याजवर जबरदस्त होत होता. हलीं बेकार-पणामुळें हरएक मनुष्यांनीं हरएक जाग्याकडे निघोन जाण्याचा इरादा केला आहे व ही फौज अशी आहे कीं, जिकडे जाऊन उतरेल तिकडे पारडे भारी वजनाचे होईल, म्हणजे ही फौज ज्यासी मदत करील त्याची फत्ते होईल, अशी फौज आहे. यास्तव आतां ती मसलत बरी आहे कीं, या लोकांस पादशाहापासीं दाखल करून, म्हणजे पादशाहाचे चाकरीवर ठेऊन, यांजकडून सिवाची पाठ व कंबर मोडून टाकवावी, म्हणजे या लोकांकडून सिवाचें पारपत्य करवावें. असे विनंतिपत्र लिहिलें. अलमगीर पादशाहानीं तें विनंतिपत्र पाहून त्या विनंतिपत्रांतील अभिप्राय लक्षांत आणिला. तेव्हां ती मलिक बरखुरदार याची अकलेची मसलत पादशाहानीं पसंत करून पादशाहानीं ही फौज चाकरीवर ठेवणेंविषयीं दिलेरखान व मलिक बरखुरदार या उभयतांचे नावें आज्ञापत्रें लिहून रवाना केलीं. तेव्हां मलिक बरखुरदार हा एकएक मनुष्यास दिलभरोंसा देऊन व त्याजला खर्चास देऊन विजापुराहून दिलेरखानाकडे पाठवीत होता. तेव्हां त्या हरएक मनुष्यास बक्षिस देऊन व त्यासी बहुत गोडीचे भाषणानें त्याचें चित्तसमाधान करून त्याजला बहुत रोजमुरा ठरऊन त्याचें चित्त संतोष करून त्या लोकांस चाकरीवर घेण्यास प्रारंभ केला. अबदुल गफूर व अबदुल शकुर व अबदुल जलील व अबदुल नबी व अबदुल सलाम व अबदुल करीमखानाचे पाच भाऊ व अबदुल मजीज व अबदुल गियास व अबदुल हकीम हे अबदुल करीमखानाचे चुलत बंधु व हाफीज महंमद हा शहाबाज-खानाचा मधला पुत्र व महंमदखानाचे दोघे पुत्र व महंमदखानाचा मेहुणा म्हणजे सासऱ्याचा पुत्र व बाहादुरखान व बैरागी लोक म्हणजे बैरखदोर, म्हणजे निशाणाकडील लोक, व अबदुल जलील वलद मुल्ला मनसूर व सय्यद बायजीद व सैद मीरान हे अबदूल करीमखानाचे सरदार व अबदुल करीमखान व येलूर व खलजनमलिक व बडेशाहा सियाहाचेत्री व लष्करीमाई व दुसरे कित्येक नामांकित लोक त्यांचे नावांचा तपसील लिहावा तर ग्रंथ फार वाढेल यास्तव तितकीं नावें लिहिलीं नाहींत. सारांश, हे लोक एकापाठीमागें एक लागोपाठ दिलेरखानापासीं जाऊन हरएक मनुष्यानीं आपआपले योग्यतेनुरूप पदाधिकार व किताब बहुत श्रेष्ठत्वाचे मिळवून आपले मनोरथ पूर्ण करून घेते जाहाले. दरिद्राचे पीडेस संतोषानें व श्रीमंतपणानें बदल केले म्हणजे दरिद्री होते ते श्रीमंत जाहाले.

## २४. सिवाजीचा पुत्र संभाजी यांणीं दिलेरखानाकडे येणें :

त्याच दिवसांत सिवाजीचा पुत्र संभाजीहि दिलेरखानासी जाऊन मिळाला. हें दिलेरखानाचे योग्यतेस व थोरपणास कारण जाहालें. संभाजी याणी दिलेरखानापासी जाऊन पोहचण्याची कैफियत असी आहे कीं, सिवाजी कित्येक कामाबदल संभाजीसी त्रासून कंटाळला होता. या दिवसांत शरहनवीस म्हणजे हुकमाचे शेरे लिहिणारा कामदार होता. त्याचे कन्येवर संभाजी फार आषक, म्हणजे लुब्ध, जाहाला होता. येणेंकरून संभाजीविसीं सिवाचे मनांत फारच वाकडेपणा येऊन सिवाजी अत्यंत त्रासला होता. अशा प्रकारें कीं, संभाजीचा केवळ शत्रूच जाहाला आणि सिवाजीनें मनांत आणिलें कीं, संभाजीस हरएक बाहान्यानें पकडून ठार जिवें मारावा किंवा कैद करावा. संभाजी यांणी हा सिवाजीचा इरादा ओळखून संशयांकीत जाहाला. आपण दिलेरखानाकडे निघोन जावें असा निश्चय केला. आपण जातीनें जाऊन पोहचण्यापूर्वी आधीं एक पत्र आम्ही आपलेकडे येतो अशा मजकुराचें लिहून दिलेरखानाकडे पाठविलें. त्यानंतर जातीनेंहि त्या पत्राचे लागोपाठच दिलेरखानाकडे निघाला. संभाजी आमचा आश्रय जोडण्याकरितां इकडे येत आहे असें संतोषाचे वर्तमान दिलेरखानास कळतांच दिलेर-खानास फारच संतोष जाहाला व संभाजी केव्हां येईल अशी मार्गप्रतिक्षा करित बसला. इतक्यांत सिवास बातमी समजली कीं, संभाजी यांणी दिलेरखानाकडे निघोन जाण्याचा निश्चय करून दिलेरखानाकडे चालता जाहाला आहे.[११] असें समजतांच सिवानें संभाजीस वाटेंतच पकडून इकडे आणावा यास्तव त्याचे पाठलागावर बहुत दौडीनें फौज रवाना केली. ही बातमी दिलेरखानास समजली तेव्हां दिलेरखान यांणी एखलासखानासमागमें तीन चार हजार स्वार देऊन एखलासखानास संभाजीस आणावयाकरितां संभाजीचे मार्गावर पाठविलें. तेव्हां सुप्याचे पलीकडे चार कोसावर संभाजी व एखलासखान यांची भेटी जाहाली. संभाजीचे समागमें तीनशें स्वारांहून अधिक जमात नव्हती. एखलास-खानासी संभाजी जाऊन मिळाला तेव्हां बहुत जमातीचा भरणा जाहाला. सिवाची फौज संभास पकडण्याकरितां चालून आली होती त्या फौजेनें हा भरणा पाहून पाठलाग करणें सोडून देऊन ती सिवाची फौज माघारी परतली. संभाजी एकदोन मजली चालून पुढें जाऊन पोहचला. तेव्हां दिलेरखान संभास सामोरा येण्याकरितां धावत येऊन अति सत्कारानें व बहुत समारंभानें संभाची भेट घेऊन आला. यापूर्वी संभाजीस द्यावया-करितां अलमगीर पादशाह कडून एक हत्ती तीन घोडे व पोषाख व तरवार व चौघडा व सातहजारी पद अधिकाराचे आज्ञापत्र आलें होतें तें सर्व संभाजीस दिलेरखान यांणी

११. शके १६०० पौश शुध १० (१३ दिसेंबर १६७८) संभाजीराजे पारखे होऊन परली गडावरून पळोन मोगलाईत दिलेरखानापासी गेले. त्याणी त्यासी हप्त हजारी दिल्ही. सन्मान केला.– जेधेश. पृ. २९.

पावते केलें. दिलेरखान यांणी आपलेकडून नानाप्रकारें संभाजीचें चित्तसमाधान करून व दिलभरंवसा देऊन संभाजीचे चित्तास बहुत संतोष केला. दिलेरखानहि संभाजीचे येण्यानीं संतोष पावला. असें वाटतें कीं, निमे दक्षण देश घेऊन फत्ते केल्याचा आनंद जाहाला.

## २५. मसऊदखान याणी सिवाजीकडून कुमकेकरितां फौज आणविणें व सिवाजी यांणी मसऊदखानाचे मदतीवर आपली फौज पाठविण प्रकर्ण :

आपलेकडील फौजेची जमात थोडी व शत्रुकडील फौजेची जमात भारी आणि दिवसेंदिवस अधिकच जमत होती. घरांतले घरांतच सय्यद मखदूम वगैरे वैरत्वावर उभे राहून फारच दंगा व गर्दी करूं लागले. यामुळें मसऊदखान फारच घाबरून अति चिंताग्रस्त जाहाला. जेव्हां यापूर्वी मसऊदखान यांणी सिवाजीसी पकी मित्रता कली होती यास्तव मसऊदखान याणी सिवाजीस निरोप सांगोन पाठविला कीं, शत्रुचें पूर्ण सामर्थ्य व वैरभाव धरून बहुत अयोग्य इरादा करित आहे. या समई आपण कुमक केलीच पाहिजे. नाहीपेक्षां भय तें आहे कीं शत्रु किल्ला घेईल. असा निरोप पाठविला[१२] तेव्हां सिवानीं तेच वेळेस सहा सात हजार स्वार हत्यारबंद विजापूरचे संरक्षणाकरितां रवान्ना केले. त्या स्वारांस पूर्ण बळ व हिंमत दिल्ही आणि ताकीद केली कीं, तुम्हीं विजापूर येथील किल्ल्यांत बहुत हुशार व खबरदार असावें. मग शत्रु व मी उभयतां पाहून घेऊं. असें सांगितले. मसऊदखान याणी आपलें चित्त ठिकाणी नव्हतें तें सिवाचे मित्रतेनें व आधारानें ठिकाणावर आणिलें. मसऊदखानाचे चित्तास पूर्ण भरंवसा आला. मसऊदखान यांणी सिवाचे सरदार मंडळीसी निश्चय ठरविला कीं, तुमची फौज आटंगीचे नदीवर उतरावी आणि शत्रुचे मोकाबल्यावर तयार असावे असें सांगितलें. परंतु ते सरदार लोक फौजेसुद्धां शहरानजिक येऊन खानापूर व खुसरवपुरावर डेरे ठोकून राहात होते. आपसांत मसऊदखानासी बोलणें चालविलें होतें कीं, किल्याचा एक दरवाजा व एक बुरूज आमचे हवालीं करून द्यावा म्हणजे मग आम्ही विजापूर किल्याचे संरक्षण करूं, असें बोलत होते. मसऊदखान यांणी त्या सर्वांची विनंती कबूल केली नाहीं. त्या फौजेतील सरदार लोक इच्छित होते कीं, आपआपले माणसांसुद्धां

१२. शके १६०१ भाद्रपद शुध प्रतिपदेस (२६ आगष्ट १६७९) शामजी नाईक विजापुरास पाठविले. आश्विन मासी (सप्तेंबर – आक्टोबर १६७९) दिलेरखाने विजापुरास वेढा घातला. कार्तिक मासी (आक्टोबर – नवंबर १६७९) इदलशाहाचा व सिवाजीराजे याचा सला जाला.– जेधेश, पृ. ३०.

किल्याचे आंत यावें. मसऊदखान यानीं त्या लोकांसहित आंत येण्याविषयीं मनाई करून कांहीएक संभावित मनुष्यास थोडेसे चाकरलोकांसहित किल्याचे आंत येऊ देत होता. किल्याचे आंत फार मंडळी येऊं लागली असतां आत येऊं देत नव्हता. यानंतर ते लोक खुसरवपूर व खानापुरावरून उठोन जोहरापुरांत किल्यानजिकचे मैदानांत येऊन उतरले. या कारणेंकरून मसऊदखानास अधिकच संशय आला व मनांत फार अंदेश आला. सदरहु सरदार मंडळ मसऊदखानास बोलले कीं, आम्हास पादशाहाचे व तुमचे भेटीस येण्याजाण्याचें जरूर कारण पडतें आणि दरवाज्यावरील लोक आम्हांस येण्याजाण्याचे वेळेस फारच हरकत करितात. कित्येक लोकांस आंत येऊ देतात व कित्येक लोकांस मनाई करतात. तुमचे व आमचेमध्यें जोंपर्यंत पडदा आहे तोंपर्यंत नानाप्रकारचे संशय येतात. तेव्हां बंदोबस्ताचें काम आमचे हातून कसें होईल? आम्हांस तुम्ही किल्याचे आंत एक जागा बुध्या नेमून द्यावी. म्हणजे आम्ही आपला सामानसरंजाम तेथें ठेऊं, असें बोलले तेव्हां मसऊदखान बोलला कीं, मी पहिलेच दिवशीं तुम्हांसी करार केला होता व तुम्हास सांगितलें होतें कीं, आटंगी येथे तुम्ही फौजेसुद्धां राहावे. असें असतां या प्रकारची बोलणीं बोलतां हें तुम्हांस योग्य नोहे. उत्तम प्रकार तो आहे कीं, आटंगीचे नदीवर तुम्ही राहून शत्रूचे पारपत्याचे विचारांत असावे. असें बोलला आणि त्यांचें बोलणें कबूल केलें नाहीं.

## २६. सिवाजीकडील लोकांनीं दंगा म्हणजे घात करण्याची मसलत करणें व पुन्हां मसऊदखानांत व सिवाजींत वैरभाव व वाकडेपणा येणें प्रकर्ण :

असें बोलतात कीं, एके दिवशीं सिवाजीकडील लोक गल्याचे व जिनसांचे गोण्याचे बैल सिवाचे मुलकाहून विकरी करण्याकरितां विजापूर शहरास आणित होते. त्यापैकीं कित्येक बैलावरील गोण्यांत तरवारी छपावून घालून दरएक बैलासमागमें एक एक शिपाई खेपेस बैलापाठीमागें जातात. त्याप्रमाणें किल्यांत येत होते. तेव्हां दरवाज्याचे पाहाऱ्यावरील लोकांनीं त्या बैलापाठीमागील लोकांची तऱ्हा पाहून मनांत संशय आणोन लोखंडाच्या सळ्या व दाभणें त्या बैलावरील गोण्यांस टोंचली. कित्येक गोण्यांत दाभण किंवा सळई सिरत नव्हती. ती गोणी फोडिली तेव्हां त्या गोणींतील जोंधळ्यांत गुप्तपणें तरवारी घातल्या आहेत. असें पाहिलें तेव्हां हुशार होऊन एकंदर सर्व गोण्या फोडून त्या गोण्यांत छपवून तरवारी भरल्या होत्या त्या काढल्या आणि त्या बैलाबरोबर लबाडीनें व लांचखोर लोकांस तीं गोण्यांतील हत्यारें हिराऊन घेऊन बहुत सख्तीने, म्हणजे मार देऊन लाथ बुक्का करून बाहेर हांकून दिल्हे. सिवाकडील सरदार लोकांनीं जाणिले कीं, मसऊदखान

फारच हुशार म्हणजे बहुत सावध आहे. असें जाणोन बहुत लज्यायमान होऊन बोलूं लागले कीं, जर करितां मोगलानीं पाठलाग केल्यास आम्हांस खास असें वाटतें कीं तुम्ही आम्हांस किल्याचे आंत येऊं देणार नाहींत. मग आम्हांस कोणी आधार नाहीं. असे निराश्रित राहून मेले जाऊं असें बोलले. परंतु मसऊदखान हा कोठे हें बोलणें ऐकून घेतो ! सिवाजी हा संधी सांपडली म्हणजे घात करणारा होता. दगा करण्याचे खेळांत सिवाजीचें सर्व वय खर्च जाहाले होते उगाच बाह्यात्कारी मसऊदखानासी मित्रतेचा भाव दाखऊन अंतर्यामीं, म्हणजे मनांत, वैर ठेवित होता. मसऊदखान हा सिवाजीचें भय वागवून बहुत हुशारीनें वागणुक करित होता. जेव्हां उगाच मित्रतेचा भाव बाह्यात्कारी उभयतांत आला होता, सेवटीं कित्येक कामांचे कारणामुळें उभयतांत वैर वाढलें व दिवसेंदिवस कपट व फंदफितुर व शत्रुत्व अधिक अधिकच वाढत होतें. येथपर्यंत कीं, उभयतांत पूर्ण अनोळखीपणा व आदावत व वैर कायम झालें. सिवा हा जातीचाच पूर्वीपासून बंडखोर फंदीफतुरवाला व बदफैली आहे. छापा घालणें व लुटणें व भर वस्तींचे गांव लूटून ओसाड करणें हा त्याचे जातीचाच अंगस्वभाव आहे. यास्तव सिवानीं येविषयीं पुन्हां प्रारंभ केला आणि आदिलशाहाचे मुलकांत मोठा दंगा चालविला. येथपर्यंत कीं सिवाचे फौजेनें विजापूर शहरानजिक येऊन पोहचून दौलतपूर व खुसरवपूर लुटून तेथील वाणी आदमी लोक द्रव्यवान होते त्यांजला कैद करून जोहरापुरावर दौड केली. आणि शेख अहंमद खवासखानी वाड्यानजीक अली रजा याजला ठार जीवें मारिलें व सिद्दी याकुत खैरतखानी याजला जखमी केला. इब्राईम जगद्गुरु याचे वाड्यानजिक ते लोक येऊन पोहचले. तेव्हां इतक्यांत कर्मधर्मसंयोगे किल्यावरुन तोफेची सरबती केली. त्या तोफेचे गोळ्यांनीं सिवाचा सरलष्कर बरबाद झाला, म्हणजे त्या गोळ्यानें उडोन ठार जाहाला, सिवाकडील फौज पळून गेली.

## २७. पुन्हां मसऊदखान याणी मोंगलासी सख्य करणें व दिलेरखान याणी आपली फौज मसऊदखानाचे मदतीवर पाठवणें प्रकर्ण :

मसऊदखान हा सिवा जो वाईट चालीनें भरलेला त्या सिवाचे दंग्यानें व बदफैलीनें पुन्हां घाबरून व भयाभीत होऊन आपले कामाचा उपाय दिलेरखानाचे सख्यांत व मित्रतेंत आहे असें जाणोन दिलेरखानासी सख्य करिता जाहालां. मसऊदखानाचे वकील दिलेरखान याजपासी होते त्या वकिलांकडून सख्य होण्याचा निरोप दिलेरखानास कळविला. मित्रता कायम असण्याविषयीं पूर्वी कलबुर्ग्यांत करारमदार ठरले होते त्याप्रमाणेंच पुन्हां करारमदार उभयतांत ठरवून सिवाच पारपत्य करण्याविसीं दिलेरखानाकडून मदत इच्छिता जाहला. दिलेरखान याजला मसऊदखानाचे सख्य करणें मंजूरच

होतें. पळून गेलेली शिकार धरून पुन्हां पाशांत घालणें सर्व कामांहून हें जरूरीचें काम असें जाणित होता, म्हणजे मसऊदखान आपल्यासी बिघडून गेला आहे तो आणखी हातीं आणावा हें काम आधीं केलें पाहिजे असें समजत होता. या कारणास्तव मसऊदखानाचा निरोप कबूल केला. पूर्ववत पुन्हां नवीन बहुत मजकूर करार ठरवून दिलेरखान यांणी आपली फौज आपल दोन तीन सरदारासमागमें मसऊदखानाचे मदतीवर रवाना केली.[१३] नेमिलेले सरदार लोक जेव्हां विजापुरानजिक जाऊन पोहोचले तेव्हां मसऊदखान खुद जातीनें दिलेरखानाकडील सरदारांस सामोरा जाऊन त्यांजला जेवीन नजिक आणोन तेथून त्या सरदार लोकांचा पादशाही दरबारांत मुजरा करऊन त्यांजला परत जाणेविसीं निरोप दिल्हा. एका आठवड्यानंतर सदरहू सरदार लोकांकडील मंडळास किल्याचे आंत बोलाऊन पादशाही दरबारांत आणोन पादशाहास त्यांजकडोन मुजरे करविले व पादशाहाकडोन हरएकास पोपाख देवऊन त्याजला निरोप दिल्हा. तिसरे दिवशीं हुकूम केला कीं, शत्रूवर चालून जावें व तुम्ही आपली फौजहि व्यंकटाद्री व दुसरे कित्येक सरदार लोकांसमागमें देऊन त्यांचेबरोबर या सरदारलोकांची नेमणूक केली. जेव्हां दोहीकडीलहि फौजांनीं कूच करून मौजे तिखोटे (तिकोटे) येथे मुकाम केला, बातमी कळविणारे जासूद लोकांनीं बातमी आणिली कीं, सिवाजी सात आठ हजार स्वार, भालेकरी व तरवारवाले हत्यारबंद पूर्ण तयारीनें सांगोल्यावर येऊन उतरून सिवाजीनीं इरादा केला आहे कीं, मोगलाची फौज विजापुरचे फौजेसहित जी पुढें चालून येत आहे त्या फौजेवर रात्रीं छापा घालावा, असा सिवाजीचा बेत आहे. अशी बातमी सांगितली तेव्हां मसऊदखान यांणीं सय्यद मखदुम याजला ताकीद सांगून पाठविली कीं, तुम्ही जलद घोड्यावर स्वार होऊन इकडील फौजेस येऊन मिळावें. सय्यद मखदुम ते दिवशीं बायकासुद्धां निघोन पर्जापुरांत येऊन उतरला. मोठे प्रातःकाळींच पुन्हां मसऊदखान याणी सय्यद मखदुम याजला निरोप सांगोन पाठविला कीं, तुम्ही फारच जलदी करून अति सत्वर फौजेंत येऊन मिळावें. असें सांगून पाठविलें असतां यावेळेसहि सय्यद मखदुम यांणी होय होय असें म्हणोन उगेच तपशिलाच्या गोष्टी सांगोन मसऊदखानाच्या निरोपाप्रमाणे येऊन पोहचला नाहीं. सय्यद मखदुम याणी सांगून पाठविलें कीं, आम्हाकडील सिपाईलोक याजपासी खर्चास कांहींएक नाहीं. तुम्ही पेशजी पंधरा हजार होन देण्याचा करार करून त्यापैकीं चार हजार होन दिल्हे,

१३. शके १६०१ माघ मासी (जानेवारी–फेब्रुवारी १६८०) इदलशाहाचा मोगलाचा सला जाला. विजापुराचा वेढा उठला. शके १६०२ श्रावण मासी (जुलै–आगष्ट १६८०) बहादुरखान सुभा होऊन आले आणि आहिवंतास वेढा घालून दिलेरखान हुजूर गेले.– जेधेश, पृ. ३०. On the 1st March 1680 Khan Jahan Bahadur Zafar Jang Kokaltash Khan became Subahdor of the Deccan vice the eldest Prince.– MiA, p. 117.

बाकीचे राहिले ते पाठीवर टाकिलेत, म्हणजे दिल्हे नाहीत, व दिलेरखान याजकडून फौजेचे नांव करून ऐवज घेतलात त्यांपैकींहि एक दंबडीदेखील मजला दिल्ही नाहीत. हली माझें जाणें कसें घडेल ? ऐवज द्यावा म्हणजे फौजेस वाटून देऊन निघोन येतो, असें सांगोन पाठविलें. तेव्हा मसऊदखान याणी उत्तर सांगोन पाठविलें कीं, तुम्ही जातीचे मुसलमान व चांगले माणूस व खऱ्या चालीचे शिपाई व नामांकित सरदार आहांत. अशा प्रसंगाचे वेळेस अशी हरकत केल्यास व अशा प्रकारची बोलणीं बोलणें हे तुमच्या योग्यतेस नीट नोहे. मी तुम्हांसी जो करार केला होता त्याप्रमाणें महाल व ज्याहागिरी व मोकासे दिल्हे आहेत. मजवर कोणताहि शब्द राहिला नाहीं. ऐन समयाचे वेळेस माघार घेणें व आम्हांपासी कांही सामान सरंजाम नाहीं असा बाहाना करणें हें शूर पुरुषाचें लक्षण नोहे. असें उत्तर सांगून पाठविलें तेव्हां सय्यद मखदुम याणी उत्तर सांगून पाठविलें कीं, मी जातीचा मुसलमान निष्कपट अंतःकर्णाचा व पवित्र विश्वासाचा आहे खास. मी तुम्हांसी जो करारमदार ठरविला आहे त्या करारास्तव स्तब्धपणा स्वीकारून बसलों आहे. तुम्ही बेमान आहांत, म्हणजे इमान सोडलेत. प्रथम तैगडचा किल्ला मजला देण्याचा करार करून पुन्हा अनमान केलात. कराराप्रमाणें वर्तणुक केली नाहींत. मजला जे मोकासे दिल्हेत त्यापैकीं निमे मोकासेहि माझे हातीं येत नव्हेते. माझेकडील मनुष्यांस ठकवून त्यांजला नाना प्रकारच्या दुर्बुद्धी शिकऊन तुम्ही आपलेकडे जमऊन घेतलेत व लारखान झेंडेवाला याजला चाकरीवर ठेविलेत. बरें, असो. काय चिंता आहे ? मीहि नांवाचा पर्जाखान आहे. हा पर्जाखान जर करितां जिवंत राहिला तर, म्हणजे मी जिवंत राहिलों तर, काळिंज कापणारे तरवारीनें शत्रूचें मस्तक उडवीन.

## २८. शिवाजीचे पारपत्यावर चालून जाते समई मसऊदखानाचे समागमें जाण्यांत पर्जाखान याणी मसऊदखानाची चाकरी न करणें व या उभयतांत वाकडे येणे प्रकर्ण :

सारांश, सय्यद मखदुम याणी मसऊदखानाची चाकरी केली नाहीं. मसऊदखानाचे फौजेंत जाऊन मिळाला नाहीं. यामुळे उभयांचे फारच वाकडे आलें. तेव्हां मसऊदखान याणी सय्यद मखदुम यासी बोलणें व येविषयीं यत्न करणें सोडून देऊन सय्यद मखदुम याजला हरएक प्रकारें ठकऊन यासी जाऊन भेटून सय्यद मखदुम याचे अंतःकर्णाची साफी करून व त्याचे मनांतील वाकडेपणाचा मळ काढून टाकून त्याजला हरएक प्रकारें आपले फौजेसमागमें घेऊन जावें याजकरितां फौजेंतून व्यंकटाद्री याजला एकट्यास बोलावून आणिलें. कर्मधर्मसंयोगें अशा समयांत दुसराच मनसोबा म्हणजे बेत उभा राहिला. तो मनसुबा हा आहे कीं, अबदुलखान

किल्लेदार येल्लूर याणी सिवासी बहुत लढाई झाल्यानंतर व सिवाकडील लोकांचा किल्यावर हल्ला सहा सात महिने चालला होता यामुळें उभयतां जेरीस येऊन या उभयतांनीं सिवापासून पंनास हजार होन घेऊन विजापूरचा किल्ला सिवाचे हवालीं करून आपले मुलांमाणसांसुद्धा सामानसरंजाम होता तो घेऊन विजापुरांतून येऊन जोहरापुरांत येऊन राहिला होता. ज्या समई सिवा शहराचे भोंवते येऊन लुटालूट करित होता तेव्हां मसऊदखान याणी त्याजला म्हणजे अबदुल्लाखानास किल्याचे आंत बोलाविलें होतें. त्यानंतर याजवर तकसीर आणोन त्याजला धरिलें, कीं पादशाही किल्ला शत्रूस विकून जो ऐवज घेतला आहेस तो ऐवज सरकारचा आहे, तो दिल्हा पाहिजे. अशी त्याजला ताकीद करून त्याजवर गुन्हा शाबूत केला. तेव्हा अबदुलाखान निरोपाय होऊन षर्जीखानाकडे जाऊन मिळाला आणि दहा हजार होन पर्जाखानास देऊन षर्जाखानाचा आधार धरून पर्जाखानाचे पाठीसीं पडला. मसऊदखान यांणीहि चांगली शिकार सांपडली आहे असें जाणिलें होते, म्हणजे अबदुल्लाखान बरा पेंचांत आला आणि पन्नास हजार होन त्याजपासून परत घेऊं असे मनांत आणिल होतें. ती शिकार हातची जाण्यानें मसऊदखान फार खिन्न होऊन सय्यद मखदुम याजकडोन त्याजला बोलावणें केलें. त्याणीं म्हणजे सय्यद मखदुम याणी, फारच हट केला. या वर्तणुकीमुळेंहि मसऊदखान व सय्यद मखदूम या उभयतांत फारच वैर व वांकडेपणा आला. संकट बहुत वाढलें. तेव्हां मिटीशाहा याणी तें संकट विझविण्याकरितां बहुत यत्न केला. परंतु सय्यद मखदुम याजपासीं बसणारे लोकांनीं हें वैर मोडून साफी होऊं दिली नाहीं. घटकेघटकेस अधिकच कज्जे व वाकडेपणा नानाप्रकारचे फंदफितूर होण्याचा प्रसंग प्राप्त जाहाला.

## २९. दिलेरखान याणी भुपाळगडचा किल्ला पाडून खराबी करणें प्रकर्ण :

सिवाजीनीं मांजऱ्यानजीक बहुत पर्वतांत एक किल्ला मजबूत व फारच पक्का बांधून त्या किल्याचे नांव भूपाळगड असें ठेवून आपल्यास आधारास जागा केली होती. आपलें सामानसरंजाम व मालमत्ता वगैरे त्या किल्यावर ठेविली. या समई सिवाजीस मोंगलांशी लढाई करण्यास प्रारंभ करण्याचा प्रसंग प्राप्त जाहाला. यास्तव तो किल्ला लढाऊ सिबंदीनें व बहुत लढाया केलेला सिपाई लोकानें भरून फार मजबुती ठेवण्याविसी हुकूम घेऊन पक्का बंदोबस्त ठेविला. मोंगलाची फौज येऊन पोंहचण्याचा पुकार चहुंकडे जाहाला. त्या भयानें तर्फेतर्फेकडील कसब्यांतील गांवोगांवची संपूर्ण मनुष्यें आपआपली बायकामुलें व मालमत्ता व बहुत सामानसरंजामासीसी येऊन किल्याचा आश्रय करून त्या किल्यावर राहिलीं होतीं. ही बातमी दिलेरखानास समजून देलेरखान तो किल्ला घ्यावयाकरितां निघाला. प्रातःकाळचे समयीं त्या किल्यापासी पोंहचून सदरहू किल्यावर हल्ला केला. दोन प्रहर दिवसपर्यंत मोठीच लढाई जाहाली व

उभयतांकडील बहुत मनुष्यें खराब जाहाली. जसा दरिद्री पुरुष द्रव्याचा ढिग पाहिला म्हणजे तें द्रव्य उपटण्याविषयीं जिवादारम्य झटून जलदी करितो त्याप्रमाणें दिलेरखान याणी त्या किल्यावर हल्ला करण्यास कमतर न करितां तेच दिवसीं तो किल्ला दिलेरखान याणी घेतला[१४] आणि त्या किल्यावरील सर्व सामानसरंजाम मालमत्ता वगैरे व दुसरे कडून चहूंकडील मनुष्यें आपआपलें सामान सरंजामानिशीं त्या किल्यावर येऊन राहिलीं होतीं त्या सर्व मनुष्यांचें दिलेरखानानीं सर्वस्व हरण केलें. त्या किल्यावरील सर्व मनुष्यांस कैद केलें. सिवाकडील सातसें मनुष्यें जीं कैद जाहालीं होतीं त्या दरयेक मनुष्याचा एक एक हात कापून त्या मनुष्यास सोडून दिल्हें. बहुत मनुष्यें त्या गर्दींत ठार जाहालीं. सिवा याणी यापूर्वी सोळा हजार स्वार किल्याचे संरक्षणाकरितां रवाना केले होते ते सोळा हजार स्वार येऊन पोहचण्यापूर्वीच तो किल्ला मोंगलाचे हातीं गेला होता नंतर सिवाकडील सोळा हजार स्वार यांणी युद्ध रचना करून मोंगलाचे फौजेस चहूंकडोन दिसों लागले. इतक्यांत एकाएकीं सिवाकडील स्वारांस बातमी समजली कीं, ईरिचखान व बजाजीराव हे उभयतां परांड्याकडोन येऊन खाण्यापिण्याचा सामानसरंजाम दिलेरखानाचे फौजेंत आणित आहेत. असें समजतांच सिवाजीकडील फौज तेथून निघोन इरचखानावर दौड करून चालून आली. तेव्हां दिलेरखानाचे यांणी इकलासखान याजला दीड हजार स्वारांचे जमातीसहित ईरचखानाचे मदतीवर रवाना करून किल्यापासून सहा कोशावर सिवाजीकडील लोक व एकलासखान या उभयतांत मोठी लढाई जाहाली, सिवाकडील लोकांनीं इकलासखानाची थोडी जमात आहे असें समजून सिवाकडील लोक चहूंकडोन एकलासखानावर चालून आले. एकलासखान यांणी एका गांवचा आश्रय करून लढाईस उभा राहिला. दिवसाचे तिसरे तासापासून दिवसाचे नवव तासापर्यंत एकसारखी लढाई चालली होती व सिवाकडील लोक चहूंकडून हल्ला व दौड करीत होते. एकलासखान याणी त्या गांवाचे भिंतीपाशी येऊन कायम उभे राहून तोफखान्याची सरबत्ती करित होता. दर हल्लेस सिवाकडील बहुत मनुष्यें ठार होत होतीं. सरासरी सिवाकडील हजार मनुष्यें ठार झालीं. दिलेरखान याजला वर्तमान कळलें तेव्हां दिलेरखान यांणी तात्काळ सर्फराजखान व लतीफशाहा या उभयतांस बहुत जमातीसुद्धां इकलासखानाचे मदतीवर रवाना करून त्याचे पाठोपाठच दिलेरखान आपणहि खुद्द जातीनें एकंदर फौज घेऊन अति सत्वर एकलासखानाकडे निघाला. दिलेरखान नजिक जाऊन पोहचला तेव्हां दिलेरखानास पाहून सिवा पळोन गेला. तेव्हां दिलेरखान यांणी एक दोन कोशापर्यंत सिवाचा पाटलाग करून दिलेरखान माघारा परतला. पुन्हां भुपालगडावर येऊन तो भुपालगडाचा किल्ला सिवा यांणी नवीन बांधलेला निखालस पाडून टाकिला.

१४. शके १६०१ वैशाख शुध २ गुरुवारी ( ३ एप्रिल १६७९ ) दिलेरखानें भूपालगड घेतला.– जेधेश, पृ. २९.

## ३०. करारमदार ठरल्याप्रमाणें मसऊदखान याणी ते करार सिद्धीस नेले नाहींत यास्तव मसऊदखान यास दिलेरखान याणी जरब देणें प्रकर्ण :

यानंतर दिलेरखान याणी मसऊदखानास बहुत जरबेचा निरोप सांगोन पाठविला. फारच धाक घातला कीं, आम्हास पूर्ते समजलें कीं, तुमचे सर्व बोलणें व सर्व वागणूक ठकविद्येची आहे. तुमचे मनांतील मनोधर्म, म्हणजे इरादाहि, ठकविद्येपरता दुसरा नसेल, कीं गुप्तपणें सिवासी सख्य ठेवून आम्हांकडे दगा, म्हणजे घात, करावयाकरिता येता. नाहींपेक्षा काय कारण होते कीं, हा वेळपर्यंत करारमदार सिद्धीस नेले नाहींत. असा निरोप सांगोन पाठविला. या निरोपाचे लागोपाठच दोन तीन दिवसांत दिलेरखान याणी कूच करून विजापूर शहरानजिक दहा कोसांवर येऊन पोहोचून दिलेरखान हाल-सिंगीवर येऊन उतरला. तेव्हां मसऊदखान फारच घाबरून आपले अवस्थेची हकीकत दिलेरखानास जाहीर केली कीं, आम्ही आपणासी करारमदार केले आहेत ते करार सोडून वागणें आम्हांकडून कदापि व्हावयाचें नाहीं. कराराप्रमाणें थोडकेच दिवसांत पादशाही डबींतील मुक्ताफळ, म्हणजे पादशाहा बिबी इजला, आपणाकडे हुजूर रवाना करितो व मी आपले पुत्रास फौजसुद्धां आपले मदतीवर पाठवितो. दिवसगत लागल्याचें कारण हें आहे कीं सय्यद मखदुम याचा गर्वीष्टपणा जाहीरच आहे. तो ताळ्यावर येतच नव्हता. यामुळें दिवसगत लागली. त्याजला ताळ्यावर आणून सर्व कामें फैसल करून देतो. या प्रकर्णी तुम्ही स्वस्थ असावें. परंतु तुम्ही भीवरा नदीकडे जावें. कारण कीं मुलुक खराब होत आहे. असें त्याजला सांगितलें तेव्हां दिलेरखान याणी हालसिंगीचे मुक्कामाहून कुच केलें आणि सदरहू नदीकडे गेला. धोलगीर व टाकळीकडे चालता झाला.

## ३१. मसऊदखान व पर्जाखान या उभयतांत फारच वांकडे येणें प्रकर्ण :

त्याच दिवसांत मसऊदखान व सय्यद मखदुम या उभयतांत कित्येक कामाचे बखेडे उत्पन्न झाल्यामुळें फारच वांकडे आलें. बहुतच वैर उत्पन्न जाहालें उभयतां-कडूनहि वांकडेपणाचा अग्नि पेटला. किती अग्नि विझविणें कोणत्याच प्रकारें व्हावयाचे नाहीं अशी आग पेटली, म्हणजे फारच वाकडेपणा आला. मसऊदखानाची सर्व कामें सय्यद मखदुम याचे शत्रुत्वाचे कारणामुळें बिघडून रात्रंदिवस दंगा चालला होता. तसेच सय्यद मखदुम हा दररोज लढाईस तयार होऊन आपले ठिकाणीं बसत होता. बहलूलपूरा व मेहेंदीवाडा येथील बाजारांत दुरस्ता सिपाई लोक हत्यारबंद तयार होऊन घोड्यावर सामान टेऊन रात्रंदिवस बसत होते. सय्यद मखदुम याचा फारच दंगा झाला व एकंदर कामाचे बखेडे जाहाले. तेव्हां मसऊदखान निरुपाय होऊन सय्यद

मखदुम याचे पारिपत्य करण्याकरितां दिलेरखान याजकडोन मदत इच्छिता जाहाला. मोंगलाशी या आदिलशाही राजधानींत नानाप्रकारचे फंदफितूर व बखेडे व्हावेत हेच कारण होते. दिलेरखान यांणी दोन तीन हजार स्वार व पादशाही तोफखाना इखतिआसखान उर्फ अबदुल रयान व अबदुल गफूर व वजीर बेग व शेख महंमद जुनेदी याजसमागमें देऊन सय्यद मखदुम यांचे पारपत्य करण्याकरितां पाठविलें. तेव्हां दिलेरखानाकडील सदरहू सरदार यांणी रंगाऱ्याचे हौदानजिक येऊन पाण्यावर उतरले. तेव्हां मसऊदखान अत्यंत क्रोधायमान होऊन सय्यद मखदुम याचें पुरतें पारपत्य करण्याचा इरादा केला. व्यंकटाद्री फौजेसुद्धां मका दरवाजांतून निघोन इब्राहीम पादशहाचे दरवाज्यानजिक येऊन उभा राहिला. किल्यावरील तोफांची तोंडें सय्यद मखदुम याचे रोखावर फिरवून तयार करून ठेविल्या. एकंदर लोकांस हुकूम दिल्हा कीं, जो मनुष्य जें लुटील तो सय्यद मखदुम याजकडील लुटीचा माल त्या मनुष्यास माफ आहे, असा एकंदर हुकूम दिला. लुटणारे पुरुष उचले वगैरे हे संतोषाचे वर्तमान लोकांचे कानावर आले. तेव्हां एकंदर लुटणारे मंडळीनें जमाव करून लुटण्याकरितां सय्यद मखदुम याजवर धावले. तेव्हां सय्यद मखदुम फौजेसुद्धां तयार होऊन पर्जा-पुरांत बसला होता आणि ही जमात फारच जलदीनें सर्वांहून पुढें लुटण्याकरितां येऊन पोंहचली. तेव्हां सय्यद मखदुम याजकडील लोकांनीं त्या लुटणारे लोकांस पकडून त्या लुटणारे लोकांची नाकें कापण्यास प्रारंभ केला. तेव्हां त्या लुटणारे मनुष्यांचे पाठीमागें होते त्या लोकांनीं जेव्हां ही अवस्था पाहिली कीं, लुटण्याकरितां जे लोक पुढें गेले होते त्या लोकांनीं लुटीचे बदल आपली नाकें गमावून माघारे परतले तेव्हां लुटीची भरपाई होऊन पुन्हां कोणी पुढें पाय ठेविला नाहीं. आपआपले जाग्यावर राहिले. व्यंकटाद्री याणी आपले ठिकाणीं निश्चय केला होता कीं, आपण इकडून आणि मोंगल लोक तिकडून याप्रमाणें चालून जाऊन उभयतांकडील फौजेचे मध्यभागीं सय्यद मखदुम याजला पकडून याचे चांगले पारिपत्य करावें. असा निश्चय केला होता, परंतु मोंगलाकडील फौज तयार होऊन त्या लोकानीं आपआपले ठिकाणीं निश्चय टरविला होता कीं, जेव्हां लढाईस प्रारंभ होईल तेव्हां आपले घोडे दौडवून आपण जातीनें जाऊन पोंहचावें. असा निश्चय ठरविला. सय्यद मखदुम आपले ठिकाणीं तयार होऊन या वाक्याप्रमाणें करिता जाहाला. पारसी वाक्याचा अर्थ : "जर करिता कोणी मनुष्य मरणावर उदार होऊन मरण स्विकारील तर : : त्याजला रुस्तुम असक-दार काय व दस्तान असला तरी काय व असफंदयार असला तरी काय : १ :" या वाक्यांतील सारांश हा आहे कीं, जो पुरुष मरणावर उदार होतो त्याजला हे सदरहू पादशाहा बलवान व महान पराक्रमी शूर होते असे शूर जरी असले तत्रापि त्याजला तो मरणावर उदार झालेला पुरुष भीत नाही." या वाक्याप्रमाणें सय्यद मखदुम याणी जिवाची आस्था सोडून बसला होता. व्यंकटाद्री जात ब्राह्मण याजला सैद मखदुम याचें

पारिपत्य करण्याची संधि सांपडेना. तेव्हां आपले ठिकाणीं उगाच राहिला आणि लढाई व गर्दी जाहाली नाहीं.

## ३२. मसऊदखान याचा गिल्ला सांगण्याकरितां पर्जाखान याणीं दिलेरखानाकडे जाणें प्रकर्ण :

सय्यद मखदुम याणी जेव्हां पाहिलें कीं, मसऊदखान सर्वोपरी आपणासी बिघडून मोंगलासी मिळून आमचा निर्मूळ फडशा करण्याकरतां आला आहे असें समजून बहुत फिकीरींत पडला. मलीक बरखुरदार याजसीं सैद मखदुम यांनी सख्य केलें. त्याजशीं सख्य करून मलिक बरखुरदार यास बोलला कीं, मसऊदखान हा केवळ जुलूम करणेंचे चालींत येऊन माझेशीं वैरत्वावर उठोन माझा निर्मूळ फडशा करण्याविषयीं मनापासून यत्न करित आहे. हली मी दिलेरखानासी जाऊन रुजू होतो. मी आपले पुत्रास पादशाहाचा चाकर करितो. मी दिलेरखानाकडे येतो. म्हणजे मग माझा व मसऊदखानाचा इनसाफ पाहून दिलेरखानाचा हुकूम होईल आणि आम्हां उभयतांचे सख्य करील. मोंगलांकडील लोक हे फार ठकबाज होते. त्यांजला लबाडीचे व ठकबाजीचे डावपेंच पुरे माहीत नव्हते. यामुळे मोंगलांकडील आषक महंमद म्हणोन दिलेरखानाचा वकील होता तो दिलेरखानाचा वकील टकविद्येनें सय्यद मखदुम यास बोलला कीं, तुम्ही दिलेरखानाकडे जाण्याची मसलत केली आहे ही तुमची अकल फारच चांगली व ही गोष्ट फारच कल्याणदायक आहे. जर करितां आपले मनांत कांहीं एक कपट नसल्यास, चित्त निर्मळ असल्यास, तुम्ही आधीं आपली बायकामुलें आमचे लष्करांत पाठवावीत. तेव्हां तुमचे मनांत निखालस निर्मळपणा आहे असा आम्हांस पूर्ण विश्वास येईल. तुम्हीं आपलीं बायकामुलें इकडे पाठविल्यानंतर तुम्हीहि खुद जातीनें कोणा एकासहि बरोबर न घेतां सडे निघोन यावें. आमचे फौजेचे समागमें दिलेरखानाकडेच चलावें. असे टकविद्येनें बोलला. तेव्हां तो दक्षिणी मनुष्य भोळसर, म्हणजे सय्यद मखदुम हा त्या ठकबाजाचे ठकविद्येनें फसून कांहीं एक विचार न करतां सय्यद मखदुम याणी आपलीं बायकामुलें मध्यरात्रीं इखतीआसखान याजकडे पाठविली. तेव्हां मलीक बरखुरदार व आषक महंमद या उभयतांनी मसऊदखानास निरोप सांगोन पाठविला कीं, सय्यद मखदुम हा इच्छित आहे कीं, दिलेरखानापासीं हुजूर येऊन दंगा मिटवून टाकावा असें त्याचें मनांत आहे. आतां त्याजवर कंबर बांधू नये. तुम्हीहि त्याजला दुःख देण्यास कारण होऊं नये. असा निरोप सांगोन पाठविला. प्रातःकाळीं सय्यद मखदुम हा इखतिआसखान याजकडे गेला आणि मोंगलाचे समागमें

धोलकीरास चालता जाहाला. धोळकीरास जाऊन पोंहचला तेव्हां दिलेरखान हा सय्यद मखदुम याजला सामोरे येण्याकरितां भिवरा नदीचे अलीकडे आला. बहुत समारंभानें व आदर सत्कारानें सैद मखदुम याजला आपले लष्करचे मुकामाचे ठिकाणास नेलें. पाठीमागून आपली फौज उतरविली. सय्यद मखदूम याचे बायकामुलांस निराळे आपले फौजेंत बहुत संरक्षणाचे बंदोबस्तानें ठेविलें. सय्यद मखदुम याणी आपले बायकांपैकीं दोन तीन बायका आपलेकडे आणविल्या होत्या. तेव्हां तेच वेळेस वकील लोक याणी येऊन त्या बायका सय्यद मखदुम याचे डेऱ्यांतून काढून माघाऱ्या नेल्या. सय्यद मखदुम याचे निसबतीचे संपूर्ण लोक व त्यांचे बायकांसहित लष्करांत ठेवणें नीट नोहे असें पाहून सरबराहखान याचे समागमें बाळापुरास रवाना केलें. असें पाहून या वर्तणुकीवरून सय्यद मखदुम सावध जाहाला. त्यांची ठकबाजी व दगलबाजी ओळखिली आणि सावध जाहाला. परंतु काम हातांतून गेलें होतें. यास्तव आतां कांहीं उपाय नाहीं असें पाहिलें तेव्हां सय्यद मखदुम याणी दिलेरखानास सांगोन पाठविलें कीं, आम्ही व मसऊदखान हे उभयतां बंधुसारिखे होतों. असें असतां मसऊदखान व आम्ही या उभयतांत लढाई व कज्या जाहाला. यास्तव मी आपलेपाशीं येऊन रुजू जाहालों, तें खास या कारणास्तवच आलों. आरबींतील कुरान शरीफचे ग्रंथांतील ईश्वराचे आज्ञेप्रमाणे ऐतेचा अर्थ : "तुम्ही आपले बंधु मंडळींत सख्य करा : असी ईश्वराची आज्ञा आहे." यास्तव आज्ञेप्रमाणें तुम्हीं वर्तणूक करावी. गैरराहा वागणूक करण्याचा व बेइनसाफ करण्याचा मार्ग चालणें हें तुम्हांस योग्य नाहीं. असत्य बोलणें व करारमदार सोडून बदलणें हे तुम्हांस नीट नाहीं. करार ठरल्याप्रमाणें मी माझें पुत्रास पादशाहाचे चाकरीवर ठेवितों. निरंतर आपलें मित्रत्व व सख्यता धारण करून राहीन. परंतु इनसाफाचे व खरेपणाचे मार्गानें माझें व मसऊदखानाचे आपण सख्य करून द्यावें. याशिवाय माझें चित्तांत दुसरें कांहीं नाहीं. दुसरे प्रकर्ण असल्यास ईश्वराची शफत. मी या पृथ्वींतील कामकारभार सोडून मकेस निघून जातो. असें बोलला तेव्हां दिलेरखान हा सय्यद मखदुम याची खिन्नतेचीं व चिंताग्रस्तपणानें भरलेलीं भांषणें ऐकून ठकविद्येनें दिलेरखान हा सैयद मखदुम याचे डेऱ्यांत आला आणि सय्यद मखदुम याजला बहुत दिलभरंवसा दिल्हा. दिलेरखान याणी पादशाहाकडून सैद मखदुम याचा पुत्र सैद अहंमद उर्फ कालेखान याजला सहा हजारी किताब आणविला. थोडकेच दिवसानंतर शाहाजादा याचे हुकूमावरून सैयद मखदुम याची बायकामुलें व त्याचे निसबतीचे लोक त्यांजला औरंगाबादेस रवाना केलें.

## २३. मसऊदखान याणीं आपला पुत्र व फौज दिलेरखानाकडे पाठविणें, दिलेरखान याणें ते लष्कर परागंदा करणें, त्याजकडील अंमलदार लोकांस दगा करणें आणि त्याजकडील अमीर लोकांस दगा करून दगलबाजीनें पकडणें प्रकर्ण :

सय्यद मखदुम याणी मोंगलाशी सख्य करून आपण दिलेरखानाकडे जाऊन पोंहचला. सय्यद मखदुम दिलेरखानाकडे जाण्याचे कारणानें मसऊदखान हा बहुत फिकीरींत पडून फारच घाबरला, कीं न जाणों विपरित प्रसंग येऊन शत्रूचे मनोरथ पूर्ण होतील. असें जाणून बहुत जल्दीनें सामानसरंजामाची तयारी करून मसऊदखान याणी आपला पुत्र सिद्दी दरवीष यांजला पांच हजार स्वार विजापुरांत बाकी राहिले होते त्यासुद्धां व्यंकटाद्री समागमें दिलेरखानाकडे रवाना केला. सिद्दी दरवीष व व्यंकटाद्री हे उभयतां विजापूर येथील फौजेसुद्धां धोलकीरास जाऊन पोंहचून दिलेरखानाचे चाकरींत जाऊन राहिले. दिल्लीवाले लोकांचे कामाचे मूळ, म्हणजे मुख्य तात्पर्य, संपूर्ण ठकविद्यवर व दगलबाजी करण्यावर व हरएक मनुष्यांचीं घरें लुटण्यावरच होतें. दिलेरखान याणे पाहिलें कीं, विजापूर येथील मुख्य कारभारी मंडळ व संभावित लोक आहेत ते सर्व आम्हाकडे येऊन जमले आहेत. आतां विजापूर रिकामें पडलें आहे. विजापुरांत कोणी आतां हुशार कामदार राहिला नाहीं. असें जाणोन दिलेरखान याचें मनांत दुष्ट संकल्प आला कीं, या विजापुरचे सर्व कारभारी मंडळास युक्तीनें व हिकमतीनें पकडून कैदेंत घालावेत आणि विजापुरावर दौड करून विजापुरचा किल्ला घ्यावा. असा विचार जेव्हां दिलेरखान याचे मनांत आला व अद्यापि ही मसलत पुरती ठरली नव्हती तोंच या मसलतीपैकीं थोडीशी बातमी फुटली. दक्षिणी लोक म्हणजे विजापूर येथील मंडळींनीं हा दिलेरखानाचा भाव समजोन हुशार व खबरदार जाहाले. तसेंच एके दिवशीं पर्जाखान शिकारीकरितां आपलेकडील कित्येक खासे मंडळ घेऊन घोड्यावर बसून शिकार धरण्याकरितां अरण्यांत निघाला. पर्जाखानाचे पाठीमागेंच मोंगलाचा पहारा येऊन पोंहचला. तेव्हां पर्जाखान याणी तो मतलब समजून अरण्यांत जात होता तो माघारा फिरला. आपले घरीं युद्धाची नोबत सुरू करून आपले फौजेसुद्धां तयार जाहाला. पर्जाखान यांणी दिलेरखान याजला निरोप सांगून पाठविला कीं, आमचे पाठीमागें तुम्ही आपला पाहारा पाठविण्याचें काय कारण होतें ? तुमचे मनांत युद्ध करण्याची आवडी उपजली असल्यास ‘ बिस्मिलाह, ’ म्हणजे आम्ही तयार आहों. तुम्ही हिंदुस्थान व दक्षिणी या दोनहि देशाचेहि लोकांनीं एकंदर जमात जमवून मजवर चालून यावें. कांहीं एक शंका ठेवूं नये. मी युद्धास आतांच तयार होऊन बसलों आहे, कीं आपले इतकेच थोडे फौजेनिसीं तुम्हांशीं कसा लढतो व कसें उत्तम प्रकारें तुम्हांस जाब देतो तें पहा. असा निरोप सांगून पाठविला तेव्हां दिलेरखान खिन्न होऊन तो

मनांतील भाव सोडून देऊन षर्जाखानास बहुत काकुळती आला यानंतर दिलेरखान याणी जाणिलें कीं, हे दक्षिणी लोक अशा तऱ्हेनें पकडले जात नाहींत. असें जाणून ती तऱ्हा सोडून देऊन दुसरेच तऱ्हेचा प्रारंभ केला. काकुळतीस येण्याचा व सख्यतेचा भाव दाखविण्याचा मार्ग चालविला. ठकविद्येचा पाश पसरून षर्जाखानास दिलभरंवस देणं व ठकविद्येनें चित्तसमाधान करण्याचा विचार करून दक्षणी लोकांस ठकविद्येनें आपलेकडे फितवून आणणें चालविलें.

## ३४. दिलेरखान याणी सालसपणाचा, म्हणजे भोळसरपणाचा, मार्ग स्वीकारणे व काकुळतीपणाचा व बहुत भोळसरपणाचा भाव दाखऊन आर्जवानें व हिकमतीचे मसलतीनें विजापूर येथील मनुष्यांस ठकविणेचें प्रकरण :

विजापूर घेण्याची आशा व आवड दिलेरखान यांचे चित्तांत नखसीखेपर्यंत पूर्ण भरली होती. नंतर दिलेरखान हा ठकविद्येस व लबाडीनें फितविण्यास रात्रंदिवस उद्योग चालवित होता. ठकविद्येंतच दिवस घालवित होता. सय्यद मखदुम याचे येऊन पोहचण्यानें सय्यद मखदुम याजपासीं दिलेरखान याणी अति आनंदाचा भाव दाखऊन संतोष दर्शविला, म्हणजे तुम्ही आलांत येणेंकरून आम्हाला फार संतोष जाहाला असें लबाडीनें बोलला. दिलेरखान याणी लबाडीनें इतका संतोष दाखविला, कीं त्या संतोषानीं सय्यद मखदुम याचे आंगरख्याचे बंद तुटूं लागले. इतका संतोष झाला. कारण कीं, दिलेरखानाचें मनोरथ पूर्ण होण्याचे प्रातःकाळचा प्रकाश दिवसेंदिवस अधिकच होऊं लागला. या बोलण्यांतील तात्पर्य हें आहे कीं, विजापूरचे राजधानींत बखेडा जाहाला. विजापुरची एकंदर फौज पळून गेली. विजापूर येथील एकंदर कारभारी मंडळांत बांकडे येऊन एकमेकांचे वैरत्वावर उठले. ते कारभारी मंडळ आपलेकडे येऊन रुजू झालें. विजापूर येथील दौलतीचा खांब हा षर्जाखान आहे या कारणास्तव फारच आवडी धरून दिलेरखान याणी बाकीची फौज फितविण्याचा उद्योग चालविला. नानाप्रकारचे ठकविद्येचे डावानें सर्वांचे अंतःकर्ण फितविण्यास प्रारंभ केला. व्यंकटाद्री हा मसऊदखान याजकडील मुख्य कारभारी होता. त्या व्यंकटाद्रीस बहुत दिलभरांसा देऊन त्याचें चित्त ठकविद्येनें फितविण्याचा उद्योग करून ठकवूं लागला. त्याजसी करार केला कीं, आम्हांस सय्यद मखदुम याचे जहागिरीसी कांहीं एक कारण नाहीं. तुम्हीं जाणा व मलीक जाणो. तुम्हीं जे कांहीं करारमदार केले आहेत, कीं पादशाहा बिबी इजला हुजूर रवाना करणें व निरंतर पादशाहाचे चाकरींत व आज्ञेंत रहाणें व सिवा हा फार गैरराहा वागणूक करणारा बंडखोर आहे त्या सिवासी कदापि किंचितहि सख्य न

ठेवणेविषयीं जे करार केले आहेत ते करार सिद्धीस न्यावेत म्हणजे पुरे. आम्हांस दुसरी कांहीं एक आशा व यापरतें आम्हीं कांहीं एक मागत नाहीं. अशा ठकविद्येनीं, कीं पाखरास दाणे टाकून पाश लावून तीं पांखरें पाशांत धरितात त्याप्रमाणें, दिल्ली येथील पादशहाकडील दिलेरखान याणी दक्षणचीं मनुष्यें पकडण्याविषयीं ठकविद्येचा पाश पसरला आहे. व्यंकटाद्री जेव्हां दिलेरखानाचे भेटीस येत होता तेव्हा दिलेरखान त्याची भेट घेण्याकरितां कचेरीची बहुत तयारी करून बिछाईती उत्तम प्रकारें अंथरून थाट करून व्यंकटाद्रीसी बहुत गोडानें व मित्रतेनें भाषणें करून त्यासी सोबत ठेवित होता. ज्या ज्या वेळेस व्यंकटाद्रीची खर्चाची तारांबळ आहे असें समजत होतें तेव्हां दिलेरखान हा तेच वेळेस त्याचे खर्चाची मदत करित होता. सरासरी लाख रुपयेपर्यंत वरचेवर मिळून व्यंकटाद्रीस पावते केले. असेंच षर्जाखान येऊन पोहचतांच षर्जाखानास पन्नास हजार रुपये रोख त्याजला खर्चाकरितां पाठविले. त्याशिवाय नित्य मोठे प्रातः-काळींच एक हजार रुपये पगार पावता करित होता. षर्जाखानासी बहुत आर्जवानें व आदरसत्कारानें वागवून व दररोज अत्यंत यत्नानें अधिकाधिकच आपले पकडींत आणिला. परगणे बाळापूर षर्जाखानाचे पुत्राचे जहागिरींत दिल्हे. त्याचा जामीनदारहि आपणच झाला. सय्यद मखदुम याची जाहागिरी घोलकीराकडे व कित्येक ज्या ज्याहागिरी दिलेरखानाचे हातीं होत्या त्या सय्यद मखदुम याजकडील कामदारांच्या हातीं राहून व एक दोन परगणे इकडे होते व जे सय्यद मखदुम याचे हाती नव्हते ते परगणे मसऊदखान याणी घेतले. व्यंकटाद्रीसी दिलेरखान याणी करार केला होता कीं, आम्हांस सय्यद मखदुम याचे जहागिरीसी कारण नाहीं, तुम्ही जाणा व तुमचा मुलुख जाणा. असा करार ठरविला असतां व सय्यद मखदुम हा आपले जाहगिरीवर मालक होता. जेव्हां या प्रकर्णी उभयतांत बोलणी जाहालीं तेव्हां दिलेरखान हा व्यंकटाद्रीची समजूत याप्रमाणें करित होता कीं, सय्यद मखदुम याजकडे परगणे आहेत त्या परगण्याचा ऐवज कर्यात मजुरा दिल्हा जाईल. तात्पर्य, दिलेरखान याप्रमाणें अति भिन्नता ठेवित होता. उभयतां शत्रूंशीं म्हणजे व्यंकटाद्री व षर्जाखानाशी दिलेरखान बहुत ठकविद्या करित होता. ज्या वेळेस सय्यद मखदुम हा दिलेरखानाचे भेटीस जात होता तेव्हां सय्यद मखदुम हा घोड्यावर बसूनच दिलेरखानापर्यंत हुजूर जात होता. सय्यद मखदुम निघो लागला म्हणजे दिलेर-खान हा त्याचा घोडा आणवून सय्यद मखदुमखानास तुम्हीं घोड्यावर बसा असे सांगोन आपले हुजूर त्याजला घोड्यावर बसवित होता. सय्यद मखदुम याजला कचेरींत दिलेर-खान आपले शेजारीं बसावयास जागा देत होता. केव्हां केव्हां दिलेरखान सय्यद मखदुम आला म्हणजे आपण बसलेले मसनदीचे, म्हणजे बैठकीचे, गादीचे, कोपऱ्यास आपण बसून ती सर्व गादी सय्यद मखदुम यास बसावयास देत होता. सय्यद मखदुम हा दिलेरखानाचे भेटीस निघाला म्हणजे सय्यद मखदुम याजकडील लोक सय्यद मखदुम याचे समागमें जात होते. सय्यद मखदुम याजला निरोप दिल्यानंतर दिलेरखान हा सय्यद मखदुम

याचे समागमें आलेले लोकांस खालीं बसवून त्यासीं बोलत होता कीं, तुम्ही जेऊन जावें. असें म्हणून बहुत आग्रहानीं त्या लोकांस जेवावयास घालित होता. दिलेरखान त्या हर-एक लोकांसीं बहुत भाषण करून त्याजला नानाप्रकारच्या गोष्टी सांगोन त्या लोकांच्या बहुत तारिफी करित होता. त्या हरएक लोकांच्या तरवारी उपसोन पाहून, त्या हरएक तरवारींची तारिफ करून, एकेक तरवार पाहावयास हातीं घेत होता. केव्हां केव्हां दिलेरखान आपलेकडूनहि कोणास ढाल व कोणास तरवार व कोणास कट्यार व कोणास कमान व दुसरे कित्येक पदार्थ देत होता. बहुतेक मनुष्यांस दिलेरखान याणी पदाधीकार दिले होते. ते लोक ज्या ज्या वेळेस खर्चास मागत होते त्या त्या वेळेस कांहीं एक अनमान न करितां त्यांजला खर्चास देत होता. सय्यद मखदुम याजला दररोज एक हजार रुपये नेमिले होते. त्या एक हजार रुपये नेमणूकीखेरीजहि सय्यद मखदुम जो पदार्थ मागत होता तो दिलेरखान त्याजला देत होता. सय्यद खान जे सांगत होता ते दिलेरखान ऐकत होता. सय्यद मखदुम जेव्हां दिलेरखानाचे भेटीस जात होता तेव्हां दिलेरखान कांहीतरी उत्तम पदार्थ सय्यद मखदुम याजला देत होता. सय्यद मखदुमास तर देईल त्याचे काय आश्चर्य आहे? सय्यद मखदुम याजकडील लोकांचे बोलण्यास देखील दिलेर-खान मोडीत नव्हता. अशी त्या सर्वांवर बहुत मेहरबानगी करून त्यांचे संरक्षण करित होता. सय्यद मखदुम याजकडील लोकांची मर्जी, म्हणजे मनोगत, ओळखून त्याप्रमाणेंच काम करून त्यांजला बहुत खुष करित होता. याजकरितां हे दक्षणी लोक दिलेरखाना-पाशीं बहुत जाऊन जमत असत. दिलेरखान फारच संतोष करूं लागला. या कारणास्तव नित्य हें काम त्याचे पकडींत येत होतें. तेव्हां विजापूर येथील दुःखदरिद्राचे पिंडेंतून सुटून दिलेरखानापासीं जाऊन सुखांत पडले होते. बहुत थोरपणाच्या व योग्यतेच्या चाकऱ्या व अधिकार मिळविले. या सर्व लोकांनीं आपले कामाचा परिणाम विसरून दिलेरखानाच्या पकडींत जात होते. हे सर्व लोक अशा प्रकारें दिलेरखानाकडे जाऊन मिळाले कीं, रात्रंदिवस दिलेरखानाची कचेरी याच लोकांनीं भरलेली राहात होती. रिकामी पडत नव्हती. हरएक लोकांनीं दिलेरखानापासून करार मदार ठरवून घेऊन त्या लोकांनीं आपआपले हरएक मित्र व ओळखीचे पुरुष जे जे विजापुरात होते त्यांजला विजापुराहून आणवून दिलेरखानापासीं चाकरीवर ठेवित होते. दिलेरखानाकडून सर्वांस पद अधिकार देववित होते. त्या लोकांचे मनांत हें येतच नव्हते कीं, दिलेरखानाचा हा सर्व मित्रतेचा भाव व हा फार अगत्य दाखविणेंचा पर्याय सर्व लबाडीचा व ठकविद्येचा होता. जसें पाखरांस दाणें टाकून पाशांत अडकावून धरितात तसें हे विजापूरचे लोक पकडण्याकरितां दिलेरखान यांणी मित्रतेचा व बहुत द्रव्य देण्याचा पाश पसरला होता. व्यंकटाद्रीशीहि अशीच मित्रता व आदरसत्कार ठेऊन त्याजला खुष करित होता. दिलभरांसा देणें व ठकविद्येनें चित्तसमाधान करणें फारच फार करित होता. सिद्दी दरविष व अबदूल रौफ व सिद्दी जव्हार (जोहर) व

सिद्दी याकूत व हसनखान रोहिला व मियाखान तुरान वगैरे कारभारी लोक सिद्दी दरविष याजसमागमें होते. त्याजला भोजनाचे पदार्थ व मेवा मिठाया वगैरे पाठवून हरएकाचे बहुतच आर्जव करित होता. नित्य दररोज भोजनाचे पदार्थ व नानाप्रकारचे उत्तम उत्तम पदार्थ पक्वान्नें करवून सिद्दी दरविषाचे घरास पाठवित होता. अबदुल करीमखान याजकडील पठाण लोक व अबदूल करीमखानाची आप्तविषयीं मंडळी विजापूर येथें होती. त्यांजला आपले कचेरींत ठेवून देण्याचा असा राबता ठेविला कीं, एक पळभर देखिल दिलेरखानाचे कचेरींत हे लोक नाहींत असें कधींहि होत नव्हते. सायंकाळचे वेळेस व्यंकटाद्रीचे समागमें जितके मुसलमान लोक राहात होते त्या एक एक मुसलमानाचें स्मरण करून व त्याजला बोलावून बहुत आदरानें व आग्रहानें जेवावयास घालित होता. व्यंकटाद्री हा जेव्हां दिलेरखानाचे कचेरींत येत होता तेव्हां दिवसाचे दोन तीन तासापासून रात्रीचे पांच सहा तासपर्यंत व्यंकटाद्री दिलेरखानाचे दरबारांत हुजूर राहात होता. व्यंकटाद्री व दिलेरखान या उभयतांत अशी मित्रता जाहाली कीं, द्वैतभाव व निराळेपणा कांहींएक राहिला नाहीं. व्यंकटाद्री ज्या वेळेस खर्चास मागत होता त्या वेळेस दिलेरखान कांहींएक अनमान न करितां त्याजला खर्चास पावते करित होता. व्यंकटाद्री जें सांगत होता तें त्याचे बोलणें दिलेरखान कधींहि मोडीत नव्हता. खैरतखान हा विजापुरांत होता. त्याजला फसऊन ठकविद्येनें आपलासा करून घेतला होता. त्या खैरतखानास पांच हजारीचा किताब देणेंचा करार करून त्याचे रोजमुऱ्या-बदल परगणे बारसी हा गांव नेमिला होता. खैरतखानहि ईच्छीत होता कीं, दिलेर-खानाकडे जाऊन त्याचे चाकरीवर राहावें. परंतु मसऊदखान हा खैरतखानास बहुत दिलभरोंसा देऊन, चित्तसमाधान करून व त्याजला बहुत खर्चासहि देऊन खैरत-खानास आपले जवळ ठेवून घेतला. असो. सरासरी दहा हजार स्वार विजापुरांतील लोकांपैकी मुसलमान व दक्षणी लोक व पठाण व मऱ्हाठे लोक चाकर होऊन दिलेर-खानापाशीं जमले व तीन चार हजार मनुष्यें क्षुधीत, म्हणजे भुकेलेलीं व अन्नाविणें फाके घालविणारीं, मनुष्यें मसऊदखानापाशीं विजापुरांत राहिलीं होतीं, तीं मनुष्यें देखील हें खाण्यापिण्याचे बहुत द्रव्य मिळण्याचे संतोषाचे वर्तमान ऐकून या लोकांपैकीं जीं जीं मनुष्यें दिलेरखानापासीं जाऊन त्याचे चाकर होऊन सुखांत पडली होती तीं तीं मनुष्यें तोंडांत पाणी घालून म्हणजे खाऊन पिऊन सुखी होऊन दिलेरखानाचा पक्ष धरित होते व गुप्तपणें करार मदारहि ठरवून घेत होते.

**३५. मसऊदखान याणीं पवित्रपणाचे पडद्यांत बसणारी पादशाहा बिबीची पालखी दिल्लीस रवाना करणें व मसऊदखान व शाहाजादा महंमद अजमशाहा या उभयतांत कांहीं दिवसांनंतर सख्य होणें प्रकर्ण :**

आदिलशाही लोकांकडून करारमदार ठरल्याप्रमाणें सिद्धीस नेणें घडेना. दिवसगत लागल्या कारणामुळें फार जरबयुक्त आज्ञापत्रें अलमगीर पादशाहाकडून दिलेरखानास येऊन पोहचलीं. तेव्हां दिलेरखान याणी व्यंकटाद्रीस या प्रकर्णी बहुत उपद्रव केला. करार ठरल्याप्रमाणें वर्तणूक करणेविषयीं बहुत जलदी केली. फारच जरब दिल्ही. तेव्हां व्यंकटाद्री यानें दिलेरखानासी बहुत मजबूत करार करवून व पादशाहा बिबी हुजूर रवाना करण्याचें काम आपले जिमेस घेऊन व्यंकटाद्री याणी या कामाबदल दिलेरखानापासून निरोप घेऊन निघाला. दिलेरखान याणी पादशाहा बिबीस आणविण्याकरितां मलीक बेक (बेग) खोज्या पादशाहाकडील चाकर व उडदाबेगिनी, म्हणजे पादशाहाचे खासे स्त्रीपासी चाकरीच्या बायकांस पुरुषाचा वेश देऊन ते सिपाई ठेविलेले असतात त्यास उडदाबेगिनी असें म्हणतात, त्या उडदाबेगीनी व आणखीहि बहुत तयारीनिशीं व्यंकटाद्रीचे समागमें दिल्ह्या. व्यंकटाद्री जेव्हां विजापुरास आला तेव्हां व्यंकटाद्री याणी मसऊदखान याजला सर्व वर्तमान जाहिर करून पादशाहा बिबी इजला रवाना करण्याविषयीं बहुत उत्तम प्रकारें व जरबयुक्त समजाऊन सांगितलें. मसऊदखानहि खुद जातीनें हेंच इच्छित होता. त्या कारणास्तव येविषई मसऊदखान याणी वारंवार मोंगलाशीं करार केले होते. दुसरे कारण हें आहे कीं, पादशाहा बिबी येथें राहिली असतां काय होईल न जाणो असें तिचें भय वागवित होता. पादशाहा बिबीचे जाण्यांत आपलें कल्याण व सुरक्षितपणा आहे असें जाणत होता. या कारणास्तव कीं, पादशाहा बिबी ही जातीची स्त्री प्रौढ व अकलवान पंधरा सोळा वर्षांचे वयाची होती. ती पादशाहा बिबी राजधानींतील कामांत बहुत मसलतगार होती. पादशाही राजधानीचीं कामें कशीं करावीं लागतात हें पूर्ण जाणत होती. राजधानीची कामें बहुत दुरुस्तपणानें शेवटास लावीत होती. पादशाही महालांतील दाया व खोजे सर्व पादशाहा बिबीचे चाकरींत व आज्ञेत राहून पादशाहा बिबीची आज्ञा कधींहि मोडित नव्हते. पुरातन संभवित, चाकर लोक हलके योग्यतेचे चाकर लोक हे सर्व चाकर मंडळ पादशाहा बिबीस रुजू होऊन तिची आज्ञा शिरसावंद्य मानित होते. तेव्हां मसऊदखान या प्रकर्णी, म्हणजे पादशाहा बिबीस दिल्लीस रवाना करण्याचें प्रकर्णी, बहुत यत्न करित होता. परंतु पादशाहा बिबी दिल्लीस जाण्यास राजी नव्हती. मसऊदखानाची तजविज कबूल करित नव्हती. यामुळें मसऊदखान निरुपाय होऊन पादशाहा बिबीचे महालांतील दाया व संनिध

राहाणारे सेवकजनांचा वसिला केला. ताऊसमा म्हणोन पादशाहा बिबीची मुख्य दाई व सरखेल होती, तीचें बोलणें पादशाहा बिबी बहुत कबूल करित होती. त्या ताऊसमा या नावाचे दाईस व महालांतील दुसरेंहि चाकर लोकांस या कामांत घेतलें. या चाकर लोकांचे वशिल्यानें पादशाहा बिबीचे मनांत मजकूर भरून दिल्हा कीं, तुमचें जाण्यांत दौलतीचें कल्याण आहे. कारण कीं, तुमचे दिल्लीस जाणें हें तुमचे भावाची राजधानी कायम राहाण्याचें कारण होत आहे. तुम्ही दिल्लीस न जाण्यांत ही राजधानी हातांतून जात आहे. सर्व कामें बिघडतात. या प्रकारें बोलणीं बोलून ये विषयीं सर्व सेवक लोक बहुत यत्न करिते झाले. तेव्हां पादशाहा बिबी बहुत बेजार होऊन, म्हणजे कंटाळून, दिल्लीस जाण्यास राजी झाली. या कारणामुळें पादशाहा बिबीचे रवानगीस बहुत दिवस लागले. दिलेरखान हा व्यंकटाद्रीस बहुत रागास येऊन व बहुत जरबेची ताकीदपत्रें पाठवित होता. मसऊदखानास ताकिदीवर ताकिद दिल्लीहून पाठवित होता. तेव्हां मसऊदखान याणी नादारीपणाची, म्हणजे पादशाहा बिबीची रवानगी करण्यास खर्चाची, फारच अडचण आहे, कांहींच सोय नाहीं. असा बाहना करून रवानगीचे सामानसरंजामाचे तयारीचे नांवानीं दिलेरखानाकडून कर्ज मागण्याचे रितीनें ऐवज आणवून हस्तगत केला. मसऊदखान हा कर्ज घेण्यापासून व मनोरथपूर्ण होण्यापासून व आपली सर्व कामें उलगडून घेण्यापासून स्वस्थ झाला. तेव्हां मसऊदखान याणी तारीख २ जमादिलाखर सन १०९० एक हजार नव्वद (१ जुलै १६७९) रोजीं शाहाजादी पादशाहा बिबी इजला कसेंहि करून महालांतून बाहेर काढून पालखींत बसवून मका दरवाज्याचे बाहेर आणोन पादशाहा बिबीची स्वारी उतरविली. पादशाहा बिबीचे संनिध राहाणारीं मनुष्यें व महालांतील बायका व दाया कुणाबिणी व खोजे पुरातन चाकर व विश्वासू कित्येक अमीरलोक यांजला पादशाहा बिबीचे समागमें देऊन शाहाजादीची स्वारी पादशाही डौलानें ता. ५ जमादिलाखर (४ जुलै १६७९) रोजीं व्यंकटाद्रीचे समागमें लष्कराकडे रवाना केली. ता. २० जमादिलाखर (१९ जुलै १६७९) रोजीं धोळकीर येथें जाऊन पोहचली. तेव्हां दिलेरखान हा सामोरा आला. दिलेरखान यांणी मेजवानीचे सामानसरंजाम पाठविला. ता. २२ माहे जमादिलाखर (२१ जुलै १६७९) भिवरा नदींतून उतरून पलीकडे गेले. मुकाम टाकळी येथें लष्करांत येऊन राहिले. तेव्हां दिलेरखान याणी लष्करांतील सर्व अमीर लोकांस व हुद्देदार व पादशाही मुतसदी लोकांस हुकूम सांगून पाठविला कीं, सर्वांनीं आपआपले योग्यतेनुरुप नजर व नजराणे रोख व कापड वगैरे करून मुजरे करावे. असा हुकूम सांगून पाठऊन दिलेरखान याणी आपणहि खुद जातीनें ते दिवशीं पादशाही डौलानें मेजवानी करून दुसरे दिवशीं प्रातःकाळीं दिलेरखान हा पादशाहा बिबीचे दरबारांत जाऊन एक हजार रुपये नजर करून मुजरा केला. बाकीचे लोक ज्याणीं आधीं मुजरा केला

नव्हता त्या लोकांनींहि नजराणा करून मुजरे केले. या कारणानें पादशाहा बिबीस नजरेचा ऐवज बहूत प्राप्त झाला. नित्य भोजनाचे सामान पादशाहा बिबीकडे सरकारांतून जात होतें. नऊ दिवसपर्यंत पादशाहा बिबीची स्वारी लष्करांत टेऊन घेऊन ता. ४ माहे रजब ( १ आगष्ट १६७९ ) रोजीं दिल्लीकडे रवाना केली. सर्व आपले सरहदींतील मामलेदार वगैरे लोकांस व किल्लेदार व जिल्हेदार व फौजदार वगैरे जे पादशाहा बिबीची स्वारी जाण्याचे मार्गावर होते त्यांजला हुकूम पाठविले कीं, हरकोणीहि शाहाजादी पादशाहा बिबी ईचे पालखी समोर जाऊन नजरा करून व मेजवानी करून आपआपले सरहदींतून सदरहू स्वारी दुसरे सरहदींत पोचवित जाणें. सेवकपणाच्या चाली बजाऊन कल्याण करून घेत जाणें. असे हुकूम पाठविले. शाहागड येथें पादशाहा बिबीची स्वारी जाऊन पोहचली. तेव्हां शाहाजादा सुलतान मुअाजम हा औरंगाबाद येथें रहात होता तो शाहाजादा सामोरा येऊन त्याणी शाहाजादीची स्वारी औरंगाबादेस आणिली. पादशाही डौलाची मेजवानी केली. पादशाही डौलाप्रमाणें जडजवाहीर पोषाख वगैरे दिल्हे. आठ दिवसानंतर सदरहू स्वारी तेथून पुढें चालती झाली. असेच मजल दरमजल नजरा व मेजवान्या घेत घेत व मुक्काम करित करित तीन महिन्यानंतर दिल्लीस जाऊन दाखल जाले.[१५] त्या समई पादशाहा व शाहाजादा हे उभयतांहि राणा याचे पारपत्यावर गेले होते. यामुळें पादशाहाजादीचें लग्नसमारंभास अवकाश लागला. पादशाहास जेव्हां पादशाही कामापासून फुरसत जाहाली तेव्हां पादशाहा या कामाकडे, म्हणजे लग्नसमारंभाकडे, सन्मुख जाहाले. पादशाहा याणी सरकारी कामगार व हुदेदार व कारखानदार लोकांस आज्ञा केली कीं, लग्न समारंभाचे सामान अति उत्तम जमवावें. त्या आज्ञेप्रमाणें थोडकेच दिवसांत सदरहु लोकांनीं सर्व सामानसरंजामाची तयारी केली. बहूत थाटाची कचेरी करून लग्नसमारंभाचे कचेरीची आरास जशी असावी तशी केली. तेव्हां बहूत उत्तमपणानें व कल्याणप्रद योगानें व हजारो संतोषानें व यशस्वीपणानें तारिख १२ माहे रजब सन १०९० एक हजार नव्वद ( १०९२ पाहिजे ) ( ९ आगष्ट १६७९ ? – २० जुलै १६८१ पाहिजे ) रोजीं शाहा महंमद अजमशाहा याचें लग्न पवित्रपणाचे डबींतील भारी किंमतीचे मुक्ताफळाशीं, म्हणजे पादशाहा बिबीसी आली आदिलशाहाचे मुलीसमागमें झालें.[१६]

१५. On Thursday, the 4th March 1680 / 12 Safer, 23rd Julus, Hakim Shamsa, who had reached the Court with the daughter of Adil Khan Bijapuri, received a special robe, a horse with gold saz, an elephant, the rank of 3 hazari ( 1000 Tr. ), the title of Shamsuddin Khan and posting under Khan Jahan Bahadur.– MiA., p.117

१६. On Tuesday, the 19th July 1681 / 13 Rajab 24 Julus, Siddi Yahya brought to the harem Shahar Banu, the daughter of

३६. पादशाहा बिबी गेल्यानंतर पुन्हां मसऊदखान व दिलेरखान या उभयतांत वांकडे येणें व मसऊदखान याणी व्यंकटाद्रीस कैद करणें प्रकर्ण :

पादशाहा बिबी हुजूर रवाना जाली तेव्हां दिलेरखान याचीहि चाकरी पादशाहास पसंत आली. दिलेरखानाचे मनोगताप्रमाणें हीं सर्व कामें जाहालीं. अंतकर्णास स्वस्थता जाहाली तेव्हां दिलेरखान पुन्हां आणखी आपले दगलबाजी व ठकबाजीचे बानीवर येऊन दिलेरखान यांणी मनांत आणिलें कीं, आतां कांहीं नवाच ठकविद्येचा खेळ उभा करावा. असें इच्छून व्यंकटाद्रीसी रदबदली केली कीं, मसऊदखान याणी विजापुरचा किल्ला हकीम षमसुद्दीन याचे हवालीं करावा. शिकंदर पादशाहा प्रौढ म्हणजे थोर वयाचा व समजुदार होये तोंपर्यंत विजापूर येथील राजधानीचा कारभार हकीम षमसुद्दीन याणी करून राजधानीची कामें चालवित जावीं. करार ठरविला कीं, तीन हजार बुंदले बंदूकबारदार हकीम षमसुद्दीनाचे मदतीस द्यावे. एखलासखान याजलाहि तीन हजार स्वारांनिशीं हकीम षमसुद्दीनाचे मदतीस नेमावें. एखलासखान याणी बहलूलखानाचे वाड्यांत राहून विजापूरचे किल्याचे व विजापूरचे ताब्यांतील आसपासचे मुलकाचे संरक्षण करित जावें. मलीक बरखुरदार हे अलमगीर पादशाहाचे तर्फेनें मुकीमीचे मार्गानें कामावर हमेशा नवरसपूर किंवा शाहापूर येथें रहातात त्या मलीक बरखुरदार याणां विजापूर शहरांत रहावें. आदिलशाही फौज दिल्लीकडील पादशाही फौजेचे कुमकेस घेऊन सिवाचें पारिपत्य करण्याकरितां मिरजेकडे व तिकडील आसपासचे मुल्कावर चालून जाण्याकरितां निघोन मुलुख घेणें करावें. सिवाचे हातीं जो मुलूख गेला आहे तो सोडवून घ्यावा. आपण दक्षणचे दहाबारा हजार स्वार नवीन चाकरीवर टेविले आहेत ते सर्व स्वार आदिशाहाकडील लोकांचे कुमकेस घ्यावे. या कामातील तात्पर्य खुण ही आहे कीं, हकीम षमसुद्दीन याचे मनांत विजापूर येथील राजधानीचा कारभार करणेंची फारच आवड बहुत दिवस होती परंतु मनोरथ सिध्धीस जात नव्हते. हली मोगलासी मिळोन हकीम षमसुद्दीन याणी फारच सख्य केलें कीं, मोगलाचे वशिल्यानें मसऊदखान याजला विजापूर येथून काढून आपण त्या कामावर विजापूर येथें दाखल व्हावें आणि कामावर कायम होऊन आपले अकलेचे विचारानें राजयधानीचा कारभार करावयाकरितां मसऊदखान याजला विजापूर येथून काढण्याविषयीं दिलेर-

Adilshah Bijapuri. She was married to Muhammad Azam on the 26th July 1681/20th Rajab.– MiA, p. 129.

'विजापूरची आदिलशाही' चीं पुढील ५० व ६३ ही प्रकरणें पहा. हा सन १०९० ऐवजीं १०९२ = १२ रजब १०९२ म्हणजे १८ जुलै १६८१ पाहिजे.

खानास हकीम षमसुद्दीन हा मार्ग सुचवित होता. येविषयीं फारच यत्न करित होता. दिलेरखान याणी हकीम षमसुद्दीन याजला करार केला होता कीं, मसऊदखान याजला उदोनीस रवाना करून तुम्हास विजापूर येथें राजधानीचे कामावर नेमून सय्यद मखदुम याजला एकंदर नवीन चाकरीस ठेविलेले फौजेसुध्दां तुमचे मदतीवर व कुमकेवर देतो. असा मनसुबा करून व्यंकटाद्रीसी करार करून निश्चय करविला. ता. २९ माहे जमादिलाखर ( २८ जुलै १६७९ ) रोजीं निश्चय ठरविला. व्यंकटाद्री याणी हें सविस्तर वर्तमान मसऊदखान याजला लिहून पाठविलें. तेव्हां मसऊदखान याणी सदरहू सविस्तर मजकूर लक्षांत आणून आपलेकडील एकांतातील मनुष्यांसी मसलत केली. सिद्दी याकूत, काजी सईद, सीदोराव व सिद्दी याकूत खैरतखानी हे सर्व लोक मसऊदखानास बोलले कीं, ही सर्व मोगलाची ठकविद्या आहे. मोगलाचे ठकविद्येचे खेळानें ठकूं नका. हुशार व्हा. विजापुरचा किल्ला देऊं नका. जर करितां तुम्ही विजापुरचे किल्यांतून बाहेर निघाल तर ही राजधानी कांही दिवसांनीं मोगलाचे हातीं जावयाची असेल ती तूर्त आजच मोगलाचे हातीं जाईल. असें बोलले तेव्हां मसऊदखान सावध जाहाला आणि समजला कीं, व्यंकटाद्री हाहि दिलेरखानासी व हकीम षमसुद्दीन यासी सामील होऊन आम्हास ठकविणेंकरितां पत्र पाठविलें आहे. हे व्यंकटाद्री याणीच पाठविले आहे असें जाणिलें. व्यंकटाद्री याणी दिलेरखानासी मुदतीचा करार केला कीं, मी विजापुरास जाऊन दोन दिवसांत मसऊदखान याजला ताळ्यावर आणतो. हकीम षमसुद्दीन याजला विजापुरास नेऊन मसऊदखान याजला किल्यांतून बाहेर काढितो. असें सांगितलें आणि व्यंकटाद्री याणी आपलेसमागमें फौज होती त्याजला खर्चास देण्याकरितां दिलेरखानापासून कर्जाचे चालीनें ऐवज घेऊन मसऊदखानाकडे निघोन आला. तेव्हां मसऊदखान याणी दोन तीन दिवस फिकीरींत पडून बहूत विचार करून ता. १५ पंधरावी माहे रजब रोजीं रात्रींचे नववे तासीं सन १०९० एक हजार नव्वद (१२ ऑगष्ट १६७९) दिवशीं व्यंकटाद्री याजला जाखो पंडीत व मल्हारी व बहलूलखान व श्रीनिवासाचार्य व दुसरे कित्येक लोक व्यंकटाद्रीचे ताब्यातील होते त्या एकंदर मनुष्यासुद्धां व्यंकटाद्री याजला कैद केलें आणि सिद्दी अबदूल आजीज याजला त्यांचे घरोघर पाठवून त्याचे घराचे सामान चिजवस्त सुद्धां सरकारचे खालसांत आणिलें. मसऊदखान याणी आपला पुत्र सिद्दी दरविश म्हणून होता त्याजकडे जासूद जलद पळत रवाना करून आपले पुत्रास आणविलें. सिद्दी दरविष हा आपले बापाची सूचना येऊन पोहचतांच सायंकाळचे वेळेस एकंदर फौज समागमें होती त्या सर्व फौजेसुद्धां धोलकीर येथून पळत निघोन विजापुरास आला.

३७. दिलेरखान याणी विजापूर घेणेंचा खास निश्चय करणें, विजापूरचे किल्यावर हल्ला कायम करण्याची जलदी करणें व खाजिन्यांतील ऐवज सरहया ुळें या कामांत सुस्ती होणें प्रकर्ण :

ही भयकर कामें प्रगट होण्यानें, म्हणजे सदरहू असाभ्या मसऊदखान याणी कैद केल्या हें वर्तमान ऐकण्यानीं, दिलेरखान, जसे सर्पाचे मस्तकावर मारण्याकरितां काठी मारली आणि तो काठीचा घाव पुरा न लागतां तो सर्प दुखावला म्हणजे अत्यंत क्रोधानें संतप्त होतो त्याप्रमाणें दिलेरखान, आपले ठिकाणीं अति क्रोधायमान होऊन संतप्त जाला. फारच रागास पेट्रून आपले फौजेस तुम्हीं जलद जाऊन भिवरा नदींतून उतरावें अशी आज्ञा केली. दिलेरखान याणी तो निश्चय केला कीं, विजापुरावर लढाई कायम जाहाली नाहीं तोंच आपण तेथें जाऊन पोहचून येणेंजाणेंचा मार्ग बंद करून नाकेबंदी अशी करावी कीं किल्ला पुढें रोखून बसावें. असा निश्चय केला आणि नदी उतरावयाचे सामान नावा व टोकरे अमीरलोकांस वाटून देऊन दिलेरखान आपणहि नदी उतरावयास आला. ता. २१ माह मजकूर ( १८ आगष्ट १६७९) रोजीं दिलेरखान आपण खुद जातीनें नदींतून पलीकडे उतरून धोलकीरानजिक जाऊन उतरोन सर्व फौज उतरून येण्याची मार्गप्रतिक्षा करित राहिला. जेव्हां हकीम षमसुद्दीनाचा भाऊ मीरजा बाकर व शेख आयुब हे व्यंयटाद्रीचे समागमें दिलेरखानाकडे विजापुरास आले होते ते मसऊदखान याणी व्यंकटाद्रीस कैद केल्यानंतर परत येऊन दिलेरखानाकडे गेले. व्यंकटाद्रीस कैदेंतून सोडीत नाहीं असा सविस्तर मजकूर दिलेरखानास सांगितला. हकीम षमसुद्दीन आले असतां त्याजला विजापूर येथील मुल्की कामावर नेमावें येविषयींचा मसऊदखान याणी मार्गप्रतीक्षा करणेंचाहि मजकूर जाहीर केला. तेव्हां दिलेरखान हा शेख आयुब याजवर फारच क्रोधायमान जाला. बहूत रागास येऊन बहूत धिकार केला. बोलला कीं, मी तुजला व्यंकटाद्रीचे समागमें दिल्हा होता ते केवळ व्यंकटाद्रीचे संरक्षणाकरितांच त्याजबरोबर तुजला पाठविला होता. ज्या समई मसऊदखान याणी व्यंकटाद्रीस पकडला त्या वेळेस व्यंकटाद्रीचा बचाव करण्याकरितां तूं आपला प्राण ओवाळून टाकितास किंवा मेला जातास तरी तुजला योग्य होतें. तूं बहूत नामर्दी, म्हणजे गांडूपणा, केलास. मजपुढें येऊन तोंड दाखविलेस हें काहीं एक लाज न धरितां निलाजरेपणा केलास असें बोलला. मसऊदखान या प्रबळ शत्रुचे, म्हणजे दिलेरखानाचे भयानें व जरबेनें फिकीरींत पडला. मनांत आणिलें कीं, दिलेरखानाशीं सख्यहि ठेवावें. यास्तव खैरतखान व सैयद महंमद बुखारी मिरजा बाकर हकीम षमसुद्दीन खानाचा भाऊ व यादगार अली वलद अबुल हसन मुलाना याजला मसऊदखान याणी आपलेपाशीं बोलावून त्याजला सांगितलें कीं, हकीम षमसुद्दीन याजला राजी करून त्याजला राजधानीचे कामांत घेऊन दिलेरखानाशी मित्रता होण्याची बोलणीं बोलावित म्हणोन मसऊखान बोलला. तेव्हां ते सदरहू सर्व लोक

बोलले कीं, तुमचे बोलण्याचा काय विश्वास? एक वेळ आसार शरिफ मध्यें तुम्ही शफत वाहून हकीम षमसुद्दीन याजला या कामांत आणिलें व पंचाहत्तर हजार होन देण्याचा करार करून त्याप्रमाणें होन देण्यास अनमान केलात आणि करार सिद्धीस नेले नाहींत. हकीम षमसुद्दीन याचें मन दुखवून त्याजला बिघडून टाकिलेत. आतां तो तुमचे कामांत पडावयाचा नाही. असें बोलले तेव्हां मसऊदखान बोलला कीं, ते मी केलें नाहीं. व्यंकटाद्री याणीं उत्तम मुसलमानावर जुलूम केला व त्या कर्माची शिक्षाहि हातोहात, म्हणजे तात्काळ, तो पावला. आतां मी हकीम षमसुद्दीन याजला विजापुरचे राजधानींतील मुलकी कामाचा कारभार देतो व हकीम षमसुद्दीनाचे सांगण्याबाहेर वागणार नाहीं. तो जे करील त्या गोष्टीस मी राजी होईन. हकीम षमसुद्दीनखानाखेरीज मी कोणताच कारभार करणार नाही. आतां तुम्हीं कसेंहि हरएक प्रकारें दिलेरखानासी सख्य व्हावयाजोगें बोलणें बोलोन सख्य करावें. असें बोलला आणि दोघांस दोन शालजोडी सुद्धां पोषाख व दोन पथके देऊन दोघांस आसार शरीफचे महालांत नेऊन शफत वाहवून कुरान शरीफची किताब त्याचे हातीं उचलून देऊन क्रिया करून त्याजला रवाना केलें. त्याणीं दिलेरखानाकडे जाऊन हकीमाचे वशिल्यानें सख्य करण्याचा यत्न करिते जाहाले. मसऊखान याणीं सांगितलेला निरोप सांगते झाले, कीं तुमचे कर्ज देणें आहे त्या कर्जात षर्जाखानाचे इलाख्याचा मुलूख मी देतो आणि शिवाजीचा बंदोबस्त उत्तमप्रकारें करितो. हकीम षमसुद्दीन याजला त्याचे ताब्यांतील लोक व त्याचे आप्तविषयी मंडळीसुद्धां इकडे पाठवावें. आम्हीं त्याजला मुलकी कामें देऊन त्याचे चाकरींत आम्ही राहूं. त्याची मर्जी मोडेल असे आम्ही कांहीं एक करणार नाहीं. हे सर्व करार होते, म्हणजे खोटा भाव होता व हे सख्य व मित्रता उगीच लबाडीची होती यांत खरी मित्रता किंवा सख्यपणाचा भाव कांहीं एक नव्हता. दिलेरखान हा विजापुरास येऊन पोहचण्याकरितां यद्यपि बहूत जलद करित होता परंतु दिलेरखानाचे खजिन्यांतील ऐवज खर्च जाहाला होता. कांही एक शिल्लक राहिली नव्हती. शिपायांस खर्चास द्यावयास हातीं कांहींच राहिलें नव्हतें. शाहाजादा मआजम[१७] व दिलेरखान या उभयतांत वांकडे आलें होतें. शाहाजादा हा निरंतर दिलेरखानाचे कामाचा बखेडा करण्याविषयीं यत्न करित होता. शाहाजादा याणीं बेदरचे व परांड्याचे व सोलापुरचे किल्ल्यावरील किल्लेदारांस व सुरतेचे बंदरास व दुसरे कित्येक जाग्यास ताकीद पत्रें पाठविलीं होतीं कीं, दिलेरखान हा पादशाही खजिना व्यर्थ खर्च करित आहे, यास्तव आमचे आज्ञेशिवाय नवीन खजिना व तोफखाना किंवा कांही एक तयारीचा सरंजाम कांहींच कोणीहि पावता करूं नये. हलीं तर दिलेरखान याणीं विजापूरचे राजधानीच

१७. On Wednesday, the 18th September 1678/11th Shaban, Prince Shah Alam Bahadur, with a vast army, was sent to govern the Subhas of the Deccan.– MiA, p. 104–105.

कारभारावर हकीम पमसुद्दीन याजला कायम करण्याकरितां व्यंकटाद्रीसी सख्य केलें. शाहाजाद्यास दिलेरखान याणी विनंती पत्र लिहिलें कीं, ईश्वराचे कृपेकरून हली आपले मनोगताप्रमाणें कामाचा योग घडून आला आहे यास्तव खजिना व लष्कर व लढाऊ सामान सरंजाम इकडील मदतीस पाठविण्यांत यावी, नाहीं पेक्षां काम घडून आलें आहे तें खराब होऊन जाईल. असें लिहिलें तेव्हां शाहाजादा याणी एक हजार हत्यारबंद शिपायांसमागमें साठ हजार मोहरा विश्वासू लोक बरोबर व दोन हजार बंदूकवाले लोक देऊन रवाना केले. त्या सर्वांस आज्ञा केली कीं, राख ऐवज सोलापूर येथें बंदोबस्तानें ठेवावा आणि ज्या समई आतां द्रव्य खर्च केलें असतां विजापूर हस्तगत होईल असें खास समजेल तेव्हां हा ऐवज दिलेरखानास पावता करावा. असा हुकूम करून दिलेरखान याजला ताकिद लिहिली कीं, इतकेंच ऐवजांत विजापूर घेणेंचें काम शेवटास लावावें. यावर अधिक ऐवज मागूं नये. यासमई तर मसऊदखान याणी व्यंकटाद्रीस कैद केलें आणि सिद्दी दरवीष याजला फौजेसुद्धां बोलावून दिलेरखानासी मसऊदखान बिघडला. उभयतामध्यें फारच वांकडें आलें. शाहाजाद्याचे निसबतीचे लोकांस हें वर्तमान कळल्यानंतर त्या लोकांनीं दिलेरखानाकडे ऐवज पावता करण्याविषयीं हरकत केली. यामुळें दिलेरखान अत्यंत क्रोधायमान जाहाला आणि अनेक प्रकारच्या सबबी लिहून ते विनंतीपत्र शाहाजाद्याकडे पाठवून तो ऐवज हस्तगत केला.

### ३८. मसऊदखान याणे विजापुरचे किल्ल्याची लढाई करतां मजबुती करणें, सिवाजीकडून फौजेची कुमक आणविणें व सिवाजी याणी मदतीकरितां फौजेसुद्धां येणें प्रकर्ण :

जेव्हां या कामास म्हणजे दिलेरखानाजवळचा ऐवज सरला नंतर पादशाहाकडून आणविला तो ऐवज हातीं यण्याचें कामावर बहुत दिवस लागल्यामुळें मसऊदखानास बहूत फुरसत सांपडून विजापुरचे किल्याचा बंदोबस्त करण्यांचा विचार उत्तम प्रकारें केला आणि विजापुरचा किल्ला लढाईचे सामान व सरंजामानें भरून सिबंदी व फौज तोरगल व उदोनी व कंदनाल (कर्नूल) व पाम नाईक याजकडून आणवून किल्ल्याची नवीन बहुत मजबुती केली. सिदोराव याजला मसऊदखान याणीं आपले तर्फेने शिवाजीकडे पाठवून निरोप सांगून पाठविला कीं, व लिहिले कीं, या राजधानीचा मजकूर तुम्हांस माहित नाहीं असें नाहीं. जाहीरच आहे. लष्कर व खजिना व मुलूख व किल्ल्याचे बंदोबस्ताचे तयारीचें सामान व किरकोळ जिन्नस कांहीं एक राहिला नाहीं. शत्रु महाप्रबळ आहे. बहुत कठीण व विजापुरावर हल्ला करण्याचे विचारांत रात्रंदिवस आहे. तुम्हीं तर इकडील कुटुंबांतील पुरातन चाकर व याच

राजधानींत थोरपणा पावलेले आहांत. यास्तव या दौलतीची काय ती चिंता तुम्हांस असेल. येविषयींचें दुःख दुसऱ्यास कांहीं एक नसेल. ही संकटाची वेळ अशी आहे कीं, असा प्रबळ शत्रु मस्तकावर येऊन पोहचून संधी साधण्याकरितां टपून बसला आहे आतां किल्ल्याचे व राजधानीचें संरक्षण तुम्हीं मन घातल्याशिवाय होत नाहीं. धण्याचे मिठास स्मरोन इकडे निघोन यावें आणि तुम्हांस जसें योग्य दिसेल तशी इकडे सूचना करावी म्हणजे त्याप्रमाणेंच वर्तणुक करितां येईल. असें पत्र लिहिलें. तेव्हां सिवाजी याणीं हा मनसुबा कबूल करून व आपण येविषयीं राजी होऊन आणि पूर्ण आधार देऊन विजापूरचे संरक्षण करण्याचा पतकर घेतला.[११] दहा हजार स्वार मसऊदखानाचे कुमकेस नेमिले. जागोजागचे किल्ल्यांकडून ओझ्याचे दोन हजार बैल हरएक किरकोळ सामान वगैरेनें भरून विजापुरास पाठविले. आपले मुलकांतील एकंदर रयत लोकांस ताकीद सांगून पाठविली कीं, केली सामान व त्याशिवाय दुसरे कित्येक जिन्नस विकावयाकरितां विजापुरास न्यावे म्हणजे तें सामान विजापूर शहरांतील रहाणारे सुखवस्तु लोकांस व विजपूरचे वतनदार लोकांस मिळेल. अशी ताकीद केली आणि विसाजी निळकंठराव याजला सिवाजी याणी आपलेकडून मसऊदखानाकडे पाठविलें. मसऊदखानाचें पत्राचें उत्तर लिहून पाठविलें कीं, या चाकरीचा पतकर मजकडे आहे. तुम्हीं किल्ल्याची मजबुती करून खातरजमेनें स्वस्थ असावें, मी खुद जातीनें येतो. दिलेरखान याजला त्याचे फौजमुद्धां खराब करून व लुटून याचे योग्यतेहून अधिक शिक्षा त्याजला देतो. असें उत्तर लिहून पाठविलें तेव्हां या उत्तराचे योगें करून मसऊदखान याजला फारच धीर आला. पुन्हां थोडकेच दिवसांनी शिवाजीकडील मुखत्यार विसाजी हा विजापुरास आला. त्याणी शिवाजीकडून पादशाहास व मसऊदखान्नास पोषाख आणिले आणि पावते केले. विनंती केली कीं, पांच हजार स्वार ऐनापुरावर व पांच हजार स्वार भुपाळगडावर येऊन पोहचले आहेत. सदरहु मार्गप्रतिक्षा करित आहेत कीं, ज्यावेळेस आज्ञा कराल ते वेळेस हजर होतील. सिवाजीहि खुद जातीनें पाटीमागून येऊन पोहचत आहे. अशी विनंती केली तेव्हां मसऊदखान याणी शिवाजीकडून आलेले विसाजी निळकंठ याजला पोषाख दिला आणि आज्ञा केली कीं तुम्हांकडील फौज जलद यावी. या फौजेनें किल्ल्याचे संरक्षणाचे कामावर हुशार रहावें. असें सांगितलें आणि मसऊदखानहि खुद जातीनें लढाईचे सामानाची तयारी करण्यांत व शत्रूचे मुकाबल्यावर उभे राहाण्यास तयार होऊन आपले तयारीचे विचारांत पडला. हसनखान रोहिला हा अबदूल करीम याचा चाकर होता. त्याजला दौलतीची नेमणूक निराळी करून देऊन व निशाण व चौघडा दिल्हा. याकूतखान खैरतखान याजला आपले जवळ बोलावून आणोन त्याजला बहूत दिलभरंवसा देऊन त्यांचें चित्त समाधान केलें. त्याजपासून मसऊदखान याणी शफत वाहून घेतली कीं, माझें चित्त निर्मळ जाहालें व माझे मनांत काहीं एक मळ राहिला नाहीं. मी कांहीं एक दगाफटका करणार नाहीं. अशी क्रिया करून घेतली. व सिद्दी दर-

विषें याजला पेष करून, म्हणजे प्रमुख करून, सुभाचा कारभार त्यानीं रास्तपणानें करित जावा असें ठरविलें. मसऊदखान याचा इरादा होता कीं, याकुतखान याजला पर्जाखानाचे बराबरीनें काढावें आणि त्याची नेमणूकीची दौलत त्याजकडे देऊन उदोनीचे मुल्कापैकीं व विजापुरचे तर्फेतील मुलाकापैकीं ज्यागीर द्यावी आणि सामानसरंजामाचे तयारीबदल तो जे जिन्नस मागेल ते द्यावें. असा इरादा होता. त्याच दिवसांत खैरतखान व मीयाखान हे दिलेरखानाकडून आसपासचा मुल्क घेण्याचे कामावर नेमिलेले होते. ते मंगळवेढ्यावर येऊन पोहचून त्याणी सैद खान तरीन हा मंगळवेढ्यास नेमलेला होता त्याजवर गर्दी केली. तेव्हां सैदखान हा बहूत मारामारी व तोडातोडी जाल्यानंतर या उभयतांचे बराबरीनें युद्धास ठरवेनासे जाहाले तेव्हां तेथून पळून गेला. मंगळवेढे मोगलांचे हातीं गेलें.[१८] याच दिवसांत मसऊदखान याणी मल्हार पंडीत व श्रीनिवासाचार्य व व्यंकटाद्री याजला पोलाद हापसी याच्या हवाला देऊन वसूल केला. मल्हारी पंडीत याजला चाळीस चाबूक मारून पंचविस हजार होनाचा कागद लिहून घेतला. ब्राम्हणराव याणी मसऊदखान यास सवाल बोलला कीं, वकील अबदुल सैफ याजला कैद करून बहुत जुलमानें ऐवज वसूल करणें. हें जीव जाणें फार जूलूम आहे. असें बोलला तेव्हां मसऊदखान याणीं त्याजला उत्तर दिल्हे कीं, अबदूल करीम याजला असें करणें काय योग्य होतें कीं दियानतराव याजला पादशाही चाकर असोन ठार मारणें आणि त्याचे घरदार लूटून फडशा करणें. हा जुलूम काय थोडा झाला कीं काय? हेंहि असो. ह्या अबदूल करीमाची अशी काय योग्यता होती व हें त्याजला काय योग्य व त्याचें असें एवढें काय सामर्थ्य होतें, कीं त्या वाकलानीं राजधानीचे श्रेष्ठ कामांत व पादशाही मसलतींत बखलगिरी करणें आणि राजधानीची खराबी करण्याचे यत्न करणें, हे योग्य कीं काय? आम्हीं हली त्याचें जें पारपत्य करित आहो तें थोडेंच आहे. जर करितां तुम्हांस त्याचें संरक्षण करण्याचें मंजूर आहे व त्याची सुटका व्हावी असें तुमचे मनांत आहे तर पंचवीस हजार होन तुम्ही आपल्या जवळचे देऊन त्याची मोकळिक करून घ्यावी. असें उत्तर दिल्हें. अशा समयांत वर्तमान आलें कीं, शत्रुचे स्वारांनीं सोलाटगी व कासेगाव लुटून तेथील लोकांना मारून तें गांव घेतलें आणि आसपासचा मुल्क लुटून फडशा करित आहेत. असें वर्तमान आलें आणि या बातमीचे लागोपाठच दुसरें वर्तमान आलें कीं, सय्यद मखदुम याजकडील स्वार आलमिल्यावर येऊन पोहचले आहेत. अशी बातमी आली तेव्हां मसऊदखान याणीं खैरतखानासी एकांत करून सय्यद शरीफ व फरीदखान पंजी व मिटीखान पंजी, म्हणजे पटाण जातींतील भेद

१८. On the 14th October 1679/19th Ramzan 1090 A. H., a letter was received from Dilar Khan stating that the fort of Mangalbhidha had been wrested from Shivaji.– MiA, p. 112.

आहे, सदरहू तीन असामींस फौजेसुद्धां तिकडे रवाना केलें. व साबाजी घाटगे याजला बोलाऊन त्यास पूर्ण दिलभरंवसा देऊन तोरगल येथील सिबंदी याचे समागमें देऊन उमदीकडे रवाना केले. इतक्यामध्यें संभाजी रसद नेण्याकरितां निघाला होता. त्या संभाजीचा व याचा मोकाबला जाहाला. तेव्हां उभयतामध्यें फारच मोठी लढाई जाहाली. उभयतांकडीलहि दहा पंधरा असामी ठार झाले. साबाजी याजला तिसाची जखम लागली. पंनास घोडे व चार उंट पंनास बैल इतकी लूट साबाजीचे हातीं लागली. मसऊदखान याणीं एक शालजोडी पोषाख व दीडशे होन साबजी याजला व एक शालजोडी त्याचे वकीलास दिल्ही. या प्रकर्णाचे लागोपाठच सिवाजीकडील कामदार आनंदराव हा दोन तीन हजार स्वारांसहित आला.[19] तेव्हां मसऊदखान शहर नवरसपुरार्यंत याजला सामोरा गेला. याजलाहि नवरसपुरांत कायम केलें. याच दिवसांत आकलूज येथून खबर आली कीं, शत्रुकडील बजाजी सरलष्कर याणीं येऊन आकलुजवर हल्ला केला होता. बाहादुरखान सांगोले येथें होता. त्याणीं हें वर्तमान ऐकून तात्काळ दौडीनें जाऊन बजाजीसी मोठी लढाई केली. सेवटीं या युद्धांत बजाजीचा[20] पुत्र ठार झाला आणि बजाजीची बाकीची फौज अपेश येऊन पळून गेली.

## ३७. मोगलाची फौज विजापूरचे संनिध येऊन पोहचणें, सिवा याणी फौजेसुद्धां मोगलाचे मुलकांत येऊन दाखल होणें व सिवाजी याणी मोगलाचा मुलूक लुटणें प्रकर्ण :

तारिख १७ सत्रावी माहे साबान सन एक हजार नवद सोमवार (१५ सप्टेंबर १६७९) रोजीं दिलेरखान हा सय्यद मखदुम षर्जाखान याचे डेऱ्यास येऊन बहुत चित्तसमाधान करून अति मित्रता प्रसिद्ध करून कामाप्रकर्णी सल्ला विचारिलें. त्याच दिवशीं सायंकाळचे पुढें अलमगीर पादशाहाकडून रुस्तुमखानी किताबाचे, म्हणजे पदाआधिकाराचे, आज्ञापत्र व सनद व पोषाख व जडावदार तरवार षर्जाखानास द्यावयाकरितां आली. तें सर्व सामान व सनद षर्जाखानास द्यावयाकरितां दिलेरखान याजकडोन आसकरखान बक्षी बुखारी षर्जाखानाकडे गेला. तेव्हां सय्यद मखदुम हा सामोरा येऊन पादशाहाचे आज्ञापत्र वगैरे सामान जशा आदरानें व मर्यादेनें घ्यावें तशा मर्यादेनें

१९. शके १६०१ रामनवमीस (११ मार्च १६७९) आनंदराव याणी बाळापूर घेतलें. – जेधेश, पृ. २९–३०.

२०. शके १६०१ कार्तिक मासी (आक्टोबर-नवंबर १६७९) ...... सिदोजी निंबाळकर गोळी लागोन ठार जाले.– जेधेश, पृ. ३०.

षर्जाखान याणी घेतलें. दिलेरखान यांणी खजिना येऊन पोहचल्यानंतर खाणेपिण्याचा सामानसरंजाम येण्याचा मार्ग चालू ठेवण्याकरितां गढी बांधून धोलकीरी येथे ठाणें मजबूत बसऊन तारिख १९ एकोणिसावी माहे साबान (१७ सप्तेंबर १६७९) रोजी तेथून कूच करून हाल्संगीचे मुकामास आला. तारीख २२ बेविसावी (२० सप्टेंबर १६७९) रोजीं तेथेंच मुकाम करून तेथील गढ्याच्याहि इमारती दुरुस्त करून खाण्यापिण्याचा सामान सरंजाम येण्याजाण्याकरितां तेथें ठाणें बसऊन तारिख ११ अकरावी माहे रमजान ( आक्टोबर १६७९) रोजीं बहमनहळ्ळीस येऊन राहिला व तारिख १० दहावी माहे रमजान (६ आक्टोबर १६७९) रोजी सर्व फौजेसुद्धां घोड्यावर बसून बारटक्यापर्यंत तकवा केला. तेव्हां मसऊदखान याणी मेवामिठाई फळफळावळ वगैरे जिनसांची तबके भरून दिलेरखान याजकडे पाठविलीं. दिलेरखान तकवा करून पुन्हां मुकामास गेला. तेव्हां तेथें ठाणें बसविण्याकरितां मोठा कोट फार मजबूत बांधिला. त्या कोटाचें काम शेवटास लावण्याकरितां बहुत यत्न केला. तारीख १६ सोळावी रमजान (१२ आक्टोबर १६७९) रोजीं सय्यद आलम व यादगार आली हे उभयतां एखलासखानाचे मारफतीनें वकील होऊन दिलेरखानाकडे येऊन दिलेरखानासी बोलणें करून पुन्हां परत गेले. दिलेरखान याजसी करार केला कीं, मसऊदखान यासी सख्य करून देतो म्हणोन गेले. तारिख ५ माहे सवाल (२९ आक्टोबर १६७९) रोजीं सिवाजी दहा हजार स्वारांनिसीं येऊन परसलज्यावर उतरला. सिवाजीची फौज विजापुरीं होती ती ता. ६ साहावी (३० आक्टोबर १६७९) रोजीं सिवाजीस सामोरी गेली. सिवाजीनें मनांत आणिले कीं, पांच हजार स्वारांनिशीं विजापुरांत येऊन सुलतान शिकंदर पादशाहाची भेट घ्यावी. पांच हजार स्वारानिशीं पादशाहाचे भेटीस येण्याविशीं मसऊदखान यास परवानगी मागितली. तेव्हां मसऊदखान याणी पांचशे असामानिसीं यावें अशी परवानगी दिल्ही. मोरो पंडीत म्हणोन सिवाचा मुख्य कार-भारी होता. त्याणी या कामाविषयीं सिवास मनाई केली. आम्ही आदिलशाहाचा सर्व मुलूक घेतला आहे. जर करितां आपण किल्याचे आंत जाऊ तर न जाणो मसऊदखान या कपटानीं व अदावतीनें दिलेरखानासी सख्य करून आपल्यास दगा करील. विजापुरचे किल्यांत जाण्याविषयीं व पादशाहाची भेट घेण्याविषई आमची सला नाहीं. असें बोलला. सिवाजी याणी आपले मसलतगार कारभारी याचे सल्लेप्रमाणें वर्तणूक करून किल्याचे आंत जाण्याचा इरादा सोडिला. मसऊदखान याजकडून वकील आले होते त्या वकीलास बोलला कीं, पादशाहाची भेट घेणें तें मजला मनापासून संतोष आहे परंतु आम्ही मोगलासी लढाई करून रिकामा होईन व दिलेरखान हा बहुत अशा दांडगेपणानें पाय लांबून अमर्यादपणें चालून आला आहे त्याजला घालऊन देऊन त्याची बहुत फजिती व बदनामी करितो. येथपर्यंत दिलेरखानाची फजिती करितो कीं दिलेरखान याणी मुठींत जीव धरून, म्हणजे आपला प्राण वाचऊन त्याणी, पळून जावें.

दिलेरखान याणी दिल्लीपर्यंत मधें कोठें राहूं नये, पळून जावें, असें करितो म्हणोन बोलिला. त्यानंतर मी बहुत संतोषानें व खातरजमेनें पादशाहाचे सेवेंत हजर होईन आणि पादशाहाचे दर्शन घेईन. तोपर्यंत मसऊदखान याणी आपले जाग्यावर म्हणजे विजापूरचे किल्यांत बहुत मजबूत व हुशार राहून जसे कळेल तसा किल्याचा बंदोबस्त ठेवावा. मी हरएक प्रकारे मोगलाची फौज घालऊन देतो असें बोलून सिवाजी याणी तारिख १० माहे साबान (६ सप्टेंबर १६७९) रोजीं आपले फौजेचे दोन हिसे करून आपण आठ नऊ हजार स्वारानिशी मुसले व आलमेल्याचे वाटेनें व आनंदराव दहाहजार स्वारांनिशी मनिचे व सांगोल्याचे वाटेनें रवाना होऊन मोगलाचे मुलकांत जाऊन दाखल झाले.[२१] दिलेरखान याणी मनांत आणिलें कीं-सिवा हा प्रतिवर्षी मुलकाची खराबी करून ऐवज वसूल करितो, तसाच साल मजकुरींहि करील. या कारणानें काय होणार ? परंतु जर करितां आम्ही विजापूर घेऊं तर सर्व सफल होईल असें मनांत आणिलें. त्यासमई सिवास मुलकांतून बाहेर घालऊन देणेंचे काम सहज आहे असें जाणोन सिवा आपले मुलकांत चालून आला या गोष्टीची दिलेरखान याणी पर्वा न करतां विजापुरावरून उठला नाही. शाहाजादा हमेषा दिलेरखानची गिल्ला अल्मीर पादशाहाकडे हुजूर लिहीत होता. खानजहान बाहादुर कोकलताष व पादशाहा संनिध राहाणारे कित्येक कारभारीलोकहि दिलेरखानाचे आदावतीवर उठोन पादशाहाचे मनांत दिलेरखान याचे वाकडेपणाविषयीं मजकूर आणऊन देत होते. दिलेरखान हा मसऊदखानापासीं कांही एक सामान संरजाम नाहीं यामुळें विजापूर घेणें फार सुलभ समजत होता. मलीक बरखुरदार व हकीम षमसुद्दीन हे उभयतां दिलेरखान याजला भर देऊन येविषयींचें कारणभूत होत होते. हे उभयतां विजापूर घेणें फार सुलभ आहे म्हणोन दिलेरखान याजला सुचवित होते. दिलेरखान शाहाजादा खोटें लिहितो व कारभारीलोक माझा गिल्ला करितात असें व विजापूरचें कारखान्याची फार खराबी व मसऊदखान फार दुष्ट आहे असें तपसीलवार मजकूर लिहून या प्रकारची विनतीतपत्रें पादशाहास वरचेवर लिहीत होता. मलिक बरखुरदार व हकीम षमसुद्दीन हे उभयताहि दिलेरखानाप्रमाणेंच लिहित होते. थोडकेच दिवसांत विजापूर हस्तगत होऊन फत्ते होईल असा भाव सुचवित होते.

२१. शके १६०१ कार्तिक मासी (आक्टोबर-नवंबर १६७९) राजियानीं जाऊन जालनापूर लुटिलें. तेथें रणमस्तखानासी लढाई जाली. ...राजे फिरोन पट्ट्यावरून रायगडावर आले. – जेधेश, पृ. ३०.

## ४०. मोगलाकडील निसबतीचे लोकांनीं विजापूर घेण्याविषयीं विचार केला होता तो सर्व विचार निर्फळ होणें व व्यर्थ होणें व दिलेरखान हा पादशाहाचे बहुत इतराजींत येणें प्रकर्ण :

मसऊदखान याणी व्यंकटाद्रीस कैद केल्यानंतर दिलेरखान व मलिक बरखुरदार व हकीम षमसुद्दीनखान याणीं जीं जीं प्रकर्णें व जे जे विचार ठरविले होते ते सर्व व्यर्थ व निर्फळ जाहाले. मसऊदखान याणी सिवासी सख्य करून सिवाजीची फौज आपले कुमकेस व मदतीस आणविली. किल्ला लढाईकरितां कायम केला. सिवाजी खुद जातीनेंहि विजापूरचे आसपास येऊन पोहचला. तेव्हां शाहाजादा याणे ही संधी ओळखून पादशाहास विनंतीपत्र लिहिलें कीं, दिलेरखान याणी बहुत ऐवज खजिन्यापैकी खर्च केला आहे. दिलेरखान याणी अद्यापि कांहींएक काम केलें नाहीं. विजापूर घेण्याविषयीं दिलेरखान याणी भलताच यत्न केला आहे. विजापूर हस्तगत होणें फारच अवघड आहे. असें वाटतें कीं, मसऊदखान हा दिलेरखानाचे शत्रुत्वानीं बहुत त्रासून विजापूरचे राज्य सिवाचे हवालां करील. या दिवसांत मसऊदखान व सिवाजी या उभयतांचे अत्यंत सख्य आहे. अशींहि पत्रें शाहाजादा याजकडून हुजूर गेलीं होतीं. यामुळें दिलेरखान व मलिक बरखुरदार व हकीम षमसुद्दीन या तिघांची लिहिणीं पादशाहापासीं खोटीं जाहालीं. पादशाहाचे मनांत फारच वाकडेपणा येऊन पादशाहानीं फारच जरबेचे आज्ञापत्र दिलेरखान यास पाठविलें. मलिक बरखुरदार व हकीम षमसुद्दीन या उभयतांस अलमगीर पादशाहा याणीं हुजूर बोलाविलें.[२७] तेव्हां दिलेरखानास व या उभयतांत बहुत वाकडे आलें. दिलेरखान बोलत होता कीं, मलिक बरखुरदार याणी मजला फसऊन विजापूर घेण्याचें काम अवघड आहे असा भाव दाखऊन त्याणी मजला संकटात घातलें असें दिलेरखान बोलत होता. मलिक बरखुरदार हा बोलत होता कीं, मी हिकमतीचे डावानें मसऊदखान व व्यंकटाद्री या उभयतांस विजापूरचे सर्व कामदार लोकासहीत जमा करून दिलेरखानाकडे पाठविले आणि दिलेरखानास सूचना केली कीं, या सर्वांस कैद करून तेच वेळेस तुम्ही विजापुरावर दौड करून विजापूर घ्यावें. असें सुचविलें असतां दिलेरखान याणीं माझें बोलणें ऐकिलें नाहीं. हें काम सुस्तीवर टाकिलें आणि मूर्ख-पणानें पादशाही काम बिघडून खराब केलें. दिलेरखान माझें बोलणेंप्रमाणें करिता तर हें काम झालें नसतें कीं काय ? म्हणजे विजापूर हातीं आलें नसतें कीं काय ? हें न होतें तर दिलेरखानावरचा शब्द मजवर आला असता. दिलेरखान याणी हकीम षमसुद्दीन याजला पादशाहाचे आज्ञेप्रमाणें तारिख ११ माहे रमजान (७ आक्टोबर १६७९) रोजीं हुजूर रवाना केलें. तारिख १० दहावी माहे सवाल (५ नवंबर १६७९) रोजीं मलिक बरखुरदार याजलाहि पूर्ण वोढावोढी करून कित्येक मनुष्यास-मागमें पादशाहाकडे डाकेकरून रवाना केला. तारिख १८ अठरावी माहे सवाल (१३

नवंबर १६७९) रोजी खाज्या अब्दुल रिजाक (रझाक) व सैयद अलम हे उभयता मसऊदखान याजकडोन मजबूत सख्य करून आले. तेव्हां दिलेरखान बोलला कीं, मसऊदखान याणीं आपला पुत्र इकडील लष्करांत पाठवावा आणि आमचें कर्ज फेडून सिवाजीचो मित्रता सोडून देऊन सिवाजीची निखालस तर्फदारी करूं नये असें होईल तेव्हां तुमचे कामाविसीं मजला पादशाहापासीं बोलतां येईल असे दिलेरखान बोलला. तेव्हां अबदुल रिजाक याणी खुद जातीनें या मसलतीचा पत्कर घेऊन बहुत रदबदली करून दिलेरखानाचें अंतःकर्णातील संशय निवारण करून दिलेरखानाचे मनाची साफी करून, दिलरखान याजला राजी करून, सय्यद अलम याजला मसऊदखान याजकडे पाठविला. त्याजला ताकीद केली. पुत्र व लष्कर इकडे पाठविणेंविषयीं मसऊदखान याजला राजी करून करार ठरल्याप्रमाणें सिद्धीस नेऊन व आपसांतील हरएक वाईटपणा दूर करून रातोरात परत यावें असें सांगोन सय्यद अलम याजला मसऊदखानाडे पाठविला. त्यावरून सय्यद अलम याणी जाऊन मसऊखानाचे मनांत आणोन दिल्हे कीं, अबदुल रिजाक हा कामांत शिरोन दिलेरखानासी मिळाला आणि निखालस दिलेरखानाचा झाला आहे. तो, म्हणजे दिलेरखान, तर केवळ अनोळखी परकी मनुष्य आहे. भरंवसा ठेवण्याजोगा नाहीं. दिलेरखानाचा असा काय विश्वास आहे कीं, त्याजकडे सिकंदर दरवीष याजला पाठवावा. अशा प्रकारचा मजकूर दिरखानाचे अंतःकर्णात आणोन देऊन सय्यद अलम याचें या प्रकारचें भाषण ऐकून दिलेरखानासी साफी करण्यास चिंता पडली. सख्य करण्याविषयीं मसऊदखानानीं बहुत अनमान केला. मित्रता होण्याचें बोलणें पाटीवर टाकिलें. दिलेरखानाचे पत्राचा जाबहि लिहून दिल्हा नाहीं.

## ४१. मसऊदखान याजकडोन पत्राचे उतर आलें नाहीं या कारणास्तव याणीं आदिलशाहाचा मुलुक लुटण्यास निघणें प्रकर्ण :

दिलेरखान याणी मसऊदखान याजकडोन उत्तर येण्याची दोन दिवस वाट पाहून विजापूर येथील मनुष्यांची चाल व रीत पाहून निराश होऊन आदिलशाहाचा मुलूक लुटून फडशा करणेंचा इरादा करून लढाईचा सामान सरंजाम भारी कटा व तोफा फार मोटमोठ्या बहमनहाली येथें ठेऊन दिलेरखान याणी तारिख २० विसावी माहे सवाल (१५ नवंबर १६७९) रोजीं कूच करून मखनापुरास आला. तारिख २२ बेवीस माहे मजकूर (१७ नवंबर १६७९) रोजीं जालगिरी येथें येऊन पोहचला. दिलेरखान हा सिवाजीचे भयामुळें निर्भयपणें खातरजमेनें विजापुरावर हल्ला करूं सकत नव्हता. दिलेरखान याणी मनांत आणिलें कीं, संभाजी हा बहुत किल्ले व बाकीचे मुलुक हस्तगत

करून देतो अशा पूर्वी गपा छाटल्या होत्या त्या संभाजीचे मसलतीनें व मूर्तजाबाद, म्हणजे मिरज येथील नायक व लोक हे अबदुल फयाज याचे वसिल्यानें आतर्यामीं मित्रतेचा पाठ ठेवित होते. त्या लोकांचे विश्वासानें मिरज व पनाळ्याकडे जावें, म्हणजे हें वर्तमान सिवाजीस कळून सिवाजी पादशाहाचे मुलकांतून परतेल आणि इकडे येईल. याजकरितां तारिख २२ ब्रेविसावी माहे सवाल (१७ नवंबर १६७९) रोजीं दिलेरखान याणी जालगिरी येथून कूच करून तिकोट्यास गेला. तिकोटा हा गांव भरवस्तीचा होता. रयत लोक मामलदार म्हणजे द्रव्यवान लोक तर्फेतर्फेचे गावांतील हिंदु व मुसल्मान यापैकीं तिकोट्यास जमा झाले होते. दिलेरखान येईल असें त्यांजला माहित नव्हतें. एखलासखान हा, लढाईतील फौजेचे उभे राहाण्याचे भेदांचीं नांवें आहेत त्यापैकीं, हरावल म्हणोन नांव जाग्यावरील लष्करांतील नेमणुकीचा होता. तो एखलासखान तिकोट्यास येऊन पोहचला. तेव्हां त्याचे फौजेंतील लोकांनीं तो गांव लुटण्यास आरंभ केला. तेव्हां मुसलमानांच्या व हिंदु लोकांच्या बायकांनीं आपापलीं मुलें घेऊन ताने व जाणते मुलासुद्धां घराल्गत विहिरी होत्या त्या विहिरींत उड्या टाकून बुडाल्या. सरासरी तीन हजार मनुष्यें मुसल्मान हिंदुपैकी कैद जाहालीं. तो गाव असा लुटून फडशा केला कीं, त्या गांवात कांहींएक जिनस बाकी ठेविला नाहीं. त्या गांवांतील राहाणारावर मोटाच प्रळय होण्याचा समय प्राप्त जाहला. तेव्हां ख्वाज्या अबदुल रिजाक याजला हें वर्तमान कळलें. तेव्हा त्या खराब बनलेल मनुष्यांची दया येउन मसऊदखानाकडोन रदबदली करवून त्यापैकीं पाचसें मनुष्यें कैदेंतून मोकळीं करून अबदुल रिजाक याणी आपलेपासीं आणवून घेतलीं. त्या पाचसें मनुष्यांस अन्नवस्त्र देऊन आपलेपासीं ठेविलीं. तारिख २४ माह सवाल (१९ नवंबर १६७९) रोजीं तिकोट्याहून कूच करून होनवाडास व तेलंग या गांवचे वाटेनें लुटालुटी व खराबा करित करित व गावांगावचे लोक कैद करित करित अथणीस गेला. तारिख २७ (२२ नवंबर १६७९) रोजीं अथणीहून निघोन ऐनापुरावर जात होता. तेव्हां वाटेंतच वर्तमान ऐकिलें कीं, संभाजी आपले लष्करांतून पळोन जाऊन विजापुरास निघोन गेला.[२२] ज्या जागीं संभाजी निघोन गेला अशी बातमी ऐकली तेथूनच दिलेरखान माघारा फिरोन विजापुराकडे निघाला.

२२. शके १६०१ मार्गसीर्ष (नवंबर १६७९) संभाजी राजे मोगलाईतून पळोन पनाळियास आले. पोश वद्य ७ (१३ जानेवारी १६८०) भोमवारी राजांची व त्यांची भेटी जाली.– जेधेश, पृ. ३०.

## ४२. दिलेरखानाचे लष्करांतून संभाजी याणीं पळून जाणें प्रकर्ण :

तें कारण जाहले होतें कीं, या दिवसी अलमगीर पादशाहा याणी दिलेरखानास हुजूर बोलाविलें व दिलेरखान हा कित्येक संशयामुळें व कित्येक अंदेशाचे कारणास्तव पादशाहाकडे हुजूर जाण्यास राजी नव्हता. त्याच दिवसांत संभाजीचा बाप सिवाजी याणीं संभाजीस नानाप्रकारें दिलभरवंसा देऊन आपले कडील पूर्ण विश्वासू लोकास संभाजीकडे पाठविलें आणि संभाजीस हरएक प्रकारें समजूत करून चित्तसमाधान करून आपलेकडे आणविलें. उभयतां बापलेकांमधें वाकडेपणा आला होता यामुळें उभयतांचें सख्य होत नव्हते तो वाकडेपणा बापाचे कळवळ्यानें व मित्रतेनें दूर जाहला. सिवाजीनें आपलें पुत्राचें मन आपलेकडे मिळऊन घेतलें. तेव्हां संभाजीं याणी फुरसतीची वेळ पाहून आपले स्त्रीस पुरुषाचा पोषाख पांघरऊन शूराचा वेष देऊन पांच स्वारांनिसीं आपेल स्त्रीसुद्धां दिलेरखानाचे लष्करांतून पळाला. तारिख २८ आठाविसावी माहे सवाल (२३ नवंबर १६७९) रोजीं विजापुरास येऊन पोहचला. तेव्हां मसउदखान याणीं जरूरीचा सामान सरंजाम पोषाख व बिछाईत वगैरे संभाजीकरितां पाठविले आणि मसऊदखान याणी संभाजीचे बहुत चित्त समाधान केलें. दिलेरखानास हें वर्तमान कळलें तेव्हां दिलेरखान मसऊदखानावर अत्यंत क्रोधायमान जाहाला. अबदुल रिजाक याणी ही फुरसतीची संधी पाहून दिलेरखानाचे मनांत आणोन दिल्हें कीं, मजला आपण निरोप द्यावा म्हणजे मी मसऊदखानाकडे जाऊन संभाजीचा इलाज करितो असें बोलून निरोप घेऊन तारीख ५ माहे जिलकाद (२९ नवंबर) रोजीं विजापुरास आला. अबदुल रिजाक यांचे हें कारण संभाजीनें जाणोन याच कित्येक दिवसांत दिलेरखानाचे फौजेंतून संभाजी पळून मसऊदखानापासी येऊन पोहचला होता. तेथूनहि तारिख ७ माहे जिलकाद (१ दिसेंबर १६७९) रोजीं रात्री घोड्यावर बसून संभाजी पनाळ्यास निघोन गेला. [२२]

## ४३. दिलेरखान याणीं विजापूरचे शहराभोंवतें येऊन लढाई करणें व दक्षणी लोकांनीं त्यांचे निवारण करणें प्रकर्ण :

दिलेरखान हा जेव्हां ऐनापूरचे वाटेनें माघारा परतला आणि व सालोटकी व काखंडकी व उखली व मंगळूरचे वाटेनें जिराईत व बागाईत, म्हणजे सेते व बागा, व हरएक गांव लुटित लुटित व खराब करित करित व जे बायका पुरुष हातीं लागत होते त्याजला कैद करित करित तारिख ११ माहे जिलकाद (५ दिसेंबर १६७९) रोजीं इलियाबाद येथे लष्कर उतरावयास जागा करून दिलेरखान खुद जातीनें व

फौज व तोफखान्यासुद्धां रसूलपूर व मुरारबागेकडे चालून येऊन त्या बाजूंनीं तोफेची सरबत्ती करणेंस व लढाई करणेंस प्रारंभ केला. किल्यावरूनहि तोफा व बंदुकीची सरबत्ती सुरू जाहाली. अकरा बारा तासपर्यंत सारिखी लढाई व तोफा वगैरेंची सरबत्ती चालली होती. किल्यावरील तोफेंचे गोळ्यांनीं मोगलाकडील लष्करांतील बहुत मनुष्यें व माणिकजी मांढरे याचा एक हत्ती याप्रमाणें ठार जाहाले. दुसरे दिवशींहि याचप्रमाणें लढाई सुरू जाहाली होती. लतीफशाहाचा बंधू व बहुत मनुष्यें ठार व जखमी जाहालीं. दक्षणी लोक बहूत शूरत्वानें हल्ला करित होते. दक्षणी लोकांकडील बहुत मनुष्यें ठार जाहालीं. नित्य या प्रमाणेंच लढाई होत होती. तोफेचे गोळे शहरांत येऊन पडत होते. तारिख १७ सतरावी माहे जिलकाद (११ दिसेंबर १६७९) रोजीं दिलेरखान याणी बेगम हाऊदाकडे येऊन डेरे टाकले. त्याप्रमाणेंच उभयतांकडून तोफेची सरबती होत होती. तारिख २४ चोविसावी रोज गुरुवार (१८ दिसेंबर १६७९) दिलेरखान याणी तेथून निघोन खन्याचे बागेत आफजलखानाचे महालानजिक डेरे ठोकले. अफजलपूर व शाहापूर वगैरे येथील घरें व बागा जाळण्याविषयीं व खराब करणेंविषयी दिलेरखान याणी हुकूम दिल्हा. तारीख २९ एकुणतीस (२३ दिसेंबर १६७९) रोजीं इलापूरचे दरवाज्यापुढें मोगलाचे फौजेंतील एखलासखान व अबदुल फयाज व विजापूरचे लोकांकडील मालोजी घोरपडे व याकूतखान खैरतखानी व हसनखान रोहिला या उभयतांत म्हणजे मोंगलांत व विजापुरी लोकांत फार मोठी लढाई जाहाली. दोहिकडीलहि बहुत मनुष्यें ठार जाहालीं व जखमी जाहलीं. दक्षणी लोक यांची फते होतीं. तारिख ९ नववी माहे जिल्हेज (२ जानेवारी १६८०) रोजीं दिलेरखान सदरहू बागेंतून निघोन बेगम हौदाकडे येऊन तेथें उतरून नित्य किल्यासी लढाई करित होता व किल्यांतील लोकहि त्याप्रमाणेंच त्यासी युद्ध करित होते.

## ४४. दिलेरखानाचे लढाईचे धांदलीचे समंई विजापुरांत थोडी जमात होती या प्रकर्णी वर्णन :

त्यासमंई विजापूर येथें पुरातन शिपायांपैकीं मालोजी घोरपडे व त्यांचे मावशीचा नवरा माणिकजी खराडे व सईदखान तरीन व मियाखान तरीन याशिवाय कोणी नव्हतें. मसऊदखानाचे अमलांत सरदार मंडळीपैकीं अमीरीचे वगैरे थोर थोर कामावर होते व कामाचा बंदोबस्त या लोकांचे हातीं होता. ते याकुतखान खैरतखानी, सिद्दी जव्हार, काजी सईद, सिद्दी याकूत, मलिकमख्यान मरम्यान, हसनखान रोहिला, अबदुल करीम दाऊदजी, संभाजी घाटगे, सिद्दी हैदर, खाज्या हैदर लारी,

अबदुल रिजाक लारी, बरीदखान कापरगावी, शेख अबदुल्ला जुनेदी, हैदर आका, हाबीशाहा व गंजुशाहा याप्रमाणें आहेत. मसऊदखानाचेच केवळ लष्कर मिळोन पांच सहा हजारावर अधिक नव्हतें. हेहि पांच हजार लोक उपासी व फाके घालवित बहुत संकटानें दिवस घालवित होते. मसऊदखान, सिद्दी हैदर, अबदुल रिजाक, बरीदखान कापरगावी व जमादार लोक आपलेकडील खासगीचे होते ते एकंदर मिळोन हजारास कांहीं कमी होते. त्यासुद्धां किल्यांत राहून किल्याचे बुरुज हरएकाकडे हवालीं केले. उदोनीकडील दोन हजार सिबंदी लोकांस किल्यावर जागोजाग नेमिले. तोरगलचे बाकीचें लष्कर व सिबंदी लोकांस व पाम नाईक याजकडील एक हजार सिबंदी लोक मदतीकरितां येऊन पोहचले होते. त्या लोकांस किल्याचे बाहेर महा दरवाज्याकडे व शाहापूर दरवाज्याकडे व इब्राहीमपूर दरवाज्याकडे व इब्राहीम आदिलशाहाचे दरवाज्यांत व किल्याचे खंदकांत व जरूरीचे जागजाग्यास ठेविले होते. बाहेरचे लष्कराचा केव्हां केव्हां बाहेर येऊन समाचार घेऊन त्यांजला हिंमत देत होता. सिवाचे मुल्कांतून व चहूंकडून नित्य बहुत गल्ला म्हणजे कैली जिंनस व सर्व किरकोळ जिंनस किल्यांत येऊन पोहचत होते. बहुत किफायत होत होती. हरएक जिंनस बहुत स्वस्त मिळत होते. मोगलाचे लष्करांत कांहींएक जिंनस कोणीकडूनच येत नव्हता व कैली वगैरे हरएक जिनसांची फारच महागाई झाली होती.

## ४५. दिलेरखान याचे हातून कांहींएक काम न होऊन व दिलेरखानाचे कांहींच मनोरथ पूर्ण न होतां दिलेरखान अति चिंताग्रस्त होणें आणि मसऊदखानासी सख्य करणें व मसऊदखान याणीं त्याचें सख्य न करण्याविषयीं हाट करणें प्रकर्ण :

आणखी एक लढाई जाहाली असती तर मोगलांचे फौजेचे फारच खराबीचें कारण जाहाले असतें. परंतु लढाई जाहाली नाहीं. याजमुळें मोगलास बहुत फुरसत सापडोन दिलेरखान इच्छित होता कीं, कांहीं पराक्रम करावा. परंतु तूर्त विजापूर मोगलाचें हातीं जावें असें ईश्वराचें मनोगत नव्हतें. यामुळें ही गोष्ट तूर्त राहिली, म्हणजे शाहाजादा व दिलेरखान या उभयतांत दिवसेंदिवस अधिकच वाकडेपणा येत होता. यास्तव शाहाजादा दिलेरखान यास खजिन्याची मदत करित नव्हता. मुल्क फार लुटला गेला[२] व लष्करची फारच पायमाली जाहाली यामुळें जहागीरीकडीलहि दिलेरखानास कांहींएक पोहचत नव्हतें. याजकरिता दिलेरखानाची फौज उपोषणानें प्राण देण्यापर्यंत त्रासून फारच खराब होत होती. मुल्काची फारच खराबी जाहाली. या कारणास्तव शाहाजादा दिलेरखानास ताकिदीवर ताकिदी लिहून पाठवित होता कीं,

विजापुरांतून तुम्हीं निघोन आपले मुलकाचे संरक्षणाविषयीं यत्न करावा. शत्रु, म्हणजे सिवा, आपले मुल्कांत, म्हणजे मोगलाई सरहदींत, आला आहे. त्याजला बाहेर घालऊन दे. अशा ताकिदी पाठवित होता. यामुळें दिलेरखान क्रोधायमान होऊन लबाडीनें हिले व बाहाने करून येविषयीं अनमान करित होता. शाहाजादा याचे आज्ञेप्रमाणें विजापूर येथून निघोन जाण्यास ढिलाई करित होता. त्या यत्नांत होता कीं, हरएक प्रकारें आपल्या कडोन मसऊखानासी सख्य करून परत जावें. असें मनांत आणोन सय्यद मखदुम षर्जाखान याचे वसिल्यानें सख्य करण्याविषयीं यत्न करित होता. या प्रकर्णी बहुतच उद्योग केला. परंतु मसऊदखान हा शाहाजाद्याचे व दिलेरखानाचे वाकडेपणाचे वर्तमान समजला होता. सिवाजी मसऊदखानास बहुत बळ देऊन लिहित होता. शाहाजादाहि अंतर्यामेंकरून मसऊदखानाचें संरक्षण व मदत करित होता. गुमपणें कोणास न समजूं देतां मसऊदखानासी शाहाजादा यार्णी बोलणें ठरविलें होतें कीं, पंचविस हजार होन मजला द्यावेत म्हणजे मी सख्य होण्याचे कराराचे कबुलायती शिवाय दिलेरखानास तुमचे मुलखांतून बाहेर घालऊन देतो. असें बोलणें ठरविलें होतें. तेव्हां मसऊदखान शाहाजाद्याचे उमेदीवर व सिवाजीचे बळावर लबाडीचे बाहाने दिलेरखानासी करून सख्य होण्याचें कामांत फारच ढिलाई करून दिलेरखानाचे बोलण्याकडे कान देत नव्हता. सख्य करण्याविषयीं कदापि राजी होत नव्हता.

## ४६. सिवाजी यार्णी मोगलाचे मुलखांत खराबी करणें, भिवरा नदीपासून नर्मदेपर्यंत लुटून फडशा करणें व येविषयींचा बोभाटा व फिर्याद अलमगीर पादशाहाकडे हुजूर जाऊन पोहचणें प्रकर्ण :

सिवाजी मोंगलाचे मुलखांत येऊन दाखल जाहाला. तेव्हां सिवाजी समागमें तीस हजार स्वार होते. सिवाजी यार्णी आपली एकंदर फौज फोडून निरनिराळ्या टोळ्या करून ती फौज चहूंकडे सोडून तोडातोडी करणें, ठार जीवें मारणें, लुटालूट करणें, घरें जाळणें व सर्व मुळखांतील बागा व सेतें मोडून खराब करणें विषयीं सिवाजी यार्णी आपलेकडील फौजेस हुकूम दिल्हा. भिवरा नदीचे सरहद्दीपासोन दौलताबादेपर्यंत एकंदर शाहेरें व कसबे व मोठमोठे गांव व लहान लहान खेडीं लुटून फडशा केलीं. फारच मालमता सिवाच्या हातीं लागली. जेव्हां चहूंकडील मुलूखाकडील भाग लुटून फडशा करण्याचें व मुलखाची पायमाली व खराबी करण्याचें कामापासूत मोकळीक जाहाली, तेव्हां वराड, खानदेश, माहूर व बागलाण वगैरेकडे सिवाजी यार्णी फौज घेऊन चालून जाऊन तिकडील मुलखांत दंगा करून तो सर्व मुलूख धूळदेशास मिळविला. बोलण्यात असें आहे कीं, या लुटींत बारा हजार घोडे व द्रव्य

कोट्यावधी रुपयाचे सिवाचे हातीं लागले. मुलखाची फार खराबी जाहाली. यामुळें व सिवाचे फौजेचे गर्दीचे उपद्रवानें दक्षणचे सुभ्यांतील मुलखांत ज्या ज्या लोकांस ज्यागिरी होत्या ते सर्व लोक फारच खराब जाहाले. सिवानीं फारच गर्दी करून जुलूम व बेदादी चालविली आहे अशा चहूंकडोन गावोंगावच्या फिर्यादी अलमगीर पादशाहाकडे येऊं लागल्या. शाहाजाद्याचे विनंतीपत्रांत दिलेरखान याचे मुर्खपणाचा मजकूर वारंवार लिहून येत होता. खानज्याहान बाहादूर व पादशाहाचे दरबारांतील थोर थोर कारभारी मंडळ यांणीं ही संधी पाहून दिलेरखानावर नानाप्रकारचीं संकटें उभीं केलीं. दिलेरखानाचे नानाप्रकारचे अपराध पादशाहाचे मनांत आणोन दिल्हे, कीं या मूर्ख पठाणानें म्हणजे दिलेरखानाचे विजापूर घेण्याची आशा धरून पादशाहाचे संपूर्ण मुलखाची खराबी केली. सरकारी खजिन्यांतील ऐवजहि विनाकारणी खर्च केला.

## ४७. दिलेरखान पादशाहाचे इतराजींत येणें प्रकर्ण :

पादशाहा याणी बहुत शिक्षापूर्वक, म्हणजे या वागणुकीनें तुझें फार फार पारपत्य केलें जाईल अशा मजकुराचे, फारच जरबदार व अत्यंत वाईटपणानें दिलेरखानास आज्ञापत्र लिहिलें कीं, तुम्हीं आपले मुलखाचा बंदोबस्त करून नंतर विजापूर घेण्याचे कामावर गेला असतां तर तुजला योग्य होतें. हा काय मुर्खपणा केलास कीं, आपले मुलखाचेहि संरक्षण केलें नाहींस व विजापूरहि घेतलें नाहींस. असो. काय चिंता आहे ? आरबी वाक्याचा अर्थ : “ नुकसान होण्याची चिंता मरणाचे चिंतेहून अधिक आहे. ” हें वाक्य मनांत आणोन मुलखाचे संरक्षणाविषयीं विजापूरचे लढाईचे कामावरून जलद निघोन मुलखाचे संरक्षणाचा बंदोबस्त कर. कारण की, मुलखाची खराबी जाहाली ये विषयींचे व सरकारचे खजिन्यांतील ऐवज विनाकारणी तूं बहुत खर्च केलास या गोष्टीचा जाब देणें तुजला प्राप्त आहे. शाहाजादा महंमद अजम याणी सुभ्यांतील दिवाणांस व खजिन्याकडील दरोग्यास म्हणजे मुख्य कामदारास, हुकूम सांगोन पाठविला कीं, दिलेरखानाचे सांगण्यावर तुम्ही कदापि वर्तणूक करूं नये. त्याचें सांगणें मानूं नये. खजिन्यांतील ऐवज त्याजला देऊं नये. त्याजला ऐवज दिल्हास मजुरा पडणार नाही. तुम्हांपासून भरून घेतला जाईल. असा हुकूम सांगोन पाठविला आणि महमद मजीफ याजला पाठवून दिलरखान याजला हुकुम सांगोन पाठविला कीं, मसऊदखानाचें सख्य इकडील मारफतीनें होईल. तुजला विजापूरचे कामासी व मसऊदखानासी सख्य करण्यास कारण नाहीं. असा हुकूम सांगोन पाठविला आणि दिलेरखानाचें एकंदर अमीर लोकांस साफ ताकीद केली कीं, दिलेरखानाचे सांगणें तुम्ही ऐकून विजापूरावर लढाई करूं नये.

## ४८. दिलेरखानानें विजापूरची लढाई करून मनोरथ पूर्ण न होतां व कांहीं-एक काम न करितां निघोन जाणें व तर्फेतर्फेतील मुलखांत खराबी व पायमाली करण्याचा यत्न करणें प्रकर्ण :

दिलेरखान याणी पाहिलें कीं, आपल्यावर मोटा प्रसंग प्राप्त जाहाला. चहूंकडोन संकटें उभीं राहिलीं. सर्वांनीं आपणांस दूषण ठेवणें व तोंडावर थुकणें ही दशा प्राप्त जाहाली. असें जाणिलें तेव्हां अत्यंत खिन्नतेनें व लज्जेनें बहुत प्रकारें मनांत आणिलें कीं, हरएक प्रकारें हरएक हिकमतीनें व हरएक हिल्यानें मसऊदखानासी सख्य करून परत जावें. असें इच्छीलें. परंतु मसऊदखान ही गोष्टच कबूल करित नव्हता. दिलेरखान याचे सेवकपणांत येत नव्हता. सख्य करण्याविषयीं राजी होत नव्हता. तेव्हां या भयास्तव दिलेरखान याणीं तारिख पहिली माहे मोहरम सन १०९१ एक हजार एकेआण्णव ( २३ जानेवारी १६८० ) रोजीं सय्यद मखदुम पर्जाखान व नंतर हुसेनखान याजला तोफखाना व लढाऊ बहुत सामान सरंजामसुद्धां उत्तरे-कडील मुलकाची खराबी करण्यांकरितां रवाना केलें. मसऊदखानाचे वकिलास बहुत सख्यता करून, येथपर्यंत कीं दिलेरखानाला जितकें सामर्थ्य होतें तितकी सख्यता करून, मसऊदखानाचे सख्य करण्याकरितां यत्न केला. शेवटीं पाहिलें कीं, मसऊद-खान बोलणेंच ऐकून घेत नाहीं व पादशाहाकडील लोक येऊन वारंवार जरब देत होते त्यास गणीतच नाहीं, पादशाही कारखान्याचीं कामें आपल्या हुकुमांतून गेलीं असें जाणोन निरूपाय होऊत बहुत रदबदली करून महंमद मजीफ याजला मसऊद-खानाचे समागमें तारिख ६ माहे मोहरम ( २८ जानेवारी १६८० ) रोजीं विजापुरास रवाना करऊन तारिख ७ सातवी मोहरम ( २९ जानेवारी १६८० ) रोजीं दिलेरखान हजारों खिन्नतेन व नाउमेदपणानें, म्हणजे निराशेनें व अत्यंत वाईटपणानें व अपूर्ण मनोरथानें, पश्चाताप पाऊन बेगम हौदावर मुकाम केला होता तेथून निघोन काम-खंडकीस निघोन गेला.[२३] पाच महिने सहा दिवस कामखंडकीस बहुत चिंतेत व घाबरेपणांत राहून जैनापुरास निघोन गेला. तेव्हां जैनापूर ( जालना ) येथील देसाई याणीं आपले जाग्याची मजबुती करून लढाईस उभा राहिला. ते दिवशीं दिलेर-खानाचा हत्ती व साठसत्तर मनुष्यें जखमी जाहालीं. त्या दिवशीं सायंकाळी दिलेरखान याणी बहुतच झटून हल्ला केला. तेव्हां देसाई मजकूर चाळीसपन्नास सिपायांसुद्धां ठार जाहाला. तो गांव लुटला गेला. दुसरे दिवशीं मोहरमची १० दहावी ( १ फेब्रुवारी १६८० ) तारिख होती. सबब त्याच गांवीं मुकाम केला. तारीख ११ ( २ फेब्रुवारी १६८० ) रोजीं कौलादीस निघोन गेला. मोठे प्रातःकाळींच तेथून निघोन ताजकिरी-

२३. शके १६०१ माघ मासी ( जानेवारी-फेब्रुवारी १६८० ) इदिलशाहाचा व मोगलाचा सला जाला. विजापूरचा वेढा उटला.– जेधेश, पृ. ३०.

कडे चालता जाहाला. तेव्हां वाटेमध्यें जासूद लोकांनीं दिलेरखानास बातमी कळविली कीं, मौजे मसूती येथे गावोंगावचीं चहूंकडचीं मनुष्यें जमा जहालीं आहेत. अशी बातमी समजली तेंव्हां दिलेरखान याणी आपले लष्करचे बाजारबुनगे वगैरे किरकोळ सामान ताजकीरी रवाना केले आणि दिलेरखान खुद जातीनें मौजे मसूती येथें आला. तेंव्हां मसूती येथील मोकदम याणी आपले बचावास्तव दोन हजार होन आमचा गांव लुटूं नये अशी कबुलायत करून दिलेरखानास देऊं लागले. परंतु दिलेरखान याणी तें ऐकिलें नाहीं. तो गांव लुटला. तेथील मोकदम दहावीस प्यादयानिसीं हावद्यांत होते. त्या मोकदम मंडळीनीं बंदुकीची सरबती केली. तेव्हां लष्करवाले हावद्यावर धाऊन जाऊन मोकदम मंडळी प्यादासुद्धां ठार मारून सरासरी बायका व पुरुष मिळून दोन हजार मनुष्यें कैद करून व दोन तीन हजार ग्रामवासी लुटून कैद करून ताजकिरीस निघोन गेला. एखलासखान हा फौजेचे बंदोबस्तावरील कामगार होता. तो एखलासखान रसद लुटून आणण्याकरितां कृष्णा नदीकडील गावोंगावचे मुग्दलचे मामल्यांत आला होता. तेथून एखलासखान याणी दिलेरखानास वर्तमान सांगोन पाठविलें कीं, इकडे आसपास जागा बहुत जमावाची गढी आहे. हे व रयत लोक वगैरे मनुष्यें जमा होऊन लढाईस तयार जाहाले आहेत. असें वर्तमान ऐकून दिलेरखान याणी एखलासखानास हुकूम सांगोन पाठविला कीं, तुम्ही त्या लोकांवर पुढें चाल करून ते लोक सांभाळून ठेवावे. तों इतक्यांत मी येऊन पोहचतो. असा हुकूम सांगोन पाठऊन मोठे प्रात:काळींच ताजकीर येथून निघोन राकसीस येऊन पोहचला. बाजारबुणगे वगैरे किरकोळ जिनस व सामान राकसी येथें ठेऊन दिलेरखान खुद जातीनें फौजेसुद्धां त्या गढींत जाऊन पोहचला. त्या गढींतील मोकदम लोक व एकंदर रयत लोक याणी वचन घेऊन नऊ हजार ९००० होन देतो म्हणोन कबूल केलें. त्यापैकीं ४००० चार हजार होन रोख देऊन बाकीचे होन देण्यास वायदा केला. तेव्हां दिलेरखान याणीं तो बाकीचा ऐवज वसूल करण्याकरितां एखलासखानास तेथें ठेऊन दिलेरखान खुद जातीनें तेथून निघोन परत राकसीस आला. परपा देसाई नालतवाडकर याणी आधीं सय्यद मखदुम याचे वचन घेऊन सय्यद मखदुम याजकडील मनुष्यांस गावास आणोन बहुत ऐवज दिल्हा होता. तो परपा देसाई येऊन राकसीचे मुकामीं दिलेरखानास भेटला. तेव्हां दिलेरखान मोठे प्रात:काळींच राकसीहून उठोन कूच करून नालतवाड येथें आला. तेथें एखलासखानाची मार्गप्रतीक्षा करित एक दिवस मुकाम केला. एखलासखान याणी सोनें व रुपें व तांब्याची भांडी व कैळी जिनस वगैरे त्या गढींतील मोकदम याणीं दिल्हे ते घेऊन बाकी वसूल येणें राहिला त्याची कबुलायत घेऊन नालतवाडास येऊन दिलेरखानापासीं मिळाला.

### ४९. दिलेरखान याणी बेदरचे मुलुखांत येऊन दाखल होणें, दिलेरखान याणी बेदरचा मुलूख लुटणें व बेदरचे लोकांनीं दिलेरखानाचे फौजेवर जबरदस्ती करणें प्रकर्ण :

दिलेरखान नालतवाड येथून निघोन कोरेंगळास गेला. देसाई मजकूर याजला दिलेरखान याणी नुसरताबाद येथील देसाईपणा व देशमुखी देणेंचा वायदा केला होता. या कारणाबदल सदरहू देसाई अद्यापि दिलेरखानाचे समागमेंच होता. त्याचे सांगण्यावरून पाल्याचा म्हणोन डोंगर लष्करापासून एक कोशाचे अंतरावर होता तेथें जाऊन पाल्याचे पर्वतावर हल्ला करून तो डोंगर घेतला. पाल्याचे पर्वतावर पेठ जाहीर आहे तेथें जाऊन तेच वेळेस हरएक बाजूनें स्वार होऊन चाळीस पन्नास प्यादे त्या पर्वतावर होते त्यांसी कांहीं एक युद्ध न करितां त्याजला ठार मारून पाल्याचा डोंगर हस्तगत करून तेथील सरासरी दोन हजार मनुष्यें कैद केलीं. बहुत मालमत्ता व कैली जिन्नस वगैरे फारच लुटून नेले. दुसऱ्या दिवशीं तेथेंच मुकाम करून पाल्याचा किल्ला पाडून आग लाऊन सर्व जाळून तालिकोटास निघाला. आधीं देसाई मजकूर याचे मारफतीनें तेथील मनुष्यांस बळ व दिलभरंवसा दिल्हा होता. अबदुल करीमखान दाऊदजी याचा पुत्र निजामखान हा तर ऐसी हजार स्वारांनिसीं तेथें होता. तो दहा स्वारांनिसी शिकारीचें निमित्त करून बाहेर गेला. दिलेरखान जेव्हां तेथें जाऊन पोहचला तेव्हां त्या गावची मोकदम मंडळीं पुढें येऊन दिलेरखानास रुजु जाहाले. पठाण लोक लढाईचे इराद्यानें गढींत राहिले होते. लष्करांतून त्या गढीवर तोफ सुरूं जाहाली तेव्हां त्या पठाण लोकापैकीं तीन स्वार वचन घेण्याकरितां दिलेरखानाकडे आले. त्यांची घोडी दिलेरखान याणीं हिराऊन घेऊन त्याजला आपल्यासी ठेऊन घेतलें. दिलेरखान याणी आपले फौजेस आज्ञा केली तेव्हां त्या फौजेनीं त्या कोटाचे चहूकडून हल्ला केला. तेव्हां अबदुल करीमखान दाऊदजीचे पुतण्यास ठार मारून एकंदर घोडे हिराऊन घेऊन तो सर्व गांव लुटून निखालस फडशा केला. सरासरी एक हजार मनुष्यें कैद केलीं. तेथील मोकदम याणी दीड हजार होन देऊन कित्येक मनुष्यांस कैदेंतून सोडविलें. बहुत लोक कैदेंत पडले. दिलेरखान याणी तेथें एक दिवस मुकाम करून दुसरे दिवशीं किंबाय म्हणोन गांव आहे या किंबायास गेला. त्या गावांतील मनुष्यें पाम नाईक याचे पाल्याचे पर्वताकडे निघोन गेलीं होतीं. त्यापैकीं कित्येक मनुष्यें वाटेंतच लुटलीं व दिलेरखान याणी तेथें मुकाम करून कोणे एका मनुष्यास पाम नाईक याजकडे पाठविला आणि निरोप सांगोन पाठविला कीं, तूं जलद इकडे येऊन हजर होऊन भेट घे त्यावरून पाम नाईक याणी आपला वकील व पुत्र या उभयतांस दिलेरखानाकडे

पाठऊन उत्तर सांगोन पाठविलें कीं, तूर्त मजला येतां येत नाहीं. विजापूर घेतल्यानंतर येऊन हजर होईन. दहा हजार होन तुम्हांस नजर देतो ते घेऊन तुम्ही येथून जलद निघोन जावें, म्हणजे माझे इलाक्यांतील मुलूख खराब होणार नाहीं. असें उत्तर सांगोन पाठविलें तेव्हां दिलेरखान याणी पाम नाईक याचे पुत्रास व वकीलास आपलेपासीं ठेऊन घेऊन कलबुर्गी येथील दिवाण महंमद आफजल याचे मारफतीनें पाम नाईक याजला जरबदार निरोप सांगोन पाठविला कीं, जमेदार लोकांचे चालीनें नांगर व कुराड गळ्यांत बांधोन इकडे येऊन चाकरी कर किंवा तीन लक्ष होन आणोन हजर कर. मी विजापुरास जातो. बहुत फौज व सिबंदी फारच जलद पाठऊन दे. मी सांगितले आहे या प्रमाणें करण्यास जर करितां ढिलाई व सुस्ती करिशील तर खबरदार. मी आतांच येऊन पोहचलो असें समज. असें सांगोन पाठविलें आणि निरोपाचे लागोपाठच तेच दिवशीं किंबाय येथून निघोन दिलेरखान मडकीस गेला. तेथील सर्व मनुष्यें पळून गेलीं होतीं. दिलेरखान याणी तो गांव लुटून त्या गांवांतील घरास आग लाऊन तो गांव स्वच्छ केला. तेव्हां पाम नाईक याणी लष्कर व सिबंदी व तीस हजार ३०,००० होन द्यावयाचे कबूल केलें. दिलेरखान इतक्यावर राजी जाहाला नाहीं आणि बोलला कीं, तीन लक्ष होन रोख दे किंवा नांगर गळ्यात बांधून इकडे हुजूर येऊन दाखल हो. या दोन कामांपैकीं कोणतें तरी एक काम केल्याशिवाय कदापि सुटका व्हावयाची नाहीं. असे बोलोन मध्यें मुकाम न करितां मडकीहून दरसनापुरास निघाला. पाम नाईक याचा पुत्र दोन तीनसें स्वार व पाच सहासें शिबंदीनिसीं तेथें होता. ते सर्व रात्री तेथून पळून गेले. दिलेरखान तेथूनहि मध्यें मुकाम न करिता गोगीस निघोन गेला. तेथील सर्व मनुष्यें पळून जाऊन गोगी ओसाड पडली होती. परंतु पीरजादे कित्येक मनुष्यांसुद्धां गोगी येथील खन्यांत व कसब्यांत राहिले होते. दिलेरखान याणी आपलेकडील लोक त्या पीरजाद्याचे संरक्षणार्थ ठेऊन येथें डेरे ठोकिले. तारिख २९ एकुणतीस माहे मोहरम ( २० फेब्रुवारी १६८० ) रोजीं दिलेरखान सागर येथें आला. वकुंड चौकीचे किल्यावर मोर्चे तजविजीकरिता शाहापुरास येऊन पोहचला आणि काहीं फौज अबदुल गफूर या समागमें सय्यद महंमद याचे बागेनजिक आणि काहीं फौज एखलासखानाचे समागमें मेलगिरीचे बागेनजिक उभी करून आपण खुद जातीनें शाहापूरचे पाटवणानजिक उभा राहून दोहीकडून उंटावरील गरनाळी व बंदुका फार कहरीची दोन प्रहरपासून सायंकाळपर्यंत सरबत्ती करित होता. सायंकाळ गुजरून गेल्यानंतर पाम नाईक याजकडील सिपाई लोकांनीं अबदुल गफूर याजवर दांडगाई करून एकंदर चालून येऊन गर्दी केली. अशी गर्दी केली कीं, पिरजाद्याचे संरक्षणाकरिता बंदुक बारदार ठेविले होते त्याजला देखिल पळविलें. अबदुल गफूर तेथून

निघोन हावदानजिक येऊन पोहचून तेथें आश्रय धरून राहिला. अबदुल गफूर याची कित्येक मनुष्यें व जनावरें जखमी जाहालीं. दिलेरखान सायंकाळचे वेळेस तेथून निघोन परत गोगीस आला. पाम नाईकाचे वकीलास बहुत जरब देऊन व भय घालून परत जाणेंविसी निरोप दिल्हा. आणि त्या दिवशीं मोहरम महिन्याची ३० तिसावी ( २१ फेब्रुवारी १६८० ) तारिख होती. त्या रोजीं प्रातःकाळीं एकंदर फौज व तोफखान्यासुद्धां तयार होऊन शाहापुरास येऊन पोहोंचला. तेव्हां शाहापूर दरवाजा तोफेच्या गोळ्यानें उठवून शाहापुरी येऊन दाखल जाहाला. हतीवर बसून दरवाज्यांत उभा राहिला. दिलेरखानाकडील हरएक लष्करी लोक हरएक बाजूंनीं शाहापुरांत व शाहापुरचे पेठेंत चालून आले. लुटालुट करूं लागले. तेव्हां दिलेरखानचा पुत्र फते मामूर हा शाहापूरचे शहरापासी उभा राहिला होत आणि एखलासखान पेठेत येऊन उभा राहिला. तेव्हां लुटणारे मनुष्याचे समुदायांनीं अशी लूट केली कीं, नेत्रास पात लागे न लागे तों एक पलखांत शाहापूर लुटून साफसफाक केलें. मोठा प्रळय उभा केला. तेव्हां पामनाईक याजकडील सिपाई लोक याणी किल्यावरून व पर्वताचे टेकडीचे आडून व गढीचे जाग्यावरून तोफा व बंदुकी व दुसरे कित्येक हत्यारें आतषबाजीचीं, म्हणजे पिस्तुलें व गर्नाली वगैरे, होतीं त्या एकंदर हत्यारांची सरबत्ती करित होते. लष्करांतील बहुत मनुष्यें ठार व जखमी झालीं व पाम नाईक हा खुद जातीनें नुसरताबादेचे किल्यावर होता. त्याणीं दिलेरखानाकडून अकरा असामी वकील लोक रदबदली करिता आले होते त्या अकरा असामीपैकीं दोन असामी कैदेंत ठेऊन बाकीचे नऊ असामीस शूलावर देऊन पाम नाईक याणी मनांत आणिलें कीं, नुसरताबादचा किल्ला किल्लेदाराचे हवालीं करून आपण खुद जातीनें किल्याचे बाहेर यावें. असें इछिलें तेव्हां पाम नाईक याजकडील दौलतीचें कल्याण इछिणोर लोकांपैकीं एका मनुष्यानीं या प्रकारची तजविज पसंत न करून पाम नाईक याजला किल्यांतून बाहेर निघण्याविषयीं मनाई करिता जाहाला. तो मनुष्य बोलला कीं, सायंकाळपर्यंत सबुरी करून जाग्यावरून हलूं नका. सायंकाळ झाल्यानंतर सायंकाळचे पुढें तुम्हांस पाहिजे तसें करा.

### ५०. बेदर येथील कजाक लोकांचे हातून दिलेरखान याणी बहुत मार खाल्ल्यानंतर पश्चातापाचे सुरीनें जखमी होणें, म्हणजे पश्चाताप पावणें प्रकर्ण :

दिलेरखान शाहापुरास येऊन पांचवे तासापासून सातवे तासापर्यंत लढाईवर कायम उभा राहून शाहापुरांतून बाहेर आला. फते मामूर हा दिलेरखानाचा पुत्र बापाचे पुढें चालून गेला होता. त्याजला आपला बाप दिलेरखान माघारा फिरला

असें वर्तमान ऐकून फते मामूरहि माघारा फिरला. पाम नाईक याजकडील सिबंदी लोक पर्वताचे दर्‍यांत छपून बसण्याचे जाग्यांत व घोलांत आश्रय धरून संधी साधण्याची मार्गप्रतिक्षा करित टपून बसले होते. ते चहूंकडोन उठोन बाहेर निघोन दिलेरखानांचे पुत्रावर एकदम चालून आले. फते मामूर याजवर गर्दी करून मोठा कठीण प्रसंग आणिला. तेव्हां फते मामूर यागे पूर्ण संकटानें आपला जीव वांचवून त्या प्रळयांतून बाहेर पडोन आपले बापासी, म्हणजे दिलेरखानासी, जाऊन मिळाला. चहूंकडे बहुत शिपाई लोक लुटालुट करण्यांत निमग्न झाले होते. त्यापैकीं पाम नाईक याजकडील प्याद्यांचे हातून सरासरी दोनशें मनुष्यें ठार झालीं व बहुत मनुष्यें जखमी झालीं. दिलेरखान हा गोगी व सैखापूरचे मध्यभागीं मैदान आहे त्या मैदानांत जखमी झालेले लोकांची फौज येण्याची मार्गप्रतिक्षा करित उभा राहिला. तेव्हां बेदरचे मारेकरी लोक दिलेरखानाचे लष्कर पळत निघाले त्यांचे पाठी लागोन बेदरचे लोकांनीं तोडातोडी व ठोकाठोकी करण्याचा प्रसंग अशा प्रकारचा उभा केला कीं, मोगल लोकांचे प्राणावर संकट आलें. मोगलांचे लष्करांतील लोक पळारे पळा प्राण वांचवा यापरत्या कांहीं एक हांका देत नव्हते. त्या तोडातोडींतून जे लोक वाचले ते सर्व लोक दिलेरखानापासीं जमा झाले. त्या लोकांचा शोध पाहिला तो एक हजार सातशें लोक ठार व जखमी झाले होते. दिलेरखान तेथून पूर्ण खिन्नतेने व चिंताग्रस्तपणानें आतां लज्जायमान होऊन गोगीस येऊन पोहचला. दिलेरखान अत्यंत लज्जनें पश्चाताप पावोन रडूं लागला. आज फारच अपकीर्ती झाली व आज-पर्यंत कित्येक वेळ बदनामी झाली होती याहून आजची बदनामी फारच झाली.

## ५१. दिलेरखान याणी पुन्हां आशा धरणें आणि आपलेकडील सरदारांस बेदरचे लोकांचा सूड घेण्याविषयीं प्रार्थना करणें प्रकर्ण :

दिलेरखान आपलेकडील फौजेंतील बक्षीस बोलला कीं, जर करितां आपले खजिन्यांत ऐवज नाहीं तर लष्करचे खर्चाकरितां मी आपलेकडील खुद जातीचे तीस हजार होन देतो. तीन दिवस येथें रहा, म्हणजे बेदरचे लोकांचे पारिपत्य करूं. त्यांचे वागणुकीचा सूड घेऊं. त्यांजला वाजवी शिक्षा करूं. असें बोलला. अलमगीर पाद-शाहाकडील सरदार लोक व शाहाजादा वरचेवर जैनापुरास येऊन पोहचून दिलेर-खानास पादशाहाचे आज्ञेप्रमाणें जाहीर केलें होतें कीं, तुमच्या सुभ्यांत घांदल झाली आहे यास्तव येथून जलद निघोन शत्रूचे पारपत्याचा विचार करा आणि मुलकाचे संरक्षण करा. असें जाहीर केलें होतें परंतु पादशाहाचे आज्ञेचे कामांत दिलेरखाना-कडून सुस्ती झाली. तेव्हां पादशाहाकडील वकील लोक दिलेरखानावर बहुत क्रोधा-

यमान होऊन दिलेरखानास फार दुर्भाषणें करून दिलेरखानाच्या तंबूच्या दोऱ्या कापून स्वयंपाकघरांत व दुसरे जागोजाग शिरून दांडगाई करित होते. नित्य दर मजलीस निघते वेळेस या प्रकारचे बदनामीपणानें व फजीतीनें दिलेरखानास बाहेर काढित होते. दिलेरखानास स्वस्थपणानें किंचित देखिल दम घेऊं देत नव्हते. दिलेरखान शाहापुरास आला तेंव्हां पादशाहाकडील लोकांनीं दिलेरखानावर फारच सक्ती व अयोग्यपणा केला.

## ५२. दिलेरखानाचे लष्करांतील बक्षी व सरदार लोकांनीं दिलेरखानाचे मसलतीस व अकलेस मान्य न होणें, दिलेरखानानें सांगितल्याप्रमाणें न वागणें प्रकर्ण :

दिलेरखान यांणीं बेदरचे लोकांचा सूड घेण्याकरितां व त्यांचे पारिपत्य करण्यास्तव येथें रहा म्हणोन आपले फौजेंतील बक्षीस बहुत आर्जऊन बोलला. तेंव्हां बक्षी व दुसरे कित्येक मुछदी लोक या सर्वांनीं आम्ही तुमचे आज्ञेंत वागत नाहीं असें म्हणून बोललें कीं, तुम्ही येथें दम धरून राहिल्यास आम्ही तुमचें समागमें राहाणार नाहीं. जर करितां तुम्हीं आपले खुद जातीनें फौजेसुद्धां येथें राहाल तर मुखत्यार आहांत, असे बोलले. सर्वांनी आपआपणांत निश्चय ठरविला कीं, जर करितां दिलेरखान येथें राहील तर त्याजला येथें सोडून देऊन आपण सर्वांनीं निघोन जावें. लष्करांतील सर्व लोकांनीं दिलेरखान कामावरून व पद अधिकारावरूनच बरतर्फ झाला आहे असें जाणोन दिलेरखानास बहुत धिक्कार व दुर्भाषणें करून व दूषण ठेऊन बोध करण्यास प्रारंभ केला कीं, आदिलशाहाचे हलके राजधानीस खराब केलीस व मारविली. पादशाहाकडील शिपाई लोक व शिक्षा करणार बक्षीवर व दुसरे कित्येक सरदार लोक याजवर व कारखानदारवर चालून येऊन गर्दी करीत होते. बहुत सक्ति करित होते कीं, तुम्हीं दिलेरखानाचें सांगणें मानूं नये. दिलेरखानासी मित्रतेनें वागूं नये, असीं ताकीद करित होते. म्हणजे बोलले, हें बोलणें ऐकून दिलेरखान भयाभीत होऊन वेड्यासारिखा फारच घाबरून मनांत बहुत चरफडत होता. येविषयींचा कांही एक उपाय जाणीत नव्हता. पादशाहाकडील शिपाई लोकांचे ओढाओढीनें व फारच सक्ति करण्यानें दिलेरखान मोठे प्रातःकाळींच गोगी येथून निघोन दरसनापुरास गेला आणि तेथून मडकीस आला. दिलेरखान यांणीं वाटेनें जातां जातां दोन्हीं बाजूंनीं जीं गांवें किंवा कसबे लागतील तीं गांवें व कसबे जाळून व खराब करून व गांवोगांवच्या पेठा जाळून मजल दरमजल कूच व मुक्काम करित जात होता. मडकीहून आलमेले येथील देसायाचे किल्यानजिक जाऊन पोंहचला.

तेव्हां त्या किल्यावर कित्येक तोफांची सरबती करून किल्यांतील राहाणारे मनुष्यांचे हात पाय उडविले. बहुत मनुष्यास कैद केलें. आलमिले हा गांव षर्जाखानाचे जागिरीचा होता. तेथील देसाई याणी येऊन दिलेरखानाची भेट घेऊन आठ हजार होन कबूल केले. त्या आठ हजारापैकीं दोनहजार होन रोख देऊन जितके लोक कैदेंत पडले होते तितके लोक सोडऊन घेतले. दिलेरखान याणी एक दिवस तेथें मुकाम करून संदगीस आला आणि तो गांव जाळून धूळदशेस मिळऊन मुसळे येथें येऊन पोह्चला. एक दिवस तेथें मुकाम करून त्या गांवचीहि निखालस खराबी केली. त्या तर्फेतील गांव व कसबे होते आणि दिलेरखान याणीं प्रथम गेते समयीं त्या गांवीं गढया व कोट बांधून तेथें ठाणीं बसविलीं होतीं त्या सर्व गढया व कोट निखालस पाडून टाकून तेथील ठाणीं उठऊनहि परगण्यास आला. दोन तीन दिवस तेथे राहून दिलेर हिंमत व इकलासखान या उभयतांस बहमनहली येथील गढी निखालस पाडून टाकण्याकरितां व तोफा व सामान सरंजाम तेथें दिलेरखान याणीं ठेविला होता तो आणावयाकरितां रवाना करून दिलेरखान खुद जातीनें निंबाळास गेला. दलेर हिंमत व इकलासखान या उभयतांनीं दिलेरखानाचे हुकूमाप्रमाणें बहमनहली येथील गढी निखालस पाडून टाकून जमीनदोस्त करून तेथें ठेविलेला सामान सरंजाम तेथून काढून दिलेरखान याजपाशीं आणोन हजर केला. याच दिवसांत बेदरवाले यानीं मोगलांसी फार शुरत्व व पराक्रम केला. या योगानें शिकंदर पादशाहा बहूत संतोष पाऊन पादशाहा यानीं पाम नाईक याजला हिरवे रंगाची आफताबगीरी व हिरवें निशाण व माहीमरातब बक्षिस दिल्हे. असेंच अलमगीर पादशाहा यानीं जेव्हां आपले फौजेसी बेदरवाले यानीं लढाई केली व बेदरवाल्याचे प्रबळतेने दिलेरखान जेरीस येण्याचे वर्तमान ऐकिलें व ही बातमी अलमगीर पादशाहापासी हुजूर येऊन पोह्चली तेव्हां अलमगीर पादशाहा यानीं मुक्ताफळासारिखे वर्षाव करणारे आपले जिव्हेंतून हीं अक्षरें काढीलीं कीं, 'शंभर शाबासक्या बेदरवाले लोकांवर असोत व हजार धिक्कार व वाईटपणा आम्हांकडील शूरांवर असोत' असें बोलले. सारांश, दिलेरखान फारच घाबरून व अक्कल सोडून देऊन व या प्रकारें गांव व खेडीं लुटून फडशा करूं लागला, कीं एकें ठिकाणीं राहात नव्हता. दिलेरखान आपले दुर्दैवीपणाचे सामान वरचेवर इकडून तिकडे नेऊन बहुतेकांस खराब करित होता. हाकम म्हणजे जिवें मारीत होता. विजापूर हस्तगत करण्याविषयीं व मसऊदखानासीं सख्य करण्याविषयीं दिलेरखान जो विचार मनांत आणित होता व जी मसलत योजित होता त्या विचाराचे योगानें विपरित फळ प्राप्त होत होतें. शाहाजादा अलम बहादूर यानीं दिलेरखानाचे कामाचा बखेडा करण्याविषयीं यत्न करून दिलेरखानाचा गिल्हा व बोभाटा वरचेवर अलमगीर पादशाहास लिहित होता व पादशाहापासीं हुजूर रहाणारे कारभारी मंडळीहि दिलेर-

खानानीं फार मूर्खपणा केला आहे व जितके हल्ले केले आहेत तितके व्यर्थ केले असे वगैरे प्रकारचे दिलेरखानाचे गिल्याचे मजकुराची पादशाहास विनंती करित होते. तेव्हां पादशाहा दिलेरखानावर अत्यंत क्रोधायमान होऊन तुझें पारपत्य केलें जाईल, अशीं वगैरे जरबदार मजकुराची आज्ञापत्रें वारंवार लिहून दिलेरखानास पाठवित होते. त्या आज्ञापत्रांचा येथपर्यंत धाक पडला कीं, दिलेरखान मनांतील दुखण्यानें, म्हणजे एक हें दुखणें कीं, विजापूरावर इतके हल्ले केले परंतु आपले कांहींच मनोरथ पूर्ण झाले नाहींत व दुसरें हें कीं, मुलकाची फारच खराबी झाली, सरकारी खजीना बेज्या खर्च केलास येविषयीं तुजला सवाल होईल व तुला जाब द्यावा लागेल असें विचारून घेणार हें भय व तिसरें हें कीं सर्वत्र तोंडावर थुंकतील व वर्मी बोलतील. या तीन गोष्टींचे प्रबळतेनें, शरीररोगानेंहि दिलेरखानास आजार म्हणजे दुखणें येऊन दिलेरखानाचें आयुष्य भरले होतें तेव्हां दिलेरखान औरंगाबाद येथें मेला.[२४]

## ५३. शिवाजीचें थोडेसें वर्तमान लिहिलें जात आहे :

शाहाजीचा पुत्र शिवाजी हा या समयांतील फंदफितूर व गैर नाना प्रकारची संकटें उभीं करणारा फारच चमत्कारिक होता, कीं सर्व शहरांत धांदल व उपद्रव करणारा असें जरी शिवाजीचें नांव ठेवलें तथापि शोभावयाजोगें आहे. शिवाजीची उत्पत्ती अद्वितीय, म्हणजे असा कोणी बदफैली करणारा कधीं जन्मलाच नाहीं असा शिवा जन्मास आला आहे असें जरी म्हटलें तरी योग्य आहे. शिवाजीमध्यें चमत्कारिक बहूत लक्षणें होतीं. शूरत्व व पराक्रम व विचार व जंगे गुरीजी, म्हणजे शत्रूवर चालून जाऊन तोडातोडी करून आणखी परत येऊन पुन्हां धाऊन जाऊन युध्द करणेंस जंगगुरेजी असे म्हणतात, हेंहि लक्षण, व नानाप्रकारच्या ठकविद्या व मकर व बाहाने शिवाजींत भरले होते. वाटमारे चोर असतात त्याप्रमाणें मारेकरीपणाचें कर्मांत व दांडगेपणांत असा होता कीं, त्यास दृष्टांतच नाहीं. असा निरोपम होता. मकरबाज व हिलेबाजी म्हणजे ठकविद्येचा गुण तर शिवाजींत अति श्रेष्ठ होता. शिवाजी हा आपले बापाचे, म्हणजे शाहाजीचे, जिवंतपणींच या ठकविद्येंत व फंदफितुर वगैरे संकटें उभीं करण्याचें कामांत सर्व पृथ्वींतील फंदफितुर करणारांहून मोठा सरदार झाला होता. शिवाजी अशीं कामें करित होता कीं, मोठमोठ्या राजधान्या बुडवित होता व मोठमोठी स्थानें व घरें समूळ

२४. शके १६०५ आश्विन मासी......तेच मासी (सप्टेंबर-आक्टोबर १६८३) दिलेरखानें विष घेऊन देह सोडिला.– जेधेश, पृ. ३२.

पाङ्गन टाकित होता. दिल्ली येथील तैमुर पादशाहाचे वंशांत व आदिलशाही राजधानींत मोठे वैरभावाचें व वांकडेपणाचें कारण उत्पन्न झालें तें याच बंडखोरानीं म्हणजे शिवाजीनींच उत्पन्न केलें. कारण कीं, तीं फंदफितुराचीं संकटें उभीं राहून हळुहळु येथपर्यंत कार्यभाव लांबला म्हणजे या दशेस गोष्ट आली. शिवाजीचें मोठे उत्तम प्रकारचे दव फारच चमत्कारिक होतें. कारण कीं शिवाजी या प्रकारचा धांदलखोर व पृथ्वीप्रळय करणारा असोन या उभयतां महाबलवानामध्यें म्हणजे दिल्लीवाले पादशाहाचे व आदिलशाही राजधानीचे मध्यभागीं सिवा रहात होता आणि नानाप्रकारचे फंदफितूर व बदफैलीचीं कर्मे करित होता. उभयतांकडीलहि राजधानींस नानाप्रकारचे उपद्रव करित होता. उभयतां पादशाहाहि सिवाजीचा निर्मूळ फडशा करण्याकरितां यत्न करित होते. परंतु सिवाजी यानींहि आपले प्रारब्धबलेंकरून व उत्तम दैवयोगेंकरून पंचवीस वर्षेपर्यंत पूर्ण मनोरथपणानें दिवस घालऊन सन एक हजार एकेआण्णव सालीं ( १६८० इ. स. ) राहेर येथें परलोकास जाता झाला, म्हणजे मरण पावला.[२५] पृथ्वीस आपले उपद्रवाचे पिडेपासून सोडविता झाला. त्यानंतर शिवाजीचा पुत्र संभाजी हाहि आपले बदफैली बापाचे ठिकाणीं कायम मुकाम होऊन आपले बापाचे बदफैलीपणाचे वतनदारीस पुन्हां नवीन तेज देऊन सांभाळीता झाला, म्हणजें संभाजीहि शिवाजी सारिखा गैरराहा वागूं लागला. मुलखाची ओसाडी व पृथ्वीची खराबी करूं लागला. केव्हां केव्हां मसऊदखानासी सख्य करून मोंगलासी म्हणजे दिल्लीवाल्यासीं दगलबाजी करित होता व केव्हां केव्हां मोंगलांशीं सख्य करून दक्षिणी लोकांशीं ठकबाजी करून उपद्रव करित होता. संभाजी हाहि वाटमारेपणा व फंदफितूर करण्याचे कामांत आपले बापाहून म्हणजे शिवाजीहून कमी नव्हता. शिवाजी प्रमाणेंच होता. संभाजीनींहि आपले बाप आज्याचे वर्तणुकीप्रमाणेंच वर्तणूक करून दहा वर्षेपर्यंत गर्विष्टपणांत व अभिमानांत राहून, अलमगीर पादशाहाचे व आदिलशाही पादशाहाचेहि आज्ञेंत न वागतां व मर्जींत न रहातां, बेमानपणा करून सन अकराशें

---

२५. शके १६०२ रौद्र संवत्सर चैत्र शुद्ध १५ पौर्णिमा शनवारीं दोन प्रहरां दिवसा ( १३ रबिलावल १०९१ हिजरी, १०९९ फसली, २३ जुलस=३ एप्रिल १६८० ) रायगडीं सिवाजी राजे यांनी देह ठेविला. सु॥ सन समानीन अलफ. जेधेश, पृ. ३०, शिदया, पृ. ५३, सर्व बखरी वगैरे यांची एकवाक्यता आहे.

News came from the Deccn that on Friday the 14th May 1680-24th Rabius-Sani Shivaji after returning from a journey dismounted from his horse, twice vomitted blood in the excess of heat, and sank down into the pit of hell.– NiA. p. 120.

एक सालीं (११०१–१६८९ इ. स.) आपले बापाचे मार्गानेंच गेला, म्हणजे मरण पावला.[२६]

## ५४. अलमगीर पादशाहा व शाहाजादा या उभयतांनीं शिकंदर आदिलशाहा पादशाहासी संरक्षण करण्याच्या चाली प्रसिद्ध करणें प्रकर्ण :

तारिख ७ सातवी माहे रबिलावल सन १०९१ सन एक हजार एक्याणव सालीं (२८ मार्च १६८०) शाहाजादा अजमशाहा अलमबहादूर याचे निशाण सय्यद मखदुम याजप्रकर्णी व सिवाचे पारपत्याचे कामाविषयीं येऊन पोहचले. तेव्हां पादशाहा व मसऊदखान हे उभयतां शहापूर हौदापर्यंत सामोरे जाऊन ते निशाण बहुत सत्कारानें घेतलें. चार दिवसांनंतर तारिख ११ माहे मजकूर (१ एप्रिल १६८०) रोजीं मिरजा महंमद मुनीफ यानीं पुन्हां पोषाख व निशाण शाहाजादा मवसुफ याजकडून आणविलें तेव्हां पुन्हां सदर्हु हौदापर्यंत सामोरे जाऊन तेंहि घेतलें. तारिख २२ माहे मजकूर (१२ एप्रिल १६८०) रोजीं मवलदमुबारकाचे कचेरीचे, म्हणजे पैगंबर याचे उत्पत्तीच्या वर्णनाच्या कविता म्हणत रात्रीं जागर बहूत समारंभानीं करितात त्या समारंभाचे कचेरीस, मसऊदखान यानीं पादशाहास आमंत्रण केले. त्यावरून पादशाहा मसऊदखानाचे घरास येऊन रात्रीं तेथेंच राहिले. दुसरे दिवशीं प्रातःकाळीं शाहापुरापर्यंत जाऊन दोन घोडे व पोषाख पादशाहाकरितां व एक घोडा व पोषाख मसऊदखानाकरितां शाहाजादा मजकूर याजकडून येऊन पोहोंचला होता. ते आदिलशाहा याणी व मसऊदखान याणी घेऊन विजापूर शहरास परत आले. तारिख २ माहे रबिलाखर (२३ एप्रिल १६८०) रोजीं व्यंकटाद्रीस कैदेंतून मोकळे करून षर्जाखानाचे मसलतींत त्याजला मुखत्यार केलें. तेव्हां व्यंकटाद्री तारिख २ माहे जमादिलावल (२१ मे १६८०) रोजीं विजापुराहून निघोन खुसरवपुरांत येऊन राहिला. तेथून तिसरे चवथे दिवशीं उदोनीकडे चालते होऊन व कलकोट्याचे मुक्कामीं षर्जाखानासी जाऊन भेटला. षर्जाखानासी नानाप्रकारचीं मित भाषणें बोलून सय्यद मखदुम षर्जाखान याचे चित्तांत मसऊदखानाविसीं वांकडेपणा आला होता तो सर्व दूर करून उभयतांमध्यें निखालस साफी केली.

२६. शके १६१० फाल्गुण वद्य ३० (११ मार्च १६८९) अवरंगजेबें तुळापुरीं संभाजी राजे व कवि कलश यांस जीवें मारून सिरच्छेद केलें.– जेधेश, पृ. ३५.

### ५५. दक्षणचा मुलूख हस्तगत करणें पूर्वीपासून मोंगलाचे मनांत होतेंच परंतु हली अलमगीर पादशाहा दक्षिण देशांत दुसरेच कारणास्तव आले आणि अकबर पादशाहा संभाजीसी मिळणें प्रकर्ण :

ईश्वराचे मनोगताचे श्रेष्ठ कारणानंतर दक्षण देशाकडे चालून येण्याचा संकल्प अलमगीर पादशाहास मुलखाची बहुत आशा अधिक इच्छा करण्याचा आहे. कारण कीं, हा संकल्प आदम पादशाहाचे वंशाचे अंतःकर्णातीलच आहे कीं, इतके विस्तीर्ण राज्य व बहूत मुलूख बाबर व अकबर पादशाहाचे कारकिर्दीहून अलमगीर पादशाहाचे कारकिर्दीत अधिक प्राप्त जाहाला होता असें असोन तितक्यांत संतोष मानिला नाहीं. पारसी वाक्याचा अर्थ : “ पादशाहासहि सर्व पृथ्वी प्राप्त जाहाली. तत्रापि आणखी एक पृथ्वी मिळावी अशा विचारांत पादशाहा असतो : १ : ” या वाक्यांतील तात्पर्य हें आहे कीं, पादशाहास सर्व पृथ्वीचें राज्य प्राप्त झालें तत्रापि त्याचें समाधान होत नाहीं. आणखी राज्य मिळावें अशी पादशाहास आशा उत्पन्न होती. या वाक्याप्रमाणें रात्रंदिवस दक्षिणचा मुलूख हस्तगत करण्याचा विचारांत प्रातःकाळपासून सायंकाळपर्यंत, म्हणजे सर्व काळ, विजापूर घेण्याचे इच्छेत अलमगीर पादशाहा रहात होते. दुसरींहि कित्येक कारणें उभीं राहिलीं. एक कारण हें कीं, सिवाचा उपद्रव रात्रंदिवस व शिवाचा पुत्र संभाजी हा सिवाचे क्रोधामुळें सर्वांस फारच उपद्रव करित होता. तेणेंकरून आगरे व दिल्ली येथील रहाणारांस पाणी पिणें देखील गोड वाटत नव्हतें, येथपर्यंत संभाजीनें उपद्रव केला. दुसरें कारण हें कीं, शाहजादा महमद अकबर याणें नानाप्रकारचीं संकटें उभीं केलीं आणि अति गर्विष्टपणानें फिरून पडण्याचे चालीनें बाहेर लोकांची अंतःकर्णें त्रासलीं व त्याबदल अलमगीर पादशाहाचे मनांत फारच भय उत्पन्न झालें. या बोलण्याचे विस्तारांतील सारांश हा आहे कीं, अलमगीर पादशाहा तक्तावर बसले त्या एकविसावे सनांत मुताबिक सन १०८९ एक हजार एकुणनव्वद हिजरी ( १६७८–९ इ. स. ) सालीं जोधपूर येथील राठोड मंडळीचा धणी राजा जसवंत हा राज्यकारभार चालविणारा मुख्य राजा होता तो ईश्वराचे निरोपाय आज्ञेकरून मरण पावला. जसवंतसिंग ठार झाल्यानंतर याचे पाठीमागें त्याचे राठोडपणाचे तक्तावर बसावयास राजा जसवंतसिंग यास पुत्र नव्हता. राजा जसवंतसिंग मरण पावल्यानंतर कैलासवासी जसवंतसिंग याजकडील चाकर मंडळी व बायकामंडळीनीं हुजूर दिली येथील अलमगीर पादशाहास विनंतीपत्र लिहिलें कीं, कैलासवासी राजा जसवंतसिंग याचे विवाहीत स्त्रियांपैकी दोघीं स्त्रियांस जसवंतसिंग याचे पोटचे गर्भ राहिले होते. दोघी स्त्रिया गरोदर होत्या. त्या दोघी स्त्रिया प्रसूत जाहाल्या. थोडकेच अंतऱ्यानें दोघीस दोन पुत्र जाहाले

आहेत. याजकरितां पादशाहाचे कृपेपासूनहि आम्हां सर्वांची ईच्छा आहे कीं, तिलक लावण्याविषयीं, म्हणजे ज्यास तक्तावर बसवावयाचें त्याचे कपाळीं दिल्ली येथील पादशाहानें आपले पायाचे आंगळ्यानें केशराचा टिळा लावावा म्हणजे तो राज्यपदास अधिकारी होतो. याजकरितां या पुत्रास टिळा लावण्याविषयीं, व जोतपूर येथील राजपदाचे तक्तावर हे पुत्र बसवावयाविषयीं मेहनबानगी करून हुकूम द्यावा. असें विनंतीपत्र पाठविलें. यावरून अलमगीर पादशाहाकडून आज्ञापत्र सादर झालें कीं, त्या पुत्रास त्याचे उभयतां मातुश्रीसुध्दां इकडे हुजूर घेऊन यावें म्हणजे येथें हुजूरचे राजपदाचीं वस्त्रें त्याजला मिळतील. असें पत्र पाठविलें. त्यावरून ते पुत्र मातोश्रीसुध्दां बादशाहाचे आज्ञेप्रमाणें हुजूर येऊन दाखल झाले. तेव्हां जोतपूर येथील राजपद त्याजला बक्षिस देणें व एवढे मोठे संस्थान जोतपुरासारखी जागा व ही केवळ अज्ञान मुलें या पुत्रानीं आपले कैलासवासी बापापासून कांहींच माहीती करून घेतलेली नाहीं अशा केवळ अज्ञान बालकांचे हातीं देणें योग्य दिसत नाहीं, असें जाणोन पादशाहानीं आपले श्रेष्ट दिवाण मंडळीस आज्ञा केली कीं, हीं दोन मुलें समजदार व प्रोढ वयाचीं होईतोंपर्यंत दोन महाल त्या मुलांचे पगाराबदल देऊन बाकीचा एकंदर मुलूख सरकारचे खालसांत जप्त करावा. त्या दोन महालांचे बंदोबस्ताचे कामावर इकडील अमीर नेमावा. जोतपूर ही तक्ताची जागा राठोड लोकांचे राजधानीचे संस्थान आहे हें जोतपूर राजाचे पुत्रास बहाल असावें, म्हणजे हें राज्य याचें याजला द्यावें. याशिवाय रजपुत लोकांस दुसरें कांहीं कारण नव्हतें. या परता दुसरा कांहीं एक मनोरथ नव्हता तो मनोरथ सिद्धीस गेला नाहीं. तेव्हां या कारणानें रजपुत लोक बहुत खिन्न झाले. संधीची वेळ साधून शाहाजाहानाबाद येथून राजाच्या बायका व मुलासुध्दां निश्चय करून जोतपुरास आले. मनास येईल तसें गर्विष्टपणाची चाल स्विकारून त्या दोन पुत्रांपैकीं एक पुत्र बानीतसिंग म्हणोन होता त्याजला घेऊन एकास उभा करून त्या जोतपुरचे राज्यावर बसविण्याचा निश्चय करून बानीतसिंग याजला जोतपुरचे तक्तावर बसविलें. रजपुत मंडळीनीं माजूरपणास व पादशाहाचे आज्ञेंत न वागण्यास प्रारंभ केला. यामुळें पादशाहास फारच क्रोध आला. आपले लष्कराची ढाल अजमीराकडे उभी केली. अजमीरास जाऊन पादशाहा याणी आपले सेवकांचे म्हणजे जसवंतसिंगाचे पुत्रांचे पालन करणेंकरितां मनांत आणिलें कीं, सर्व राटोड लोक मूर्ख आहेत. या मूर्खांचे अपराधामुळें जसवंतसिंगाचे पुत्रांचा उच्छेद करूं नये. हीं मुलें केवळ लहान. यांजकडे येविषयींचा कांहींच अपराध नव्हता. अजमीर येथील राणा याची सरहद राटोड लोकांचे सरहदीस मिळाली आहे. यास्तव पादशाहाची साफ आज्ञा जाहाली कीं, त्या बदमस्त धुंद पुरुषास म्हणजे अजमीर येथील राणा यास हुशार करावा कीं, यद्यपि

राठोड मंडळींचा घाताचा समय आला आहे तत्रापि त्या राठोड लोकांस राणा यांनीं आपले मुलखांतील पर्वतांतील वगैरे ठिकाणीं जागा व आश्रय देऊं नये. त्या मृत्यूनें घेरलेले राठोड मंडळींचे जमार्तास आधार देऊं नये. असें अजमीर येथें राणा यास आज्ञापत्र पाठविलें. खानजहान बहादूर जाफरजंग याजला राठोड लोकांचे पारपत्यावर नेमून पादशाहा आपले राजधानीस परत येते जाहाले. खान-जहान बहादूर याणें आपले विचारानें या कामास प्रारंभ करून पादशाहास विनंतीपत्र लिहिलें कीं, राणा हा गुप्तपणानें राठोड लोकांचीं मदत करित आहे. राठोड लोकांचे बायकामुलांस राणा याणे आपले मुलखांत रहावयास जागा दिली आहे. असें वर्तमान कळतांच पुन्हां आणखी पादशाहा याणी आपले लष्करची ढाल युद्धाकरितां अजमीराकडे चालती केली. पादशाहाजादा महंमद अजम हा दक्षण देशाहून हुजूर येण्याचा इरादा करून येऊन उज्जनीस पोहचला होता. त्या शाहा-जाद्यास पादशाहाचे आज्ञापत्र गेलें कीं, राणा याचे मुलकाचे जाग्यांत रागासागर म्हणोन तलाव आहे त्या तलावावर तुम्ही येऊन तेथें मुक्काम करून राणा याचे मुलकाची खराबी करावी. आणखी पादशाहाजादा महंमद अजम याजला हुकूम येऊन पोंहचला कीं, राणा याच्या पळून जाण्याच्या वाटांची जागा पर्वतांतून आहे त्या पर्वतांचे अवघड जाग्यांत हुजूरची कहरी फौज घेऊन येऊन रजपूत लोकांस कैद करण्याविषयीं व पकडण्याविषयीं बहूत यत्न करून त्या पाखरांसारिखे पळून जाणारांस, म्हणजे राणा यास, पकडून हातीं आणी तोंपर्यंत किंवा त्याजला ठार मारी तोंपर्यंत यत्न सोडूं नये, असा हुकूम येऊन पोहचला. पादशाहाजादा महंमद अकबर याजबराबर फौज नेमिली आणि सांगितलें कीं, राठोड लोकांचे मुलखांत सरहद्दीचे अंतऱ्यानें भयंकर स्थान बहुत पर्वताची जागा आहे तेथें जाऊन तिकडील तर्फेतील मुलखाची खराबी करावी. [२७] असें सांगोन फौज नेमिली. असेच कितीक लोक दुसरे लढाऊ शूर लुटालूट व तोडातोड करण्याकरितां नेमिले. तसेच चहूंकडोन फौजेंतील लढाऊ शूर यांणी पादशाहाचे मनोगताप्रमाणें बहूत गर्दी उसळविली. मीर शाहा-बुद्दीनखान व दुसऱ्या कित्येक फौजा राठोड लोकांचे मुलखाची खराबी करण्याकरितां नेमिल्या होत्या, त्याणीहि लढाईविषयीं अति उत्तम यत्न करून व फारच गर्दी करून तोडातोडी व लुटालुटी करण्यांत किंचितहि अंतर किंवा आळस केला नाहीं.

२७. On Friday, the 16th January 1680 / 24th Zilhijja,..... Akbar was presented with a Sarpetch of ruby worth 40,000 rupees. and sent to Udaipur.- MiA, p. 115.

## ५६. सारांश :

शाहाजादा महंमद अकबर हा टकबाज रजपुताचे टकविद्येनें फसून कित्येक पादशाही अमीरलोकांसहित व पादशाहाचे इमानी चाकरलोकांसहित रजपुतांस सामील होऊन फिरून पडण्याची व बदलण्याची चाल स्विकारिली. शाहाजादा यानीं ऐकिलें कीं, पादशाहाकडील बहूत जमात जागोजाग नेमिली गेली आहे. आतां पादशाहापासी हुजूर दोन तीन हजार स्वार व कांहीं चाकरीचे माणसां-परते अधिक नाहींत. असें ऐकून जागोजाग नेमिलेली जमात शाहाजादा यानीं आपलेपासी आणऊन राठोड लोकांची, पिशाच्यासारखे लोकांची, जमात सरासरी दहाबारा हजार स्वार होते त्या जमातीसुध्दां व त्याशिवाय ही जमात सात आठ हजार स्वार जमा करून एकंदर फौज जमऊन शाहाजादा अजमीराकडे चालता जाहाला. पादशाही तोफखाना व कांहीं थोडासा आपला तोफखाना समागमें घेतला. हें वर्तमान एकून पादशाहा अत्यंत क्रोधायमान झाले. [२८] ती जमात फार आहे याजवर पादशाहानीं नजर न ठेवितां पादशाहापासीं सरासरी लढाऊ स्वार दोन हजार असतील तितकेच आपले थोडेसं जमातीसुद्धां पादशाहा मौजे देवराई म्हणून गांव अदमीरापासून तीन कोशावर आहे व दामा म्हणोन पादशाहा जाहाला तसल्या पादशाहासीं युद्ध करून त्या गांवचे जाग्यांत यश आलें होतें सबब त्या मौजे देवराई येथें पादशाहा येऊन उतरले. शाहा अलम याजला हुकूम सादर जाहाला कीं, जल्द येऊन हुजूर हजर व्हावें. त्या आज्ञेवरून पादशाहाजादा बहूत जलदी निघाला. ज्या दिवशीं महमद अकबर हा पादशाहाचे लष्करचे मुकामाचे जाग्याचे पासून पांचसहा कोसावर येऊन पोहचला तेव्हां पांचसहा हजार स्वारांनिसीं त्या दिवशीं सरासरी तीस कोशाची मजल एक दिवसांत काढून शाहा अलम तेथें येऊन पोहचला. महंमद अकबर याजकडील फौजेंतील सर्व सिपायांचा मुख्य सरदार पादशाहा लालीखान म्हणोन होता. तो महंमद अकबर याचे फौजेंतून फुटून पादशाहाकडे हुजूर येऊन पोहचला. रजपूत लोक लालीखानाचे बोलण्याचे विश्वासा-वर लालीखानासमागमें होते. त्यानीं लालीखानाचे फौजेंतून फुटून दूर गेला तें जाणें दगलबाजीचे असें जाणून त्या रजपूत लोकांनी महमद अकबर याची सोबत

२८. On Friday, the 7th January 1681/26 Zilhijja, the Emperor learnt from the letters of spies, approved observers and other well-informed persons that through the instigation of the Rathors and some ungrateful imperial servants, Prince Mahammad Akbar had rabelled, promoted those of the imperial officers who agreed with him, and imprisoned those whom he suspected of being unfriendly.- MiA, p. 122.

सोडून दिली व दुसरेहि कित्येक चाकर लोक गरजवंत होते तेहि हरएक बहाण्यानीं एक एक लोक अकबर याची सोबत सोडून निघोन गेले. तेव्हां निरुपाय होऊन चारपांच कोशावरूनच महंमद इब्राहीम हा पादशाहाकडे हुजूर जात नव्हतां त्या या महंमद इब्राहीम याजसुद्धां व दुसरेहि दोन तीनशें लोक व चार पांच हजार रुपये शिल्लक राहिले होते ते घेऊन पहाटेची एक प्रहर रात्र उरली होती तेव्हां पळून राठोड लोकांचे मुलखांत गेला.[२९] त्याचे बाजारबुणगे किरकोळ सामान होतें तें रजपूत लोकांनीं लुटून नेलें. दुसरे दिवशीं पादशाहा यानीं शाहा अलम याजला महंमद अकबर याचे पाठलागावर नेमिलें. महमद अकबर राठोड लोकांचा दूर मुलूख अहमदाबाद गुजराथचे सरहदीनजीक बीन पाण्याची जागा आहे तेथें जाऊन राहिला. पुन्हां राठोड लोक त्याजपासी जमले. राजा जसवंतसिंग याजकडील श्रेष्ठ सरदार लोकांपैकीं दुर्गा व सोमक हे उभयतां सरदार होते. महंमद अकबर हा बहूत धांदली. कांहीं एक पुढें यत्न चालेनासा झाला. एके ठिकाणीं एक मुक्काम एक रात्र किंवा एक दिवसदेखिल करूं शकला नाहीं. तेव्हां त्या दुर्गा व सोमक या उभयतां सरदारांसहीत व पांचशें रजपूत लोक घेऊन गुजराथचे अरण्याची वाट धरून दक्षिण देशाकडे येऊन कोकणचे मुलखांत महंमह अकबर हा शाहाजादा संभाजीपासी येऊन राहिला.[३०] कदाचित आदिलशाहा व कुतुबशाहा हे उभयतां पादशाहा आपल्यास मदत करतील या उमदीनें महंमद अकबर इकडे आला. य

२९. Before dawn on Sunday, the 16th January 1681/6th Muharram, the Emperor learnt that Muhammad Akbar, who had encamped one and a half kos from him (the Emperor's tent) had fead away at midnight leaving his family and children behind.- MiA, p. 125.

३०. शके १६०३ जेष्ठ मासी (मे–जून १६८१)[१] सुलतान अकबर शाहा जाला. औरंगजेबावर यागी होऊन त्रिंबकास आला. त्यास संभाजीराजे यार्णी कोंकणांत पालीस ठाव दिल्हा.– जेधेश. पृ. ३१. A letter came from Khan Jahan Bahadur stating that Muhammad Akbar had passed by Burhanpur on Sunday, the 16th May 1681/7th Jamadilawal and entered the territory of Sambha, who had kindly and honourably given him shelter in his dominion.- MiA, p. 127. शके १६०३ कार्तिक शुध १३ रविवारीं (१३ नवंबर १६८१) पातशाहापुरी संभाजीराजे यांची व अकबराची भेटी जाली.– जेधेश, पृ.३१. On Saturday, the 6th August 1681/1st Shaban, a letter was received from Khan Jahan Bahadur, to say that Akbar was living in the fort of Pali near fort Maspuli, 200 cavalry and 800 infantry were with him, and Sambha had assigned a pension to them.- MiA, p. 130.

तिघांचे मदतगारीनें, म्हणजे आदिलशाहा व कुतुबशाहा व संभाजी या तिघांचे मदत-गारीनें, आपली मजबुती करून प्रबळ होऊन आपले मनोरथ पूर्ण करून घ्यावे असें महमद अकबर याणी योजिलें.

## ५७. राणा याचे प्रकर्णापासून मोकळीक करून घेऊन दक्षिण देशाचा इरादा करणें प्रकर्ण :

जेव्हां पादशाहाकडील फौजा चहूंकडून राण्याचे मुलखांत येऊन राणा याजला मध्यभागीं वेढून राणावर कठीण प्रसंग आणिला तेव्हां राणा याणीं आपण चहूं-कडोन संकटांत पडलों असें जाणून गर्वाचे भ्रांतींतून सावध झाला. आतां याहून अधिक गर्व करणें चांगलें नाहीं असें जाणिलें. या संकटांत जरासें उभें राहिलें असतां आपला घात आहे असें समजला. निरुपाय होऊन शाहाजाद्याकडे येऊन पोहचून मजकडून अमर्यादा घडली ते सर्व अपराध क्षमा करावे असें काकुळतीस येऊन राणा याणी आपले वतनापैकीं कित्येक परगणे अलमगीर पाद-शाहास नजर देऊन अलमगीर पादशाहाचे सेवेचा व आज्ञा पालन करण्याचा तुरा आपले श्रेष्ठत्वाचे पागोट्यांत खोविला, म्हणजे अलमगीर पादशाहाची सेवा व आज्ञा कबूल केली. अलमगीर पादशाहास जेव्हां रजवाडे लोकांचें लढाईपासून मोकळीक जाहाली व रजवाडे लोकांचे कामापासून अंतःकर्ण स्वस्थ झालें तेव्हां अलमगीर पादशाहाचे अंतःकर्णांत शाहाजादा महमद अकबर व शाहाजादा आअजम या उभ-यतांविषयीं विचार पडला. असें वाटलें कीं, हा शाहाजादा प्रत्यक्ष लहान वयाचा व कमी पदवीचा असोन दांडगेपणा व अमर्यादा व धटाई व ठकबाजी व हिलेगिरी करण्यांत सर्व थोर व याचे व श्रेष्ठ पदवीचे शाहाजाद्याहून श्रेष्ठ व सर्वांस प्रसिध्द आहे. न जाणो तो नीच योग्यतेचा पुत्र, म्हणजे महमद अकबरहि, या सदरहू लक्षणांत पूर्ण जाणता आहे व तसा कोणीच ठकबाज नाहीं त्या महंमद अकबरासी हा शाहाजादा जेव्हां मिळेल व दोघे एक होतील तेव्हां खास असें आहे कीं, पारसी बैतेचा अर्थ : “ दोघे पुरुषांची चित्तें एक जाहालियास पर्वत देखिल फोडतील. ” दोघे एक झाले म्हणजे बहुत संकटें उभीं राहतील. तीं संकटे सुधारण्याविषयीं व निवारण करण्याविषयीं आपले यत्नांचे सामर्थ्य रहाणार नाहीं. यास्तव अलमगीर पादशाहाचे मनांत अशी चिंता प्राप्त झाली कीं, त्या चिंतेनें पादशाहास खाण्यापिण्याचा देखिल त्रास येत होता. ह्यास्तव शाहाजादा आअजम याचें लग्न पादशाहा बिबीसी होण्याचा समारंभ या अडथळ्यामुळें लांबणीवर पडला होता. माहे रजेब सन १०९२ सालीं ( जुलै १६८१ ) अति उतमपणानें सदरहू लग्न

समारंभ करून शाहाजादा मजकूर याजला त्याच महिन्यांत दक्षण देशांत याच लढाईचे कामावर रवाना केला. [३१] त्यानंतर रमजानचे महिन्यांत (सप्टेंबर १६८१) अलमगीर पादशाहा खुद जातीनेंहि दक्षण देशचे मुलखाकडे निघाले. याच दिवसांत शिकंदर पादशाहा व मसऊदखान व सय्यद मखदुम व दुसरे कित्येक कारभारी मंडळीस अलमगीर पादशाहानीं आज्ञापत्रें पाठविलीं कि तीं आज्ञापत्रें अशीं होतीं कीं, त्या आज्ञापत्रापैकीं या ठिकाणीं दोन पत्रांच्या नकला, एक नकल अलमगीर पादशाहाचे आज्ञापत्राची व दुसरी नकल पादशाहा बिबी इणें सय्यद मखदुम याजला आज्ञापत्र पाठविलें होतें त्या पत्राची अशा दोन पत्राच्या नकला, योग्य जाणून दृष्टांताकरितां या जागीं लिहिल्या आहेत.

## ५८. अलमगीर पादशाहा यानीं पर्जाखान उर्फ रूस्तुमखान याजला आज्ञापत्र पाठविलें त्याची नकल :

सय्यदपणा व शूरत्वास आधार व बहुत कृपा करण्यास योग्य पात्र रूस्तुमखान याणी पादशाहाचे कृपेस थोरपणा पावोन जाणावें कीं, या यशस्वी आरंभाचे व विजयरुप परिणामाचे दिवसांत सर्व हिंमत राणा याचे पारपत्यावर खर्च झाली होती. इकडील यशस्वी फौज चहूंकडोन राणाचे मुलखांत येऊन राणा याजला त्या फौजेनें मध्यभागीं वेढिला होता. अकबर याणी बेखबर व मूर्खपणामुळें व लहान वयामुळें दौलतीच अकल्याण इछिणारे व मूर्ख मंडळींचे अयोग्य मसलत शिकविण्यावरून आपले देशाचे विचारापासून नेत्र झांकून बेमानपणा व फिरून पडण्याची चाल स्वीकारिली आणि अयोग्य चालीचे उत्पत्तिस्थान झाला. शेवटीं आपले वाईट वर्तणुकींत सांपडला गेला. लढाईस उभे राहण्याचें सामर्थ्य आपल्यांत राहिलें नाहीं असें अकबर यानीं जाणून पळून जाता झाला. कैलासवासी राजा जसवंतसिंग याचे निसबतीचे कित्येक चाकरलोक समागमें घेऊन पूर्ण वाईटपणानें व अत्यंत घाबरेपणानें अपूर्ण मनोरथ व दुर्दैवपणाचें अरण्य चालून जाऊन राणाचे मुलखांत गेला.

---

३१. शके १६०३ कार्तिक मासी (नवंबर १६८१) अजमशाहा औरंगाबादेस आला. – जेधेशा, पृ. ३१. On Sunday, the 31st July 1681/25th Rajab, Prince Muhammad Azam got the title of Shah and was appointed to the Deccan expedition.- MiA., p. 130. News came that Muhammad Azam had left Burhanpur for Aurangabad on the 29th October/26th Sawwal, and reached the latter place on Friday, the 11th November 1681/10th Zilqada.- MiA, p. 131.

याजकरितां राणा याणी आपले घरची खराबी करून घेण्यास राजी न होतां त्या अयोग्य पुरुषास व पादशाहाचे इतराजींतील मनुष्यास, म्हणजे अकबरास, राणा यानीं आपले सरहदींत रहावयास जागा दिली नाहीं. यामुळें अकबर अति चिंताग्रस्त, खिन्न व भयभीत होऊन दक्षण देशाकडे जाण्याचा इरादा करून त्या अयोग्य पुरुषासी व बेमानासी म्हणजे महंमद अकबरासी (शिवाजी-संभाजीस) मिळाला आहे व योग्य पुत्र व किर्तीमान व श्रेष्ट योग्यतावान राजधानीचे नेत्रांतील तेज व श्रेष्ट कुलीनपणाचे व सुदैवपणाचें तेज व पादशाही दौलतीचा दीप व ऐश्वर्याचें उंच स्थानाचा ग्रह व राजधानीचे डबींतील मुक्ताफळ व श्रेष्टतेचें व योग्यतेचे बागेंतील वृक्ष व थोरपणा व ऐश्वर्यरूप बागेची शोभा व श्रेष्ठ व कुलवान व उत्तम दैववान पादशाहाजादा पृथ्वी व पृथ्वींतील राहणारे लोकांचा आधार महंमद आआजम हा पुन्हां राणा याजवर चालून गेला.[३२] राणा याणी दूरवर विचार करून नम्रतेचा मार्ग स्वीकारून पादशाहाचे पुत्राचे चाकरींत हजर झाला. गुन्हेगारीबदल दंड देण्याचें पादशाहाचे सर्व हुकूम कबूल करून राणा याणी करार केला कीं, कैलासवासी राजा जसवंतसिंग याचे बेमान व धण्यासी बदलणारे चाकर लोकांना मी आपले इलाक्यांत येऊं देणार नाहीं. असा करार केला यास्तव राणा याचे सर्व अपराध क्षमा केले व आमचें अंतःकरण इकडील कामापासून पूर्ण स्वस्थ झालें. आतां तुम्हीं बहुत फौज व भारी तोफखाना घेऊन त्या दुष्टाचा, म्हणजे सिवाचा, निर्मूळ फडशा करण्याकरितां निघावें आणि तारिख १ पहिली माहे साबान (६ आगष्ट १६८१) रोजीं इकडील फौजेचेहि तिकडे येण्याविषयीं कूच होईल.[३३] आणखी आज्ञा केली जात आहे कीं, विजापुरांतील किल्ले व मुलुख सिवाचें हातीं गेला आहे ते किल्ले सोडऊन घेणें व तो मुलुख हस्तगत करून घेण्याकरितां अशी संधी पुन्हां येणार नाहीं. तुम्ही सर्वोपरि खातरजमा व भरंवसा टेऊन सय्यदपणास आधार व शूरत्वास व धारिष्टास आश्रयभूत व सर्व विश्वासू सेवकांतील मुख्य व दौलतीचें कल्याण इछिणारांतील सारांश व युद्धांत पुढें चालून जाणारे शूरांतील श्रेष्ट असे जे खानजाहान बाहादूर नफरजंग कोकलताश यांचें समागमें राहून उभयतानें मिळोन या कामास प्रारंभ करावा. सेवेची व युद्ध करण्याची कमर बांधून, जिवाचें कमरेवर बांधून, म्हणजे युध्द करण्याविषयीं जिवादारम्य श्रम करून या सेवेंत व दौलतीचे कल्याण इछिण्यांत सुस्ती व किंचितहि अंतर न करितां ही गोष्ट आपलेस

३२. On Friday, the 9th September 1681/6th Ramzan, Shahazada Muhammad Azim was sent back to Ajmir–MiA, p. 131

३३. On Monday, the 5th September 1681/2nd Ramzan, the Emperor issued orders for his camp to be moved from Ajmer towards Burhanpur.– MiA, p. 131.

योग्यता प्राप्त होण्याचे कारण आहे असें जाणावे. स्वामीसेवेविषयीं प्राण खर्च करणें हे पादशाहाची कृपा वाढऊन घेण्याचें कारण आहे. तारिख ७ सातवी रोज ( रजब ? ) शक २४ अलमगीर पादशाहा तख्तावर बसले तो सन १०९२ एकशे ( ? हजार ) ब्रेआण्णव ( १३ जुलै १६८१ ) सालीं पत्र लिहिलें गेलें.

५९. शहरबानू बेगम उर्फ पादशाहा बिबी हिणें सैय्यद मखदूम रुस्तुमखान याजला आज्ञापत्र लिहिलें त्या आज्ञापत्राची नकल :

सैय्यदपणास व शूरत्वास आधार व धैर्य व पराक्रमास आश्रयभूत सर्व शूरांतील श्रेष्ठ रुस्तुमासारिखे योग्यतेचे सैय्यद षर्जाखान यासी पादशाहाचे कृपेंत मिश्रित असोन जाणावें कीं, ईश्वराचा स्तव, मी आपले घरापासून आपले शहरापासून दूर येऊन पडले आहे. त्या मज निराश्रितावर ईश्वरांनीं बहुत कृपा करून ठेविली आहे. तो विस्तार वर्णन करावा तर हजारों वर्षे वर्णन केलें तत्रापि वर्णिला जाणार नाहीं. याजकरितां तुम्हीं इकडील कांहीं चिंता करूं नये. स्वस्थ असावें. हली इकडील राणा हा इकडील प्रबळ फौजेच्या पराक्रमानें जेरीस येऊन पादशाहाजादा पृथ्वीस व पृथ्वींतील राहाणारास आधार व शास्वत ऐश्वर्यांचे कपाळाचें तेज व धर्माचें व मुलकाचें कपाळाचें तेज व दौलत व ऐश्वर्यांचे नेत्राचे तेज असा जो महंमद आआजम याची राणा याणी चाकरी पत्करून पादशाहाचे हुकूमाप्रमाणें गुन्हेगारीबदल ऐवज देणें कबूल केलें. आतां इकडे कांहीं एक काम राहिलें नाहीं. याजकरितां पादशाहाची आज्ञा जाहाली आहे कीं, शाहाजादा मजकूर हे दक्षण देशाकडे येतील. याजकरितां सरकारांत निश्चय ठरला आहे कीं, सरकारची फौज ही माहे साबानचे आवलीस ( आगष्ट १६८१ ) तिकडे रवाना होईल. ही फौजहि त्या बेमानाचे व अमर्याद पुरुषाचे, म्हणजे सिवाचे, पारपत्य करून परत येईल. त्यासमईं पादशाहाहि खुद जातीनें सिवाचे पारपत्यावर येत आहेत. हा अलभ्य लाभ जाणोन व पादशाहाची सेवा घडणें हाहि अलभ्य लाभच समजून आदिलशाही खानदानीचे इमानावर दृष्टी ठेऊन व मित्रतेच्या चाली तुमचे कडून प्रसिध्द व्हाव्या अशी आमची इच्छा आहे. त्याप्रमाणें तुम्हीं वर्तणूक करून आपले धण्याचे कार्यास जितकें सामर्थ्य असेल तितकें घटून सिद्दी मसऊदखानाचे समागमें व दुसरेहि कित्येक अमीरलोक व खानमंडळ याणी बहुत मजबुतीनें व एकचित्तपणानें शेवटास नेऊन स्वामीसेवेविषयीं अत्यंत यत्न करावा. कर्नाटक व दुसरे कित्येक स्थानें हातांतून गेली आहेत ते सर्व आदिलशाही दौलतीकडे हस्तगत करावे. कारण कीं, ही गोष्ट सर्वांस पसंत व कर्म ईश्वरापासी उत्तम फलदायक

होईल. पादशाहा खुद जातीनें मुल्ख घ्यावयाकरितां उज्जनीकडे गेले आहेत. त्याचे अंतःकर्णासहि संतोषास कारण होईल. आमचेहि मित्रतेचे मजबुतीस कारण होईल. तुमची मदत व साह्य करा म्हणोन पादशाहास विनंति करण्यास जागा होईल. संशय आहेत ते सर्व दूर होतील. पादशाहाचे योगानें विजापूर येथील अंतर्बाह्य-पणानें संतोषास व विश्रांतीस कारण होईल. धण्याची दौलत पालन करण्याचें तात्पर्य हें आहे कीं, या समई शत्रु तसाच कायम राहील. याजकरितां त्याचे पारपत्य करण्या-विषयीं अंतर न करितां आपले वारिसदारीचीं स्थानें घ्यावीत. ढिलाईवर व आळसावर टाकूं नये. बेमान शत्रूचे फंदफितूर व ठकबाजीकडे कान न देतां त्याचे ठकविद्येनें फसूं नये व शत्रुत्व व पराक्रम करून दाखवावा. तारिख १२ बारावी माहे रजेब ( १८ जुलै १६८१ ) अलमगीर पादशाहाचा तख्तावर बसल्याचा राजशक २४ चोवीस.

### ६०. शिकंदर पादशाहाचे राजधानींत बंदोबस्त नाहींसा जाहाला, या बखेड्याचे कारणानें मसऊदखान त्रास पावोन उदोनीस पळून जाणें प्रकर्ण :

मसऊदखान यानीं व्यंकटाद्री याजला सैय्यद मखदुम याजप्रकर्णीचे कामांत मुख्त्यार करून रवाना केला. सैय्यद मखदुम याचें अंतःकरण दुखवलें होतें. यामुळें त्रासून आपले भाऊबंद मंडळींतून निघोन जाऊन मोंगलाचा आश्रय धरून राहिला. दिलेरखानाचे हुकूमावरून उदोनीस तर्फेतील गावांची खराबी करण्याचें कामावर नेमिला गेला होता. व्यंकटाद्रीचे नीति व बोध शिकविण्यानें मित्रता सिध्धीस नेण्याचा व द्रव्यप्राप्तीचा विचार करून आपले धण्यापासी, म्हणजे आदिलशाहापासी, येऊन रुजू झाला. आपले धन्याची सेवा करणें व खाल्लेलें मिठाचें इमान जागविणें हें कर्म अक्कलवान लोकांपासी बहुत पसंत व योग्य आहे. यास्तव सैय्यद मखदूम यानीं ही चाल मजबूत धारण करून मोगलाचा आश्रय धरून राहिला होता ती मोगलाची सोबत सोडून देऊन मोगलापासून निघोन विजापुरास आला. तेव्हां मसऊदखान जोगीमठापर्यंत त्याजला सामोरे जाऊन सैय्यद मखदुम याजला शहरांत आणोन शिकंदर पादशाहा यानीं जोहरापूर बुर्जावर बसून सैय्यद मखदुम षर्जाखान याचा मुजरा घेऊन व त्याचा पादशाहा यानीं अत्यंत मेहरबानगीनें फारच सत्कार केला. त्याजला बदामीचे लढाईचे मसलतीवर नेमिला.

## ६१. सारांश :

सिद्दी मसऊदखान यानीं आदिलशाही राजधानीचा व शिकंदर आदिलशाहा पादशाहाचे कारकीर्दींतील राजधानीचा बंदोबस्त नीट राखणेंविषयीं बहुत चिंतेंत पडून आपले अकलेचे विचारानें कितीहि यत्न केला तत्रापि ईश्वराची इच्छा आदिलशाही राजधानीविषयीं विपरित झाली होती. यास्तव सर्व विचार व्यर्थ झाले. आरबी वाक्याचा अर्थ : " प्रारब्धयोग विपरित उभा राहिला म्हणजे सर्व विचार निर्फळ होतात, " असें आहे. राजधानीचे बंदोबस्ताचे दोर वोळलेले होते ते सर्व पीळ उलगडून पिंजलेले कापसाप्रमाणें होऊन, म्हणजे राजधानींतील सर्व बंदोबस्त बिघडून, बहुत बखेडा होऊन आतां पुन्हां मनोरथ सिध्ध होतील व राजधानीचा बंदोबस्त होईल अशी कांहीं एक इच्छा राहिली नाहीं. अशी उमेदहि दिसत नव्हती. येथपर्यंत बखेडा जाहाला कीं, सर्व रयत लोक व घरमंडळी वगैरे खासे लोकसुद्धां एक दिवसदेखिल गोडीनें व स्वस्थपणानें बसून अन्न खात नव्हते. पादशाहापासून रयत लोकापर्यंत एक रात्रदेखील स्वस्थपणानें विश्रांतीचे बिछान्यावर निद्रा लागत नव्हती. या पाच सहा वर्षांचे बखेड्याचे चिंतेनें व विनंतीपत्रांचे ओढाओढीनें व अनेक प्रकारचे संकटानें त्रासून शिकंदर पादशाहाचे राजधानींतील ममलकतमदारपणाचे, म्हणजे मुख्य कारभारीपणाचे, कामास कंटाळला व विजापूर येथील मुलकी कामास व मदाऊलमहामी म्हणजे मुख्य कारभारीपणाचे कामास त्रासला. या धांदलीचे समयांत सुखाचे कोपऱ्यात घुसणें व या गर्दीचे वेळेस आपला प्राण वाचविणें हाच अलभ्य लाभ समजणें, म्हणजे उदोनीचा किल्ला रक्षण करणें आणि त्या किल्यांत येऊन सर्वांचे वाइटपणापासून एकीकडे राहाणें, हें शिकंदरी दौलतीहून व सुलेमानी मुलखाहून फार चांगलें असें मसुदखान यांणी जाणलें आणि निरोपाय होऊन विजापूर येथील कारभार व हुकमी कामापासून बरतर्फी मागून व शिकंदर पादशाहाचे वजिरीचें काम सोडून देऊन उदोनीस निघोन जाणेचा मनांत निश्चय केला. कांहीं सबबींचा भाव दाखऊन मजला वतनास जाण्यास निरोप द्यावा अशी पादशाहास विनंती करून निरोप मागितला. तेव्हां शिकंदर पादशाहा मसऊदखानास निरोप देण्यास राजी नव्हता. मसऊदखान यानीं जाण्याविषयीं फारच आग्रह करून व नानाप्रकारचे बहाने करून उदोनीस जाऊन खास परत येतो असा करार करून व कुरान शरिफचे किताबाची शफत वाहून तारिख १७ सत्रावी रमजान सन एक हजार चवेरआणव ( ३० आगष्ट १६८३ ) सालीं पादशाहापासून निरोप घेऊन मसऊदखान आपले घरास आला. तारिख ११ अकरावी माहे जिल्हेज ( २० नवंबर १६८३ ) रोजीं विजापूर येथून निघोन उदोनीकडे चालता झाला. तारिख १२ बारावी माहे रबिलाखर सन एक

हजार पंचाणव (१९ मार्च १६८४) सालीं विजापूरचे राजधानीच वजिरीचीं वस्त्रें व मुल्की कारभाराचें पद घोडे रास च्यार व हती नग एक सहित पादशाहा याणी आक्का खुसरव याजला दिली. आका खुसरव यानीं हुकुमी कारभार व वजिरीचें काम आपले मनोगताप्रमाणें पुरतें केलें नव्हते व पुरतेसें सुख भोगिलें नव्हतें तोंच त्याजविसी कालचक्र कंटाळलें, म्हणजे आका खुसरव याचा दैवयोग फिरला. तारिख १२ बारावी माहे जिल्काद सन मजकुर (१२ आक्टोबर १६८४) रोजीं आका खुसरव यानीं वजिरीचें कामाचा परित्याग करून परलोकास जाता जाहाला, म्हणजे मरण पावला.

## ६२. सिद्दी मसऊदखान याजप्रकर्णी थोडेसें वर्णन :

सिद्दी मसऊदखान हा आदिलशाहाकडील मलिक अबदुल वाहब बिन मलिक रयहान याचे सेवक मंडळीपकीं होता. अबदुल वाहब मरण पावला तेव्हां मलिक अबदुल वाहब याजकडील सिद्दी जव्हार या सेवकांनीं मलिक रयहान म्हणोन अबदुल वाहब याचा पुत्र होता त्याजला कैद करून सिद्दी जवहर (जोहर) हा आपणच महंमद नूर कंदनोल (? कर्नूल) येथें अबदुल वाहब याचे ठिकाणीं कायम मुकाम होऊन आपणच साहेबजादा, म्हणजे अबदुल वाहबाचे पुत्रासारिखा, जाहाला. अमिरीचे पदवीस पावला. सिद्दी जव्हर यानीं आपली कन्या सिद्दी मसऊदखान याजला देऊन त्याजला आपला जावई करून त्याचे पालन करित होता. त्या समई सिद्दी जव्हर यानीं सलाबतखान असें पद मिळऊन पादशाहाचे हुकूमावरून पनाळ्याचे किल्यावर हल्ला करून सिवाजी भोसल्यासी युद्ध केलें. त्यासमई सिद्दी मसऊदखान यानीं त्या लढाईत बहुत पराक्रम करून अमीरीचा व खान असा किताब मिळविला. जेव्हां सिद्दी जव्हर सलाबतखान मरण पावला व सिद्दी अबदुल अजीज, म्हणोन सलाबतखानाचा पुत्र होता तो मुख्त्यार जाहाला आणि तो मसऊदखानास कैद करावे असे इछीत होता, हा अबदुल अजीज याचा इरादा अबदुल वाहेब याचे स्त्रीनें जाणोन हा अबदुल अजीज याचा इरादा मसऊद-खानास कळविला. तेव्हां मसऊदखान कांहीं लोक समागमें घेऊन कंदनोल (कर्नोल) येथून पळून जाऊन शेख इनायतुल्ला आदिलाबादी याजकडे उदोनीचे किल्याकडे गेला. तेव्हां शेख इनायतुल्ला यानीं मसऊदखान याजला किल्यावर जागा देऊन मसऊदखानासी मित्रता धारण केली. मसऊदखान यानीं थोडकेच दिवसांत उदो-नीचा किल्ला शेख इनायतुल्ला याजकडून मित्रतेनेंच हस्तगत करून या किल्यावर राहिला. हळुहळु श्रेष्ठ अमीरीचे व वजिरीचे पदवीस पावला. यद्यपि बाह्यात्कारी

स्नेह व गोड बोलून आदर तारतम्य ठेवण्यांत व मर्यादेचे चालींत बहुत उत्तम लक्षणें मसऊदखानांत होतीं व किल्याचे संरक्षणाविषयीं व हुशारी व मसलतीचे कामांत पूर्ण अभ्यास होता, परंतु मसऊदखान हा बहुत बेमान मनुष्य होता. मूर्खांचें पालन करणारा होता. मित्रमंडळीविषयीं फार संशय बाळवित होता व येथपर्यंत संशय ठेवित होता कीं, आपले स्त्रीवर व आपले पुत्रावर देखिल विश्वास ठेवित नव्हता. मसऊदखान याजमध्यें रयत पालन करण्याचें व सिपाई लोकांचा सांभाळ करण्याचें लक्षण किंचितहि नव्हतें. असल जातीचे सिपाई लोकांचा सांभाळ करून प्यादे लोकांवर सिपाईगिरीचा भरंवसा ठेवित होता तितका सिपाई लोकांवर, म्हणजे शूरांवर, भरंवसा ठेवित नव्हता. मसऊदखान याचे दौलतीचें कारकार्दीत कोणी एक देखील श्रेष्ठ मनुष्य किंवा विद्वान अथवा गुणी जन सुखी झाला नाहीं. कोणाचेच मनोरथ पूर्ण जाहाले नाहींत. जे जे समजदार लोक योग्यतेस पाऊन कामांत दखलगिरी करित होते ते सहा ग्रहस्थ होते. एक सिदी अंबर म्हणोन मसऊदखानाचा चाकर होता. उदोनीचा किल्ला व त्या किल्याचे ताब्यांतील मुलकासुद्धां तो किल्ला सिदी अंबर याचे हवालीं करून त्याजला मसऊदखान यांनीं आपलेकडील मुखत्यार केला होता. दुसरा व्यंकटाद्री मुरारी ब्राह्मण कुळकर्णी मौजे कारदिनें मामले रायचूर हा मसऊदखानाचे दौलतीचे प्रारंभी पारसीनवीस होता. हळूहळू दियानतराव याचे मित्रतेचे वसिल्यानें राजधानीचें कामांत व मसलतींत शिरोन मदारुलमहाम म्हणजे मुख्य कारभारी झाला होता. बोलण्या-चालण्यांत मसऊदखानासीं थोडा साखरेपणा ठेवीत होता. परंतु मसऊदखान याचा त्याजवर विश्वास नव्हता. या आंदेशामुळें विश्वास नव्हता कीं, न जाणो याजला दुखविलें असतां हा आपलेपासून त्रास पावोन कामाचा बखेडा करील. यास्तव तसेच कंटाळून प्रसंगास्तव मसऊदखान याच्या सल्यानें वर्तणुक करित नव्हता. तिसरा सैय्यद आका हा फार आशावान गरजवंत व आपले उपयोगावर नजर ठेवणें व बहुत द्रव्य जमा करणें या दोन गोष्टींशिवाय दुसरें कांहींच लक्षण सैय्यद आका याचे शरीरांत नव्हतें. सैय्यद खान याची स्त्री मसऊदखानाची बहीण होती. या नात्यानीं हा त्याचा मेहुणा होय. या स्त्रीचे वसिल्यानें श्रेष्ठपणास पावोन बहुत साळसूदपणानें मसऊदखानाचे लोभांत शिरला होता. चवथा महंमदखान भिस्ती याणी लहानपणापासून महंमदखान असे पद पावला होता. पांचवा हिरोजी गाडीवान हा गाडीवानीचे पदापासून जमादारीचे पदवीस पावोन दुसरेहि कामदार मंडळींत थोडासा विश्वास ठेवित होता. जेव्हां दौलतीकडील कामदारमंडळी या जमादाराचे वसिल्यानें काम करित होते तेव्हां तें काम सेवटास लागत होतें. सहावा सिवनु पिंजारी सरगोपा हा चाहाडखोरपणानें व सर्व लोकांची खराबी करण्याचे चालीनें आपले धण्यासी बहुत पसंत होऊन प्रतिवर्षी बहुतेकांची

खराबी करून निर्मूळ फडशा करून जुलूम व जबरदस्तीनें लोकापासून द्रव्य घेत होता. कित्येक चोरटे जमऊन चोऱ्याहि करित होता. या सहा असामीपरता दुसरा कोणीच मसऊदखानाचे कारकिर्दीत योग्यतेस चढला नव्हता.

## ६३. बंदोबस्त करण्याकरितां अलमगीर पादशाहाची स्वारी दक्षण देशांत येणें प्रकर्ण :

जेव्हां वर्णनाचा सिलसिल्ला येथपर्यंत येऊन पोहचला तेव्हां जरूर कारण झालें कीं, दक्षण देशांत अलमगीर पादशाहा याणी येण्याचा निश्चय ठरवावा म्हणजे आदिलशाही कारकीर्दीची समाप्ति या गोष्टीवरच आहे असें बोलणें झालें. सर्वांस जाहीर व्हावें कीं, पूर्वीहि येविषयींची सूचना सुचविलीच आहे कीं, तैमूर पादशाहाचे वंशांतील पुरुषांनीं दक्षण देश हस्तगत करण्याची आशा व विजापूर घेण्याची इच्छा धरून या गोष्टींत आयुष्य खर्च करित होते. त्यांचे मनोरथ पूर्ण झाले नाहींत. परतु अवरंगजेब बादशाहा अद्वितीय झाला होता. त्याजपासीं जमातहि बहुत होती. तैमूर पादशाहाचे वंशातील सर्व पुरुषांहून बहुधा पृथ्वींतील पादशाहांहून, श्रेष्ठ व अद्वितीय होता. सर्व लक्षणें पूर्ण व उत्तम स्वभाव ईश्वराचे सेवेचे व ईश्वरी ज्ञानाचें उपदेश करण्यात सर्वमान्य होता. या दक्षण देश हस्तगत करण्याचे व विजापूर घेण्याचे इछेंत सत्तर वर्षेपर्यंत शाहाजादगी, म्हणजे आवरंगजेब तक्तावर बसला नव्हता त्या दिवसापासून व तक्तावर बसल्यापासूनहि, सत्तर वर्षेपर्यंत आवरंगजेब याणी बहुत यत्न व विचार करून खटपट करित होता. वारंवार अगणित फौज कित्येक नामांकित सरदारांसमागमें व कित्येक फौजा शाहाजाद्यांसमागमें देऊन दक्षण देशावर पाठवित होता. रात्रंदिवस याच फिकिरींत व विचारांत राहून आपणहि खुद जातीनें चालून जाण्याचाहि खास इरादा टेवित होता. तेव्हां शेवटीं ईश्वराचे इच्छेकरून फारच चमत्कारिक निमित्य हातीं आलें. पूर्वींचा संकल्प सिध्धीस नेण्याकरिता प्रारंभ केला, म्हणजे शाहाजादा महंमद अकबर हा जन्मापासूनच अमर्याद होता. त्या शाहाजाद्यानीं बेमानपणा व फिरून पडण्याची चाल स्विकारून बापासी युद्ध करण्यास उभा राहिला. परंतु पादशाहासी युद्ध करण्याचे धैर्य ठरेनासे झाले. तेव्हा दक्षण देशाकडे जाण्याचा संकल्प करून संभाजीस जाऊन मिळून त्यासी सख्य केलें. संभाजीचा आश्रय धरून राहिला. हें वर्तमान ऐकण्यानें अलमगीर पादशाहाचे अंतःकरणांत फार भीति उत्पन्न झाली. कारण कीं, न जाणो दोघेहि बंडखोर, म्हणजे संभाजी व महंमद अकबर शाहाजादा हे उभयताहि फंदफितूर करणारे बंडखोर, जेव्हां एक झाले आहेत तेव्हा संकट उभे करतील. मग तें संकट निवारण करण्याचा विचार चालणार नाही.

याजकरितां फार जलदी करून संकट उभे राहिलें नव्हतें तोंच ते जलद निवारण केलें पाहिजे, याजकरिता बहुत जलद पादशाहा बिबीचे लग्न शाहाजादा महंमद आआजम याजसी तारिख १२ बारावी माहे रजब सन एक हजार बेआंणव (१८ जुलै १६८१) रोजीं लाऊन या लग्नाचे शुभदायक कार्यापासून मोकळे होऊन तारिख २५ पंचविसावी माहे मजकूर (३१ जुलै १६८१) रोजीं अद्यापि शाहाजादा महंमद आआजम याचे पूर्व वयच होतें त्या लहानपणाचे वयांतच महंमद आआजम या शाहाजाद्यास शाहा असा किताब व अति श्रेष्ठपणाचे पद देऊन त्याचे समागमें बहुत फौज नेमून त्या फौजेसुद्धां व बहुत तयारीनिसी दक्षण देशावर शाहाजादा महंमद अकबर या अमर्याद पुरूषाचा निर्मूळ फडशा करण्याकरितां व त्या बेमानाचे व धण्यासी फिरून पडणाराचे पारपत्य करण्याकरितां रवाना केला. तारिख ५ पांचवी माहे रमजान सन मजकुरीं (६ सप्टेंबर १६८१) रोजी अलमगीर पादशाहा खुद जातीनेंहि बहुत फौज घेऊन व बहुत सामानसरंजामाचे तयारीनिसीं अजमीर येथून निघोन आपले फौजेची श्रेष्ट ढाल, म्हणजे निशाण, दक्षण देशाकडे चालतें केलें. त्यापूर्वी थोडक्याच दिवसांत अशीच त्याजला सूचनाहि गेली कीं, पादशाहाचीं आज्ञापत्रें व पादशाहा बिबीचेंहि आज्ञापत्र विजापूर येथील कारभारी मंडळीस या मजकुराचे गेलें कीं, बेमानाचा व अमर्याद पुरुषाचा म्हणजे सिवाचा पुत्र संभाजी याणी फारच बदफैली व फंदफितुरी वगैरे गैरराहा वागणुक चालविली आहे व विजापूर इलाक्यांतील मुलखाची फारच खराबी झाली आहे. शिकंदर पादशाहाचे राजधानींत फारच बखेडा झाला आहे हें सर्व प्रकर्ण अलमगीर पादशाहाचे ऐकण्यांत आलें. याजकरितां शाहाजादा महंमद आआजम याजला बेमानाचे पुत्राचे, म्हणजे संभाचे, पारपत्य करण्याकरितां अलमगीर पादशाहा याणी हुजूरून रवाना केले आहे. सत्वरच पादशाहाहि यशस्वी फौजेसहित तिकडे येत आहेत. याजकरितां असें केलें पाहिजे कीं, आदिलशाहाकडील इमानी चाकर लोकानीं या समई ही संधि अलभ्य लाभाची जाणोन दिल्ली येथील पादशाही फौजेस कुमक करून बेमानचा पुत्र बेमान, म्हणजे सिवाचा पुत्र संभा, त्या संभाचे पारपत्य करण्याकरिता इकडील फौजेशी मिळून विजापूरचे इलाक्यांतील संपूर्ण मुलख शत्रुचे हातीं गेला आहे तो सोडवून घेऊन पुन्हा आणखी सुलतान सिकंदर पादशाहाचे राजधानीस शोभिवंत व कायम करावें. राजाधिकारीनीं अलमगीर पादशाहाचे सेवेंत व आज्ञेंत वागून तिळमात्र आज्ञा मोडून चालू नये. अशीं आज्ञापत्रें गेली होतीं. त्या पत्रांपैकीं सय्यद मखदूम षर्जाखानास आज्ञापत्रें सादर झालीं त्या दोन पत्रांच्या नकला या ग्रंथात सदरीं लिहिल्याच आहेत. अलमगीर पादशाहा याणी खास जाणिलें कीं, या प्रकारचे या नीति बोध सांगण्यानीं कांहीं एक काम होत नाहीं. विजापूर येथील कारभारी मंडळ व कामदार लोक आप-आपणांत वांकडेपणा ठेवितात. एकमेकांशी बिघडून राजधानीचे बंदोबस्त व संरक्षणा-

विषयी कांहीं एक यत्न करित नाहीत. बदफैलीनें वागणाराचा पुत्र, म्हणजे सिवाचा पुत्र संभा, त्या संभासीं सामील झाल्याशिवाय रहात नाहींत. फंदफितुर करणारा संभाहि बदफैलीने वागणें सोडून देऊन पादशाहाचे चाकरींत व आज्ञेत राहण्याचा मार्ग धरीत नाहीं. बदफैलीने अधिक अधिकच वर्तणूक करून मुर्वास, म्हणजे शाहाजादा महंमद अकबरासहि, आश्रय देऊन संकट उभीं करण्याचें विचारांत आहे. ही गोष्ट सोडणें म्हणजे संकट निवारण करणें. आपण खुद्द जातीनें दक्षिण देशांत चालून गेल्याशिवाय केवळ फौजा रवाना करण्यानें व्हावयाचे नाहीं. आदिलशाही व कुतुबशाही राजधानी निजामशाही राजधानी प्रमाणें बुडविणें आणि आपण खुद्द दक्षिण देशाचे राजधानीवर मालक होऊन प्रबळ होणें हे पूर्वीपासूनच अलमगीर पादशहाचे मनांत होतें. दक्षिण देशाकडे चालून जाण्याचा इरादा ठरवून दक्षिण देशाकडे ढाल उभी करून तारिख १२ बारावी माहे जिल्काद सन मजकूर (१३ नवंबर १६८१) रोजी अलमगीर पादशहाची स्वारी बुऱ्हाणपूर शहरास येऊन दाखल झाली.[३४] त्या शहरात चार महिने राहिल्यानंतर माहे रबिलावलचे महिन्यांत (मार्च १६८२) बऱ्हाणपूर येथून निघून[३५] खुजिस्तेबुनयाद, म्हणजे हैदराबादेकडे (औरंगाबादेकडे) जाण्यास कूच केलें. हैदराबाद (औरंगाबाद) येथे सात आठ महिने राहून नंतर तारिख १ पहिली माहे जिलकाद साल-गुतस्द रोजी (२२ आक्टोबर १६८२) हैद्राबाद (औरंगाबाद) येथून निघोन अलमगीर पादशाहाची स्वारी अहमदनगर येथे येऊन दाखल झाली.[३६] सन एक हजार चवऱ्याण्णव सालींचे अवधीस अलमगीर पादशाहाचें लष्कर व संभाजीची फौज या उभयतां लष्करांत आलमालचे नजिक लढाई झाली. अलमगीर पादशाहाकडील हसन अल्लीखान त्या लढाईत जखमी झाला आणि बहुत मनुष्यें ठार झालीं. संभाजीकडील फत्ते झाली.[३७] याच सालीं हुसेनखान पठाण सरहादी येथून कृष्णा नदीचे किनाऱ्या-

३४. शके १६०३ पौष मासी क्षय संवछरामध्ये (नवंबर १६८१) औरंगजेब बुऱ्हाणपुरास आला.– जेधेश, पृ. ३१, On Sunday, the 13th November 1631 / 12th Zilqada, the Emperor reached Burhanpur.–MiA, p.132.

३५. He (Emperor) started from Burhapur on the 28th February 1682 / 1st Rabilawal.– MiA, p. 133. On Wednesday, the 22nd March 1682 / 23rd Muharram (? should be Rabilawal), the Emperor reached the palace of Aurangabad.– MiA, p. 134.

३६. On Friday, the 12th October 1683 / 1st Zilqada, the Emperor reached Karnpura,.... On Tuesday the 13th November 1683 / 3rd Zilhijja, the Emperor arrived at the earthaen fort of Ahmednagar. – MiA. p. 1;6.

३७. शके १६०३ माघ मासी (जानेवारी १६८२) हसन अल्लीखान कल्याण भिवंडी जाळून फिरोन गेला. जेधेश, पृ. ३१.

पासून षर्जाखानाचे फौजेंतून फुटोन मोंगलाचे फौजेंत जाऊन मिळाला. तेथून औरंगाबादकडे निघोन अलमगीर पादशाहाचे सेवेंत जाऊन हजर होऊन पांच हजारी असें पदक व फतेजंगखान असा किताब हुसेनखान याजला मिळाला. मीर शाहाबुद्दीन-खान यानी लढाईत बंडखोर शत्रूशी पराक्रम केला.[३८] त्या सेवेबदल शाहाबुद्दीनखान याजला गाजीउद्दीनखान असा किताब प्राप्त होऊन पुण्याकडे जाण्यास निरोप घेतला.[३९] तारिख सातवी माहे रमजान (२० आगष्ट १६८३) रोजीं याच सालीं शाहाजादा महंमद आआजम हा पुन्हां विजापुरचे बंदोबस्तावर नेमिला गेला.[४०] तारिख ३ तिसरी माहे सवाल ( १५ सप्टेंबर १६८३ ) रोजी शाहाजादा याजला पादशाहा यार्णी संभाजीचे पारपत्य करण्याकरितां व कोंकणचा मुलूख खराब करण्याकरितां निरोप दिल्हा.[४१] तेव्हां शाहा अलम हा करमाळे राजघाटाचें मार्गानें जाऊन कोकणांत दाखल

---

३८. शके १६०४ चैत्र मासी ( एप्रिल १६८२ ) शाहाबुद्दीनखान येऊन रामसेजेस वेढा घातला. वैशाख मासी ( मे १६८२ ) रूपाजी भोसले व मानाजी मोरे जाऊन शाहादीखानासी गणेश गांवापासी भांडण केलें. पाचसें घोडीं पाडाव केलीं. त्यावर आश्विन मासी ( आक्टोबर १६८२ ) रामसेजेचा वेढा उठला. जेधेश, पृ. ३२.

३९. शके १६०५ कार्तिक मासी (आक्टोबर–नवंबर १६८३ ) शाहादीखान पुणियांत येऊन बैसला.– जेधेश. पृ- ३२. पौश वद्य ४ ( २७ दिसेंबर १६८३ ) शाहादीखान देवघाटे उतरोन निजामपूर मारिलें.– जेधेश, पृ. ३२–३३.

४०. शके १६०४ माघ मासी ( जानेवारी–फेब्रुवारी १६८३ ) सुलतान अजमशाहा येऊन कोल्हापुरा पावेतों धाविला. त्यास हंबिररायानीं फिराऊन भवरे पलीकडे लाविलें. – जेधेश, पृ. ३२.

४१. शके १६०५ पौश वद्य ५ ( २८ दिसेंबर १६८३ ) शाहा अलम रामघाटे उतरोन कुडाल व बांदे जाळून घाटावरी फालगुण शुध्द पौर्णिमेस ( २० फेब्रुवारी १६८४ ) गेला. लष्कर फार मेले.–जेधेश, पृ. ३२. शके १६०६ वैशाख मासी ( एप्रिल १६८४ ) शाहा अलम विजापुराजवळ शेक्स म्हणून गांव आहे तेथें बैसला. –जेधेश, पृ ३३. On the 15th September 1683 / 3rd Shawwal, as commanded by His Majesty, the advance tents of Shah Alam Bahadur came out of Aurangabad, playing sweat music with the object of exterpating the enemy in the direction of Konkan and Ramdarah and other lands of the Marathas.- MiA, p. 145. On Sunday, the 18th May 1684 / 13th Jamadassani, Shah Alam Bahadur ( returned ) from the Konkan, had audience, and received a robe and jewels worth 3 lakhs and 90,000 rupees. His sons got robes and jewels.– MiA, p. 149.

होऊन शाहा आलम यांनी कोंकणचा मुलख लुटालूट करण्यांत व तिकडील लोक पकडून कैद करणें व मोठमोठी वसुलाची झाडें एकंदर तोडून खराबी करणें व तिकडील किल्ले हस्तगत करण्यांत किंचितहीं अंतर केलें नाहीं. गोव्याचे बंदरासन्मुख हवेली आहे या हवेलीकडून सर करीत करीत मकोव्याचे बंदरास गेला व तेथून साष्टीचे बंदरास जाऊन पोहचून तिकडील सर्व मुलूख लुटून निखालस ५डशा केला. शाहाजादा याजकडील नेमिलेले फौजेत खाण्यापिण्याचे सामान नाहीसें झालें व वाटा बंद झाल्यावर रसद येण्याजाण्याचा मार्ग बंद झाला व संभाचे गर्दीचे व वाटमारेपणाचे व त्याजकडील कामदार पेंढारी याचे लुटालुटीचे कारणानें विजापुराकडून कांही एक मदत किंवा साह्य नाहींसें झालें. विजापुरचे लोक संभास सामिल व मिलाफी होऊन संभास बळ देत होते. या कारणानें मोठा हरएक जिनसांविषयीं दुष्काळ पडला व बहुत कठीण प्रसंग प्राप्त झाला. जनावरें उपाशीं मरू लागलीं. कैली जिन्नस निखालस नाहींसा झाला. यामुळें या फौजेंतील लोकांनीं बहुत संकट भोगिलें.[४१] तेव्हां त्या लोकांना परत येण्याविषयीं हुकूम झाला व शाहाजादा महंमद आआजम याजला विजापुरातर्फे मुलूख लुटण्याकरितां बहुत फौजेसुद्धां पादशाहा याणी नेमिला होता,[४२] त्या शाहाजाद्यानीं पादशाहाचे आज्ञेवरून तिकडील सर्व मुलुख लुटून धारवाडच्या किल्यावर हल्ला करून कित्येक दिवसांत तो किल्ला घेऊन फत्ते करून माघारा परतला होता.

## ६४. मसऊदखान उदोनीस निघोन गेल्यावर विजापूर येथील बाकीचें वर्तमान प्रकर्ण :

रिख ६ सहावी माहे मोहरम सन एक हजार पंचाण्णव (१५ दिसेंबर १६८३) रोजी सिकंदर पादशाहाचे चाकरीस आका खुसरव तयार झाला. तारिख २९ एकुणतीसावी माहे मजकूर (७ जानेवारी १६८४) रोजीं पादशाहा आका खुसरव याची मेजवानी घेण्यास गेले. तेथून नवाब अबदुल रौफखान व जमषीदखान या उभयतांस सामोरे जाऊन त्यांचा मुजरा व सलाम घेऊन त्यांजला घरास जाण्यास निरोप दिला. तारिख ६ सहावी माहे सफर (१४ जानेवारी १६८४) रोजीं सर सरनोबतीचे पद सिद्दी सालम याजला दिल्हे. याच दिवसांत बहादूरखान पठाण आकलूज येथून येऊन चाकरीस राहिला व रबिलावलचे महिन्यांत (फेब्रुवारी १६८४) मीरान अफजलखान व सय्यद आलम हे उभयतां उदोनी येथून चाकरीवर हजर झाले. तारिख १२ बारावी माहे मजकूर (१८ फेब्रुवारी

४२. On Monday, the 20th Ougust 1663 / 7th Ramzan, Muhammad Azam Shah was sent on the Bijapur expedition. MiA, p. 144.

१६८४ रोजीं याकूत याजला हवालदारीचा हुद्दा दिला. तारिख २६ सविसावी (३ मार्च १६८४) रोजीं सय्यद मखदुम मुल्कांचे बंदोबस्ताकरिता निरोप घेऊन रवाना झाला. तारिख २७ सत्ताविसावि (४ मार्च १६८४) रोजीं पादशाहा यानी बुर्जावर येऊन पाम नाईक याजकडील लोकांचा मुजरा व सलाम घेतला. तारिख ७ सातवी रबिलावलरवर (१४ मार्च १६८४) रोजीं सर्फराजखान कैद झाले. त्यांचा पुत्र येऊन चाकरीस राहिला. तारिख ९ नववी (१६ मार्च १६८४) रोजीं सालगीरयाचे, म्हणजे जन्मास आल्याचे वाढदिवसाचे कचेरींत समारंभ झाला व तारिख १२ बारा माहे मजकूर (१९ मार्च १६८४) रोजीं आका खुसरव याजला हुकुमी कामाचें व वजिरीचें पद व वस्त्रासुद्धा व पागांटें व चादर व चार घोडे व एक हतीसहित दिल्हे.

## ६५. अलमगीर पादशाहाकडून शिकंदर पादशाहास आज्ञापत्र आलें त्याची नकल :

तारिख २३ तेविसावी (३० मार्च १६८४) रोजीं अलमगीर पादशाहाकडून आज्ञापत्र व पोषाख आला होता. तो घेण्याकरितां आरखऱ्यापर्यंत पादशाहाची स्वारी जाऊन पादशाहा याणी तें आज्ञापत्र व पोशाख घेतला. हें आज्ञापत्र कित्येक हुकुमाचे कलमबंदीचे होतें. तीं कलमें :

१) स्वारी खर्च व रसद कांहीं एक सबब न सांगता पोहचविणें.

२) आपले मुलकांतून फौजेचा व रसद येण्याजाण्याचा मार्ग मोकळा ठेवणें.

३) कारण पडेल तेव्हां इकडील, म्हणजे दिल्लीकडील, यशस्वी फौजेची मदत करणें.

४) शाहाजाद्याचे व इकडील नामांकित सरदार मंडळींचे मदतीस पांचसहा हजार स्वार नेमणें.

५) संभाची मित्रता व सख्य बाह्यात्कारी व अंतर्यामीकरून सोडून देणें व सर्वांनीं एक दिल होऊन संभाचा निर्मूळ फडशा करण्याकरितां विचार करणें.

६) पर्जाखान याजला जागा न देणे. त्याजला आपले मुलकांतून घालऊन देणें.

येणेंप्रमाणें अलमगीर पादशाहाचे आज्ञापत्रांतील मजकूर समाप्त झाला. तारिख ११ वी जमादिलावल (१७ एप्रिल १६८४) रोजीं पादशाहाची स्वारी शाहापुर हौदापर्यंत जाऊन शाहाजादा शाहा अलम याजकडून निशाण आलेलें घेतलें. शाहा अलम याणी हें निशाण पाठविलें. त्यांतील तात्पर्य हें आहे कीं, आदिलशाहास पूर्ण दिलभरंवसा दिला होता. येणें करून आदिलशाहास दिलभरंवसा व अधिक अधिक आवडी उत्पन्न होत होती. तारिख २२ बेवीसावी माहे जमादिलखर (२८ मे १६८४)

रोजी नवाब मुजफरजंग बहादूरखान याजकडील लोकांनी मंगळवेढे व सांगोले या दोन गावचे ताब्यांतील मुलुख घेतला.

## ६६. शिकंदर पादशाहाकडून अलमगीर पादशाहास उत्तर गेले त्याची नकल :

शिकंदर पादशाहा यासी अलमगीर पादशाहाचे आज्ञापत्रांचे उत्तर अलमगीर पादशाहाचे पत्रांत हुकूमाची कलमें होती तितके कलमाचें जाब लिहून त्या विषयीचे एक विनंती पत्र लिहिलें. त्या विनंती पत्रांत कित्येक मजकुराची कलमें आहेत. या विनंतीपत्रांतील सारांश हा आहे, विनंतीपत्रांतील कलमे बिा.

१) पूर्वी दिलेरखान वगैरे यांजकडून नजरेचा ऐवज घेतला आहे तो माफ करून आपले आज्ञापत्राप्रमाणें मेहरबानी करण्यांत यावी.

२) षर्जाखान याजला आपले आज्ञेप्रमाणें विजापूर येथून घालवून देऊ तर षर्जाखान हा येथून खिन्न होऊन निराशपणें निघोन जाऊन बेमानाचा पुत्र बेमान, म्हणजे संभाजीकडे जाऊन, त्यासी खास सख्य करील. या करण्यांत बहुत संकटे उभी राहतील असे वाटतें. याजकरितां मज सेवकाची ही विनंती आहे कीं, षर्जाखानाचे अपराध क्षमा करण्यांत यावे, म्हणजे षर्जाखान यास पूर्ण दिलभरंवसा देऊन व त्याजकडून करारमदार ठरवून घेऊन षर्जाखानाचे समागमें बहूत फौज देऊन छिनाल हिंदूचे, म्हणजे संभाजीचे, पारपत्यावर त्याजला रवाना करून आपले सेवेंत षर्जाखानास तत्पर ठेऊन निमकहराम, म्हणजे ज्यांचे मीठ ग्वावें त्यावरच बदलणारा असा जो बेमान, हिंदू वाईटपणाचे म्हणजे संभाजीचे पारपत्य करून त्याचे हातून मुलूख सोडऊन सरकारास येऊन मुजरा करील. यास्तव माझी विनंती ही आहे कीं, षर्जाखानाची बायकामुलें व त्याचे निसबतीचे लोक मजकडे पाठवावे. म्हणजे मग षर्जाखानाचे चित्तास पूर्ण भरंवसा येईल आणि सरकारचे चाकरींत बहुत संतोषानें यत्न करूं लागेल व लढाई करील.

३) षर्जाखानाचे जाहगिरीचा मुलूख होता तो आपले दौलतीकडे गेला आहे. हलींहि मंगळवेढे व सांगोले हे दोन मोठे गांव या गांवचे ताब्यातील एकंदर मुलुख नविनच नवाब बहादूरखान यानी घेतला आहे. तो मुलुख हे सर्व पुर्ववत या सेवकाचे म्हणजे माझे हवाली व्हावे.

४) पादशाही फौजा व शहाजाद्याकडील व अमीर व वजीर लोकांकडील फौजा माझे मुलुखातून उठऊन नेऊन ठाणीं बसऊन संकट उभे केलें आहे ती एकंदर ठाणीं

उठवावीत. तेव्हां एकंदर शहरांतील व गांवोगावचे राहणारे लोक सुखानें संसार करित जातील.

५) माझे मुलखांतील वसूलाचा ऐवज आपले दौलतीकडील खर्चाकडे आला आहे. तो ऐवज माझा मजला देवविण्यांत यावा व तो आला म्हणजे सिपाई वगैरे लोकांस देऊन छिनाल हिंदूचे, म्हणजे संभाचे, पारिपत्य करवीन.

६) पादशाही फौजा व शाहाजाद्याकडील अमीर व वजीर लोक यांजकडील फौजेनें पुणें व चाकणच्या मार्गानें शत्रूवर चालून जावें. त्याना लुटालूट करावी. मजकडील फौजा मिरज व गदक व लक्ष्मीश्वरचे मार्गानीं येऊन शत्रुची खराबी करतील.

७) मजकडून जेव्हां आपले फौजेस मदत होईल तेव्हां मी आपले कृपेस पात्र होईन.

८) माझे इलाक्यांतील मुलुख हिंदु शत्रूचे म्हणजे संभाचे, हातीं गेला आहे. तो मुलुख आपले व शहाजांद्याचे फौजेच्या पराक्रमानें शत्रूच्या हातून जितका सुटेल तितका माझा मजकडे कृपा करून देवविण्यांत यावा.

९) जर करितां बेमान हिंदू, म्हणजे संभाजी, आपणास शरण येईल व सेवकपणा धारण करील तेव्हां त्यासी सख्य होईल. याजकरितां माझी विनंती ही आहे कीं, आधी माझा मुलुख त्याजकडून घेऊन व तो मुलूख माझा मजकडे देवविण्यांत येवून नंतर संभाजीसी सख्य व्हावें

१०) छिनाल हिंदूचें, म्हणजे संभाजीचें, पारिपत्य करण्याचें काम शेवटास गेल्यानंतर पादशाही फौजेपासून व शाहाजाद्याचे व अमीर लोकांचे फौजेकडून कोणतेहि प्रकारें माझे मुलखांत लढाई होऊं नये.

अलमगीर पादशाहाचे आज्ञापत्रांचें उतर देण्याकरितां शिकंदर आदिलशाहा पादशाहा याणी दहा कलमांचे विनंतिपत्र लिहीलें. त्या विनंतीपत्राचा मजकूर येथून समाप्त झाला.

तारिख १६ सोळावी (२२ म १६८४) रोजीं सय्यद मखदूम व पाम नाईक याचे मसलतीचें काम शाहा इब्राहीम याचे हवालीं झालें. तारिख २६ सविसावी (१ जून १६८४) रोजीं शाहाजादा शाहा अलम बहादूर कोकणांतून निघोन बंदरीहून कूच करून तिकोट्याचे मार्गानें हुजूर येण्यास निघाला. अहमदनगर येथें तिर्थरूपाचें, म्हणजे अलमगीर पादशाहाचे, सेवेंत हजर होऊन श्रेष्टता पावता झाला, म्हणजे बापास भेटला.[४२] याच दिवसांत अलमगीर पादशाहास उगाच बाह्यात्कारीं शिकंदर पादशाहासी मित्रतेचा भाव दाखविण्याचे कारण होतें. ह्या कारणास्तव कीं बहुत दिवस लागले व आज्ञापत्रांत हुकुमाची कलमें लिहिलीं होतीं त्यापैकीं एकहि कलम आदिलशाहाकडून घडून येत नाहीं. रसदहि येऊन पोहोचली नाहीं. कुमकेस फौजेची जमातहि आली नाहीं. तेव्हां यांत कांहीं तरी फितूर व वांकडेपणा आहे असें जाणोन दिवसेंदिवस अलमगीर

पादशाहास त्रासाचीं व वांकडेपणाचीं कारणें अधिक अधिकच वाढलीं. शत्रुत्व व अदावत अधिक अधिकच वाढली. आदिलशाहाची मित्रता व सख्य संभाजीसीं आहे व आदिलशाहा संभाजीचा पक्षपात करतो असा संशय अलमगीर पादशाहास खास आला. तेव्हां अलमगीर पादशाहा याणी अत्यंत क्रोधायमान होऊन आदिलशाहाचे मुलखांत ठाणीं बसविण्याविसीं हुकूम दिला.[४३] तेव्हां सदरहू मुलखात ठाणे बसविण्यास प्रारंभ झाला. सय्यद मखदूम याजकडील लोकांस गोव्याचे किल्यावर जालेहालचे नजीक ठाणें बसविण्यावर नेमून लढाऊ फौजेसहित लष्करचे लोकांसी युद्धास प्रारंभ जाहाला. त्या लढाईत युसुफशाहा ठार झाला. बहूत मनुष्यें ठार व जखमी झालीं. सय्यद मखदूम याजकडील लोकांचा मोड झाला. तारिख १५ पंधरावी माहे रजब (१९ जून १६८४) रोजीं पादशाही महालाकडील व पादशाहापुरची पेठ व जोहरापूर येथील सरहद्देवर व सरखेलीचे म्हणजे मुखत्यारीचें काम चिंतो त्रिमणाजी याचे हवालीं झाले. तारिख २९ एकूणतीस माहे रजब (३ जुलै १६८४) रोजीं आदिलशाहा पादशाहाची स्वारी शाहापुरापर्यंत जाऊन शाहाजादा आआजम याजकडून वस्त्रे आलीं होती तीं घेतलीं. तारिख २७ सत्ताविसावी माहे साबान (३१ जुलै १६८४) रोजीं शाहा हजरत याजला सला व मसलत विचारणें करितां हैदराबादेकडे रवाना केला. तारिख २ दुसरी माहे रमजान (४ आगष्ट १६८४) रोजीं शाहा हजरत कादरी याजला सला व मसलत विचारणें-करितां मसऊदखानाकडे उदोनीस रवाना केलें. तारिख ५ पाचवी माहे रमजान (७ आगष्ट १६८४) रोजीं नवाब अबदुल रौफखान याणी शाहाजादा आआजमशाहा याचे कुमकेकरितां आपेल हवेलींतून निघोन अफजलखानाचे हावदावर येऊन उतरला. तारिख २० विसावी माहे रमजान (२२ आगष्ट १६८४) रोजीं सिकंदर पादशाहाची स्वारी मलिक गुलजार याचें घरीं जाऊन पादशाहानीं मलिक गुलजार याजला बहुत दिलभरंवसा देऊन आसार शरिफ, म्हणंजे हजरत पैगंबर, याचे केशाचा डबा आसार महालांत आहे तो समागमें घेऊन हमेषा दरबारांत येत जात जावें अशी त्याजला परवानगी दिल्ही. त्याच दिवसांत शाहाजादा महंमद आआजम याजकडून निशाण आलें. त्या निशाणास शाहापुरापर्यंत सिकंदर पादशाहाची स्वारी सामोरी जाऊन तें निशाण घेतलें. आका खुसरव याणी वजिरीचे काम सात महिनेच करून त्या वजिरीचे कामाचे आका खुसरव याचें मनोरथ पूर्ण झालें नव्हतें तोंच आका खुसरव तारिख १३ तेरावी माहे जिल्काद सन १०९५ एक हजार पंचाणव ( १३ आक्टोबर १६८४) रोजीं मृत्यूलोकाचा परित्याग करून परलोकास जाता झाला, म्हणजे मरण पावला. तारिख २६ सव्विसावी माहे जिल्काद ( २६ आक्टोबर १६८४ ) रोजीं सिकंदर पादशाहास कन्या झाली. तारिख १ पहिली माहे जिल्हेज ( ३० आक्टोबर १६८४)

४३. शके १६०६ जेष्ठपूर्व ( मे १६८४ ) विजापुरकरांनीं मोंगलासी बिघाड केला. – जंधेश, पृ. ३३.

रोजीं सुलतान महंमद शाहाजादा जन्मास आला. याच दिवसांत राजधानीचा बंदोबस्त निखालस नाहींसा झाला. दौलतीकडील एकंदर कामाचा बखेडा झाल्याकारणास्तव दरबारांतील कारभारी मंडळास आतां पुढें कांही एक चांगलें होत नाहीं अशी नाउमेदीची, म्हणजे निराशेची, दशा दिसोन येत होती. मोंगल, म्हणजे अलमगीर पादशाहा, याणी ठकविद्येचा पाश पसरून पक्षी फाशांत धरितात त्याप्रमाणें हरएक मनुष्यास आपले कांडींत आणण्याचा विचार चालविला. पाम नाईक देखिल जसा दाण्यास भुकेला पक्षी पाशांत सांपडला जातो त्याप्रमाणें मोगलासी फितून अलमगीर पादशाहाचे सेवेंत जाऊन रहाण्यास तयार होऊन, म्हणजे पादशाहाकडे जाऊन, पादशाहाचे कृपेंकरून बहुत सत्कार पावोन पाच हजारी असें पद पाम नाईक याजला प्राप्त झालें. तारिख १२ बारावी माहे मोहरम सन १०९६ एक हजार शाहाण्णव ( ९ दिसेंबर १६८४ ) रोजीं शाहा हजरत हैदराबाद येथून परत आला. तारिख ६ सहावी माहे सफर ( २ जानेवारी १६८५ ) रोजीं षर्जाखान जिल्हेदारीचे मुलकाचे बंदोबस्ताचे कामावरून विजापुरास परत आला. तारिख १३ तेरावी (९ जानेवारी १६८५) रोजीं सालीमखान निरोप घेऊन तोरगलास गेला. तारिख १८ अठरावी ( १४ जानेवारी १६८५) रोजीं शाहा हजरत कादरी उदोनीहून परत आले. मसऊदखानाकडून बहुत आस्थापूर्वक व अति उत्तमपणानें पूर्ववत कुतुबशाहासी मित्रतेचा राबता टेवावा व कुतुबशाहासी फारच सख्य राखावें असा शाहा हजरत याणी निरोप पोहचविला. तारिख २० विसावी (१६ जानेवारी १६८५) रोजीं मसऊदखानाचा पुत्राहि या प्रकर्णाचा निश्चय ठरविण्याकरितां उदोनी येथून आला. याच दिवसांत शाहाजादा आआजम याजकडील फौजा आदिलशाहाचे मुल्कांत ठाणीं बसविण्याकरितां निघोन तोरगलचे नजिक येऊन पोहचल्या. तेव्हां षर्जाखान व अबदुल रौफखान हे उभयतां तोरगलची मदत व कुमक करण्याकरितां निघोन आआजमशाहाकडील फौजेसी युद्ध करण्याकरितां त्या फौजेच्या मोकाबल्यावर कायम राहिले. षर्जाखान व अबदुल रौफखान हे उभयतां शाहाजाद्याकडील फौजेचे मोकाबल्यावर युद्ध करण्याकरितां उभे राहून या उभयतांनीं आपलेकडील फौजेच्या ओळी बांधिल्या.[४४] या कारणास्तव अलमगीर पादशाहा अत्यंत क्रोधायमान होऊन हल्ला करण्याचे व मोरचे कायम करण्याचे व फौज उभी राहण्याकरितां चर खणोन व भुयार खणून विजापुरापर्यंत पोहचविणेंचे तयारींत निमग्न जाहाले. येविपर्यीचा पूर्ण इरादा करिते जाहाले. अबदुल हसन कुतुबशाहा याजला शिकंदर पादशाहाची निखालस मित्रता सोडून देणें व आदिलशाहा यास कांहीं एक मदत न करणें अशी बहुत जरबेची आज्ञापत्रें पाठविलीं. कुतुबशाहा व आदिलशाहा याणी

४४. (April 1685) Sharza Bijapuri boldly advanced towards the army of Muhamad Azam Shah on the bank of Tungabhadra river. After a severe fight and losing many men, fled.-MiA, p.156.

परस्परें एकमेकांचे साह्य करण्याची पूर्वीपासून वहिवाट होती ती अलमगीर पादशाहा याणी मना केली. विजापूरचे लोकांना मदत व कुमक न करणेंविषयीं कुतुबशाहास फारच जरबदार साफ ताकीद केली. त्या तारखेपासून अलमगीर पादशाहाकडोन आदिलशाहास पत्र येण्याजाण्याचा पाठ व हुकुम व सूचना व जासूद व निरोपसुद्धां येण्याची चाल निखालस बंद झाली. अलमगीर पादशाहा व आदिलशाहा या उभयतांत फारेच वांकडेपणा व वैर उत्पन्न झालें. फंदफितुर वगैरे संकटें आजपर्यंत तोंडावर रजई घेऊन निजलीं होती त्या संकटांस जागृत होण्याचा प्रातःकाळ जाहाला, म्हणजे आज-पर्यंत संकटें विजलीं होती तीं पुन्हां उभी राहिलीं. लढाईच्या दंग्यास बाजाराचा दिवस आला, म्हणजे फार गर्दी होण्याचा समय आला. तारिख २७ सताविसावी माहे रबिलावल (२२ फेब्रुवारी १६८५) रोजीं मेलगिरी पंडित संभाजीचा दिवाण हा राहेर येथून येऊन जोगी मठानजिक येऊन उतरला. तारिख १ माहे रबिलाखर (२५ फेब्रुवारी १६८५) रोजीं सिकंदर पादशाहा जोहरापूरचे बुर्जावर येऊन बसले. संभाजीकडील सरदारलोक पादशाहास मुजरा करण्याकरितां तयार होऊन आले. सर्वांनी मुजरे केले. संभाजीकडील मेलगिरी पंडित दिवाण याजला पादशाहानीं मोआतेमदखाव असा किताब दिला.[४५] तारिख ३ तिसरी माहे जमादिलावल रोज रविवार सन एक हजार शाहाणव १०९६ (२९ मार्च १६८५) रोजीं मोगलाकडील वकील खाज्या अबदुल रहीम याजसीं लढाई सुरू झाली[४६] व त्याचे मदतीस फौज येऊन पोहचली. तारिख ४ चवथी माहे मजकूर (३० मार्च १६८५) रोजी नवाब बहादूरखानाचा पुत्र विजापुरावर हल्ला करण्याकरितां दौलतपुराकडे व राजमहंमद याचे तक्यांत येऊन किल्यावर हला करून पुन्हां परत गेला. तारिख ७ सातवी (२ एप्रिल १६८५) रोजीं रुहुल्लाहखान बक्षी शाहापुरांत येऊन पोहचला.[४७] विजापुरचे किल्यावर लढाई व हल्ला केला. तारिख २१ एकविसावी माहे जमादिलाखर रोज शुक्रवार (१५ मे १६८५) रोजीं खानजहान बहादूर हे रंगाऱ्याचे तलावावर येऊन उतरले.[४८] याच

४५. शके १६०७ आषाढ मासी (जून–जुलै १६८५) संभाजी राजे याणी विजा-पूरचे मदतीस कबजीस पाठविलें. ते जाऊन पन्हाळा राहून फौजा रवाना केल्या. – जेधेश, पृ. ३३.

४६. शके १६०७ (? चैत्र मासी) मार्च १६८५ रहिमखान बाबुरखान रणमस्तखान येऊन विजापुरास वेढा घातला. –जेधेश, पृ. ३३.

४७. On Monday, the 16th March 1685/20 Rabi. S., Ruhullah Khan was sent to punish the enemy near Bijapur.–MiA, p. 155.

४८. The Emperor learnt that on Friday, 27th March 1685/2nd Jama. S., the siege of Bijapore had begun. Khan Jahan Bahadur Zafar Jang had begun to dig entrenchments from the side of

दिवसांत शिकंदर पादशाहा याणी आपलेकडील संभावित व विश्वासू लोकांस उदोनीस पाठऊन मसऊदखान याजला पूर्ण आवडीनें अत्यंत इच्छेने आपलेकडे बोलाविले. या गर्दीचे संकटाचे समई ही राजधानी कायम रहावी व ही दौलत शाश्वत असावी याजकरितां येविषयीं तुम्ही मदत करावी व वळ द्यावें असा त्याजला निरोप सांगून पाठविला. तसेंच हें आज्ञापत्र मसऊदखान यास पाठविलें.

## ६७. शिकंदर पादशाहा याणी सिद्दी मसऊदखान याजकडे आज्ञापत्र पाठविलें त्या आज्ञापत्राची नकल :

जेव्हां तुम्ही संभावित व विश्वासू व मित्र समुदायांतील मुख्याचे सरदार आहांत, हैदराबाद प्रकर्णी कित्येक मोकदमे शाहा हजरत कादरी यांजला ते मोकदमे शेवटास नेण्याविषयीं तुम्हीं सांगितले होतें ते एकंदर बारिक मजकूर शाहा हजरत याणी हैद्राबादेस जाऊन जाहीर केले. ते बहुत पसंत आले. याजकरितां तुम्हीं सत्य जाणावें कीं, शाहा हजरत याणी जसें लिहून पाठविलें आहे त्याप्रमाणें ते सर्व मोकदमे शाहा हजरत याणी सिध्धीस नेण्यास त्या कामाचा सर्व भरंवसा सर्व कल्याण इच्छिणारांतील व पूर्ण सामर्थ्यवानांतील तुम्ही निवडक आहांत. यास्तव तुम्हावर सोपला आहे. तुम्ही त्याहून अधिक त्या कामाची मुख्त्यारी आपले हातीं आणून ती सर्व कामें शेवटास लावावी या कामाप्रकर्णी शाहा हजरत जे लिहितील तीच आमची आज्ञा व दस्तऐवज असें जाणोन तें काम फार जरुरीचें असें ओळखावे. या दिवसांत बाहादूरखानाचा पुत्र व रुहुल्लाहखान वगैरे याणी खोटा संकल्प व वाईट इरादा मनांत आणोन विजापुरासंनिध येऊन उतरून किल्यावर हल्ला करून लढाई करित आहेत. या समई दौलतीचे सर्व कल्याण इच्छिणारांस व तुम्हास तर अवश्यच आहे कीं, दौलतीचें कल्याण इछिणें व अंतर्यामींचा सेवकपणा जाहीर करून जन्मवर कीर्ति मिळवावी. सर्वांस प्रसिध्द आहे कीं, या राजधानीचें संरक्षण करणें, तुम्ही राजधानीचे आधार सबब, तुम्हासच प्राप्त आहे. यास्तव हें आज्ञापत्र येऊन पोहचतांच तुम्ही हुजूर येऊन पोहचावे आणि तुम्हास जसें समजेल व तुम्ही जसें करूं शकाल तसें या राजधानीचे संरक्षण करावें. कारण कीं, सर्व कामाची मुख्त्यारी तुम्हांवरच आम्ही सोपवली आहे असें सत्य जाणोन अति सत्वर येऊन पोहचावे आणि राजधानीचा प्रतिपाळ करावा. नाहीपेक्षां आमचे जबाबाकडे या गोष्टीचा शब्द नाहीं. सर्व जाग्याचे व सर्व घरांचे व संपूर्ण सेवक लोकांचे सुरक्षितपणा

Zuhrapur, at a distance of half a kos, and Ruhullah Khan and Qasim Khan at a distance of a quarter kos from the fort walls. MiA, p. 156.

कल्याणाचा संबंध या राजधानीचे सुरक्षितपणाकडे आहे, म्हणजे ही राजधानी कायम राहील तर सर्वांचे कल्याण आहे. जाणिजे. तारिख २४ चोविसावी माहे जमादिलावल सन १०९६ दहाशे शहाण्णव (१९ एप्रिल १६८५).

## ६८. ( औरंगजेबाची विजापुरवरील स्वारी )

औरंगजेब पादशाहा म्हणजे अलमगीर पादशाहा. कारण अलमगीर पादशाहा तख्तावर बसले नव्हते तेव्हांचे जन्मनांव औरंगजेब होतें. तख्तावर बसले तेव्हां अलमगीर पादशाहा असें नांव जाहालें. तात्पर्य औरंगजेब व अलमगीर हीं दोनीहि नांवें एकाचींच आहेत. ते औरंगजेब पादशाहा हमेषा हिंदुस्थानांत, म्हणजे दिल्लीस, राहात होते. तेव्हां विजापूर हस्तगत करण्याचे फिकीर व विचारापासून एक दिवसदखील रिकामे राहिले नाहींत, म्हणजे नित्य विजापूर घेण्याचे मसलतींत होते. शाहाजाद्यासमागमें व सरदारांबरोबर भारी फौजा विजापुरावर नेमणें व मुलुख घेण्याचा व किल्ले हस्तगत करण्याचा लढाऊ बहुत सामानसरंजाम रवाना करणें व उत्तम विचारवान व धैर्यवान लोक अद्वितीय व ठकबाज व मकरबाज पुरुष नेमण्याचे तयारींत किंचितहि आळस व अंतर करित नव्हते. ते अलमगीर पादशाहा जेव्हां दक्षण देशांत आपले चरणारवृंदेकरून श्रेष्टता देते झाले, म्हणजे दक्षिण देशांत आले, तेव्हां अलमगीर पादशाहाकडील कित्येक लोक बुऱ्हाणपुरांत व कित्येक हैदराबादेंत व कित्येक औरंगाबादेत व कित्येक अहमदनगरांत येऊन राहून रात्रंदिवस या कामांत बहुत यत्न करित होते. येविषयींचे विचार करीत होते. अलमगीर पादशाहा याणी तेव्हां जाणिलें कीं, इतकाहि यत्न केला असतां कार्यसिद्धी होत नाहीं तेव्हां फारच जलदी करून माहे जमादिलाखर महिन्यांत (मे १६८५) कूच करून तारिख १ पहिली माहे रजब (२५ मे १६८५) रोजीं पादशाहा सोलापूरचे तर्फेत येऊन उतरले.[४९] खानजहान बहादूर हे विजापुरावर हल्ला व लढाई करित होते. त्याणी अलमगीर पादशाहाची स्वारी सोलापुरानजजिक येऊन दाखल झाली असें वर्तमान एकतांच तारिख ६ माहे रजब (३० मे १६८५) रोजीं विजापूर येथून निघोन अलमगीर पादशाहाचे भेटीकरितां सोलापुरांत चालता झाला. तारिख १८ अठरावी माहे रजब (११ जून १६८५) रोजीं कंदनाले (कर्नूल) येथून विजापूरचे कुमकेस फौज आली. तारिख २२ बेविसावी (१५ जून १६८५) रोजीं शाहाजादा

४९. शके १६०७ जेष्ठ मासी ( मे–जून १६८५ ) अवरंगजेब अहमदनगराहून कूच करून सोलापुरास आले. विजापुरावरी मोहीम केली.– जेधेश, पृ. ३३.
On Sunday, the 25th May 1685/1st Rajab, the Emperor reached Sholapur.- MiA, p. 158.

महंमद आआजमशाहा विजापूरचे लढाईवर नेमिला जाऊन तो शाहाजादा भारी फौजेसुद्धां येऊन पोहचला. त्याणी बेगम हावदावर आपल्या लष्करचे डेरे ठोकिले. तारिख ७ सातवी माहे साबान (३० जून १६८५) रोजीं किल्ला घेण्याचें लढाऊ सामानसंरजामासुद्धां शहाजादा पुढें चालून येऊन किल्यासी भिडला. किल्ल्यावर मोरचे कायम केले. चोरवाट बांधणें, भुयार खणणें, तोफा डागणार गोलंदाज निवडक पाहून निवडणें व बंदुकीचीं निशाणें लावणारे बंदुकबारदार योजण्यांत बहुत यत्न केला. तारिख ९ नववी माहे साबान (२ जुलै १६८५) रोजीं अबदुल रौफ व पर्जाखान हे उभयतां किल्यांतून बाहेर पडोन शत्रूसी युद्ध करण्यांत बहुत झटून केसाइतके देखील आपलेकडून अंतर करित नव्हते. तारिख १० दहावीं माहे साबान (३ जुलै १६८५) रोजीं खाण्यापिण्याचा सामानसरंजाम येत होता. त्या सामानावर उभयतां-कडूनहि मोठी लढाई झाली. तारिख ४ चवथी माहे रमजान (२६ जुलै १६८५) रोजीं मंगळीनजिक रसद येत होती. त्या रसदीवर आदिलशाहाकडील व अलमगीर पादशाहाकडील फौजेंत मोठी लढाई व तोडातोडी झाली. तारिख २४ चोविसावी माहे रमजान (१५ आगष्ट १६८५) रोजीं आंबाजी पंडीत हैदराबादकर येऊन ऊतरला.[५०] दुसरे दिवशीं (१६ आगष्ट १६८५) हुजूर येऊन सुदैववान झाला, म्हणजे पादशाहास भेटला. तारिख ९ माहे जिल्हेज (२८ आक्टोबर १६८५) रोजीं अबदुल हसन कुतुबशाहा यानीं मादाना म्हणोन वकील होता त्याजला कैद करण्याचे वर्तमान येऊन पोंचलें.[५१] तारिख २३ तेविसावी माहे मोहरम सन १०९७ (१० दिसेंबर १६८५) रोजी हंबीरराव हा संभाजीचे फौजेसमागमें येऊन पोंचला. तारिख ३ तिसरी माहे सफर (१९ दिसेंबर १६८५) रोजीं संभाजीची फौज मोगलाचे इलाख्यांतील मुलूख लुटण्यावर रवाना झाली. तारिख ११ माहे साबान (२३ जून १६८६) रोजीं पाम नाईक याची आलंग, म्हणजे चौकी, उठविली. जवहर काजी सईद हा त्या लढाईत ठार झाला. सारांश,

५०. शके १६०७ वैशाख मासी (मे १६८५) भागानगरकरी विजापुरास मदतीस तीन हजार स्वार तीन लक्ष होन खर्चास दिल्हे.– जेधेश, पृ. ३३.

५१. शके १६०७... .....शहा अजम व बहादुरखान, यसे जाऊन भागानगर लुटिलें. त्याच महिन्यांत मादणावरी हला करून मारिलें. त्याचा भाऊ अंकणा मारिला क्रोड रुपये देऊन मोगलासी सला केला.– जेधेश, पृ. ३३.

On Sunday, the 28th June 1685/6th Shaban, the Prince (Shah Alam) was sent against Haiderabad – MiA, p. 159. On Sunday, 18th October 1685/30th Zilgada, dospatches from Shah Alam Bahadur and Khan Jahan Bahadur announcing the capture of the City of Haiderabad, the shutting up of Abdul Hasam in the fort of Golconda...... were received.- MiA, p. 164.

तारिख २ दुसरी माहे जमादिलावल सन मजकूर (१७ मार्च १६८६) रोजीं विजापुरावर नुकतीच लढाई झाली. एकीकडून खानजहान बहादूर वगैरे अमीर लोक व दुसरेकडून रुहुल्लाहखान व कासमखान वगैरे लढाईस झटत होते. त्यानंतर आआजमशाहा सख्त लढाई करण्याकरितां नेमिला. तेव्हां मोठेच दारूण युद्ध होतें झालें. शाहाजादा याणी किल्याची फत्ते करण्याविषयीं मोरचे पुढे चालविणें, नकब, म्हणजे पोकार खणून त्यांतून दारू भरून उडवितात तो नकब, जलद पुढे चालविणें व आतषबाजीची हल्यारें म्हणजे तोफा, बंदुकी, बाण वगैरे एकदम उडऊन सरबती करण्यांत फार फार यत्न केला. फार दिवस लढाई लांबती.[५२] यामुळे महंमद आआजमशाहाचे फौजेंत मोठा दुष्काळ पडला. खाण्यापिण्याचें सामान कोणीकडूनच येऊन पोचत नव्हतें. एकंदर मार्ग बंद झाले होते. संभाजीचे फौजेंनीं मोंगलाचे लष्करांत रसद येण्याचे मार्ग बंद करून मोंगलाचें मुलकांत लुटालुट चालविली होती. जागोजागचे वाहते पाणी देखील खराब करून टाकिलें. पाण्यापासी माणसांना व जनावरांना येण्याचे मार्ग बंद करून निखालस बंदी केली लष्करांतील बहुत मनुष्यांनीं खाण्यापिण्याच्या सरंजाम येऊं न पोचला सबब घोडीं वगैरे जनावरें व उंट कापून त्यांचे मांस खात होते. कित्येक मनुष्यें उपोषणानें मरत होती. या दशेचे वर्तमान अलमगीर पादशाहाचे कानावर येऊन पोचल. तेव्हां पादशाहा याणी शाहाजादा आआजमशाहा याजला हुजूर बोलाविलें. तेथून खान फेरोजजंग शहाबुद्दीनखान याजला नवीन बळाची म्हणजे ताज्या जोराची फौज समागमें देऊन बहुत द्रव्य व अत्यंत कैली जिन्नस व बहुत दारूगोळे व किल्ला घेण्याचे दुसरें कित्येक सामान व लढाईवर जी फौज कायम होती त्या फौजेचे कुमकेस पाठविलें.[५३] शहाबुद्दीनखान येऊन पोहचण्यानें लष्करास पुन्हां नवा दम आला. हरएक सामान सरंजामाची बहुत स्वस्थता झाली, म्हणजे सस्ताई झाली. बहुत सुख प्राप्त झालें. विजापुरांत इतके कांहीं एक सामान सरंजाम नाहींसे होतें. असें असोन व एकमेकांत बिघाड असोन आपली जमात थोडीसी राहिली होती. दक्षिणी लोकांनी आपली

५२. Amanullah Khan, son of Alahwardi Khan and Fath M'annur Khan son of Diler Khan died fighting heroically in the trenches of Bijapur. Kamaluddin Khan, son of Diler Khan and Fath Jang Khan Miana were wounded . ..The powder magazine of the army of Muhammad Azam Shah caught fire, nearly 500 bahahas (hill climbing infantry) and musketeers were killed.– MiA, p. 161.

५३. When the Emperor learnt of this (fight to death) determination of the Prince to stay, he ordered Firoz Zang Bahadur on Monday, the 4th October 1685/10th Zilqada to set out with a large army and provisions beyond calculation to reinforce and supply the Prince's army.– MiA, p. 162.

जमात थोडी व शत्रूची जमात फार या गोष्टीवर नजर न ठेऊन धैर्य व शूरत्व धरून बहुत पराक्रमानें लढाई करित होते. शत्रुचे मोरचे लागूं होऊ दत नव्हते. शत्रूकडील बाहेरचे फौजेस त्यांचे मनोदयाप्रमाणें काम न करूं देतां ज्या जाग्यावर उभे राहात होते तेथून हांकून देत होते. आपले मनोरथ पूर्ण होईनात व कार्यसिद्धी होण्यास दिवसगत लागतील यामुळें अलमगीर पादशाहा अत्यंत क्रोधायमान होऊन सोलापुरांतहि कित्येक दिवस स्वस्थपणानें घालविणें नीट नाहीं असें जाणून पादशाहा खुद जातीनीं सोलापूरचे किल्यांतून तारिख २ दुसरी माहे साबान राजशक अलमगीर पादशाहा तख्तावर बसल्याचा ३० तीस मुताबिक सन १०९७ एक हजार सत्याण्णव (१४ जून १६८६) रोजीं लष्करची ढाल उभी करून तारिख २१ एकविसावी माहे मजकूर (३ जुलै १६८६) रोजीं रसुलपूर येथें लष्करचे डेरे ठोकून तेथें पादशाहाची स्वारी उतरली.[५४] या दिवसांत शिकंदर पादशाहा यासी आपले खामे मंडळीपैकीं एक ग्रहस्थ मसऊदखान याजकडे पळत पाठविला. मसऊदखान याजला बहुत अगत्यानें हुजूर बोलाविलें. या राजधानींतील बहुत खराबी झाली व प्रसंग बहुत परिणामास आला अशीं मसऊदखानास पत्रें पाठऊन तुम्ही जलद येऊन पोहचावें असें त्याजला सांगून पाठविलें कीं, तुम्हीं पुरातन चाकर, इकडील मिठ खाऊन वाढलेले, संभावित व काम कारभार केलेले आहांत. यास्तव तुम्हांस प्रास आहे कीं, या शेवटच्या प्रसंगांत, कारण कीं या राजधानीची नाव बुडण्यास कोणीएक मना करणारा राहिला नाहीं, याजकरितां तुम्हीं बहुत पोख्तपणानें असा विचार काढावा कीं, संकटाचे भोवऱ्यांत बुडालेली नाव सुटकेचे कडेस लागेल असें करावें. प्राण घेणारा विषप्रद, म्हणजे पूर्ण विखारी, अजगर मस्तकावर येऊन पोहचून गिळून टाकण्याचे विचारांत आहे. तो अजगर परत जाई असें करावें, म्हणजे अलमगीर पादशाहा यानीं संकटानें वेढिले आहे त्या संकटापासून सोडवावें. अशीं पत्रें लिहून मसऊदखानास पाठविलीं. त्या पत्रांपैकीं एका पत्राची नकल या ठिकाणीं लिहिली जात आहे.

५४. शके १६०८ आषाढ मासी (जून=जुलै १६८६) अवरंगजेब सोलापुराहून येऊन विजापुरावरी लगट केला.–जेधेश, पृ. ३३. On Monday the 14th June 1686/2nd Shaban, the Imperial standards moved from Sholapur in that (Bijapur) direction. On Saturday the 3rd July 1686/21st Shaban, when the Imperial Camp reached Rasuapur ..... 3 kos from Bijapur......– MiA, p. 169.

## ६९. सिकंदर पादशाहा यासी परिणामास दशा आल्यानंतर मसऊदखानास आज्ञापत्र लिहून पाठविलें, त्या आज्ञापत्राची नकल :

तुम्हीं खरेपणाचे व विश्वासाचे व साफीचे इरायाचे मार्गानें, कारण कीं हा साफीचा मार्ग उत्तम सेवक लोकांचा आहे त्या मार्गानें, विनंतिपत्र पाठविलें तें पावलें. तुम्हीं मजबूत अंतःकरणानीं विनंतिपत्रांत जो मजकूर लिहिलात तो बहुत पसंत आला. हा वेळपर्यंत तुम्हीं येथें येऊन पोहचण्याची मार्गप्रतिक्षा करून लिहिलें जातें कीं, एक महिनावर कांहीं अधिकच दिवस झाले अलमगीर, म्हणजे औरंगजेब, पादशाहा सोलापुरांत येऊन उतरून नानाप्रकारचीं संकटें व लढाया करित आहे. तो विस्तार लिहिता सरत नाहीं. ईश्वराचे कृपेंकरून हा वेळपर्यंत आम्ही सुरक्षित राहिलों. इतकी फुरसत पडली असोन हे तुम्ही धर्माजी पंडित वगैरेची मार्गप्रतिक्षा करून ही दौलत बुडावी असें तुमचे मनांत नीट दिसत असल हे आश्चर्य आहे. येणेंकरून सहस्त्रावधी प्रकारें आश्चर्य आहे. जर करितां तुम्ही निघोन इकडे याल तर फार चांगलें. या प्रसंगी ही अवस्था पाहून पुन्हां राजधानीचे बंदोबस्ताचे काम पाहावें. नाहीपेक्षां विजापूर मोंगलाचे, म्हणजे औरंगजेब पादशाहाचे, हातीं गेलें, गेलें, गेलें ! असें सत्य, सत्य, सत्य जाणावें ! आज चवथा दिवस आहे, कीं रेवणीवर शत्रु प्रबल होऊन तोफेचे गोळ्यांनीं ज्यामंत बुरुज पाडून जमिनदोस्त करून टाकला आहे. यावरून कोणत्या घटकेस काय प्रळय होईल हें कांहीं कळत नाहीं. याजकरितां तुम्ही अकल चालऊन हें वर्तमान ऐकतांच इकडे निघोन यावे व इकडील हुकूमाप्रमाणें वर्तणूक करून आयुर्दायपर्यंत कीर्ति मिळवावी. याउपर तुम्हास वाटेल तसें करावें. तुम्ही निघोन आला असतां इकडील सर्व कारभारी मंडळापेक्षां तुमची योग्यता वाढल, हें सत्य जाणावे. जाणिजे. छ २४ माहे रमजान सनं १०९७ (५ आगष्ट १६८६). ईश्वराचे मनोगत विजापूर शत्रूचे हातीं जावयाविषयीं चंचल जाहालें होतें. यास्तव मसऊदखान याणी या बोलण्याकडे कदापि कान दिल्हाच नाहीं, म्हणजे हें बोलणें ऐकून घेतलेंच नाहीं. विजापुरास जाण्याविषयीं त्याचे चित्तानीं शास्त्रार्थ दिलाच नाहीं, म्हणजे विजापुरास यावें असें वाटलेंच नाहीं.

## ७०. विजापूर हस्तगत करण्याविषयीं व किल्ला घेऊन फत्ते करण्याकरितां अलमगीर पादशाहा याणी पूर्ण यत्न करणें प्रकर्ण :

रसुलपूर हा गांव अलमगीर पादशाहाचे लष्करचे मुकामाचे वस्तीचें स्थान झाला, म्हणजे पादशाहा रसुलपूर येथें राहिले. पादशाहा याणी तेथून गाजीउद्दिनखान व

तोफखान्याकडील दरोगा म्हणजे मुख्य कामगार वगैरे अमीर लोक नेमिलेले होते त्यांजला आज्ञापत्र पाठविलें कीं, यत्नांचा कमरबंद जिवाचे कमरेवर पूर्ण मजबूत बांधून, म्हणजे जिवादारम्य यत्न करून, रात्रंदिवस झटून हल्ला करण्यांत, ठकाविद्या उभी करण्यांत व पोकार खणून त्यांत दारू भरून उडविण्यांत फारच मेहनत करावी. बक्षी यांनीं किल्ला घेण्याविषयीं शाहाजाद्याकडील व अमीर व मनसबदारांकडील सेवकलोकांस वाटण्या करून ज्याच्या त्या त्या ठिकाणचा बंदोबस्त ते ठेवितील. विजापूरचा किल्ला ज्या जमिनींत बांधिला आहे ती जमीन अर्धी गज खणिली तथापि काळे धोंडे निघतात. जलद काम करणारे बेलदार लोक व मजबूत हाताचे पाथरूट व दुसरे कित्येक अति उत्तम हरएक कामाचे कामदार काम करण्यास लागोन त्याणी कित्येक दिवसांत मोरचा किल्याचे दरवाजानजीक पोहचविला. दक्षणी लोक पराक्रमी. याणींहि तोफा व बंदुकीची सरबती करण्याविषयीं किंचितहि अंतर न करितां जितकें सामर्थ्य होतें तितका शत्रुचा पराभव करिण्याकरितां यत्न करित होते. या कामांत तिळप्राय अंतर करित नव्हते. परंतु जेव्हां अकलवान लोकापासीं हे प्रसिद्ध आहे कीं, ज्यासमई ईश्वराचा संकल्प व प्रळयकारक ईश्वराची इच्छा आदिलशाही सिलसिला सर्व तोडण्याविषयीं व ही राजधानी व ही खानदानी, म्हणजे हें कूळ, समाप्त करण्याविषयीं जाहालां होती तेव्हां यत्न व विचार करण्यापासून काय फायदा होऊं शकेल ? मसलत व शत्रुपराभव करण्याचा विचार काय कामास येईल ? आरबी वाक्याचा अर्थ : " ईश्वराचे इच्छेस जें येईल तें ईश्वर करितो असें आहे. ईश्वराचे इच्छेपुढें कोणाचाच विचार चालत नाहीं."

### ७१. अलमगीर पादशाहाचे हातीं विजापूर जाणें प्रकर्ण :

विजापूरचा किल्ला घेऊन फत्ते करण्यास फार दिवस लागले. बहुत यत्न केला कीं, हिंदुस्तानची सर्व राजधानी इतक्या सामान सरंजामासुद्धां एक हल्केंसे शहर, म्हणजे विजापूर, घेण्याकरितां जिवादारम्य यत्न करित आहे व जितके सामर्थ्य आहे तितके झटून यत्न करित होते असें असतां कार्य सिद्धी होत नव्हती. यास्तव अलमगीर पादशाहास हें नीट न वाटून फार जलदी करून अति अधीर होऊन पादशाहा खुद जातीनें या कामास तत्पर होऊन गाजीउद्दीनखान व तोफखान्याकडील दरोग्याचे मोरच्यापासून एक कोसाचे अंतऱ्याने पादशाहाचा डेरा होता त्या डेऱ्यांतून अलमगीर पादशाहा निघोन मोरच्यानजिक अलमगीर पादशाहाची स्वारी उतरण्याकरितां तंबू ठोकिला होता त्या तंबूत अलमगीर पादशाहाची स्वारी येऊन दाखल झाली. पादशाहा याणी आज्ञा केली कीं, किल्ला घेणारे लढाऊ शूर व महा बलवान पराक्रमी शूरांनीं चहूंकडून शाहाजाद्याचे फौजेसुद्धा व एकंदर फौजेंतील शूरांनीं एक जमाव करून

मोरच्याचे बाजूनीं किल्ल्यावर एकंदर हल्ला करावा. अशी आज्ञा केली तेव्हां या अवस्थेंत विजापूरचे लोकांत निराशा प्राप्त होऊन सर्व लोक भयाभीत झाले. शिकंदर पादशाहा व शिकंदर पादशाहाचे सर्व कारभारी लोकांची निराशा होऊन शिकंदर पादशाहा व शिकंदर पादशाहाकडील कारभारी लोक यांनी अलमगीर पादशाहासी सख्य केल्याशिवाय कांहीं एक उपाय नाहीं असें जाणिलें. तारिख १ पहिली माहे जिलकादचे रात्रीं (१० सप्टेंबर १६८६) अबदुल रौफ याचा मुनशी सईदखान व सय्यद मखदूम षर्जाखान याचा मुनसी शेख हुसेन हे उभयतां हाफीज अफजल याजसमागमें अलमगीर पादशाहासी सख्य करण्याकरितां गाजीउद्दीनखान याजकडे जाऊन त्याच रात्रीं परत आले. तारिख २ दुसरी माहे जिलकाद (११ सप्टेंबर १६८६) रोजीं अबदुल रौफखान हे खुद जातीनें गाजीउद्दीनखान याचे भेटीस गेले. भेट घेऊन सख्य होण्याचे करार मदार ठरविल्यानंतर त्याच रात्रीं परत आले. विजापूरचा किल्ला मोंगलाचे हवालीं करून द्यावा असें शिकंदर पादशाहासी बोलणें करून करार ठरविला. तारिख ३ तिसरी माहे मजकूर (१२ सप्टेंबर १६८६) रोजीं पुन्हां गाजीउद्दीनखान याजकडे जाऊन त्याचे विचारानें अलमगीर पादशाहाची भेट घेतली. पादशाहाचे कृपेस पात्र झाले. अबदुल रौफखान याच रात्रीं परत आला. गाजीउद्दीन तेथेंच राहिला. षर्जाखान रात्रीं किल्ल्यांत आला. तारिख ४ चवथी माहे जिलकाद व अलमगीर पादशाहा तक्तावर बसल्याचा राजशक ३० तीस मुताबिक सन १०९७ दहाशे सत्याणव रोजीं दहावे तासीं (१३ सप्टेंबर १६८६) शिकंदर पादशाहा विजापूर किल्ल्यांतून अलमगीर पादशाहाचे भेटीस जाऊन पोहचला. विजापूरचा किल्ला हवालीं करून दिला.[५५] अलमगीर पादशाहा याणी शिकंदर पादशाहाची भेटी बहुत सत्कारानीं व अत्यंत कृपेनें घेऊन शिकंदर पादशाहास बहुत दिलभरवसा दिला. फारच सत्कार केला. अलमगीर पादशाहा याणी आपले तंबू ठोकिले होते त्या खासे तंबूचे पाठीमागें शिकंदर पादशाहाचा तंबू ठोकिला. शिकंदर पादशाहास त्याचे बायकामुलांसुद्धां उतरावयास जागा ठरविली. प्रतिवर्षी एक लक्ष रुपये शिकंदर पादशाहाचे खर्चास नेमून दिल्हे. कित्येक दिवसानंतर तानाशाहा अबूल हसन कुतुबशाहाची कन्या शिकंदर पादशाहास द्यावयाची ठरऊन पवित्र कुराण शरीफचे शास्त्राप्रमाणें लग्न करण्याविषयीं आज्ञा केली. अबदूल रौफखान मिया व सय्यद मखदूम षर्जाखान या उभयतांस सात हजारी असें पद व सहा हजार स्वार देऊन अबदूल रौफ याजला दिलेरखान असा किताब व सय्यद मखदूम याजला

५५. शके १६८० आश्विन शुध ७ सोमवारी (१६ सप्तेंबर १६८६) अवरंगजेबें विजापूर घेतलें. सुलतान शिकंदर भेटला. यासी नजरबंद केलें. सरजाखान व बहलोलखानाचा लेक यास पंचहजारी दिली.– जेधेश, पृ. ३३–३४. (n Sunday, the 12th September 1686/4th Zilqada, the fort (Bijapur) was captured by Alamgir.– MiA, p. 171.

रूस्तुमखान असा किताब दिला. विजापूरास दारूलजफर असा किताब दिल्हा. दारूलजफर या नावांची विजापूरची प्रसिद्धी केली. दुसरे दिवशीं ता. ५ माहे जिल्काद (१४ सप्टेंबर १६८६) रोजीं अलमगीर पादशाहा खुद जातीनें बहुत थाटानें किल्ल्यांत येऊन सर्व विजापूर पादशाहा याणी हिंडून पाहून पुन्हां अलमगीर पादशाहाची स्वारी लष्करांत परत गेली. रूहुल्लाहखान यास पांच हजारी पद व चार हजार स्वार प्राप्त झाले. तो विजापुरचे सुभेदारीचे कामावर सुभेदार जाहाला. त्या तारिखेपासून आदिलशाहाची दौलत समाप्त झाली. आदिलशाहाचा निर्वंश झाला, म्हणजे नकल झालें.

## ७२. शिकंदर पादशाहा यानी ही दशा पाहून पश्चाताप पावणें प्रकर्ण :

यानंतर शिकंदर आदिलशाहा यानीं जीवमानपर्यंत अलमगीर बादशाहाचे कैदेंत गुप्त राहून अपूर्ण मनोरथपणानें आयुष्य घालविलें. हयहात, हयहात, हयहात ! म्हणजे अरे, अरे, अरे ! तो बिचारा मुळचाच फार चमत्कारिक निर्दैवी व दुर्दैवी झाला ! कारण कीं, सुलतान महंमद पादशाहा तेव्हां सुलतान महंमद पादशाहाचेच नांवानीं वागला, शिकंदर पादशाहा तक्तावर बसला तेव्हा चवदा वर्षेंपर्यंत चाकर लोकांचेच जेरदस्तींतच राहिला. हलीं तर कांहींच मुखत्यारी राहिली नाहीं. यानंतर अलमगीर पादशाहाचे कैदेंतहि चौदा वर्षे पर्यंत बहूत संकटानें व जेरदस्तीनें आयुष्याचे दिवस घालऊन तेहतीसावे वर्षाचे वयांत सन एक हजार एकशे अकरा (१७००-१७०१ इ. स.) सालीं अत्यंत निराशेनें या मृत्युलोकाचा परित्याग करून परलोकासी गमन करता जाहाला, म्हणजे मरण पावला. ही रुबई, म्हणजे या दोन बैता, शिकंदर पादशाहाचे मरण्याचे वर्णनाविषयीं वर्णिल्या आहेत. या दोन बैतांत शेवटील चरणांत शिकंदर पादशाहाचे मरणाची तारिख बांधिली आहे. त्या बैतांचा अर्थ : " शिकंदर पादशाहा याणी या मृत्युलोकापासून कूच केलं, तेव्हां सर्व गोरगरीब लोकांचे हृदयांतून शोकाचा ध्वनी निघाला : १ : गुप्त अर्थाचे तऱ्हेने मी तारखेचे वर्ष वर्णिलें आहे. शिकंदर पादशाहा या मृत्युलोकापासून निघाला : २ : "इतका या बैताचा अर्थ जाहाला. 'शिकंदरनीन कुहन जुल्मत बरामद' इतके अक्षरांपैकी 'कुहन जुलमत' इतकी अक्षरें आबजदचे हिशोबानें गणिलीं असतां १४४५ चौदासे पंचेचाळीसची बेरीज येते व सिकंदर इतकी अक्षरें अबजदचे हिशोबानें गणिली असतां ३३४ तीनशे चौतीसची बेरीज येती. ही ३३४ ची बेरीज १४४५ चौदासे पंचेळीसशे बेरजेंत वजा दिली असतां ११११ अकराशे अकराची बेरीज बाकी उरली. या हिजरी सनांत सिकंदर पादशाहा मरण पावले.

### ७३. मुसलमान लोकांचे शहरावर हल्ला करण्याचें काय कारण असें विचारण्याकरितां शिकंदर पादशाहा यांणी विद्वान लोकांस अलमगीर पादशहाकडे पाठविणें व अलमगीर पादशाहा याणी येविषयींचे उत्तर सांगणें प्रकर्ण :

अलमगीर पादशाहा याणी विजापूर हस्तगत करण्याविषयीं बहुत यत्न करून मोठा हल्ला करून किल्यांतील राहाणारांवर मोठा कठीण प्रसंग आणिला. येथपर्यंत कीं, या किल्यांतील राहाणारांस कल्याण होण्याची व सुखाची उमेद राहिली नाहीं. सुटका होण्याची निखालस आशा तुटली. केवळ निराशाच जाहाली. शिकंदर पादशाहा याणी आपले दरबारांतील अकलवान लोक व शहरांतील थोरथोर संभावित लोक जमऊन येविषयीं त्यांजला मसलत विचारिता जाहाला. या प्रकर्णी त्यांजला सल्ला विचारून सुटका होण्याचा उपाय विचारिला तेव्हा शिकंदर पादशाहाचे दरबारांतील कारभारी मंडळीनीं बहूत विचार करून बोलले कीं, दिल्ली येथील अलमगीर पादशाहा धर्मानें वागणारा व शास्त्रनिष्ट आहे. हा अलमगीर पादशाहा कुरान शरीफचे किताबीचे आज्ञेशिवाय व धर्मनिष्ट मुत्फी, म्हणजे कुरान शरीफची किताब, पाहून त्या प्रमाणें शास्त्रार्थ देणारा. त्या मुत्फीची शास्त्रार्थाची आज्ञा घेतल्याशिवाय एक काम देखील करित नाही. त्या पादशाहासी लढाई करणें हे यद्यपि आम्हांस योग्य नव्हे परंतु अलमगीर पादशाहासी शास्त्रार्थानीं वाद घालणेंचा मार्ग मोकळा आहे. अलमगीर पादशहासी बोलण्यांत आमचे सामर्थ्य यद्यपि नाहीं. तत्रापि अलमगीर पादशाहास विचारू कीं, मुसलमानासी लढाई करावी हें कोणत्या शास्त्रांत योग्य लिहीलें आहे ! मुसलमान लोकांचे घरांत नमाज व आजान म्हणजे बांग देणें व मुसलमान लोकांचे नमाज वगैरे संपूर्ण धर्म सर्वकाळ परिपूर्ण आहे, असें असतां मुसलमान लोकांचीं घरे लुटून फडशा करावी व तोडातोडी करावी येविषयींचा कसा शास्त्रार्थ आहे ! असें जर करितां विचारिल्यास अमलगीर पादशाहा कायल म्हणजे थकीत होऊन आपण करितों हें अशास्त्र वागणुक आहे असें त्याचे लक्षांत येऊन हें कर्म सोडील. ही मसलत व ही युक्ती सर्वांस पसंत आली. तेव्हां पादशाहा याणी विजापुरांत विद्वान लोक होते त्यापैकीं कित्येक विद्वान लोकांस अलमगीर पादशाहासी सप्रमाण शास्त्रार्थानें वाद घालण्याकरितां पादशाहाचे लष्करांत पाठविलें. जेव्हां शास्त्रार्थानें वाद घालण्याकरितां व प्रश्न करण्यास्तव शिकंदर पादशाहाकडून विद्वान लोकांची जमात येऊन पोहोचली आहे असें अलमगीर पादशाहास वर्तमान समजलें तेव्हां अलमगीर पादशाहाचे समागमें विद्वान लोक होते, त्यांपैकीं कित्येक विद्वान लोक सदरहु विद्वानासीं प्रश्नोत्तर करण्याकरितां नेमिले. तेव्हां अलमगीर पादशाहाकडील विद्वानांनीं सदरहु विद्वानांस विचारिलें कीं, काय प्रश्न आहे ! कोणता वाद आहे ! तेव्हां विजापुरांतील विद्वान लोकांनीं आपले

प्रश्न केले. बहुत हुशारीनें विस्ताररूप बोलू लागले कीं, ईश्वराचा स्तव असो व ईश्वराचा उपकार असो. आमचे कारकीर्दींतील आदिलशाहासारखा पादशाहा इनसाफ करणारा, शूर, धैर्यवान, दान करणारा, दयाळू, सर्वांसी चांगला, उत्तम स्वभाववान व कृपावंत आहे तसाच विद्वान व बोलण्याप्रमाणें वर्तणूक करणारा, ईश्वराची सेवा करणारा, विरक्त, पवित्र, व सद्गुणी, शास्त्राप्रमाणें वागणारा व धर्मनिष्ट म्हणजे आपले ज्ञातीधर्मानी वागणारा आहे, कीं त्याचे कारकिर्दीत कोणीच अशक्त पुरूष शक्तिमान पुरुषापासून व कोणतीच मुंगी सर्पांपासून पिडा पावली नाहीं, म्हणजे कोणी कोणास उपद्रव केला नाहीं. पुढेंहि तसा पादशाहा होणार नाहीं. कोणताच हुकूम आदिलशाहाचे दरबारांतून कायदा, शास्त्रार्थ सुटून, कुरान शरिफाची आज्ञा व ज्ञातिधर्म सुटून कधींही होत नाहीं. कारण कीं, प्रत्यक्ष या शहराचा व या मुलकाचा धणी जातीचा मुसल्मान, ज्ञानी, ईश्वराचे एकत्व समजणारा, पवित्र विश्वासाचा व त्याची सर्व मंडळीहि विरक्तपणा बोलल्यानें योग्य मुसलमान असा जो सिकंदर पादशाहा, सर्व दुर्गुण आच्छादन करणारा व सर्व आयत्र झांकणारा आहे. त्याची जमातहि तशी आहे. या शिकंदर पादशाहा याणी मशिदी व शाळा व नमाज व बांग देण्यांनींच भरभरीत म्हणजे भरपूर ठेविल्या आहेत. सर्व मुसलमान लोक आपले धर्म स्थापन करणें व ज्ञातिधर्म सजीव करणें व नमाज पढण्यांत केसांइतके देखिल आपलेकडून अंतर पडूं देत नसतां अलमगीर पादशाहाच्या फौजा प्रळयकारक अत्यंत क्रोधायमान होऊन प्रळय करित येऊन पोहचून सक्त हल्ला करून कांही एक अपराध घडला नाहीं अशा निरपराधी मुसलमान लोकांस खाण्यापिण्यास देखिल कांही एक मिळूं न देतां लुटालूट करून खराबी व तोडातोडी करण्याचें व सर्व मुसलमानांच्या हुरमती घेण्याचें विचारांत आहेत. शास्त्रार्थ चालू करणारे हजरतमहमद रसुल्लिल्लाह आलेह वसल्लम त्यावर व त्याचे सर्व पेगंबरावर ईश्वराचा आशिर्वाद असो. कारण कीं, त्या हजरत पैगंबर यानीं मुसलमानासी युद्ध करणें वर्ज करून मना केलं आहे. हे पैगंबर युद्ध करण्याकरितां जात होते तेव्हां सांगत होते कीं, सावध असा. जर करितां हिंदू लोकांचे शहरांत आजान म्हणजे कोणी पुरुष बांग देत आहे व त्याचा बांग देण्याचा ध्वनी ऐकिल्यास त्याची लुटालुट न करितां त्या मुसलमानास पिडा करूं नका, अशी पैगंबर यानीं आज्ञा केली आहे. तेव्हां या निश्चयावरून व या संवादावरून मुसल्मानाचे मालमत्तेस व जीवास उपद्रव करणें केवळ अयोग्य आहे. अलमगीर पादशाहा इनसाफ करणार व धर्मनिष्ट असा आहे कीं, त्याचा एक श्वास देखिल ईश्वराचे कृपेचे स्थान आहे. यास्तव हें कर्म अलमगीर पादशाहास शास्त्रार्थानें फार दूर, फार दूर, फार दूर आहे, म्हणजे हें करणें फार अशास्त्र आहे. अलमगीर पादशाहा यानीं हा संवाद समजून घेतल्यानंतर आपलेकडील विद्वान लोकांस निरोप सांगून पाठविला आहे कीं, आदिलशाकडील विद्वान लोकांस आमचे कडील उत्तर द्यावें कीं, जे तुम्ही बोललांत ते

खरें आहे व दुरुस्त आहे. यांत कांहीं एक अमान्य होण्याची जागा नाहीं. आम्हांस तुम्हांसी व तुमचे शहरासी व तुमचे मुलकासी कांहीं एक गरज नाहीं. तुम्हांसी तोडा-तोडी व लढाई आम्ही करित नाहीं. परंतु हें आहे कीं, बेमान हिंदु निर्दैवीचा पुत्र निर्दैवी, म्हणजे शिवाजीचा पुत्र संभाजी व ही सर्व निर्दैवीपणाची व बेमानपणाची लक्षणें संभाजींत आहेत. हिंदुस्थानी अवैं बैतेचा अर्थः " कोणी मुसलमान अपराधी आहे आणि तो मुसलमान अपराध्याचे भयास्तव हरम म्हणजे मक्केचे सभोंवते भिंत आहे त्या ईश्वरी स्थानाचे भिंतीच्या आंत जाऊन राहिल्यास त्या स्थानांत आहे तोंपर्यंत त्याजला मारूं नये" असें आहे. परंतु संभाजी असा आहे कीं, त्या स्थानांत जरी जाऊन राहिला तत्रापि त्याजला तोडण्यास लायक आहे." : तो संभाजी तुमचा आश्रय धरून राहिला आहे. आणि तुमचे आधारानें बहूत फंदफितूर व खराबी करित आहे. जागोजागचे शहरांतील मुसलमान लोक व मुलखामुलखांतील व गांवोगांवचे गोरगरिब लोक दिल्लीचे दरवाजापर्यंत संभाजीचे पिडेनें अति पिडा भोगून त्रासून रात्रंदिवस आरडाओरडा करित आहेत. स्वधर्माचा रस्ता केरकचऱ्यापासून निर्मूळ करावा म्हणजे असे पिडक लोक मुसलमानी धर्मांत राहूं देऊं नये व त्याचा निर्मूळ फडशा करणें पादशाहास प्राप्त आहे. आम्हीहि पादशाहाचे जमातीपैकींच आहोंत. यास्तव आम्हांस हें करणें योग्य आहे. आम्ही आपलें वतन सोडून या सरहद्दांत आमचे येण्याचें तात्पर्य यापरतें, म्हणजे संभा-जीस पकडण्यापरतें, दुसरें कांही एक नाहीं. संभाजीस हातीं आणून, म्हणजे पकडून, पृथ्वींतील मनुष्यांस संभाजीचे पिडेपासून सोडवावें. तो संभाजी तुमचे आश्रयांत आहे. तो संभाजी आमचे हवालीं करून द्यावा. हें तुम्हांस मागतों. संभाजी आमचे हातीं आला म्हणजे याच घटकेस आम्हीं निघोन जातों आणि आपले दिल्लीचा मार्ग स्विका-रितों. असें अलमगीर पादशाहा बोलले. तो पादशाहाकडील उत्तराचा निरोप विजापूर येथील लोकांनीं ऐकून स्तब्ध राहून, म्हणजे कांहीं एक उत्तर न देतां, विजापुरास परत आले.

## ७४. शिकंदर पादशाहा यानीं मरण पावण्याचें कारण प्रकर्ण :

अलमगीर पादशाहा यांणी विजापूर घेण्याविषयीं व दक्षिण देश हस्तगत करण्या-विषयीं जितका प्रयत्न केला व बहुत श्रम व महनत केली तितके श्रम व संकट कोण-तेच पदार्थाकरितां केले नाहींत. अलमगीर पादशाहा तक्तावर बसेल नव्हते तेव्हां वारंवार दक्षिण देशावर फौज रवाना करून दक्षिण देश हस्तगत करण्याकरितां बहुत यत्न करित होते. तक्तावर बसून राजधानीची सर्व मुख्त्यारी हातीं आल्यानंतरहि याच विचारांत राहात होते. वारंवार फौज दक्षिण देशावर रवाना करित होते. नानाप्रकारचे

ठकविद्येनें व दगलबाजीनें व हीलें व सभ्यपणाचा भाव व आर्जव व ठकविद्येचे सर्व दरवाजे व सर्वांस आपलेकडे फसऊन आणणेचे पर्याय प्रसिद्ध करून आपली कार्य-सिध्धी व्हावी असें इच्छित होते. अलमगीर पादशाहा तक्तावर बसल्यापासून तीस वर्षे याच प्रकारे गुजरलीं. मुख्य तात्पर्य विजापूर घेण्याचें होतें. परंतु सिद्धीस गेलें नाहीं. तेव्हां निरूपायपणानें पादशहा याणी बहुत दिवसांची ईच्छा सिद्धीस नेण्याकरितां हा विचार केला कीं, आपले वतनाची जागा सोडून प्रवास स्विकारून, वतनाचेच जाग्यावर राहून सुख भोगण्यापेक्षां, प्रवासाचे दुःख उत्तम असें जाणोन अलमगीर पादशाहा दक्षिण देशांत आला. पादशाहा दक्षिण दशांत आल्यानंतर दक्षिण देशांत येऊन बहूत ठकविद्या व नानाप्रकारचे हुन्नर केल्यानंतर ही विजापूर घेण्याची एक वेळ देखिल फत्ते जाहाली नाहीं. बहुत वेळ संकटें मात्र भोगिलीं. विजापूरचा किल्ला घेऊन फत्ते जाहाल्यानंतरहि विजापूर ताब्यांतील मुलुख एकदम व एकदांच हातीं आला नाहीं. तो मुलुखहि बहुत दिवस गुजरल्यानंतर एक एक किल्ला व एक एक गढी विजापूर शत्रूचें हाती गेले असतां व मुलखाचा वारिसदार व धणी म्हणजे सिकंदर पादशाहा कैद झाले असतांहि सुलभपणानें फते जाहाली नाहीं. बहुत संकटें मात्र भोगिलीं. असें सांगितलेंहि आहे कीं, अलमगीर पादशाहा यानीं विजापूर घेऊन फत्ते जाहाल्यानंतरहि आपले आयुष्याचे दिवस सरासरी वीस वर्षें याच विजापूर ताब्यांतील मुलूख हस्तगत करण्याचे यत्नांत खर्च केलीं. सारांश विजापूर ही लहानशी जागा होती. विजापूर ताब्यांतील मुलुखहि फार मजबूत नव्हता. त्या मुलखांत पादशाही फौज आली. त्या विजापूर ताब्यांतील गढींतील किल्लेदार याणे अलमगीर पादशाहाची आज्ञा न ऐकतां व हुकूम न मानितां व दांडगेपणानें व अमर्यादेनें वागून बंदुकी व बाणांची सरबत्ती अलमगीर पादशाहाचे लोकांवर केली. तेव्हां अलमगीर पादशाहाकडील वकील जरब देणारे याणी त्या सदरहू किल्लेदाराकडे जाऊन सदरहू किल्लेदारास सांगितले कीं, अरे मुर्खा, तूं काय मूर्खपणाचा समज अंतःकरणांत आणिला आहेस. कोणता विचार कच्चेपणाचा केला आहेस ! तुजला अद्यापि खबर कळली नाही कीं काय कीं, विजापूर ताब्यांतील सर्व मुलूख अलमगीर पादशाहाचे हातीं आला आणि तुझा धनी व तुझे मुलखाचा धनी, म्हणजे सिकंदर पादशाहा, कैद जाहाला आहे. परंतु तू बेवकूफ आहेस. कारण कीं, अलमगीर पादशाहाचे फौजेवर बंदुकीची सरबत्ती करितोस आणि अलमगीर पादशाहाची आज्ञा मोडून दांडगेपणानें वागतोस. सशाचे झोपेसारखे करून, म्हणजे सशाचे पाठी एखादे जनावर लागले म्हणजे ससा पुढें पळतें व त्यापाठीं लागलेले जनावरानीं फारच गांठलेसें दिसलें म्हणजे खाली पडून दोन्ही कान आपले डोळ्यावर झांकून घेऊन झोपलेचें मिस घेतलें आणि मनांत आणिलें की झोंप लागल्यावर पाठी लागलेलें जनावरानें काय करावयाचें आहे असें मनांत आणितें. तेव्हां पाठी लागलेलें जनावर त्या सशास मारितें तसें तूं आरंभिलें

आहेस. कारण कीं, तूं निखालस सर्व गोष्टींपासून बेखबर, म्हणजे बेशुद्ध, जाहाला आहेस. असें बोलले तेव्हां त्या किल्लेदारानें दांडगेपणानें उत्तर दिल्हे कीं, आम्हीं आपले धण्याशिवाय दुसऱ्यास जाणित नाहीं व ओळखीत नाहीं. मग कोणी कां असे ना ? आमचा पादशाहा जिवंत आहे तोंपर्यंत आम्हीं त्याचे चाकर आहों. त्याचे सेवेंत प्राणखर्च करूं. असें उत्तर दिल्हें तेव्हां बातमीदारानीं तें सर्व वर्तमान अलमगीर पादशाहास कळविलें. तेव्हां अलमगीर पादशाहा यानीं आश्चर्य मानिलें. जाणिलें कीं, कैदेंत शिकंदर पादशाहा जिवंत असण्यांतहि नानाप्रकारचे फंदफितूर वगैरे बखेडे मोडत नाहींत. असें सांगण्यांतहि आहे कीं ग्रंथ वर्णन करणारांनीं हरएक कारण वर्णन करावें हा त्याचा हुद्दा आहे. यास्तव कारण वर्णन केलें जात आहे कीं, एक खरबूज विष भरून शिकंदर पादशाहाकडे पाठविलें. खोज्यास ताकीद केली कीं, हे खरबूज शिकंदराकडून मुद्दाम खावीव. असी आज्ञा केली तेव्हां त्या खोज्यानें पादशाहाचे आज्ञेप्रमाणें काम केलें. ते विषानें भरलेलें खरबूज शिकंदर पादशाहाकडून खावविलें आणि परत आला. ते विषानें भरलेलें खरबूज शिकंदर पादशाहा यानीं खातांच शिकंदर पादशाहाचे नाजूक, म्हणजे सुकुमार शरीरांत, तें विष प्रवेशलें आणि व्यास झालें. अलमगीर पादशाहा यांनीं पुन्हां आणखी लागोपाठच खोज्यास शिकंदर पादशाहाकडे पाठऊन निरोप सांगून पाठविला कीं आतां तुमचे मनांत जी इच्छा असेल ती सांगून पाठवावी, म्हणजे त्या प्रमाणें इकडून इच्छा पूर्ण करण्यांत येईल. तेव्हां शिकंदर पादशाहा यानीं उत्तर दिलें कीं, आपले कृपेचे छायेंत माझ्या सर्व ईच्छा पूर्ण जाहाल्या. आतां माझे मनांत कांहीं एक आशा राहिली नाहीं. परंतु एवढी मात्र आशा आहे कीं, माझे प्रेत माझे गुरुचे कबरे-संनिध त्यांचे चरणारविंदी जमिनींत पुरावें असें सांगितलें. नंतर तेच दिवशीं शिकंदर आदिलशाहा पादशाहा याणी या अपूर्व मनोरथाचे अकुंचीत स्थानाचा परित्याग करून ईश्वराचे कृपेनें विस्तीर्ण यशस्वी स्थळास जाता झाला, म्हणजे मरण पावला. आरबी वाक्याचा अर्थ : "ईश्वराची कृपा त्याजवर आणि त्याचे बाप आज्यावर असो :" नंतर शिकंदर आदिलशाहा पादशाहा यानी अंतकाळीं सांगितल्याप्रमाणें शिकंदर पादशाहाचे प्रेत अलमगीर पादशाहा याणी विजापुरास रवाना करून हजरत शाहा नईमुल्लाह हे हजरत शाह बुरहान याचे ज्ञानवान शिष्यमंडळीपैकीं एका शिष्याचे नातू व हजरत शाह हषम आलही याचे स्थानावर पदाधिकारी झाले होते. त्या हजरत शाहा नईमुल्लाहचे कबरेचे तळासी शिकंदर आदिलशाहा पादशाहाचे प्रेत पुरलें. अद्यापि शिकंदर पादशाहाची कबर मातीची आहे. त्या कबरेवर कांहीं एक इमारत नाहीं. सांगण्यांत असें आहे कीं, ज्या दिवशीं शिकंदर आदिलशाहा पादशाहाचें प्रेत विजापूर शहरांत आणिलें होतें ते दिवशीं विजापूरचे सर्व शहरांत एकच आरडा जाहाला. बहूत मंडळींची गर्दी रस्त्यांत व बाजारांत मेळेच्या मेळे जमले. बायका व पुरुष फारच जमून व शहरांतील राहाणारे एकंदर लोक मिळोन शिकंदर पादशाहा

मरण पावले या शोकानें अत्यंत आक्रोशानें रडूं लागले. त्या दिवशीं पृथ्वीप्रळया-सारखा शोकाचा दिवस प्राप्त जाहाला होता. हजारों स्त्रीयानीं रडरडून, भ्रतार मरण पावला म्हणजे त्याची स्त्री अत्यंत शोक करून काकणें फोडून विधवा होती त्याप्रमाणें, हजारो स्त्रीयांनीं आपले हातांतील काकणें व चुडे हाणहाणून घेऊन फोडिले.

## ७५. आदिलशाही कारकीर्द समाप्त होण्याचा शेवटचा पुरुष शिकंदर पादशाहा आहे. त्याचे परिणामाचे थोडेसे वर्णन प्रकर्ण :

तात्पर्य : शिकंदर पादशाहा राजधानींत लक्ष बागेंतील एक वृक्ष उगवलेला होता. राजधानी व संपती तल्लक्षण उंच स्थानावरील एक नक्षत्र होता. परंतु त्या वृक्षास मनोरथपूर्णपणाची ताजगी व सुखाची टवटवी न येतां कालचक्राचे अति कठीण वायूनीं तो वृक्ष सुकला आणि सुखाचे व मनोरथपूर्णपणाचे उंचत्वास न पोंहचून जलद नाश प्राप्त जाहाला. यद्यपि शिकंदर पादशाहा तक्तावर बसण्यास दैववान जाहाला परंतु काय उपयोग ? कारण कीं, शिकंदर बादशाहाचे सर्व आयुष्य राजधानीचे कारभाराची मुखत्यारी हातीं न राहातां खर्च झालें होतें, ३२ बतिस वर्षे आयुर्दाय होतें, परंतु काय फळ ? कारण कीं, शिकंदर पादशाहाचे वय संकटांत व शत्रुचे मनोरथपूर्णपणांत खर्च झालें होतें. नाहीं नाहीं म्हणजे असें म्हणावें कीं काय असें म्हणो नये. यद्यपि या नाशवंत पृथ्वीतील सुखापासून शिकंदर पादशाहा बेन-सिब राहिला परंतु पवित्र परलोकीचे मधुरतेनें अत्यंत संतोषरूप व सफलीत होऊन या लोकीचे राजधानीबदल परलोकीची दौलत हस्तगत केली. तेव्हां शिकंदर पादशाहा याजला अशाश्वत राजधानीबदल परलोकीचें कल्याणप्रद राज्य प्राप्त झालें असेल व सत्य शिकंदर पादशाहा मनोरथपूर्णपणानीं या पृथ्वींतून निघोन गेला असेल. कारण कीं, ईश्वराचे देवडींत नुकसानास प्रवेश नाहीं, म्हणजे साफी सुफी याचा धर्म व या लोकांचा आचार म्हणजे ज्ञानवान विरक्त साधूचा धर्म शिकंदर पादशाहांत पूर्ण होता. पूर्ण ज्ञानी लोकांची संगती करून ज्ञानमार्ग उत्तम करून शिकंदर पादशाहा आपण खुद जातीनें श्रेष्ठ शेख लोकांत योग्यता पावोन शाश्वत ज्ञानाचे राजधानीचा बंदोबस्त प्राप्त करून घेऊन ज्ञान तल्लक्षण मुलकाचा पादशाहा जाहाला होता. त्या काळांतील शेखपणाचा आधार व ज्ञानवान शाहा नईमुल्लाह हे अति श्रेष्ठ होते. त्याजला शिकंदर पादशाहा याणी शरण जाऊन हा ज्ञानमार्ग त्याजपासून शिकून घेऊन ईश्वरप्राप्तिचा मार्ग समजून घेऊन व दुसरे कित्येक ज्ञानवान लोकांचीहि संगती करून विषयांतून चित्त काढून फळ प्राप्त करून घेतलें होतें.

७६. जसे कीं :

ज्ञानवान शेख महंमुद बहरी सर्व ज्ञानी पुरुष तल्लक्षण नवरीचा नवरा, म्हणजे सर्वांहून ज्ञानी, आणि जव्हेरुह म्हणोन ग्रंथ केला आहे त्या ग्रंथांत शेख महमुद हे लिहितात कीं, विजापूर येथील मालक पुरुषांपैकीं शेवटचा पुरुष शिकंदर पादशाहा. त्या शिकंदर पादशाहासी कांहीं कारणाचे योगानें कित्येक दिवस माझा सहवास झाला होता. शिकंदर पादशाहाचे खासे तंबूतच एक दोन वर्षे राहिलों होतों. तेव्हां एके दिवसीं शिकंदर पादशाहा याणी बहूत मर्यादेनें मजला विचारिलें कीं, जीव म्हणोन काय पदार्थ आहे व जीव कशास म्हणतात. हें लक्षण सांगावें. असें विचारीलें तेव्हां मी बोललों कीं, जीव म्हणोन कांहीं असा पदार्थ नाहीं कीं, कोणी जीवाचे सुक्ष्म म्हणजे फार बारिक लक्षण बोलण्यानें प्रत्यक्ष दाखवील व दुसरा कोणी जीवाचे लक्षण समजून घेईल असा पदार्थ नाहीं. जीव म्हणजे ईश्वराचे प्रतिबिंब आहे. बहुधा ईश्वराचा प्रत्यय जसा चिंतनानें व विचारानें सत्य मानावें तसेंच जीवाचें लक्षण प्रत्यय असें जाणिवेची गती तेथपर्यंत पोंहचत नाहीं. तर्काचा घोडा ज्ञानाचे अरण्यांत दौड करुं शकत नाहीं, म्हणजे जिवाचें रूपवर्णन करण्यांत तर्काची गती चालत नाहीं. सग्दुरु कृपा करून ज्यास जीवाच्या लक्षणाचा उपदेश करितात आणि प्रत्ययास आणोन देतात त्याची जिव्हा आधीं बंद करितात, म्हणजे ज्यास ज्ञान प्रत्यय होतो तो शद्बपांडित्य करित नाहीं. ज्ञानांतच निमग्न असतो. पारसी बैतेचा अर्थ : "जीवाचे रूप प्रगट करण्यांत मी वर्णन करूं शकत नाहीं. इतकें मात्र जाणतों कीं, निर्गुण स्वरूपांत जीव म्हणोन केवळ ईश्वराचे रूप आहे व साकार रूपांत ईश्वराचे प्रतिबिंबास जीव असे नामाभिधान जालें : १ :" जर करितां एखादा मूर्ख बोलेल कीं, जीव मी प्रत्यक्ष पाहिला व दुसऱ्यासहि मी जीव प्रत्यक्ष दाखऊन देतो, असें म्हटल्यास त्यांचें ते गेलणें असत्यपणाची साक्ष देते म्हणोन तो असत्य बोलतो. त्यास कांहींच ज्ञान प्रत्यय नाहीं व ईश्वरावर तुफान घेतो. त्याची जिव्हा तुटोन पडो व तें असत्य भाषण ऐकणाराचे कान जावोत, म्हणजे बहीर होवोत. पारसी बैतेचा अर्थ : "हे प्राणप्रिया, आपले चित्त स्वाधीन करून घेतलेले पुरुषाप्रमाणें मर्यादेच्या चाली शिकण्याविषयीं यत्न कर. खबरदार आस : हे प्राणप्रिया, अमर्याद पुरुपास कोणतेच कचेरींत मार्ग नाहीं : १ : जो पुरुष या ज्ञान मार्गातील मुख्य असतो त्याचे दृष्टींत मर्यादसील पुरुष पुष्पासारिखा दिसतो अमर्याद पुरुष चिखलासारखा दिसतो : २ :" या बैतेंत गुल म्हणोन पुष्पाचे नांव व गील म्हणोन चिखलाचे नांव आणिलें आहे. यांतील तात्पर्य हें आहे कीं, गुल व गील हे दोनीहि शद्ब फारसी लिपीनें लिहिण्यांत एकसारखे एका रूपाचेच येतात. त्यापैकीं एका शद्बास पेष लागल्यानें गुल असें होतें व एका शद्बास

जेर लागल्यानें गील असें होतें. परंतु जेर जबर न देतां लिहिलें असतां दोन्हीहि शब्द एकसारखेच दिसतात. अर्थ जाणणारे आहेत ते मागील पुढील अर्थ लक्षांत आणून गुलास गुल म्हणतात व गिलास गिल म्हणतात. तसें मर्यादसील पुरुष व अमर्याद पुरुष हे दोघेहि एकसारखेच दिसतात. परंतु ज्ञानी आहेत ते उभयतांचे लक्षणावरून मर्यादशील कोण व अमर्याद कोण हे जाणतात. यास्तव मर्यादेची चाल शिकण्यास यत्न कर. असें सांगितलें. शेख महंमुद बहरी याणी ' जव्हेरे दुनया ' म्हणोन ग्रंथ केला आहे. त्या ग्रंथांत लिहितात कीं, शिकंदर खान आदिलशाहा हा विजापूर येथील राजधानीचे पादशाहापैकीं शेवटचा पुरुष आहे. या शिकंदर पादशाहा याणी फकिरास म्हणजे मला विचारलें कीं, दुनिया म्हणोन काय पदार्थ आहे. तेव्हां मी बोललों कीं, देहाचा परित्याग केला असतां परलोकीं जो पदार्थ उपयोगी पडत नाहीं त्यास दुनिया असें म्हणावें. असें बोललों तेव्हां शिकंदर पादशाहा बोलला कीं, असें सर्व बोलतात हें सत्य आहे. परंतु माझें चित्त अर्शास पोंहचे अशी कांहीं खुणेची गोष्ट कृपा करून सांगावी, कीं त्या योगानें मी ज्ञानी होईन आणि येविषयींची गोडी घेईन. तेव्हां मी बोललो कीं, जो पदार्थ हातांत येतो व दृष्टीनें दिसतो व चित्तांत समावतो व ज्या पदार्थास नांव व खुणेचा निर्देश आहे मग तो पदार्थ मुलकचे अवस्थेंतील असो किंवा मलकुतचे दशेंतील असो त्यास दुनिया असें म्हणावें. मुलक म्हणजे सूर्य चंद्रापासून जमिनीपर्यंत जितका पदार्थ दृष्टीस दिसतो त्यास मुलक असें म्हणावें व जितका पदार्थ अगोचर म्हणजे दृष्टीस दिसत नाहीं त्यास मलकूत असें म्हणावें. जितकें दृष्टीस दिसतें तो दुनया म्हणोन पदार्थ आहे. त्याशिवाय जितकें आहे तितका दीन म्हणोन पदार्थ आहे. याप्रमाणें दीन व दुनयाचा भेद आहे असें सांगितलें. तेव्हां हें बोलणें ऐकून शिकंदर पादशाहास आनंद झाला. शिकंदर पादशाहा याणी बहूत शाबासकी दिली. फारसी बैतेचा अर्थ : " जितका पदार्थ शरीरांत आहे तितकी दुनिया आहे. यद्यपि तो पदार्थ शरीरांत असोन दिसत नाहीं, तत्रापि दुनियाच आहे : १ : जितका पदार्थ शरीरांचे प्रतिबंधांत नाहीं तितका पदार्थ दीन आहे. जर करितां तूं मजपासून ऐकून घेसील तर तुला येविषयींची खूण सांगतो : २ : दुनया म्हणोन काय पदार्थ आहे व दीन कशास म्हणतात असें जर विचारशील तर शरीर हें दुनिया आहे व जिव्हा दीन आहे. ती मूर्खता व हें ज्ञान आहे, म्हणजे दुनया ही मूर्खता आहे व दीन हें ज्ञान आहे : ३ : दीन हा उत्तम पदार्थ आहे व दुनया हा अयोग्य पदार्थ आहे. तो शिष्य आहे व हा गुरु आहे : ४ : " याप्रमाणें बोलणें समाप्त जाहालें तेव्हां या विस्तारापासून जाहीर होत आहे कीं, शिकंदर पादशाहा यानीं साधूचे व विरक्त पुरुषांचें धर्मापासून गोडी घेतली होती. त्या शिकंदर पादशाहावर ईश्वराची कृपा असो व त्याचें कल्याण असो.

७७. विजापूरचा किल्ला घेऊन फत्ते झाल्यानंतर अलमगीर पादशाहा याणी विजापूर ताब्यांतील एकंदर मुलुख व शहरें हस्तगत करण्याकरितां बहुत दिवस खर्च केले. त्या प्रकर्णांतील थोडेसें वर्णन प्रकर्ण :

अलमगीर पादशाहा याणी विजापूरचा किल्ला घेऊन फत्ते केल्यानंतर विजापूर ताब्यांतील मुलुख कित्येक दिवसानंतर हस्तगत केला. त्या प्रकर्णांपैकीं थोडासा मजकूर लिहिला जात आहे कीं, अलमगीर पादशाहा विजापूर येथें दिड महिना राहून तारिख २ दुसरी माहे जिल्हेज (१० आक्टोबर १६८६) रोजी विजापूर येथून कूच करून तारिख २८ अठ्ठाविस (५ नवंबर १६८६) रोजीं अलमगीर पादशाहाची स्वारी सोलापुरास दाखल जाहाली.[५६] तेथें एक महिना राहून तारिख २९ एकोणतीस माहे मोहरम (६ दिसेंबर १६८६) रोजीं कलबुर्ग्याकडे जाण्यास पादशाहा याणी कूच केलें.[५७] तेथें बेदरावर उतरून हैदराबादेकडे चालते झाले. तारिख ४ चवथी माहे रबिलावल (९ जानेवारी १६८७) रोजीं गोवलकुंड्यापासून एक कोशावर उतरून गोवलकुंड्याचे किल्यावर हल्ला केला.[५८] विजापुरावर लढाई चालली होती त्या समयीं शाहा अलम बहादूर शाहा हा शिकंदर पादशाहासी सख्य ठेऊन कोणास न कळूं देतां आदिलशाहास पत्रें पाठवित होता. हा एक संशय होता. या कारणास्तव व गोवलकुंड्यावर हल्ला चालला होता ते समयीं सदरहू शाहाजादा हा अबुल हसनासी सख्य ठेवित होता. याजकरितां व कित्येक लोकांनीं ती शाहाजाद्याची फितुरीपत्रें धरून जिनसांसुद्धां अलमगीर पादशाहापासी हजर केली. यास्तव अलमगीर पादशाहा याणी शाहाजाद्यावर अत्यंत क्रोधायमान होऊन शाहा अलम बहादूर शाहा याजला त्याचे दोन पुत्रांसहित तारिख २६ सवीसावी माहे रजब (२८ मे १६८७) रोजीं नजरबंदीचे पाहाऱ्यांत ठेविलें. शाहाजाद्याकडील एकंदर कारखानें व त्याची दौलत सर्व जप्त केलें.[५९] एकाच राहूटींत शाहाजादा याजला त्याचे पुत्रांसहित

५६. On Saturday, the 30th October 1686/22nd Zilhijja, the Emperor left Bijapur and reached Sholapur on Tuesday, the 2nd November 1686/25th Zilhijja.– MiA, p. 173.

५७. On Sunday, the 5th December 1686/29th Muharam, the Emperor started from Sholapur for Gulbarga.– MiA, p. 177.

५८. शके १६०८ माघ मासी (जानेवारी १६८७) कुतुबशाहा बसवपटण आदिकरून भागानगर अवरंगजेबास दिल्ही. कासिमखानाचे विद्यमानें तेच मासी औरंगजेबें भागानगरीस येऊन वेढा घातला.– जेधेश, पृ. ३४.

५९. On Saturday the 28th August 1687/18th Shawwal, Shah Alam's disloyal servants etc. expelled .....– MiA, p. 178–179.

रहावयास जागा ठराऊन त्या राहुटींत ठेविलें. तारिख ४ चवथी माहे जिलकाद ( २ सप्टेंबर १६८७ ) अलमगीर पादशाहा तक्तावर बसल्याचा राजशक ३१ एकतीस रोजीं आठ महिने व कांहीं दिवस गुजरल्यानंतर गोवलंकुड्याचा किल्ला घेऊन फत्ते जाहाली.[६०] तेव्हां कुतुबुद्दीनमुल्क अबुल हसन याजला नजरबंदीचे पाहऱ्यांत कैद करून दौलताबादेस रवाना केलें. पाम नाईक म्हणोन बारा हजार स्वार व एक लक्ष सिबंदीचा धणी होता. तो पाम नाईक आदिलशाहाचे चाकर मंडळींपैकीं होता. त्याजकडे सकरगडचा किल्ला ( सागरगड ) होता. तो किल्ला तारिख २ दुसरी माहे सफर राजशक ३२ बत्तीस ( १६ नवंबर १६८८ ) रोजीं पाम नाईकाचे हातून सोडऊन घेतला.[६१] त्या किल्यास नूसरतगड असे नांव ठेविलें. तो पाम नाईक हा अहमदनगरांत सेवेंत हजर होऊन पांच हजारी किताब पावला होता. विजापुरावर व हैदराबादेवर बहुत हल्ला व लढाया शत्रुलोकांप्रमाणें करित होता. याजकरितां रूहुल्लाहखान याजला नेमिलें होतें. त्याणी किल्ला हवाली केला. तो पाम नाईक खान मशारनिल्हेचे समागमें येऊन अलमगीर पादशाहापासी हजर जाहाला. पांच दिवस चाकरींत राहून (मरण पावला)[६२] तारिख १ माहे रबिलावल सन मजकूर ( १५ दिसेंबर १६८८ ) रोजीं हैदराबाद येथून[६३] कूच करून तारिख १४ ( २८ दिसेंबर १६८८ ) रोजीं बेदरचे शहरास पोहचले.[६४] तेथून कूच करून तारिख ३ री माहे जमादिलावल ( १४ फेब्रुवारी १६८९ ) रोजीं कल्बुर्ग्यास पोंहचून तेथून निघोन तारिख २२ माहे मजकूर (५ मार्च १६८९) रोजीं विजापूर शहरास पोहचून

६०. शके १६०९ भाद्रपद शुध १२ ( ८ सप्तेंबर १६८७ ) अवरंगजेबे भेद करून भागानगर घेतलें.– जेधेश, पृ. ३४. At midnight, on Wednesday, the 21st September 1687/24th Zilqada. through the treachery of Sarandaz Khan Batni Bijapuri. ... the fort was captured.-MiA,p.182-183.

६१. On Monday, the 28th November 1687 /2nd Safar, the fort of Sagar bowed to the Muslim leaders.- MiA, p. 186.

६२. On Tuesday, the 27th December 1687/2nd Rabi, A. the Emperor granted Pam Nayak an interview and honoured him... .. After attending the Court for five or six days he suddenly set off to visit hell.- MiA, p. 186.

६३. On Wednesday, the 25th January 1688/1st Rabi-S., the Emperor started for Bijipur.- MiA, p 187.

६४. On Tuesday, the 7th February 1688/14th Rabi-S., the Emperor reached Zafarabad Bedar.- MiA, p. 187.

किल्याचे आंत खवासखानाचे वाड्यांत येऊन उतरले.[६५] बेळगांवचा किल्ला याच दिवसांत शाहाजादा महंमद आआजमशाहा याचे यत्नानें घेऊन फत्ते जाली. त्या किल्यास आआजमनिगड असा किताब दिल्हा.[६६] तारिख १८ अठरावी माहे सवाल राजशक ३२ (५ आगष्ट १६८८) रोजीं गाजीउद्दीनखान याचे यत्नानें उदोनीचा किल्ला घेऊन फत्ते जाहाली.[६७] सिद्दी मसऊदखान याणी आदिलशाहाचे निसबतीनें तो किल्ला व त्या किल्याचे ताब्यांतील एकंदर मुलुख हस्तगत केला होता. त्या मसऊदखानानें आधीं युद्धांस व शत्रु पराभव करण्यास तयार जाहाला. अलमगीर पादशाहाचे फौजेसी लढाई करण्याकरितां पुढें चालून आला. शेवटीं मसऊदखान याणी सख्य करण्याचा विचार करून किल्ला हवालीं करून देऊन खान असा किताब व सात हजारीचे पद व सात हजार स्वार मिळऊन योग्यता पावला. मसऊदखान म्हातारपणामुळें हुजूर येऊन पोंहचला नाहीं. कित्येक असें बोलतात कीं, मसऊदखानाचे तोंडावर कोड होते, सबब तोंड कसें दाखवावें या लाजेस्तव त्याणीं आपले पुत्रास हुजूर पाठऊन त्याजकडून सलाम व मुजरा करविला. उदोनीचे किल्यास इमतीयाजगड असा किताब मिळाला. अद्यापि अलमगीर पादशाहा हे विजापुरांत राहिले होते. तोंच राजशक ३३ तेहतीसचे वर्षांतील मोहरमचा महिना (आक्टोबर १६८९) अर्धा गुजरल्यानंतर अर्धे मोहरमांतच विजापूर येथें महामारीचा मोठा उपद्रव जाहाला.[६८] या उपद्रवांत एक लक्ष मनुष्यें बाजारी लोक व एकांडे शिपाई व गांवांतील राहणारे गांववाले व कित्येक थोर लोकहि मरण पावले. बहुतेक मनुष्यांचे या उपद्रवानें डोळे व कान गेले. कित्येक मनुष्यें मुकीं जाहालीं. इतका उपद्रव जाहाला व अलमगीर पादशाहाचे स्वारीसमागमें आलेले कित्येक थोर थोर लोक व पादशाहाची स्त्री औरंगाबादी होती ती व फाजीलखान सदरेकडील काजी मुफ्ती खतीब वगैरे इमामांची चौकशी करणार कामदार व राजा जसवंत याचा पुत्र महंमदीराज वगैरे सुद्धां कित्येक लोक मरण पावले. असे बोलतात कीं, जेव्हां औरंगाबादीचे

६५. On Saturday, the 25th February 1688, 3rd Jamad, A., the Emperor reached the outskirts of Gulbarga. On Thursday, the 15th March 1688 22nd Jamada. A., the Emperor reached Bijapur. – MiA, p. 188.

६६. शके १६०७ फाल्गुण मासी (मार्च १६८८) अजम शाहा याणी बेळगांव घेतलें व कित्येक किल्ले घेतले.– जेधेश, पृ. ३४.

६७. On the 6th August 1688/8th Shawwal the fort of Adoni surrendered to Firuz Zung Bahadur.– MiA, p. 191.

६८. शके १६१० आश्विन मासी (सप्तेंबर-आक्टोबर १६८८) विजापुरांत महामारी आली.– जेधेश, पृ. ३४.

प्रेत दफन करण्यास म्हणजे जमिनींत पुरावयास नवबागेकडे नेत होते तेव्हां औरंगाबादीचें प्रेत उचलून नेत होते त्या प्रेत उठवणारापैकीं खवासखानाचे वाड्यापासून मनुष्यें पुरावयाचे जाग्याचे गांवापर्यंत सोळा बोझी (वा)ले जागोजाग या उपद्रवानें पडले आणि मरण पावले. सदरहू पटकीचा उपद्रव जाहाला तेव्हां या उपद्रवाचे प्रारंभी असा प्रळय झाला कीं, मनुष्यें प्रेतास कफन दफन म्हणजे प्रेतावर वस्त्र घालणें व प्रेतास पुरण्याविषयीं थकून गांवांतील मेलेले मनुष्यांचे प्रेतांस नांगरानें ओढून रानांत नेऊन टाकित होते. एके दिवशीं इलाहपुरचे दरवाजानें जे नांगर बाहेर नेले होते त्या नांगरांची संख्या केली, म्हणजे मोजिले, तों सातशें नांगर गणतीस लागले. बहुतेक घरांची दशा अशी झाली होती कीं, हरएक घरांतील राहणारीं मनुष्यें रात्रीं घराचे दार लाऊन निजत होतीं. प्रात:काळपर्यंत तीं घरांतील सर्व मनुष्यें लहान थोर व पुरुष व स्त्रीया सुद्धां एक माणूसदेखील जिवंत न राहातां घरांचीं दारें आंतून कड्या लावलेलीं तशींच राहत होतीं. घरा शेजारचे आडोसीपडोसी राहणार लोकांस त्या महामारीचे मोठे उपद्रवामुळें आपले दु:ख एकीकडे ठेऊन शेजारचे राहणाराचे घरास जाऊन मेलेले माणसांबद्दल एकमेकांचा समाचार घ्यावा इतकीदेखील फुरसत पडत नव्हती. असें वाटतें कीं, महामारीचे उपद्रवाचा समय पृथ्वी प्रळयाचे दिवसांसारखाच जाहाला होता. पटकीची अशी गर्दी झाली कीं, कोणासहि दुसऱ्याचे शांतवन करण्यास व समाचार घेण्यास फुरसत पडत नव्हती. यांतील तात्पर्य हें आहे कीं, सर्वांचेच घरीं या प्रकारचा पटकीचा उपद्रव तेव्हां कोणी कोणाचा समाचार घ्यावा ? जो तो आपआपले दु:खांतच निमग्न होता. आरबी बैतेचा अर्थ: "असा एक दिवस आहे कीं कोणीच कोणाची परवा करणार नाहीं, म्हणजे मरणाचे दिवशीं कोणीच कोणाचे ओझें उचलणार नाहीं." त्या समयांत मनुष्याची अशी अवस्था जाहाली होती कीं, कांहीं कांहीं घरें पांच पांच सहा सहा महिनेपर्यंत तशीच दारें लावून बंद झालेलीं होती. कोणीच कोणाचा असा नातलग किंवा अडोसीपडोसी शेजारचा राहणारा स्नेही राहिला नाहीं, की त्यानी येऊन या अनाथ मनुष्यांचा समाचार घेऊन त्याचें घर उघडावें असा कोणी नव्हता. मेलेले माणसांचें घेतन मालाचा इच्छकहि कोणी नव्हता. कोणी प्रेताचे मालमत्तेकडे पहात नव्हता. या महामारीचे मोठे उपद्रवाची तारिख या अर्धे बैतेंत बांधून वर्णन केली आहे. त्या अर्धे बैतेचा अर्थ : "हा पृथ्वीप्रळयाचा समय होता कीं महामारीचा उपद्रव होता." इतका या अर्धे बैतेचा अर्थ आहे. 'मीयामत बुहायापुवबाबुद' इतकीं अक्षरें अब-जदचे हिशोबानीं गणिलीं असतां ११०१ अकराशेंएकचा (१६८९–१६९०) सन निघतो. या सालीं हा महामारीचा उपद्रव जाहाला. महामारीचा मोठा उपद्रव येथ-पर्यंत जाहाला तेव्हां पादशाहाचे वाड्यांतील महालांत कित्येक खाशा स्त्रीया व कित्येक

शाहाजादे व कित्येक सेवेवरील लोकांहि मरण पावले. पादशाहाचा राजशास्त्री होता तो शास्त्रानें जे पदार्थ वर्ज केले आहेत त्या पदार्थापासून जसें शास्त्रज्ञ पळतो तसा महामारीचे उपद्रवाचे भयानें पळोन गेला. पादशाहा विजापुरांतच राहिले. तेव्हां पादशाही दरबारांतील कारभारी लोक घाबरून धर्मशास्त्राचा शास्त्रार्थ सांगणाऱ्यांचे शास्त्रार्थानें पादशाहास यासमई येथें राहूं नये, महामारीचा उपद्रव फार जाहला आहे, यास्तव हें शहर सोडून बाहेर निघावें हें उत्तम असें बोलून पादशाहास विजापुरांत राहण्याविषयीं मनाई करते जाहाले. तारिख ३ माहे रबिलावल (६ दिसेंबर १६८९) रोजीं लढाईस निघण्याकरितां तयारी करून विजापूर येथून निघोन आकळूजकडे जाते जाहाले.[६९] आठ रोजानंतर महामारीचे प्रळयाचा अग्नि व पटकीची गर्दी निखालस शांत जाहाली. परंतु तो उपद्रव तीन वर्षेपर्यंत सारखा गांवोगांव चालला होता. त्या महामारीचे उपद्रवांत हजारो घरें व महाल ओसाड जाहाले. किल्याचे कोटाचे आंत जितक्या बहुत कबरी, म्हणजे मेलेले माणसाची थडीं, दिसतात तीं त्याच महामारीचे उपद्रवांतील आहेत. तारिख १६ माहे रबिलावल (१९ दिसेंबर १६८९)[७०] रोजीं मौजे कोरेगांव येथून कूच करून विजापुराकडे निघाले. तारिख १० माहे जमादिलावल (१० फेब्रुवारी १६९०) रोजीं मौजे बिदरी या गांवावर श्रीकृष्णतीरीं पोंहचून[७१] तेथेंच दोन महिनेपर्यंत राहिले. तारिख १९ माहे साबान (१९ मे १६९०) रोजीं बिदरीहून कूच करून मंगल्यास (गलगल्यास ?) येऊन पोहचले.[७२] याच महिन्यांत शेख निजाम दक्षिणी सर्वांस प्रसिद्ध व आदिलशाही राजधानींतील चाकर मंडळींतील होता तो या राजधानींत बखेडा जाहाल्यानंतर कुतुबुलमुल्क अबुल हसन याचे चाकरींत दाखल जाहाला. कित्येक दिवसानंतर तेथून निघोन अलमगीर पादशाहाचे दरबारांत येऊन चाकर मंडळांत दाखल जाहाला. मुकरबखान असा किताब मिळऊन पन्हाळ्याचा

---

६९. शके १६१० मार्गसीर्ष मासी (नवंबर-दिसेंबर १६८८) अवरंगजेब विजापुरीहून तुळापुर नजिक भीमातीर येथें आले.– जेधेश, पृ. ३४. Friday the 14th December 1688/1st Rabi-A., was chosen as the day for starting from Bijaper.-MiA, p. 192.

७०. On Wednesday, the 18th December 1689/16th Rabi-A., the imperial camp started on the return journey from Koregaon, towards Bijapur.– MiA, p. 200.

७१. On 9th February 1690 10 Jamad A., the camp reached the village of Badri.- MiA, p. 200

७२. On Sunday, the 18the May 1690/19th Shaban, the Imperial Camp marched from Badri to Galagala.-MiA, p. 202.

किल्ला हस्तगत करण्याचे कामावर नेमिला गेला होता. इतक्यामध्यें संभाजी हे त्याच दिवसांत राहेर येथून खेळण्याचे किल्यास जाऊन[७३] तेथील बंदोबस्त करून संगमनेर (संगमेश्वर) येथे संभाजीचा दिवाण कबकलश यानीं हवेली व बाग बांधिली होती तेथें राहून संतोषांत व सुखांत निमग्न जाहाला. यानंतर खान फिरोजजंग याजला संभाजीचा निर्मूळ फडशा करण्याचें कामावर नेमिलें होतें. परंतु पटकीचे उपद्रवानें त्याचे डोळे गेले होते. यास्तव महंमद आआजमशाहा याजला त्याचे बदलीवर नेमिलें. अद्यापि शोधांतच होते. संभाजी हातीं लागला नव्हता. तोंच एकाएकीं संभाजीची खबर शेख निजाम याजला समजली. तेव्हां शेख निजाम यानीं चार पांच हजार स्वारानिशीं दौड करून कोणास न कळूं देतां त्या निर्दैवी पुरुषावर, म्हणजे संभाजीवर, जाऊन पोहचला व संभाजीहि लढाईस उभा राहिला. तेव्हां संभाजीचा दिवाण कबकलश हा जखमी जाहाला आणि संभाजी हवेलींत छपून राहिला. यानंतर संभाजीची एकंदर घर मंडळी धरीलीं गेली. त्या मंडळीस तारिख ५ माहे जमादिलावल (२७ फेब्रुवारी १६८८) रोजीं बहादूरगडचे किल्यांत हूजूर आणऊन त्याजला कैद केले. त्यानंतर संभाजीहि कैद जाहाला.[७४] तारिख २९ एकूणतीसावी माहे मजकूर (२२ मार्च १६८८) रोजी संभाजी कोरेगांव उर्फ फत्तेहाबाद येथें कत्तल जाहाला, म्हणजे ठार मारला गेला, [७५] काफेर नह नुमीरत्फ, म्हणजे नरकास जाण्यास योग्य असा जो हिंदु, तो गेला, म्हणजे मरण पावला. हा या फारसी शब्दाचा अर्थ जाहला व 'काफेर नह नुमीरत्फ' इतकीं अक्षरें अबजदचे हिशेबानें गणिलीं असतां १०८९ दहाशे एकूण नव्वद सन निघतो. या सनांत संभाजी कत्तल जाहाला. संभाजीस कत्तल केलें या सेवेबद्दल शेख निजाम मकरबखान याजला खानजमान फतेजंग असा किताब व सात हजारी असें पद व सात हजार स्वार प्राप्त जाहाले. एकलासखान व शेख मिरान हे उभयतां शेख निजामखानाचे

७३. शके १६१० कार्तिक मासी (आक्टोबर-नवंबर १६८८) संभाजीराजे रायगडाहून कलशाचे मदतीस (पन्हाळ्यास) आले....... . शिर्के (गणोजी शिर्के) यासी युद्ध करून त्यास पळवून खेळणियास आले.– जेधेश, पृ. ३४.

७४. शके १६१० माघ वद्य ७ (१ फेब्रुवारी १६८९) शुक्रवारी संभाजीराजे व कवि कलश रायेगडास जावयास संगमेश्वरास आले असतां सेक निजाम दौड करून येऊन उभयतांस जीवंतच धरून नेले. वरकड लोक रायगडास आले.–जेधेश, पृ. ३४-३५.

७५. शके १६१० फालगुण वद्य ३० (११ मार्च १६८९) अवरंगजेबे तुलापुरीं संभाजी राजे व कवि कलश यास जीवें मारून सिरच्छेद केले.–जेधेश, पृ. ३५. Sambha was executed along with Kavi Kalas with the sword on Monday, the 11th March 1689/29th Jamadilawwal.– MiA, p. 196.

पुत्र होते. त्या उभयतांस एकास खानआलम व एकास मुनवरखान असे किताब प्राप्त जाहाले. संभाजीचा भाऊ रामाजी उर्फ संताजी (?) हा संभाजी वारल्यानंतर सरदारपणाचे नांवानें प्रबळ जाहाला होता, म्हणजे मी एक सरदार असें म्हणवित होता. यआतेकादखान हा राहेरीचे लढाईवर नेमिला होता. यांणीं राहेरीचे किल्यांतील राहाणारांवर मोठा कठीण प्रसंग आणिला.[७६] तेव्हां रामाजी यांनीं वैराग्याचा वेश घेऊन एकंदर मऱ्हाटे सरदार मंडळींसहित पळोन[७७] गेला. मलबार व कर्नाटकाचा रस्ता धरिला. अबदुल्लाखान हा प्रथम रूहुल्लाखान याचे निसबतीचा मुखत्यार होता. त्यानंतर त्याजकडे विजापुरचे सुभेदारीचे काम झालें. त्या अबदुलखानानी रामजी वगैरे सरदार पळून गेले त्यांचा माग लाऊन तुंगभद्रेचे किनाऱ्यास राणेबेदनूरचे जमेदाराचे किल्ल्यांत त्यावर जाऊन पोंहचला. बहिरराव मान्या घोरपडा हे उभयतां व सरासरी शंभर थोर थोर चाकर लोक कैद केले. रामा खुद जातीनें एकटा बाहेर पळून गेला होता. या प्रकर्णी अबदुलखान याजविसी हुजूर अलमगीर पादशाहापासी गिल्ला समजविण्यांत आला. तेव्हां पादशाहा फार क्रोधायमान जाहाले. तो इतराजींत आला. त्यानंतर लष्करखान हा विजापुरचा सुभेदार जाहाला. या सुभेदाराचे सुस्तीमुळें हिंदुराव वगैरे विजापुरांत जे लोक कैद होते ते कैदेंतून पळोन गेले. या कारणानें तो सुभेदार इतराजींत आला. संभाजीस पकडण्यापूर्वीं राहेरचा किल्ला घेण्याचे कामावर यआतेकादखान याजला नेमिलें होतें. त्याचे यत्नानें तारिख ५ माहे मोहरम राजशक ३४ चवतीस (२८ सप्टेंबर १६९०) रोजीं राहेरचा किल्ला घेऊन फत्ते केली. तारिख ७ वी माहे मजकूर (३० सप्टेंबर १६९०) रोजीं यआतेकादखान हा अलमगीर पादशाहापासी हुजूर येऊन पोंहचून त्याजला झुलफुकारखान बहादूर असा किताब प्राप्त जाहाला. शिवाजीची स्त्री वगैरे व संभाजीचे निसबतीचे लोक कैद जाहाले होते. त्यांजला आणवोन मोठे तंबूत बंदोबस्तानें ठेविलें. ये विषयांचे बंदोबस्तावर आसदखान

७६. शके १६११ चैत्र शुध १५ (२५ मार्च १६८९) अवरंगजेबे जुलपुकारखानास पाठऊन रायेगडास वेढा घातला. जेधेश, पृ ३५. Before the capture of Sambha Itiqad Khan had been sent to conquer fort Rairi...... On Saturday, the 19th October 1689/15th Muharam, he captured the fort and made the moches, wives, daughters and sons of Sambha.- MiA, p. 199.

७७. शके १६११ चैत्र वद्य १० शुक्रवारी (५ एप्रिल १६८९) राजाराम पळोन प्रतापगडास गेले.......आश्विन वद्य ८ गुरुवारीं (२६ सप्टेंबर १६८९) राजाराम पन्हालियाहून स्वार होऊन कार्तिक वद्य ११ (२८ आक्टोबर १६८९) वेलुरास आले. तेथून चंदीस आले.- जेधेश, पृ. ३५.

याजला नेमिलें. संभाजीचा पुत्र शाहू राजा हा नऊ वर्षांचा होता. त्याजला सात हजारी किताब व सात हजार स्वार व चौघडा व राजे असे पद अलमगीर पादशाहा याणी कृपा करून दिल्हे.[७८] तारिख ६ वी सहावी माहे सफर (२९ आक्टोबर १६९०) सन मजकूर रोजीं रायचूरचा किल्ला रुहुल्लाहखान याचे यत्नानें फत्ते जाहाला. त्या किल्यास फेरोजगड असा किताब मिळाला.[७९] तारिख ४ माहे जमादिलाखर राजशक ३४ चवतीस (२३ फेब्रुवारी १६९१) रोजीं गलगले उर्फ कुतुबआबाद येथून कूच केलें आणि विजापुरावर येऊन पोहचून किल्याचे बाहेर डेरे ठोकिले.[८०] अलमगीर बादशाहाची फौज हल्लीं विजापुरावर येऊन उतरली. ही चौथी वेळ आहे, म्हणजे यापूर्वी तीन वेळ आली होती. हली आली, ही चौथी वेळ आहे. तारिख ९ वी माहे रमजान राजशक ३५ पस्तीस (२८ मे १६९१) रोजीं महंमद कामबक्षी याजला चंदीचे तर्फेत बंड झालें होते त्या बंडवाल्यास पकडण्याकरितां निरोप दिल्हा.[८१]

७८. शके १६११ कार्तिक मासी (आक्टोबर १६८९) रायगडी सला करून मार्गसीर्ष शुध २ रविवारीं (३ नवंबर १६८९) रायगड मोंगलास दिला. संभाजी राजे याचे पुत्र सिवाजी राजे यास तुलापुरास औरंगजेब पासी नेले. पातशाहे त्यास हप्त हजारी केले. शाहुराजे नांव ठेविलें. ते वर्षी कुलगड मोगलें घेतले.– जेधेश, पृ. ३५ The Emperor graciously ordered that tents fit for holding Sambha's mother, and other relations of the deceased should be set up in Gulalbar... with all respects and privacy. Shahu, the nine year old elder son of Sambha, was given the mansab of 7 hazari (same tr.) and the title of . aja, etc.– MiA, p. 200

७९. On Friday the 29th November 1689/26th Safar, Ruhullah Khan captured the fort of Raichur.– MiA, p. 200.

८०. शके १६१२ माघ मासी (जानेवारी-फेब्रुवारी १६९१) अवरंगजेब गलगलियास आले.– जेधेश, पृ. ३६. On Wednesday, the 18th December 1689/16th Rabiulawwal, the imperial camp started from Koregaon (Tulapur) on 9th February 1690/10th Jamadilawal came to Badri. On Sunday the 18th May 1690/19th Shaban marched from badri to Galgala; On Monday, the 24th February 1691/4th Jamadassani, the Emperor marched from Galgala and alighted outiede the fort of Bijapur.– MiA, p. 200-204.

८१. कामबक्ष शाहाजादे असतखान जुलपुकारखानाचे मदतीस चंदीस आले. शके १६१३ पोशमासी (डिसेंबर १६९१) दाखल जाले.– जेधेश, पृ.३६. On Wednesday, the 27th May 1691/9th Ramzan, Muhammad Kam Bakhsh was sent to put down the rebels of the country of Jinji.–MiA.p 205.

तारिख २१ एकविसावी माहे मोहरम राजशक ३६ रोजीं (२३ सप्टेंबर १६९२) उमदतुलमुल्क याजला कर्नाटकतर्फेत बंड जाले या बंडवाल्यांचे पारपत्यावर नेमिलें. तों उमदतुलमुल्क कडपें येथें पादशाहाजाद्यासी जाऊन मिळाला. तारिख ५ माहे रबिलाखर (४ दिसेंबर १६९२) रोजीं चंदीस जाऊन पोंहचले.[८२] याच सालीं दारुल खिलाफत येथून शाहा अलम याची मातुश्री नवाबबाई मरण पावल्याचे वर्तमान येऊन पोंहचलें. तेव्हां खुद जातीनें झेबुन्निसा बेगमसहित शाह अलम यांचे डेऱ्यास जाऊन त्याचे शांतवन केलें. तारिख ४ माहे जिलकाद सन मजकूर (९ जुलै १६९२) रोजीं शाहा अलम हा वेळपर्यंत नजरबंदीचे कैदेंत होता. त्याजला कैदेंतून सोडणेंविशीं व हुजूर येणेंविशीं आज्ञा केली. ठरलें कीं, दोन प्रहरची नमाज हजरतचे समागमें करित[८३] जावी. असा हुकूम जाहाला आणि त्याचे दोघेहि पुत्रांस किताब व पद अधिकार देऊन योग्यतेस चढविलें. असें ऐकण्यांत आहे कीं, बहादूरशाहा याजला दोघे पुत्र होते. ते एकाच डेऱ्यांत सहा वर्षपर्यंत नजरबंदीचे पहाऱ्यांत ठेविले होते. एके दिवशीं हाफीज कारीखुपआल्हानी हा अलमगीर पादशाहाचे सेवेंत येऊन पोंहचला. कुराण अशा सुस्वरानें पढत होता कीं, बहादूरशाहाचे सुस्वराशीं सुस्वर मिळत होता. पादशाहा याजला त्या हाफीजाचे कुराण पढणें ऐकण्यानें आपले कैदेंत ठेविलेले पुत्राचें स्मरण पादशाहाचे अंतःकरणांत आलें. पादशाहास मनांत फार कळवळा उपजला. त्याजला कैदेंतून सोडण्याविषयीं आज्ञा केली. त्याजला हुजूर बोलाविलें. तारिख २६ सविसावी माहे साबान सन मजकुर (४ मे १६९२) रोजीं विजापूर येथून कूच करून पुन्हां दुसरे वेळ गलगल्यास जाऊन राहिले. तारिख २६ वे माहे जिलकाद (राजशक ३६ धरला तर ३१ जुलै १६९२) रोजीं गलगले येथें रुहल्लाहखान मरण पावला. तेव्हां हजरत समाचारास गेले. तो मरण पावल्यानंतर बहरमंदखान मीर बक्षी जाहाला. शाहा अलम याजला चाळीस हजारी किताब दिल्हा आणि चाळीस हजार स्वार दिल्हे. तारिख २० माहे सवाल राजशक ३७ सदतीस (१५ जून १६९३) रोजीं आआजमशाहा नलगुदाचे दुखण्यानें दुखणाईत होणें व हुजूरचे बोलावणें जाहले म्हणोन हुजूर येणें; व गुलालबाडांत याजकरितां डेरा ठोकणें. पादशाहा यानीं

८२. News came that on Sunday, the 4th October 1691/21st Muharram, Umdat-ul-Mulk Asad Khan had intervewed Kam Bakhsh at Kadapa, and that the two had reached Jinji on Wednesday, the 16th December 1691/5th Rabiussani.- MiA, p. 207.

८३. Cn Monday, the 20th July 1691/4th Zilqada, the Prince (Shah Alam) was granted an interviaw. He was ordered to perform the Zuhar Namaz in company of the father.-MiA, p. 207.

शाहाजाद्याचे दुखण्यास्तव तेथें राहणें व शाहाजादा यानीं आरोग्य होणें. फारसी बैतेचा अर्थ : "पादशाहाचे आसिर्वादानें शाहाजादा आरोग्य जाहाला" व 'शफायेपहदुआये पादशाहाबुद' इतकीं अक्षरें अबजदचे हिशेबानें गणिलीं असतां ११०६ अकराशें सहा (१६९४–१६९५ इ. स.) सन निघतो. या सनांत शाहाजादा आरोग्य जाहला. तारिख ६ माहे साबान राजशक ३८ (१२ मार्च १६९५) रोजीं गलगलियेहून कूच करून अलमगीर पादशाहा विजापुरावर आले.[८४] पादशाहाची फौज विजापूर तर्फेत येऊन उतरली. ही पांचवी खेप आहे. तारिख १७ माहे सवाल राजशक ३९ (२१ मे १६९५) रोजीं मौजे बहरमपूर येथें भिवरा नदीचे किनाऱ्यास लष्करचे डेरे ठोकिले.[८५] त्या गांवास इसलामपूर असें नांव ठेविलें. माहे जमादिलावर राजशक ३९ एकुणचाळीस (जानेवारी १६९६) रोजीं खानाजादखान व महमद मुरादखान हे उभयतां हुजुरचे फौजेसुद्धां संताचे, म्हणजे रामाजीचे(?) पारपत्यावर नेमिले होते ते उदोनी नजिक जाऊन कासमखान यासी मिळाले. लढाईचे मोकाबल्यावर उभे राहिले. मोड होऊन दिदबुकचे गर्हांत शिरून आंत मजबूतपणानें राहिले. कासमखान याजला अफू खाण्याची संवयी होती. त्याजला दिवस तीनपर्यंत अफू मिळाली नाहीं. सबब तीन दिवसानंतर कासमखान मरण पावला. तेरा दिवसानंतर खानाजादखान वगैरे याणी अभय मागून हुजूर रवाना जाहले.[८६] महंमद आआजमशाहा याणी बहादूरगड येथें निरोप घेतला. महंमद आजम हे तारिख १२ माहे जिल्हेज राजशक ३९ (१४ जुलै १६९५) रोजीं

८४. On Monday, the 1st April 1695/26th Shaban, the Emperor marched from Qutbabad, and on the 3rd April 1695/28th Shaban arrived at Bijapur for the fifth time.–MiA, p. 224.

८५. On Saturday, the 11th May 1695/7th Shawwal, the imperial army moved form Nauraspur and Afzalpur (Bijapur) and reached Brahmapuri on the bank of of the Bhima on Tuesday, the 21st May 1695/17th Shawwal.–MiA, p. 226.

८६. On Sunday, the 19th January 1696/23rd Jamadassani, the two forcas united six kos from the track of the enemy........ Qasim Khan died on the 3rd day (21st January 1699)........ Khanahzad Khan bagged for safety, and a truce was made on condition that he would surrender to Santa the cash, articles,.... etc. besides 20 lakhs rupees......MiA, p. 227-230. शके १६१७ पौश शुध ११ ते दिवसीं (५ जानेवारी १६९६) संताजी घोरपडे याणी खानजादीखान व कासीमखान सिटीयाजवळ डोडेरी म्हणऊन गांव आहे तेथें कैद केलें. कासीम खान तर मेला. खानजादखानास लाख रुपये घेऊन वाट दिल्ही.– जेधेश, पृ. ३८.

पादशाहाचे आज्ञेवरून मनार येथें रवाना जाहाले. खानाजादखान याजला रूहुल्लाह-खान असा किताब प्राप्त जाहाला. अलमगीर पादशाहा तक्तावर बसल्याचे ४० चाळीसावे सालीं फत्तेखान बहादूर हा खान फेरोजजंग या आपले बापापासून त्रासून हुजूर येऊन पोंचला. एक महिन्यानंतर पादशाहा याणी त्याची भेट घेतली. कासमखान याची लढाई जाहाल्यानंतर संताजी बहुत लुटीचे मालासहित आपले राहावयाचे स्थानास निघोन गेला. खानजहानबहादूर याचा पुत्र हिंमतखान हा सिवा-पटण येथें होता. तो संताजीवर धांवून जाऊन लढाईचे मोकाबल्यावर उभा राहिला. तो हिंमतखान त्या लशाईत ठार जाहाला.[८७] विजापूर येथ सुभेदारीचे कामावर आदिलखान होता. तो अलमगीर पादशाहा तक्तावर बसल्याचे चाळीसावे राजशकांत (१६९६-९७) मरण पावला. महंमद कारखान म्हणून विजापुरांत छपून राहिला होता तो आदिलखानाचे कामावर विजापूरचा सुभेदार जाहाला. माहे मोहरम राजशक ४१ एकेचाळीस सालीं (जुलै १६९७) मोठेंच प्राणघातक संकट उभें राहिलें. भिवरा नदीस दूरचे पाणी येऊन महापूर आला होता. तेणेंकरून बहुत घरें बुडालीं. नावेवरील नावाडी नावा टाकून आपला प्राण वांचवून निघोन आले. फकीर लोक वगैरे त्या महापूरानें वाहून गेले. तिसरे रात्रीं तें महापुराचे पाणी उतरले.[८८] तारिख १९ एकोणिसावी माहे जमादिलावर राजशक ४१ (२४ दिसेंबर १६९७) रोजीं खानजहान बहादूर मरण पावला.[८९] पादशाहा समाचारास गेले होते. तारिख ६ सहावी माहे साबान सन मजकूर (८ फेब्रुवारी १६९८) रोजीं जुलफिकारखान याचे यत्नानें चंदीचे किल्याची फत्ते जाहाली.[९०] आदिलशाहाकडील कर्नाटक वगैरे संपूर्ण मुलूख अलमगीर पादशाहाकडे आला. अमीरखान नाजम काबूलवाला तारिख २७ सावी माहे सवाल राजशक ४२ बेचाळीस (२९ एप्रिल १६९८) रोजीं मरण पावला. काबूलचा सुभा शाहाजादा महंमद आजम याचे हवालीं करणें व महंमद अकबर याचे पुत्रास

८७. शके १६१७ पौश मासी (जानेवारी १६९६) हिंमत बहादुर संताजी घोरपड्यानें बसवपटजवळ मारिला.- जेधेश, पृ. ३८.

८८. It took the form of the outbreak of second Nova's flood, on the morning of Monday, the 19th July 1697/10th Mnharram, in the river Bhima.-MiA, p. 236

८९. On Tuesday, the 23rd November 1697/19th Jamadilawwal, the Khan died.- MiA, p. 237.

९०. शके १६१९ मार्गसीर्ष शुध ५ (८ नवंबर १६९७) मोंगलानीं चंजीस वेढा घातला.-जेधेश, पृ. ३९. On Monday, the 7th February 1698/16th Shaban, the fortress (Jinji) consisting of 7 forts, was forcibly captured and annexed to the Empire.-MiA, p. 238.

दुर्गादास राठोड याणी हुजूर आणणें व त्याचे अपराध षुजाअतखान नाजम हैदराबादवाले यानीं याच सालीं क्षमा करविणें व इसलामपूर येथें चार वर्ष राहिल्यानंतर आज्ञा जाहाली कीं, किल्याचा घेर धोंडे व गच घालून पुर्वी सरकार-वाडा बांधण्याकरिता नविन बांधिला होता व तेथून मातीचा किल्ला अडिच कोसावर आहे त्या किल्याची नविन इमारत करावी, असा हुकूम. जाहाला. किरकोळ सामान तेथें ठेऊन आसदखान याजला त्याचे संरक्षणावर नेमिला. तारिख ५ पाचवी माहे जमादिलावल राजशक ४३ त्रेचाळीस (१९ आक्टोबर १६९९) रोजीं हिंदु लोकांचे किल्ले हस्तगत करण्याकरितां व लढाई करण्याकरितां अलमगीर पादशाहा निघाले. विसावे दिवशीं मिरजेचे तर्फेत लष्करचे डेरे उतरले.[९१] तारिख २९ एकूणतिसावे माहे जिल्हेज राजशक त्रेचाळीस (१८ जून १६९९) रोजीं खान फेराजजंग याजकडील लोकानीं संताचे, म्हणजे रामाजीचें (?), मस्तक कापून पाठविलें ते सदरहू तारखेस येऊन पोहचलें.[९३]

### ७८. एक कथा भाग वर्णिला जात आहे :

संभाजी वल्द शिवाजी यांचा दंगा जेव्हां शांत जाहला, म्हणजे विझला, तेव्हां अलमगीर पादशाहा याचें अंतःकरण विश्रांती पावलें. नानाप्रकारचे विचार व फिकीरीपासून स्वस्थ जाहालें. तेव्हां संभाजीचा भाऊ (राजाराम) संताजी (सनापती)[९२] कपटी व शहरचे लढाईंत मानकरी मंडळ व सरदार लोकांचे जमातीसुद्धां बैरागी व गोसावी लोकांचे वेषानें निघोन पळोन गेला होता. त्यानंतर अबदुलखान सुभे विजापूर याणी त्याचा माग काढून त्या मागावर दौड करून राणेबेदनूरचे आसपास त्यावर जाऊन पोहचून संताजीचे (राजारामाचे) मंडळीस पकडलें होतें. संताजी (राजाराम) खुद जातीनें आपला जीव वांचवून बाहेर पळून गेला होता. हिंदूचे कित्येक किल्यांपैकीं एका किल्यांत आश्रय धरून राहून बहूत

९१. On Thursday, the 19th October 1699/5th Jamadilawal, the Emperor started at an auspicious month......for expedition in person to trample......the land and forts of the infernal infidels ......and arrived at Miraj in 20 days.– MiA, p. 248.

९२. सदर ग्रंथकाराचे मतें शिवाजी महाराजांचे दुसरे पुत्र राजाराम महाराज व सेनापती संताजी घोरपडे ही एकच व्यक्ती आहे. अर्थात ही समजूत चुकीची आहे. तरी लढाई वगैरेच्या प्रसंगीं राजाराम हा शब्द सेनापती संताजीकरितां आहें कीं कसें हें तत्संबंधीय मजकुरावरून जाणून घेणें आवश्यक आहे.

मजबूत फौजेची जमात जमवून आपले बापाचे, व (भावाचे) म्हणजे संभाजीचे, चालीस जिवंत करून, म्हणजे ही बापाची व भावाची बंडखोरपणाची चाल लोपली होती त्या चालीस पुन्हां तेजस्वी करून, अलमगीर पादशाहाचे सरहदींत जाऊन लुटालुट करणें व छापा घालणेंस प्रारंभ केला. तेव्हां खानाजादखान व मुरादखान व कासमखान हे (सेनापती) संताजीचे पारपत्यावर नेमिले जाऊन या तिधानें आपले जमातींसुद्धां एके ठिकाणीं मिळोन संताजीवर दौड केली. तेव्हां संताजी यानीं या तिघांस असे संकटांत आणोन घेरून त्यांचा असा मोड केला कीं, या तिधानींहि या मरणाचे संकटातून आपले जीव वांचविलें हाच अलभ्य लाभ समजून आनंद मानिला, म्हणजे मोठा मोड जाहाला तेव्हां हे तिघे आपला जीव वांचवून पळोन गेले. सारांश, थोडकेच दिवसांत संताजीची गर्दी संभाजीचे गर्दीहून फारच अधिक जाहाली. तेव्हां अलमगीर पादशाहास पहिलेपेक्षां दसपट अधिक फिकीर पडली. तेव्हां संताजीचे पारिपत्य करण्याचा विचार करून नानाप्रकारचे विचार काढित होते. तसाच बाह्यात्कारी सख्यतेचा भाव दाखऊन दगा, म्हणजे घात, करण्याची मसलत करून संताजीचे पारिपत्यावर दगा, म्हणजे घात, करणारी फौज नेमित होते. तशीच दुसरीहि युक्ति काढून दगा, म्हणजे घात, करणारीहि फौज संताजीवर रवाना केली. फकीर व मषायख वगैरे बहुत लोक आमंत्रण करून मेजवानकीचा भाव दाखऊन दगा म्हणजे घात करणारे लोक होते त्याणीं पादशाहाचे आज्ञेवरून या कामाविषयीं हिंमत धरिली. मेजवानकीचा भाव दाखवून घात करण्याची मसलत करिते जाहाले. परंतु हें कर्म त्वरित गुणास येत नव्हते, म्हणजे या डावानें संताजी त्वरित सांपडला जात नव्हता. कार्यसिध्धी जाहाली नाहीं. यास्तव पादशाहाचे अंतःकरणांत बहुत घाबरेपणा येत होता. त्या दिवसांत विजापूर येथील कारभारी मंडळीपकीं सय्यद हसन खुदानवाज वलद काजी बहादूर हे अलमगीर पादशाहाचे फौजेंत होते. हेहि आमंत्रण करून दगा म्हणजे घात करणारेच होते. दावत आस्मा या नामेंकरून प्रसिद्ध होते. पादशाहा याणी या सय्यद हसन खुदानवाज याजला या कामाप्रकर्णी निरोप सांगून पाठविला आणि या कामास तुम्हीं उद्योग करणें. अशी आज्ञा केली. तेव्हां सय्यद हसन याणी उतर सांगोन पाठविलें कीं, बहुत जमात या कामाविषयीं तत्पर जाहाली आहे तव्हां माझें कांही कारण नाहीं. जर करितां आपले आज्ञेस्तव मी या कामांत उद्योग केला तत्रापि काय होणार? जर करितां आपली आज्ञा या प्रकर्णी मजलाच होत आहे व या कामांत मी कसा यत्न करतो व स्वामीसेवा कशी करून दाखवितों हें पाहावें असें मनांत असल्यास आधीं या कामांत नेमिलीं आहेत त्या सर्व जमातींस मनाई करावी व ती जमात परत आणावी म्हणजे माझी सेवा उतमप्रकारें दिसून येईल. असें उतर सांगून पाठविलें तेव्हां अलमगीर पादशाहा याणी पुन्हां

त्याजला सांगून पाठविलें कीं, मना करण्यांत व ती जमात परत आणविण्यांत फकीर लोकाचे अंत: करण दुखवितें यास्तव या गोष्टीचें कांहीं कारण नाहीं. तुम्ही या कामाविषयीं यत्न करावा. आजपासून ईश्वरकृपेनें व ईश्वराचे साह्यानें जी कांहीं कार्यसिद्धी होईल त्यांत आम्ही आपलेकेडून या जमातीस तुमचे यत्नानें कामावर ठेऊं. असी आज्ञा केली. तेव्हां त्याणीं कबूल करून या कामास प्रवर्त झाले. पादशाहा याणी पुन्हां कोणेएके ग्रहस्थास सय्यद हसन याजकडे पाठविलें आणि निरोप सांगून पाठविला कीं, खाण्यापिण्याचे वगैरे जिन्नस व साहित्य मेजवानकीकडे जें कारण पडेल व तुम्ही जें सांगून पाठवाल ते जमविण्यांत येईल. तेव्हां त्याणी उत्तर सांगून पाठविलें कीं, संताजी याणी सर्वांस पीडा केली आहे. तो सर्वांचा द्रोह म्हणजे तळतळाट हेंच त्याजला मेजवानकीचे साहित्य मोठें आहे. दुसरे कांहीएक कारण नाहीं. तेव्हां अलमगीर पादशाहा यांस हें बोलणें पसंत आलें. नंतर थोडकेच दिवसांत कार्यसिद्धी जाहाली. तो बेनसीब, म्हणजे निदवी म्हणजे संताजी, कैद जाहाला. त्याचे मस्तक कापिलेले अलमगीर पादशाहापासीं हुजूर येऊन पोहचलें.[९३] तेव्हां पादशाहास अत्यंत संतोष जाहाला, पादशाहा याणी कृपाळू होऊन सय्यद हसन याजला सय्यद हसन खुदानवाज संताकुष असा किताब दिला. संताकुष म्हणजे संताजीस जीवें मारणारा असा अर्थ होतो. हा किताब त्याजला दिला. त्या दिवसापासून सय्यद हसन याजला संताकुष असें सर्वत्र म्हणतात. खान फिरोजजंग याचे पराक्रमानें देवगड उर्फ इसलामगढ याजला म्हणजे हा किल्ला हस्तगत केला. तो निर्दैवी, म्हणजे संताजी, त्या किल्यांतून पळून गेला. वसंतगड हा किल्ला कृष्णा नदीपासून एक कोसावर प्रसिद्ध आहे. तो किल्ला तरबियतखान याचे पराक्रमानें एक आठवड्याचे म्हणजे आठ दिवसाचे हल्लेंत तारिख १२ माहे जमादिलाखर राजशक ४३ ( २५ नवंबर १६९९ ) रोजीं घेऊन फत्ते झाली. कुहषिमस्तष म्हणजे त्याणीं पर्वत पाडिला त्या शब्दाचा अर्थ होतो व कुहषिमस्तष इतकीं अक्षरें अबजदचे हिशेबानें गणिलीं असतां सन ११११ अकराशे अकरा ( १६९९–१७०० इ. स. ) निघतो. या सालीं हा

९३. The stories vary, but he was either siezed by the Matlab Khan and sent to hall, or was slain by the same claimout of blood (Mane's prother-in-Paw); his hand fell into the hands of the bol-diers of Firuz Khan and was sent to the Emperor.- MiA, p. 244.

शके १६१९ चैत्र मासी ( मार्च–एप्रिल १६९७ ) संताजी घोरपडे सातारे प्रांतीं आले. त्यावर गाजदीखान ( गाझीउद्दीनखान ) नामजाद आला. आषाढ मासी ( जून १६९७ ) संताजी घोरपडे यासी नागोजी माने याणी माहादेवाजवळ दगा देऊन मारिले.– जेधेश, पृ. २९.

किल्ला घेतला. त्या किल्यास 'किलीदेफतह' असा किताब दिल्हा.[९४] तारिख २५ पंचविसावी माहे जमादिलाखर ( १९ दिसेंबर १६९८ ) तागायत तारिख १३ तेरावी माहे जिल्काद राजशक ४३ त्रेचाळीस ( ४ मे १६९९ ) पर्यंत चार महिने व अठरा दिवसांत महंमद आआजमशाहा याचे मार्फतीनें तो किला फत्ते झाला. त्या किल्याचे नांव आजमतारा असें ठेविलें.[९५] सातारचे किल्यावर हल्ला करावयाचे दिवसांत मोठे संकट उभें राहिलें. त्या एकंदर संकटापैकीं एक हें आहें कीं, तारिख ५ पांचवी माहे जिल्काद सन मजकूर ( २६ एप्रिल १६९९ ) रोजीं पोकार खाणून त्यांत दारु भरून त्यास आग दिली. तेव्हां तो अग्नि सातारचे किल्यावर जाऊन पडला. तेव्हां किल्या-वरील बहुत मनुष्यें जळालीं. दुसरे दारुचे पोकारासहि आग दिली आणि किल्याचे आंतील दरवाजेहि पडतील असें मनांत आणिले. इतक्यांत प्रारब्धयोगानें किल्याची भिंतच पायापासून बाहेरले बाजूस ढासळली. फौजेंतील माणसांचे आंगावर पडली. तेव्हां सरासरी दोन हजार मनुष्यें, शूर कामाचे उपयोगाचींच माणसें, मेलीं. तेव्हां सुबा म्हणोन सातारचे किल्यावर किलेदार होता. तो सुबा अलमगीर पादशाहाचे भेटीस आला. तेव्हां तो येऊन भेटल्यानंतर त्याजला पांच हजारी किताब व पोषाख मिळाला. तारिख २२ बेविसावी माहे जिल्काद ( १३ मे १६९९ ) रोजीं ( परली ) किल्यावर हल्ला कायम झाला. [९६] या हल्याचे दिवसांत परजन्याची फारच वृष्टी झाली. तेणेंकरून नदीस व ओढ्यास मोठे पूर आले. या पावसाचे संकटामुळें व रसद येऊन न पोंहचण्यामुळें मोठा दुष्काळ पडला. तारिख ३ माहे मोहरम राजशक ४४ चवेचाळीस ( १० जून १७०० ) रोजी महंमद आआजम-

~~~~~~~~~~~

९४ The next morning, Saturday, the 25th November 1699/12th Jamadassani, the fort- 'Vasantgad' was conquered.-MiA, p. 249.

९५. On Friday, the 8th December 1699/25th Jamadassani, the imperial tent was pitched at the foot of the fort......On Friday, the 15th March 1700/5th Shawal, the Khan....... carried the treanch under the Revani of the fort in one month .....On Satur-day, the morning of 13th April 1700/5th Zilqada, at fort a fuee was fired, the fort wail fall inside and a large bode of garrison were burnt On Sunday, the 21st April 1700/13th Zilqada our bcmers mounted the towers and poropets of that (Satara) fort of infidility....the fort was named azamtara.-MiA, p.250-254.

९६. On Tuesday, the 30th April 1700/22th Zilqada the Emperor encamped on the plain in front of the fortzata.-MiA, p. 256.
~~~~~~~~~~~

शाहाचे विचारानें फत्ते जाहाली.[९७] त्या किल्यास इब्राहीम आदिलशाहा याणी नवरसतारा असें नांव ठेविलें व हाजी नसरुल्लाह इतकीं अक्षरें अबजदचें हिशेबानें गणिलीं असतां ११११२ अकराशे बारा ( १७००-१७०१ ) सन निघतो. या सनांत फत्ते जाहाली. तारिख १९ एकोणिसावी माहे सफर सन मजकूर ( २५ जुलै १७०० ) रोजीं महुसानगडाचे ( भूषणगड ) किल्याचे मैदानांत लष्करचे डेरे ठोकिले. आआजमशाहा याजला बुऱ्हाणपुरास जाऊन राहण्याविषयीं निरोप दिल्हा. एकंदर फौजेसहि पूर्ववत जिकडील तिकडे मुलकावर रवाना केलें. तारिख १६ सोळावी माहे रबिलावल ( २१ आगष्ट १७०० ) रोजीं महुसानगड ( भूषणगड ) येथून खवासपुर येथें एक कोसाचें अंतरावर आहे तिकडे कूच झालें.[९८] त्या गावांत राहणें लष्करचे विश्रांतीस कारण झालें. तारिख ४ चवथी माहे साबान सन मजकूर ( ३ जानेवारी १७०१ ) रोजीं मुखलीसखान बक्षी मरण पावला. त्याचे कामावर रुहुल्लाहखान कायम झाला. तारिख २ माहे रजब ( २ दिसेंबर १७०० ) रोजीं कूच झालें. मूर्तजाबाद उर्फ मिरजेचे तर्फेत उतरले.[९९] ज्यान सीपारखान आजम हैदराबादकर साबान महिन्यांत ( जानेवारी १७०१ ) मरण पावला. महंमद कामबक्ष हा तेथील सुभेदारीचे कामावर कायम झाला. त्याचे हातांखालील मुख्त्यार ज्यान सीपारखानाचा पुत्र रुस्तुमखान कायम झाला. तारिख २ माहे मोहरम राजशक ४५ पंचेचाळीस ( २९ मे १७०१ ) रोजीं पनाळ्याचे तर्फेत छावणी घालण्याचें इरादानें कूच झालें. तारिख २७ सतावीसावी माहे मोहरम ( २३ जून १७०१ ) रोजीं वर्धनगडचा किल्ला खटावापासून दोन कोसावर आहे त्या किल्याभोवतें लष्करचा वेढा पडला. फत्तेउल्लाहखानबहादूर हा वर्धनगडचा किल्ला हस्तगत करण्याचें कामावर नेमिला होता. तारिख १० दहावी माहे मोहरम ( ६ जून १७०१ ) रोजीं खान मशारनिल्हे

९७. On Tuesday, the 4th June 1700/27th Zilhijja, an assault was made and on Sunday the 9th June 1700/3rd Muharram, according to the Emperor's orders, sent the garrison out of the fort.- MiA, p. 257-258.

९८. On Thursday, the 25th July 1700/19th Safar the imperial camp arrived near Bhushangarh. On Friday the 30th August 1700/ 26th Rabiulawal, the army started for Khawaspur.-MiA.p 258-259.

९९. On Monday, the 16th December 1700/16th Rajab His Majesty marched towards Murtazabad Miraj, arriving there on Wednesday, the 1st Januaay 1701/2nd Shaban.-MiA, p. 261.

यांणी वर्धनगडचा किल्ला घेऊन फत्ते केली.[१००] खान मशारनिल्हे याचे नांव महंमद सादिक असें होते. तेंच नांव त्या किल्यास सादिकगड असें ठेविलें. आसदखान व फेरोजजंग वऱ्हाडांहून लष्करचे सामानाचे संरक्षणार्थ येऊन पोहचले. तारिख २८ माहे रबिलाखर ( २१ सप्टेंबर १७०१ ) रोजीं परजन्याची अशी अति वृष्टी जाहाली कीं, त्या पाण्याचे महापुरानें बहुतेक गांव वाहून गेले. तारिख १० माहे सवाल ( २७ फेब्रुवारी १७०२ ) रोजीं पावनगडचे दरवाज्यापुढें म्हणजे दरवाजाचे व पावनगडचे मध्यभागाचे मैदानांत फौज उतरली. तरबियतखान व फतहुल्लाहखान व महंमद मुरादखान यांही हरएक बाजूचे मोरचे जलद चालू केले. तारिख १ माहे मोहरम राजशक ४६ ( १६ मे १७०२ ) रोजीं तरबियतखान याचे पराक्रमानें तो पनाळ्याचा किल्ला घेऊन फत्ते जाहाली.[१०१] त्या किल्यानें नांव शाहदुर्ग असें ठेविलें. आसदखान दिवाण वारल्यानंतर ते दिवाणगिरीचें काम इनायदुल्लाहखान याजकडे कायम झाल. बहरामंदखान हा मांडवगडचा किल्ला हस्तगत करण्याकरितां व खंदक खणण्याचे कामावर नेमिला. सदरहु किल्ला कित्येक दिवसानंतर हस्तगत होऊन फत्ते जाहाली. अमीरूल उमराव बहरामंदखान यास फार श्रम जाहाले. त्या श्रमानें थकला. तेव्हां आज्ञा जाहाली कीं, खेड म्हणोन थोडेसें अंतरावर गांव आहे तेथें विसांवा घ्यावा. त्यावरून दोन तीन दिवस विसांवा घेतला. आणखी पुन्हा पूर्ववत युद्धास उभा राहिला. तारिख १६ माहे जमादिलाखर ( २९ आगष्ट १७०२ ) रोजीं सादिकगड उर्फ वर्धनगड येथून कूच जाहलें. तारिख १६ माहे रजब ( २५ नवंबर १७०२ ) रोजीं खेळण्याचे किल्यापासून साडेतीन कोसांवर लष्करचे डेरे ठोकिले. शाहाजादा बेदरबख्त हा पादशाहाचे भेटीस येऊन पोहचला. दुसरा आसदखान अमीरुलउमराव हाच जाहाला. अलमगीर पादशाहा फत्ते जाहाल्यानंतर बहादुरखानासी मिळाला. हमिनुद्दीनखान बाहादूर व राजा

१००. The imperial army, for the recovery of the forts-Varhangarh Nanegir add Chandan and Wandan, started on Thursday the 29th May 1701/2nd Muharram – MiA, p. 266. The garrison of Wardhangarh saved their lives by flight leaving the fort empty on the 6th June 1701/10th Muharram. In ten or twelve days the Kiledar of Nangir......surrendered the fort. On Monday, the 6th October 1701 they evacuated the forts of Chandan and Wandan.– MiA, p. 266-267.

१०१. On Saturday, the 9th March 1701/10th Shawal, the imperial camp was pitched in the environs of the fort (Panhala) and on the 28th May 1701/1st Muharram, the conquest was accomplished. –MiA, p. 262-264.

जयसिंग (सवाई जयसिंग ?) व मुनआमखान हे किल्याचे हल्यावर नेमिले होते. तारिख २७ माहे साबान (५ जानेवारी १७०२) रोजीं पादशाहा याणी खुद जातीनें एक कोसावर वेढा दिल्हा. शाहाजादा व राजा जयसिंग व फत्तेउल्लाहखान व महंमद अमीनखान व हमीनुद्दिनखान व सरमस्तखान याणी बहुत (श्रम) केल्यानंतर तारिख २२ माहे जिल्हेज राजशक ४६ शेचाळीस (९ मे १७०२) रोजी फत्ते झाली. फत्तेह पुदकिल आखेलना म्हणजे खेळण्याचे किल्याची फत्ते जाहाली.[१०२] इतका या फारसीचा अर्थ जाहाला. सदरहु फारसी अक्षरें अबजदचे हिशेबानें गणिलीं असतां १११३ अकराशे तेरा (१७०१–०२ इ. स.) सन निघतो. या सनांत खेळण्याच्या किल्याची फत्ते झालीं. पादशाहा कुरान शरीफचे किताबीत शकून पाहत होते. तेव्हां आलहमदुलिल्लाह सखरलिना असी आयत निघाली होती. तीच आयत शकुनांत धरून खेळण्याचे किल्याचे नांव सखरलिना असें ठेविलें. सदरहू किल्ला आंबाघाट व पायनघाट तळकोंकणचे सरहादीस आहे. तो किल्ला हस्तगत करण्याचे कारणानें बहुत मुलुक जमला होता. बेदरबख्त याजला खेळण्याचे किल्याची फत्ते जाहाल्यानंतर खुजस्तेबुनयाद हैदराबादचे बंदोबस्तावर नेमिलें. बहरामंदखान बक्षी मरण पावला. तो वारल्यानंतर जुल्फुकारखान मीर बक्षी झाला. याच दिवसांत लुत्फुल्लाहखान मरण पावला. जेबूनिसा बेगम ही दारुल खिलाफत येथें मरण पावली. तारिख ७ माहे मोहरम राजशक ४७ सतेचाळीस (१३ मे १७०३) रोजीं खेळण्याचे किल्याहून कूच केलें. परजन्याची अति वृष्टी झाली. त्यामुळें नदीनाल्यांस महापूर आले. ओझीं उचलणारे कोणी मिळेनासे झाले. दाणे वगैरे कैली जिन्नस कांहीं एक मिळेनासे होऊन दुष्काळ पडला. घासलकडीहि मिळेनासी झाली. सर्वोपरीं अनेक तऱ्हेचीं संकटें उभीं राहून फारच कठीण प्रसंग गुंजरला. बहुत मनुष्यें व जनावरें ठार झालीं. तेव्हां तारिख १२ बारावी माहे रबिलावलचे (२६ जुलै १७०३) एक महिन्यांत व सतरा दिवसांत चौदा कोस मजल काढून पनाळ्याचे किल्याचे तळवटास येऊन पोहचले.[१०३] तेथें बहुत बहुनच संकटें उभीं

१०२. The Emperor's army left Vardhangarh on 7th November 1701/16th Jamadassani, for Khelna. On Saturday, the 6th December 1701, arrived near the skirt of the wall. On Sunday, the 11th January 1702/22nd Shaban, Emperor ordered the trenches to be pushed on. On Friday, the 6th January 1702/27th Shaban, the camp moved on. The fort was captured on 27th April 1702/10th Zilhijja. On Wednesday, the 10th June 1702/25th Muharram, the Emperor visited the fort.– MiA, p. 267-273.

१०३. MiA, p. 277.

राहिलीं. बहुतच वाकडेपण उभें राहिलें. तारिख १० दहावी माहे जमादिलावल (११ सप्टेंबर १७०३) रोजीं कृष्णा नदीस फारच मोठा महापूर आला होता. यास्तव तेथेंच नदीकिनाऱ्यास जाऊन पोहचून वीस दिवस इकडे व वीस दिवस तिकडे लष्कर उतरण्याकरितां मुकाम करून आसदनगर (Vadgaon ?) येथें जाऊन राहिले. तेथून बहादूरगडास आले. त्याच मजलींत फेरोजजंग याची फौज यासमई इसलामपूर येथें ठेविली होती त्या फौजेची चार कोसपर्यंत जिलीब दुरस्ता पादशाहाचे दृष्टी पडली. तोफखानाहि फार जमला आहे असें पाहिले. तेव्हां आज्ञा जाहाली कीं, अमीरलोक याणी फार तोफखाना ठेऊं नये. तारिख २४ चोविसावी माहे रजब (२३ नवंबर १७०३) रोजीं बहादुरगड येथून खंडाळ्याचा (कोंडाणा) किल्ला हस्तगत करण्याकरितां कूच करून तारिख १८ अठरावी माहे साबान (१६ दिसेंबर १७०३) रोजीं खंडाळ्याचे (कोंडाणा) किल्याचे माचीस जाऊन पोहचलें.[१०४] शाहाजादा मुआनुद्दीन सामोरा आला. याजबदल त्याजला सुभे मुलमान व सुभे थाटाची सुभेदारी व अधिक पदआधिकार देऊन त्याची योग्यता वाढविली. नकलिजखान याजला विजापूर येथील सुभेदारी दिली. तळकोंकणची सुभेदारी व आआजमगड बेळगांव वगैरे व खुजस्ते बुनयाद हैदराबाद येथील सर्व बंदोबस्ताचें काम व खानदेशचा सुभा हे सर्व बेदरबख्त याजकडे दिल्हे. इसलामपूर येथील किरकोळ सामान बहादुरगडास आणविलें. फतरुल्लाहखान याणी बहुत पराक्रम व लढाया केल्या होत्या. यास्तव त्याचे विनंति करण्याप्रमाणें पूर्ण मनोरथपणानें त्याजला काबूलाकडे जाण्यास निरोप दिल्हा. अहंमदाबाद येथील सुभेदारी व अजमीर येथील सुभेदारी महंमद आआजम याजला दिली. चाळीस हजारीचा किताब व बत्तीस हजार स्वार त्याजला दिल्हे. तारिख १७ सत्रावी माहे जिल्हेस राजशक ४७ सतेचाळीस (२४ एप्रिल १७०३) रोजीं खंडाळे (कोंडाणा) येथून परतले.[१०५] तारिख २५ पंचविसावी माहे मजकूर (१ मे १७०३) रोजीं मुहिआबाद पुणें येथें छावणी घातली.[१०६] पुण्यांत खेळण्याचे कारणास्तव इनायतुल्लाहखान याचा तंबू उपटून टाकिला. त्या तंबूचे ठिकाणीं

१०४. On Thursday, the 3rd December 1702/24th Rajab, the army set out for the conquest of Kondhana and on Sunday, the 27th December 1702/18th Shaban, arrived at the foot of the fort. -MiA, p. 278.

१०५. On Thursday, the 8th Aprial 1703/2nd Zilhijja, Kondhana captulated.-MiA, p. 282.

१०६. On Saturday, the 24th April 1703/18th Zilhijja, the imperial camp started for Puna and reached Poona on Saturday, the 1st May 1703/25th Zilhijja.- MiA, p. 282.

आसदखानाचा तंबू ठोकिला. असें समजलें तेव्हां आसदखानास आज्ञा जाहाली कीं, तुम्हीं आपला तंबू उपटावा. जेव्हां त्यांतील बारिकपणा समजला तेव्हां आसदखान याजला हुकूम गेला कीं, तूं इनायतुल्लाहचे डेऱ्यास जावें. त्यावरून त्याणी आज्ञेप्रमाणें केलें. महंमद अकबर इरानचें सरहदींत मरण पावला.[१०७] राजशक ४८ अठेचाळीस तारिख २१ एकविसावी माहे सवाल (१६ फेब्रुवारी १७०४) रोजीं रुहुल्लाहखान याचे योगाने राजगडचा किल्ला घेऊन फत्ते जाहाली.[१०८] त्या किल्यास नबीशाहगड असे नांव ठेविलें. तारिख १५ पंधरावी माहे मोहरम राजशक ४८ अठेचाळीस ( ९ मे १७०४ ) रोजीं रुहुल्लाहखान मरण पावला.[१०९] तो वारल्यानंतर मिरजा सदरुद्दीन मिर बक्षी जाहाला. तारिख २३ तेविसावी माहे जिलकाद राजशक ४८ अठेचाळीस ( १९ मार्च १७०४ ) रोजीं मौजे खेड मसऊदबाद म्हणोन आहे. त्या गांवीं पोहचून तेथे आठ महिने अकरा दिवस राहिले. खंडाळ्याचा (कोंडाणा) किल्ला तारिख २ दुसरी माहे जिल्हेज (२७ मार्च १७०४) रोजीं तरबियतखानाचे यत्नानें घेऊन फत्ते जाहाली. त्या किल्याचें नांव बखशिदबक्ष असें ठेविलें. राजशक ४८ अठेचाळीस सालीं तोरण्याचा किल्ला राजगडचे किल्यापासून चार कोसावर आहे त्या किल्याचे तर्फेत तारिख २८ अठाविसावी माहे सवाल ( १२ फेब्रुवारी १७०५ ) रोजीं लष्कर येऊन उतरले. तारिख १५ पंधरावी माहे जिलकाद ( २८ फेब्रुवारी १७०५ ) रोजीं तोरण्याचा किल्ला आमानुल्लाहखान याचे पराक्रमानें घेऊन फत्ते झाली.[११०] त्या किल्याचे नांव फत्तउल्लेबेग असें ठेविलें. तारिख १४ चौदावी माहे रजब ( २२ आक्टोबर १७०५ ) रोजीं खेड येथून या किल्याची फत्ते झाल्यानंतर जुन्नराकडे टांकगड ( टंका ) हस्तगत करण्याकरितां निघाले. पाम नाईकाचा पुतण्या भर नाईक

---

१०७. Shahajada Akbar's death took place in Iran in the 48th year of Alagir's reign i. e. 28th Decemher 1703 to 16th December 1704. The News of his death was, however, reached the Emperor on 21st November 1704.- MiA, p. 320-321 and 288.

१०८. on Wednesday, the 10the November 1703/12th Rajab, the army marched out for the conquest of Rajgarh, and arrived at the foot of the fort on Sunday, the 28th November 1703/30th Rajab. On Wednesday, the 16th February 1704/21st Shawal, the imperial banner was planted on the top of the fort.-MiA, p. 283-284, 289.

१०९. MiA, p. 290.

११०. On Wednesday, the 23rd February 1704/28th Shawwal, the imperial tent was pitched in the neighbourhood of Torna. In the night of Friday the 1oth March 1704/15th Zilqada, the enemy became helpless and begged quarters.-MiA, p. 289-290.

याजकडे तो किल्ला होता. सकरगडचा किल्ला गेल्यानंतर त्या किल्यावर त्याणी आपल्यास राहावयास जागा केली होती. यद्यपि या दिवसांत वारंवार फौजा तो किल्ला हस्तगत करण्याकरितां नेमिल्या परंतु भर नाईकाचे दांडगेपणामुळें व नजरेच्या ऐवज पाठविण्याचें वसिल्यानें तो किल्ला आजपर्यंत भर नाईकाचेच हातीं होता. हली प्रथम किलीजखान व महंमदखान त्या किल्यावर नेमिले. कित्येक दिवसानंतर त्या किल्यावर नुसरतजंग जाऊन पोहचून त्याणी बहुत यत्न केला. तारिख १४ चौदावी माहे मोहरम राजशक ४९ एकूणपन्नास (२७ एप्रिल १७०५) रोजीं तो किल्ला घेऊन फत्ते जाहाला[१११] त्या किल्याचें नांव रहिमानबक्ष असें ठेविलें. बहुतेक थोर थोर लोकांचे या समई इजाफे जाहाले. असें कीं किलिजखान याजला पाच हजारी कितात्र व पाच हजार स्वार मिळाले. किलिजखान यांनीं देवापुरांत टांकगड यापासून तीन कोसावर कृष्णानदीचे किनाऱ्यास छावणी घातली. यात्र सालीं देवापुरांत अलमगीर पादशाहाची प्रकृती बिघडली. त्या भावनेने पादशाहा फार घाबरले. परंतु औषधउपाय जलद केला. या योगानें पादशाहास त्वरित आरोग्यता प्राप्त झाली. तारिख १६ माहे रजब सन मजकूर (२४ आक्टोबर १७०५) रोजीं बहादूरगडाकडे कूच केलें.[११२] तारिख १ पहिली माहे साबान (८ नवंबर १७०५) रोजीं बहादूरगडास येऊन पोहचले. संभाजीचा पुत्र शाहू याजला नुसरतजंग याचे समागमें मुलूख घेण्याचे मसलतीकरितां नेमिला. तारिख १६ माहे सवाल राजशक ५० (२१ जानेवारी १७०६) रोजीं अलमगीर पादशाहाची फौज अहमदनगरावर येऊन उतरली.[११३] बेवीस वर्षांनंतर सवाल महिन्याचे अखेरीस राजशक ५१ सालीं (फेब्रुवारी १७०७) पादशाहाची प्रकृती बिघडली. कांहीं दिवसानंतर कांहींशी प्रकृती आराम जाहाली. पुन्हां माहे जिलकाद महिन्याचे आवलीस (फेब्रुवारी १७०७ सुरुवात) पादशाहाचे दुखणें आणखी परतले. या दुखण्याचें दिवसांत पादशाहाचे मुखांतून हीं अक्षरें निघालीं. अहमदनगर अखेर सफर, म्हणजे अहमदनगर येथें आलों आहो हा सेवटील प्रवास आहे. असें यासमई दुखणें झालें आहे. तारिख २८ माहे जिलकाद राजशक ५१ मुताबिक सन १११८ हिजरी रोजी प्रात:काळीं शुक्रवारीं एक प्रहर दिवस आल्यानंतर (२१ फेब्रुवारी १७०७) औरंगजेब पादशाहा, म्हणजे अलमगीर पादशाहाचा, जीव

१११. MiA, p. 291.

११२. MiA, p. 303-304.

११३. On the 23rd January 1706/19th Shawal, imperial (26th March 1705/19th Saban-should be) began its march for Ahamadnagar. The imperial camp returned to Ahamadnagar after the lapse of 22 years on Sunday the 20th Jannary 1706/16th Shawal.-MiA, p.304.

तल्लखाण पक्षीं पादशाहाचे चार तत्त्वांचे शरिरांतून उडाला, म्हणजे अलमगीर पादशाहा मरण पावले.'[११४] आरबी वाक्याचा अर्थ : "असे मुसलमान लोक व इनसाफ करणारे आहेत. त्यावर व त्याचे बाप आज्यांवर ईश्वराची कृपा असो." अलमगीर आज नेहान रफ्त. याचा अर्थ : 'अलमगीर पृथ्वींतून गेला, म्हणजे मरण पावला' असा होतो. 'अलमगीर आज नेहान रफ्त' इतकी अक्षरें अब्जदचे हिशेबानें गणिलीं असतां १११८ अकराशे अठरा सन निघतो. या सनांत अलमगीर मरण पावले. अलमगीर पादशाहा यानी अंतकाळीं सांगितलें होतें कीं, माझे प्रेत हजरत शाहा जेनुलहकवद्दीन कुदसल्लाहसिरहू यांचे कबरेखालीं पुरावें. त्याप्रमाणें सदरहू कबरेखालीं पुरलें. अलमगीर पादशाहा मुलूक घेण्याचे व पृथ्वी संरक्षण करण्याचे विचारानें वोढावोढींतून व या खटपटींतून विश्रांति पावले, म्हणजे मरण पावले. अलमगीर पादशाहा यानीं अंतकालींचा मजकूर आपले कारकिर्दीचा लिहून ठेविला आहे तो असा आहे :

## ७९. अलमगीर पादशाहा याणी अंतकालीं बोध लिहून ठेविला आहे तें वर्णन प्रकर्ण :

मी जन्मास आलों तेव्हां कोणास समागमें घेऊन आलों नव्हतों. एकटाच जन्मास आलों होतों. त्याप्रमाणें हल्लींहि कोणास समागमें न घेतां निघोन गेलों. जन्मास आलों तेव्हां मस्तकास कांहीं एक नसतां बोडक्यानींच उपजलों. तसाच हल्लीं बोडक्यानीं निघोन गेलों. यास्तव माझे ताबूतासमागमें, म्हणजे माझें प्रेतासमागमें निशाणें व मोरचेल वगैरे पादशाही चिन्हांचा सरंजाम कांहीं एक चालऊं नये. हमीबुद्दीनखान हा माझा पूर्ण विश्वासू मनुष्य आहे. त्याणी एकट्यानीं माझें प्रेत हजरतशाह बुरहानुद्दीन याचे दरग्यांत पोंहचवावें. प्रेत पुरावयाचे ठिकाणीं फकीर लोकांचे प्रेत कांहीं एक समारंभ न करितां पुरतात तसें पुरावें. माझे दैववान पुत्र आहेत. ते फौजेवर कायम करावे. माझें दैववान पुत्रांपैकीं राजपद ज्याचे दैवी असेल तो राज्य करील. जर करितां नवीन संपादन केलेले दोन सुभ्यावरच अल्प संतोष म्हणजे तृप्ती मानितील तत्रापि कांहीं एक अळथळा करूं नये. वजीर अमीरूल उमरावापरता वजीर होणार नाहीं. राज्य करणें ज्याचें दैवी येईल त्याजला खानाजाद याणी अडथळा करूं नये. उपद्रव देऊं नये. पादशाही चाकरलोक यासी महंमद आआजम यासी पूर्ण विश्वासानें वागून त्याची सेवा करित जावी. दोन सुभ्याचे तख्तावर बसणारे मुस्तकरून

११४. On the morning of Friday, the 20the February 1707/28th Zilhijja, 1118 A. H. Aurangzeb died.– MiA, p. 309.

खिलाफतचे सुभ्यास राजी असेल त्याणी चार सुभे दक्षणचा कदीम मुलूख, माळवे खानदेश, वऱ्हाड, गुजराथ, दारूलखेरे अजमीर, चकलात व त्याचे ताब्यांतील मुलूख घेऊन असावें. जो शाहाजादा दारूल खिलाफतचे सुभ्यास राजी असेल त्याणी काबूल व दुसरे कित्येक सुभे आपले खासगी खर्चाकडे घेऊन सत्तावन हजार तीनशे ब्याएंशी ५७३८२ रुपये शिल्लक आहे ती घ्यावी. त्यापैकीं पांच हजार रुपये आमचे ताबूताकडे खर्च करावे. बाकीचे रुपये फकीर फुकार यांजला खैरात करावे. वजीर याणी त्या शाहाजाद्यास सांगावें कीं, पादशाहा यानीं जिवंतपणी सांगितलें आहे त्याप्रमाणें तुम्ही राजी असल्यास खर्च करावा. असें सांगावे व सदरी लिहिलेंप्रमाणें सुभे वाटून घेऊन राज्य केल्यास एकमेकांत लढाया होणार नाहींत. अलमगीर पादशाहा याणी अंतकाळी बोध केलेला येथून समाप्त जाहला.

## ८०. बोध वर्णन प्रकर्ण :

आरबी वाक्याचा अर्थ : " हे अकलवान हो, तुम्ही ईर्षा धरा. आम्हांस व तुम्हांस ईश्वर मार्ग दाखवो. आज्ञा करो. ईश्वर असा आहे कीं, सर्वांवर सामर्थ्यवान आहे. जें कर्म घडत आहे त्या कर्माच्या परिणामाचे ठायीं क्षमा करणारा आहे. पैगंबराचे भिडेमुळें अन्याय क्षमा करणारा व पैगंबर असे आहेत कीं स्वतां अधिकारी आहेत. ही नाशवंत पृथ्वी दगलबाज काय चमत्कारिक संकटाचा पाश अकलेस जाळणारा व सावधपणास लुटून नेणारा आहे, कीं हा पाश ज्याचे गळ्यांत पडला त्याची या पाशापासून सुटका कदापि व्हावयाची नाहीं. पहा बरें, पूर्ण अकलवान, दूरवर विचार करून परिणामावर दृष्टि ठेवणारा असेल तसाच पूर्ण विद्वान, शास्त्रज्ञ, आचारशिल, सत्य जाणणारा, ईश्वरास ओळखणारा व त्या काळांतील निरोपम असा अलमगीर औरंगजेब पादशाहा आहे. प्रत्यक्ष हिंदुस्थानासारिखा मुलुख, कीं सर्व मुलूखाहून श्रेष्ट आहे आणि तो हिंदुस्थानचा मुलुख अलमगीर पादशाहाचे हातीं असोन तितक्याच मुलखावर तृप्ति न मानितां अधिक मुलुख मिळविण्याची आशा धरून दक्षिण देश हस्तगत करण्याची आशा धरिली आणि रात्रदिवस दक्षिण देशावर दौड व हल्ला करून थोडकेच दिवसांत युक्तीन खानदेश, वऱ्हाड व अहमदनगर हस्तगत केले. आश्चर्य आहे कीं, इतकेंहि घेऊन तृप्ती न मानितां हे दोन विचारे गरीब एक शिकंदर व दुसरा अबुल हसन पादशाहा या दोघांस आपले अंतकरणांत करुणा आणोन जिवंत सोडिता किंवा आपले सत्तेंतील पादशाहा करून ठेवितां आणि जीवदान देतां तर अलमगीर पादशाहाचे थोरपणास काय कमी झालें असतें ! जी

सेवकांस प्रतिपालन करण्याची चाल धारण करून शाहूचा प्रतिपाळ केला आणि त्याचा वंश कायम ठेविला व त्याचे वडिलाचे राजधानींचे तख्त शाहूस बहाल केलें, प्रत्यक्ष त्याचा बाप म्हणजे संभाजी व त्याचा आजा म्हणजे शिवाजी या उभयतानीं अलमगीर पादशाहास अत्यंत पीडा केली व बहुत उपद्रव दिला आणि फारच दांडगेपणानें व अमर्यादेनें अलमगीर पादशाहास त्रास दिल्हा होता. असें असतां, त्याजला राजपद दिल्हे आणि या दोन मुसलमानांस म्हणजे शिकंदर पादशाहा व अबुल हसन पादशाहा या उभयतांचे संरक्षण केलें नाहीं. या उभयतांविषयीं अंतःकरणांत किंचितहि दया आली नाहीं. या उभयतांचा निर्मूळ फडशा केला. या उभयतांचा वंश निखालस ठेविला नाहीं असा निर्वंश केला. अशा प्रकारें कीं, त्यांचें नांव किंवा खूणदेखील बाकी ठेविली नाहीं. असें असून आणखी अधिक मुलूख मिळविण्याची आशा धरिली आणि आशेचा घेरा फारच वाढविला कीं विजापूर व गोळकोंडा हस्तगत केला व येविषयीं बहुत वर्षे आशा करित होता ते मनोरथ बहुत वर्षांनीं पूर्ण जाहाले. अत्यंत संतोष जाहाला. या उपर अलमगीर पादशाहा आपले वतनास, म्हणजे दिलीस, परत जाऊन आपले आप्तविषयीं सोयरे-धायरे मंडळीस भेटणे हाच अलभ्य लाभ समजोन आपले वाडवडील ज्या ठिकाणीं वारले तेथेंच आपले शरीर नेऊन टाकिता तर योग्य होतें. परंतु तेंहि झालें नाहीं. विजापूर ताब्यांतील मुलुख, किले व माहाल घेण्याचे फिकिरींत पडला. ह्याविषयीं फारच यत्न केला. अलमगीर पादशाहाचे आयुष्यापैकीं वीस वर्षे बाकी राहिलीं होतीं ती वीस वर्षें याच फिकिरींत खर्च केलीं. हिंदुस्थानासारखी राजधानीची जागा अशी विस्तीर्ण कीं अर्धी पृथ्वीच म्हणावी त्या हिंदुस्थानाची आशा सोडून याच दौडा-दौडींत व धावाधावींत मरण पावला. अरे अरे, हे सख्ये बंधु हो, हे सत्य मित्र हो, मी हें जें वर्मी बोलणें बोललों या बोलण्यावर कदापि दूषण ठेऊन माझे दुर्गुण काढू नका. उभयता पादशाहांचे श्रेष्ठत्वावर मजला आशा होती म्हणून या उभयतां पादशाहाचे म्हणजे सिकंदर पादशाहा व अबुल हसन पादशाहा यांचे कल्याण इछितो, असें समजून या ईश्वराची शफत वाहून सत्य सांगितलें. काय चमत्कारिक अलमगीर पादशाहा! पृथ्वीतील सर्व पादशाहाहून श्रेष्ठ होता व सर्व विद्येंत पूर्ण निपुण व सर्व गुणांत गुणज्ञपूर्ण होता. शेख व सर्व फकीर लोकांतहि श्रेष्ठ होता व पूर्ण ज्ञानी होता. मी हे जे गिल्ल्याचे भाषण केलें व वाईटपणा दर्शविला हें पृथ्वीचा वाईटपणा सर्व बंधुवर्गास समजला व सर्व भ्रांत लोकांस कळून सर्वांस बोध व्हावा याजकरितां बोलिलों. हा बोध ईश्वरास जाणणारे ऋषी लोकांतील निवडक आहे. हा बोध जेथें असतो तेथें त्या बोधाची चिन्हें अशीं आहेत. आरबी वाक्याचा अर्थः "श्रेष्ठ ईश्वर आम्हांस आश्रय देवो. असा ईश्वर आहे कीं पृथ्वीतील अयोग्य पदार्थापासून, म्हणजे अपराधापासून, आपले कृपेनें व दयेनें क्षमा

करणारा आहे. " अल्पसंतोष म्हणजे थोडक्यांत संतोष मानणें हें काय चमत्कारिक संतोष वाढविणारे व सुखकारक अति श्रेष्ट लक्षण आहे ! परलोकास गेलेले ते धन्य पादशाहा आहेत कीं, ज्याणीं हें थोडक्यांत संतोष मानण्याचें लक्षण संरक्षण करून सुख भोगून या पृथ्वीची व या पृथ्वींतील पदार्थांची आशा सोडून उभय लोकींचे म्हणजे या लोकींचे व परलोकींचे सुख प्राप्त करून घेतले आहे. आरबी वाक्याचा अर्थ : " हे ईश्वरा, आम्हांस त्या पादशाहाचे देवढींतील कुत्र्यापैकीं कुत्रें कर व हेंच कर. "

८१. एक कथाभाग वर्णन केला जात आहे :

या दोनीहि राजधान्या म्हणजे आदिलशाहाची व कुतुबशाहाची राजधानी अलमगीर पादशाहाचे हातीं आली तेव्हां अलमगीर पादशाहास फार आनंद झाला. कारण कीं जी इच्छा अलमगीर पादशाहाचे चार पिढ्या लागोपाठ चालत आली होती तीं इच्छा या समईं पूर्ण झाली. अलमगीर पादशाहाचे पाठीमागील गुजरलेले पुरुषानें जी मनांत आवडी धरिली होती तें मनोरथ आज पुरले. या कारणास्तव अलमगी पादशाहास अत्यंत आनंद झाला आणि अति हर्षानें त्याबदल मोठी कचेरी केली. संतोषाचे व आनंदाचे जसें साहित्य असावें तसें जमविलें. ईश्वरास जाणणारे साधु लोकांस बहुत दान धर्म केला. दरबारांतील कारभारी मंडळीस व लढाऊ शूरांस पद अधिकार दिल्हे. इजाफे केले. एकंदर कारभारी मंडळी व खास-गीचे लोक व हमेषा संनिध राहणारे वगैरे सर्व लोकांनीं अलमगीर पादशाहास मुबारकबादीच्या नजरा केल्या. परंतु जैबुनिसा बेगम इणें सर्वांप्रमाणें पादशाहास मुबारकबादीची नजर केली नाहीं. पादशाहा याणी ह्याविषयींचें कारण बेगम इजला विचारिलें. तेव्हां बेगम इणें धैर्यवान पुरुषाप्रमाणें असें उतर दिल्हे कीं, हे मुबारक-बादी द्यावयाचे स्थान नाहीं. आपले सेवकाकडून असे कोणतें श्रेष्ट काम कीं मुबारकबादी द्यावयाजोगें व त्याचे योग्यतेस शोभावयाजोगें घडोन आलें आहे, म्हणजे आपण असा काय पराक्रम केला आहेत कीं मी आपणास मुबारकबादी द्यावी व नजर करावी. यापूर्वी आपण पादशाहाचे पादशाहा होता. कारण कीं, कित्येक पादशाहा मुलकामुलकाचे अबुल हसन पादशाहा व सिकंदर आदिलशाहा पादहशाहा हे उभयता पादशाहा आपले आज्ञेंत व सेवेंत नजर व खंडणीचा ऐवज देत होता. यामुळें आपल्यास शहनशाह राज्याधिराज असें नांव शोभत होतें. आज तर सर्व पादशाहांचा उच्छेद करून एकंदर राजधान्या बुडऊन आपण एकटेच राहिलात आणि सर्व राजधान्या मोडून एकच राजधानी जाहली तेव्हां आपला शहनशाहपणाचा म्हणजे राज्याधिराज-

पणाचा दरजा म्हणजे अधिकार उतरून शाहपणाचे म्हणजे राजेपणाचे दरज्यास म्हणजे पदवीस आलांत. यांतील तात्पर्य हें कीं, आजपर्यंत कित्येक राजे होते म्हणोन आपणास राज्याधिराज असे म्हणत होते. हलीं सर्वांचा उच्छेद करून आपण एकटेच राहिलेत. तेव्हां राजेच झालात. यास्तव जाहीर आहे कीं यावेळेस आपणास नजर करावी असी आपली योग्यता दिसत नाहीं. जेव्हां जैबुनिसा बेगम हिनें या मजकुरानें हीं उत्तरें धैर्यवान शूर पुरुषाप्रमाणें अलमगीर पादशाहास दिली तेव्हां पादशाहास बहुत विस्मय झाला आणि पादशाहा याणीं हे उत्तर बहुत अकलेचें जाणून फार पसंत केले. पारसी बैतेचा अर्थ : " जर करितां स्त्रीची बुध्धी पुरुषाहून अधिक आहे तर त्या स्त्रियेस बुध्धिमान म्हणावें. "

## ८२. विजापूरची खराबी होणें व पडापड होणें प्रकर्ण लिहिलें जात आहे :

सर्वांस जाहीर व्हावें कीं, यापूर्वी विजापूर येथील उत्तमपणाचें व मामुरीचें, म्हणजे भरवस्ती व आबादानीपणाचे, वर्णन विजापूर येथील राहाणारे लोकांचें स्वस्थतेचें, सुख संतोषाचे, विजापूर येथील पादशाहा मंडळ व अमीर लोकांचें उदारपणाचें व दातृत्वाचे, विद्वान लोकांचे जमावाचे, गुणीजनांचे समुदायाचें, विरक्त फकीर लोकांचे ईश्वरास ओळखण्याचें ज्ञानाचें कुरान षरीफचें ग्रंथांत लिहिलेले शास्त्रार्थाप्रमाणें आचारांचे, धर्मशास्त्री व विद्वान यानीं स्वधर्मानें वागण्याचें, विजापूर येथील सिपाई मंडळीचें शूरत्व पराक्रमाचें, पाण्याचें मिष्टतेचे व हवा बदलणेचें जसें कीं विजापूर येथील राहाणारे लोक हमेषा आरोग्य व आनंदात राहून कदापि फसद, म्हणजे आंगाचे शिरेस टोचून रक्त काढितात यास फसद असें म्हणतात त्या फसद, खोलण्याची व जुलाब घेण्याची इच्छा करित नव्हते; वैद्य लोक प्रकृतीची परिक्षा करणारे विजापूर येथील हवेस विलायत येथील हवेचे बराबर समसमान धरीत होते व दुसरी कित्येक उत्तम लक्षणे विजापूरची व विजापूर येथील राहाणाराची जीं वर्णनें केली जातात, वर्णनें ऐकण्यांत येत आहेत, सर्वत्र बोलतात व ग्रंथात लिहिली आहेत त्याप्रमाणें निःसंशय आहे. विजापूर त्या समयीं तसेंच होतें. असें असतां विजापूरची खराबी होण्याचें कारण हें आहे कीं, जागोजाग विजापूर येथील उत्तमपणाचें वर्णन निघतें. उत्तमपणा सर्वत्रच वर्णन करित आहेत. परंतु हलीं हें सर्व वर्णन निघतें. उत्तमपणा सर्वत्रच वर्णन करित आहेत. परंतु हलीं हें सर्व वर्णन गपा छाटल्याप्रमाणें व व्यर्थ बडबड केल्या अन्वयें समजुतींत येत आहे. विजापूरची व विजापूर येथील राहाणारांची तारिफ बखरीचे ग्रंथांत व मुल्ला जहूरी यानीं व वगैरे लोकांनी ग्रंथ केले आहेत त्या ग्रंथांतहि

दिसण्यांत येत आहे. ते सर्व असत्य व व्यर्थ बडबड केल्यासारखे नजरेस येत आहे. कारण कीं या समयीं विजापूर येथील काय खराबी व कसी ओसाडी जाहली आहे व विजापूर येथील राहाणारे लोकांत किती बेमुरवतपणा दिसण्यांत येत आहे तो विस्तारें लिहितां सरत नाहीं. इतके बेमुरवत जाहले आहेत. कारण कीं त्या समयीं विजापूर येथील कीर्ती श्रेष्ठत्व व अत्यंत उत्तमपणा होता तसी या विजापूर येथील हली खराबी व वोसाडी फारच जाहाली आहे. जर करितां पूर्वीचा उत्तमपणा या समयीं वर्णन करावा तर चित्तास फार लज्या वाटती व लज्जेनें हे वर्णन करवत नाहीं व जिव्हाहि हें वर्णन करूं देत नाहीं. कारण कीं या समयीं हें शहर फारच मोडकळीस व ओसाडीस आलें असें, कीं जर करितां पृथ्वींतील एकंदर खराबीसी व विजापूरचे खराबीसी अकलेचे तराजूंत वजन करून पाहतील तर सर्व खराबींचे पारड्यापेक्षा विजापूरचे खराबीचे पारडें खास भारी वजनाचें होईल म्हणजे विजापूरचे खराबीशिवाय कोठेच खराबी नाही. हे ईश्वरा, हलीं विजापूर आहे असेच तरी ठेव. कारण कीं नानाप्रकारचीं संकटे विजापूरचे प्रारब्धयोगानें प्राप्त झालीं आहेत. पारसी बैतेचा अर्थ : " सर्वोपरी हा ईश्वराचा स्तव असो कीं विजापूर येथील याहून अधिक खराबी होऊं नये. "

## ८३. विजापूर येथील एकंदर खराबीची व ओसाडीची कारणें वर्णन प्रकर्ण :

विजापूरची ओसाडी व खराबी कोणकोणते कारणास्तव जाहाली असें विचाराल तर मी सांगतो कीं, दिडशे १५० वर्षांचा सुमार कांहीं अधिकच वर्षेपर्यंत लागोपाट ओसाडीची व मोडकळीची कारणें झालीं आहेत. तीं लिहितां सरत नाहीं. प्रथम सिकंदर पादशाहाचे कारकीर्दीत चौदा वर्षेपर्यंत लागोपाठ धांदल व गर्दी जाहाली. तें वर्णन सदरी लिहिलेंच आहे. दुसरे वेळेस सन ११०१ अकराशेएक (१६८९–१६९० इ. स.) सालीं महामारीचा उपद्रव जाहाला तो महाप्रळयासारिखा प्रळय जाहाला. तिसरे वेळेस ११०३ अकराशेतीन (१६९१–१६९२ इ. स.) सालीं दुष्काळ पृथ्वी प्रळयकारक मोटाच जाहाला कीं, तें दुष्काळाचें संकटाचें वर्णन सतरऐंशी वर्षेपर्यंत मनुष्यांचे मुखांतून जात नव्हतें, म्हणजे वारंवार त्या दुष्काळाचे संकटाचे वर्णन निघत होतें. चौथे वेळेस सन १११३ अकराशे तेरा (१७०१–१७०२ इ. स.) सालचे प्रारंभापासून हा वेळपर्यंत कीं, हे अलमगीर पादशाहा तख्तावर बसल्याचे राजशकाचे चाळीसावे साल आहे. या सालपर्यंत अकराशे वर्षांनंतर नानाप्रकारची विजापूरची ओसाडी होण्याची कारणें लागोपाट झालीं आहेत. तीं अद्यापि सरत नाहींत. पुढेंहि विजापूर खराब होण्याची कारणें बंद होतील अशी

आशा दिसव नाहीं. परंतु जर करितां ईश्वर कृपा करील तर मात्र कांहीं कल्याण होईल. कारण कीं आरबी वाक्याचा अर्थ : “ तो ईश्वर सर्व पदार्थांवर सत्ता ठेवणारा आहे ” यांतील तात्पर्य हें आहे कीं, सर्व पदार्थांवर ईश्वर सताधारी आहे. सर्व ईश्वराचे हातीं आहे.

## ८४. सन १११३ अकराशे तेरा ( इ. स. १७०१–१७०२ ) सालचे खराबीचे वर्णन प्रकर्ण :

या चाळीसाव्या सालीं या प्रकारची खराबी जाहली त्या विषयीचे कारणाचें वर्णन केलें जात आहे कीं, या सदीचे आरंभापासून पुढील भविष्य जाणणारे लोकांनीं सन १२०४ ( १७८९--१७९० इ. स. ) सालीं मोठा दुष्काळाचा तीन वर्षेपर्यंत प्रळय होईल व बहुत मनुष्ये त्या दुष्काळांत मरतील म्हणून भविष्य करून ठेविले आहे. हली असा दुष्काळाचा प्रसंग गुदरून मनुष्यें मरण पावलीं कीं, त्यापुढील दुष्काळ पडण्याचें स्मरण सर्वांचे चित्तांतून निःशेष असे निघून गेले कीं म्हणजे असा विसर पडला कीं, अन्न निखालस मिळेनासें झालें. त्यामुळें कित्येक मनुष्यांनीं गवताचे बीज व हरएक झाडाचें बीज खाऊन व रस्त्यांत मरून पडलेलीं मुरदाड जनावरें व कुत्रीं व मांजरें कापून खाऊन किंचित प्राण वाचविले. शेवटीं तेहि मरण पावले. कांहीं कांहीं या दुष्काळांतील मनुष्यें हा दुष्काळ सरल्यावरहि वाचलीं होती तीं मनुष्यें सुकाळ झाला तथापि मागील दुष्काळाचे पीडेचे उपद्रवानें मरण पावलीं, वाचली नाहींत. लक्षावधी मनुष्यें या दुष्काळांत मेली. कित्येक मनुष्यें कफन दफन न होता तशीच मरून जमिनीवर पडलीं. तीं प्रेतें कावळ्यानें व घारीनें तोडतोडून भक्षण केली. बहुत दिवसपर्यंत अरण्यांत मनुष्याचे हाडाचे आंथरूण झालें होतें, ज्या ज्या गांवीं किंवा खेड्यांत उतरावें तेथें एका तीराइतकीं देखील जागा मनुष्याचे मस्तकाचे, कमरेचे, हाताचे व पायाचे हाडासिवाय कोठेंच जागा रिकामी दिसत नव्हती. असें वाटतें कीं, जमिनीवर पांढरी बिछाईतच आंथरली आहे कीं काय, असें दिसत आहे. जवळ जाऊन पुरती चौकसी करून पाहावे तेव्हां माणसाचीं हाडें आहेत असें समजत होतें. एक बैलाचे गोणीभर दाणे जे दोन तीन रुपयास मिळत होते ते मोठे प्रयासाने एक रुपयास चार शेर, तीन शेर दाणे मिळत होते. असा दुष्काळ पडला तेव्हां कशी दशा होईल ती असमानी आफतीची सात आठ वर्षे गुजरल्यानंतर पुन्हां एकाएकीं संकट प्राप्त झालें. पुन्हां आणखी दुसरा लागोपाठ दुष्काळच पडला. तो दुष्काळ पहिले दुष्काळाचे जोडीचा म्हणजे साम्यतेचाच प्राप्त झाला. दुसरा दुष्काळ पडला तो पहिले दुष्काळापेक्षां फारच

कठीण प्रसंगाचा दुष्काळ होता. कारण कीं पहिले दुष्काळाचे समयांत मनुष्यापासीं कांहीं धन संचय होता, म्हणजे मनुष्यें द्रव्य बाळगून होतीं. हलीचे दुसरे दुष्काळ समयांत मनुष्यास नादारीनें व दरिद्रानें असें घेरलें होतें कीं, या दुसरे दुष्काळाचे समयांत मनुष्यापाशीं प्राणापरता कांहींच संचय राहिला नाहीं. एक ईश्वर मात्र जो पदार्थ इच्छिल ते करीत इतकेंच सत्य आहे. या समईं कोणी धर्मवान दयाळु दाता योग्य पुरुष कोठे आहे कीं तो या सर्व मनुष्यांचे प्राणधन आहे तें घेऊन, म्हणजे मनुष्याचे पालन करून, आपले उदारपणाचे आंबारींतून मनुष्यांस अन्न देऊन या मनुष्यांचे शरीरांत किंचित दुगदुगी मात्र राहिली आहे त्या मनुष्यांचे प्राणोत्क्रमण न होऊं देतां प्राण वाचवील असा कोणीच राहिला नाहीं. यास्तव निरोपाय होऊन कांहीं मनुष्यें पहिले दुष्काळांतून वाचली ती अधमेली झालेलीं मनुष्यें या दुष्काळांत पहिले दुष्काळांत मेलेले माणसांचे पाठी मागें गळीं म्हणजे मरण पावली.

## ८५. तर्फेतर्फेतील मनुष्यांस खाण्यापिण्यास मिळेनासें होऊन सर्वांवर मोठा कठीण प्रसंग गुजरला ह्या विषयींचे वर्णन प्रकरण :

एकंदर लोकांस बहुत दरिद्र प्राप्त झालें. खाण्यापिण्यास देखिल मिळेनासें झालें. बाजारचा व व्यापारी लोकांचा व्यापार फार कमी पडला. पृथ्वींतील व्यापारी लोकांस व्यापार केल्याशिवाय उपायच नाहीं. याजकरितां कारण कीं, व्यापारी लोकांचा व्यापार सर्व मनुष्यांचे व सिपाई लोकांचे सुखावरच आहे. सर्व मनुष्यें सुखांत असतील तर व्यापारहि चालतो. या समईं सिपाई लोकांस कांहीं एक योग्यता राहिली नाहीं. श्रेष्ठ व संभावित व कुलीन पुरुषांस तर कोणीच कदरदानी, म्हणजे योग्यता, जाणणारा राहिला नाहीं. सिपाई लोकांस खाण्यापिण्यास मिळेनासें झालें तेव्हां एकंदर व्यापारी लोकांवरहि कठीण प्रसंग गुजरला. याजकरितां तर्फेतर्फेतील सर्व मनुष्यांस पूर्ण दरिद्र प्राप्त झालें. फार खराबी जाहाली. हें सर्व विजापूरचे निर्दैवीपणाचें चिन्हानेंच जाहलें आहे. अलमगीर पादशाहा याणी जेव्हां विजापूर हस्तगत केलें तेव्हां अलमगीर पादशाहा याणी बहुत यत्न केला कीं, शहर पूर्ववत फार शोभिवंत व अबादान असावें. असा यत्न केला. यांतील कारण हें होतें कीं, अलमगीर पादशाहा बहुत कदरदान होता. विजापूर हस्तगत केल्यानंतर कित्येक अमीरलोक विजापुरांत होते. त्यापैकीं कोणा एकासहि कामावरून काढून बेकार, म्हणजे बेरोजगार, ठेविला नाहीं. अलमगीर पादशाहा याणी कोणा एकासहि उपद्रव दिल्हा नाहीं. व पीडाहि केली नाहीं. सर्वांस पादशाही चालीनें संरक्षण करून योग्यता वाढऊन सर्वांस संतोष करून

पद अधिकार दिल्हे. विजापूर येथील सिपाई लोकांस व एकंदर दक्षिणी मनुष्यांसहि बहुत योग्यतेनें चाकरीवर घेऊन त्यांचा सर्व सामान सरंजामाचा बंदोबस्त ठेविला. निरंतर या सर्वांचें चित्तसमाधान ठेवण्याविषयीं यत्न केला. तसेंच मषायख, म्हणजे धर्मशास्त्री, लोकांचे मंडळीस, फकीर लोकांस व विद्वान व साधु मंडळीस, जे विजापुरांत होते त्यांजला, वजिफ म्हणजे पगार ठरऊन देऊन निरंतर पादशाहा अति थोरपणानें ह्याविषयींचा बंदोबस्त ठेवीत होते. येथपर्यंत कीं, ज्याचा आईबाप वारला आहे व ज्यास कोणी आधार नाहीं त्याजला अनाथ रांडमुंड स्त्रियांस देखील पोटास कांहीं नाहीं अशी बातमी समजल्यानंतर त्यांचे योग्यतेनुरूप कोणास गांव, कोणास खेडीं, कोणास रोज, कोणास दरमाहा व कोणास जमीन याप्रमाणें चालू केलें. अलमगीर पादशाहा याणीं जसें विजापूर येथील राहाणारांचें बहुत संरक्षण केलें आणि त्याजला इनाम व पगार ठरऊन दिल्हे तसे दुसरे ठिकाणीं कोठेंच केलें नाहीं. आज जशी अलमगीर पादशाहाची इनामपत्रें विजापूर येथें मुसलमान लोकांपाशीं प्रत्यक्ष आहेत तशीं हैदराबाद येथेंहि नाहींत, अह्मदनगर येथेंहि नाहींत व दुसरेहि कोणतेच जागीं अशीं नाहींत. यद्यपि अलमगीर पादशाहाचा उदारपणा व हिंमत, म्हणजे धैर्य, व योग्यता जाणणेचा संबंध दक्षिणी पादशाहाकडे किंचित दशांश म्हणजे दहावा हिसादेखिल नव्हता, म्हणजे अलमगीर पादशाहास दक्षिणी पादशाहाची दया किंचितहि नव्हती, परंतु विजापुरांतील राहाणारांवर अलमगीर पादशाहा याणी फारच कृपा केली आणि अत्यंत मेहरबानगीनें सांभाळ केला. हें सर्व जाहालें परंतु विजापूरचें प्रारब्ध वाईटच. यामुळें आबादानी जाहाली नाहीं. कोणास सुख लागलें नाहीं. दिवसें दिवस विजापुरचा नाश होणेंत कांहीं कमी जहालें नाहीं. तसाच. आसफजाहा आपले जिवमानपर्यंत विजापूरचे व विजापुरांतील राहाणारांचे संरक्षणाविषयीं बहुत यत्न करित होता व विजापुरांतील इमारतींची डागडुजी पडझड नीट करून बंदोबस्त ठेण्याविषयीं फारच झटत होता. विजापुरांतील राहाणारांचे बहुत चित्तसमाधान ठेवित होता. ज्या विद्वान हुशार मनुष्यास विजापूर सुभ्यावर रवाना करित होता त्या मनुष्यांस आधीं विजापूरच्या इमारती दुरुस्त करण्याविषयीं, विजापूरची आबादानी ठेवण्याविषयीं व विजापूर येथील राहाणारांचे बहुत चित्तसमाधान ठेऊन त्यास आधार देत जाऊन त्याचे बहुत संरक्षण करित जावें असी ताकीद व बोध करित होता. विजापूर येथील मुसलमान लोकांचे रोजमुरे व इनाम नेमणुकी वगैरे जे असेल तें बंद न करितां चालू ठेऊन हमेषा अशी वहिवाट ठेवित होता कीं, प्रतिवर्षी मषायख लोकांची जमात व फकीर मंडळी व विजापूर येथील हकदार मुसलमान लोकांचा समुदाय हे सर्व लोक आसफज्याहकडे हुजूर जाऊन पोहचत होते. तेव्हां आसफज्याह हरएकास

बहुत आदरानें व अत्यंत प्रीतीनें व पूर्ण सत्कारानें भेटी घेऊन हरएकास योग्यतेनुरुप इनाम व बक्षीस देऊन त्याचा संतोष करून त्याजला परत जाणेंविषयीं निरोप देत होता. विजापूर येथील राहणारे लोकापाशीं असें ठरलें होतें व बोलत होते कीं या कालचक्राचे योगानें हरएकाचे चित्तावर वाकडेपणाचा व वैरभावाचा मळ बसत होता. अयोग्य कालचक्राचे किंकिरीचा जंग, म्हणजे मळ, बसून चित्ताचे दर्पणास मलीन करित होता. तो मळ नवाब आसफज्याहाची भेटी घेतांच सर्व दूर होऊन सर्वांची अंतःकरणें आयन्यासारखीं निर्मळ होत होतीं. त्या कदर-दानाची, म्हणजे आसफज्याहाची इतकी कदरदानी व इतकी संरक्षण करण्याची चाल यत्नपूर्वक असोन, विजापूरची वस्तवस्ती म्हणजे दुदैव कांहींच दूर होत नव्हतें. आबादानी व मामुरी होत नव्हती. जेव्हां त्या अलमगीर पादशाहाचे कदरदानींत व पूर्ण प्रीतीनें संरक्षण करण्याचें दिवसांत व त्या श्रेष्ठ अमीराचे म्हणजे आस-फज्याहाचे कारकीर्दीतहि विजापूरची या प्रकारचीच दशा होती तेव्हां पहावे कीं, नाकदरदानाचे व निर्दय पुरुषाचे हातीं विजापूर पडलें असेल तेव्हां विजा-पूरची अवस्था कोणते दशेस पोहचली असेल हें पहावें. सन ११७३ अकराशें त्र्याहातर ( १७५९–१७६० इ. स. ) हिजरी सालीं जेव्हां नवाब आली निजामखान व मराठे लोकांत बिघाड आला तेव्हां ६०,००,००० साठ लक्षाचा मुलूख कमी जाहाला. त्यानंतर विजापूर ब्राह्मण लोकांचे हातीं आलें. तेव्हां ब्राह्मण लोकांनीं विजापूर शहराचा बंदोबस्त ठेविला नाहीं. विजापूरचे आबादीची व इमारत दुरुस्त राखण्याची चिंता केलीच नाहीं. ज्या अमलदारास विजापुरावर पाठवित होते व विजापुरावर जो अमलदार आला तो ऐवज वसूल करण्याविषयींच यत्न करीत होता. दिवसेंदिवस वसुलाविषयींच बहुत झटत होता. तो अमलदार कदापि रयत लोकांचे व गोरगरीबांचे अवस्थेवर नजर ठेवीत नव्हता. ह्यास्तव निरोपायपणानें दिवसेंदिवस विजापूरची अधिक अधिकच ओसाडी व खराबी होत होती. कित्येक घरांची व दुकानांची खराबी होऊन निखालस फडशा होत नव्हता असें कोणतेंच वर्ष किंवा महिना रिकामा जात नव्हता. असें म्हणजे दर महिन्यास प्रतीवर्षी बहुतेक घरांचा व दुकानांचा फडशा होत होता. विजापूरचा किल्ला अलमगीर पादशाहा याणी जेव्हां घेतला त्यासमई अलमगीर पादशाहा यानीं विजापूर येथील खानेसुमारी म्हणजे घराची मोजदाद केली. तेव्हां ९,८४,००० नऊ लक्ष चौऱ्याऐशीं हजार घरें गणतीस लागलीं. यद्यपि या पूर्वी सुलतान महंमद आदिल-शाहा पादशाहा याचे कारकीर्दीत एकट्या शाहपूरचीच ९,००,००० नऊ लक्ष घरे गणतीस खानेसुमारी केली होती. त्याशिवाय शहरची व एकंदर पुऱ्यांची घरें होतीं. आज पहावें कीं विजापूरचे शहरांत व एकंदर पुऱ्यांत व किल्याचे आंतबाहेरील मिळोन नऊशे ९०० घरांसिवाय अधिक गणतीस लागली नाहीत. नऊशें मोजणी

झाली. आश्चर्य हें आहे कीं प्रती वर्षीं विजापूरची खराबी होतच होती. हल्ली तर हें शहर दारुल आमारत व दारुल खिलाफत, म्हणजे राजधानीची जागा व अमीर-लोकाचें वस्तीस्थान असें म्हणवीत होतें, हली हें शहर या दशेस येऊन पोहचलें कीं एखाद्या कसब्याची किंवा लहानसे खेड्याची साम्यता दिली तत्रापि शोभावयाजोगें आहे. कारण कीं, लहानशा कसब्यांत व खेड्यांत जे जरुरीचे कारणाचे पदार्थ मिळ-तात ते या विजापुरांत मिळतात असें नाहीं. हाकीम म्हणजे वैद्य, काजी, मुत्फी म्हणजे कुरान शरीफचे किताबींतील शास्त्रार्थ देणारा व विद्वान जे शहरांत व मुसलमानी वस्तींत असलेच पाहिजेत ते कोणीच राहिले नाहींत. तेव्हां अकलवानाचे सांगण्यावरून या शहरांत शाहाण्या मनुष्यांनी राहूं नये असेंच सिध्द होतें. परंतु काय करावें ? थोरथोरांचे दरगाह व मोठमोठे वली पुरुषांच्या म्हणजे साधूंच्या कबरी व वाडवडील गुजरून गेले त्यांच्या कबरी आहेत यामुळें या जाग्यावरून हलतां येत नाहीं. येथेंच राहाणें प्राप्त आलें.

### ८६. एक कथाभाग वर्णन केला जात आहे :

विजापूर येथील विद्वान लोकांपैकीं एक विद्वान माहबिल्लाह म्हणोन होता. तो आसफज्याहचे भेटीस गेला होता. तेव्हां नवाब आसफज्याह यानीं नित्य पाठाप्रमाणें, म्हणजे विजापुराकडून कोणीहि येईल त्याजला विजापूरचे वर्तमान विचारीत होते, त्याप्रमाणें सदरहू विद्वान यांस विजापूरचें वर्तमान विचारीलें. तेव्हां विद्वान मजकूर याणी पारसी बैतेंत विजापूरचे मजकुराची सूचना सुचविली. त्या पारसी बैतेचा अर्थ : "पादशाहाचे वाड्यावर सुनेऱ्याचे कडे जागोजाग सुतेरे घालीत आहेत. आफरासियाब म्हणोन पादशाहा जाहला. अशा योग्यतेचे पादशाहाचे हवेलीवर घुबडे व पिंगळे बसतात." यांतील तात्पर्य हें आहे की, ज्याचे घरांत वस्ती नाहीं त्याचे घरांत झाडलोटीचा बंदोबस्त नसतो व जेथें झाडलोट नाहीं तेथें जागोजाग सुतेरे व घेरोसे लागतात व ओसाड घरावर घुबडे बसतात अशी दशा विजापुरची जाहाली आहे. दूरदृष्टीनें पाहावें कीं, यापूर्वी आसफज्याहची कारकीर्द ऐशी ८० वर्षेपर्यंत होती व त्या कारकीर्दीतील सुखप्राप्ती दक्षिण देशातील सर्व प्रसिद्ध आहे. विजापूर व विजापुरांतील राहाणारे त्या समयांत बहुत संतोषांत व द्रव्य बाळगून असतील. त्याप्रमाणें त्या विद्वानांनीं विजापूरचें वर्तमान सांगितलें त्यांत पूर्वींचे कारकीर्दीस व हलीचे कारकीर्दीस बहुत तफावत आली असें सांगितलें. आज तर नानाप्रकारचे संकटाचा प्रळयच आहे. त्याहि कारकीर्दीस व या कारकीर्दीस हजारपट अंतर आलें. बहुतच कमतरपणा व

खराबी झाली तें सांगू काय व रडूं काय ? आरबी वाक्याचा अर्थ : "ईश्वर जें इच्छितो तें करीत आहे व ईश्वराचे इच्छेस येईल ती आज्ञा ईश्वर करितो." पारसी बैतेचा अर्थ : "उछिष्ट म्हणजे उष्टे आहें किंवा चांगलें आहे हें विचारण्यास तुजला हुकूम नाहीं, म्हणजे अधिकार नाहीं. उगाच स्तब्ध राहा. कारण कीं, आमचे साकीनी, म्हणजे शराब देणारांनी, जी शराब ओतली ती शराब कांहीं एक न विचारितां प्राशन करावी हेंच उत्तम आहे, म्हणजे ईश्वर करील तें सर्वांनीं उगेच सोसावें व असें कां व कशासाठीं ईश्वर करितो हें विचारण्यास कोणास अधिकार नाहीं. ईश्वर सत्ताधारी आहे.

## ८७. पुण्याचे सरदाराचें वर्णन प्रकर्ण :

यद्यपि पुण्याचे सरदार ब्राह्मण लोक याणीं विजापूरचा समाचारच घेतला नाहीं आणि विजापूर हे पादशाही तख्ताची राजधानीची जागा असोन विजापूर येथील इमारतींचे दागदुजीचा बंदोबस्त न करितां पुणे व सातारा या दोनच जागा राजधानीच्या केल्या होत्या. परंतु त्या ब्राह्मण सरदारांनीं न्याय व इनसाफानीं राज्य केलें व हिंदुस्थान व दक्षणची सरबराई बहुत अकलेनी ठेऊन अत्यंत शोभेनें कारभार केला. या ब्राह्मण लोकांचे कारकीर्दींत जोंपर्यंत गरीब लोकांचा व रयतेचा प्रतिपाल करणें व दाद घेणें व न्याय व इनसाफ चालू होता तोंपर्यंत राजधानींचा कारभार अति उत्तमपणानें व शोभेनें चालला होता. त्याचे राज्य हस्तगत करणेविषयीं शत्रूचा जोर चालत नव्हता. जेव्हां घरांतले घरमंडळींतच वाकडे आले, आपसांत वैर उत्पन्न जाहालें आणि मित्रता व सख्य निखालस एकमेकांतून नाहींसें झालें, नाना फडणीस हा बहुत अकलवान मसलतगार व फार विचारवान कारभारी होता व नाना फडणीस यांनीं फार दिवस बहुत अकलेनी व उत्तम विचारानें राजधानीचा बंदोबस्त चांगला ठेऊन राजकारभार चालविला, त्या नाना फडणीसाची मसलत व सला विचार मोडून बुडबडाच्या पायाचा व वाईट स्वभावाचा बाजीराव वलद राघोबा याजला गादीवर बसविलें. ज्या बाजीरावानीं कधींहि कामकाजाचा अनुभव पाहिला नाहीं त्या मूर्खानीं अकलवान कामदाराचा विचार सोडून आपले मनास येईल तसी वागणूक करून पुरातन सरदार कुलीन होते त्याजला बर्तर्फ करून नीच मनुष्यांस त्या थोर थोर सरदारांचे जाग्यावर कायम केलें. त्या हलके योग्यतेचे चाकरांचे अयोग्य मसलतीनें कारभार करून अकलेचा कायदा सोडून कामाचा भरंवसा भलत्यावरच ठेऊन नालायकपणाची म्हणजे वाईट चाल धारण केली. राज्य बुडण्यास जी चाल योग्य होती ती चालू केली. हलके योग्यतेचे चाकर लोक

त्याचे दौलतीचे कारकीर्दीत फारच योग्यतेस चढले होते. बहुत जुलम जबरदस्ती करण्यास प्रारंभ केला. राजधानींत एकंदर कामाचा बंदोबस्त निखालस नाहींसा जाहाला. रयत लोकांची खबर घेणें निखालस सुटलें. येणेंकरून सर्व गरीब लोकांस उपद्रव होऊं लागला. दरवडा व छापा चहूंकडे पडणें व मामलेदार म्हणजे द्रव्यवान व साहुकाराचीं घरे लुटणें व त्याजला जिवानिसीं ठार मारणें प्रसिद्ध जाहालें. पेंढारी लोक याणी एकंदर मुलकांत दंगा व गर्दी चालविली. भरवस्तीचे कसब्यांचे गांवच्या पेठा निखालस लुटून पाक करित होते. या संकटाचें भय चहूंकडे असें पडलें होतें कीं, मनुष्यांनीं रात्रीं निजणें सोडिलें. मुसाफर म्हणजे प्रवास करणारे व मार्ग चालणारे माणसांनीं जाणें येणें सोडिलें. एकंदर वाटा बंद जाहाल्या. शेवटीं आरबी वाक्याचा अर्थ : " मुलुक कुफ्रचे योगानें कायम राहातो. जुल्माचे योगाने मुलूख कायम राहात नाहीं. कुफ्र म्हणजे देवाची पूजा करणारा म्हणजे हिंदु जातीचा जरी मुलकाचा धणी आहे व न्यायानें वागतो असें आहे तत्रापि मुलूख कायम राहील, आणि खुदापरस्त म्हणजे मुसलमानाचे जातीचा मुलकाचा जरी धणी आहे आणि तो जुलूम करील तर कदापि मुलूख कायम राहाणार नाहीं असें आहे. " या वाक्याप्रमाणें शेवटीं ती ईश्वरानीं दिलेली दौलत त्या बाजीरावापासून निघोन गेली. आणि त्याचे शत्रूचे मनोरथ पूर्ण होऊन तो बाजीराव शत्रूचे हातीं कैद झाला. सर्वांकडून त्या बाजीरावानें छीः थूः करून घेतलें. पारसी बैतेचा अर्थ : " ज्या पुरूषाचें दैव दुर्दैवपणानें फिरतें त्या पुरूषाची अकल घात सूचक, म्हणजे घाताची वाट दाखविणार, होती. "

## ८८. इंग्रज लोकांचे धणीपणाचे वागणुकीचें वर्णन प्रकर्ण :

हलीं आठवे वर्ष आहे कीं, मराठे लोकाची कारकीर्द बाराशें तेहतीस (१८१७–१८१८ इ. स.) सालचे अरंभापासून इनसाफ करणार, न्यायानें वागणार, अकलवान व समजदार इंग्रज बहादूर यांचे हातीं हे विजापूर येऊन इंग्रज सरकारचे न्यायानें व शिक्षेनें हिंदुस्थान व दक्षणचे सर्व मुलकांत सुख व विश्रांती प्राप्त जाहाली. सर्व रयत लोकांस स्वस्थपणा व खातरजमा व विश्रांती प्राप्त जाहाली. कारण बाजीराव याचे अमलापासून खंडणीचा ऐवज देण्यास त्रासले होते व बाजीरावाचे जुलमानें व पीडेनें जीव देण्यापर्यंत कंटाळले होते, या कारणास्तव कीं बाजीराव याचे अमलांतील अमलदार मामलेदार वगैरे बहुत जुलमानें व जबरदस्तीनें वसूल घेत होते. जुलूम व जबरस्तीशिवाय व रयतेस उपद्रव केल्याशिवाय वसूल करितच नव्हते. कौल करारहि सोडून दसपट अधिक वसूल घेत होते. हली इंग्रेज सरकारचे अमलांत कांहीं एक उपद्रव किंवा पीडा न होतां,

न मागतां व तगादा न करितां रयत लोक खुद जातीनें आपआपले संतोषानें वसूल आणून पोहचवितात. करारमदार सोडून एक दाणादेखील अधिक वसूल देत नाहींत आणि अत्यंत संतोष पाऊन व सुखास व विश्रांतीस प्राप्त होऊन बहुत सुखानें प्रपंच करित आहेत. पूर्वी बाजीराव याचे अमलांत छापे व दरवडे हरएक तर्फेतील गावांत पडून मामलेदार व सौदागर लोक व सावकार लोकांची घरें लुटून पाक करून केवळ माल लुटून इतक्यावरच संतोष न मानिता जिवानिसींहि सदरहू मंडळीस ठार मारित होते. हलीं इंग्रेज सरकारचे अमलांत, जर करितां चोरट्यांनीं कोणास जिवें मारल्यास किंवा कोणाचा माल थोडासाहि लुटून नेल्यास, अमलदार व मामलेदार वगैरे बहुत हुशारी ठेऊन बहुत खबरदारीनें जलद त्या चोरांचा पता लाऊन चोरट्यांस पकडून त्याजला बहुत सिक्षा देऊन व पुरतें पारपत्य करून त्या चोरट्यांस माती वाहण्याचे कामावर नेमितात. असेच हजारों चोरट्या लोकांस कैद केलें. चोरटे व दरवडेखोर दूर देशचे व जवळचे गांवचेहि कैद झाले. हली धोंडे फोडण्याचे व माती वाहण्याचे कामांत प्रतीबंध पावोन आपले वाईट वागणुकीचे पारपत्य पावतात. तसेंच पूर्वीचे अमलांत पेंढारी याणी सर्व शहरांत व गांवोगांव दंगा करून संकटाचा अग्नि प्रदिप्त करून कित्येक भरवस्तीचे व आबादानीचे गांव लुटून हरएक तर्फेस चहूंकडे भय घातलें होतें. असें कीं, सर्व मनुष्यें भयाभीत होऊन सर्वांनीं निद्रा घेणें व खाणेंपिणें सोडून रात्रंदिवस भयाभीत होऊन धाक बाळगीत होते. एकंदर रस्ते बंद जाहाले. हा दंगा बंद करण्याचे कोणाचेच हातून बंदोबस्त होत नव्हता. हली साहेब इंग्रज बाहादूर यांचे बंदोबस्तानें असा पक्का बंदोबस्त झाला आहे कीं, ते सर्व पेंढारी लोक नाबुदीचे गलींत बुसून, म्हणजे निखालास नाहींसें होऊन, असे नाश पावले आहेत कीं, त्या पेंढारी लोकांची खूण देखील कोठें राहिली नाहीं. साहेब इंग्रज बाहादूर यांचे बंदोबस्तानें पूर्वीचे अमलांत बहुतेक घरें व जाग्याच्या इमारती पडून खराब झाल्या होत्या त्या इमारती दुरुस्त जाहाल्या. ज्या ज्या गावची पडापड जाहाली होती येथें आबादी जाहाली आहे. असें कीं, पूर्वींचे मोठे मोठे इनसाफ करणारे पादशाहा होऊन गेले त्यांचे कारकीर्दीचे हा इनसाफ पाहून स्मरण येतें, म्हणजे पूर्वीचा पादशाहाचा इनसाफ व हलीचे इंग्रेज सरकारचा इनसाफ समसमान आहे. दिवसेदिवस अधिकच इनसाफाची वृध्धी आहे. परंतु विजापूर हें दक्षिणचे तक्ताचे व राजधानीची जागा आहे व विजापूरची कीर्ति इरान व दुरान व रुम व षाम पर्यंत प्रसिद्ध आहे. या इंग्रेज सरकाराचे कारकीर्दीतहि पहिलेप्रमाणेंच विजापूर ओसाड व खराब राहिले. पडापड जाहालेली तशीच आहे. जसे ब्राह्मण लोकांचे, म्हणजे पेशव्यांचे, अमलांत कोणीच विजापूरचे इमारतींचा बंदोबस्त केला नाहीं व कोणीच विजापूरचे इमारतींची चिंता वागविली नाहीं तसेंच

या इंग्रज सरकारचे अमलांतहि कोणी विजापूरची चिंता वागविली नाहीं व कोणीच विजापूरची आबादी व्हावी येविषयींची फिकीर बाळविली नाहीं. इंग्रज सरकार यानींहि निखालस डोळेझांक केली आहे. पूर्वीचे कारकीर्दीत मनुष्यास आशा होती जर करितां हें शहर पुरातन तक्ताची जागा आहे, हें शहर जर करितां इंग्रज सरकारचें हाती पडलें तर खास हें शहर आबाद व मामुर होईल. कारण कीं, इंग्रज सरकार हे कदरदान आहेत. पारसी अर्धें बैतेचा अर्थ : "जवाहिराची योग्यता जवाहिराची परिक्षा जाणणार ओळखितो व तक्ताची योग्यता पादशाहा जाणतो". जेव्हां इंग्रज सरकार बहादूर याचा भर दौलतीचा व बाहाराचा समय असोन अशा समयांतहि विजापूर पहिलेप्रमाणें ओसाड व खराब झालें हें पूर्ण आश्चर्य आहे असें नाहीं. विजापूरचे दुर्दैवाचा गुण व विजापूरचे दैवच वाईट आहे, तेव्हां काय सांगावे ! ते या बैतेंत वर्णन केलें आहे. पारसी बैतेचा अर्थ : "जें आहे तें आमचे अयोग्य प्रारब्धाचें शरीरानेंच आहे. नाहींपेक्षां तुमचेकडून कोणाचे शरीराविषयींच अंतर नाही."
पूर्वीचे कारकीर्दींत असा कायदा चालू होता कीं, जेव्हां एखादा सरदार किंवा कोणी फौजवाला कोठून कोणीकडे शिकारीकरितां किंवा कांहीं कामाकरितां निघत होता व त्या सरदाराचा ज्या जाग्यावर मुकाम पडत होता तेथें तो सरदार त्या जागेचे मनुष्यापासून मेजवानकीचे साहित्य घेत होता. यद्यपि एक बकरें व एक तुपाची घागर जरी होती तरी तितकेच घेत होता व दुसरे कांहीं एक जरीं न मिळेसे असलें तत्रापि गवत किंवा कडबा तरी फुकट घेत होता. यामुळे व या करण्यांत हजारो गोरगरीब रयत लोक खराब झाले व हजारां लोकांचे बहुत नुकसान होत होतें. हली होतें. हली या इंग्रज सरकारचे अमलांत इजा व उपद्रव निखालस बंद झाला आहे. लष्करांतील कोणतेच शिपायास असें सामर्थ्य नाहीं कीं, एखादे हलकेसे रयत लोकांचे खळ्यांतून एक कणीस उचलील किंवा कोणते एखादे गरीबापासून कांहीं जबरदस्तीनें घेईल. असें सामर्थ्य नाहीं परंतु जो कांही जिन्नस पाहिजेसा असेल तो किंमत देऊन विकत घेतात व पैसा दिल्याशिवाय एक कोंबडयाचे अंडे देखील घेत नाहीं. पूर्वी असी वहिवाट होती कीं, रयत लोकांचें बागेंत किंवा शेतांत कांहीं उत्तम फळफळावळ झाडास येत होतीं तेव्हां सरदार लोकांची व गांवचे हकीमांची फरमास तीं फळें मागण्याविसी होत होती तेव्हां तो बिचारा गरीब भयाभीत होऊन धाकाने कापत कापत त्या मागणारास काय मागेल ते आणोन हजर करित होता. या योगानें सर्वांस बहुत उपद्रव व चिंता प्राप्त होत होती. या गरीबांचा प्रतिपाळ करणारांचे, म्हणजे इंग्रज सरकारचे, कारकीर्दींत हेंहि बंद झालें. सरदारांस जो जिन्नस पाहिजेसा होईल त्या जिन्नसाची किंमत पाठऊन तो जिन्नस विकत आणवी. तो व इंग्रज सरकारचे अमलांत दुसरे आणखीहि कित्येक उत्तम लक्षणें आहेत व तीं लक्षणें

स्तुती करण्यास योग्य आहेत. आरबी वाक्याचा अर्थ : " आधार देवो ईश्वर त्याजला उतमपणाविषयीं. "

येथपर्यंत सरकारचे उत्तम गुणवर्णन जाहाले. येथून पुढें इंग्रज सरकारचे दुर्गुण वर्णन ग्रंथाचे समाप्तीपर्यंत आहे. तेव्हां तें लिहिलें असतां तुम्ही इंग्रज सरकारचे चाकर असोन इंग्रज सरकारचे निंदेचे वर्णनाचा तरजुमा कसा केलात येविषयीं कसें करावें म्हणोन सरकारांत जाहीर करून नंतर हुकूम होईल तसे करावयाचे होते असा कोणी बोल ठेवितील, हे जाणोन मेहरबान बारटल फ्रीयर साहेब, इस्कोयर, कमिशनर बाहादूर, इलाखा सातारा, यांची स्वारी नेहरास गेली होती त्यांस ह्याविषयीं अर्जदास्त लिहिली. त्याचे उत्तर आलें त्या दोनीहि पत्रांच्या नकला या ठिकाणीं लिहिणें मुनासिब जाणोन लिहिल्या जात आहेत.

विनंतीपत्राची नकल :

हुा

मेहरबान कदरदान आलीशान रफीआमकान
हजरत बारटल फ्रीयर साहेब इस्कोयर, कमिशनर
बाहादूर, इलाखा सातारा, मदजिलहू

अर्जदाष्त नरसिंगराव विटल पारसनीस निा सरकार कुंपणी इंग्रज बाहादूर बादज आदाये आदाबे तसलिमात मजारून राय मेहर इंजलाय आंकेताब तारीख २ माहे मुलहराम (मोहरम= ७ नवंबर १८५०) मुकाम सातारा येथें साहेब बाहादूर यांचे दर वरिषीचे योगानें बखैर असो. दिगर मजमुन इंके साहेब बाहादूर याणी विजापूर येथील पादशाही कारकीर्दीचे वर्णनाची पारसी किताब तारिखे विजापुरी ही मऱ्हाठीत तरजुमा करण्याकरितां मजकडे दिल्ही. त्या किताबीचा तरजुमा शेवटास आला आहे. परंतु सदरहू किताबीचे शेवटीं इंग्रज सरकारचे फारच दुर्गुण वर्णन केले आहेत. तेव्हां येविसीचा तरजुमा करणे नीट दिसत नाहीं. हें वर्णन तसेंच ठेऊन येथपर्यंत ग्रंथ समाप्त करावा किंवा कसें ह्याविषयीं फार जलद हुकूम पाठविण्यांत यावा. कारण कीं, मजला वारीस श्रीपंढरीस जाणेची फार जरूर आली आहे. तर वारीकरितां जाणेविषयींहि रजेचा हुकूम लिहून आला पाहिजे. जियादाचे अर्ज जुमायदे दस्तुर खुद.

आज्ञापत्राची नकल लिहिली जात आहे :

सन १८५०

की. जा. नं. २०

सातारा कमिशनर साहेब याजकडून–

मेहेरबाने बाबा पारसनवीस यास तुम्ही छ २ मोहरमचे (७ नवंबर १८५०) पत्र पाठविले ते पोहचले. त्यांत विजापूर येथील पादशाही कारकीर्दीच्या पारशी किताबीचे शेवटीं इंग्रज सरकारचे फार दुर्गुण व निंदा केली आहे त्याचा तरजुमा करावा किंवा कसें म्हणोन व पंढरीचे वारीस जावयाचे आहे याजकरितां सत्वर उत्तर यावें म्हणोन लिहिलें आहे. त्याजवरून लिहिण्यांत येतें कीं, निंदेचा तरजुमा तुम्ही बिन फिकिर करून काम पुरे करून पंढरीहून आल्यावर तरजुमा हुजूर जाहीर करणें. तारीख ९ नवंबर सन १८५० इसवी.

बार्टल फ्रीयर
[ इंग्रजी लिपीची सही. ]

८९. याप्रमाणें हुकूम आला. त्यावरून इंग्रज सरकारचे दुर्गुण व निंदेचे वर्णनाचा तरजुमा लिहिला जात आहे :

येथपर्यंत जेव्हा इंग्रज सरकारचे उत्तम गुण व तारिफ वर्णन केली तेव्हां त्यांचे दुर्गुणहि वर्णन करितो. कारण कीं, येणेंकरून मतलबास्तव तारिफ केली असा दोष मजवर न राहावा. ह्या विषयीं वाक्य आहे. " जें सांगितले आहे तें बरेंच सांगितले आहे. " फारसी बैतेचा अर्थ : " अकलवान पुरूष दोन पदार्थानें शोभतो. तारिफेचे ठिकाणीं तारिफ करावी व निंदेचे ठिकाणीं निंदा करावी. " या जातीचे अकल्याणकारक पायाचे म्हणजे इंग्रजांचे दुर्गुणहि वर्णन केले पाहिजेत. ही निर्दैवी जात या मुलकात आली त्या पहिले वर्षातच मोठे विघ्न प्राणघातक या इंग्रजानी समागमें आणिलें. तें एक दुष्काळ व एक महामारीचा उपद्रव हीं दोन विघ्नें या मुलुकांत आली. दुष्काळ कांहीं दिवसांनंतर कांहींस पीडा करून निवारण झाला. त्या दुष्काळानें कित्येक संकटें व विघ्नें मनुष्यास चाखवून, म्हणजे भोगऊन, प्राण घेनले. परंतु पटकीचा उपद्रव बहुतच प्रळयकारक झाला. तो काय सांगावा व त्याचा काय विस्तार करावा ? वर्णन करण्यास जिव्हेस सामर्थ्य नाहीं व चित्तासहि बळ नाहीं. दुरवर विचार करणें तर अकलवानांनीं अलमगीर पादशाहाचे कारकीर्दीत सन ११०१ अकराशे एक ( १६८९–१६९० इ. स. ) सालीं महामारी उपद्रव झाला व

त्या पटकीस महाप्रळ्याची उपमा दिली आहे. जसें कीं सांगितलें आहे. पारसी बैतेचा अर्थ : "मोठा प्रळय होता किंवा महामारीचा उपद्रव होता. हलीं हा पटकीचा उपद्रव पहिलेपेक्षां हजारपट अधिक झाला आहे. या उपद्रवास कोणत्या पदार्थाची उपमा देऊ व कोणता पदार्थ या उपद्रवाचे साम्यतेस आणूं ? कारण कीं या पटकीचे उपद्रवाचे बराबरीचा असा कोणताच पदार्थ अंतःकरणांत येत नाहीं कीं यास उपमा दिली जाईल. पहिले पटकीचे उपद्रवाचे संकटांचे वर्णन यद्यपि बहुत वर्षें मनुष्यांचे जिव्हेनीं होत होतें. परंतु तो उपद्रव या विजापूरचे तर्फेत अलमगीर पादशाहा मरण पावल्यापासून शांत होऊन त्या उपद्रवापैकीं कांहीं थोडासा बाकी राहिलेला उपद्रव तीन वर्षेपर्यंत किंचित अवशेष उरला. परंतु हा पटकीचा मोठा उपद्रव आठवे वर्षापासून इंग्रज लोक या दुष्काळांत आले तेव्हांपासून प्रती वर्षांत खाडा न पडतां चालू आहे. एक वर्ष देखील या माहामारीचे उपद्रवाखेरीज रिकामे गेलें असें पाहिले नाहीं. जसें संस्कृतात सहा ऋतु व मुसलमानी शास्त्रांत चार ऋतु वर्णन केले आहेत तो ऋतु आपआपले महिन्यांत कधींहि आल्याशिवाय राहत नाहीं तसे सन समान सितैन ( १६६८-६९ इ. ) सालापासून पटकीचे उपद्रवासहि प्रतीवर्षीं येणें प्राप्त झालें. हा एक ऋतुच मुकरर झाला आहे व तो ऋतु जसा ज्या महिन्यांत जो येतो तो सर्व पृथ्वींत चहूंकडे त्या महिन्यांत तोच ऋतु असतो. कोठे असतो कोठे नसतो असे घडत नाहीं. तसा हा पटकीचा उपद्रवहि एकाच मुल्कांत व एकाच तर्फेस आहे असें नाहीं. हा उपद्रव पृथ्वीभर जाहाला आहे व चहूकडून दूर देशचे मुलकाहून जी कोणी मनुष्यें येतात ती या पटकीचे उपद्रवाचेंच वर्तमान आणितात. हरएक मुल्कांत या उपद्रवानें बहुत मनुष्यें टार झाली ( नाही ) असा कोणताच गांव किंवा खेडें नाहीं कीं त्या गावांत हा पटकीचा उपद्रव कधींहि झालाच नाहीं. खास हे आठवें वर्ष तर असें आलें कीं, या आठवे वर्षांत पटकीचा उपद्रव पूर्वींचे वर्षापेक्षां फारच अधिक जाहाला. कित्येक घरांची अशी दशा झाली आहे कीं, घरचे एकंदर मंडळीपैकीं एक माणूस देखिल जिवंत राहिला नाहीं. त्यांचे घरचीं चीजवस्त मालमत्ता काय असेल ते एकंदर बैतन माल देऊन तो माल इंग्रज यांचे जमेस आला. कित्येक गावांची व खेड्यांचीहि अशी अवस्था झाली कीं, त्या गावांत एक देखील मनुष्य वस्तींत नाहींसें होऊन गांव ओसाड झाले. त्या गावांत कोणीच गाववाला नाहींसा झाला. यामुळें त्या गांवचा वसूल देखिल बंद होऊन दाब बुडाली. साल मजकुरीं पटकीचे गर्दीनें व उपद्रवानें मुलकाचे सरदारांस व शिपाई लोकांस असें भय प्राप्त झालें कीं आपआपल्या जागा व घरें सोडून देऊन घाबरून आपला प्राण वाचविण्याकरितां इकडून तिकडे व तिकडून इकडे असें जागोजाग फिरत होते. गोरगरीबांचा व सामर्थ्यहीनांचा व दरिद्री लोकांचा

काय हिशेब ! खुद थोर लोक व द्रव्यवानांची अशी अवस्था झाली आहे कीं, त्यांणीं आपले प्रपंचाची आशा सोडून व सोन्यारुप्याची व घरची चीजवस्त वगैरे एकंदर सामानाची परवा पाठीवर टाकून, म्हणजे सोडून, रात्रंदिवस मरणाचे फिकिरींत पडोन निद्रा व भोजनाचे निखालस विस्मरण केलें आहे. आयुर्दायापासून निराशवंत होऊन चित्त या पृथ्वींतून व कारभारांतून काढिलें आहे. या आठ वर्षांतील पटकीचे उपद्रवांत मयत माणसाची गणती हजार व लक्षाचा सुमार सुटोन आर्ब खर्वास मोजदादीची गणती येऊन पोहचली असेल. आरबी वाक्याचा अर्थ : "ह्या विषयींची गणती जाणणें एक ईश्वरापासीं मात्र आहे, म्हणजे एक ईश्वर मात्र याचा सुमार जाणतो. यमदूताचे फौजेचीहि गणती एक ईश्वरच जाणतो. दुसरा कोणीच या यमदूताचे फौजेचा सुमार जाणित नाहीं." यांतील तात्पर्य हें आहे कीं, जसें यमदूताचे फौजेचा हिशेब ईश्वर जाणतो, कारण कीं ती फौज अगणित आहे, तसेच या पटकीचे उपद्रवांत फारच मनुष्यें मयत जाहालीं त्यासहि गणती नाहीं. यास्तव याचीहि गणती ईश्वरच जाणतो. असें वाटतें कीं, या पटकीचे उपद्रवांत मनुष्यांचे प्राण आकर्षक करण्यास यमदूत देखिल थकले असतील. महामारीचा उपद्रव नव्हे. हा ईश्वराचाच कहर आहे. आरबी वाक्याचा अर्थ : "हे ईश्वरा, आम्हास या नर्कांचे संकटापासून वाचीव. प्रळय करणारा जबरदस्त जो ईश्वर त्या ईश्वराची काये इछा आहे हे कांहींच कळत नाहीं. एकंदर पृथ्वीचा संहार करून महाप्रळय करण्याचा बेत आहे असें दिसते." पारसी बैतेचा अर्थ : "या संकटात पृथ्वी नाश पावली. हें एकच संकट प्राप्त जाहालें आहे असें नाहीं. शेकडों संकटें प्राप्त झालीं. या प्रळयांत व या संकटांत व या वर्षांत माझे नेत्राचें बुभळांतील पुतळीचाहि वियोग जाहाला नाहीं : २ : वियोगाचे जर करितां कोणी मस्तक कापील तर तात्काळ आपले मापुकेची भेटी जाहाली असें होईल : ३ : "हरएक प्रकारें ईश्वर क्षमा करो व या समयांत जे मरण पावले आहेत त्यांचे अपराध पैगंबराचे ममतेच्या योगानें ईश्वर क्षमा करो व याच आठवे वर्षावरच या विघ्नाची समाप्ति करो. या पूर्वी सुलतान शिकंदर पादशाहा मरण पावल्यापासून यद्यपि मनुष्यास प्रपंचाची बहुत अडचण जाहाली. शूरत्व नाहींसे झाल्यामुळें व श्रेष्ठ व कुलीन पुरुषांची कदरदानीहि नाहींसी झाली. यास्तव सर्व मनुष्यें या राजधानीस नांवें ठेवित होतीं. या दक्षिण देशांतच हजारों व लाखों मनुष्यें कुलीन व श्रेष्ठ होतीं व याशिवाये दक्षिणची हजारों मनुष्यें हिंदुस्थान व विलायत व आरबस्तान वगैरे ठिकाणीं जागोजाग चाकरीवर राहून पोटास अन्न मिळवित होतीं आणि प्राण वाचऊन आयुष्याचे दिवस घालवीत होती. या आश्रयानें तर्फेतर्फेतील मनुष्यें व सर्व व्यापारी लोक यांजलाहि व्यापाराजोगा दिवस होता. यद्यापि पूर्ण सुख व बहुतसी स्वस्थता प्राप्त नव्हती, तत्रापि

या इंग्रजांचे अमलांत श्रेष्ठ सिपाई लोक, कुलीन पुरुष, शेख व सय्यद, मोंगल व पठाणं, व आरब हे एकाएकीं एकदाच खिन्नतेचे एकदांच आपलें नांव कोणास न कळूं देण्याचे गलीत घुसले, म्हणजे हे सर्व लोक निखालस खिन्न व नाउमेद होऊन एक वेळ रात्रीस तरी खावयास भाकरी तरी मिळो असी इच्छा करणारे होऊन, म्हणजे या मंडळींची अशी दशा होऊन, या मंडळीपैकीं कांहींसे फारच थोडे लोक इंग्रज सरकारचे चाकरीवर राहिले आहेत. त्या लोकांची योग्यता महार व चांभाराचे नीचपणाचें योग्यतेच्या बराबर आहे, म्हणजे इंग्रजाचे अमलांत सहरहू जातीचे लोक व महार व चांभार सारखेच झाले आहेत. हे इंग्रज सय्यद व शेख याजला व चांभार व धेड याजला एका ताजव्यांत एकसारखेच वजन जोखितात, म्हणजे सय्यद वगैरे जातीचे लोकांस व महार चांभारास एकसारखेंच मानितात. बहुतकरून इंग्रज लोकांपासी महारास जितकीं योग्यता आहे तितकीं सेख व सय्यद यांजला नाहीं. हे ईश्वरा, काय चमत्कारिक योग्यता न ओळखण्याचा गुण इंग्रज लोकामध्यें आहे. आरबी वाक्याचा अर्थ : "त्या गोष्टीपासून ईश्वर आधार देवो," म्हणजे या इंग्रज लोकांचे हातून ईश्वर वाचवो. आदम पैगंबराचे समयापासून हा वेळपर्यंत हरएक हिंदु व मुसलमान जातीपासी धोंड्यात व रत्नांत फरक होता व मोत्यांत व काचेचे काळे मण्याचे पोतीत फरक होतो. म्हणजे हिंदु व मुसलमान धोंड्यास व रत्नात, काळे पोतीस व मोत्यास भिनतेने ओळखीत होते. ते दोनीहि एकसारखेच मोजीत नव्हते. इंग्रज खुद जातीनें बहुत अकलवान व फार समजदार व मोठे विद्वान असें आपणास जाणतात आणि या गोष्टीवर फार डौल मिरवितात. परंतु हा सदरी लिहिलेल्या पदार्थाचा फरक जाणीत नाहींत व ओळखीत नाहींत, म्हणजे अकलवान म्हणवीत असोन धोंड्यास व रत्नास, काचेचे मण्यास व मोत्यास एकसारखेच मानितात, म्हणजे सर्व जातीस व महार चांभारास एकसारखेच मानितात. यामुळें सर्व मनुष्यांस बहुत दरिद्र व खाण्यापिण्यास अन्न देखिल मिळेनासे झालें. अन्नदाता ईश्वर आतां या मंडळीस अन्न देवो. आरबी वाक्याचा अर्थ : "पैगंबराचे बरकतीनें व त्याचे श्रेष्ठ वंशाचे बरकतीनें कृपा करो. मुसलमान लोकांचे शास्त्रांत व मुसलमानांचे ज्ञातीचे ब्याहात्तर भेद आहेत. अधर्मी हिंदु लोकांचे ज्ञातींत सातसे भेद आहेत. ते दोनीहि जातीचे भेदांतील ज्ञातींत धर्म करणें व बक्षीस देणें व खैरात करणेंची चाल चालू आहे. परंतु हे इंग्रज लोक धर्म म्हणोन काय पदार्थ आहे हें जाणत नाहींत, बक्षीस देणें म्हणोन काय पदार्थ आहे हे ओळखीत नाहींत. खैरात करणें व सतकें, म्हणजे उतारे, या पदार्थांस तर हे इंग्रज लोक कदापि आपलेपासीं प्रवेश होऊ देत नाहींत. या इंग्रज लोकांत अकल जुजरस आहे. जुजरस म्हणजे प्रपंच विषयाची अकल परमार्थ विषयाची अकल नव्हे. इंग्रज लोकांचे अकलेस हरएक पदार्थ हरण करणें हें उत्तम आहे. आपले हातून

कोणास कांहीं देणें हें फार वाईट कर्म आहे, म्हणजे इंग्रज लोकांस दुसऱ्याचें हरण करणें एवढें मात्र बरें वाटतें. कोणास कांहीं देणें पसंत येत नाहीं अशी यांची चाल आहे. ही गोष्ट अक्कलवान पुरूषापासी फार अयोग्य व रद केलेली आहे. बहुधा हे इंग्रज लोक ईश्वरी मार्गांत द्रव्य खर्च करणें व गोरगरीब लोकांस धर्म करणें व बक्षीस देणें हें फार मूर्खत्वाचें कर्म आहे असें समजतात. हे कर्म भ्रांत पुरुषांचे भ्रांतीप्रमाणें व वेड्यासारखे समजतात, म्हणजे धर्म करितो व बक्षिस देतो तो वेडा व त्यास खुळ लागलें असें समजतात. हे ईश्वरा, हें काय आश्चर्य आहे कीं, इंग्रज लोकांपुढें गुणाचा दुर्गुण जाहाला, विद्या खराबीनें बदल झाली. आरबी वाक्याचा अर्थ : "ईश्वरी मार्गांत तुम्ही जर द्रव्य खर्च न कराल आणि कितीहि ईश्वराची सेवा कराल तर तुम्ही उत्तम पदास पावणार नाहीं. ईश्वर तुमची विनंती कबूल करणार नाहीं. ईश्वरी मार्गांत द्रव्य खर्च कराल तर ईश्वरहि तुम्हांस उतम पदास पाववील." हे इंग्रज लोक कांहींच खबर ठेवीत नाहींत. कदाचित हे इंग्रज वेखस, म्हणजे एक वेळ प्राणोत्क्रमण झाले म्हणजे पुन्हा लिंग देह धारण करूत सर्व मेलेले उठतात व हाषर म्हणजे सर्वांस पाप पुण्याचा हिशेब द्यावयास एक ठिकाणीं जमा करितात व नषर म्हणजे पापपुण्याची झडती घेतल्यास हरएकांचे कर्मांप्रमाणें निरनिराळे जन्मास घालितात या गोष्टीची या इंग्रज लोकांस कांहींच खबर नाहीं. येविषयीचें विचारास हें इंग्रज योग्य नाहींत. परलोकीं पापपुण्याची झडती द्यावी लागते ही गोष्ट इंग्रज लोक सत्य मानित नाहींत. प्रत्यक्ष इंग्रज लोक आपणास आहाले किताब म्हणवितात. आहाले किताब म्हणजे चार कुराने उतरली आहेत त्यापैकी इंजील म्हणोन कुरान आहे त्या ग्रंथाचे हे अधिकारी म्हणवितात. असे असोन समजत नाहींत. कोणता ग्रंथ या इंग्रज लोकांचे हातीं लागला आहे कीं, त्या ग्रंथात धर्म करणें व बक्षीस देण्याचा विस्तार लिहिलाच नाहीं. पुण्य कर्म, खैरात व उत्तम मार्ग त्या ग्रंथात लिहिलाच नाहीं असा कोणता ग्रंथ आहे ? हे इंग्रज लोक त्या ग्रंथाचे अधिकारी म्हणवितात. हे कांहींच कळत नाहीं. कोणताच असा पैगंबर झाला नव्हता कीं त्यामध्येंहि धर्म करण्याची वगैरे उत्तम लक्षणें नव्हतीं. सत्य विचार पाहातां धर्म करणें व बक्षीस देणें हीं खास ईश्वराचे लक्षणापैकींच लक्षणें आहेत. कारण कीं या लक्षणांनी ईश्वर आपणास दाता व दयाळू असें म्हणवितो. ईश्वरानीं पैगंबरास याच लक्षणांचा उपदेश केला आहे. हरएक मनुष्याचे बुध्धीनें कृपणता म्हणजे हलकटपणाचे कर्म फार वाईट आहे. धर्म करणें व बक्षीस देणें हें फार उत्तम कर्म आहे, असें सर्व जाणितात. प्रत्यक्षास प्रमाणाचें कारण नाहीं. मंतिकचे विद्येंत तसऊर अनेक प्रकारचे लिहिले आहेत. त्यात मुख्य तसऊराची दोन लक्षणें लिहिलीं आहेत. एक तसऊरे बहिंदी म्हणजे कोणी म्हणेल कीं अग्निनें आंग भाजते

असें बोलल्यास अग्निनें आंग भाजते किंवा नाहीं हे पोथी काढून शास्त्रांत पाहाण्याचें कारण नाहीं. प्रत्यक्ष दृष्टीस येतें कीं, अग्निनें आंग भाजेल यांत कांहीं संशय नाहीं. या तसऊरे बदिही असें म्हणतात तसऊरे जबरिया म्हणजे कोणीं म्हणेल स्वर्गांतील बाग असा आहे तर ते कांहीं प्रत्यक्ष दिसत नाहीं. शास्त्रावरूनच सत्य मानावें लागतें. या चिंतनास तसऊरे जबरिया असें म्हणतात. तसऊर म्हणजे चिंतन. तेव्हां प्रत्यक्षाचे विचारास अनुमानाचा विचार कसा येईल? यावरून धर्म करणें हें उत्तम लक्षण. कोणास कांहीं न देणें हें अयोग्य लक्षण. हें सर्व लहानथोर मनुष्यास समजतें. यास कांहीं प्रमाण पाहाण्याचें कारण नाहीं. असो. हे इंग्रज लोक कोणास कांहीं देत नाहींत. सर्वांचे हरण मात्र करितात. येणेंकरूनहि मनुष्यास दरिद्रास व खाण्यापिण्यास अन्न न मिळण्याचें कारण जाहालें. कारण कीं, सर्वांस प्रसिध्ध आहे कीं, जेव्हां सरदार लोक व अमीर लोक उदारपणा धारण करितात आणि धर्म करणें व बक्षीस देणें चालवितात तेव्हां सर्वांस सुख व संतोष प्राप्त होतो. पुन्हां कोणाचेच आर्जव करण्याचें कारण नाहीं असें सर्व सुखांत राहातात. सारांश, या अकल्याणकारक कारकीर्दीत, म्हणजे इंग्रज लोकांचे कारकीर्दीत, हजारो व लाखो थोर थोर मनुष्यें रोजगार नसल्यामुळें अन्नवस्त्रास महाग होऊन अत्यंत संकटांत पडोन खराब जाहलेत, रडत बसलेत व भडकत फिरूं लागले. कोणी एक यांची अवस्था विचारण्यास येत नाहीं. या मनुष्यास एक जवा बराबर देखिल किंमतीस खरेदी घेत नाहींत. दरमहा पगार व मुशाहिरा देऊन हे इंग्रज लोक खिदमतगार-पणाचें चाकरीवर देखील या लोकांस ठेवित नाहींत. हे ईश्वरा, हे देवाधिदेवा, आता या गोरगरीब मनुष्यांचे वाचणें कसें होईल? हे बिचारे लोक कसे वांचतिल? हीं मनुष्यें आपले आयुष्याचें दिवस कसे घालवितील? याची फिकीर तुजला आहे. कारण कीं सर्व दयावंतावर दया करणारा व धर्मवानावर कृपा करणारा तूं आहेस. हे ईश्वरा, कृपा कर आणि या दीन व अनाथ मनुष्यांचे अवस्थेवर कृपादृष्टीनें अवलोकन कर. या धोंड्यासारखे हृदयाचे जमातीस, म्हणजे या निर्दय कठीण मनाचे इंग्रज लोकांस, या गोरबरीब पीडा पावलेल्या मनुष्याविषयीं मेणासारखे मऊ कर, म्हणजे या गोरगरीबाविषयीं या इंग्रज लोकांचे कठीण मनांत कांहीं दया उपजे असें कर, किंवा या इंग्रज लोकांचा उच्छेद करून या इंग्रज लोकांचे ठिकाणीं कोणी दयावंत पुरुषास आणून स्थापन कर. हे ईश्वरा, हे ईश्वरा, हे ईश्वरा, तीन वेळ हे ईश्वरा असें म्हणण्यांतील तात्पर्य हें आहे कीं, हे ईश्वरास करूणा भाकली असतां त्यांत सर्व कल्याण आहे. निश्चयास्तव कोणतेहि शब्दाचा तीन वेळ उच्चार आहे. त्यांतील कारण हें आहे कीं, ईश्वरास करूणा भाकण्यांतच कल्याण आहे.

**येथून हा ग्रंथ समाप्त जाहाला असे :**

## ९०. भाषांतरकाराचा उपसंहार

विजापूर येथील पादशाही कारकीर्दीचे आरंभापासून शेवटपर्यंत जीं जीं प्रकर्णे व लढाया व अनेक राज्यकारभाराचे मजकूर युसफ आदिलशाहा पादशाहा या मूळ पुरुषापासून शिकंदर आदिलशाहा पादशाहा या समाप्तीचे पादशाहापर्यंत व तेथून राजधानी संस्थान दिल्ली येथील अमलगीर पादशाहाची कारकीर्द व तेथून नबाब आसफज्याह बहादूर संस्थान हैदराबाद याची कारकीर्द व तेथून पेशवाई कारकीर्द व त्यापुढें इंग्रज सरकारचा अंमल होय तोपर्यंत जें झालें तें सर्व तारिखवार झाडा लिहिलेला बुसातीने सलातीन म्हणोन पारसी ग्रंथ आहे त्या ग्रंथाचा मराठी भाषेंत तरजुमा केला असता सर्वांस अर्थ समजुतींत येईल असें जाणोन आली जेनाब फेंज इंनिसाब गरीब परवर करमगुस्तेस्कर मेहरबान कदरदान हजरत बारटल फ्रीयर साहेब, इस्कोयर, कमिशनर बाहादूर, इलाखा सातारा, यांही मेहरबानगी करून मी नरसिंगराव विठल पारसनीस या मज सेवकास सदरहू पारसी किताबीचा अर्थ महाराष्ट्र भाषेंत करण्याविषयीं आज्ञा केली. त्यावरून सदरहू पारसी किताबीचा अर्थ ' फरहंगे जेहानगिरी, ' ' बुरहान काते, ' ' कंजुल्लुगांत, ' ' कषफुल्लुगात ' ' मुतखबुल्लुगाते शाहजेहानी ' व ' नाविदुलफुज्ला, ' वगैरे फरहंगीचे म्हणजे कोशांचे आधारानें सर्व विद्वान लोकांस पसंत पडे असा सप्रमाण अर्थ पारसी शब्द न सोडितां महाराष्ट्र भाषेंत मेळ घालून यथामती केला आहे. परंतु एखादे ठिकाणीं विद्वान लोकांस चूक आढळल्यास त्या चुकीवर झांकण घालावें, वर्म काढूं नये ह्याविषयीं फारसींत प्रमाण आहे तो बैत—

### पारसी बैत

बिपोश गर बकताए रसी व ताना मजान
के हेच नफस बशर खाली अजकता नबूवद

بپوش گر بخطا رسی و طعنه مزن
که هیچ نفس بشر خالی از خطا نبود

### याचा अर्थ

जर करितां तुजला एखादी चूक आढळली तर त्या चुकीवर झांकण घाल: कारण कीं ज्या मनुष्याचे हातून चुकी घडत नाहीं असा कोणीच मनुष्य नाहीं : १ :

ह्याविषयींच आणखीहि पारसीत प्रमाण म्हणजे वाक्य आहेत. त्या बैता अर्थासहित लिहिल्या जात आहेत.

### फारसी बैत

तमादारम के गरना शुकरफे
बिखानद जीं मोहब्बतनामा हरफे

### याचा अर्थ

माझी इच्छा आहे कीं जर करितां एखादा कोणी उत्तम पुरुष एकाएकी या मित्रता भरलेले पत्रांतून एखादें अक्षर वाचील : १ :

### फारसी बैत

जदूरा दूर गर बीनद खताई
नयारद बरसरे-मन माजराए

### याचा अर्थ

ग्रंथ वाचून पाहाते वेळेस आसपास ग्रंथात कोठे चूक आढळल्यास माझ्या माथ्यावर कांही शब्द आणूं नये.

### फारसी बैत

बखदेरे वसा दर इसलाह कोशद
वगर इसलाह नतवानत बेपोशद

### याचा अर्थ

आपल्या सामर्थ्यांनी चूक आढळेल तेथें शुध्द करावें व जर करितां शुध्द करण्याचे सामर्थ्य नसल्यास चूक काढूं नये चूक झाकावी. : १ :

असे आहे. हा ग्रंथ साहेब कमिशनर बाहादूर यांचे आज्ञेबरहुकूम या सेवकाचे हातून श्रीगुरूचे कृपेंकरून समाप्त झाला. या ग्रंथाचे पारसी बैतेंचे वर्णनांत विवरण करून त्या बैतेंतच ग्रंथ समाप्तीची तारिख बांधली आहे, त्या पारसी बैता—

### पारसी बैत

जि फजले अभिजद सुव्हान इन्सिरामे किताब
नमूदशुद बसलाहे कमिशनर साहेब

### याचा अर्थ

पवित्र ईश्वराचे कृपेंकरून ग्रंथाची समाप्ती : कमिशनर साहेब यांचे विचारानें झाली आहे : १ :

### फारसी बैत

चू खत्म अज पै तारीख साले इत्तिमामश
दिलम बेगुफत शुमारो कमिशनर साहब

### याचा अर्थ

त्याचे म्हणणे त्या ग्रंथाचे समाप्तीचे वर्षाची तारीख जेव्हां मी शोध करून पाहिली : माझे चित्त बोललें कीं कमिशनर साहेब शुमारद ' म्हणजे जाणतो.

'शुभारद कमिशनर साहेब' इतकी अक्षरें अबजदचे हिशेबानें गणिलीं असतां १२६६ बाराशे सहासष्ट हिजरीचा सन निघतो. या सनांत हा ग्रंथ शहर सातारा येथें सुा इहिदे खमसैन मयातैन व अलफ छ २९ जिल्हेज मुा तारीख ५ माहे नवंबर सन १८५० इसवी सन, १२६० फसली, कार्तिक शुा १ प्रतिपदा शके १७७२ साधारणनाम संवत्सरे रोज मंगळवारीं प्रातःकाळीं समाप्त झाला असे.

सदरहू तारखेस ग्रंथ समाप्त झालेला मेहरबान फ्रीयर साहेब बाहादूर, कमिशनर इलाखा, सातारा, यानीं करविला. तो गत वर्षी त्यांचा त्यांस दिला. त्या ग्रंथाची प्रत श्रीमन्महाराज छत्रपति स्वामी राजधानी संस्थान करवीर यांहीं मी नरसिंगराव विठल पारसनीस निसबत सरकार इलाखा सातारा या मज सेवकास समक्ष आज्ञा केली कीं सदरहू ग्रंथाची एक प्रत या सरकारांत तुम्ही लिहून हजर करून स्वामिसेवा करून दाखवावी. त्यावरून ही प्रत लिहिली. हे लिहिणें आज मिति कार्तिक शुा १ प्रतिपदा शके १७७३ विरोधकृतनाम संवत्सरे, तारीख २५ माहे आक्टोबर सन १८५१ इसवी, रोजीं समाप्त झालेला हा ग्रंथ शहर सातारा येथें सदरहू मितीस समाप्त करून श्रीमंत छत्रपति स्वामी संस्थान करवीर यांचे सेवेंत हजर केला असे. दस्तूर नरसिंगराव विठल पारसनीस निा सरकार इलाखा सातारा.

# संदर्भ--ग्रंथ--सूचि


काव्येसं    काव्येतिहास-संग्रह, भाग ३१ वा, शाहाजीची कैफियत.

जेधेक    जेधे यांचा करीना, शिवचरित्र प्रदीप.

जेधेश    जेधेंची शकावली, शिवचरित्र प्रदीप.

बुइमा    बुऱ्हाण-इ-मासीरचा अनुवाद—अहमदनगरची निजामशाही, संपा. भ. ग. कुंटे, मुंबई, १९६२.

माशाच    मालोजीराजे आणि शहाजी महाराज यांची विचिकित्सक चरित्रें, वा. सी. बेंद्रे, पुणें, १९६७

मुघोप्रइ    मुधोळ संस्थानच्या घोरपडे घराण्याचा इतिहास, संपा. द. वि. आपटे, पुणें, १९३४.

शामकै    शाहाजी महाराजांची कैफियत, काव्येतिहास संग्रह, भाग ३१ वा, संपा. का. ना. साने, कल्याण.

शिचप्र    शिवचरित्रप्रदीप, संपा. द. वि. आपटे व स. म. दिवेकर, भा. इ. सं. मं. पु. ग्रं. क्र. ४, पुणें, १९२५.

शिवाया    शिवापूर संग्रहांतील यादी, शिवचरित्र प्रदीप.

शिवाश    शिवापूरकर देशपांडे दप्तरांतील शकावली, शिवचरित्र प्रदीप.

A:S    Amal-i-Salih by Muhammad Salih Kambu, The History of India as told by its own Historians by Sir H. M. Elliot and Prof. John Dawson, Kitab Mahal Edition, Vol. VII, No. LXV, p. 123-132.

AN    Akbar-Nama by Shaikh Abul Fazl, Elliot & Dawson, Vol. VI, No. XLII, p. 1-102.

BN    Badshah Nama by Abdul Hamid Lahori, Elliot & Dawson, Vol. VII, No. LXII, p. 3-72.

Brig F. ferista    History of the Rise of the Mahanedan Power in India, till the year A. D. 1612 : Translation from the original of Mahomed Kasim Ferista by John Briggs, Vol. III, Calcutta 1910.

E & D    The History of India as told by its own Historions by Sir H. M. Elliot and Prof. John Dawson, Kitab Mahal, edition, Vols. VI to VIII.

INJ Ikbalnama-i-Jahangir of Mutamad Khan, Vol. No. LVII, E & D, p. 400-438.

KKED Muntakhabul Lubab of Muhammed Hashim Khafi Khan, E & D, Vol. VII, No. LXXIX, p. 207-533.

KKMC Muntakhabul Lubab of Muhammed Hashim Khafi Khan, Translation in full, Mackenzie Collection, India Office library, London (MSS).

MAN Muhamad Nama-Translation by B. D. Varma, Shivaji Nibandhavale, Poona, 1931.

MiA Ma-asir-i-Alamgiri of Muhamad Saki Mustaid Khan E & D, Vol, VII, No. LXXIII, p. 181-197 and trans. of Jadu Nath Sarkar, Calcutta 1947.

MIN A Study of Muslim Inscriptions, by V S. Bendrey, Karnatak Printing Press, Bombay-2.

SJN Shah Jahan Nama of Inayat Khan, E & D, Vol. VII, No. LXIII, p. 73-122.

TAA Tarikh-i-Ali Adilshahi, E & D. Vol VIII.

TAN Takmila-i-Akbar Nama of Inayatulla E & D. Vol. VII, No. XLIII, p. 103-115.

TiJ Tuzuk-i-Jahangiri or Memoirs of Jahangir translated by Alexander Rogers, Vol. I & II, London, 1909.

TiMQ Tarikh-i-Muhammad Qutbshahi, E & D, Vol. VIII.

WiJ Dwazde Sale Jahangiri-Wakaiul-i Jahangiri, E & D., Vol. VII, No. LV. p. 276-391.




## मुंबई मराठी ग्रंथ-संग्रहालयाच्या
## इतिहास संशोधन मंडळाची ग्रंथमाला

| | | |
|---|---|---|
| १. | **पानिपतचा संग्राम**–श्री. सेतुमाधवराव पगडी व. प्रा. न. र. फाटक | रु. ५–०० |
| २. | **घाशीराम कोतवाल**–संपा. प्रा. न. र. फाटक | रु. ४–०० |
| ३. | **मुंबईचे वर्णन**–प्रा. न. र. फाटक | रु. ८–०० |
| ४. | **मराठे व निजाम**–श्री. सेतुमाधवराव पगडी | रु. ७–०० |
| ५. | **गड–कोट–दुर्ग व त्यांची वास्तु**–श्री. वा. सी. बेंद्रे | रु. ३–०० |
| ६. | **इतिहास संशोधन पद्धति**–श्री. के. मो. पंडित | रु. ०–७५ |
| ७. | **राणा जयसिंग आणि शिवाजी महाराज**–श्री. वा. सी. बेंद्रे | रु. ६–०० |
| ८. | **रट्टवंशीय बल्लाळ यांचा अर्धापूर शिलालेख**–श्री. न. शं. पोहनेरकर व हरिहर ठोसर | रु. २–०० |
| ९. | **महाराष्ट्रेतिहास परिषद्**–अधिवेशन पहिले–**निबंधसंग्रह**–संपा. श्री. वा. सी. बेंद्रे | रु. ८–०० |
| १०. | **जुन्या मासिक त्रैमासिकांत प्रसिद्ध झालेली महाराष्ट्रेतिहासाची साधनें**–संपा. श्री. वा. सी. बेंद्रे, विभाग पहिला–प्रास्ताविक, सूचि वगैरे | रु. १५–०० |
| ११. | ,, ,, विभाग दुसरा– (इ. स. १५०१ ते १७५०) | रु. २०–०० |
| १२. | ,, ,, विभाग तिसरा–(इ. स. १७५१ ते १८८०) | रु. २०–०० |
| १३. | शिवाजी महाराजांचे थोरले बंधु–‘**संभाजीराजे भोसले**–’ श्री. वा. सी. बेंद्रे | रु. २–०० |
| १४. | **महाराष्ट्रेतिहासाचे संशोधनक्षेत्र व साधनसंपत्ति**–श्री. वा. सी. बेंद्रे | रु. ४–०० |
| १५. | **महाराष्ट्रेतिहास परिषद्**–अधिवेशन दुसरे–**निबंधसंग्रह**–संपा. श्री. वा. सी. बेंद्रे | रु. ८–०० |
| १६. | **पोर्तुगीजांच्या महाराष्ट्रांतील हालचाली**–(सतराव्या शतकाच्या पूर्वार्धातील) –श्री. वा. सी. बेंद्रे | रु. ६–०० |
| १७. | Downfall of Angre's Navy by Shri V. S. Bendrey | Rs. 4-00 |
| १८. | **विजापूरची आदिलशाही**–संपा. श्री. वा. सी. बेंद्रे | रु. २०–०० |
| १९. | **महाराष्ट्रेतिहास परिषद्**–अधिवेशन तिसरे–**निबंधसंग्रह** संपा. श्री. वा. सी. बेंद्रे | रु. १०–०० |